नंतर पंडितजींच्या विनंतीवरून सर शंकरन् नायर यांनीं अध्यक्षस्थान स्वीकारलें. ही निवडणूक बॅ. बॅप्टिस्टा यांना पसंत नसल्यामुळें तिला 'मी हरकत घेईन' अशी बॅ. जिना यांना त्यांनीं आगाऊ नोटीसहि दिली होती; पण ज्यांनी सभा बोलाविली त्यांनाच अध्यक्ष नेमण्याचा अधिकार असतो असा एक आधार दाखवून जिना यांनीं या हरकतीला हरकतहि घेतली होती, म्हणून बॅ. बॅप्टिस्टा यांनीं सभेंत फक्त हा वृत्तान्त उघड करून स्वतः चें समाधान केलें. पंजाबांत लष्करी कायदा सुरू झाला त्याला सर शंकरन् नायर यांनीं संमति दिली होती यामुळें त्यांच्या निवडणुकीस बॅप्टिस्टा यांची हरकत होती असें म्हणतात. असो. अध्यक्ष स्थानापन्न झाल्यावर जयकरांनीं सहानुभूतिदर्शक कांहीं तारा वाचून दाखविल्या. मग बॅ. जिना हे बोलावयास उठले. त्यांनीं आपल्या भाषणांत असें सांगितलें कीं, हल्लीं चाललेला सामना थांबविण्याकरितां जरी ही परिषद बोलाविली गेली आहे, तरी चालकांची जबाबदारी बरीच मोठी आहे. कारण समेट व्हावयाचा तो उभयपक्षांचा अपमान न होईल अशा रीतीनेंच झाला पाहिजे. पण ती रीति कोणती हाच मुख्य प्रश्न आहे. व्हाइसरॉयसाहेबांना राष्ट्रीय सभा अमुक एक गोष्ट करील अगर न करील असें नक्की आश्वासन पाहिजे. तें मिळेल तर समेटाचा विचार करण्यास ते अजूनहि तयार आहेत; करतां आपण एकविचार करून निश्चित स्वरूपाचे ठराव मंजूर केले पाहिजेत. शेवटीं चालकांनीं योजलेल्या मसुद्याचा त्यांनीं थोडाबहुत खुलासा केला व ते कोणत्या शब्दांनीं मंजूर करावयाचे हें आतां सभेनेंच ठरवावें असें सांगितलें.

नंतर महात्मा गांधी यांनीं राष्ट्रीय सभा व असहकारिता पक्ष यांच्यातर्फें भाषण केलें. ते म्हणाले, " आपण इतक्या अनेक पक्षांचे लोक एकविचारासाठीं एकत्र जमलों ही आनंदाची गोष्ट आहे. कित्येकांच्या मतें मी भलत्याच एका मार्गानें वाहत चाललों आहे. पण माझ्या मतें मीं युक्तायुक्त विचार अद्यापि टाकलेला नाहीं, व माझे विचार मी अगदीं खुल्या दिलानें सांगणार आहे. सभेच्या चालकांप्रमाणें राष्ट्रीय सभावाल्यांशींहि मीं कालआज या विषयाची खासगी चर्चा केली आहे व आम्हीं असें ठरविलें आहे कीं, समेट घडून येणें इष्ट असलें तरी या परिषदेंत असहकारितावाद्यांनीं हजर राहून सहानुभूति दर्शविण्यापलीकडे प्रत्यक्ष कोणताहि भाग घेऊं नये. ठराव सर्वानुमतें मंजूर होण्यासारखें करण्याला इतर पक्षांच्या

लोकांना आपलीं तत्त्वें सोडावीं लागूं नयेत याकरितां, व आमच्या लोकांनीं बोलून आणखी वादविवादच फुकट वाढेल याकरितां, आम्ही गप्पच बसणार आहोंत. आम्ही विचाराल ती सल्लामसमत देऊं, पण ठरावावर मतें देणार नाहीं. सर्व लोक असहकारितावादी बनावेत असें मला स्वतःला अर्थातच वाटतें; पण सर्व लोक कांहीं तसे बनूं शकत नाहींत. यामुळें उभयपक्षाच्या विचारांच्या दरम्यान भिंत आड राहणारच. योजलेले ठराव सामान्यतः बरें असले तरी अगदीं हवे तसे नाहींत. सरकारची दडपशाही एकदोन नैमित्तिक कायद्यांपुरती नसून पीनल कोड, प्रोसीजर कोड, पोलीस ॲक्ट असल्या नित्य व सामान्य कायद्यांचाहि सरकार बेशरमपणें आज सर्रास दुरुपयोग करीत आहे. कित्येक ठिकाणीं तर पंजाबांतील लष्करी कायदाहि बरा असें म्हणण्याची पाळी आली आहे. सरकारची ही जुलमी व अन्यायी बुद्धि पालटण्यास त्यांना खरा पश्चात्तापच झाला पाहिजे; व आम्ही दुर्घट स्वार्थत्याग करूं तरच त्यांच्या या बुद्धीवर न्यायाचें सिंचन होऊन ती दुरुस्त होईल. समेटाचें बोलणेंच जर लॉर्ड रेडिंग यांना करावयाचें तर, व्यक्ति या नात्यानें, मी एकहि अट न घालतां 'पायानें चालत या' म्हटलें तरी त्यांच्या छावणींत जाईन. पण हा प्रश्न माझ्या स्वाभिमानाचा नसून किंवा समेटाची परिषद कोणीकडून तरी भरविली जावी एवढाच नसून, ती भरली तर यशस्वी कशी होईल याचाच आहे. अर्थात् देशांतील दूषित सरकारी वातावरण सरकारच्याच पश्चात्तापानें शुद्ध झालें पाहिजे. परिषद भरली व ती सरकारच्या गुरमीमुळें फुकट गेली तर तिचा काय उपयोग? जोंपर्यंत ही गुरमी जाणार नाहीं तोंपर्यंत वाटेल त्या कायद्याच्या शब्दांतून सरकार दडपशाहीचा चौचाकी रथ जोरानें हाकून रस्ता हवा तसा रुंद करून घेणार! कायद्याचा दिमाख सरकार दाखवितें, पण तो कायदा स्वतः केव्हांच पाळीत नाहीं! हरताळ वगैरे प्रसंगीं कांहीं ठिकाणीं असहकारितावादी म्हणविणारांकडून अयोग्य वर्तन झालें हें मीं कबूल करून त्याचा निषेधहि केला आहे; पण त्या मानानें सरकारचे अन्याय फार मोठे व अनुपेक्षणीय आहेत. कायदा व शिस्त हीं लोकांनाहि हवीं आहेत; पण या गोड नांवाखालीं सरकार आज काय वाटेल ते अत्याचार करीत आहे. सरकारनें केली म्हणून ती अराजकता होत नाहीं, व सरकारनें केला म्हणून अन्याय हा न्यायच होतो असें मानणारा मी नाहीं. उद्यां स्वराज्य झालें म्हणजे तुमचे अधिकारीहि कदाचित् लष्करी

कायदा एकादे ठिकाणीं सुरू करतील पण निदान ते जनतेला जबाबदार तरी राहतील. परकी राज्यांत मनुष्यस्वभावाचे सर्व दुर्गुण अधिकाऱ्यांत असतातच पण त्यांचा कान धरणारा कोणी नाहीं हीच खरी आपत्ति असते. इतर ठरावांसंबंधानें महात्माजी म्हणाले कीं, नैमित्तिक दडपशाहीच्या कायद्यांच्याच काय पण नित्य व सामान्य अशा कायद्यांच्याहि दुरुपयोगानें तुरुंगांत खितपत पडलेले सर्व कैदी सरकार मुक्त करील तर सरकारला पश्चात्ताप झाला असें मानतां येईल. मी या बंदिवानांकरितां करुणा भाकीत नाहीं किंवा भीक मागत नाहीं. ते सर्व तुरुंगांत खुशाल असून सुटका व्हावी अशी त्यांचीहि इच्छा नाहीं. तुरुंगांत गेल्यापासून कांहीं गलेलठ्ठ लोकांचें थोडें मांस कमी झालें व विश्रांतीमुळें कांहीं हाडकोळ्या माणसांचे अंगांतील मांस शेरअच्छेर वाढलें या दोनहि गोष्टी इष्टच आहेत. पंडितजी म्हणतात, स्वार्थत्यागाचा कहर गुदरला, कडेलोट झाला! मीं म्हणतों, खरा कहर तर अद्यापि दूरच आहे. पण सरकारच्या दडपशाहीचें तोंड माघारें फिरलें इतकें तरी स्पष्ट दिसावयास पाहिजे. सरकारचाहि अपमान व्हावा अशी आमची इच्छा नाहीं. त्यांना द्यावयाचें तें वाटेल तर उदारपणानें द्यावें; पण तें देण्यास आम्हीं त्यांना भाग पाडलें असें होऊं नये, यांतच त्यांचा मान राहील. नेमस्त मित्रमंडळींनाहि आमचें असें सांगणें आहे कीं, असहकारितावादी आज स्वार्थत्यागाचा धडा शिकत आहेत व उद्यां फांसावर लटकाविलें तरी देशाकरितां आनंदानें कसें मरावयाचें हें त्यांना शिकावयाचें आहे. त्यांचा वाढता स्वार्थत्याग पाहून नेमस्तांना आवेश आला तर तो मला हवा आहे. एरवीं त्यांनाहि बुद्धि आहे व त्यांना हें सर्व कळतेंच. त्यांनीं योग्य वाटतील ते ठराव करावे व आम्ही जरी या परिषदेच्या कामांत प्रत्यक्ष भाग घेऊं इच्छीत नाहीं तरी इतर रीतीनें मदत लागेल ती आम्ही देऊं."

म. गांधींचें भाषण झाल्यावर नटराजन् यांनीं त्यांना विचारलें कीं, सरकारला उद्देशून ठरावांत केलेली विनंति त्यांनीं मान्य केली तर असहकारितावादी समेटाकरितां आपली चळवळ थांबवितील कीं नाहीं? त्याला महात्माजींनीं उत्तर दिलें कीं, 'होय, हरताळ, पिकेटिंग वगैरे सर्व चळवळी समेटाच्या प्रश्नाचा निकाल लागेपर्यंत आम्ही थांबवूं.'

नंतर नेमस्त पक्षाचे पुढारी सर होर्मसजी वाडिया म्हणाले, "नेमस्त लोकांनाहि स्वराज्य हवें, पण अराजकता नको. दडपशाहीच्या कामींहि सर-

कारचा आम्ही निषेधच करणार. सीझर, नेपोलियन, बोर्बोन, हॅप्सबर्ग इत्यादि जुलमी राजांनीं शांततेच्या व कायद्याच्या नांवाखालीं पूर्वी जें केलें तेंच इंग्रज सरकार आज करीत आहे. नागरिकत्वाच्या हक्कांची किंमत देऊन आम्ही शांतता विकत घेऊं इच्छीत नाहीं. आम्ही पंजाबांतील अत्याचार विसरलें नाहीं. सुधारणांच्या मंथनांतून अमृत निघेल असें वाटलें होतें तें खास निघालें नाहीं, भाग्य उदयास येईलसें वाटलें होतें तें आलें नाहीं, व दडपशाही तर इतकी दुष्टपणाची चालली आहे कीं, वरिष्ठ कार्यकारी कौन्सिलांतील हिंदी सभासद व प्रांतिक कौन्सिलांतील प्रधानमंडळ अद्यापि राजीनामे दिल्याशिवाय कसे गप्प बसले याचेंच आश्चर्य वाटतें. पण महात्माजींनाहि माझें असें सांगणें आहे कीं, कायदेभंगाची चळवळ खालच्या लोकांत भडकूं न देतां त्यांनीं ती सुशिक्षितांपुरती मर्यादित ठेवावी."

बमनजी शेठ म्हणाले, "इतक्यांतच तह कसला? आयर्लंडच्या चळवळीचें मनन करा. मवाळ लोक म्हणजे हिंदुस्थानांतील अल्स्टर पक्ष! त्यांनीं कोणता स्वार्थत्याग आजवर केला म्हणून त्यांना कोणी मान द्यावा? हे शिष्ट म्हणे राउंड टेबल कॉन्फरन्स भरविणार! सरकारी पगारानें खिसे भरणाऱ्या व सरकारी कृपेनें सुख पावणाऱ्या लोकांची मध्यस्थी कशी उपयोगी पडणार? बरें, त्यांना झालें तरी सरकार कोठें विचारतें आहे? तेंहि बेजबाबदारच. खरा तह सरकार व राष्ट्रीय सभा यांचा यांनींच ठरवावा. आतां परिषद भरविलीच व या लोकांना निमंत्रणेंहि दिलीं व ते आले हें ठीक आहे. यांतूनहि काय होईल तें होऊं द्या."

जमशेठजी वाडिया म्हणाले, "समेट होत असेल तर गांधिजींनीं साधें पिकेटिंग देखील बंद करावें. सरकार घाबरलें आहे हें बिकानेर येथें लॉर्ड रेडिंग यांनीं केलेल्या भाषणावरून दिसतच आहे. आम्ही तटस्थ असलों तरी आमची सहानुभूति असहकारितावादी लोकांकडेच आहे; कारण तेच स्वार्थत्यागी आहेत. मवाळांनीं कोणता स्वार्थत्याग आजवर केला?"

पं. कुंझरू म्हणाले, "उभयपक्षांनींहि दिल्याघेतल्याशिवाय समेट होणार नाहीं. ठराव आहेत असे उभयपक्षांनाहि थोडथोडे अमान्य आहेत. पूर्ण एकमत न होईल तर ठराव मंजूर करूं नयेत. सरकारच्या निषेधाबरोबर शांतताभंगाचा निषेधहि झाला पाहिजे."

प्रो. रुचिराम शहाणी म्हणाले, "राउंड टेबल कॉन्फरन्स जरूर व्हावें, पण मध्यस्थांनीं सरकारास असें विचारावें कीं, 'नेमस्त म्हणविणारे लोक ज्या मागण्या करतील त्या तरी तुम्ही मान्य कराल काय? कीं हा आपला सगळा तोंडच्या वाऱ्याचाच खेळ?"

शेषगिरी अय्यर म्हणाले कीं, "या परिषदेंत म. गांधी भाग घेत नाहींत, त्याअर्थीं त्यांना राउंड टेबल कॉन्फरन्स खरें कितपत हवें हें कोणी म्हणावें?"

सत्यमूर्ति म्हणाले, "अखेरच्या सभेंत काय मागण्या मागाव्या याचा आतां इतक्यांत विचार करूं नये. सामान्य कायद्यानें शिक्षा झालेले लोकहि तुरुंगांतून सोडावे. न सोडले तरी मनानें ते आपणापाशीं हजर आहेतच. सरकार सभेटाला कबूल होईल तर पिकेटिंगसारख्या चळवळीहि थांबविण्यांत याव्या."

श्रीनिवास आयंगार म्हणाले, "राउंड टेबल कॉन्फरन्स घडून न येईल किंवा व्यर्थ होईल तर सरकारला मात्र फायदा मिळेल. कारण आम्हीं आज चालविलेल्या चळवळीहि थांबविणार. आंध्र प्रांतांत लोक कायदेभंगाला कसे उत्सुक झाले आहेत! पिकेटिंगसारख्या चळवळींत शांतताभंग होतो हा सरकारचा शुद्ध कांगावा आहे. समेट हवा तर मवाळांनींहि असहकारितेविरुद्ध चालविलेली चळवळ थांबविली पाहिजे. परिषद भरविण्यांत अडचण असेल तर लॉर्ड रेडिंग यांनीं एकट्या महात्मा गांधींना बोलाविलें तरी पुरें; कारण ते राष्ट्रीय सभेचे सर्वाधिकारी आहेत. आम्हांला सदुपदेश करणाऱ्या मवाळांनीं असहकारिता पत्करिली तर उद्यां घडावयाचें तें आजच घडून येईल!"

प्रो. मुकर्जी म्हणाले कीं, "परस्पर माजलेला गैरसमज नाहींसा होऊन सरकार समजूतदार बनेल तर गांधी त्यांना समेटाचा मार्ग दाखवितील."

पं. गोकर्णनाथ मिश्र म्हणाले, "मी पक्का स्वराज्यवादी असतां केवळ तपशिलाविषयींच्या मतभेदामुळें मी उघड असहकारितावादी बनलों नाहीं. पण संयुक्त प्रांतांत आतां सरकारनें दडपशाहीचा इतका कहर केला आहे कीं, आमच्या सगळ्या आशा नष्ट झाल्या; सुधारणा फोल ठरल्या. गव्हर्नरांनीं जाहीरपणें सांगितलें कीं, या दडपशाहीला प्रधानमंडळाचीहि संमति होती. याचा जबाब प्रधान देतील काय? माझ्या प्रांतांतील नेमस्त लोकांना असहकारिता मान्य नसली तरी राजकीय चळवळ व नागरिकत्वाचे हक्क सरकारनें पायांखालीं तुडविल्यावर त्यांना झालें तरी कायदेभंगाशिवाय आतां काय उरलें?"

यानंतर विमादलाल, पेटीट, मोरियॅम वगैरे गृहस्थांचीं भाषणें झाल्यावर खुलाशादाखल म. गांधी म्हणाले कीं, " या परिषदेंत भाग न घेतांहि तिच्या कार्याला शक्य ती सर्व मदत करण्याची माझी इच्छा आहे हें मी पुनः स्पष्ट सांगतों. मतभेदाच्या नदीवर पूल बांधावयाचा असेल तर त्याला आम्ही मदतगार होऊं इच्छितों. पण ठरावांची जबाबदारी पत्करीत नाहीं. फक्त इतरांनीं ते मान्य केले तरी त्याला कांहीं थोडें वजन येणार नाहीं. एकमतच व्हावयाचें असेल तर कांहीं ठराव अधिक खंबीर केले पाहिजेत. स्पेशल कायद्यापेक्षांहि सामान्य कायद्याच्या बाबतींत सरकारनें अधिक जुलूम केला आहे. कायदेभंगाकरितां जे तुरुंगांत गेले त्यांनीं आपखुषीनें तुरुंगवास ओढवून घेतला असें तरी म्हणतां येईल. पण, पी. को. १२४ अ, क्रि. प्रो. को. १०७–१०८ वगैरेखालीं खटले झाले ते सरकारनेंच नाहक उपस्थित केले. निदान इतकें खास म्हणतां येईल कीं, शांतताभंग क्वचित् कोठें होत असला तरी सरकार उपाय म्हणून जे योजिते ते वाजवीहून अधिक कडक असतात. ज्यांनीं अत्याचार केले असतील त्यांना तुरुंगांतून सोडा असें मी म्हणत नाहीं. फार काय, पण कोणालाच तुरुंगांतून सोडा असेंहि हवें तर मी म्हणत नाहीं. हरताळ देखील थांबवीन. पण पश्चात्तापाचा एक तरी शब्द बोलून सरकार आमचा स्वाभिमान राखील तर मी सभेट व्हावा असेंच म्हणतों. पण नेमस्त मित्रांनीं आमच्यावर जोर चालवून नसत्या अटी घालूं नयेत. मध्यस्थांनीं आमच्याकडच्याप्रमाणें सरकारकडेहि जाऊन यावें व मग आपण फिरून एकत्र बसून विचार करूं. सरकार आम्हीं म्हणूं तें करण्यास कबूल असेल तर आमच्यांत एकमत होणेंहि कठीण नाहीं. दक्षिण आफ्रिकेला स्वराज्य दिलें तेव्हां सरकार लोकांना म्हणालें, एकमतानें जसें मागाल तसें देऊं. तेव्हां लोकांनींहि एकमत केलें व अखेर स्वराज्यदानाचा कायदा करतांना मुख्य प्रधान कॅंबेल बॅनरमन् म्हणाले कीं, ' लोकांनीं एकमतानें जो मसुदा पाठविला तो मला शिरसावंद्य आहे. मी त्यांतील व्याकरणाची चूक देखील दुरुस्त करणार नाहीं, किंवा कानामात्रा फिरविण्याचीहि जबाबदारी घेणार नाहीं."

शेवटीं बॅ. जिना यांनीं थोडासा खुलासा केल्यावर ठरावांची भाषा नक्की करण्याकरितां सुमारें वीस लोकांची एक कमिटी नेमण्यांत आली, त्यांत सर्व पक्षाचे लोक घातले होते. तथापि पूर्वी ठरल्याप्रमाणें असहकारितावाद्यांतर्फे

एकटे गांधीजीच कमिटींत हजर राहतील असें सांगण्यांत आलें व पहिल्या दिवसाचें परिषदेचें काम संपलें.

त्या रात्रीं महात्माजींच्या घरीं खाजगी सभा होऊन ठरावांत काय दुरुस्ती करावी, तसेंच खुद्द राउंड टेबल कॉन्फरन्सपुढें कशी बाजू मांडावी याविषयीं चर्चा झाली व असें ठरलें कीं, दुसऱ्या दिवसाच्या कार्यक्रमांतहि असहकारितावाद्यांनीं तटस्थच राहावें.

## दिवस दुसरा

दुसऱ्या दिवशीं ( रविवारीं ) सकाळीं दहा वाजल्यापासून, मध्यंतरीं फक्त अर्धा तास विश्रांति घेऊन या कमिटीचें काम सायंकाळीं सहा वाजेपर्यंत चाललें होतें. बाहेर गर्दी जमून सभासद वाट पाहून कंटाळले. अखेर सहा वाजतां दरबार खुला होऊन परिषदेचें काम पुन्हा सुरू झालें. पूर्वींचे अध्यक्ष सर शंकरन् नायर हे मतभेदामुळें काम सोडून निघून गेल्यामुळें त्यांच्या जागीं सर विश्वेश्वरअय्या यांची निवडणूक झाली व बॅ. जिना यांनीं वाचून दाखविलेले दुरुस्त ठराव अध्यक्षांनीं सभेपुढें एकेक मांडले.

नंतर चर्चेस सुरुवात झाली. प्रथम 'गुजराथी' पत्राचे माजी संपादक नारायणराव गोखले यांनींहि असा सवाल केला कीं, म. गांधी हे पुढील कार्यक्रमांत भाग घेणार कीं नाहीं ? त्यावर व इतर प्रश्नांवर खुलासादाखल म. गांधी म्हणाले कीं, " कार्यक्रमांत भाग न घेण्याचा आमचा निश्चय कायम आहे. आम्ही फक्त हजर राहूं इच्छितों व सल्लामसलत देऊन मदत करूं. ता. ३१ जानेवारीपर्यंत सभेटाच्या प्रश्नाचा निकाल न लागल्यास, पूर्वी थांबविलेल्या व नव्याहि सर्व चळवळी आम्हांस फिरून सुरू कराव्या लागतील. लॉर्ड रेडिंग काय किंवा नेमस्त बंधु काय, उभयतांशींहि मिटतें घेण्यास मी तयार आहें. नेमस्तांच्या भिडेला बळीं पडून त्यांची मर्जी राखण्याकरितां मी अनेक सूचना मंजूरहि केल्या. स्वयंसेवक नोंदविण्यासारख्या गोष्टी चालू राहतील. अर्थात् कायदेभंगाची पूर्वतयारी चालू राहील. पण दारूच्या गुत्त्यांपुढील साध्या शांततेच्या पिकेटिंगसारख्या चळवळीहि थांबवूं. या चळवळी थांबविण्याचें कबूल केल्यानें एरोड येथील स्त्रिया व पुण्यांतील शंकरराव लवाट्यांसारखे निःस्वार्थी अनत्याचारी पिकेटिंगचे पुढारी यांचा मजवर रोष

होईल. परंतु तो रोष पत्करून देखील त्यांना मी ही गोष्ट थांबविण्यास विनंति करीन राउंड टेबल. कॉन्फरन्समध्यें पंजाब-खिलाफतीच्या मागणीप्रमाणें वसाहतीच्या स्वरूपाच्या स्वराज्याची मागणी जोरानें करूं; या मागण्यांत रति-भर कमी होणार नाहीं. मागण्या पुऱ्या होण्याच्या रीतींत किंवा कृतींत मात्र सवलती देणें शक्य आहे. पण मागण्या अढळ राहतील हें स्पष्ट जाणूनच वाटेल तर राउंड टेबल कॉन्फरन्स भरवावें; नाहीं तर भरवूं नये हें मी आतांच बजावतों. कांहीं न मिळाल्यानें चळवळींत आम्ही नामशेष होऊन गेलों तरी बेहत्तर! पण निदान मनानें तरी स्वतंत्र राहूं. नुसतें परतंत्र जिणें घेऊन काय करावयाचें ?"

हें उत्तर ऐकून नारायणराव गोखले व इतर एकदोन नेमस्त गृहस्थ सभागृह सोडून निघून गेले.

शेषागिरी अय्यर म्हणाले कीं, "कालचा माझा ग्रह आज बदलला. म. गांधी हे कार्यक्रमांत भाग घेत नाहींत. यामुळें परिषदेचें कार्य सर्व व्यर्थ जातें असें नाहीं. जसें एका बाजूला सरकार स्वतंत्र, तशी दुसऱ्या बाजूला राष्ट्रीय सभेची वर्किंग कमिटी आहे. गांधी व असहकारितावादी यांखेरीज जे आपण इतर सभासद हेच खरे मध्यस्थ आहोंत व आपण दोघांशींहि निरनिराळे स्वतंत्र बोलूं शकतों. हीच मध्यस्थीची योजना वाजवी आहे, व गांधी किंवा राष्ट्रीय सभावाले हे परिषदेंत भाग घेतील तरच उलट काम बिघडेल."

नंतर दळवी वकील यांनीं एका ठरावाला विरोध करून असें सांगितलें कीं, "इतर सर्व उपाय अमलांत आणून ते व्यर्थ गेले असें ठरेपर्यंत कायदेभंगाचा उपाय अमलांत आणण्यांत येऊं नये; अशी ठरावाची भाषा खरी, पण त्यामुळें असा ध्वनि निघतो कीं, हे उपाय थकल्यावर तरी कायदेभंग करावा. पण लिबरल किंवा नेमस्त पक्ष तेव्हांहि कायदेभंग करण्यास तयार होणार नाहीं; म्हणून या ठरावाला नेमस्तांनीं मंजुरी देऊं नये. अलाहाबाद तेथें भरलेल्या आमच्या सभेंत या विषयाला कार्यक्रमपत्रिकेंत जागा दिली असतांहि कांहीं ठराव करण्यांत आला नाहीं."

पंडित कुंझरू म्हणाले कीं, "या परिषदेंत व्यक्तिशः कोणी नेमस्त पक्षीयानें कांहींहि मत दिलें तरी तें एकंदर नेमस्त पक्षावर बंधनकारक होऊं शकत नाहीं. सरकार व असहकारितावाले यांच्या दरम्यान आपणा मध्यस्थांना सोनेरी नाजूक पूल बांधण्यास मदत करावयाची आहे, व येथें अगर बाहेर ज्या ज्या

उपायांनीं ती मदत करतां येईल ती आम्ही जरूर करूं. येथें कोणत्याहि ठरावावर कोणी मतें दिलीं तरी वाहवा, न दिलीं तरी वाहवा; पण मतें घेऊन न मोजलेलींच बरीं."

बॅ. जिना म्हणाले, "विषयनियामक कमिटींत ठरावांची भाषा जेव्हां निश्चित झाली तेव्हां त्यांना अखेर कोणी विरोध केला नाहीं, म्हणूनच आतां त्यावर मतें घेण्यास हरकत नाहीं." पण या गोष्टीचा इनकार पुरुषोत्तमदास वगैरे एकदोन सभासदांनीं केला. नंतर या व इतर ठरावांवर हरचंद्रराय विशनदास, हरिलालभाई देसाई, पी. सी. सेटना, एच्. पी. मोदी, पंडित गोकर्णनाथ मिश्र, मदन मोहन वगैरे गृहस्थांचीं भाषणें होऊन ठराव मंजूर करण्यांत आले. प्रत्यक्ष विरुद्ध मत देणारे असे मनमोहनदास रामजी, दळवी व इतर एकादा दुसरा सभासद इतकेच निघाले अर्थात् विशेष विरोध असा कोणास करावयाचा नाहीं व सामान्यपणें ठराव सर्वांस पसंत आहेत अशा समजुतीनें ते मंजूर झाल्याचें जाहीर करण्यांत आलें. शेवटीं होर्मसजी वाडिया यांनीं अध्यक्षांचे आभार मानल्यावर परिषदेचें काम रात्रीं नऊ वाजतां संपलें.

वरीलप्रमाणें या परिषदेंत सर्व-संमत-प्राय ठरलेल्या मूळ इंग्रजी ठरावांचें भाषांतर खालीं शब्दशः दिलें आहे —

## मुंबईच्या 'शांततापरिषदेचे' ठराव

१ गेल्या कांहीं आठवड्यांपासून हिंदुस्थानांतील कित्येक प्रांतांतून, समित्यांच्या व सभाबंदीच्या कायद्याचें क्षेत्र विस्तृत करून, ते कायदे लागू केले जात आहेत व राजकीय गुन्ह्यांच्या बाबतींत सामान्य कायद्यांचाहि दुरुपयोग केला जात आहे. या योगानें सरसकट धरपकड सुरू झाली असून तिच्या तडाक्यांत कित्येक प्रमुख पुढारी व नागरिक हेहि सांपडले आहेत. सरकारचें हें धोरण लेखनस्वातंत्र्य, भाषणस्वातंत्र्य, संघसंस्थापनस्वातंत्र्य वगैरे नागरिकांच्या अगदीं मूलभूत हक्कांवर निष्कारण हल्ला करणारें आहे असें या सभेस खात्रीनें वाटत आहे. शिवाय तिला असेंहि वाटतें कीं, या धोरणाचा उद्देश तर निष्फळ झालाच आहे. पण वरती जनतेची सहानुभूति नष्ट होऊन लोकांच्या क्षोभांत भरच पडली आहे. यास्तव सरकारनें हें धोरण ताबडतोब बदललें पाहिजे असें या सभेचें स्पष्ट मत आहे.

२ या परिषदेचें असेंहि मत आहे कीं, देशाच्या तक्रारी दूर होऊन पूर्ण जबाबदारीच्या राज्यपद्धतीचा दर्जा प्राप्त करून घेण्यास दुसरा कोणताहि

उपाय उरला नाहीं असें निःसंशय ठरेपर्यंत अहमदाबादच्या राष्ट्रीय महासभेनें ठरविलेल्या कायदेभंगाच्या चळवळीचा उपक्रम करूं नये.

३ ता. २१ डिसेंबर १९२१ रोजीं कलकत्ता येथें व्हाइसरॉयांनीं आपल्या भाषणांत जे विचार प्रदर्शित केले त्यांना मान देण्याच्या हेतूनें व पंजाब आणि खिलाफत यांच्यासंबंधाचीं गाऱ्हाणीं दूर करणें आणि वसाहतींच्या धर्तीचें संपूर्ण स्वराज्य प्राप्त करून घेणें यांच्यासारखे जे महत्त्वाचे प्रश्न आज राष्ट्रापुढें आहेत त्यांचा उभयपक्षांना अपमानकारक न वाटणारा व गोडीगुलाबीचा असा निर्णय लावण्याचे शक्य तितके मार्ग शोधून काढण्याच्या इराद्यानें, सरकार आणि लोकांचे प्रतिनिधी यांची एक तडजोडीची परिषद भरविण्यांत यावी, या सूचनेला ही परिषद दुजोरा देत आहे. शिवाय या परिषदेचें असें मत आहे कीं, वादग्रस्त मुद्द्यांचा निर्विकार मनानें विचार करतां येण्याला अनुकूल वातावरण उत्पन्न होण्याकरितां समित्यांचा कायदा व सभाबंदीचा कायदा लागू करण्यासंबंधाचे जाहीरनामे व त्या कायद्याखालीं निघालेले हुकूम, सरकारनें परत घ्यावे आणि त्या कायद्यान्वयें शिक्षा झालेले, पकडण्यांत आलेले, व खटला चालू असलेले सर्व लोक, तसेंच 'फतव्या'चे बाबतींत शिक्षा झालेले सर्व लोक सोडून द्यावे. तसेंच, ज्या अर्थीं सामान्य कायद्याच्या नांवाखालींहि कित्येक लोकांना, ते शांततेच्या व्रतापासून बिलकूल ढळले नसतांना, शिक्षा झालेल्या आहेत त्या अर्थीं सरकारनें सुचविलेला एक व या परिषदेच्या ५ व्या ठरावांत निर्दिष्ट केलेल्या कमिटीनें निवडलेला एक अशा दोन इसमांची कमिटी, मतभेदाच्या निर्णयार्थ त्यांना सरपंच नेमण्याचा अधिकार देऊन, सरकारनें नेमावी व तिनें अगर सरपंचानें शिफारस केलेले सर्व कैदीहि सोडण्यांत यावे; व तडजोडीच्या परिषदेचा-निकाल होईपर्यंत हरताळ, पिकेटिंग व कायदेभंग थांबविण्यांत यावे असेंहि या परिषदेचें मत आहे.

४ देशांतील आजची आणीबाणीची स्थिति व लवकर तडजोड घडवून आणण्याची आवश्यकता यांकडे लक्ष देतां या परिषदेचें मत असें आहे कीं, शक्य तितक्या लवकर तडजोडीची परिषद (Round Table Conference) बोलाविण्यांत यावी व ब्रिटिश प्रधानमंडळानें सदर परिषदेंत तडजोड घडवून आणण्याकरितां जरूर तो अधिकार व्हाइसरॉयसाहेबांना देऊन ठेवावा.

५ पंजाब, खिलाफत व स्वराज्य या प्रश्नांच्या बाबतींत राष्ट्रांच्या मागण्या काय आहेत, यांच्या तपशिलांत आज न शिरतां ही परिषद पुढील गृहस्थांची एक कमिटी नेमीत असून, एका बाजूला सरकार व दुसऱ्या बाजूला देशांतील महत्त्वाच्या राजकीय संस्था-यांच्याशीं पत्रव्यवहार करून तडजोडीच्या परिषदेचे सभासद व परिषदेची तारीख वगैरे तपशिलाच्या गोष्टी ठरविणें, जरूर तर पुन्हा मध्यस्थ परिषद बोलावणें, व आजचे ठराव अमलांत आणण्याकरितां कराव्या लागणाऱ्या दुसऱ्या आनुषंगिक गोष्टी करणें यासंबंधाचे सर्व अधिकार तिला देत आहे.

**कमिटींतील सभासद**

१ सर विश्वेश्वरअय्या, २ पं. मदन मोहन मालवीय, ३ शेषगिरी अय्यर, ४ सर पी. सी. रॉय, ५ बॅ. जयकर, ६ सर दिनशा पेटिट, ७ सर होर्मसजी वाडिया, ८ बॅ. बॅप्टिस्टा, ९ श्री. रायजादा भगतराम, १० डॉ. गौर, ११ पं. हृदयनाथ कुंझरू, १२ श्री. नटराजन्, १३ श्री. सी. आर. रेड्डी, १४ श्री. सत्यमूर्ति, १५ पं. गोकर्णनाथ मिश्र, १६ प्रो. एस्. सी. मुकर्जी, १७ बॅ. जिना, १८ श्री. जी. एम्. भुर्गी, १९ बॅ. बी. चक्रवर्ती, २० बॅ. हसन इमाम.

कमिटींत आणखी सभासद घेण्याचा अधिकार कमिटीस आहे.

---

# अलाहाबाद येथील स्वराज्य पक्षाची सभा व समेट

( केसरी ता. ६ मार्च १९२३ )

'स्वराज्य' पक्षाच्या अलाहाबाद येथें भरलेल्या सभेचें काम ता. २०, २१ व २२ या दिवशीं चालून स्वराज्य पक्षाची संस्थापना ज्या तत्त्वांवर उभारण्यांत आली आहे तीं तत्त्वें आंखण्यांत आलीं व त्या तत्त्वानुसार त्या पक्षाचा कार्यक्रम व संघटना तयार झाली. वरील तत्त्वें, कार्यक्रम व घटना आलाहिदा पाठविलींच आहेत. स्वराज्य पक्षाची ही सभा नमुनेदार झाली असें म्हणावयास हरकत नाहीं. प्रत्येक प्रश्नाची व तदंगभूत तत्त्वाची चर्चा सांगोपांग व निर्भीडपणें करण्यांत आली. पण एकवार रूपरेषा ठरल्यानंतर 'आणि', 'व' वगैरेसारख्या शब्दांवरसुद्धां अशा तऱ्हेच्या परिषदेच्या, किंबहुना राष्ट्रीय

सभेच्या विषयनियामक कमिटीच्या, सभांतूनहि जो कालापव्यय निष्कारण करण्यांत येतो त्याला सर्वस्वीं फांटा मिळाला होता. चर्चा झाल्यानंतर, त्या-संबंधींचे निर्णय कोणत्या भाषेंत लिहावयाचे हें काम दोघांतिघांच्या तज्ज्ञ कमिटीकडे सोंपविण्यांत आलें होतें. अशा रीतीनें तीन दिवस काम चालल्यानें स्वराज्य पक्षाचा कार्यक्रम बांधेसूद, सुटसुटीत व भरीव बनला आहे.

## समेटाचा प्रश्न

तिसरे दिवशीं, म्हणजे ता. २२ रोजीं, स्वराज्य पक्षास मूर्त स्वरूप दिलें गेल्यानंतर सभेपुढें समेटाचा प्रश्न निघाला. देशबंधु दास यांनीं, मुंबईस स्वराज्य पक्षाच्या कमिटीची सभा भरली होती त्याच वेळीं मौलाना कलम अझाद यांनीं, वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झालेल्या अटी कमिटीपुढें मांडल्यापासून तों तहत् अलाहाबाद व कलकत्ता येथें त्यांची भेट होऊन सदर प्रश्नास मूर्त स्वरूप येईपर्यंतचा इतिहास सांगितला. मुंबई स्वराज्य पक्षाच्या कमिटीनें त्या अटी नाकबूल केल्या होत्या. राष्ट्रीय सभेच्या कारभारी मंडळांत मौलाना अझाद यांच्या आग्रहावरूनच त्या अटी मान्य केल्या होत्या, हीहि गोष्ट सांगण्यांत आली. पंडित मोतिलाल नेहरू व हकीम अजमलखान यांनीं आहेत तशा अटी आपणांस कबूल आहेत असें सांगितल्याचें वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झालें होतें; पण ती गोष्ट खोटी असून त्यांत दोघांनींहि महत्त्वाच्या दुरुस्त्या सुचविल्या होत्या. देशबंधु दास यांनींहि स्वतःच्या म्हणून दुसऱ्या अटी वरील अटींस जोडण्याकरितां मौलानासाहेबांकडे दिल्या होत्या. अशा तऱ्हेनें इतिहास सांगून उत्तर हिंदुस्थानांतील सर्व प्रांतांत फुटीनें विलक्षण परिस्थिति उत्पन्न झाली असून पुन्हा एकवार आपण तत्त्व न सोडतां समेट होत असल्यास करावा अशी विनंति करून त्यांनीं सभेस सदर प्रश्नाची चर्चा करण्यास सांगितलें.

## समेटाचे धागेदोरे

या समेट-प्रकरणाची खरी मक्खी समजण्यास त्याचे पूर्वींचे धागेदोरे नीट लक्षांत घेतले पाहिजेत. मौलाना अबुल कलम अझाद हे कलकत्त्याचे एक मुसलमानी शास्त्रांतील व्युत्पन्न पंडित आहेत. मुसलमानी समाजावर यांचें मोठें वजन असून उलेमांच्या सभेवरहि यांची विलक्षण छाप आहे. १९१४ पासून त्यांनीं खिलाफत-प्रकरणाकरितां पुष्कळ हालअपेष्टा सोसल्या आहेत. हकीम अजमलखान यांचेहि ते स्नेही असून आज त्यांचा शब्द इतर पुढाऱ्यांपेक्षां

अधिक झेलला जातो. अशा गृहस्थाकडून राष्ट्रीय सभेच्या कारभारी मंडळाकडे समेटाचें बोलणें सुरू झाल्यानें कारभारी मंडळांतील लोकांना त्यांना दुखविणें इष्ट वाटलें नाहीं व म्हणूनच त्यांनीं आपली संमति दिली. त्यांच्यापैकीं कांहीं मुत्सद्दयांचा डाव हा कीं, तीन महिने स्वराज्य पक्षास गप्प बसावयास लावून त्यानंतर कायदेभंग सुरू झाला तर ठीकच; न झाला तरी राष्ट्रीय सभेचें खास अधिवेशन भरवून पुनः एकवार राष्ट्रीय सभेकडून कौन्सिलप्रवेशावर नापसंतीचा शिक्का मारवावा व जमल्यास तो निकाल मान्य केलाच पाहिजे अशी अट समेटांत घालून स्वराज्य पक्षाचा पायाच उखडून टाकावा ! प्रसिद्ध झालेल्या मौलानासाहेबांच्या अटी पाहिल्या म्हणजे त्यांतील शेवटच्या कलमांत वरील विष असलेलें चटदिशीं लक्षांत येतें. मौलानासाहेबांस स्वतःस त्याचें सुखदुःख नव्हतेंच. मौलानासाहेबांपुढें एकच प्रश्न होता तो हा कीं, युरोपमध्यें खिलाफतीच्या प्रश्नाची चर्चा चालली असतांना हिंदुस्थानांत एकी आहे असें जगभर दिसावें. स्वराज्य पक्षासहि वरील कारणाकरितांच मौलानासाहेबांस आपण समेटास तयार असून तत्त्व न सोडतां समेट होत असेल तर तो पाहिजे आहे याची खातरजमा करावयाची होती. म्हणूनच पंडितजी, हकीमसाहेब व देशबंधु दास यांनीं स्वराज्य पक्षाची संस्थापना नीट करून मग त्याच्यापुढें प्रश्न मांडून त्याच्या संमतीनेंच समेट करूं असें मौलानासाहेबांस आगाऊ बजाविलें होतें.

## समेटाची चर्चा

स्वराज्य पक्षापुढें ता. २२ रोजीं देशबंधु दास यांनीं हा प्रश्न विचाराकरितां मांडल्यानंतर मौलानासाहेबांनीं स्वतः तासभर भाषण करून एकीचें महत्त्व सांगितलें; व अशी एकी दोन महिने घडून येऊन पुढें जर कायदेभंग झाला नाहीं तर उलेमांचा कौन्सिलप्रवेशाविरुद्ध असलेला फतवा रद्द करणें सोपें जाईल असेंहि सांगितलें. नंतर बरीच चर्चा झाली, प्रसिद्ध झालेल्या अटींवर समेट करणें कोणासच पटत नव्हतें. तत्त्वतःच दोनहि पक्षांच्या परंपरेंत, विचारसरणींत व काम करण्याच्या पद्धतींत फरक असल्यानें समेट होणें शक्य नसल्यानें चार नव्या योजना पुढें मांडण्यांत आल्या. पहिली सूचना अशी होती कीं, गया पक्षानें आपला कौन्सिलविरोधी ठराव मागें घ्यावा व स्वराज्य पक्षानें कौन्सिलची चळवळ चालू ठेवावी. गया पक्षानें पंचवीस लाख रुपये व पन्नास

हजार स्वयंसेवक जमवावे, त्यास स्वराज्य पक्षाचा अडथळा असूं नये; व दोनहि पक्षांस समान असणारा कार्यक्रम दोघांनींहि चालू ठेवावा. या सूचनेंत कोणी कोणास अडथळा करूं नये एवढेंच तत्त्व होतें. दुसरी सूचना अशी होती कीं, उभयपक्षांनीं कौन्सिलची चळवळ एप्रिलअखेर करूं नये; बाकीचा कार्यक्रम आपापल्या रीतीनें चालू ठेवावा, व त्यांत कोणी कोणास अडथळा करूं नये. ता. ३० एप्रिलनंतर ज्याला जो योग्य वाटेल तो कार्यक्रम स्वीकारावा. यामध्यें स्पष्टपणें म्हटलें नसलें तरी असा भावार्थ आहे कीं, स्वराज्य पक्ष कायदेभंगाच्या तयारीच्या आड येणार नाहीं व त्याचा मोबदला म्हणून कौन्सिलच्या चवळवळीच्या आड गया पक्षानें येऊं नये. तिसरी सूचना अशी होती कीं, एप्रिलअखेरपर्यंत कौन्सिलविवाद बंद व्हावा व गयेचा कार्यक्रम दोनहि पक्षांनीं चालवावा. कायदेभंग ठरल्यास उभयतांनींहि तो करावा व न ठरल्यास मात्र त्यापुढें स्वराज्य पक्षाच्या आड गया पक्षानें येऊं नये. येथें हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, या तीनहि सूचनांत राष्ट्रीय सभेच्या जादा अधिवेशनाला जागा दिली गेलेली नाहीं. मौलानासाहेबांनीं केलेली चौथी सूचना म्हणजे राष्ट्रीय सभा भरवून त्या सभेचा निर्णय दोहोंपक्षांनीं मान्य करावा अशा अर्थाची होती. ही सूचना मात्र सर्वानुमतें नापास ठरविण्यांत आली होती. पण चर्चेच्या वेळीं जरूर तर निवडणुकीचे नवीन नियम करून त्याप्रमाणें प्रतिनिधींची निवडणूक झाल्यावर मग राष्ट्रीय सभा भरवावी असें पुढें मांडण्यांत यावें असें ठरलें व ही चर्चा करण्याकरितां देशबंधु दास, पंडित नेहरू, विठ्ठलभाई पटेल, केळकर ( अगर त्यांचे जागीं गोखले ), सत्यमूर्ति व राघवेंद्रराव यांची कमिटी नेमून स्वराज्य पक्षाच्या सभेचें काम संपलें.

## कारभारी मंडळाचा निर्णय

स्वराज्य पक्षानें नेमलेल्या कमिटीची सभा ता. २३–२४–२५ रोजीं भरून त्यांत समेटाच्या अटी मुक्रर करण्यांत आल्या. राष्ट्रीय सभेच्या कारभारी मंडळाची सभा ता. २६ रोजीं अलाहाबादेस भरून त्या सभेस राजगोपाळाचारी, वल्लभभाई पटेल. श्री. सरोजिनी नायडू, गंगाधरराव देशपांडे, टी. प्रकाशम्, राजेंद्रप्रसाद, मोअझमअल्ली, जमनलाल बजाज वगैरे मंडळी हजर होती. त्यांनीं समेटाच्या प्रश्नावर खासगी रीतीनें सहासात तास चर्चा करून त्यांच्यातर्फे बोलणें करण्याकरितां राजगोपाळाचारी, वल्लभभाई पटेल व मोअझमअल्ली यांची नेमणूक केली. स्वराज्य पक्षानें दास, नेहरू व पटेल यांची नेमणूक केली.

या सहा प्रतिनिधींच्या बैठकींत अनेक प्रश्नांची चर्चा होऊन कारभारी मंडळानें पहिली व तिसरी सूचना नापसंत केली. दुसरी सूचना पसंत केली, पण तींत दोहों पक्षांनीं विधायक कार्यक्रम पुढें ढकलण्याकरितां निधि व स्वयंसेवक एकत्र काम करून मिळवावे अशी पुस्ती जोडली. मौलानासाहेबांनीं मुंबईस केलेल्या सूचनेंत त्यांच्या पसंतीनेंच केलेली सुधारणासुद्धां त्यांना मान्य झाली नाहीं व राजगोपाळाचार्यांनीं तर नवीनच सूचना केल्या व दोनहि पक्षांचे प्रतिनिधी वरील सूचनांसह आपल्या पक्षाचा सल्ला घेण्याकरितां गेले. दोनच सूचना शिल्लक राहिल्या होत्या व त्या दोनहि कारभारी मंडळास मान्य होत्या. अर्थातच कोणती तरी एक सूचना मान्य करणें स्वराज्य पक्षास जरूर होतें. म्हणून त्या पक्षानें चौथी सूचना नाकारली व दुसरी सूचना पसंत केली आणि तीच दोहों पक्षांस संमत झाल्या कारणानें ठरावरूपानें पुढें आणण्यांत आली व ऑ. इं. कॉं. कमिटीची सभा भरून तींत हा समेट मंजूर करण्यांत आला.

## ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीची सभा

'स्वराज्य' पक्षानें निश्चित केलेल्या आणि राष्ट्रीय सभेच्या कारभारी मंडळानें मान्य केलेल्या समेटाच्या अटींचा विचार करण्याकरितां ऑ. इं. कॉं. कमिटीची सभा मंगळवार ता. २७ रोजीं पंडित नेहरू यांच्या आनंदभवनांत भरली. सभेला अवघे ९८ सभासद हजर होते. दोन वाजतां सभेला प्रारंभ व्हावयाचा होता; परंतु वर्किंग कमिटी व स्वराज्य पक्ष यांच्या वाटाघाटीचा निकाल न लागल्यामुळें सभासदांस तिष्ठत राहावें लागलें.

तीन वाजतां बैठकीस सुरुवात झाली. दासबाबूंनीं पंडित मालवीयजी यांनीं अध्यक्षस्थान स्वीकारावें असें सुचविलें. त्यास नेहरूंनीं अनुमोदन दिलें. पण मालवीयजींनीं अध्यक्षाची माळ दासबाबूंच्या अंगावर फेंकली; सरोजिनीबाईंनीं हातास हात लावला! दासबाबू नको नको म्हणत होते; पण मालवीयजी त्यांच्या कानांत कांहीं कुजबुजले. अशा रीतीनें 'आपके वास्ते, आपके वास्ते' असा थोडासा औपचारिक प्रकार होऊन अखेरीस

## देशबंधु दास

अध्यक्षस्थानीं बसल्यावर ते म्हणाले, मीं अध्यक्षपदाचा राजीनामा दिला आहे, आणि समेटाच्या अटींत मला माझ्या पक्षातर्फे बोलावें लागेल. याकरितां मी अध्यक्षपद स्वीकारण्यास नाराज होतों; पण आपल्या आग्रहास्तव मी हें

स्थान स्वीकारतों. पण आजच्या सभेंत माझ्या राजीनाम्याचा प्रश्न पुढें येऊं नये. यानंतर राजगोपाळाचारी यांनीं समेटाच्या अटी वाचून दाखविल्या आणि नेहरूंनीं त्यांना दुजोरा दिला.

या अटी ऐकतांच कट्टया ना-फेरवाल्या सभासदांकडून प्रश्नांचा भडिमार सुरू झाला. दासबाबू व नेहरू यांनीं अथपासून इतिपर्यंतची सरळ हकीकत सांगून कारभारी मंडळानें त्या अटी मान्य केल्याचें सांगितलें. ना-फेरवाल्यांना 'इकडे आड, इकडे विहीर' अशी अडचण येऊन पडली. वर्किंग कमिटीनें, विशेषत: डेप्युटी महात्मा राजगोपाळाचारी यांनीं, अटी कबूल केल्यावर त्या झिडकारणेंहि योग्य नव्हतें व स्वीकारण्याला तर मन कचरत होतें. ना-फेर-वाल्यांत कुजबूज सुरू झाली. कांहीं वेळानें मुंबईचे आर. वेंकटराम हे समेट नामंजूर करावा असें सुचवण्याकरितां उभे राहिले; पण मौज ही कीं, या अटी मान्य केल्याबद्दल वर्किंग कमिटीला दोष न देतां, असल्या अटी पुढें केल्याबद्दल स्वराज्य पक्षासच त्यांनीं दोष दिला! अझाद, सोभानी यांनीं वेंकटरामजींस दुजोरा दिला. पंडित रुचिरामहि त्यांतच सामील झाले. उलटपक्षीं श्यामसुंदर चक्रवर्ति यांनीं समेटाला अनुकूल भाषण केलें. बहुतेक ना-फेरवाले अशा 'दुदिल्या' स्थितींत घुटमळत असतां

## सरोजिनीबाई

समेट घडवून आणण्यास पुढें सरसावल्या आणि त्यांच्या 'वसंतकूजिता'नें सभासदांचा राग शांत झाला. तथापि समेटाबद्दल एकमत होत नाहीं असें पाहून दासबाबूंनीं उपसूचना मागविल्या; त्याबरोबर पांचचार उपसूचना पुढें आल्या. आगाऊ नोटीस नसल्यामुळें व प्रत्येक उपसूचना रीतसर पुढें येऊन तिला अनुमोदन न मिळाल्यामुळें त्यांवर मतें घेण्यास कांहीं सभासदांनीं हरकत घेतली. परंतु दासबाबूंनीं मतें मोजलीं आणि सर्व उपसूचना नामंजूर झाल्याचें जाहीर केलें. तेव्हां पुन्हा हरदासाचें तट्टू पूर्वपदावर आलें! त्या वेळीं राज-गोपाळजी उठून कायसेंसें बोलले, पण तेवढ्याचा जादूप्रमाणें परिणाम झाला आणि त्यांनींच पुढें मांडलेला व पंडित नेहरूंनीं दुजोरा दिलेला समेटाचा मूळ ठराव बहुमतानें मंजूर झाला. ठराव एकमतानें मंजूर होईल अशी डेप्युटी महात्माजींची फार अपेक्षा होती. परंतु दासपक्षाच्या तडजोडीला हाणून पाडून त्यांच्या डोक्यावर अबुल कलम यांची एकांगी तडजोड लादण्याचा चंग बांधून

आलेल्या ना-फेरवाल्यांचें मन इतकें खट्टू झालें कीं, त्यांनीं आपला हट्ट अखेर-पर्यंत कायम राखून समेटाला विरोध केलाच. आतां अटी बहुमतानें मंजूर झाल्यामुळें त्यांच्यावर बंधनकारक झालेल्या या समेटांतील अटी ते कितपत प्रामाणिकपणें पाळतात तें दिसून येईलच. समेटाच्या अटी पुढें दिल्या-प्रमाणें आहेत.

**समेटाच्या अटी**

१ दोनहि पक्षांकडून ३० एप्रिलपर्यंत कौन्सिलचे बाबतींत कांहीं एक चळवळ केली जाऊं नये.

२ तोंपर्यंत दोनहि पक्षांनीं आपआपला बाकीचा कार्यक्रम एकमेकांच्या कामांत व्यत्यय न आणतां पार पाडावा.

३ बहुसंख्याक पक्षानें गया कॉंग्रेसच्या ठरावानुसार कायदेभंग करण्यासाठीं फंड व स्वयंसेवक जमवावे.

४ मतभेद नसलेल्या विधायक कार्यक्रमाकरितां स्वयंसेवक आणि पैसे जम-विण्यास आणि तो कार्यक्रम व उभयपक्षास मान्य असलेल्या इतर बाबी पार पाडण्यास अल्पसंख्याक पक्षानें बहुसंख्याक पक्षास मदत करावी.

५ ता. ३० एप्रिलनंतर दोनहि पक्षांस आपणास योग्य दिसेल त्या मार्गाचा अवलंब करण्यास हरकत नसावी.

६ हल्लींच्या कौन्सिलांची योग्य मुदत भरण्यापूर्वींच कोणत्याहि प्रांतांत कौन्सिलच्या नव्या निवडणुकी करण्याचें सरकारनें ठरविल्यास या तडजोडीच्या अटी बंधनकारक मानूं नयेत.

---

# दिल्ली येथील बातमीपत्रें

## पत्र नं. १

हल्लींची पुण्याची समशीतोष्ण हवा टाकून दिल्लीच्या या थंडीच्या कडाक्यांत येऊन पडणें ही कांहीं सुखाची गोष्ट नव्हे. पण हवेची तुलना कर-तांना दिल्ली व पुणें अशी ती न करतां सिमला व दिल्ली अशीच केली पाहिजे. कालप्रमाणें हवेच्याहि सुखदुःखोपभोगाचें कारण राजाच म्हणावा लागतो! पुण्यापेक्षां दिल्लीची हवा अधिक थंड खरी; पण सिमल्यास तर आज

बर्फांचे डोंगर रचले गेले असतील त्यांची वाट काय? हिंदुस्थान सरकारची खरी मुख्य कचेरी सिमल्यासच आहे, पण या दिवसांत सिमल्यास राहणें साहेबलोकांनाहि शक्य नाहीं म्हणूनच ती खालीं दिल्लीला येते. अर्थात् तुलनेनें दिल्लीची हवा अधिक सुखकर ठरते. पण ही सुखकर हवा इतकी थंडगार आहे कीं, खिडक्यांच्या तावदानांवरील दहिंवराच्या झालरी व यदृच्छालिखित चित्रें सकाळीं नऊ वाजेपर्यंत पाहावयास सांपडतात, आणि बाजारांतील दुकानांतून तूप किंवा खोबऱ्याचें तेल विकत घेतलें तर तें खुशाल कागदांत गुंडाळून देतात ! रात्रीं पारा ३५ अंशांपर्यंत जातो म्हणतात. फक्त बर्फ मात्र पडत नाहीं. पण कौन्सिलचें कामकाज आणखी सुमारें दोन महिने चालावयाचें असल्यामुळें दिल्ली सोडतांना कदाचित् येथील प्रखर उन्हाळ्याला दोष देत जावें लागण्याचाहि संभव आहे.

* * *

पण अंगांतील ही थंडी घालविण्याची एक सोय आयतीच झाली आहे ती अशी कीं, बहुतेक कौन्सिलर लोकांच्या राहण्याच्या जागा व कौन्सिलें भरण्याच्या जागा यांत सुमारें सात साडेसात मैल, व शहरापासून सुमारें पांच मैल इतकें अंतर असल्यामुळें दिवसांतून शरीराला चलनवलन आपोआप बरेंच मिळतें. कलकत्त्याचा विस्तार फार मोठा म्हणतात, पण नवी दिल्ली झाल्यापासून अंतराचे बाबतींत कलकत्ता खास मागें पडणार, आणि नव्या दिल्लीला तर नुकता कोठें आतां प्रारंभ आहे ! सिमल्यास सरकारनें आजवर रयतेचे कोट्यवधि रुपये कसे खर्च केले ही गोष्ट सामान्य जनतेच्या दृष्टीआड राहते. कारण सरकारी कामाशिवाय सिमल्यास जातो कोण ? पण नवी दिल्ली राजधानी वसविण्याच्या हौसेखातर सरकारनें नव्या दिल्लीच्या रचनेवर खर्चलेला पैसा पाण्यापेक्षांहि पातळ असला पाहिजे ही गोष्ट त्यांतील रस्ते, चौक, चक्रव्यूह व जमिनीवर थोडेंसें डोकें वर काढलेल्या अपुऱ्याच पण प्रचंड इमारती यांवरून पूर्ण पटण्यासारखी आहे. कलकत्त्याहून दिल्लीला राजधानी आणण्याचीं सरकारचीं इतर कारणें कांहींहि असोत पण वैभवेच्छेच्या बाबतींत इंग्रज सरकारनें मोगल बादशहांच्यावर ताणच नसली तरी त्यांच्याशीं स्पर्धा करण्याची आकांक्षा धरली आहे खास ! जुन्या काळीं धान्य व धान्यामुळें मजुरी हीं दोनहि स्वस्त असत इतकें तरी वैभवाची हौस फेडून घेणाऱ्या जुन्या राजांच्यातर्फे म्हणतां येण्यासारखें होतें. पण हल्लींच्या महागाईच्या

दिवसांत जुन्या काळच्या वैभवाशीं स्पर्धा करूं पाहणारें सरकार हातानें किती उधळें व मनानें किती अविचारी असलें पाहिजे याची कल्पना नव्या दिल्लीच्या कल्पनेबरोबरच येते.

पण उधळपट्टी हा हिंदुस्थानांतील परकीय सरकारावर एक मोठा आरोप असला तरी त्याहून मोठे असे इतरहि आरोप त्यांच्यावर आहेत, व हे सर्व सरकारच्या विरुद्ध आजवर पूर्णपणें शाबीत झाले असल्या कारणानेंच, स्वराज्याची चळवळ आणि तदंगभूत कौन्सिलांतील व कौन्सिलाबाहेरील लोकप्रतिनिधींचा उद्योग सुरू आहे. हे आंतील व बाहेरील उद्योग वास्तविक एकाच रेल्वेच्या मार्गाचे, पण फक्त स्टेशनच्या यार्डांत होणारे, दोन फाटे असून या दोन फाट्यांपैकीं एका रुळावरून दुसऱ्या रुळावर व दुसऱ्यावरून पहिल्यावर इंजिन व सबंध गाडीहि जशी सहज नेतां येते, तशीच कौन्सिलांतील चळवळ व कौन्सिलाबाहेरील चळवळ यांच्या संबंधाची स्थिति आहे. पण आंतील काय, किंवा बाहेराल काय चळवळीला खरें तेज येण्यास सगळया जनतेनें व तिच्या पुढाऱ्यांनीं एकाच दृष्टीनें पाहिलें पाहिजे व आपलेपणा मानला पाहिजे. सुदैवानें महात्मा गांधी यांच्या हल्लींच्या उदाहरणावरून, या दोनहि चळवळींबद्दल कोणी सारखाच आपलेपणा मानण्याचें मनांत आणलें तर तें शक्य आहे असें दिसून येईल. महात्माजी तुरुंगांत होते तोंपर्यंत त्यांचीं मतें व विचार, त्यांत आपल्या पदरचा मसाला घालून, लोकांपुढें मांडणें कित्येकांना सहजच सुलभ झालें होतें. पण महात्माजी, त्यांच्यावरील शस्त्रक्रियेनंतर, मोकळेपणानें मित्रमंडळीशीं बोलूं लागल्यापासून, कौन्सिलवादी हे कोणी परके नव्हेत, आपलेच आहेत, त्यांना यश मिळालें तर तें आपलेंच आणि न मिळालें तर त्यांना येणारा कमीपणा तोहि आपलाच, असें महात्माजींना वाटत असल्याचें त्यांच्या अनेक मित्रांनीं अनुमान केलें आहे व तें खोटें असेल असें आम्हांस वाटत नाहीं. हें सर्व सांगण्याचें कारण इतकेंच कीं, असहकारितावाद्यांनीं देखील कौन्सिलच्या कामकाजाकडे सहानुभूतीनें पाहिलें तर त्यांत देशाचें कल्याणच आहे. या एका विशिष्ट कामांत स्वराज्य पक्षानें पुढाकार घेतला असेल; पण विधायक कार्यक्रम ज्यांच्या हिताकरितां करावयाचा त्यांच्याहून अन्य कोणाचें तरी हित कौन्सिलांतील चळवळ साधणार असें थोडेंच आहे !

असो. कट्टर म्हणविणारे किंवा म्हटले जाणारे लोक हा विवेक करोत वा न करोत, स्वराज्य पक्षानें कौन्सिलांतील चळवळींत जें पाऊल एकदां पुढें टाकलें

आहे तें तो मागें घेणार नाहीं व त्याला तें मागें घेण्याचें कारणहि नाहीं. कां कीं, त्याचें भावी उद्दिष्ट मनासारखें सर्व सफळ होवो वा न होवो, नुसत्या नव्या निवडणुकींनींच सरकारच्या मनांत दहशत बसली आहे हें नागपूरच्या व बंगालच्या उदाहरणांवरून उघड झालेंच आहे. आणि आतां लेजिस्लेटिव्ह असेंब्लींतहि हा अनुभव लवकरच येईल. असेंब्लींत स्वराज्य पक्षाच्या पत्रिकेवर प्रत्यक्ष सही केलेले सभासद अवघे ४५ असले तरी एकाच विचाराचा व एकाच शिस्तीनें चालणाऱ्या सभासदांचा एवढा एकटा गट किंवा कंपू सरकारास आजवर कौन्सिलांत पाहावयास सांपडला नव्हता. लोकनियुक्त १०४ सभासदांपैकीं स्वराज्य पक्षाला ४५ च सभासद लाभावे ही गोष्ट त्या पक्षाला कमीपणा आणणारी नसून ती कांहीं अंशीं परिस्थितीला व कांहीं अंशीं विद्यमान कार्यपद्धतीला कमीपणा आणणारी आहे. फांसा पडेल तसेंच कोणी झाला तरी दान देणार, आणि स्वराज्य पक्ष झाला तरी त्याला लाभलेल्या संख्याबळाचाच तो उपयोग करूं शकेल. कट्टरांनीं जो गोंधळ माजविला, तो माजविला नसता तर इतर कित्येक प्रांतिक कौन्सिलांत व असेंब्लींत आणखी पुष्कळ स्वराज्य पक्षीय सभासद निवडून आले असते, व तसें होतें तर कौन्सिलांतील राजकारणास आज जो रंग आलेला आहे तो अधिकच तजेलदार झाला असता! पण गेल्याचा शोक न करितां 'प्रस्तुतमनुसरामः' असें म्हणूनच कार्याला लागलें पाहिजे.

* * *

असेंब्लीच्या कामकाजाला ता. ३० रोजीं यथाविधि सुरुवात झाली. सर्व विधींतला पहिला विधि अर्थात् शपथविधि होय. या समारंभाला पहिले दिवशीं सुमारें ११२सभासद हजर होते. शपथ घेण्याला प्रथम स्वतः अध्यक्ष सर फ्रेडरिक व्हाईट यांनीं सुरुवात केली.ते दुसऱ्यांना शपथ देणार! पण त्यांना शपथ दुसरा कोण देणार? धन्याचा धनी कोण? तसाच अध्यक्षाचा अध्यक्ष कोण? कोणीच नाहीं. "तीर्थोदकं च वन्हिश्च नान्यतः शुद्धिमर्हतः" हाच न्याय अध्यक्षांच्या शपथविधीला लागू होता. त्याच्यानंतर शपथ घेण्याचें हें काम दोन तास चालूं होतें व आपला शपथ घेण्यापुरता वगळून, बाकीचा सर्व काळ सभासदांना इतरांकडे पाहून मनांतल्या मनांत टीका, टवाळी, हास्यविनोद, तारीफ किंवा निंदा करण्याला मोकळा होता. कोणी शपथ घेण्याला चालला म्हणजे तो

दिसतो कसा, चालतो कसा, त्याचा पोषाख कसा आहे, हा कोणत्या पक्षाचा असेल व पुढें काय धोरण ठेवील याविषयीं जवळजवळच्या मंडळींत हटकून कुजबूज सुरू व्हावयाचीच ! साहेब लोक सर्व एकाच रंगाचे व एकच पोषाख करणारे असले तरी त्यांच्यांतहि पाहणाराला वैचित्र्य आढळतेंच ! सर माल्कम हेले, स्टॅनियन वगैरे लोकांकडे पाहिलें कीं, त्यांच्याबद्दल टीकेचा बरावाईट शब्द मनांत तरी उमटल्याशिवाय राहतच नाहीं, मग हिंदी लोकांतील वैचित्र्याविषयीं तर बोलावयासच नको.

* * *

पोषाखाच्या वैचित्र्यासंबंधानें कोणी हिशेबच करता तर त्याला दहा पांढऱ्या टोप्या, पंधरा इतर टोप्या, वीस फेटे व पागोटीं आणि पन्नास डोकीं उघडीं अशी गणती करतां आली असती. माधवराव अणे व सरदार मुतालीक या दोघांच्या डोक्यांवर दक्षिणी पगड्या होत्या. एक मद्रासी प्रतिनिधि डोक्यावर उपरणें पांघरूण घरच्यासारखा बसला होता. एका राजेसाहेबांच्या टोपींतली खऱ्या सोन्याची जर डोळे दिपवीत होती. आणि अध्यक्ष म्हणून बोलावयाचें नाहीं इतकेंच, पण खरा विचित्र व एखाद्या नाटकपात्रास शोभेल असा पोषाक सर्वांत त्यांचा एकट्याचाच होता. हिंदी कायदे-कान्सिलाला विलायती पार्लमेंटाचें स्वरूप देण्याच्या भरांत अध्यक्षांना दिलेला पोषाख म्हणजे अंगांत फिकट मळकट रेशमाचा लांब अस्तन्यांचा बाळसंतोषी झगा व डोक्यावर पांडुरक्या केसांचा टोप. या टोपाच्या कानांवरून खालीं आलेल्या बाह्या पाहून देशी नाटकांतील देवदानवांच्या कुंडलांची आठवण होते. पण त्यापेक्षां खरी समर्पक उपमा म्हणजे रातपाकोळ्यांच्या झाडाला टांगून विहिरीवर लोंबणाऱ्या गवती घरट्यांची होय. तसेंच रेशमी पितांबर गुंडाळून आलेल्या ब्रह्मी सभासदांकडे पाहून देशी नाटकांतील कृष्ण-नारदांच्या सोंगांची आठवण होई. आणि रंगा अय्यर यांचें दाढी व जटाभार यांत लपून गेलेलें तोंड पाहून ऋषीच्या सोंगाकरितां त्यांना तसेंच्या तसें उचलून नेलें तरी चालेल असें कोणासहि वाटलें असतें. शरीराच्या ढबींत एका बाजूस पोरसवदा कस्तुरभाई लालजी किंवा चेटीअर, तर दुसऱ्या बाजूस अगडबंब शामलाल नेहरू हा विरोधहि मौजेचा होता. पण अर्थात् हा रिकाम्या वेळेंतील क्षणभर मनाचा खेळ होता. कारण असेंब्लींतील प्रत्येक सभासद

दुसऱ्या सभासदाकडे पाही तो प्रायः कायमच्या गंभीर वृत्तीनेंच पाही! आणि त्यांत हा आपल्या कार्यांत आपला सहकारी मित्र होईल किंवा विरोधी प्रतिपक्षी म्हणून त्याच्याशीं आपणाला दोन हात करावे लागतील हाच विचार मुख्य असे.

* * *

याच विचारानें शपथविधिपूर्ण होतांच स्वराज्य पक्षानें आपली सभा असेंब्लीच्या कमिटी रूममध्यें भरविली. या सभेंत हजर–गैरहजर सभासदांची तपासणी झाली. त्यांत ब्रह्मदेशचे प्रतिनिधी स्वराज्य पक्षाला मिळणार असें दिसून आलें. इतर कित्येक स्वतंत्र सभासदहि पलीकडच्या खोलींत बसले होते, व आपसांत उभयवर्गांमधील सूक्ष्म मतभेदाची भिंत निघून जाऊन आपण सर्व एकाच दालनांत बसल्यासारखे कसें दिसूं व वागूं याचा विचार करीत होते. सुदैवानें स्वतंत्र सभासदांपैकीं पुढारी मंडळी हीं एकी घडून यावी या मताचे आहेत, व या बाबतींत बिपिनचंद्र पाल, जिना, पुरोत्तमदास ठाकुरदास, रंगाचारियर, रामचंद्रराव व एकदोन स्वतंत्र मुसलमान पुढारी यांच्याशीं बोलणें सुरू झालेलें आहे. तसेंच हा मिलाफ किंवा ही मोठी बनावट हवी तशी घडून येवो वा न येवो, निदान स्वतःकरितां आंखलेल्या धोरणानें काम चालू ठेवण्याचा स्वराज्य पक्षाचा निश्चय असल्यामुळें त्याची सभा आज दोनप्रहरीं व्हाइसरॉयसाहेबांच्या भाषणानंतर कमिटीमध्यें भरून येथील कामापुरते प्रेसिडेंट, डेप्युटी प्रेसिडेंट, चिटणीस यांची नेमणूक व तात्पुरत्या कचेरीची तयारी याचा विचार होणार आहे. व्हाइसरॉयसाहेबांच्या भाषणांत असेंब्लींतील कोणत्याहि पक्षाचा कार्यक्रम हटकून बदलावा असें कांहीं फारसें असण्याचा संभव नाहीं; तथापि आजच तें भाषण होणार असल्यामुळें त्याचे आधीं कोणी कांहीं नक्की न ठरविणें स्वाभाविक आहे.

## पत्र नं. २

**मा**गील पत्रीं लिहिल्याप्रमाणें गेल्या गुरुवारीं व्हाइसरॉयसाहेबांचें भाषण झालें. नव्या त्रिवार्षिक बैठकीची सुरुवात असल्यामुळें सभेला राजदरबारचें म्हणजे थाटाचें स्वरूप देण्यांत आलें होतें. शहरच्या आसपास रहदारी बंद ठेवल्यामुळें बिचाऱ्या वांटेच्या वाटसरालाहि सभागृहाबाहेर कित्येक मैल-

पर्यंत हा थाट आर्धीपासून भोंवत होता. व्हाइसरॉयसाहेबांची स्वारी चार घोड्यांच्या गाडींत बसून सर्व परिवारासह येऊन दाखल झाल्यावर कांहीं वेळानें मिरवणुकीच्या पद्धतीनें सभागृहांत प्रवेश करती झाली. असेंब्ली व कौन्सिल ऑफ स्टेट या दोहों सभांच्या सभासदांना या दिवशीं एकत्र जमविण्यांत आलेलें असून कनिष्ठ-वरिष्ठ मानाचे हे लोक सरमिसळ जागांवर बसून व्हाइसरॉयांची मार्गप्रतीक्षा करीत होते. पुढें लष्करी शिपाई, मागून कौन्सिलचे अधिकारी, त्यामागून कौन्सिल व असेंब्लीचे अध्यक्ष व शेवटीं खुद्द व्हाइसरॉय अशा क्रमानें मिरवणूक आंत आल्यावर व्हाइसरॉयसाहेब उच्चासनावर देवासारखे व वरील दोन अध्यक्ष खालीं त्यांच्यापुढें दोन बाजूंस गरुड-हनुमंतासारखे बसले होते. तसेंच लॉर्ड कर्झन यांनीं नवीन प्रघात पाडल्याप्रमाणें दोन छोटे राजकुमार व्हाइसरॉयांच्या लांब झग्याचीं दोन टोकें धरून त्यांच्यामागून चालत आले. ते उच्चासनाच्या पायऱ्यांवर नाटकी पद्धतीनें बसले होते. आणि मागें प्रभावळींत उभे राहिलेल्या दहा पंधरा लष्करी अधिकाऱ्यांनीं या राजवैभवाच्या नाटकी देखाव्याला पूर्णता आणली होती. या अधिकाऱ्यांपैकीं कित्येकांचा पोषाक निरनिराळा व निरनिराळ्या शतकांतील नाइट किंवा लष्करी सरदारांच्या पोषाकाची पुसट आठवण करून देणारा होता. राजसभेचा थाट पाहण्याला स्त्रिया अर्थातच लागतात. त्यांचीहि सभागृहावरच्या गॅलऱ्यांतून गर्दी झाली होती व 'कुवलयितवातायनमिव' या वर्णनाची आठवण होत होती.

* * *

व्हाइसरॉयांनीं आपलें भाषण सर्व खुर्चीवर बसूनच वाचून दाखविलें. त्यांनीं आढ्यतेचा पवित्रा केलेला असून भाषण वाचीत असतां मधून मधून सभागृहापैकीं निरनिराळ्या वर्गांकडे ते उद्देशपूर्वक नजर फेकीत. त्यांचा आवाज मोठा असून त्यांतूनहि ते कांहीं कांहीं शब्दांवर मधून मधून मुद्दाम जोर देत. अशा रीतीनें वक्तृत्वाचा सर्व थाट पुरा होता. परंतु भाषणांत कांहींच तथ्य नव्हतें. वास्तविक हजारों मैलांपलीकडील रशियांतील बोल्शेव्हिकांपासून ते आपणापासून दहा हातांवरील स्वराज्य पक्षापर्यंत सर्व प्रांतांचें समालोचन त्यांनीं विहंगमदृष्ट्या केलें; पण स्थूल शब्दजालाखेरीज त्यांत

कांहींच नव्हतें. परराष्ट्रीय संबंध व सरहद्दीवरील धामधूम यांचीं वर्णनें जशीं कायम ठशाचीं होतीं तशींच कायदे-कौन्सिलाच्या सभासदांचें केलेलें स्वागत व त्यांना दिलेला उपदेश हाहि कायम ठशाचाच होता. जुन्या कायदे-कौन्सिलानें मोठे विजय संपादन केले हे शब्द व्हाइसरॉयांच्या तोंडून निघतांच कित्येकांनीं आत्मनिषेधक दृष्टीनें खालीं पाहिलें, व व्हाइसरॉयांनीं केलेला हा अजाणता व गंभीर विनोद ऐकून पुष्कळांना हसूं आलें. स्वराज्य पक्षाला उद्देशून व्हाइसरॉयसाहेबांना काय बोलावयाचें असतें हें आतां कांहीं नवीन नाहीं. तीन महिन्यांपूर्वींच ते बोलून चुकले होते, व तेंच पुनः त्यांच्यासमोर समक्ष बोलल्यानें त्याची युक्तता किंवा परिणामकारकता वाढणार असें थोडेंच होतें. पण उभयतांची एकदां गांठ पडावयास पाहिजेच होती ती पडली. व्हाइसरॉयसाहेबांना सांगावयाचें तें त्यांनीं सांगितलें, आणि स्वराज्य पक्षाला उलट त्यांना काय सांगावयाचें तेंहि त्यांना लवकरच ऐकावयास मिळेल.

* * *

कौन्सिलांतील या भाषणाच्या आधींच स्वराज्य पक्षानें आपण व्हाइसरॉयसाहेबांना किती मान देतों हें त्यांना कृतीनें दाखविलें. एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलचे एक सभासद मि. अतुलचंद्र चतर्जी यांनीं त्याच दिवशीं संध्याकाळीं आपल्या बंगल्यांत व्हाइसरॉयसाहेबांना गार्डन-पार्टी दिली होती व असेंब्लीच्या सर्व सभासदांना निमंत्रणें केलीं होतीं, पण स्वराज्य पक्षाचा एकहि सभासद या पार्टीला गेला नाहीं व कित्येकांनीं पार्टीला हजर राहण्याविषयीं आपली हरकत व नाखुषी स्पष्ट शब्दांनीं लिहून चतर्जी यांना कळविली. पण स्वराज्य पक्षाचें हें उदाहरण कांहीं स्वतंत्र सभासदांनींहि स्वतंत्रपणानें अनुसरलें होतें. व्हाइसरॉयसाहेबांच्या भाषणाचा त्यांना राग आला होता व गार्डन-पार्टीला गेल्यानें सहजच जो लघळपणा पदरीं येणार त्याचा त्यांना तिटकारा वाटला. असेंब्लीच्या सर्व सभासदांना निमंत्रण असतां फारच थोडे सभासद हजर राहिले ही गोष्ट व्हाइसरॉयसाहेबांच्याहि लक्षांत आल्याशिवाय राहिली नाहीं असें म्हणतात. हजर असलेल्या कांहीं लोकांशीं बोलणें काढून लोकमतप्रदर्शक विचार समजून घेण्याची इच्छा त्यांनीं दर्शविली. पण हीहि गोष्ट कांहीं नवीन नाहीं. मानभावी अधिकाऱ्यांच्या मुर्दाडपणाचा हा एक ठराविकच मासला आहे. स्वतः लॉर्ड रेडिंग हे दोनतीन वर्षांपूर्वीं पंडित मदन मोहन यांच्याशीं

तीन दिवस चारचार तास बोलले म्हणतात, व महात्मा गांधी यांच्याशीं तर मुलाखतींचा एक सप्ताह त्यांनीं पूर्वी केला होता ही गोष्ट प्रसिद्धच आहे. तेव्हां-पासून लोकांचें मत समजून घेण्याचा व्हाइसरॉयसाहेबांचा हा खटाटोप अजून सुरूच आहे. आणि ते विलायतेस परत जाईपर्यंतहि तो संपणार नाहीं. पण हिंदी जनतेचें लोकमत ही अशी काय पृथ्वीच्या गर्भकपाटांत खोल सांठवून ठेवलेली चीज आहे म्हणून तिला शोधून वर काढण्याला कोणास इतके परिश्रम पडावे! पण दांभिक भलेपणा दाखविण्याची खोड सगळ्या युरोपियन लोकांच्या हाडीं-मांसीं खिळलेली असते; मग लॉर्ड रेडिंग यांच्यासारख्या वकिली बाण्याच्या व कणिकनीतींत मुरलेल्या मुत्सद्द्यानेंच त्या कलेंत निष्णातपणा दाखविला तर नवल काय? या गार्डन-पार्टीच्या प्रसंगीं दहापांच असामींना तरी हाच गळ व्हाइसरॉयसाहेबांनीं टाकून पाहिला व कित्येकांच्या टाळूंत तो शिरलाहि असेल! गार्डन-पार्टींत अधिकाऱ्यांच्या बाजूनें असा ध्वनि निघत होता कीं, कौन्सिलांतील तुम्ही लोक जबरदस्तीनें स्वराज्य मिळवूं पाहतां, पण ही जबर-दस्ती आम्हांला कशी आवडेल व ती आम्ही कशी मानूं? पण एकतर्फी अधिकार किंवा सत्ता चालविणें याला जर बळजोरी म्हणावयाची तर स्वतः सरकार आज दीडशें वर्षे काय करीत आलें? कौन्सिलांतील बहुमताची बळ-जोरी या जुन्या बळजोरीपेक्षां खचित अधिक अपमानास्पद नाहीं!

* * *

पण बहुमत हें तोंडाला सहज आलें तरी व कायद्याच्या कागदावरहि लिहिलें गेलें असलें तरी कृतींत कसें वठणार हाच सर्वांपुढें मुख्य प्रश्न आहे. शंभर लोकनियुक्त सभासदांपैकीं ४८ सभासद एकट्या स्वराज्य पक्षाचे आहेत. दुसरे पक्षी 'स्वतंत्र' हें नांव धारण करणारे म्हणजे सरकार पक्षास सर्वस्वीं वाहिलेले नसून लोकहिताच्या बऱ्याच बाबतींत सरकारविरुद्ध मत देतील किंवा लोक-पक्षाची बाजू उचलून धरतील असे सभासद २० पासून २५ पर्यंत तरी भर-तील असें म्हणतात, पण यांच्या शीलाचा व स्वभावाचा ठाव अद्यापि लागावयाचा आहे. बहुमत सिद्ध झाल्यावर सरकार तेंहि झिडकारील हा संभव सोडला तरी प्रथम वरील दोन पक्ष एकजीव होतील, तेव्हांच बहु-मत सिद्ध होणार! ही अडचण लक्षांत घेऊन स्वराज्य पक्षानें या दुसऱ्या पक्षाशीं ऐक्य करण्याचा प्रयत्न आज दोनतीन दिवस सुरू केला आहे व

स्वतंत्र पक्षाचे पुढारी पंडित मदन मोहन मालवीय, बॅ. जिना, दि. ब. रंगाचारियर वगैरे या प्रयत्नास मदतहि करीत आहेत. तथापि स्वतंत्र पक्षाचें आपसांतच एकमत नसल्यामुळें हीं वीस-पंचवीस मतें एकत्र करणें म्हणजे आवळ्यांची मोट बांधण्यासारखें झालें आहे. ती एकीकडून बांधावी तर दुसरीकडून कांहीं आवळे घळघळून जातात. त्यांतील कोणी संपूर्ण स्वराज्य मागण्याला प्रतिकूल तर कोणाला राजकीय कैद्यांची मुक्तता करा असें म्हणवत नाहीं. कोणी व्यक्तिशः एखादी जागा किंवा द्रव्यलाभाची कामगिरी मिळण्याकरितां टपून बसलेला असल्यामुळें त्याला स्वराज्य पक्षाशीं मिसळवत नाहीं, तर कोणाला अल्पसंख्याकांची सुरक्षित व्यवस्था आधीं लागल्याशिवाय तुमच्या कोणाच्याच ठरावाला अनुकूल मत देववत नाहीं. त्यांच्यांतील शहाणे लोक हे अति विचारग्रस्त म्हणून, धूर्त लोक हे स्वार्थी म्हणून, सावध लोक भित्रे म्हणून आणि मुसलमान हे स्वहितदक्ष म्हणून. तात्पर्य, कोणी अवगुणामुळें तर कोणी गुणामुळें सरकाराविरुद्ध चढाईचें धोरण पत्करण्याला नालायक होऊन बसलेले आहेत. पंडित मदन मोहन व बॅ. जिना यांच्या दृष्टींत किंवा वाणींत हुल्लडीची हौस एखादे वेळीं चमकून जाते. पण पूर्वी स्वराज्य पक्षाला नांवें ठेवलीं म्हणून किंवा स्वतंत्र पक्षांतील समानशील अशा कांहीं थोड्या बरोबरीच्या लोकांचा ऋणानुबंध तोडवत नाहीं म्हणून, ते कोणत्याहि वादांत अखेरनिर्णयाचे वेळीं स्वराज्य पक्षाच्या उलट बाजूस आपल्या मताचा कांटा झुकवितात, स्वराज्य पक्षाची स्थिति सुदैवानें तशी नाहीं. त्यांतील निदान अठ्ठेचाळीस लोक एकमताचे व शिस्त पाळणारे असल्यामुळें वाटाघाटीस मोठी सोय झाली आहे. स्वतंत्र पक्षाशीं बोलावयाचें तर स्वराज्य पक्षाच्या पुढाऱ्यांना दहावीस लोकांशीं बोलावें लागतें व हें बोलणें सर्वांशीं एकदम करतां येत नाहीं, म्हणून त्यापासून फारसें कांहीं निष्पन्न होत नाहीं. उलट स्वराज्य पक्षांतील एकाशीं बोललें कीं तें पुरे होतें, इतर सर्व त्याचे ऐकतात.

* * *

बहुमत सिद्ध करावयाचें तर स्वतंत्र सभासद मिळवून घेतले पाहिजेत हाच स्वराज्य पक्षापुढें मुख्य प्रश्न असल्यामुळें ते मिळवून घेण्याविषयीं प्रयत्नांची सीमा पोंचवून पाहावयाची अशा निश्चयानें पंडित नेहरू व त्यांचे

सहकारी यांनीं दिल्लीस येतांच प्रयत्नास सुरुवात केली. पंडित मदन मोहन हे उभय पक्षांत मोडत असल्यामुळें किंवा मोडत नसल्यामुळें दोघांकडेहि जाऊन सरकारविरोधी अशी एक नवीच पार्टी असेंब्लींत करण्याचे फायदे ते ता. ३०-३१ या दोन दिवसांत सर्वांना सांगत होते. त्याबरोबरच प्रत्येक पक्ष आपापल्या सभा वेगळ्या भरवून ही नवी पार्टी बनवावयाची तर देवघेव कशी करावी याची चर्चा करीत होता. पैकीं स्वराज्य पक्षानें आपलें असेंब्लींतलें अधिकारी मंडळ नेमून स्वतःपुरती तयारी केली. स्वतंत्र पक्ष वर सांगितल्याप्रमाणें एकजीव झालेला नसल्यानें त्याचें अधिकारी-मंडळ नेमतांच येत नव्हतें. पण जिना व रंगाचार्य हे त्याचे पुढारी समजले जात. सर पुरुषोत्तमदास वाटाघाटीस हजर असत, पण फारसा भाग घेत नसत. स्वराज्य पक्षाचे ४८ सभासद असल्यानें आपण त्यास मिळालों तर बहुमत होऊं शकेल ही गोष्ट ढळढळीत दिसत असल्यानें तसा प्रयत्न करून पाहण्याची कल्पना साहजिकच त्यांनाहि सुचावी यांत आश्चर्य नाहीं. कारण स्वराज्य मिळवावयाचें, तें शक्य तितक्या लवकरच मिळवावयाचें व सरकाराचा कौन्सिलांत वरचेवर पराभव केल्यानें तें मिळण्यास मदत होईल याच मताचे ते आहेत. त्यांनाहि देशभक्तीची लज्जत आहे व म्हणूनच मवाळांनाहि मिळवून घ्यावें असा महात्मा गांधींचा प्रथमपासून उपदेश होता. दोनहि पक्षांना एकी तर व्हावी पण आपलें स्वत्व किंवा वैशिष्ट्य तर जाऊं नये असें मनांतून वाटत असल्यास नवल नाहीं, व यापुढें चार दिवस चाललेल्या जिकिरीच्या वाटाघाटींत हेंच काय तें मर्म होतें.

प्रथम बोलणें असें सुरू झालें कीं, उभयतांनीं मिळून स्वराज्यविषयक मागणी तयार करून असेंब्लीपुढें मांडावी आणि सरकारकडून तिला मनाजोगा जबाब न मिळाला तर उभयतांनीं मिळून विरोधाला प्रारंभ करावा व पुढील महिन्यांत बजेटाच्या वेळींच सरकारची चंदीवैरण बंद करावी. पण दोघांची मागणी एक कशी होणार? स्वराज्य पक्षाची मागणी बरीच चढी असल्यानें ती स्वतंत्र पक्षाला कशी मानवणार? व येथेंच तक्रारीस सुरुवात झाली. पण या कामीं आपण वाटेल तितकी पड खावी, नमतें घ्यावें, पण स्वतंत्र पक्ष मिळता करून घ्यावाच घ्यावा असें निश्चयी धोरण पंडित नेहरू यांनीं ठरविलें. आलेली संधि गमावूं नये व स्वतंत्र पक्षाची तरी एकदां परीक्षाच पाहावी याच हेतूनें त्यांनीं हें धोरण ठरविलें. पण तीन दिवस एकसारख्या सभा होऊनहि जम

बसण्याचें चिन्ह दिसेना. "असेंब्लीच्या १४४ सभासदांपैकीं ७२ लोक म्हणजे स्वराज्य पक्षाच्या ४८ शिवाय आणखी २४ लोक बजेट नामंजूर करण्याला तयार होतील तरच आम्ही अडवणुकीच्या धोरणास मान्य होऊं" अशी अढी कांहीं स्वतंत्र सभासद घेऊन बसले. आणि 'तुम्ही याल तरच आम्ही येऊं' असें इतर म्हणूं लागले! अशा रीतीनें स्वतः उमेदीनें पुढें पाय टाकून सही करण्यास कोणी तयार होईना. नबाबाच्या एका गोष्टींत 'आप बैठो, आप बैठो' असें म्हणतां म्हणतां आगगाडी सुटून निघून गेल्याचें सांगतात. मुख्य ठरावांचे दिवस जवळ येत चालल्यानें असाच प्रकार येथेंहि होतो कीं काय अशी भीति वाटूं लागली. पण अखेर पंडित मोतिलाल नेहरू यांच्या दीर्घ प्रयत्नानें बहात्तरांची संख्या भरून मोठी विरोधी पार्टी बनण्याचा संभव दिसूं लागला.

* * *

स्वराज्य पक्षानें प्रथमपासून स्वतःचा असा ठराव कोणताच दिला नव्हता. किंबहुना कौन्सिलांतील अडवणुकीचे पाय भुईला लागतात किंवा नाहींत व लागलेच तर कितपत लागतात याचा अंदाज लागल्याशिवाय स्वराज्य पक्षांतील कोणाहि सभासदानें ठराव पाठवूं नयेत, उपसूचना आणूं नयेत व भाषणेंहि करूं नयेत, तर तटस्थ राहून कांहीं वेळ काय होतें तें पाहावें, अशी शिस्त ठरवून दिली होती. इकडे स्वतंत्र पक्षाच्या लोकांना हा निर्बंध कांहींच नसल्यानें त्यांनीं आपापले लहानमोठे ठराव पाठवून देऊन फेब्रुवारीच्या दोनतीन आठवड्यांचें काम आधींच अडवून ठेविलें होतें. पण त्यांतच स्वराज्याच्या मागणीचा व महात्मा गांधींच्या मुक्ततेचा असेहि ठराव असल्यामुळें साधल्यास यांतच स्वतंत्र पक्षाला मदत देऊन सरकारावर बहुमत लादावें हें स्वराज्य पक्षाला एका दृष्टीनें प्रात व दुसऱ्या दृष्टीनें सोयीचें झालें. मंगळवार ता. ५ रोजीं हे दोनहि ठराव कार्यक्रमांत दाखल झाल्यामुळें ता. ३ पर्यंत म्हणजे वाटाघाटीच्या अपुऱ्या स्थितींतच सर्वांना आपल्या उपसूचना पाठवाव्या लागल्या व पुढें अवघ्या एक दिवसाचीच सवड एकमत करण्यास उरल्यानें या तगाद्याचा एकीला फायदाच झाला! स्वराज्य पक्षाचा पाठिंबा मिळाल्यास आपला ठराव, त्यांत कमजास्त होऊन का होईना पण बहुमत मिळून पास होईल अशी रंगाचारियर यांना उमेद आली; व आपली मागणी अर्धीमुर्धी का होईना पण या ठरावाच्या पाठीवर उपसूचना म्हणून बसल्यास, स्वतंत्र पक्षाचीं मतें

मिळून आपलेंहि काम होईल असें स्वराज्य पक्षास वाटूं लागलें. शेवटीं सर्व उपसूचनांचा विचार नेहरू, रंगाचारियर, केळकर, पुरुषोत्तमदास, जिना व पटेल या सहा असामींनीं करून त्यांतील एक पसंत करावी, किंवा सर्वांची मिळून एखादी नवी बनवावी, असें सर्वानुमतें ठरलें. ही उपसूचना सोमवारच्या सभेपुढें मांडून सर्वांना पसंत पडल्यावर नवीन विरोधी पार्टी बनविण्याचें निश्चित झालें व मग त्याप्रमाणें सर्व पुढाऱ्यांपासून सह्या घेण्यास सुरुवात झाली. अजून कोठें शंका-कुशंका निघतच आहेत; व स्वतंत्र म्हणविणाऱ्या चोवीस लोकांच्या सह्या कागदावर पडतील तेव्हांच गंगेत घोडे न्हाले असें म्हणतां येईल. परंतु इतक्या उपरहि तसें न झालें, व चुचकारीत चुचकारीत आणलेलें हें एकीचें तट्टू गंगास्नान होण्यापूर्वीच बुजून उधळून गेलें तरीहि कांहीं बिघडलें नाहीं. स्वराज्यपक्ष हा आपल्या पायांवर उभा राहून बनेल तें करण्यास तयारच आहे. रंगाचार्यांचा ठराव मंगळवारीं निघावयाचा तो सर माल्कम हेले यांच्याच संमतीनें शुक्रवारपर्यंत पुढें ढकलला गेला आहे. तेथपर्यंत एकीच्या या भट्टींत आणखी काय काय रंग उमटतात तें पाहावें.

* * *

महात्मा गांधींच्या सुटकेचा ठराव मंगळवार ता. ५ च्या कार्यक्रमांत दाखल झाल्याचें वर सांगितलेंच आहे. पण त्याचा नंबर दुसरा लागला असल्यानें नेमलेल्या दिवशीं तो चर्चेला न निघाला तर फुकट जाईल. मग फिरून त्याला बॅलटच्या सोडतींत पडून नशिबाची परीक्षा पाहावी लागणार व त्याच्या नांवाची बक्षिस-चिठी निघाली तरी फेब्रुवारीच्या तिसऱ्या आठवड्यापर्यंत त्याला मार्गप्रतीक्षा करीत बसावें लागणार. यामुळें सर्व पक्षांच्या लोकांना तो एक चिंतेचा विषयच होऊन राहिला होता. शिवाय गेल्या जुलै महिन्यांत हाच ठराव असेंब्लीपुढें येऊन नामंजूर झाल्यानें एक वर्षाच्या मुदतबंदीचा नियम तोच ठराव पुनः घेण्यास आड येतो कीं काय अशीहि भीति होतीच; आणि स्वराज्य पक्षाप्रमाणें स्वतंत्र पक्षालाहि हा ठराव मंजूर व्हावा अशीच मनांतून फार इच्छा असल्यानें उभयपक्षांच्या पुढाऱ्यांनीं या अडचणीचा परिहार कसा करावा या विवंचनेंत एक दिवस घालविला. पण नुकतेंच वर सांगितल्याप्रमाणें रंगाचारियर यांचा ठराव पुढें शुक्रवारपर्यंत ढकलला गेल्यानें दोनहि ठरावांची चांगलीच सोय झाली. पण खुद्द असेंब्लीच्या सभासदांपेक्षांहि

इतर लोकांना ही सोय अधिक आनंददायक वाटली. कारण यंदांचें दिल्लीचें कौन्सिल म्हणजे महात्मा गांधींच्या मुक्ततेचा ठराव याहून दुसरा कांहीं अर्थ त्यांना उमजत नव्हता असेंच दिसून आलें आणि ही गोष्टहि हिंदी लोकांपुरतीच नसून युरोपियन लोकांनाहि लागू होती. कारण या दिवसाची गॅलरींतील प्रेक्षकांचीं तिकिटें मागण्याकरितां आधींपासून त्यांच्या देखील इतक्या उड्या पडल्या होत्या कीं तिकिटें देणारांना शेंकडों लोकांची नाखुषी पत्करावी लागली!

* * *

उजाडत्या मंगळवारीं कौन्सिलकडे वेळेच्या आधीं धांव घेण्याची गडबड सर्वत्र सुरू झाली. गांधींच्या सुटकेचा ठराव कोण मांडील, त्यावर कोण कोण बोलतील, खडाजंगीचा वाद कसकसा होईल, सरकार कोणतें धोरण स्वीकारील याविषयीं आदले दिवशीं झोंपेपर्यंत चालून थांबलेले वाद फिरून सुरू झाले. पण हें सर्व व्यर्थ ठरावयाचें होतें! कारण सोमवारीं रात्रींच गांधींना सोडण्याचा सरकारचा निश्चय होऊन हुकूमहि सुटले होते व सकाळ होतांच ही सुटकेची वार्ता सर्व दिल्लीभर एकदम पसरली. अर्थात् असेंब्लीच्या सभेचें स्वारस्य व कौतुक सगळें नाहींसें झालें. हातांत तिकिटें पडलींच होतीं म्हणून शेंकडों स्त्रीपुरुष गॅलरींत येऊन बसले होते. पण रस काढून घेतलेल्या उसाच्या चिपाडासारखा तो सभाप्रसंग सपक ठरला. अजूनहि लोकांना आशा इतकीच वाटत होती कीं, गांधींच्या सुटकेच्या ठरावाचें कारण उरलें नसलें तरी प्रत्यक्ष सुटका झाल्याबद्दल तरी अभिनंदपर भाषणें ऐकावयास मिळतील. परंतु तीहि आशा शेवटीं फुकट गेली; कारण सभेच्या प्रारंभींच अशी हूल निघाली कीं, अँग्लो-इंडियन असोसिएशनचे प्रतिनिधि मि. ऱ्होड्स हे गांधींच्या मुक्ततेबद्दल आपल्या वर्गातर्फे नापसंती दर्शविण्याकरितां (अॅडजर्नमेंट) तहकुबी मागणार आहेत व तसें झाल्यास उत्तरादाखल कोणी काय तें बोलावें, एरवीं आधीं बोलूं नये असें स्वराज्य व स्वतंत्र या पक्षांच्या पुढाऱ्यांनीं ठरविलें. एरवीं रंगाचारियर व मोतिलाल नेहरू हे अभिनंदनपर दोन शब्द बोलणार होते. पण अगदीं आयत्या वेळीं ऱ्होड्स यांनीं तहकुबी मागितली नाहीं, यामुळें अध्यक्षांनीं मूळ ठराव आणणारे चेटियर यांना बोला म्हणून सांगितल्याबरोबर त्यांनीं "मी आपला ठराव परत घेतों" एवढेच शब्द उच्चारले व ते एकदम खालीं बसले. यामुळें रंगाचारियर व नेहरू यांनाहि बोलण्यास अवसर उरला नाहीं व अध्यक्षांनीं पुढील कामास सुरुवात केली. यामुळें अभिनंदन-

पर बोलणारांचे शब्द तोंडांतल्या तोंडांत व आनंदानें टाळ्या वाजविणारांच्या टाळ्या हातांतल्या हातांत राहिल्या! तथापि महात्माजींच्या सुटकेनें सर्वांना झालेला आनंद कांहीं लपण्यासारखा नव्हता. तो सर्वांच्या तोंडांवर स्पष्ट दिसत होता. पुढें तास दोन तास काम चाललें व लष्करी शिक्षण व हिंदी सैन्य यांचा प्रश्न चर्चेला निघाला तरी त्याकडे कोणाचें फारसें लक्ष राहिलें नाहीं. सभागृहाच्या बाहेर दिल्लींतच काय पण सर्व देशभर आनंदीआनंद होऊन कसा गेला असेल याची कल्पना व चर्चा करण्यांत लोक दंग होते. गांधींच्या मुक्ततेचा ठराव ज्या दिवशीं असेंब्लींत येणार त्या दिवशीं सकाळींच त्यांची सुटका प्रत्यक्ष झाली. हा योगायोग अपूर्व होय! कसेंहि असो, कौन्सिलवादी असहकारी लोकांजवळ गांधींच्या तुरुंगवासाच्या कुलपाची किल्ली महंमदअल्ली जेव्हां तेव्हां मागत ती अखेर दिल्लीच्या दफ्तरांतच सांपडली! यापुढें खुद्द स्वराज्याची किल्ली हुडकण्याचा प्रयत्न होणार आहे. येत्या शुक्रवारीं (ता. ८ रोजीं) रंगाचारियर यांचा स्वराज्यविषयक ठराव व त्यावर मोतिलाल नेहरू यांची उपसूचना असेंब्लींत चर्चेस निघणार आहेत, आणि त्यांचा निकाल हें पत्र पुण्यास पोंचण्याच्या सुमारास कदाचित् तारेनें कळेलहि.

## पत्र नं. ३

ता. १३-२-२४.

महात्मा गांधी यांच्या मुक्ततेनंतर गेल्या आठवड्यांत असेंब्लींत जें काम झालें त्यांत स्वराज्य पक्षाला जे विजय मिळाले ते किरकोळ विषयांवरच होते. तथापि त्यावरून जुनें कौन्सिल व नवें कौन्सिल यांतील अंतर सरकारच्या प्रत्ययास चांगलेंच आलें असेल यांत संशय नाहीं. जुन्या असेंब्लींत सरकारपक्षाचा प्रचंड बहुमतानें पराभव होणें ही गोष्ट अशक्यप्राय असल्यामुळें एखादा पराभव झाला म्हणजे तो पर्वणीसारखा वाटे. परंतु नव्या असेंब्लींत गेल्या एकाच आठवड्यांत सरकारचा दोन प्रसंगीं पराभव झाला. हे प्रसंग म्हटले म्हणजे दक्षिण-आफ्रिकेंतील कोळशावर आयात जकात बसविण्याविषयीं मि. नियोगी यांचा ठराव व पासपोर्ट ॲक्टाच्या दुरुस्तीचें सरकारी बिल. पहिल्यांत सरकारनें खरोखर नकार देण्याचें कांहीं कारण नव्हतें. कायद्यानें ही जकात बसवितां येते; पूर्वीं साखरेवर आयात जकात बसविल्याचा दाखला दफ्तरीं आहे. रेल्वेच्या वाहतुकीवर कांहीं टक्के हंशील (रिबेट) परत देण्याच्या रूपानें दक्षिण-आफ्रिकेचें सरकार आपल्या खाणीवाल्यांना

बौंटी ऊर्फ कृत्रिम पुष्टी किंवा मदत देतें हें सिद्ध झालें आहे. आणि तिकडील कोळशाचा व्यापार वाढून त्याबरोबर बंगाल्यांतील कोळशाचा व्यापार रोडावला ही गोष्टहि प्रसिद्ध आहे. शिवाय जकात बसविल्यानें सरकारचें नुकसान कांहीं एक न होतां झाली तर बंगाल्यांतील खाणीवाल्यांना पडत्या काळीं थोडी मदत होऊन राजकीयदृष्ट्या देखील आफ्रिकन सरकाराविरुद्ध प्रतिक्रियेचें धोरण स्वीकारलें जाईल, हे फायदे उघड आहेत. पण हिंदी लोकांचें कांहीं झालें तरी, गोऱ्या कातडीलाच गोरी कातडी अखेर मिळणार असें वर्तन सरकार पक्षानें केलें. बाजू अगदीं अंगावर येणार असें पाहतांच सर चार्लस इन्नेस यांनीं आम्हीं पुढें-मागें केव्हां तरी लहानशी जकात बसवून पाहूं असें मोघम आश्वासन दिलें. पण लोकपक्षाला तें न पटून अखेर ठरावाला अनुकूल ७७ व प्रतिकूल ३९ इतक्या बहुमतानें ठराव मंजूर झाला. या पहिल्या विजयाचा सत्कार सभासदांनीं टाळ्या वाजवून केला.

पराभवाचा दुसरा प्रसंग पासपोर्ट बिलाचा हें वर सांगितलेंच आहे. पासपोर्ट म्हणजे परदेशीं जाण्यायेण्याचा परवाना. लढाईच्यापूर्वी पासपोर्टाचा जाच फारसा नव्हता. उलट पासपोर्ट बरोबर घेऊन जाणें ही परक्या मनुष्याला परदेशांत एका प्रकारची मदतच वाटे. कारण पासपोर्ट दाखविला म्हणजे हा अमुक सरकारचा प्रजाजन आहे असें दिसून येई व राष्ट्रधर्माप्रमाणें त्यास सरकाराकडून संरक्षण मिळे. अलीकडे युद्धाच्या काळापासून पासपोर्टाचें हें जुनें मदतीचें स्वरूप जाऊन त्याला उलट बंधनाचें स्वरूप आलें आहे. पूर्वी पासपोर्ट मुद्दाम मागून घेतला जाई व अलीकडे पासपोर्ट हातीं असल्याशिवाय आगबोटीवर कोणा उतारूस घेऊं नये असा उलटा न्याय झाला आहे! लढाईच्या वेळीं ही गोष्ट ठीक होती; पण शांततेच्या काळांतहि ही पद्धति चालू ठेवणें म्हणजे तो एक प्रकारचा जुलूमच होय. १९२० सालीं असेंब्लींत पासपोर्टाचा कायदा मंजूर केला. त्यांत सर्व प्रकारचे नियम करण्याचा अधिकार सरकारास दिला गेला. हल्लीं सरकारास त्या कायद्याच्या कलमांत अशी दुरुस्ती पाहिजे आहे कीं, परदेशाहून पासपोर्ट घेऊन कोणी मनुष्य हिंदुस्थानांत आला तर त्यांत लिहिलेल्या कालमर्यादेबाहेर त्याला इकडे राहूं देऊं नये व त्यांत लिहिलेल्या स्थलमर्यादेपलीकडेहि त्याला जाऊं देऊं नये असा अधिकार सरकारास असावा. हल्लींचा पासपोर्टाचा कायदा व त्यांतहि अशा प्रकारची सुधारणा झाली असतां काय काय परिणाम होतील याचें विवेचन

येथें करीत नाहीं. मुद्दा इतकाच कीं, हें बिल लोकपक्षाला पटण्यासारखें नव्हतें. निदान सिलेक्ट कमिटीपुढें जाऊन त्याची छाननी अवश्य व्हावयास पाहिजे होती. पण ती बाजू सोडून बिल असेंब्लीपुढें आणून तावडतोब पासच करून घेण्याचा सरकारचा आग्रह होता. त्यांतल्या त्यांत असेंहि झालें कीं, बिल सिलेक्ट कमिटीला पाठविण्याची सूचना आधींच पुढें येती तर सरकारनें ती मान्यहि केली असती. पण योग्य वेळ निघून गेली. आतां बिल सिलेक्ट कमिटीकडे पाठवितां येत नाहीं असा नियमाचा फायदा घेण्याची कुबुद्धि सरकारास झाल्यामुळें ऐनजिनसी बिलच नामंजूर करावें असें लोकपक्षीय सभासदांनाहि वाटलें. अखेर मतें घेतां बिलाचा विचार पुढें ढकलण्याची सरकारनें स्वीकारलेली एका तिऱ्हाइताची सूचनाहि ६२ विरुद्ध ४३ मतांनीं नामंजूर झाली. तेव्हां आपलें बिल मागें घेण्याशिवाय सरकारास गत्यंतरच उरलें नाहीं. बिल पुनः पुढें येईल तेव्हां सिलेक्ट कमिटीपुढें पाठविलें जाईल याविषयीं आतां शंका नको.

* * *

वरील दोन विषयांवर मतभेद होऊन मतांची मोजदाद करण्यांत आली, तेव्हां पहिल्या प्रसंगीं ३८ व दुसऱ्या प्रसंगीं १९ इतक्या स्वतंत्र सभासदांनीं स्वराज्य पक्षाला मिळून सरकाराविरुद्ध मतें दिलीं हें उघड झालें. तथापि ही गणमैत्री किती काळ व कशी काय टिकते यावरच पुढील सर्व गोष्टी अवलंबून आहेत. चालू बैठकींतील मुख्य भांडणाचा मुद्दा स्वराज्याच्या मागणीचा ठराव हा असून सरकारनें ती मागणी अमान्य केल्यास बजेट नामंजूर करणें वगैरे पुढील अडवणुकीचा कार्यक्रम ठरलाच आहे. मागणीचा ठराव बहुमतानें मंजूर झाल्यानंतरच पुढील कार्यक्रमास बहुमत कितपत टिकतें हा प्रश्न उपस्थित होणार. मागणी मंजूर करण्यापुरतें स्वराज्य पक्षीय व स्वतंत्र मिळून बहुमत सिद्ध झालेंच आहे. कौन्सिलांतील असहकारी व मवाळांसह स्वतंत्र यांचा एकदिल व्हावा, एकाच शब्दांनीं त्या सर्वांनीं मिळून मागणी काय ती करावी; याकरितां स्वराज्य पक्षानें आपल्या अटी सौम्य करण्याची पराकाष्ठा केली आहे व ही कारवाई गेल्या पांच तारखेला चांगलीच फळाला आली असती. पण ता. ५चा मागणीचा ठराव प्रथम ता. ८ पर्यंत पुढें ढकलला गेला. पुढें ८ तारखेला चर्चेला सुरुवात होऊन तिला ता. १३ पर्यंत कलाटणी मिळाली. त्या दिवशीं तरी त्याचा निकाल लागणार असा सर्वांचा अंदाज होता; पण संध्याकाळीं ५॥

वाजतां अध्यक्षांनीं तो आपल्या अधिकारांतच तहकूब केला व सोमवार ता. १८ पर्यंत पुढें ढकलला. यामुळें आतां सोमवारीं तरी त्याचा निकाल लागतो कीं, तो बुधवारपर्यंत पुढें ढकलला जातो पाहावें. कोर्टांतील मुकदम्याप्रमाणें या प्रश्नाला तारखावर तारखा पडत चालल्या आहेत, ही कांहीं सोयीची गोष्ट नव्हे; व त्यांत कांहीं काळेंबेरें आहे कीं काय, असाहि संशय घेण्यास जागा आहे. कारण आजपर्यंत हजर नसलेले सरकार पक्षाचे कांहीं सभासद गेल्या चार दिवसांत क्षितिजावर उमटले आहेत !

* * *

मुख्य ठरावांतील मागणी वास्तविक पाहतां फार मोठी नाहीं. पण स्वतंत्र सभासदांना मिळवून घेण्याकरितां मुद्दाम ती तितकी कमी करण्यांत आल्याचें पूर्वी दर्शविलेंच आहे. एका अर्थानें स्वतंत्र व मवाळ पक्षाचें सत्त्व घेण्याचाच तो प्रकार आहे. "जहालांची मागणी फार म्हणून अयुक्त आणि मवाळांची मागणी थोडी म्हणून अयोग्य, यामुळें या दोहोंचा मेळ पडूं शकत नाहीं असा बहाणा नेहमींचाच आहे. पण तुम्ही म्हणाल तितकी सौम्य मागणी तुम्ही-आम्ही मिळून करूं या. तुम्ही तिला संमति दिली म्हणजे तुमच्याहि मतें ती योग्य समंजसपणाची ठरली. पण तीहि सरकारनें अमान्य केली तर मग तरी सरकारला विरोध करण्याचा तुमचा-आमचा निदान कौन्सिलांतला मार्ग एक होण्याला कोणती हरकत ?"

असा सवाल स्वतंत्र पक्षाला स्वराज्य पक्षानें टाकल्यावरून तो निरुत्तर झाला व म्हणूनच राष्ट्रीय हें नांव धारण करणाऱ्या नव्या संयुक्त पक्षाची स्थापना ७२ सह्यांनीं झाली. मागणी अशा रीतीनें कमी झाली नसती तर संयुक्त पक्षच स्थापला गेला नसता हें अगदीं उघड आहे. पण यावर असा प्रश्न कोणासहि सुचेल कीं, मागणी कमी करण्याचा जसा स्वतंत्र किंवा मवाळ यांचा आग्रह होता तसाच मागणी मोठी ठेवण्याचा स्वराज्य पक्षानेंहि हेका कां चालविला नाहीं ? त्याला उत्तर हेंच कीं, वाटेल तें करून असेंब्लींत बहु-मत बनवावें या गोष्टीची स्वराज्य पक्षाला जितकी आस्था तितकी मवाळांना नाहीं. मागणी कमी झाली तरी पुरवली, पण बहुमताच्या जोरावर सरकारच्या गळ्यांत ती बांधूं ही ईर्षा स्वराज्य पक्षाला वाटते. उलट बहुमत न बनलें तरी चालेल, पण मोठी मागणी मागूंच नये असा मवाळांचा निर्धार ! असा या दोन पक्षांच्या मनोरचनेंतच फरक आहे, त्याला कोण काय करणार ? दोन

बायांपैकीं मूल खरें कोणाचें याविषयींच्या बिरबलशाही गोष्टीची या ठिकाणीं आठवण होते. दोघींहि मूल आपलें म्हणूं लागल्या होत्या; तेव्हां तें कापून दोघींना दोन तुकडे वांटून देण्याचा बिरबलानें हुकूम केला. तेव्हां खऱ्या आईनें अशी खोटीच कबुली दिली कीं, तें मूल दुसरीचें. हेतु हाच कीं तें मूल चिरलें न जावें. स्वराज्य पक्षाला या गोष्टींतील खऱ्या आईप्रमाणें एकीचें प्रेम वाटत असून त्यापायीं अखेर आमचीच मागणी मान्य झाली असें म्हणण्याचें श्रेय स्वतंत्र पक्षाला मिळालें तरी चालेल, पण सरकारच्या छातीवर कसेंहि करून बहुमत नाचवावें. बहुमताचा कागदी घोडा एकीच्या मंत्रानें सजीव व खडा करावा असें स्वराज्य पक्षाला मनःपूर्वक वाटत असल्याचें हें निदर्शक नव्हे असें कोण म्हणेल?

असो. मागणींत एकी झाली, पण नंतर सरकारनें आपल्या मनोरचनेंत जरूर तितका फरक पाडला कीं नाहीं, म्हणजे मागणी मान्य करण्याची तयारी दाखविली कीं नाहीं, याचा निकाल होईल तेव्हां अडवणुकीच्या प्रतिकाराचा विचार होईल. यांत नव्या पक्षांतील $\frac{3}{4}$ इतक्या मतांनीं ठरेल तो निर्णय अमलांत येणार. अर्थात् $\frac{3}{4}$ बहुमताचें हें पहिलें गडांतर, व कदाचित् तेंहि सिद्ध झालें तरी आयत्या वेळीं कोणाची सदसद्विवेकबुद्धि मार्गांत आडवी पडणार नाहीं कशावरून? पण यदाकदाचित् तसें घडलेंच तर पुनः पूर्वीचा, निदान ४५ सभासदांचा, स्वराज्य पक्ष तरी आपल्यापुरता विरोध करावयाला खंबीर आहेच व रोजच्या सभासदांची हजेरी पाहिल्यास स्वराज्य पक्षाचा विरोध कांहीं अगदींच फुकट जावयाचा नाहीं.

* * *

असो. रंगाचारियार यांच्या मुख्य ठरावाला उपसूचना कोणत्या आल्या आहेत त्यांची थोडी माहिती देऊन हें पत्र पुरें करतों. पटेल यांच्या उपसूचनेंत स्वराज्याच्या मागणीबरोबर सर्व राजकीय कैद्यांची बंधमुक्तता करण्याची मागणी आहे. मौ. महंमद शफी यांनीं पाठविलेल्या उपसूचनेंत सर्व राजकीय कैदी सोडावे असें म्हणून शिवाय महात्मा गांधींना सोडण्याबद्दल वेगळें कलम त्यांनीं घातलें होतें. तसेंच राउंड टेबल कॉन्फरन्समध्यें दोन-तृतीयांश सभासद असेंब्लींतील लोकनियुक्त सभासदांनीं निवडून द्यावे असेंहि एक कलम होतें. पण या दोनहि उपसूचना संयुक्त पक्ष बनण्यापूर्वीं हातची संधि गमावूं नये म्हणूनच पाठविल्या होत्या व आतां त्या अर्थातच परतच घेतल्या जाणार,

कारण मोतिलाल नेहरू यांची एकच उपसूचना जागेवर उरावी असा प्रयत्न सुरू आहे. बाबू भुवनानंददास यांच्या उपसूचनेंच फक्त किरकोळ शब्दांचा फरक असून ती ते मागें घेतील. दोरास्वामी अय्यंगर यांच्या उपसूचनेंत 'लवकर' या शब्दाऐवजीं 'ताबडतोब' असा शब्द आहे. पण तीहि त्यांनीं परत घेतली. मदनमोहन यांनींहि उपसूचनांची वेळ टळूं नये म्हणून 'रॉयल कमिशन' हे शब्द वगळण्याविषयीं व कमिटी नेमण्याविषयीं अशा दोन उपसूचना पाठविल्या होत्या. पण राउंड टेबल कॉन्फरन्स मान्य करून त्या त्यांनीं परत घेतल्या. मौलवी महंमद याकूब यांनीं एक उपसूचना पाठविली. तींत स्वराज्याच्या योजनेंत 'अल्पसंख्याकांची योग्य तजवीज करून, असे शब्द घातले होते पण मोतिलाल नेहरू यांनींच ते शब्द मान्य केल्यामुळें तीहि उपसूचना गेली. महंमदअल्ली जिना यांनींहि कमिटी नेमून सुधारणांच्या कायद्यांची तपासणी व्हावी या अर्थाची एक उपसूचना पाठविली होती; पण नव्या पक्षांत सामील झाल्यामुळें तेहि ती मागें घेणार. डॉ. गौर हे धड स्वराज्य पक्षांत आहेत व धड त्यांत नाहींत, असें असल्यामुळें त्यांनीं जी उपसूचना पाठविली होती तींत नेहरू यांच्या उपसूचनेंतील योजना निश्चयानंतरच्या नव्या निवडणुकीस फाटा दिला होता. ती त्यांनीं परत घेण्याचें नाकारल्यामुळें बुधवारच्या वादविवादांत तिच्यावर मतें घेण्यांत आलीं व ती नापास झाली. त्यांनीं हात दाखवून विनाकारण अवलक्षण करून घेतलें.

* * *

तरी अद्यापि दोन उपसूचना राहिल्याच आहेत. एक के. सी. रॉय यांची व एक बाबू बिपिन चंद्र पाल यांची. रॉय यांची उपसूचना गुळमुळीत व सरकारमान्यतेकडे मान लवविणारी अशी आहे. पण तिला नव्या संयुक्त पक्षानें थारा न दिल्यामुळें ती नामंजूर होणार. पाल यांच्या उपसूचनेंत मात्र स्वराज्य-स्थापनेच्या पायऱ्या कांहीं निश्चित अनुक्रमानें सांगितल्यामुळें तिच्यांत ग्राह्यांश नाहीं असें म्हणतां येत नाहीं. पण पंडित नेहरू यांची उपसूचना संयुक्त पक्षानें आपली म्हणून ठरविल्यानें पाल बाबूंची उपसूचना बहुमतानें नापास होणार. ती त्यांनीं पुढें आणूंच नये अशी कांहीं लोकांनीं खटपट केली, पण आपल्या मतदारसंघानें आज्ञा केली असल्यानें आपणास ती मागें घेतां येत नाहीं असें त्यांचें म्हणणें आहे. असो. येत्या सोमवारीं अगर बुधवारीं रॉय व

पाल यांच्या उपसूचना निकालांत निघाल्यावर मोतिलाल नेहरू यांच्या सूचनेवर मतें घेण्यांत येतील व ती पास झाल्यावर रंगाचारियार हेहि ती मान्य करून स्वतःचा ठराव परत घेतील असा अंदाज आहे.

## पत्र नं. ४

ता. २२-२-२४.

दि. ब. रंगाचार्य यांचा ठराव आणि त्यावरील अनेक उपसूचना यांची माहिती मागील पत्रीं दिलीच होती. अजमासाप्रमाणें गेल्या सोमवारीं इतर सर्व उपसूचनांचा निकाल लागून पंडित मोतिलाल नेहरू यांची उपसूचना ७६ विरुद्ध ४८ इतक्या मतांनीं मंजूर झाली व तिच्यासह रंगाचारियार यांचा ठराव अर्थातच मंजूर झाला.

वादविवाद आधींच कल्पनेबाहेर लांबला होता. त्यांतून सरकार आपल्या पक्षाचे गैरहजर सभासद परगांवांहून आणवीत होतें. शिवाय हजर असलेल्या मुसलमान सभासदांत फूट पाडण्याचा प्रयत्न सुरू होता. निकाल लांबणीवर टाकण्याचा जणूं काय संकेत असल्याप्रमाणें सरकार पक्षाचे सभासद एका-मागून एक उठून बोलत होते व अध्यक्ष घड्याळाकडे कानाडोळा करीत होते. यांपैकीं कित्येक सभासदांनीं वाचलेलीं भाषणें लिहून किंवा लिहवून देण्याला सरकारी व्हिपला म्हणजे संमेलकाला बराच बराच त्रास पडला असावा! परंतु ज्या कारणांकरितां सरकार चर्चा थांबवूं पाहत होतें त्याच-करितां स्वराज्य पक्षीय अधिकारी ती लवकर संपवूं इच्छीत होते. या दोन विरोधी हेतूंमुळें स्वराज्य पक्षाकडील भाषणांना मुद्दाम संक्षेप द्यावा लागला. सोमवारीं एकदोन मुसलमानांखरीज कोणीहि बोलूं नये असें आदल्या दिवशीं ठरल्यामुळें ज्यांना पूर्वीच्या दोन दिवशीं बोलण्यास संधि मिळाली नव्हती अशांनाहि सोमवारीं बोलण्याची आपली इच्छा केवळ शिस्तीकरितां आवरून धरावी लागली.

* * *

शेवटीं फक्त एकाच स्वराज्य पक्षीय मुसलमानाला बोलण्याचा अवसर मिळाला. याचें कारण अध्यक्षांचा उघड पक्षपात म्हणा किंवा कांहीं ठराविक धोरण म्हणा. पूर्वीच्या दोन दिवशीं केळकर, अणे, बेळवी, लोहोकरे वगैरे मंडळी तीनचारदां उभी राहून त्यांनीं बोलण्याचा प्रयत्न केला; परंतु परवानगी देण्याची अध्यक्षांना लहर लागली नाहीं! अभ्यंकरांनीं तर " मी

आतांपर्यंत सहा वेळां उभा राहिलों" असें मोठ्यानें जाहीर केलें; पण त्यानंतरहि त्यांना वगळून इतरांना परवानगी मिळाली. पण जुन्या युगांतलें भाषणाचें कौतुक संपलें असून 'व्होट' चें म्हणजे निर्णायक मताचें कौतुक या नव्या युगांत सुरू झालें असल्यानें स्वराज्य पक्षीय सभासदांनीं अध्यक्षांच्या पक्षपाताची पर्वाच केली नाहीं. सरकार पक्षाची मंडळी कोणी विशेष बोलणारी उरली नाहीं, असें झाल्यावर रंगाचार्य व हेले यांची अखेरचीं उत्तर-प्रत्युत्तरें होऊन सांजवातींचे दिवे लागल्यावर मतांची मोजदाद झाली. ही मोजदाद झाल्यावर व निकाल जाहीर होण्यापूर्वीं विजेचे सर्व दिवे अकस्मात् मालवले गेले! या अंधारांतून काय निष्पन्न होतें याची सर्वांनाच उत्सुकता होती; व अंधारांत बसल्याबसल्या या शकुनाच्या शुभसूचक अर्थाचें तूप जो तो आपल्या कार्याच्या पोळीवर ओढूं पाहत होता. पण शकुनाचा अर्थ दुतर्फी व्हावा हीच तर मौज होय. पूर्वीं ग्रीक व पर्शियन यांचें युद्ध होऊं घातलें तेव्हां देवानें कौल दिला तो प्रसिद्धच आहे. "एक राज्य नाश पावेल" मग तें ग्रीकांचें असो वा पर्शियनांचें असो! पण या विनोदाला फारसा अवसर मिळाला नाहीं. कारण फिरून लखलखाट होऊन अध्यक्षांनीं निकाल जाहीर केला.

* * *

वास्तविक पाहतां हा स्वराज्यविषयक सुधारणांचा ठराव असेंब्लींत यंदाच प्रथम निघाला अशांतली गोष्ट नाहीं. पूर्वीं मुजुमदार, गौर, अग्निहोत्री वगैरेंनीं या विषयावर ठराव आणले होते व त्यांतील कांहीं मंजूरहि झाले होते. तथापि हल्लींच्या ठरावाला जें महत्त्व आलें होतें तें पूर्वींच्या ठरावांचें कोणी मानलें नाहीं. असें त्या वेळीं कौन्सिलांत असलेले लोकहि सांगतात. याचें कारण उघड आहे. एक तर हल्लींच्या ठरावांत मागणी अधिक स्पष्ट व निकडीची, त्यांत स्वयंनिर्णयाचें तत्त्व नवीनच गोवलेलें; व त्याहिपेक्षां विशेष हें कीं, हा ठराव मंजूर करून पुढें त्यांतून कांहीं तरी निष्पन्न करण्याच्या निश्चयानें स्वतंत्र व स्वराज्य पक्षीय लोक एकत्र मिळालेले. वरील सर्व कारणांमुळें सरकारचा विरोध जसा या प्रसंगीं कसून होता, तशीच मतें देण्यांत भाग घेणाऱ्या सभासदांची संख्या पूर्वींहून पुष्कळ अधिक होती. पूर्वींच्या तीन वर्षांत दोन्ही बाजूंचीं मतें मिळून सत्तर-ऐशींवर सहसा जात नसत. एखाद दुसऱ्या प्रसंगीं तीं नव्वदांवर गेलीं असतील. पण नवीन असेंब्लीच्या पहिल्या

दोनच्च आठवड्यांत मतें मोजून सरकार पक्षाचा जो तीन वेळां पराभव झाला, त्यांत एकंदर मतांची संख्या १०५ पासून १२४ पर्यंत भरली. पण पूर्वींपेक्षां या ठरावासंबंधीं सांगण्याची विशेष गोष्ट म्हटली म्हणजे पूर्वी सुधारणांच्या वृद्धी-संबंधानें सरकारकडून केव्हांहि जी कबुली मिळाली तिच्यापेक्षां यंदाच्या चर्चेत तिची मजल बरीच्च पुढें गेली हें सर माल्कम हेले यांचीं दोनहि भाषणें वाच-णारांच्या तेव्हांच्च लक्षांत येईल. पूर्वींच्या ठरावांसंबंधानें विलायत सरकारकडे पाठविण्यास लागणारीं टपालाचीं तिकिटें खर्च करण्यापलीकडे सरकारनें अधिक कांहीं केलें नाहीं. पण यंदाचा ठराव पुढें येतांच दिल्ली व लंडन यांचेमधील तारायंत्र हलूं लागलें, व पार्लमेंटकडील कांहीं तरी आश्वासन निकालापूर्वीं जाहीर करतां यावें म्हणून, पूर्वी सांगितल्याप्रमाणें, ठरावाला तीन कलाटण्या मिळून तेरा दिवसांचा अवधि मुद्दाम देण्यांत आला.

* * *

सरकारकडून मिळालेलें आश्वासन कितपत समाधानकारक आहे याविषयीं आज निश्चयात्मक असें कोणीच्च कांहीं बोलूं इच्छीत नाहीं. कारण आश्वासना-चे शब्द संदिग्ध आहेत. स्वराज्याच्या प्रगतीला हल्लींच्या कायद्यांत कोण-कोणत्या गोष्टी आड येतात, सदिच्छेचाहि पाय खोलांत कोठें जातो किंवा मर्यादेचा कोणता उंचवटा तिला चढतां येत नाहीं याविषयीं स्वतः होऊन चौकशी करण्याचें सरकारचें अभिवचन निश्चित आहे. पण खुद्द ॲक्टाच्या क्षेत्रांतील हे उचंवटे तोडून खळगे भरून काढले तरी मूळ स्वराज्यरचनेच्या ज्या संकुचित कल्पनेवर हल्लींच्या कायद्याची मांडणी करण्यांत आली ती रचनाच बदलून घेतली पाहिजे असें आढळल्यास तें घडवून आणण्याचा अधिकार हिंदुस्थान सरकारास नाहीं. तेव्हां त्याबाबत सरकारची आज कबुलीहि नाहीं. अर्थात् हिंदुस्थान सरकारनें मागणीला समाधानकारक उत्तर दिलें किंवा नाहीं याचा निकाल अंशतः विलायत सरकारवर अवलंबून राहणार. लॉर्ड ऑलीव्हियर यांच्या ता. २६ रोजीं होणाऱ्या भाषणावरून कदाचित् कांहीं सुगावा लागेल. असेंब्लीचा महत्त्वाचा निकाल समजण्यावर त्यांचें हें भाषण अवलंबून आहे; यामुळेंहि कित्येक लोक गुटमळत राहिले आहेत. तात्पर्य, सरकारच्या धोरणाविषयीं दिल्लींतील लोकमत आज अनिश्चित आहे असें म्हटलें तरी चालेल.

 * * *

असो. ठराव व उपसूचना यांवरील चर्चा बरीच महत्त्वाची व तेजदार झाली. रंगाचारियर यांचें भाषण मनधरणीचें व विनंतिवजा असेंच होतें. त्यांनीं बरेच कोटिक्रम खोडून काढले, पण तुटक शब्द वापरला नाहीं. पंडित मदनमोहन यांचें भाषण प्रमाणबद्ध नसलें तरी आवेशयुक्त होतें. पं. मोतिलाल नेहरू यांनीं वकिली बाणा पुरा लढविला. त्यांनीं उपसूचनेप्रमाणें आपलें भाषणहि रेशमाच्या गांठीप्रमाणें मऊ पण खंबीर असेंच केलें. त्यांच्या नेमस्तपणाला सर माल्कम यांनाहि उघड सर्टिफिकेट द्यावें लागलें. वर मखमलीचा हातमोजा आणि आंतून पोलादाची पक्कड असा त्यांचा प्रकार होता. या नेमस्तपणाचा वचपा सिद्धसाधकपद्धतीनें पटेल यांनीं भरून काढला. त्यांनीं असेंब्लीची 'चौपाटी' बनविली! संपूर्ण स्वराज्य पाहिजे, तें लवकरच काय पण आतां या क्षणाला दिलें तरी घेऊं, इतकेंच नव्हे; पण हवेंहि असें त्यांनीं बेदरकार सांगितलें! गेल्या असेंब्लींत 'आमच्या सद्धेतूविषयीं शंका घेणारा कोणी भेटला नाहीं असें माल्कम हेले यांनीं म्हणतांच पटेल म्हणाले, "तुमच्या हेतूविषयीं शंका घेण्यास हा मी पुढें उभा आहे!" सर पुरुषोत्तमदास यांनीं आपलें भाषण वाचून दाखविलें. तें बरें होतें, पण त्याचा मुळींच परिणाम झाला नाहीं. चमनलाल यांनीं विलायती थाटाचें मनसोक्त भाषण केलें. त्याला हेले यांनीं 'विद्यार्थ्यांचा निबंध' असें म्हणतांच चमनलाल यांनींहि हेले यांना 'साठी बुद्धि नाठी' असा टोमणा दिला! डॉ. गौर हे नेहमींच खणखणीत बोलतात, पण त्याला जिव्हाळ्याचा ओलावा कमी असतो. पालबाबूंनीं मात्र आपल्या उंच आवाजानें असेंब्लीचें छप्पर उडवून देण्याचा बेत आणला होता. सर शिवस्वामी अय्यर यांचें भाषण मुद्देसूद पण अगदींच 'रामाय च रावणाय च' अशा स्वस्ति-वाचनासारखें झालें!

* * *

स्वराज्यमागणीला विरोध करण्याचें कार्य निघालें कीं, सरकारा खालोखाल मोठा मान अँग्लोइंडियनांचा. यांत दोन प्रकार. अस्सल गोरे व्यापारी, सरकारी नोकर वगैरे हे एक व दुसरे युरेजियन, जे हल्लीं स्वतःला अँग्लो-इंडियन किंवा 'डोमिसाइल्ड' म्हणवूं लागले आहेत ते. माल्कम हेले यांनीं पहिल्या भाषणांत जपून इतकेंच सांगितलें होतें कीं, स्वराज्य द्यावयाला काढलेंच तर आम्हांस या सर्व लोकांना तसें आगाऊ कळविलें पाहिजे. पण तें सांगण्याची वाट त्यांना पाहावी लागत नाहीं. युरेजियन लोकांना आधींच सुगावा लागतो,

म्हणून ऱ्होड्स, मॉयर, गिडने वगैरे लोकांनीं आगगाडीला इंजिन जोडण्यापूर्वींच तांबडा बावटा उभारला. उद्यां स्वराज्य झालें तरी गोऱ्या व्यापाऱ्यांचें एक पैचेंहि नुकसान आम्ही होऊं देणार नाहीं असें रंगाचार्य यांनीं जीव तोडून सांगितलें. तथापि ऱ्होड्स म्हणाले कीं, "सरहद्दीपेक्षांहि बंगाल्यांत आज गुन्हेगारी अधिक आहे." पण इतका पैसा व एवढें मोठें सैन्य हातीं ठेवूनहि बंदोबस्त राखतां न येणारें सरकार कुचकामाचें हें अनुमान त्यापासून काढावयाचें सोडून हिंदी लोकांच्या अपात्रतेचें अनुमान त्यापासून कसें निघतें, देव जाणे! मॉयर यांनीं विलायतच्या मतदारांकडे बोट दाखविलें. कशास काय संबंध! गिडने यांनीं लेकवळ्यांचें स्तोम माजवितांना राणा भीमदेवाचा पार्ट केला. पण एकानें त्यांना स्पष्ट सांगितलें कीं, कातडी गोरी असली तरी तुम्ही हिंदी ते हिंदीच! दुसरा म्हणाला, स्वराज्याच्या आड असे वेळीं अवेळीं याल तर संभाळा. विलायती गोरे आज तुम्हांला जवळ करीतच नाहींत, पण उद्यां काळे हिंदीहि तुम्हांला दूर लोटतील; मग या 'मूठभर मिसळीला' कोण विचारील तें आम्ही पाहूं? गिडने यांच्यासारखे लोक उन्मत्तपणानें बोलत असतां, अस्सल साहेब मात्र पाहणाराला चीड येण्याइतकें संथपणानें बोलतात. एक तर कोणतेंहि अपकृत्य करावयाचें तरी अंगांतील रक्त थंड ठेवून तें करण्याचें बाळकडू त्यांची भूमाता त्यांना पाजीत असते. दुसरें असें कीं, हिंदुस्थानांत विलायती राज्य व व्यापार दृढमूल असल्याची ग्वाही त्यांचें मन तरी त्यांना अजून देत आहे. म्हणून राजकीय चळवळीचा शुष्क पाचोळा जळालासा दिसला तरी त्यानें त्यांच्या आत्मविश्वासाचें बूडहि तापत नाहीं, मग आंतील पाणी कसें कढणार!

* * *

राहतां राहिला विरोध कांहीं असमंजस मुसलमानांचा. हा विरोध म्हणजे पायांतील चढावांतला केवळ खडा. तो ठेवून चालवत नाहीं, काढला तरी लवकर निघत नाहीं. सुधारणांचा अर्धोदय ही आपल्या विरोधकर्माची मोठी पुण्यपर्वणी असें ते समजतात व या पर्वणीच्या वेळीं अडवून घेतलेल्या दानाचें फळ त्यांना मिळतेंहि. मोर्लेमिंटो सुधारणा निघाल्या तेव्हां सवत्या सुभ्याबद्दल डेप्युटेशन नेऊन मुसलमानांनीं थोडासा खो घातला. मॉंटेग्यू-चेल्म्सफर्ड-सुधारणांचे तोंडाला मुसलमानांना प्रमाणाबाहेर जागा देण्याचा करार झाला, तेव्हांच लखनौ कॉंग्रेस पार पडली. आज सात वर्षांत कौन्सिल-

मध्यें आपल्याला जागा कमी असें मुसलमानांना फारसें वाटल्याचा बोभाटा नाहीं; पण स्वराज्याचा नवा हप्ता मागण्याची वेळ येतांच बंगाल्यांत त्यांनीं मनासारखा करार करून घेतलाच. पण तोच शब्दशः सर्व हिंदुस्थानभर लागू करण्याचा त्यांचा आग्रह ! ठरावावरील चर्चेंत चार-पांच मुसलमानांनीं विरोधी भाषणें केलीं. मुद्दा एकच ठराविक, आम्ही अल्पसंख्याक, आमचें कसें होईल ? त्यावर एका स्वराज्यपक्षीय मुसलमानानेंच चोख उत्तर दिलें. तो म्हणाला, " आणखी पन्नास वर्षें गेलीं तरी ही स्थिति कशी बदलणार ? मुसलमान थोडे व हिंदु अधिक हे राहणारच; म्हणून पन्नास वर्षांनंतरहि स्वराज्य देऊं नये असे होणार ! भराभर हिंदु बाटवावे म्हटलें तर हिंदूंना आपलें मर्म कळून आल्यानें शुद्धिकरणासारख्या प्रतिक्रियारूप चळवळी सुरू झाल्या. बरें, स्वावलंबनानें मुसलमान आपली लोकसंख्या वाढवूं म्हणतील तर मुसलमानांना जास्तींत जास्त चार बायका करण्याची परवानगी, पण हिंदूंनीं किती बायका कराव्या याला धर्माची मर्यादाच नाहीं ! " हा सर्व अर्थात् विनोदच होता. पण पावसानें वाहून आलेल्या मातींत जसा एखादा खरा सोन्याचा कण सांपडतो तसा वादाच्या भरांतील विनोदांतहि सत्याचा अंश लाभत नाहींच असें नाहीं.

* * *

खास सरकारतर्फें मुख्य अशीं दोनच भाषणें झालीं. पैकीं सर बेसिल ब्लॅकेट यांचें भाषण धीमेपणाचें होतें, त्यांत भलेपणा होता; पण तो पोकळ सहकारितेचा. वय मध्यम, हिंदुस्थानचा अल्पपरिचय, हातीं शेंकडों कोटि रुपयांची चांदरात झडविण्याचा अधिकार आणि हिंदुस्थानांत इंग्रजांनीं येऊन शतकृत्य केलें असा गर्व नव्हे, पण अभिमान. अशा स्थितींत दोन अधिक-उणे गोड शब्द बोलण्यांत त्यांचें काय वेंचणार ? हेलेसाहेबांनीं मात्र खवचटपणाचा नंगा नाच केला. सरकारी चित्रगुप्ताच्या कचेरींतील बाडांतून जुनेपुराणे उतारे काढून ताबडतोब स्वराज्य मागणाऱ्या सर्व लोकांना त्यांच्याच शब्दांनीं कुंठित करण्याचा त्यांनीं प्रयत्न केला ! पण त्याला शिवस्वामी यांनीं उत्तर दिलें, कीं जुन्या कमी प्रतीच्या मागण्यांपैकीं सरकारनें तेव्हांच एकादी मान्य केली असती तर मग तुमच्या अडवणुकींत कांहीं अर्थ होता; पण कांहींहि मागितलें तरी आम्ही कांहीं तें देतच नाहीं असें म्हणत गेल्यानें, तोंडाला येईल तें मागत सुटणें हेंहि स्वाभाविक ठरतें. बॅ. जिना यांनीं हेले यांच्या या खारट-

पणाला एका शब्दानें पाणी लाविलें. ते म्हणाले, सात वर्षांपूर्वी स्वतः तुम्ही एक क्षुल्लक जिल्हाधिकारी होता. तेच आज गृहमंत्रि आहां व उद्यां गव्हर्नर होणार! हिंदी लोकांनींहि सात वर्षांपूर्वी चार आठ आणे स्वराज्य मागितलें असलें तर आज तें चौदा आणे मागतात. कालांतरानें सर्वांचीच बढती होते यांत नवल काय? असो. हेले म्हटले तर वक्ते आहेत, म्हटले तर नाहींत. दृष्टिकोन किंचित् बदलणें, मान किंचित् हलविणें येवढ्यानेंहि एखाद्या कुशल नटाप्रमाणें ते भावना बदलतात. पण धूर्तपणाची लकेर त्यांच्यावर इतकी पसरलेली दिसते कीं आपल्या विश्वासाचा ठेवा त्यांजपाशीं ठेवण्यास कोणीहि कबूल होणार नाहीं. त्यांच्या सगळ्या वक्तृत्वांत आश्वासनपरच पण काय कर्णमधुर असेंहि कांहीं नव्हतें.

स्वराज्यविषयक मुख्य ठराव विल्हेस निघाल्यावर दोरी काढून ठेवलेल्या धनुष्याप्रमाणें असेंब्लीची स्थिति झाली आहे. ऑलीव्हियर यांचें भाषण होणार, मग असेंब्लींतील नवीन नॅशनॅलिस्ट पक्ष त्याचा विचार करणार, त्यानंतर बजेटाच्या मागण्या पुढें येणार, अशा क्रमानें एकदोन आठवडे असेच जाणार. यामुळें सोमवार सायंकाळपासून असेंब्लीच्या कामाचें स्वारस्य कमी झालें. काल मुसलमानांची मागणी व हॉर्निमन यांच्या हद्दपारीचा ठराव हे दोन विषय चर्चेस निघावयाचे होते, तरी सभासदांची गर्दी फारशी नव्हती. पहिला विषय वादग्रस्त असल्यामुळें स्वराज्यपक्षीयांनीं किंवा स्वतंत्रांनीं त्यांत फारसा भाग घेतला नाहीं. गोळीनें गोळी टिपून निघावी तसाच दोघां परस्परविरोधी मुसलमानांच्या युक्तिवादानें तो विषय निकालांत निघाला. पंडित नेहरू यांनीं फक्त इतकेंच सांगितलें कीं, आदल्या दिवशीं पास झालेल्या उपसूचनेंत सर्व अल्पसंख्याक लोकांच्या हक्कांचा विचार करण्याचें कलम आहेच व भर असें-ब्लींत देवघेव करीत बसण्यानें निकाल लागणार नाहीं. याउपर हट्ट धराल तर आम्हांला विरुद्ध मतें देऊन ठराव नामंजूर करावा लागेल! पण हा धाक अमलांत आणण्याचें कारणच पडलें नाहीं. हॉर्निमन यांच्या ठरावावर मात्र आभाळांत अभावितपणें ढग जमून वादळ व्हावें तसा जोराचा वादविवाद झाला. हेले यांना तो थोडक्या शब्दांनीं टाळतांहि आला असता. पण जळत्या घरांत मुद्दाम शिरून आपल्या हातानें डोक्यावर छप्पर पाडून घ्यावें असा प्रकार त्यांनीं केला. स्वतःच निरुत्तर होण्याइतके ते चिडून गेले व या एका दिवसांत त्यांच्या अंगाचे जितके वाभाडे निघाले तितके गेल्या तीन वर्षांतहि निघाले

नसतील! त्यांनीं प्रथम स्टेट-सेक्रेटरीकडे बोट दाखविलें, नंतर मुंबई सरकारच्या जबाबदारीचा बहाणा केला. एका क्षणांत असें सांगितलें कीं, आज घटकेला हॉर्निमन यांजविरुद्ध एकहि आक्षेप नाहीं व दुसऱ्याच क्षणीं असें प्रतिपादिलें कीं, अशा भयंकर मनुष्याला आम्ही पासपोर्ट देण्याचा सल्ला देऊं शकत नाहीं! विल्सनसाहेब यांनीं तर हॉर्निमनवर हवा तसा शेणखळा उडवून ही असेंब्ली नसून कुटाळचावडी आहे असें क्षणभर भासविलें! पण अखेर मतें मोजल्याशिवायच ठराव पास झाला. असो. आज पुरवणी-बजेट मंजुरीला निघालें. त्यावर स्वतंत्र सभासदांनीं चर्चा केली, पण स्वराज्य पक्षानें त्यांत भाग मुळींच घेतला नाहीं. त्या पक्षाचे सर्व सभासद उठून गेले!

## पत्र नं. ५

ता. २७-२-२४.

चालू आठवड्यांत सरकारी व खाजगी अशीं बरींच बिलें पुढें आणण्यांत आलीं; परंतु त्यांवर विशेष चर्चा किंवा वाद झाले नाहींत. डॉ. गौर यांचा बिलें तयार करून मांडण्याचा झपाटा जबरदस्त असतो. पण ते आधीं सभासदांचीं मनें आपल्या बाजूस वळविण्याची खटपट फारशी करीत नाहींत व जीं बिलें पुढें आणतात तीं कोणास फारशीं पटणारीं नसल्यामुळें सहसा मंजूर होत नाहींत. डॉ. गौर हजर असले म्हणजे कोणत्याहि प्रश्नांत त्यांचा 'बीचमें मेरा चांदभाई' असावयाचाच. ते चांगले कायदेपंडित आहेत, परंतु येन केन प्रकारेण प्रसिद्ध होण्यापेक्षां त्यांच्या सूचनांत फारसा राग नसतो. असेंब्लींत इतर अनेक कायदेपंडित सभासद आहेत, पण किरकोळ कायद्यांच्या सुधारणा करीत बसण्याकडे त्यांचें फारसें लक्ष लागत नाहीं. सर शिवस्वामी अय्यर हेहि एक कायदेपंडित आहेत, पण ते जे विषय पुढें आणतात त्यांत राजकीय प्रगति होण्याचीच दिशा दिसून येते.

* * *

चालू आठवड्यांत कित्येक ठरावांवर मात्र बराच जोराचा वादविवाद झाला. पैकीं अकाली लोकांचे पुढारी खरकसिंग व मुसलमान देशभक्त मौ. हजरत मोहानी यांची बंधमुक्तता करण्याचे ठराव व अकाली लोकांच्या गाऱ्हाण्यांची चौकशी करण्याकरितां कमिटी नेमण्याचा ठराव; हे इतक्या मोठ्या बहुमतानें पास होणार असें दिसलें कीं, प्रत्यक्ष मतें न मोजतांच त्यांची मंजुरी

जाहीर करण्यांत आली. सरदार खरकसिंग यांचेविषयींची जी हकीकत खासदार कर्तारसिंग यांनीं सांगितली ती ऐकून सरकारचा खुनशीपणा सर्वांना पटला. किरपाण वापरणें हा गुन्हा नव्हे, पण किरपाण बनविणें हा गुन्हा होतो असें ठरवून या गृहस्थांना शिक्षा देण्यांत आली आहे! तसेंच एक शिक्षा संपण्याच्या आंत दुसऱ्या शिक्षेची तयारी कशी करण्यांत येते हें हजरत मोहानी यांच्या खटल्याप्रमाणेंच याहि प्रकरणीं दिसून आलें. सरदार खरकसिंग यांचेविरुद्ध एक ब्रहि काढण्यास कोणी सरकारचा पित्त्या उभा राहिला नाहीं. कदाचित् सर माल्कम हेले हे कोठून तरी, कांहीं तरी कोरून काढावयाचे, पण या बाबतींत असा चमत्कार झाला कीं, या ठरावास उत्तर देण्याकरितां माहिती हवी म्हणून गृहमंत्रि यांनीं पंजाब सरकाराकडे कागद मागितले, ते शीखसुवर्णमंदिराचे मुख्य ट्रस्टी व गुरुद्वारप्रबंधक कमिटीचे अध्यक्ष खरकसिंग यांचे कागद न येतां दुसऱ्या कोणा खरकसिंगाचे कागद टपालांतून आले! दिव्याखालीं हा अंधारच म्हणावयाचा. पण हा अंधार हेलेसाहेबांना सरकारी धोरणाचा कमकुवतपणा लपविण्यास चांगलाच उपयोगी पडला. जेथें हजारों शीख कैदेंत जातात तेथें नामसादृश्यानें अशी अदलाबदल सहजच होणार. पण त्याबरोबर हेंहि सिद्ध झालें आहे कीं, सरकारी चित्रगुप्त थकतील किंवा गोंधळून जातील इतकें काम तुरुंगांत जाणाऱ्या शीख लोकांनीं सरकारला पुरविलें आहे.

मौ. हजरत मोहानी यांच्यासारखे मात्र सर माल्कम हेले यांना उलट बोलण्याला जागा मिळाली. दुर्दैवानें मोहानी यांनीं स्वतःचा बचाव न केल्यामुळें व त्यांच्या वार्डरला शिक्षा झाल्यामुळें लांचाचा गुन्हा शाबीत झाल्याचा बहाणा हेले यांना करतां आला. पण या भल्या माणसाच्या अंगीं हलकेपणा चिकटविण्याचा हेले यांचा प्रयत्न इतर रीतीनें अकस्मात् निष्फळ झाला. तो असा. हा ठराव चर्चेस निघण्याच्या आधीं बॅ. जिना हे "कामचलाऊ अध्यक्ष" म्हणून अध्यक्षांचे गैरहजेरींत त्यांच्या खुर्चीवर बसलेले होते. चर्चा सुरू असतां दोरास्वामी अय्यंगार यांनीं भलताच मुद्दा काढून हेलेसाहेब हे माणसांच्या खऱ्या पदवीचा उच्चार करीत नाहीं असें ते म्हणाले. हजरत मोहानी यांची पदवी म्हणजे "मौलाना" ही. त्यावर हेले यांनीं अशी कोटी केली कीं, खुद्द आजचे अध्यक्ष, म्हणजे बॅ. जिना यांनींच नागपुरच्या काँग्रेसमध्यें मोहानी यांना "मौलाना" म्हणणार नाहीं असा हट्ट धरला होता. अर्थात् मुसलमान मुसलमानाला ओळखींत नाहीं तर मी कां ओळखीन

हा त्याचा भावार्थ! पण बॅ. अभ्यंकर यांनीं या कोटिक्रमानें झालेली उणीव भरून काढली ती अशीः—“बॅ. जिना हे ज्या मुस्लीम लीगचे एक वेळ अध्यक्ष होते तिचेच अध्यक्ष हजरत मोहानी हेहि एक वेळ होते. अर्थात् मुसलमान मुसलमानाला ओळखत नसेल, पण तुम्ही ज्याला अध्यक्षाचा मान देतां त्याच्या पदाचा मान इतर ठिकाणीं मिळालेल्या गृहस्थाचा मोठेपणा तुम्ही नाकबूल करून कसें चालेल?” अभ्यंकरांनीं दुसरीहि एक कोटी चांगली केली. तुरुंगांतील शिस्तीचे नियम न पाळणारा कैदी हा मुदतीआधीं सोडण्याला पात्र नाहीं असा युक्तिवाद हेले यांनीं केला होता. त्यावर अभ्यंकरांनीं हेले यांना असें विचारलें कीं, हा युक्तिवाद जर खरा, तर ज्यांनीं तुरुंगांतील नियम उत्कृष्टपणें पाळले अशा कित्येक मोठ्या कैद्यांनाहि मुदत संपेपर्यंत तुम्हीं कैदेंत रखडविलेंच कीं नाहीं? तुरुंगांतील शिस्त पाळण्याविषयीं लोकमान्य टिळकांना अधिकाऱ्यांचें सर्टिफिकेट असल्याचें प्रसिद्धच आहे. पण सरकारनें त्यांच्या कैदेचीं सहा वर्षे पुरीं करून घेतलीं हें सांगण्याचा अभ्यंकरांचा हेतु उघड होता. या ठरावावर मुसलमान वक्त्यांचीं भाषणें झालीं, पण त्यांत फारसा जीव नव्हता. कित्येकांनीं तर वक्तृत्वाच्या अगडबंबपणानें किंवा लाचारी दाखवून आपलें हसेंच करून घेतलें.

* * *

शीख लोकांच्या गाऱ्हाण्यांबद्दल कमिटी नेमण्याच्या ठरावावरील चर्चा मात्र बरीच हृदयस्पर्शी व समर्पक झाली. पंडित मदन मोहन यांचें भाषण फारच साधार व समंजसपणाचें होतें. पंडितजींची कळकळ खरोखरच वाखाणण्यासारखी असते. असो. हजरत मोहानींच्या ठरावावर अनेक मुसलमानेतर सभासदांचीं भाषणें झालीं; पण शीखांचे ठरावावर अनुकूल भाषण करण्याला फारसे कोणी मुसलमान सभासद मिळाले नाहींत हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे! उलट दोनतीन मुसलमान सभासदांनीं खिरींत मिठाचा खडा टाकण्याचा प्रयत्न केला. खासदार गुलाबसिंग यांनीं ठराव मांडतांना शीखांचा थोडा पूर्वेतिहास सांगितला, त्यांत असा उल्लेख आला होता कीं, “प्रारंभीं पंजाबांत एका हातांत कुराण व एका हातांत तलवार धरून मुसलमानांनीं धर्मप्रसार केला. परंतु कांहीं मुसलमान सभासदांना तें विधान खपलें नाहीं! अबुल कासिम यांनीं तर असें सांगितलें कीं, वरील विधान खोटें असल्याचा पुरावा इतकाच कीं, तें खरें असतें तर हिंदुस्थानांत आजमितीस एकहि

हिंदु किंवा शीख उरला नसता. बिचाऱ्याला "व्याघ्रस्य महदालस्यं सर्पस्य महतो भयम्" हें सुभाषित माहीत नाहीं वाटतें! शीखांचीं जीं दुःखें म्हणून निवेदन करण्यांत आलीं त्यांविरुद्ध कोणाहि युरोपियन सभासदांस कांहीं उलट बोलतां आलें नाहीं. पंजाबांतील दोघा युरोपियनांनीं इतकेंच सांगितलें कीं, सरकारची शीखांविषयीं द्वेषबुद्धि नसून गुरुद्वारासंबंधीं तंटे तोडण्याचा प्रयत्न सरकारनें मनापासून केला; पण खुद्द शीखाशिखांतच मेळ नाहीं त्याला आम्हीं काय करावें? व याचें प्रत्यंतरहि लोकनियुक्त अशा शीख खासदारानें म्हणजे सरदार बाबा उजरसिंग बेदी यांनीं सभेंतच दिलें! कारण ते शीखांतील सुधारक पंथी अकाली नसून सनातनी आहेत.

* * *

पण कसेंहि असलें तरी अकाली लोकांचा स्वार्थत्याग व धैर्यवेष पाहून युरोपियन लोकांच्या मनावरहि चांगला परिणाम झाला असावा असें वाटतें. सर गॉर्डन फ्रेजर यांनीं कमिटी नेमण्याच्या सूचनेला संमतीच दिली, पण ती हायकोर्ट न्यायाधिशांची नेमावी असें सुचविलें. सर माल्कम हेले यांचेंहि या विषयावरील भाषण जरा नरमाईचेंच झालें. याचें कारण कदाचित् असें असेल कीं, आदले दिवशीं जैतो येथील कत्तलीच्या विषयाची चर्चा करूं देण्याची पंडित मालवीय यांनीं परवानगी मागितली असतां अध्यक्षांनीं नियमांची फाजील ओढाताण करून ती परवानगी नाकारली होती. अध्यक्षांची ही कृति एक प्रकारें जुलमी असून सर माल्कम हेले यांनीं घेतलेला आक्षेपच त्याला कारणीभूत झाला होता, व या जुलमाचा निषेध करण्याकरितां पंडितजींबरोबर स्वराज्य पक्षाचे बहुतेक लोक सभागृह सोडून गेले होते. तोच विषय अप्रत्यक्ष रीतीनें दुसऱ्या दिवशीं चर्चेला निघाला असल्यामुळें हेले यांनीं, त्यांच्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें जखमेवर मीठ न फासतां, आज थोडेंसें मवाळीचें मलम लाविलें! त्यांनीं प्रथम शीखांची खूपच स्तुति केली. त्यांचा धर्मसुधारणेचा हेतु नाकबूल केला नाहीं. पण एखाद्या समंजस तिऱ्हाइतासहि कदाचित् पटेल असलाच युक्तिवाद आत्मसमर्थनार्थ त्यांनीं पुढें केला; तो हा कीं, गुरुद्वारांची सुधारणा करावयाची असली तरी महंत वगैरे सनातनी शीख किंवा हिंदु यांचे जुने भोगलेले व वहिवाटलेले हक्क अकाली लोकांनीं केवळ जुलुमजबरदस्तीनें हिरावून काय म्हणून घ्यावेत! अकाली लोकांच्या सत्याग्रहाच्या चळवळींत तात्त्विक दृष्टीनें पाहतां ती एक प्रकारची उणीव आहे ही

गोष्ट खरी. तरी पण तेवढ्याचा फायदा घेऊन महंतांना काखेंत मारणें आणि प्रकर्षोन्मुख अकाली लोकांचे पाय मागें ओढणें हा जो प्रकार सरकार आज करीत आहे त्याचें समर्थन तेवढ्यानें होऊं शकत नाहीं.

* * *

जैतो येथील कत्तलीसंबंधीं चर्चा सोमवारीं टळली. तथापि मंगळवारीं निरनिराळ्या प्रसंगांनीं का होईना उपस्थित झालीच. अध्यक्षांच्या कारवाईनें सरकारच्या अब्रूचा अपमृत्यु टळला होता; पण महामृत्यु कसा टाळतां-येणार ? व मौज ही कीं, आदले दिवशीं चर्चेचें गांठोडें खुंटीला अडकवून ठेवण्यात जीं कारणें दाखविण्यांत आलीं तीं दुसऱ्या दिवशींहि लागू पडण्यासारखीं असतांहि शिस्ती-बेशिस्तीचे प्रश्न कोणी काढूं शकला नाहीं ! प्रत्यक्ष कत्तलीच्या मुद्द्यावर सवालजबाब व्हावयाचे, ते शीखांचें समाधान कसें होईल या मुद्द्यावर झाले, येवढाच काय तो फरक ! वादांत सर्व बाजू सरकारच्या अंगावर आली व ती अशी— नाभा संस्थान हें हल्लीं प्रत्यक्ष रीतीनें ब्रिटिश सरकारच्या व्यवस्थेखालीं आहे. संस्थानिक गादीवर असतां त्याचे हाताखालीं सरकारनें आपल्या पसंतीचा दिवाण नेमून देणें हें वेगळें आणि स्वतःचा ॲडमिनिस्ट्रेटर म्हणजे कुलमुखत्यार नेमून त्याकरवीं कारभार चालविणें हें वेगळें. नाभाचे हल्लींचे ॲडमिनिस्ट्रेटर मि. जॉन्सन यांना सर्व हुकूम दिल्लीहून मिळतात. ता. २१ रोजीं कत्तल झाली त्यापूर्वीं कांहीं दिवस ते दिल्लीस येऊन पांचशें लोकांचा जथा येईल त्या लोकांचें काय करावें याविषयीं समक्ष हुकूम घेऊन गेले होते. संस्थान व खालसा यांच्या हद्दीवर ब्रिटिश पोलीस अधिकारी व डेप्युटी कमिशनर हजर होते. जथ्याचा पुढारी रीतीप्रमाणें अनत्याचारित्वाची जाहीर शपथ घेऊन निघाला होता. जथ्याचे हातीं शस्त्रें नव्हतीं, अवांतर घोळका जमला होता तो लढण्यास नव्हे तर मौज पाहण्याला. घोडेस्वार जथ्यापुढें तलवार काढून चालला होता. पण नंगी तलवार हें शीख लोकांचें कृपाण, ते तें नेहमींच बरोबर बाळगतात. जथा किंवा इतर लोक यांनीं गोळीबार केला हें म्हणणें अद्यापि सिद्ध व्हावयाचें आहे. उलट त्यांच्यांतलेच शेंकडों लोक मेले व सरकारकडील एकहि जखमी झाला नाहीं. संस्थानी सैन्यानें मशीनगन आणून ठेविली होती ही कबुलीच दिली आहे. आणि तिच्यावरील झांकण काढलें नव्हतें येवढी गोष्ट शाबीत व्हावयाची आहे ! अकाली लोकांनीं गोळीबार केला हें खरें मानलें तर सरकारी मनुष्य एकहि

कसा जखमी झाला नाहीं? हा प्रश्न विचारला तेव्हां हेले म्हणाले, "त्यांना बरोबर नेम धरतांच आला नसेल." हें उत्तर ऐकतांच सर्व सभागृह हसूं लागलें व हेलेसाहेबांचें तोंड चिमणीएवढें झालें. पण हातीं अधिकार असल्यावर कोणी किती लाजविलें तरी काय होणार? याच गोष्टी जाहीर रीतीनें व कौन्सिलबाहेर म्हणजे जबाबदार रीतीनें सरकारचे गळीं बांधण्याकरितां बुधवार ता. २७ रोजीं कॉंग्रेस कमिटीच्या विद्यमानें दिल्लीस मोठी जाहीर सभा भरविण्यांत आली होती. अध्यक्षस्थानीं मौ. शौकतअल्ली हे असून उभय पंडितजी, कृष्णकांत मालवीय, महंमदअल्ली, न. चिं. केळकर, षण्मुखम् चेट्टी, पुरुषोत्तमदास टंडन यांचीं भाषणें झालीं. जथ्थ्यांत सामील असलेला एक शीखहि सभेस हजर होता.

* * *

ता. १८ नंतर स्वराज्यविषयक मागणीसंबंधानें एक आठडाभर पुढें कांहींच झालें नाहीं. नवीन पार्टीची सभा भरविण्याचें कारणच नव्हतें. पंडित मोतिलाल नेहरू हे पुण्यास निघून गेले होते. स्वराज्य पक्षाचे शेजारच्या प्रांतांतील कांहीं सभासद कामकाजाचे मंदीमुळें घरोघर गेले होते. लॉर्ड ऑलीव्हियर यांनीं आपले उद्देश जाहीर करण्याला बोलूनचालून मुदतच मागून घेतली होती; तथापि विलायतेहून रॉयटरची किंवा खासगी एखाद-दुसरी तार येऊन रोज असेंब्लीच्या लायब्ररींत भविष्य वर्तविण्याची सट्टेबाजी सुरू असे. कोरड्या अक्षता कपाळाला लावण्यापासून तों एकदम राउंड टेबल कॉन्फरन्स बहाल करण्यापर्यंत येवढें मोठें मैदान मिळाल्यावर सर्वांनाच आपापले अंदाजाचे घोडे नाचविण्यास सवड मिळावी यांत नवल नाहीं. ठरलेल्या तारखेच्या आदल्या दिवशीं पार्लमेंटरी प्रश्नोत्तरांच्या एकदोन तारा अशा आल्या कीं, त्यांनीं ही घोडदौड खूपच फैलावली. अखेर काल रोजीं लॉर्ड ऑलीव्हियर यांचे भाषणाची तार आली, तीवरून सर्वच भविष्यें विफल होण्याचा रंग दिसतो. नव्या मागणीचें काय होणार याचें उत्तर हिरण्यकशिपूला मिळालेल्या वरासारखें संदिग्ध आहे. घरांत नाहीं, घराबाहेर नाहीं; रात्रीं नाहीं, दिवसा नाहीं; मनुष्याकडून नाहीं व पशूकडूनहि नाहीं! स्वराज्य पक्षाची मागणी सर्वस्वीं नाकारली काय? नाहीं. सर्वस्वीं दिली काय? नाहीं. स्वराज्य आजच देणार काय? मुळींच नाहीं. पांचपंचवीस वर्षें लांबविणार काय? तेंहि नाहीं. हल्लींच्या घटनेची परीक्षा पाहण्यास १९२९ पर्यंत थांबणार काय? नाहीं. आज परीक्षा

घेणार काय ? नाहीं. बरें, आज परीक्षा घेणारच नाहीं काय? नाहीं. परीक्षा घेण्यास रॉयल कमिशन नेमणार काय? नाहीं. मग राउंड टेबल कॉन्फरन्स बोलावणार काय? नाहीं. हेलेसाहेबांनीं सांगितल्याप्रमाणें प्रांतिक सरकारामार्फत चौकशी करण्यावरच भागविणार काय? नाहीं. तात्पर्य, इतक्या नकारांच्या वळणांतून बाहेर पडून :जें करितां येईल तें लॉर्ड ऑलीव्हियर करणार! पार्लमेंटांतील हुजूर पक्षाचा विरोध उत्पन्न करावयाचा नाहीं, उदार पक्षाची मदत घ्यावयाची नाहीं, मजूर पक्षाचीं तत्त्वें सोडावयाचीं नाहींत, हिंदुस्थानांतील मवाळांना नाखूष करावयाचें नाहीं, व स्वराज्य पक्षाला भ्यालों असें दाखवावयाचें नाहीं. इतक्या पकडींतून काय बाहेर पडेल तें खरें!

* * *

पण भविष्यें जशीं अनेक वर्तवितां येतात, तसेच प्रत्यक्ष कागदावरील शब्दांचे अर्थहि अनेक करतां येतात. त्यांतून सरकार आपला अर्थ काढीत आहे, व सरकारला हवा तसा अर्थ काढतां येणार नाहीं असें स्वतंत्र पक्ष स्वराज्य पक्षाला सांगत आहे. सुधारणा अपुऱ्या व गैरसोयीच्या कशा याची चौकशी होणार हें खास; पण कोण करणार हें निश्चित नाहीं. सुधारणांची सुधारणा होणार हें खास; पण त्याकरितां पार्लमेंट नवा कायदा करणार किंवा स्टेट-सेक्रेटरी स्वतः-च्या अधिकाराचें दान करून ती गोष्ट साधणार हेंहि निश्चित नाहीं. पण कसें-हि असलें तरी ज्या अर्थी स्वराज्य पक्षाचा स्पष्ट नामनिर्देश लॉर्ड ऑलीव्हिअर यांचे भाषणांत आला आहे, त्या अर्थी आज असेंब्लींतील मुख्य विरोधी पक्ष, व अनेक पक्षांपैकीं सर्वांत प्रबळ पक्ष म्हणजे स्वराज्य पक्ष, ही कबूली त्यांनीं दिली आहे हें उघड होतें. या पक्षाचें म्हणणें, ज्या साधनानें हिंदुस्थान सर-कारला एका बाजूस ठेवून, स्टेट-सेक्रेटरी परस्पर समजून घेणार तें साधन अद्यापि ठरलें नाहीं व त्याचा उलगडा कदाचित् लवकरच होईल. पण या नुसत्या नामनिर्देशाला म्हणजे पहिल्या प्रतीच्या मानाच्या नारळाला भुलून जाऊन स्वराज्य पक्ष आपलें धोरण बदलील हें संभवनीय नाहीं. असो. ऑली-व्हियर यांच्या भाषणाचा विचार करून पुढील धोरण ठरविण्याकरितां नव्या संयुक्त राष्ट्रीय पक्षाची सभा रविवार ता. २ मार्च रोजीं भरणार आहे; तींत काय ठरतें तें यथाक्रम कळेलच.

## पत्र नं. ६

ता. ७-३-२४

सरकारचा जबाब समाधानकारक नसल्यामुळें अडवणुकीच्या मार्गाचा स्वीकार करावा, म्हणजे खर्चाच्या मागण्याहि नाकाराव्या असा ठराव असेंब्लींतील राष्ट्रीय पक्षानें तीनचतुर्थांश बहुमतानें केल्याचें मागील पत्रीं लिहिलेंच आहे. त्याची अंमलबजावणी कशी काय होते, हें ता. १० पासून दिसून येईल. कारण ता. १० ते १५ या पांच दिवसांत खर्चाच्या सर्व मागण्या व करपट्टीचें बिल यांचा निकाल लागावयाचा आहे. वास्तविक नवीन पक्षाच्या नियमांप्रमाणें सर्व गोष्टी घडून आल्या तर अवघड असें कांहींच नाहीं. या पक्षाचीं सत्तर माणसें हजर राहूं शकतील, व तितक्यांनीं मत दिलें तर खर्चाच्या मागण्या फेंटाळून लावतांहि येतील. पण नियम कसेहि असले तरी ते पाळले गेले पाहिजेत इतकेंच त्यांत अवघड असतें. कोणाची सदसद्बुद्धि कशी केव्हां आड येईल याचा नियम नाहीं असें मीं एका पत्रांत सूचित करून ठेविलें होतें हें वाचकांस स्मरत असेल, व तो प्रसंग आतां येण्याचा संभव दिसूं लागला आहे. पुढें काय होणार याची कल्पना असल्यामुळें कीं काय, कित्येक नेमस्त सभासदांनीं या पक्षास मिळण्याच्या वेळींच सावधगिरी ठेविली. लॉर्ड ऑलीव्हिअर यांनीं उत्तर देण्याचें पुढेंच राहिलें. पण मुलाचे पाय पाळण्यांत दिसूं लागतात, या म्हणीप्रमाणें मागणी ठरवितांनाच कित्येकांनीं आधींपासून असें म्हणण्यास सुरुवात केली कीं, मजूर पक्षानें आतां कोठें प्रधानपद मिळविलें आहे. त्याला कमींत कमी सहा महिन्यांचा तरी अवधि दिलाच पाहिजे. सहा महिने द्याव-याचे याचा अर्थ इतकाच कीं, अडवणूक यंदा न करतां पुढील सालावर ढकलावयाची. पण ज्यांनीं आधीं अशा रीतीनें पाय काढला तेच बरे असें म्हणण्याची वेळ न येवो म्हणजे झालें.

* * *

इतर कित्येक नेमस्तांच्या डळमळीला लॉर्ड ऑलीव्हिअर यांच्या भाषणानंतर प्रारंभ झाला. त्यांनीं असा बहाणा सुरू केला कीं, हिंदुस्थान सरकारचें धोरण असमाधानकारक आहे यांत शंकाच नाहीं, व तेवढ्यावरच पार्टीच्या धोरणाचा निकाल लागावयाचा असता तर आम्हीहि तुम्हांबरोबर खर्चमंजुरी नाकारून अडवणुकींत सामील झालों असतों. परंतु लॉर्ड ऑलीव्हिअर यांचें भाषण व धोरण हीं इतकीं असमाधानकारक आहेत असें म्हणतां येत नाहीं. आणि पार्टीनें बहुमतानें तसें ठरविलें, पण आम्हांला तसें न वाटल्यास आम्हीं काय

करावें ? यावर वास्तविक उत्तर हेंच कीं, गतवर्षी मजूर पक्ष अधिकारारूढ नव्हता. दिल्ली येथील अधिकाऱ्यांच्या धोरणावरून सरकारच्या धोरणाचा निकाल तेव्हां लागावयाचा होता आणि गतवर्षी लोकमत क्षुब्ध करण्यासारख्या गोष्टी दिल्ली सरकारनें थोड्या केल्या असें नाहीं; असें असतां गतवर्षी खर्च नामंजुरीची कल्पना तुम्हांला कां आली नाहीं, किंवा आवडली नाहीं. पण न करत्याचा वार शनिवार ! गतवर्षी कल्पना सुचली नाहीं, पटली नाहीं सुचूनदेखील बहुमत होण्याचा संभव नसल्यानें अंगिकारिली नाहीं असें म्हणूं. पण यंदा ही कल्पना नुसती सुचली, पटली, इतकेंच नव्हे, तर सही घालून कबूल केलेल्या नियमानुसार मंजूरहि झाली. असें असतां फिरून खळबळ सुरू आहेच; पण याचा खरा अर्थ इतकाच कीं, सरकारची रसद मारण्याची कल्पनाच या लोकांना मनांतून भयंकर वाटते. भयंकर याचा अर्थ या गुन्ह्याकरितांच सरकार डोकें मारतें किंवा तुरुंगांत टाकतें असा नाहीं, तर तो उपाय जालीम वाटतो. खर्च मंजूर न केला तर देशांतील कारभार कसा चालणार व कारभार बंद पडण्या सारखी गोष्ट म्हणजे क्रान्तिकारक अशी गोष्ट ! क्रान्तिकारक म्हणजे जहाल, जहाल म्हणजे असमंजस, असमंजसपणाचा अर्थ आम्हांला बुद्धि कमी असें लोक म्हणणार. या परंपरेनेंच त्यांची सर्व विचारसरणी चालते !

* * *

पण वास्तविक खर्च नामंजूर करण्यांत जहालपणा नाहीं किंवा असमंजसपणाहि नाहीं. आपणाला रीतसर मिळालेला अधिकार आपण बजवावयाचा इतकाच त्याचा अर्थ आहे. सरकार झालें तरी काय करतें ? सर्व अधिकार आपल्या हातीं ठेवावा व लोकमत झुगारून द्यावें हा तरी जहालपणाच नव्हे काय ? गर्व व बिनमुरवतखोरपणा हा झाला तरी असमंजसपणाचाच प्रकार नव्हे काय ? पण सरकार हा असमंजसपणा आज दीडशें वर्षें करीत आलें आहे. मोठ्या गोष्टींचें राहो, पण गुदस्ता मिठाचा कर वाढविला नसता तर कारभार अडून पडला असतां, देशांतील सर्व व्यवहाराचे ताबूत थंडे होऊन बसले असते, असें थोडेंच आहे ! तीच गोष्ट संस्थानिक संरक्षणासंबंधाच्या कायद्याची. तो कायदा पास झाला नव्हता, तेव्हां संस्थानिकांची अब्रू काय मोठी गाड्यांनीं वाहत होती, आणि आतां तो पास झाला म्हणून ती अब्रू अशी काय कडीकुलपाच्या बंदोबस्तांत राहिली आहे ? पण हा झाला समंजस-

पणाचा विचार. सरकारला हा समंजसपणा सुचला नाहीं आणि आम्ही सर्व लोकप्रतिनिधि एकविचारानें वागूं व खर्चमंजुरी बंद पाडूं असें कोणी म्हटलें तर ते मात्र जहालपणाचें व असमंजसपणाचें ठरतें. सर्व अविचाराचा (!) मक्ता सरकारला व सर्व सुविचाराचा (!) मक्ता आम्हांला असें झालें आहे, त्याला काय करावें ? सरकारी सभासदांनीं जन्मांत चुकून देखील लोकांच्या बाजूला एखादे वेळींहि हात उचलूं नये व सुविचारीपणाच्या निमित्तानें लोकांनीं निवडून दिलेल्या प्रतिनिधींपैकीं मात्र कांहीं हात सरकारच्या बाजूनें उचलले जावे हें दुर्भाग्य नव्हे तर काय ?

* * *

वास्तविक कायद्यानें लोकपक्षाला असेंब्लींत अधिक मतें ठेवण्यांत आलीं आहेत. १४४ पैकीं १०४ लोकांना निवडून द्यावें असें ठरलें. तेव्हां त्याबरोबर असा निर्बंध कायद्यानें घातला नाहीं कीं, या १०४ नीं केव्हांहि एका बाजूनें मत देऊं नये; तसें झालें तर तो कटाचा गुन्हा होईल! तसेंच हिंदुस्थानच्या जमाखर्चाच्या एकंदर रकमेपैकीं अमुक इतक्यापुरतीच मंजुरी पाहिजे, इतराला मंजुरी नको असें कायद्यानें ठरविलें, याचा अर्थ सरकारनें आपल्यापुरता हवा तेवढा बंदोबस्त आधींच करून घेतला आहे; मग बाकीच्यांतहि आम्हीं हात आंखडूनच धरला पाहिजे हें काय म्हणून ? बरें समजा, आम्हीं खर्चाला नामंजुरी दिली तरी तो खर्च जरूरीच्या सबबीवर सर्टिफिकेट देऊन मंजूर करून अमलांत आणण्याचा अधिकार सरकारनें स्वतःकडे ठेवून घेतलेला असून त्याचा उपयोगहि सरकार करतें हें आपण पाहतों. असें असतां आपल्या हातीं असलेला तेवढा खर्च नामंजूर करण्याला लोकप्रतिनिधींनीं कां कचरावें किंवा तें असमंजसपणाचें कां मानावें हें कळत नाहीं. लोकप्रतिनिधींच्या बहुमतानें खर्च नामंजूर होणें याचा अर्थ सरकारच्या धोरणाचा निषेध व्यक्त करणें इतकाच समजला जातो. त्याहून त्याला अधिक खोल अर्थ नाहीं; पण इतकी देखील नाजूक अडवणूक करण्याला कित्येक जुन्या पिढीचे पुढारी तयार होत नाहींत तेव्हां त्यांची ही नुसत्या भलेपणाची खोड जाणार तरी केव्हां ? खर्च नामंजूर केल्यानें लॉर्ड ऑलीव्हिअर किंवा रामसे मॅकडोनाल्ड हे आम्हांला असमंजस म्हणण्याचा जितका संभव तितकाच त्यांनीं आमच्या या सत्याग्रहाचें कौतुक करण्याचा संभव नाहीं काय ?

* * *

पण दुर्दैवानें ही विचारसरणी कांहीं नेमस्तांना व स्वतंत्रांना अद्यापि पटली नाहीं. त्यांतल्या कित्येकांनीं राष्ट्रीय पक्षाच्या स्थापनेच्या आधींच आपलें अंग काढून घेतलें हें वर सांगितलेंच आहे. बाकीच्यांमध्यें दोन-तीन प्रकार आहेत. कांहींनीं केवळ वकिली पद्धतीनें हरकती आणण्याला सुरुवात केली आहे. मूळ नियमांचा अर्थ अमुक असा नाहीं, आम्ही या समजुतीनें या पक्षांत सामील झालों नाहीं, सभा बोलावली ती रीतसरच नव्हती, लोकांना नोटीस पोंचावी तशी पोंचलीच नाहीं; असल्या युक्तिवादानें ते बहुमताच्या ठरावाची अडचण काढून टाकूं पाहत आहेत. दुसरे कित्येक 'उघड बंड करूं, आम्ही ठराव मानीत नाहीं,' असा धाक घालीत आहेत. कित्येक असें म्हणत आहेत कीं, 'आम्ही नियमांनीं व वचनांनीं बांधले गेलों खरे, त्या अर्थी जें काय व्हावयाचें तें होवो; बहुमताप्रमाणें चालणें हें आमचें कर्तव्य आहे व तें आम्ही करूं, पण नाखुषीनें करूं. याचा अर्थ या बैठकीनंतर राष्ट्रीय पक्ष सोडून जाऊं व एखादाच असें म्हणत आहे कीं, आमचें मत काय होतें तें आम्हीं सांगितलें. आतां पुढें काय होईल, कसें होईल, हें पाहावयाचें नाहीं; बहुमताप्रमाणें चालावयाचें व तेंहि खुषीनें चालावयाचें. ही झाली व्यक्तिसंबंधाची गोष्ट. पण तेवढ्यानें हा प्रश्न सुटत नाहीं. बहुमताप्रमाणें न चालणाराला लोक काय नांवें ठेवतील किंवा न ठेवतील, हा प्रश्न पुढचा आहे; पण उद्यां खर्च-नामंजुरीला प्रत्यक्ष मतें किती पडतील हाच प्रश्न अधिक महत्त्वाचा असल्यानें पराभव झाला तरी अडवणूक करावयाची किंवा वरील व्यक्तींशीं मिळतें घेऊन कांहीं तरी मधला मार्ग काढून असेंब्लींत बहुमत सिद्ध करावयाचें या विचारानें उभयतांमध्यें समेट करण्याची खटपटहि कांहीं लोक करीत आहेत.

* * *

कसेंहि होवो, असेंब्लींत विरोधाचें पाऊल एकंदरीनें पुढें पडत आहे याविषयीं मात्र शंका नाहीं. समेट न झाला तर स्वराज्य पक्षाचे सर्व लोक व त्यांना मिळणारे थोडेसे स्वतंत्र लोक मिळून बजेटाला सरसकट हरकत घेतील; मग त्यांत पराभव होवो वा जय येवो. या मार्गानें जय हटकून येण्याची आशा कमी. कारण सरकारचे सर्व आडमुठे लोक जाग्यावर खडे राहणार. फाजील सुविचारी स्वतंत्र लोक भलेपणामुळें त्यांना जाऊन मिळणारे संशयात्मे 'नरो वा कुंजरो वा' म्हणून घरीं बसणार किंवा हजर राहून मत न देणार! पण वरील कारणांनीं जय न आला तरी पूर्वीं कधींहि घडून न आलेली गोष्ट म्हणजे एकं-

दर बजेटाच्या नामंजुरीकरितां पन्नासपंचावन्न लोकांनीं मत देणें ही गोष्ट घडून येईल व असा दाखला नवीन पाडणें हा राजकारणाच्या लक्ष्यांत मोठाच फायदा होय. राजकारणाचा इतिहास असल्या दाखल्यांनींच बनला जातो व १९२४ सालीं असेंब्लींत बजेट नामंजुरीकरितां मतमोजणी करावी लागली असा दाखला नमूद झाला तरी स्वराज्य पक्षानें राजकारणाचा गाडा पुढें नेला असेंच इतिहासकारांस म्हणावें लागेल. बरें, समेट झाला व त्याकरितां स्वराज्य पक्षाला पूर्वींच्या स्वराज्यविषयक मागणीप्रमाणें अडवणुकीच्या धोरणांतहि थोडी पड खावी लागली, म्हणजे आपलेंच धोरण सर्वस्वीं चालवितां आलें नाहीं, तरी फार फार म्हणजे इतकेंच होणार कीं, बजेटांतील सर्व मागण्या नामंजूर न होतां कांहीं थोड्या सर्वस्वीं नामंजूर होणार. पण सर्व मागण्या नामंजूर करण्याच्या हट्टानें पराभव पावण्यापेक्षां मागण्यांची संख्या मर्यादित करून का होईना, पण त्यावर बहुमत सिद्ध करून सरकारचा पराभव करतां आला तरी तीहि प्रगतीच होय, पूर्वीं न झालेली गोष्टच होय, अर्थात् नवा दाखलाच होय. यांपैकीं अखेर कोणतें प्रत्यक्ष घडतें तें पहावें. पण स्वराज्य पक्षाचीं जितकीं माणसें असेंब्लींत असतील तीं सर्वच्या सर्व बरोबर कांहीं थोडीं तरी स्वतंत्र माणसें घेऊन, बजेट-नामंजुरीला मत देणार ही गोष्ट सिद्ध आहे. गेल्या निवडणुकीच्या वेळींच स्वराज्य पक्षाचे आणखी चांगले चांगले लोक ठिकठिकाणीं निवडणुकीला उभे राहते व लोक त्यांना निवडून देते, तर अडवणुकीचा गाडा आज जो रेंगाळत आहे तो खूप जोरानें चालूं लागला असता. असो. ता. १० ला बजेटावर मतें घेण्याला सुरुवात असल्यामुळें तोंपर्यंत या प्रश्नाचा काय तो निकाल लागेलच. दरम्यान बजेटावरील वादविवाद काल रोजीं संपला व करपट्टीच्या बिलाचा निकाल कसा लागणार याचा थोडासा अंदाज आला. हा वादविवाद शुष्कच असतो. बजेटाचा आधार घेऊन कोणी कांहींहि बोलावें असा एक प्रकारचा शिरस्ताच पडला आहे, व त्याप्रमाणें 'आमच्या गांवीं न्यायकोर्टाची उणीव आहे' येथपासून संपूर्ण स्वराज्य मागण्यापर्यंत सर्व विषय चर्चेंत आले! उत्तर देतांना फडणविसांनीं या चर्चेवर टीका केली. त्यांचें म्हणणें असें कीं, लोक बजेटाच्या तपशिलांत खोल जावें तितके गेले नाहींत. त्यांची तक्रार बरोबर आहे. कारण सहानुभूति व मार्मिकपणा असल्याशिवाय टीका बरोबर होत नाहीं. पण टीकेंत सहानुभूति नसण्याचें

कारण उघडच आहे. फडणविसाच्या दृष्टीनें बजेटाचा अभ्यास कोण करणार? लोकांना आज धोरणाचें कौतुक आहे, निवळ आंकडेबाजीचें कौतुक नाहीं. शिवाय दीडदोनशें कोटि रुपयांच्या जमाखर्चाच्या अभावीं अंदाजाच्या कागदपत्राचे भारे सभासदांपुढें वादविवादाच्या आधीं फक्त 'चार दिवस' आणून आदळले तर त्यांनीं तरी मार्मिकपणा काय दाखवावा? गतवर्षी कराचीचे व्यापारी सर पी. डी. वेब व यंदा मुंबईचे व्यापारी व तज्ज्ञ सर पुरुषोत्तमदास ठाकुरदास यांनीं देखील अशी तक्रार केली कीं, चार दिवसांत आमचे कागदहि पुरे वाचून होत नाहींत, मग आम्ही खोलांत शिरून चर्चा कशी करणार? असल्या लोकांना जी अडचण ती अतज्ज्ञ माणसांना किती असेल याची कल्पना सहज करितां येईल. फडणविसाच्या तक्रारीसारख्या तक्रारी इतर व्यवहारांत पाहावयास मिळतातच. घरीं आचाऱ्यानें हौसेनें जिन्नस करावा पण यजमानाला भूक तरी नसावी किंवा बाहेरच्या काळजीनें त्याचें मन व्यग्र असावें; म्हणजे यजमान चवीनें जेवत नाहीं अशी तक्रार आचारी करतो त्यांतलाच हा प्रकार होय! जमाखर्च हें राजकारणी धोरणाच्या वृक्षाचें फळ आहे. पण हा वृक्षच हस्तगत करण्याचा ध्यास ज्याला लागला तो त्यावरील एखाद्या फळाच्या नादांत कसा पडणार?

* * *

फडणविसांनीं ज्या एका भेदनीतीचा अवलंब केला ती मात्र त्यांचे अंगावर आली. यंदाच्या अंदाजपत्रकांत शिल्लक दाखवून 'दाणे टाकून कोंबडीं झुंजवावीं' तसें असेंब्लींतील सभासद झुंजविण्याचा त्यांचा विचार होता, पण तो साधला नाहीं. शिल्केपैकीं कांहीं भाग प्रांतवार खंडणी कमी करण्याकडे देतो म्हटल्याबरोबर प्रत्येक प्रांत आपल्याला अधिक मागून दैन्य दाखवील असा त्यांचा अंदाज असावा. पण बहुतेक प्रांतांच्या लोकांनीं या वाटणींत भांडण न काढतां लॉर्ड मेस्टन यांनीं केलेल्या एकंदर योजनेंतील अन्यायावरच झोड उठविली. शिल्केची रक्कम प्रांतवार वाटून मागितली तर मिठावरील कर कमी होऊं शकत नाहीं; अर्थात् मिठाच्या कराविरुद्ध लोकांची तक्रार खोटी, तींत खरी कळकळ नाहीं, असेंहि साधल्यास दाखवावें अशी फडणविसांना कुबुद्धि सुचली होती. पण बहुतेक प्रांतांतील लोकप्रतिनिधींनीं स्पष्ट सांगितलें कीं, मिठाचा कर नुसता आठ आणेच नव्हे तर सव्वा रुपयानें कमी करून मूळ पदावर आणा, मग आमची प्रांतिक खंडणीची रक्कम कमी न झाली तरी

चालेल, आणि तेंहि खरेंच आहे. प्रांतिक सरकार तरी असें काय जबाबदार आहे कीं, लोकांचें मीठ तोडून खजिन्यांत भर टाकली तर तिचा उपयोग तें केवळ लोककल्याणाकडेच करील!

* * *

पण या बाबतींत लोकांची परीक्षा पाहण्याचा आणखी एक प्रसंग फडणविसांना मिळणार, पण फुकट जाणार आहे, तो असा. अडवणुकीच्या धोरणामुळें बजेट नामंजूर करावयाचें तर त्याबरोबर करपट्टीचें बिल नामंजूर करावें लागणार असा युक्तिवाद ओघानें येतो. पण मग लोकप्रतिनिधींना अडवणुकीचें धोरण अधिक प्रिय आहे कीं, मिठावरील कर कमी करण्याची कळकळ अधिक आहे, असा प्रश्न उत्पन्न होईल व या विरोधाच्या पेंचांत खासदार लोक सांपडले म्हणजे मग आपण त्यांच्या कुचंबणेची गंमत दूर बसून पाहूं, असा फडणविसांचा विचार दिसतो. पण यांतहि त्यांची निराशाच होईल. कारण समेटाचें धोरण यशस्वी झालें तर स्वतंत्र सभासदांना बरोबर मिळवून घेऊन बजेटांतील फक्त कांहीं निवडक बाबी सर्वस्वीं नामंजूर करून, स्वराज्य पक्ष बाकीच्यासंबंधीं तटस्थ वृत्ति स्वीकारील व मग अर्थात् कर कमी करण्याच्या उपसूचनांवरहि बहुमत होऊन कर कमी होईल. पण समजा, समेट न झाला व सरसकट विरोध करण्याचें ठरलें व त्यांतच मिठावरील कराचे बिलाला विरोध करावा लागला, तरी त्याला स्वराज्य पक्षाची तयारी असण्याला हरकत नाहीं. कारण तरतमभाव लोकांना न समजण्याइतके लोक मूर्ख नाहींत. बरें त्यांतूनहि समजा, इतर बाबतींत अडवणूक करून मिठावरील कराच्या बिलावर मतें देऊन तो कमी केला, म्हणजे बाकीचें उत्पन्न सरकारला उरूं दिलें तर येऊन जाऊन विसंगतपणाचा आरोपच येणार ना? खुशाल येवो! असल्या आरोपाला राजकारणांत कोणी भीक घालीत नाहीं! तात्पर्य, आमची ही परीक्षा पाहण्याचें फडणवीससाहेबांचें कपट व्यर्थ होणार!

## पत्र नं. ७

ता. १३-३-२४

माझें मागील पत्र लिहून झाल्यावर नॅशनॅलिस्ट पार्टीची कत्तलरात्र सुरू झाली. रोज सभा भरूं लागल्या. एक स्वराज्य पक्षाची, दुसरी नॅशनॅलिस्ट पक्षाची व तिसरी कार्यकारी कमिटीची, अशा रीतीनें एखादे दिवशीं तीन-तीनहि सभा होत. वास्तविक 'स्वराज्याच्या मागणीला सरकारी जबाब समा-

धानकारक नाहीं' असा ठराव झाल्यावर मग एवढा गोंधळ कसला ? असा प्रश्न सहजच सुचतो. पण त्याचें उत्तर असें कीं, एक तर नियमाप्रमाणें या ठरावानंतर स्वतंत्र पक्षाच्या लोकांनीं बजेट फेटाळून लावण्यास तयार व्हावें असें असलें तरी त्यांची नाखुषी अगदीं उघड उघड दिसून येत होती. प्रतिष्ठित मनुष्य वचनबद्ध झाला म्हणजे त्याला वचनाप्रमाणें वागावें लागतें हें खरें; तथापि "मी वचनाप्रमाणें वागून तुझ्यावर उपकार करतों व केवळ नियमामुळें माझ्या मनाविरुद्ध मला वागावें लागत आहे, याचें पाप तुझ्या माथ्यावर राहील" अशा प्रकारचा तळतळाट तो आपल्या जळफळाटानें दुसऱ्यास दाखवीत असतो. तोच प्रकार येथेंहि झाला. शिवाय वरील गोंधळाचें दुसरें कारण असें कीं, ज्या नियमावलीमध्यें विशिष्ट स्थितींत बजेट फेटाळून लावावें असें लिहिलेलें आहे त्याच नियमावलींत असेंहि लिहिलेलें आहे कीं, असेंब्लींत बहुमत मिळविण्याची खात्री झाल्याशिवाय बजेट फेटाळण्यास सुरुवात करूं नये.

* * *

पण हें बहुमत हटकून मिळणार अशी खात्री कोणाची कशी होणार ? ही खात्री म्हणजे अर्थात् अंदाज, व कोणत्याहि निवडणुकींत उभयान्वयी लोकांचीं मतें जमेस धरावयाची पाळी आली म्हणजे तो अंदाज डळमळीतच मानला पाहिजे, हें निवडणुकीचा अनुभव असलेल्या सर्वांना माहीत आहेच. असेंब्लींत निर्विवाद बहुमत मिळण्यास निदान ७२ खासदार सभासद बजेट फेटाळण्यास तयार झाले पाहिजेत. आतां नॅशनॅलिस्ट पार्टीच्या यादीवरच जर ७२।७३ सभासदांचीं नांवें दाखल, तर मग ७२ मतें मिळण्याची पंचाईत कसली ? याचें उत्तर हें कीं, ७२।७३ यादीवर राहिले, पण सभागृहांत आयत्या वेळेस ते सर्व हजर असतातच असें नाहीं. कोणी गांवीं गेले म्हणून, कोणी गांवीं जाऊन परत येतों म्हणाले पण आयत्या वेळीं आले नाहींत म्हणून, कोणी आजारी झाले म्हणून, कोणी आजाराचें मिष केलें म्हणून, कोणावर प्रतिपक्षाचें वजन बेसुमार पडलें म्हणून, व कोणी जाणून-बुजून फसविलें म्हणून; तात्पर्य ता. ८ चे सुमारास, खुद्द नॅशनॅलिस्ट पार्टीचीं कांहीं मतें कमी पडणार व बाहेरचीं कांहीं न मिळालीं तर बहुमत होणार नाहीं असें वाटूं लागलें. पण आमच्या एका दिवसाच्या खटपटीनें ही उणीव बरीच भरून निघाली. ता. ८ रोजीं नॅशनॅलिस्ट पक्षानें दोन-तृतीयांश

बहुमतानें सर्व बजेट नामंजूर करावें असें ठरविलें व ता. ९ च्या सभतें दुसरे दिवशीं बजेट नामंजूर करण्याइतकीं मतें आपल्या बाजूस पडतील असा अंदाज बहुमतानें मंजूर केला.

सरकारच्या बाजूस आमच्याप्रमाणेंच अस्मानीचा गोता असला तरी सुलतानीचा नव्हता. त्यांनीं आपली यादी तपासून जे सभासद हजर राहण्यासारखे वाटले नाहींत त्यांचे राजीनामे तावडतोब मागवून घेतले व त्यांच्या जागीं दुसऱ्या लोकांच्या 'नेमणुका' केल्या. हीच 'निवडणूक' असती तर तिला दोन महिने पुरले नसते. पण सरकारला आपला मानसपुत्र तळहाताच्या मळानें निर्माण करतां येतो ! किंबहुना हात मळविण्याचेंहि कारण पडत नाहीं. एकाच टेबलावर बसून शाईत बुडविलेल्या एकाच टाकानें एकाची राजीनाम्यावर सही व त्याचे जागीं दुसऱ्याची नेमणूक केल्याची सही होऊं शकते. या सुलभप्रसूतीमुळें ता. ८ चे सुमारास कांहीं जुने सरकारी सभासद एकदम अदृश्य होऊन त्यांचे जागीं कांहीं नवे सभासद एकदम दिसूं लागले. तथापि इतरहि खटपट सरकारला बरीच करावी लागली. त्यांच्या तर्फेचे कांहीं सभासद असे असतात कीं, नेहमींच्या चालचलाऊ कामांत सरकारला त्यांची गरज लागत नाहीं, पण निर्वाणीचे वेळीं धांवा केला असतां ते सरकारला अंतर देत नाहींत. उदाहरणार्थ, कर्नल गिडने हे स्वराज्याच्या मागणीच्या ठरावाचे दिवशीं, म्हणजे ता. १८ फेब्रुआरी रोजीं सभागृहांत दिसले; त्यावर ता. १० मार्च रोजीं बजेटमंजुरीच्या कार्याला उगवले ! असो. ता. १० रोजीं असेंब्लींत सुमारें १२५ सभासद हजर होते, व सामान्य रीतीनें पाहणाराला दोनहि पक्ष तुल्यबल दिसले असल्यास नवल नाहीं. बजेट नामंजूर झालें तरी काय होणार असें म्हणणाऱ्यांनीं त्या दिवशीच्या प्रारंभीं उभयपक्षांच्या चेहऱ्यांकडे पाहिलें असतें तर सकृद्दर्शनीं शुष्क वाटणाऱ्या या निकालाला किती महत्त्व होतें हें त्याला तेव्हांच दिसून आलें असतें.

* * *

बजेटांतील पहिली मागणी कस्टमखात्यास लागणाऱ्या खर्चाची होती व राजकारणाच्या दृष्टीनें बजेट नामंजूर करावयाचें तर या रकमेच्या नामंजुरीपासूनच प्रारंभ करणें जरूर होतें. कित्येक स्वतंत्र सभासदांचें म्हणणें असें होतें कीं, नंबर १५ ची सर्वसाधारण कारभाराची ( जनरल ॲडमिनिस्ट्रेशन ) व नंबर ५८–५९ म्हणजे विलायतेंत होणाऱ्या खर्चाची अशा दोनतीन

मागण्या सर्वस्वीं नामंजूर कराव्या, ह्यांत आम्ही सामील होऊं. या दोनतीन मागण्या मिळून सुमारें दीडकोटि रुपयांची रक्कम होते. परंतु या मागण्या चर्चेला निघेपर्यंत चार दिवसहि जावयाचे, व बजेटनामंजुरी हें एक प्रकारचें युद्ध मानलें तर पहिल्याच लढाईत यश मिळविणें हेंच अत्यंत जरूरीचें ठरतें. कारण दोनतीन दिवस शुष्क चर्चेचे निघून गेले तर बाहेर लोंकांचे मनावर कदाचित् भलताच परिणाम व्हावयाचा! शिवाय सभागृहांत साठ-पासष्ट सभासद तुरमुंडी देऊन ठिय्या न हलवितां बसावयाचे, हें काम किती कठीण असेल याची कल्पना पुष्कळांना होईलच. या सर्व गोष्टींचा विचार करून अखेर असें ठरविण्यांत आलें कीं, कस्टम खात्याच्या खर्चमंजुरीपासून म्हणजे बजेटाच्या श्रीगणेशापासूनच सरसकट नामंजुरीस प्रारंभ करावा. या गोष्टीस स्वतंत्रपक्षीय लोक नाराजच होते, पण शेवटीं शिस्तीमुळें ती गोष्ट त्यांना कबूल करावी लागली.

* * *

ठरल्याप्रमाणें कस्टमची ७४ लक्षांची रक्कम मंजुरीला पुढें येतांच पंडित मोतिलाल नेहरू यांनीं ती सर्वस्वीं नामंजूर करावी अशी उपसूचना पुढें आणली. तिचें समर्थन करतांना त्यांनीं उपसूचनेचा मुख्य हेतु खुलासेवार पण सौम्य शब्दांनीं समजावून सांगितला. त्यांचें म्हणणें हेंच कीं, " आम्हीं नामंजूर केलेली रक्कम गव्हर्नर-जनरल हे बहुधा आपल्या सुलतानी अधिकारांत मंजूर करतीलच; तरी पण अशी सुलतानी गाजविण्याला त्यांना भाग पाडणें हेंच तूर्त आमचें उद्दिष्ट आहे. कारण असेंब्लींतील बहुमत सरकारविरुद्ध असल्यामुळें सरकार सुलतानी अधिकार गाजवूनच आपला चरितार्थ चालवूं शकतें हा विरोधाभास इकडील व विलायतेंतील जनतेला चांगला पटेल. नवीन सुधारणांत एवढ्या मोठ्या असेंब्लीला निर्णायक असा अधिकार फार थोडा ठेवला आहे, म्हणूनच सुधारणा फोल आहेत! आणि बहुमताच्या कृत्यानें राज्यकारभारांत बखेडा उत्पन्न झाला तर त्याची सर्व जबाबदारी खुद्द सरकारवरच राहते. त्यांच्या या भाषणाचा परिणाम चांगला झाला. त्याचें कारण त्यांचे बोलण्यांत आवेश असला तरी वावगा असा एकहि शब्द नव्हता व त्यांनीं स्वीकारलेला मार्ग शिस्तीला सोडून आहे असें म्हणण्याची कोणाचीहि छाती नव्हती.

* * *

सदर उपसूचनेवर सुमारें चार तास वादविवाद झाला. एका अर्थानें ता. ५, १३ व १८ फेब्रुवारी रोजीं स्वराज्यविषयक मागणीचे ठरावावर झालेल्या चर्चेची ती सुधारून वाढविलेली आवृत्तीच होती असेंच म्हटलें तरी चालेल. नवीन असा मुद्दा म्हटला म्हणजे लॉर्ड ऑलीव्हियर यांच्या भाषणाचा. पण त्या भाषणानंतर बजेट फेटाळून लावण्याचा ठराव झाला असल्यानें उभयपक्षांपैकीं कोणीहि त्या मुद्द्याला फारसें महत्त्व दिलें नाहीं. या बाबतींत परस्परांचे मत परस्परांना पुरें माहीत झालें होतें. शिवाय या दिवशीं वादविवाद सुरू होण्याचे प्रारंभींच डॉ. गौर यांनीं एक उपद्व्याप केला तो त्यांच्या व सरकारच्या गळ्यांत आलेला होता होता. तो प्रकार असा– कांहीं तरी मधाचें बोट लावून खोटी आशा उत्पन्न करावी आणि तीक्ष्ण उपाययोजनेच्या आपल्या मरणाला कोठून तरी रात्र आडवी आणावी, ही डॉ. गौर यांचेसारख्या कृतिहीन वावदुकांची नेहमींची ठरीव रीत आहे. ह्याप्रमाणें गृहमंत्रि सर माल्कम हेले यांच्याशीं थोडें हितगुज करून त्यांनीं आदले दिवशीं त्यांचेकडून विलायत सरकारकडे स्वराज्यविषयक धोरणाच्या चौकशीची म्हणून तार पाठविली, व जबाब येतांच तुम्हांला कळवीन असें अभिवचन घेतलें. या अजब कारवाईचा कागद हातीं घेऊन ते आदले दिवशीं नॅशनॅलिस्ट सभेंत आले व तेथील ठरावावर बिब्बा घालण्याचा त्यांनीं प्रयत्न केला, पण डॉ. गौर यांना सर्व लोक पुरे ओळखीत असल्यामुळें हा विषय निघतांच सर्वांनीं त्यांना फजित केलें व ते मान खालीं घालून सभेंतून निघून गेले. तथापि असेंब्लींतहि त्यांनीं फिरून तोच डाव टाकला, पण त्यांचे दुर्दैवानें सर माल्कम हेले यांना समाधानकारक असें कांहींच उत्तर देतां आलें नाहीं. गौर यांचा प्रश्न व हेले यांचें उत्तर बाहेर पडतांच कमींत कमी १०-१५ सभासदांनीं उपप्रश्नांची उलटीसुलटी सरबत्ती सुरू केली, व शेवटीं हें गांधीलमाशांचें पोळें उगाच चाळविलें असें वाटून हेले म्हणाले कीं, आडांतच नाहीं तर पोहऱ्यांत कोठून येणार ? मजजवळ जर कांहीं माहिती नाहींच तर तुम्हाला मी ती काय देणार ? तुमचे प्रश्न म्हणजे कोरड्या विहिरींत लावलेला पंप हलवीत बसण्यासारखें निरर्थक आहे ! पण नॅशनॅलिस्ट पक्षाला आशेचा उसना ओलावा हवा होता म्हणून कांहीं त्यानें पंप हलविला नाहीं, तर हेले यांच्या म्हणण्याप्रमाणें मूळ सहानुभूतीच्या विहिरींत पाणीच नाहीं हेंच सिद्ध करण्याकरितां हलविला होता व त्याचें तें कार्य झालें.

* * *

सुमारें चार तास चर्चा झाल्यावर साडेपांच वाजण्याचे सुमारास, अध्यक्ष अजूनहि हा शुष्क काथ्याकूट थांबवीत नाहींत असें पाहून नॅशनॅलिस्ट पक्षाच्या दहापांच लोकांनीं "आतां मतें घ्यावीं" असा पुकारा केला, तेव्हां मतें घेण्यांत आलीं. या वेळचा देखावा खरोखरच पाहण्यासारखा होता. डिव्हिजन घेण्याचे आधीं घंटा वाजवून इमारतींतील सर्व सभासदांना इशारा देण्यांत येत असतो, पण या इशाऱ्याची आज कोणास फारशी गरजच नव्हती. प्रत्येक सभासद जागा पक्की धरून बसला होता. घंटा वाजल्यावर मिनिट दोन मिनिटांपर्यंत सर्व सभागृहांत, म्हणजे वरील गॅलऱ्यासुद्धां, इतकी स्तब्धता झाली होती कीं, एखादी टाचणी पडली असती तरी ऐकूं आली असती; पण लगेच दुसऱ्या क्षणीं ती स्तब्धता मोडून निरनिराळ्या दोन ठिकाणीं मतें देण्यास जाणाऱ्या लोकांची धांदल इतकी झाली कीं, जणूं काय एखाद्या जळत्या घरांतूनच माणसें बाहेर पडत आहेत! आणि एका अर्थानें असेंब्लीचें सभागृह जळतें घरच बनलें होतें; कारण असल्या महत्त्वाच्या विषयावर बहुमताच्या नापसंतीचा अग्निसंस्कार त्याला पूर्वीं केव्हांहि शिवला नव्हता. असो. सरकारचे बाजूस जाऊन मतें देणाऱ्या लोकांच्या चर्येवर जितकी मुरदाडपणाची पडछाया, तितकीच विरोधी पक्षाचे बाजूस जाणाऱ्या बहुतेक लोकांचे तोंडावर उमेदीची छटा दिसत होती. पण या गोष्टीला उभयपक्षीं कांहीं थोडे अपवाद असून ते लक्षांत घेण्यासारखे होते. सरकारचे बाजूला मतें देणारे दोनचार लोक तरी असे होते कीं, त्यांना उजळ माथ्यानें मत देण्याचें अवघड वाटून ते कसे तरी गुपचूप जाऊन मतें देऊन आले. विरोधी पक्षाकडे कांहीं लोक उघड नाखुषीनें मतें देण्यास गेले; कारण ते जातांना म्हणत गेले कीं, "ठीक आहे, आम्हाला कत्तलखान्याकडे तुम्ही शिस्तीच्या जोरावर ओढून नेणारच तर न्या बापडे, आम्हांला आलेंच पाहिजे." पण माझ्या मतें या जुलमाच्या रामरामांतच आशेला एक प्रकारची जागा वाटते. कारण नियमांचें बंधन मानून का होईना, पण सरकाराविरुद्ध असल्या ठरावास विरोध करण्याला नेमस्त लोक तयार झाले असें हें आजपर्यंतच्या इतिहासांत पहिल्यानेंच!

* * *

या सुमाराला काम थांबविण्याची रोजची वेळ झाली असल्यानें सर्वांना असें वाटलें कीं, आज यापुढें आणखी युद्धप्रसंग होणार नाहीं. उभयपक्षांना ती गोष्ट निरनिराळ्या कारणांकरितां हवीच होती. सरकार पक्षाला असें

वाटत होतें कीं, येवढ्यावर थांबून रात्र कामाला मिळाल्यास तटस्थ बसलेल्या स्वतंत्र सभासदांचें मन हरप्रयत्नानें वळवितां येईल किंवा कदाचित् आणखी कांहीं मुसलमान फोडतां येतील. पंडित नेहरू यांनाहि क्षणभर असें वाटलें कीं, स्वतंत्र पक्षाचे पुढारी खरोखरच नाराज झालेले आहेत कीं काय? किंवा आजच्या यशःप्राप्तीनें त्यांचे मनाला हुरूप आला आहे कीं काय? आणि ते नाराज झाले असले तर सर्व बजेट फेटाळून लावण्याऐवजीं वानगीदाखल एखादसुरी बाब फेटाळून लावण्याची जी सूचना त्यांचेकडून पूर्वीं आली होती तिचा विचार करण्यास इतर सभासदांना शिफारस करतां येईल कीं काय? याचा विचार करण्यास अनायासें सवड मिळेल. परंतु खुद्द अध्यक्षांचे मनांत कांहीं वेगळेंच पाप उभें राहिलें. त्यांची अशी समजूत असावी कीं, विरोधी पक्षाला मिळालेलें बहुमत एका बाबीपुरतेंच असावें. अर्थात् काम असेंच पुढें चालवून मतें मोजण्याचा दुसरा प्रसंग आणल्यास हें बहुमत तकलुपी ठरेल! या विचारानें त्यांनीं लगेच दुसरी म्हणजे इन्कमटॅक्स खात्याच्या खर्चाची ६१॥ लाखांची मागणी पुढें ओढली. अध्यक्षांचें हें धोरण लक्षांत येतांच कित्येक सभासदांनीं कालहरण करण्याकरितां म्हणून कांहीं तरी बोलण्यास सुरुवात केली. पण अध्यक्षांचे ध्यानांत हा कावा येऊन त्यांनीं त्यांना अडविण्यास सुरुवात केली. लगेच दुसऱ्या डिव्हिजनची घंटा वाजली. संशयात्मे एकमेकांकडे पाहूं लागले. नुकत्याच दिलेल्या विरोधी मताचा जोर त्यांचे मनावर अद्यापि असल्यामुळें फिरून कत्तलखान्याकडे चाललों असें म्हणत कांहीं स्वतंत्र लोक मतें देण्यास गेले; पण कांहींनीं दगा दिलाच. मतें नोंदण्याचे खोलींत स्वराज्यपक्षीय लोक आतुरतेनें मोजदाद करीत होते, व त्यांना बाजू अंगावर येणार अशी शंका वाटल्यावरून त्यांनीं स्वतंत्र म्हणून नॅशनॅलिस्ट पक्षांत समाविष्ट नसलेल्या, पण खरोखर भल्या अशा एका सभासदाकडे बाहेर येऊन बाजू संभाळण्याविषयीं विनंति केली व ती त्यानें अदमासाप्रमाणें मान्यहि केली. अखेर विरोधी पक्षाचा पराभव होणार अशा मनःस्थितींत सभागृह असतांच अध्यक्षांनीं ६० विरुद्ध ६१ मतांनीं बजेटाची मागणी नामंजूर असें जाहीर केलें! शर्यतीचे मैदानावर मानेला मान लावून दोन घोडे पुढें आले असतां किंचित् दूरच्या मनुष्याचा मतभेद होऊन तो आपण जिंकलें म्हणून टाळ्या वाजवितो, तसाच प्रकार येथेंहि झाला व क्षणभर उभयपक्षांनीं मिळून टाळ्या वाजविल्या; हें पाहून गॅलरींतील लोक

खरोखरच चकित झाले. पण एका क्षणांत खरा प्रकार कळून आल्यावर सरकार पक्ष हिरमुसला झाला.

*　　　*　　　*

पण अध्यक्षांची हौस येवढ्यानें भागली नाहीं, व आणखी एकदां मतें मोजण्याचा प्रसंग आणल्यास विरोधी पक्षाचा पराभव खास होईल, व तसें झालें म्हणजे पुढील सर्व मार्ग मोकळा झाला असें त्यांना वाटलें, व सरकार पक्षाचे प्रतोद मि. ॲलन यांनीं जवळच्या सभासदांस तसें बोलूनहि दाखविलें. फिरून तिसरी एक कोटि सात लक्षांची मीठ खात्याची बाब मंजुरीला निघाली. फिरून कालहरणाच्या दृष्टीनें कांहीं सभासद बोलूं लागले व अध्यक्षांनीं त्यांना अडवण्यास सुरुवात केली, व हटवादीपणानें मतें नोंदण्यास हुकूम केला. पण पूर्वींचें गाडें आतां उलटलें. मोजदादीचे अखेरीस विरोधी पक्षाला आपला जय होणार अशी खात्री वाटूं लागली; व ५७ विरुद्ध ६३ मतांनीं खर्चाची मागणी नामंजूर झाली असें जाहीर होतांच सरकार पक्ष चपापला. फिरून अध्यक्षांना यापुढील काम थांबविण्याची नाजूक सूचना झाली; पण आपल्या फजितीनें अध्यक्ष इतके संतापून गेले होते कीं, त्यांनीं एका सरकारी सभासदावर तोंड टाकलें. उलट त्या सभासदानें असाच दुसऱ्या एकास तोंडचा धक्का दिला, व अशा गलबलीच्या स्थितींत अध्यक्षांना फिरून चवथी मागणी मंजुरीकरितां घालण्याची बुद्धि झाली. ही बाब थोडी-थोडकी नसून अफू खात्याच्या दोन कोटि आठ लक्ष रुपये खर्चाची होती! या वेळीं अध्यक्षांनीं कोणाला एक शब्दहि बोलूं न देतां ती तडक मतालाच घातली. पण विरोधी पक्षाचें यंत्र आतां चांगलें चालूं लागलें असल्यामुळें कत्तलखान्याकडे जातों असें पूर्वी म्हणणारीं कांहीं नाजूक दिलाचीं माणसेंहि तोंड वाईट न करतां हसतच सरकारविरुद्ध मत देण्यास गेलीं. रक्त पाहतांच खून चढतो किंवा लढाईत आपले हातानें एकदां एक मनुष्य मारला म्हणजे पुढें आणखी माणसें मारण्याचें कांहींच वाटेनासें होतें म्हणतात; तसा प्रकार या वेळीं झाला! मतमोजणींत किंचित् फरक पडला तरी ५६ विरुद्ध ६० मतांनीं मागणी नामंजूर झालीच. हें पाहिल्यावर मग मात्र अध्यक्षांची धुंदी उतरली. त्यांची चूक त्यांचे लक्षांत आली व त्यांनीं त्या दिवसाचें काम एकदम थांबविलें. पुष्कळांना असें वाटलें कीं, ह्या बैठकीस त्या संध्याकाळीं आणखी दहा बाबी पुढें येत्या तर त्याहि नामंजूर झाल्या असत्या.

अशा रीतीनें साडेचार कोटि रुपयांच्या मागण्या एकाच दिवसांत नामंजूर झाल्यानें नॅशनॅलिस्ट पक्षाला हवें होतें तें तत्त्व प्रस्थापित झालें. पण हाच क्रम पुढेंहि एकसारखा चालवून स्वतंत्र सभासदांची नाखुषी, किंबहुना कायमचें वैर संपादन करण्यापेक्षां येथेंच हात आंखडावा असें त्याच रात्रीं भरलेल्या पार्टीच्या सभेंत ठरलें; व त्याप्रमाणें दुसऱ्या दिवशीं पंडित मोतिलाल नेहरू यांनीं स्वराज्य पक्षातर्फें व बॅ. जिना यांनीं स्वतंत्र सभासदांतर्फें असेंब्लींत जाहीर केलें. त्याहि दिवशीं आणखी एका बाबींत मतें मोजण्यांत आलीं. त्यांत सरकारचा पराभव झाला. पण तो एका किरकोळ उपसूचनेवर झाला. स्वराज्यपक्षीय लोकांनीं येथून पुढें बाकीचें बजेट स्वतंत्रपक्षीय सभासदांच्या स्वाधीन केलें व ते स्वतः अलग राहूं लागले. याचें कारण असें कीं, स्वतंत्रांना बजेटाच्या बाबींत कोठें शंभर, कोठें पन्नास असल्या किरकोळ रकमा केवळ औपचारिक रीत्या कमी करावयाच्या होत्या, म्हणजे त्यांना केवळ कोरडी चर्चा हवी होती. मतें मोजण्यापर्यंत मजल नेऊन सरकारवर मात करावयाची नव्हती. स्वराज्य पक्षाला असली चर्चा नको होती, यामुळें यापुढें दोनतीन दिवस या पक्षाचे लोक कोणी सभेस गेले, कोणी न गेले, असें चाललें होतें. स्वतंत्र लोकांत नुसता एकोपाहि नव्हता. यामुळें चर्चेंत ते एकमेकांविरुद्ध बोलत व एकमेकांविरुद्ध मतेंहि देत! अर्थात् हा मार्ग अडवणुकीचा नसून स्वतःची फजिती करून घेण्याचा होता. यामुळें स्वराज्य पक्षाला मतें देण्याच्या भानगडींत पडतां येईना. स्वतंत्र लोक आपलें एकमत करून बहुमत होण्याकरितां मदत मागतील तर ती देण्यास मात्र स्वराज्य पक्ष केव्हांहि तयार होता. असो. बजेटमंजुरीचे व फायनॅन्स बिलाचे चर्चेंत आणखी दोनचार दिवस जावयाचे आहेत, व ते गेले म्हणजे मग नॅशनॅलिस्ट पार्टी फिरून पूर्ववत् शिस्तीनें चालते, कीं विस्कळित होते याचा ठाव पक्का लागूं शकेल. वास्तविक स्वराजिस्ट व स्वतंत्र मिळून संख्याबल इतकें आहे कीं, सरकारास केव्हांहि बहुमत मिळणार नाहीं; बहुतेक सर्व गोष्टी लोकांच्या मनाप्रमाणें होतील व केवळ सुलतानी अधिकार गाजवूनच आपले हेतु सिद्धीस नेण्याची भयंकर जबाबदारी सरकारवर पडेल. परंतु अजूनहि लोकपक्षांत जूट व शिस्त मुरावी तितकी मुरलेली नाहीं. हीच स्थिति अनुभवानें व ईर्षेनें सुधारली तर या पुढील कालांत अडवणुकीच्या मार्गाला निर्विवाद यश आल्याशिवाय राहणार नाहीं.

# पत्र नं. ८

ता. २०।३।२४

अदमास पुष्कळ वेळां चुकतात, पण आमचा स्वतंत्र सभासदांसंबंधाचा अदमास या खेपेस जितका चुकला तितका पूर्वीं केव्हांच चुकला नव्हता. ही चूक ज्या रीतीनें घडली त्याच रीतीनें नेमस्त व स्वतंत्र यांच्यासंबंधानें अदमास पुढेंहि चुकत गेल्यास हिंदी राजकारणांतील दुधांत वेगळी साखर घालावयास नको. कारण आजच्या घटकेला प्रत्येक कायदेकौन्सिलांत बहुमत सिद्ध व्हावयास स्वराज्यपक्षीय व स्वतंत्र यांच्या एकीशिवाय दुसरी कोणतीच अडचण नाहीं. एकाच दिशेला पण वेगवेगळ्या पात्रांतून वाहणारे हे दोन मतप्रवाह त्यांच्यामधील बांध फुटून एकत्र वाहूं लागल्यास त्यांच्यापुढें सरकार-पक्ष हा दगडासारखा जड असला तरी वाहून जाईल यांत शंका नाहीं. आज दोन महिने दिल्लीस आमची मुख्य खटपट अशी ही एकच चालू आहे व सुदैवानें तिला परवां चांगलें फळ आलें. जी गोष्ट स्वराज्य पक्षाच्या मनांत असतांहि त्याच्या एकट्याच्या हातून घडून येणें शक्य नव्हती ती स्वतंत्रांच्या मदतीमुळें सोमवारीं प्रत्यक्ष घडून आली.

* * *

मंगळवारीं (ता. १८) पं. मोतिलाल यांनीं केलेलें भाषण, व त्यापुढें चार दिवस बजेटावर झालेला शुष्क वादविवाद आणि खर्चमंजुरी, यांच्यामुळें देशांत एक प्रकारचा गैरसमज उत्पन्न झाला होता. कित्येकांनीं याला 'बार्डोलीची पुनरावृत्ति' असेंहि नांव दिलें! कित्येकांनीं त्याला स्वराज्य पक्षाचें अधःपतन असेंहि म्हटलें; पण दूषित पूर्वग्रहामुळें मनुष्य अविचारी बनतो याचें हें उदाहरण होय. वास्तविक स्वराज्य पक्षानें सोमवारीं जें धोरण ठेवलें होतें तेंच त्यानें मंगळवारींहि ठेवलें होतें. या दोन दिवसांत जो फरक पडला तो स्वतंत्र सभासदांच्या कारणानें. सरकारशीं सहकारिता करून त्याला जरूर तो पैसा खर्चाला दिला पाहिजे असें जर स्वराज्य पक्ष केव्हां म्हणता तर मग वरीलप्रमाणें त्याचें वर्णन करतां आलें असतें. पण स्वराज्य पक्षानें तसें कधींच म्हटलें नाहीं. पहिल्या दिवशीं चार मोठ्या मागण्या फेटाळून लावल्यावर 'झालें येवढें पाप पुरे' असें स्वतंत्र पक्षालाच वाटूं लागलें! व 'काय वाटेल तें होवो, स्वपक्षाला बेमान ठरलों तरी चालेल, पण असलें पाप फिरून उद्यां करावयाचें नाहीं'

असें त्यानें मनाशीं ठरविल्यावर एकटा स्वराज्य पक्ष काय करणार होता ? बरें, आपलाच हट्ट चालवून आपलीं तेवढीं मतें त्यानें नमूद केलीं असतीं तर या बैठकींत न घडलेली गोष्ट घडली असती; म्हणजे सरकारला बहुमताचा जय मिळाला असता व स्वतंत्र सभासदांशीं स्वराजिस्टांची फूट कायम झाली असती. याकरितां स्वराज्य पक्षानें चार दिवस 'तुम्ही जाणे व तें बजेट जाणे' असें म्हणून वसंतकालाची वाट पाहत आशेवर मौनव्रत पत्करलें. पुढील एकाहि मागणीला स्वराज्यपक्षीयानें मत दिलें नाहीं व बहुतेकजण सभागृहांत हजरहि राहिले नाहींत. याचा परिणाम स्वतंत्र पक्षावर चांगला झाला. चार दिवस स्वराज्यपक्षीय लोक सभागृहांतून जवळ जवळ अदृश्य झाले होते. स्वतंत्र सभासद आपल्या उपसूचना पुढें आणीत, लांबलचक भाषणें करीत व सरकार पक्ष त्यांना उत्तरें देई. अखेर हे सभासद आपल्या उपसूचना माघाऱ्या तरी घेत किंवा मतें मोजण्यापर्यंत पाळी न येतांच त्या नामंजूर म्हणून जाहीर होत. बरें, सरकारनें त्यांतली एखादी मान्य केली असती तरी फलश्रुति शेंपन्नास रुपये कमी होण्याची ! उपसूचना करणारांना फक्त टीका करण्याचें समाधान पाहिजे होतें तें त्यांना मिळालें. पण त्याबरोबर त्यांना हेंहि कळून आलें कीं, आपण व स्वराज्यपक्षीय या दोघांचें एकमेकांविणें अडण्यासारखें असलें तरी ते ४०।४५ आहेत, आपण मात्र मूठभर आहों; इतकेंच नव्हे तर तेवढ्यांतहि आपापलीं मतें जुळत नाहींत. उलट स्वराज्य पक्षांत कोणताहि विषय समजण्याइतकीं व तो नीट मांडण्याइतकीं अनेक बुद्धिवान् माणसें असतांहि, तीं आपल्या मतस्वातंत्र्याचें फाजील स्तोम माजवीत नाहींत, तर एकजुटीनें, शिस्तीनें, अगदीं एक-मनुष्य असल्याप्रमाणें वागतात. तात्पर्य, परिणाम व यश यांच्या दृष्टीनें हल्लींच्या राज्यकारभाराच्या पद्धतींत मतस्वातंत्र्याला किंमत अधिक आहे, कीं एकजुटीला किंमत अधिक आहे, या प्रश्नाचा प्रकाश त्यांच्या मनावर उत्कृष्ट पडला. कसेंहि असो; फायनॅन्स बिल पुढें येण्याचे सुमारास स्वतंत्र व नेमस्त यांचे विचार जहाल बनत चालले होते यांत शंका नाहीं.

*   *   *

रविवारीं राष्ट्रीय पक्षाची सभा झाली; तींत बिलाच्या निरनिराळ्या कलमांना आणल्या गेलेल्या अनेक उपसूचनांपैकीं आपण कोणत्या मान्य कराव्या, म्हणजे कोणावर मतें घेण्याचें भाग पाडावें याचा निश्चय झाला. सर्व फायनॅन्स बिलच्या बिल नामंजूर करतां आलें तर उत्तमच. पण त्याला स्वतंत्र

सभासद अनुकूल कसे होणार ? पण तें नाहीं तर निदान अशा उपसूचना स्वीकाराव्या कीं, त्यांच्या योगानें लोकांचें कल्याण होऊन वरती सरकारचा पराभव होईल. उदाहरणार्थ, मिठावरील करासंबंधींच्या बिलांतील सरकारी सवाल दोन रुपयांचा होता. अर्थात् तो कर आठ किंवा सात आण्यांवर आणण्याची उपसूचना झाल्यास मीठ स्वस्त होईल व तेंहि सरकारचा पराभव करून. टपालखात्याचे दर कमी व्हावे अशी लोकांची मागणी आहेच. अर्थात् हे दर कमी म्हणजे पूर्वींइतके करण्याची उपसूचना पुढें आणल्यास तोच युद्ध-प्रसंग व दर कमी झाल्यास तितका लोकांचा फायदाच. परदेशी कलाबतूवर हल्लीं तीस टक्के जकात आहे, ती पंधरा टक्के करण्याचें सरकारनें योजिलें होतें; व ही गोष्ट घडून येईल तर हा देशी धंदा हटकून बुडेल, सबब सरकारची ही योजना हाणून पाडण्याची उपसूचना केली होती ती पास झाली, तर वरच्या-प्रमाणेंच राजकीय स्वार्थ व परमार्थ दोनहि साधणार होते. आगपेट्यांवरील जकात कमी न करण्याची उपसूचना निश्चित करण्याचा हाच हेतु होता. कारण जकात वांचविण्याकरितां काड्या व पेट्या इकडे आणवून त्यांना येथें गुल लावून, पेट्यांत भरून विकण्याचे कारखाने पुष्कळ निघाले असल्याचें लोकांस माहीतच आहे. पण या उपसूचना पुढें आणण्याचा प्रसंग आला नाहीं, व एक डोळा मागणाऱ्या आंधळ्याला दोन मिळावे तसाच प्रकार सोमवारीं झाला !

* * *

आदल्या रात्रीं स्वतंत्र सभासदांच्या छावणींत एक इष्ट अशी नवीन चळवळ सुरू झाली. स्वराज्य पक्ष म्हणतो त्याप्रमाणें आपण जर खरोखर सगळें बिलच्या बिल फेटाळून लावण्यास तयार झालों तरी त्यांत आपण वावगें असें काय करूं ? किंवा त्यामुळें लोकांचें झालें तर नुकसान असें काय होईल ? एकानें मिठावरील कर आठ आणे योग्य असें म्हणावें. दुसऱ्यानें सवा रुपया हा दर योग्य ठरवावा. या वादाच्या असमाधानवृत्तींत राहून आपण मतें द्यावीं, फुटून मतें दिलीं तर सरकार जिंकणार, एक होऊन सवा रुपयाला अनुकूल मतें दिलीं तर सरकार आठ आणे तर नाहींच, पण कदाचित् सवा रुपयाहि मान-णार नाहीं, व गतवर्षीप्रमाणें व्हाइसरॉय दोन रुपये कराला संमति देतील ! तात्पर्य, बिल नामंजूर केल्यास सरकारचें कसें होईल, किंवा धारवाडी कांट्यानें मोजलेंच तर सुविचार अधिक कोणाचा भरेल, या विचारानें होणाऱ्या

जिवाच्या घालमेलींत आम्हीं मात्र मरून जाऊं, व सरकार मात्र केवळ अधिकाराच्या जोरावर करावयाचें तें करून वरती तोच सुविचार म्हणून मिरविण्यास तयार! याकरितां 'धटाशीं उद्धट होणें' व 'आडमुठ्याशीं आडमुठ्यासारखें वागणें' हीच परतंत्र राजकारणांतील खरी नीति होय हें त्यांना पटूं लागलें. एकलकोंड्या सुविचाराच्या पराभवाचें दुःख कित्येक स्वतंत्र सभासदांना या चार दिवसांत अनुभवास आलें होतें. त्यांतच पंडित मदन मोहन यांच्या रागाची भर पडली. कारण जैतो येथें जाऊन तेथील गोळीबाराचा खरा प्रकार समजून घेऊन ते जळफळत व फणफणतच दिल्लीस परत आले होते. अशा रीतीनें स्वतंत्रपणें केवळ आपल्याच मताच्या कक्षेंत फिरणाऱ्या कांहीं सभासदांची अवचित युति झाल्यानें सतग्रहीचा योग बळावला आणि सोमवारीं सकाळीं स्वतंत्र सभासदांकडून पंडित मोतिलाल नेहरू यांजकडे अशी सूचना आली कीं, आम्ही सर्व बिलच्या बिल नामंजूर करण्यास तयार आहों.

*　　*　　*

यावर पंडितजींनीं काय उत्तर दिलें असेल हें सांगावयास नकोच. वाऱ्याबरोबर निरोप पाठवावा त्याप्रमाणें स्वराज्य पक्षाचे सर्व लोक अकरा वाजण्यापूर्वीच आनंदानें सभागृहांत येऊन दाखल झाले. हा नवा बेत अवचित झाल्यानें त्याची बातमी मात्र बरीच गुप्त राहिली. पण सरकारला १० वाजण्याचे सुमारास ही कुणकूण लागून त्यांचेहि सभासद जय्यत तयार झाले. सर बेसिल ब्लॅकेट यांनीं करपट्टीचें बिल पुढें मांडतांना त्यांतील प्रत्येक सरकारी सवालाचें समर्थन केलें व आज त्यांच्या अयुक्तिवादाचा इतका कडेलोड झाला, कीं मिठावर सरकारी योजनेप्रमाणें कर बसवाल तर तुम्ही खरी जबाबदारी ओळखली व स्वराज्याची पात्रता सिद्ध केली असेंच जवळजवळ त्यांनीं बोलून दाखविलें! लोकपक्षातर्फे बिलाला विरोध करण्याचा मान पंडित मदन मोहन यांजकडे देण्यांत आला होता. त्यांचें सुमारें अडीच-पावणेतीन तास भाषण झालें. त्यानंतर पंडित मोतिलाल यांनीं खास स्वराज्य पक्षाची बाजू मांडतांना नेहमींप्रमाणें सरळ सरळ युक्तिवाद केला. इतर कोणी बोलूं नये असेंच ठरलें होतें; पण सर पुरुषोत्तमदास यांनीं सरकारच्या बाजूचें भाषण केलेंच! एका हिंदी मनुष्याविरुद्ध दुसरा बोलावयास न मिळाल्यास मग आम्ही हिंदी कसले? बिपिन चंद्र पाल यांनीं स्वीकारलेल्या नव्या दुर्दैवी धोरणाप्रमाणें त्यांनाहि सरकारतर्फे बोलण्याची इच्छा होती; पण उशीर झाल्यामुळें तो एक दुःखद प्रसंग

टळला. शेवटीं मतें मोजण्यांत आलीं तेव्हां सरकारच्या बाजूला ५७ व विरुद्ध ६० अशीं पडून फायनॅन्स बिल नामंजूर झाल्याचें अध्यक्षांनीं जाहीर केलें. सव्हँट्स ऑफ इंडियाचे जोशी व सर पुरुषोत्तमदास यांनीं तर सरकार-बाजूला मतें दिलींच, पण बिपिन चंद्र पाल यांनींहि तिकडेच मत दिलें! आदल्या शुक्रवारीं व्हाइसरॉयसाहेबांच्या बंगल्यावर ते उपाहाराला गेले होते त्याची ढेकर सभागृहांत अशा रीतीनें पुरी झाली!

* * *

वरील निकालानें वरिष्ठ कायदेकौन्सिलाच्या इतिहासांत आजवर कधीं न घडलेली गोष्ट घडून आली. सरकारची मात्र 'सुंभ जळालें पण पीळ गेला नाहीं' अशी स्थिति असल्यानें त्यांनीं दुसऱ्या दिवशीं फिरून हाच युद्धप्रसंग घडवून आणण्याचा अविचार केला. एकदां नामंजूर झालेलें बिल एक वर्षांत फिरून पुढें आणतां येत नाहीं असा जुना नियम आहे. पण तो बदलून घेण्याविषयीं सरकारची एक वर्षभर खटपट चालू होती. यंदा स्वराज्य पक्ष असेंब्लींत निवडून आलेला पाहतांच त्यांनीं लगट केली व पार्लमेंटकडून तारेनें मंजुरी आणून तो दुरुस्त नियम ता. १५ मार्चच्या सरकारी गॅझेटांत प्रसिद्ध केला. नियम दुरुस्त झाल्याची खबर तोंपर्यंत कोणासहि नव्हती. सोमवार तारीख १७ रोजीं या नियमाबद्दल असेंब्लींत थोडी चर्चा झाली, पण त्याचा अंमल त्याच दिवशीं पहिल्यानें होणार असें स्वप्न कोणास कशानें पडणार? त्या रात्रीं अकरा वाजल्यावर सर माल्कम हेले यांच्या सेक्रेटरींनीं पंडित मोतिलाल नेहरू यांना टेलिफोनवरून झोंपेंतून उठविलें, व कळविलें कीं, नवीन नियमाचा फायदा घेऊन नामंजूर झालेलें फायनॅन्स बिल सरकार फिरून दुसऱ्या दिवशीं असेंब्लीपुढें मांडणार आहे. अर्थात् हा अवचित घाला पडणार होता. पण त्याला आतां स्वराजिस्ट व स्वतंत्र मिळून सर्वांची तयारी होती. कोणी कोणाची समजूत घालण्याचें कारण राहिलें नव्हतें. सरकारकडी एक सभासद के. सी. रॉय विलायतेस जाण्यास निघाले असतां सरकारनें वाऱ्यावरून वरात देऊन त्यांची जागाहि आदल्या दिवशीं भरून घेतली व फिरून मंगळवारीं अकरा वाजतां सोमवारचाच युद्धप्रसंग तंतोतंत उभा राहिला. नामंजूर बिल फिरून पुढें मांडतांना सर बेसिल ब्लॅकेट यांनीं विशेष भाषण केलें नाहीं; आणि नवीन बिल पुढें आणण्याचे वेळीं त्याविरुद्ध एकाहून अधिक भाषणें व्हावयाचीं नसतात, यामुळें तेवढें एक भाषण पंडित मोतिलाल नेहरू

यांनीं केलें व एकदम मतेंच घेण्यांत आलीं. होकार व नकार या दोहोंच्या उच्चारांत नकारच अधिक जोराचा भरला असा अध्यक्षांना अंदाज आल्यानें त्यांनीं बिल नामंजूर म्हणून जाहीर केलें. येथें स्पष्ट करून सांगण्यासारखी एक गोष्ट आहे ती ही कीं, प्रत्यक्ष मतें मोजण्याचा आग्रह सरकारास हक्कानें करतां येत असतांहि त्यांनीं तो या वेळीं केला नाहीं. अर्थात् आपली बाजू पडकी ठरली, आपण हरलों अशी कबुली त्यांनीं बिनतक्रार दिली व सुरुवातीपासून अवघ्या एक तासाचे आंत त्या दिवशीचें काम संपलें!

* * *

असेंब्लीनें दोन वेळां फेटाळून लावलेलें हें बिल कौन्सिल ऑफ स्टेटकडे जाईल, तेथें तें मंजूर होईल व मग व्हाइसरॉयसाहेब त्याच्या गळयांत सर्टिफिकेट बांधून त्याला व्यवहार्य करतील, या सर्व गोष्टी खऱ्या. पण त्यांचा स्वराज्य पक्षाशीं आतां कांहीं संबंध उरला नाहीं. त्याला करावयाचें तें त्यानें केलें, व तेंहि लोकांचें कांहीं विशेष नुकसान न होतां केलें, हें लक्षांत ठेवलें पाहिजे. बिल फेटाळून लावाल तर व्हाइसरॉय हे दोनच काय पण वाटेल तर अडीच रुपये देखील मिठावर कर बसवितील, असल्या धमक्या बाहेरच काय पण खुद्द असेंब्लींतहि देण्यांत आल्या होत्या. पण स्वराज्य पक्षानें त्या जुमानल्या नाहींत. धोका खरा, पण वरिष्ठ प्रकारचा हक्क बजावावयाचा असला तर धोकाहि सोसावा लागतो. पण निरनिराळया बहात्तर उपसूचनांच्या द्वारें मीठ, कलाबतू, आगकाड्या यांवर कर किंवा जकात काय असावी याविषयीं लोकमत प्रकट झालें होतें. तें सरकार अवमानणार नाहीं असाहि एक अंदाज होता व तोच खरा ठरला. मिठावरील कर सरकारनें आपण होऊन सवा रुपया केला. कलाबतूवरील संरक्षक जकात कायम ठेविली आणि बिनगुलाच्या काड्या व बिनडकविलेल्या पेटया यांवर नवी जकात बसविली. तात्पर्य, उपसूचनांवर वादविवाद होऊन व बहुमत मिळवून लोकांच्या पदरांत जें पडावयाचें तें नुसत्या 'हुंकारेणैव धनुषः' पदरांत पडलें आणि त्याबरोबर बिल नामंजूर केल्यानें जें निषेधप्रदर्शन व्हावयाचें तेंहि झालेंच.

* * *

असो, त्याहिनंतर गुरुवारच्या बैठकींत राष्ट्रीय पक्षाला फिरून दोन वेळां जय मिळाला, व आतां बहुधा अशी स्थिति झाली आहे कीं सरकार मतें मोज-

विण्याच्या भानगडींतहि सहसा पडणार नाहीं. आठ दिवसांपूर्वीं हा नवीन राष्ट्रीय पक्ष जगतो कीं मरतो, अशी कुत्सिक शंका प्रदर्शित करणाऱ्यांनाहि आतां अशी खात्री वाटूं लागले आहे, कीं मे महिन्यांत होणारी जादा बैठक व सप्टेंबरांतली मामुली बैठक या दोहोंच्या वेळींहि लोकमताचीं अशीं जीं जीं कामें निघतील त्यांत स्वराज्य पक्ष एकविचारानें वागून सरकारवर मात करीत जाईल. नवीन पक्षांत स्वराजिस्ट व स्वतंत्र या मुद्द्यावर मतभेद होतात; पण सुदैवानें त्यांत व्यक्तिद्वेषाचें बीज नसल्यानें इतर ठिकाणच्याप्रमाणें हे मतभेद दुस्तर वाटत नाहींत. आतां ता. २५ रोजींच काय तें थोडेंबहुत काम आहे. तें झाल्यावर ता. २६ रोजीं 'पुनरागमनाय च' म्हणून असेंब्लीवर अक्षता पडतील. असेंब्लींतील विषयांच्या चर्चेपेक्षां स्वराज्य पक्ष व राष्ट्रीय पक्ष यांच्या अंतर्गत कारभाराविषयीं व कारस्थानाविषयींच मला आपल्या पत्रांतून बराच पाल्हाळ करावा लागला. कारण, खरें पाहिलें तर नवीन विरोधी पक्षाची घटना हेंच या नव्या असेंब्लींतील महत्त्वाचें काम होय. या योगानेंच सरकारचा पराभव करणारें बहुमत सिद्ध झालें. तें न होतें तर नव्या व जुन्या असेंब्लींत फारसा फरक दिसला नसता. लोकपक्षाचें बहुमत प्रस्थापित होत नसतां नुसत्या विषयांची चर्चा कितीहि झाली तरी ती व्यर्थच होय. पण स्वराज्य पक्षानें असेंब्लींत येऊन सरकारी सद्दी व अब्रू यांचें पारडें फिरविलें, जुन्या समजुती घालवून टाकल्या; गृहीत गोष्टी असिद्ध ठरविल्या, नवे पायंडे पाडले, नवे दाखले घातले, व सरकारच्या सुखनिद्रेचा विध्वंस केला. ही गोष्ट त्यांच्या शत्रूंनाहि आतां कबूल करावी लागेल.

## पत्र नं. ९

ता. २७।३।२४

येथील असेंलीचें काम ता. २५ रोजीं म्हणजे अदमासापेक्षां एक दिवस आधींच संपलें. पण त्यापूर्वीं लोकपक्षाला आणखी कित्येक जय लाभले. ता. २० रोजीं शेठ कस्तुरभाई लालभाई यांचा गिरण्यांवरील एक्साइज-ड्यूटी उठविण्याचा ठराव पुढें आला. त्याजवर नॅशनल पक्षांत मतभिन्नता होती. शिवाय त्या ठरावाला सरकार पक्षातर्फे कसून विरोध होणार होता. या विरोधाची कोणास पर्वा नव्हती. पण त्याच दिवशीं त्यामागून दडपशाहीचे कायदे रद्द करण्यासंबंधाचा ठराव यावयाचा होता; व एक्साइज ड्यूटीच्या ठरावाच्या चर्चेत

सगळा वेळ गेला तर हा दुसरा म्हणजे अधिक महत्त्वाचा ठराव बाद होणार; याकरितां कस्तुरभाई यांच्या संमतीनेंच असें ठरलें होतें कीं, त्यांनीं फक्त आपला ठराव मांडून त्यावर भाषण करावें व त्यानंतर लगेच तहकुबीची उपसूचना दुसऱ्या कोणी तरी आणून ती पास करून घ्यावी. असें झालें म्हणजे ठराव पुढच्या बैठकीला शिल्लक उरून दडपशाही कायद्याच्या ठरावाला मनमुराद वेळ मिळेल. ठरल्याप्रमाणें हें उपसूचनेचें नाटक वठतांच सरकारला हा कावा उमगला. एक्साइज ड्यूटीच्या ठरावाची त्यांची शिकार हुकली व एरवीं टळणारा दडपशाही कायद्याचा ठराव गळ्याशीं येऊन भिडला. सर माल्कम हेले व त्यांचे हस्तक यांनीं या हातचलाखीबद्दल आकाशपाताळ एक केलें. पण शेवटीं उपसूचना मंजूर झालीच.

* * *

यानंतर बंगाल रेग्युलेशन वगैरे कुप्रसिद्ध कायदे रद्द करण्यासंबंधाचा ठराव पुढें आला. त्यावर बराच खडाजंगी वाद झाला. माल्कम हेले यांनीं दंग्या-धोप्यांची ठराविक यादी वाचून दाखविली. कलकत्त्यास लागलेल्या बॉंब-गोळ्याच्या कारखान्याच्या शोधाचें तोंडीं लावणें त्यांना आयत्या वेळीं बरेंच उपयोगी पडलें हें सांगावयास नकोच. या ठरावावर पालबाबूंनीं जोराचें भाषण करून आपल्यावरील लोकांची अप्रीति काहींशी घालविली. पण आधींच्याच मतगणनेंत त्यांनीं सरकारतर्फे मत दिलें होतें हें लोक विसरले नाहींत. असो. अशा रीतीनें एकाच दिवसांत दोन विजय मिळाले व त्याच दमांत मंगळवार ता. २५ रोजीं पुढें येणारीं दोनहि लोकपक्षाच्या तर्फेचीं बिलें आपण मंजूर करून घ्यावीं असें नॅ. पक्षाच्या सभेंत ठरलें. पण फिरून त्याच रात्रीं आणखी कांहीं अदलाबदल होऊन पंडित मोतिलाल–पटेलप्रभृति कांहीं गृहस्थ दिल्ली सोडून आपापल्या गांवीं निघून गेले व बिलें लांबणीवर टाकलीं जातील असा अंदाज दिसूं लागला. ता. २१ ते २३ हे तीन दिवस सुटीचे असल्यामुळें आणखी कांहीं मंडळी गांवगन्ना गेली. पण सोमवार ता. २४ रोजीं मामुली काम झाल्यावर स्वतंत्र पक्षातर्फे पंडित मदन मोहन मालवीय यांनीं व स्वराज्य पक्षातर्फे केळकर यांनीं असें ठरविलें कीं, एकंदर यादी पाहतां आपलें बहुमत होण्याचा संभव आहे व त्याकरितां पूर्वींच्या ठरावाप्रमाणें दोनहि बिलें दुसऱ्या दिवशीं बडवून पास करून घ्यावीं.

* * *

लगेच जवळपासच्या लोकांना तारा करण्यांत आल्या, व इतर रीतीनें बहुमताची खटपट सुरू झाली. ता. २५ रोजीं पांचचार खासगी बिलें पुढें यावयाचीं होतीं, पण त्यांतलीं मुख्य दोनच होतीं—(१) डॉ. गौर यांचें बिल क्रिमिनल लॉ-अमेंडमेंट ॲक्ट ( समितीचा कायदा ) रद्द करण्यासंबंधाचें व ( २ ) सर पुरुषोत्तमदास यांचें हिंदुस्थानच्या किनाऱ्यालगतच्या व्यापारांतील अडचणी दूर करण्यासंबंधाचें. पहिल्या बिलाची कीर्ति जगजाहीरच आहे! समर्थ-विद्यालय, बंगाल्यांतील समित्या, शि. गुरुद्वारप्रबंधक कमिटी, १९२१ सालच्या कॉंग्रेस कमिट्यांच्या सभा वगैरे बेकायदेशीर ठरवून हजारों मनुष्यें ज्याच्यामुळें तुरुंगांत गेलीं तोच तो कायदा होय. दुसऱ्या बिलाचें स्वरूप ता. ११ मार्चच्या केसरींतील 'हिंदुस्थानांतील नौकानयन' या विषयावरील लेख ज्यांनीं वाचला असेल त्यांच्या लक्षांत येईलच. असो. या दोन बिलांच्या चालकांपैकीं सर पुरुषोत्तम यांना बहुमताची खात्री वाटत नसल्यामुळें ते सोमवारीं रात्रींच मुंबईस निघून गेले. डॉ.गौर यांनीं मात्र कांहीं झालें तरी आपलें बिल पुढें मांडण्याचा निर्धार केला होता व त्याचें चांगलें फळ त्यांना पुढें मिळालेंहि. मंगळवारीं ११ वाजतां मंडळी सभागृहांत जमली तेव्हां नॅ. पक्षाच्या बाकांवरून थोडी मंडळी पाहून सरकार पक्षाला बराच हुरूप आलेला दिसला व केव्हां नव्हे तो असेंब्लीच्या शेवटच्या बैठकींत तरी आपण एकदां विजय मिळवूं असें त्यांना वाटूं लागलें. पण त्यांच्या मनोरथाची उतरंड लवकरच गडगडली.

* * *

समितीचा कायदा रद्द करण्यासंबंधानें लोकमत जागृत आहे याचा अनुभव पूर्वींचाच आहे, पण त्या दिवशीं तो विशेष प्रकारानें आला. कारण कित्येक मुसलमान सभासद जे सरकारकडे गेल्यामुळें कित्येक वेळां नॅ. पक्षाला आपलें यश संशयित वाटलें तें या वेळीं इमानाला जागून एका बाजूस तटस्थ होऊन तरी उभे राहिले. सर माल्कम यांचें या ठरावावरील भाषण हें होममेंबर या नात्यानें शेवटचेंच व्हावयाचें असल्यामुळें ते आपल्याकडून जीव तोडतोडून बोलले, पण त्याचा उपयोग झाला नाहीं. त्यांनीं प्रतिज्ञापूर्वक सांगितलें कीं, या बिलाच्या प्रत्येक कलाटणीच्या वेळीं सरकार त्याला तीव्र विरोध केल्याशिवाय राहणार नाहीं. पण या दहशतीचाहि कांहीं उपयोग झाला नाहीं. आणि ५८ विरुद्ध ३९ मतांनीं बिल पुढें आणण्यास डॉ. गौर यांस परवानगी

देण्यांत आली. या निकालाचें महत्त्व विशेषच आहे. कारण डॉ. गौर यांचा याच बाबतींतला प्रयत्न पूर्वींच्या असेंब्लींत दोनदां फसला होता. वरील परवानगीमुळें डॉ. गौर यांचें बिल बहुधा येत्या सप्टेंबरांत पुढील विचाराकरितां घेण्यांत येईल व तसें झाल्यास तें मंजूर होऊन समितीचा कायदा रद्द होईल अशी आशा बाळगण्यास बरीच जागा आहे. ठराव व बिल यांतील फरक हाच होय. ठराव मंजूर झाला तरी तो अमलांत नुसता न आणला तरी कोण काय करणार ? पण अशा बिलाचा कायदा मंजूर झाल्यावर तो फेटाळून लावण्याची सही करण्यापूर्वीं व्हाइसरॉयसाहेबांना चार-चार वेळां विचार करावा लागेल !

* * *

पण याच विजयाच्या पाठोपाठ दुसराहि एक विजय नॅ० पक्षाला मिळावयाचा होता, व तोहि अकल्पित रीतीनें मिळाला ! हल्लीं मौ. महमदअल्ली वगैरे मंडळी खिलाफतीच्या लढ्याबाबत कांहीं कारस्थान करण्याकरितां युरोपला जाण्याच्या विचारांत आहेत ही गोष्ट वाचकांस माहीत असेलच. तसेंच समुद्र मार्गानें हिंदुस्थानांतून बाहेर जाणारांना पासपोर्ट (परवाना) घ्यावा लागत असतो हेंहि प्रसिद्धच आहे. हा परवाना मिळविण्याकरितां महमदअल्ली प्रभृतींच्यातर्फे सरकारास अर्ज करण्यांत आला; पण अल्लीबंधू व इतर एकदोन गृहस्थ यांना आम्ही परवाना देणार नाहीं असा सरकारकडून जबाब मिळाला. हा प्रकार नुकताच घडलेला असल्यामुळें व असेंब्लीची बैठक ता० २५ रोजींच खलास होणार असल्यामुळें ठराव वगैरे आणण्यास जरूर ती मुदत आगाऊ मिळण्यासारखी नव्हती. तथापि एखादा मोठ्या निकडीचा विषय उपस्थित झाल्यास चालू सर्व कामें बाजूस ठेवून त्या विषयाचीच चर्चा करण्यास सवड मिळावी अशी सूचना कोणाहि सभासदास करतां येते म्हणून तशी सूचना चमनलाल यांनीं केली. अध्यक्षांनीं अशी सूचना मंजूर केल्यास त्या सूचनेला ठराविक दोन तासांची मुदत मिळते. या प्रसंगीं सुदैवानें अध्यक्षांना ही परवानगी देण्याची बुद्धि झाली. वादविवादांत सर माल्कम हेले यांनीं फिरून असें सांगितलें कीं, सरकार महंमदअल्लीसारख्या लोकांना परदेशीं जाण्याचा परवाना देण्यास तयार नाहीं ! आणि वरती असाहि टोला दिला कीं, अल्लीबंधू हे जर इंग्रज सरकारला जुमानीत नाहींत तर त्यांनीं सरकारकडे असल्या अर्जांची भीक कां मागावी ?

* * *

पण अलीबंधूंचें वर्तन सुसंगत कीं विसंगत हा यांत मुख्य मुद्दा नसून सरकार परवाना देण्याच्या बाबतींत स्वतःच्या मनापेक्षां इतर कोणताच नियम मानण्यास तयार नाहीं हें ठीक आहे काय, हा यांत मुद्दा होता. या ठरावावर पुष्कळ मुसलमानांनीं ठराविक पद्धतीनें भाषणें केलीं. पण ठराव पुढें आणणारे चमनलाल व त्याला दुजोरा देणारे पंडित मालवीय असल्यामुळें या खेपेस हिंदु-मुसलमानांची एकी बरीच प्रकट झाली. दोन तासांची मुदत भरण्याचे आंत भाषणें संपविण्यांत आलीं व ठरावावर 'हो'काराचा इतका वर्षाव झाला कीं, हो-नाहीं ठरविण्याला प्रत्यक्ष मतें मोजण्याचें कारणच पडलें नाहीं. अशा रीतीनें हा या बैठकींतला शेवटचा युद्धप्रसंगहि नॅशनॅलिस्ट व. स्वराज्य पक्षांना यशाचा झाला. असेंब्लीची सभा ता. २७ मे रोजीं फिरून सिमल्यास भरेल असें अध्यक्षांनीं जाहीर केलें, व ही चिरस्मरणीय बैठक समाप्त झाली. या शेवटच्या दिवशीं असा प्रकार न होता, स्वराज्य पक्षाचे लोक हजर नसते, तर सभा बरखास्त होण्यापूर्वीं एक गोष्ट हटकून झाली असती ती मात्र झाली नाहीं! होममेंबर सर माल्कम् हेले हे पंजाबचे गव्हर्नर म्हणून येत्या जूनपासून तिकडे जाणार व त्यांच्या जागीं मुडिमन हे येणार. अर्थात् हुजूर पक्षाच्या पद्धतीप्रमाणें मावळत्या सूर्याला स्तुतिपाठाचें अर्घ्यप्रदान व्हावयाचें. पण स्वराजिस्ट लोक हजर असल्यामुळें हा वादग्रस्त विषय पुढें काढण्याच्या भानगडींत कोणी लुडबुड्ये पडले नाहींत. नाहीं तर स्तुतीच्या प्रत्येक शब्दाला निंदेचे दहा शब्द हेले यांना निष्कारण ऐकून घ्यावे लागले असते.

* * *

यंदाची असेंब्लीची बैठक महत्त्वाची असल्यामुळें गेले दोन महिने सरकारी पक्ष व विरोधी पक्ष या दोघांनाहि पुष्कळच ताण पडला. म्हणून परवां बैठक खलास होतांच मोठी सुटी जाहीर झाल्यावेळीं शाळेंतील मुलांना जसा एक प्रकारचा उच्छृंखळ आनंद होतो तसाच उभयपक्षांच्याहि लोकांना झाला; व क्षणभर आपले विरोधी संबंध विसरून जाऊन ते ओळखीच्या लोकांशीं स्नेहभावाच्या चार-दोन गोष्टी परस्पर बोलले. त्यांतल्या त्यांत सरकार पक्षाच्या कांहीं लोकांना, विशेषतः सर माल्कम हेले यांना, पुष्कळच मेहनत पडली. परवां एका गृहस्थाशीं बोलतांना ते म्हणाले, "यंदा मला किती मेहनत पडली याची तुम्हांला कल्पना नसेल. मला दिवसांतून चौदा तास काम करावें लागे" व तें खरेंहि असेल. कारण असेंब्लीचे सरकारी पुढारी या नात्यानें त्यांना सकाळीं ११ वाजल्यापासून काम संपेपर्यंत आपल्या जागेवर बसावें लागे, व ते

सर्व वेळ पक्की बैठक मारून बसतहि. दोनहि पक्षाचे इतर सभासद दिवसांतून दहापांच वेळां तरी बाहेर जाऊन येत. पण केव्हां कोण काय बोलेल किंवा काय घेतेल या भयानें हेले मात्र आपली जागा सोडीत नसत. शिवाय प्रत्येक विषयाच्या चर्चेंत यंदा राजकारण नेहमींच्यापेक्षां अधिक घुसत असे, म्हणजे तपशिलाला कमी महत्त्व मिळून मुख्य धोरणावर सर्व वाद होई. यामुळें सरकारी बाजू बहुधा माल्कम हेले यांनाच पुढें मांडावी लागे. हेले यांची दृष्टि कावळ्यासारखी चंचल असली तरी त्यांची बैठक घोरपडीसारखी निश्चल होती यांत शंका नाहीं.

* * *

पण सरकार पक्षातर्फे माल्कम हेले यांना जसा धन्यवाद देणें जरूर आहे, तसाच लोकपक्षातर्फे पंडित मोतिलाल नेहरू यांनाहि तो देणें जरूर आहे. कारण हेले यांना चौदा तास काम पडलें असेल, पण नेहरू यांना एका झोपेशिवाय बाकी सर्व वेळ कामच करावें लागलें. अधिकाऱ्यानें विश्रांति घ्यावयाचें मनांत आणल्यास त्याला पहारा बसवून ती घेतां येते, पण लोकपक्षीय पुढाऱ्यांचें तसें नाहीं. त्यांना स्वतःभोंवतीं असा पहारा ठेवतां येत नाहीं व कोणास मज्जाव करतां येत नाहीं. पंडित नेहरू यांची छोटी खोली हा गेल्या दोन महिन्यांत एक बडा खलबतखाना होऊन बसला होता. सगळ्या सभा व सगळ्या सभांच्या प्रास्ताविक सभा यांना त्यांना हजर राहावें लागे व आमच्या खासगी सभांतूनहि आम्ही लोक किती गोंगाट करतों, किती अप्रस्तुत प्रश्न उपस्थित करतों, निरनिराळ्या पक्षांच्या कशा समजुती काढाव्या लागतात हें माहीत असणाराला पंडित मोतिलाल यांना सर्व छोट्यामोठ्या सभांचे अध्यक्ष म्हणून किती मेहनत पडली असेल याची कल्पना करतां येईल. पंडितजींना पूर्वीं आपल्या वकिलीच्या अमदानींत पुष्कळ काम करावें लागलें असेल. पण वकिलीची मिजासच अशी असते कीं कामाचे श्रम वाटत नाहींत. पुढारीपणाची गोष्ट तशी नाहीं. तेथें सगळी मिजास जिरून जाते व ती तशी जिरून जाणें यांतच पुढारीपणाचें यश आहे. जुन्या काळांत नेहरू हे फेरोजशहा मेथाच होते. पण फेरोजशहा हे मिजास संभाळून गेले व नेहरू यांनीं मिजासीचा त्याग करून नवा देह धारण केल्याप्रमाणें नवें अवतारकृत्य केलें, यामुळें या दोघांच्या मान्यतेंत जमीनअस्मानाचा फरक पडला.

* * *

पण पंडित नेहरू यांच्या या अवतारचरित्रांत आणखी एक उपाख्यान आहे तें विशेष बोधप्रद ठरेल. पंडितजी हे पूर्वी मवाळ व नेमस्त असतां असहकारितावादी व महात्माजींचे चेले बनले हें एक परिवर्तन खरें. पण प्रथम कट्टर असहकारवादी असतां पुढें ते कौन्सिलवादी बनले हें दुसरें परिवर्तन होय. अजूनहि ते महात्माजींवर श्रद्धा ठेवणारेच आहेत, अजूनहि ते महात्माजींचाच सल्ला घेतात, अजूनहि महात्माजींची संमति, निदान अनुमति, हीच आपल्या यशाची खरी कसोटी, तेंच आपल्या श्रमांचें खरें साफल्य असें ते मानतात हें खरें. तथापि पूर्वी कायदेभंग कमिटीवर असतांना पुण्या-मुंबईस गेलेले नेहरू व आजचे असेंब्लीचे पुढारी नेहरू यांतील फरक पाहिला म्हणजे मौज वाटते. पुण्यास त्या वेळीं त्यांनीं केळकरप्रभृति साक्षीदारांची तपासणी अशा झोकानें केली कीं, कौन्सिलांत शिरणें हें हराम होय, व एका प्रसंगीं असेहि उद्गार विनाकारण काढले कीं, आम्ही काय महाराष्ट्राचें अनुकरण करूं वाटतें! पण थोड्याच दिवसांत कौन्सिलप्रवेशवादामध्यें पंडितजींनीं महाराष्ट्रास मागें टाकलें! पुण्यास केळकर-भोपटकरांना व नागपुरास अणे-मुंजे यांना विरोध बुद्धीनें छेडणारे पंडितजी दिल्लीस याच लोकांना खलबतांत घेतल्याशिवाय पान हलूं देत नाहींत हें पाहणाऱ्या तिऱ्हाइताला कालगति विचित्र आहे असें म्हटल्याशिवाय कसें राहवेल!

* * *

असो. कसेंहि असलें तरी पंडितजींनीं आपलें हें नवें अवतारकृत्य मेहनतीनें, प्रतिष्ठितपणानें व रुबाबदारीनें चालविलें आहे यांत शंका नाहीं. पंडितजी समोर असले म्हणजे हेले यांना जपूनच बोलावें लागतें. होममेंबरचें काम सोडतांना व्हाइसरॉय यांनीं हेले यांना मेजवानी दिली, त्या वेळीं हेले यांनीं केलेल्या भाषणांत असे उद्गार काढले कीं, "मी दगदगींतून सुटलों. गव्हर्नर झाल्यानें मी आतां अशा स्थानीं जात आहें कीं, तेथें पंडितजींचा शिलशिला नाहीं." या उद्गारांत थोडी विनोदाची झाक असली तरी सत्याचा अंश बराच आहे. मावळत्या होममेंबरला आपण मोठ्या दगदगींतून सुटलों असें हायसें वाटून तोंडानें उसासा टाकण्याइतकें जिकिरीचें व जोखमीचें असेंब्लींतील काम होऊन बसलें होतें यांत शंका नाहीं.

* * *

असो. दिल्लीचें हवामान पूर्ण पालटलें. आम्ही येथें आलों, तेव्हां सभागृहांत विजेच्या शेगड्या जागजागीं धगधगत होत्या, आतां तेथेंच आंत विजेचे पंखे जोरानें फिरूं लागले असून बाहेर व्हरांड्यावर वाळ्याच्या ताट्या चढून त्यांवर अखंड जलवृष्टि करावी लागत आहे. स्वराज्य पक्ष असेंब्लींत शिरण्यापूर्वीं तेथें असलेली गारव्याची हवा बैठक संपण्यापूर्वीं इतकी कडक उष्ण झाली हा झालेला भौतिक शास्त्राप्रमाणें परिवर्तनचमत्कार राजकारणशास्त्राच्या दृष्टीनेंहि बोधप्रद असल्यामुळें एकाच श्लिष्ट शब्दानें त्या दोहोंचा उल्लेख करून हें पत्र पुरें करतों.

---

# सिमला येथील छोटी हजेरी

## पत्र नं. १

ता. २९-५-२४.

**ठरल्याप्रमाणें** ता. २७ मे रोजीं असेंब्ली व स्टेट-कौन्सिल यांच्या बैठकी येथें सुरू झाल्या. चालू सेशन फक्त संरक्षक जकातीच्या बिलाकरितां आहे, त्यांत खासगी सभासदांना स्वतःचे ठराव वगैरे कांहीं आणतां येणार नाहींत, जें सरकारी कामकाज पुढें येईल तें सहसा वादग्रस्त ठरणार नाहीं, आणि सेशन दहा दिवसांहून अधिक वेळ चालणार नाहीं असें जाहीर झालेलें असल्यामुळें पुष्कळ सभासद सिमल्यास हजर राहण्याचा कदाचित् कंटाळा करतील असा अंदाज होता. पण तो खरा ठरला नाहीं. सिमल्यास फारसें काम नसलें तरी सिमल्यास सिमला आहे या कारणानेंहि कित्येक सभासद आले असण्याचा संभव आहे, आणि असें म्हणण्याचें कारण, त्यांतील कित्येक सभासद सेशनच्यापूर्वीं पुष्कळ दिवस येऊन राहिलेले असून, सेशन संपल्यावरहि कांहीं दिवस ते येथून हलणार नाहींत असें समजतें. बिनतोड गैरहजर राहिले असे म्हटले म्हणजे जे सभासद या वेळीं विलायतेस सरकारनें धाडले किंवा स्वतः होऊन गेले ते. गेल्या मार्चनंतर असेंब्लीच्या सरकारी सभासदांत तर पुष्कळ अदलाबदल झालेलीच आहे, पण खासगी सभासदां-

ताहि कांहीं नवे चेहरे दिसतात. एकदोघांच्या निवडणुकीसंबंधानें चौकशी सुरू असल्यामुळें जे दिल्लीस हजर नव्हते तेंहि आतां निवडणुकी कायम झाल्यामुळें, सिमल्यास उगवले आहेत. असेंब्लींत ठळक फरक दिसतो तो अध्यक्षाच्या जागीं. सर फ्रेडरिक व्हाईट विलायतेस गेल्यामुळें त्यांचे जागीं सर चिमणलाल सेटलवाड यांची नेमणूक झाली असून पूर्वी एकदां हायकोर्टांतील न्यायाधिशाचीं कवचकुंडलें त्यांनीं तात्पुरतीं घातलीं तशींच हल्लीं असेंब्लीच्या अध्यक्षाचींहि घातलीं आहेत. पण कोणी येवो कोणी जावो, नदीच्या प्रवाहाप्रमाणें असेंब्लीचें काम मामुली पद्धतीनें सुरूच आहे.

* * *

सिमल्याच्या बैठकींत पुढें येणारें काम वर सांगितल्याप्रमाणें फारसें वादग्रस्त नसल्यामुळें असेंब्लीबाहेरच्या चळवळींत मात्र दिल्लीपेक्षां सिमल्यास शिथिलता आलेली आढळते. सरकारी बिल महत्त्वाचें असून फारसें वादग्रस्त नाहीं असें हल्लींचें हेंच कदाचित् पहिलें असेल. कसेंहि असो सरकारशीं झगडावयाचें असेल तेव्हां सभासदांत खळबळ असावी व वरचेवर सभा भराव्या, आणि तसें नसेल तेव्हां शिथिलता दिसावी हें स्वाभाविकच आहे. जकात मंडळाची शिफारस तंतोतंत अमलांत आणणारें, व हिंदुस्थानांतील पहिल्या प्रतीच्या पोलादाच्या स्वदेशी कारखान्याला बुडत्या काळांत हात देणारें बिल सरकारनें आपण होऊन पुढें आणल्यामुळें विरोधकांना मदतगार हें शत्रूंना मित्र: बनवण्याचा चमत्कार सरकारास करतां आला ! बिलाच्या पहिल्या वाचनाच्या वेळीं अवघे चार ( बिपिनबाबू धरले तर साडेचार ) सभासद बिलाच्या विरुद्ध बोलल्यासारखे दिसले; पण तेहि बिलाच्या तत्त्वाविरुद्ध नसून त्यांतील तपशिलाच्या कित्येक बाबींनाच विरुद्ध होते. या स्थित्यंतराचा फायदा सर बेसिल ब्लॅकेट यांनीं आपल्या भाषणांत अर्थात् जरूर घेतला. ते म्हणाले, “ काळ कसा विपरीत आला आहे पाहा ! दिल्लीस आम्ही आशाळभूतपणानें समोर नजर टाकून मनांत म्हणत होतों कीं, यांतला एक तरी सभासद आमच्या बाजूला मत देईल काय ? आणि आतां पाहावें तों आमच्या विरुद्ध कोण आहे हें त्याच्या भाषणांत खोल शिरून मुद्दाम हुडकून काढावें लागतें.”

* * *

पण ही इष्टापत्ति मानली तर अशा इष्टापत्ति नित्य घडवून आणण्याचें स्वतः सरकारच्याच हातीं आहे; तें त्यांनीं करावें व स्वराजिस्ट, नॅशनॅलिस्ट

यांना खुशाल आपले सहकारी बनवावें, त्याला ना कोणाची आहे? दुसऱ्याची बायको झाल्यावर त्याचें आडनांव कोणाहि स्त्रीला सहज हस्तगत करतां येतें, तशांतलाच हा प्रकार आहे! सर्व गोष्टींत राष्ट्रीय पक्षाच्या मनासारखें वागल्यावर त्याला हवा तसा वळविण्याचें श्रेय सरकारला मिळण्याला कोणतीच हरकत नाहीं. "उद्यां राष्ट्राच्या उघड फायद्याचें एखादें बिल सरकारनें पुढें आणलें तरीहि तुम्ही तें हाणून पाडाल काय?" असा असमंजस प्रश्न स्वराज्य पक्षाला नडविण्याकरितां म्हणून कित्येक टीकाकार पूर्वी विचारीत होते हें वाचकांच्या स्मरणांत असेलच. या प्रश्नांचीं कांहीं अकरणरूपी प्रच्छन्न उत्तरें वास्तविक दिल्लीसहि दिलीं गेलीं. कारण विरोध न करतां सरकारचें एखाद-दुसरें बिल चांगलें म्हणून स्वराज्य पक्षानें तेथें परस्पर मंजूर होऊं दिलें. पण आतां सिमल्यास एका सरकारी बिलाला जरूर तर प्रत्यक्ष अनुकूल मदत देऊनहि तें मंजूर करण्यास स्वराज्य पक्ष तयार झाला आहे! या कृत्याला कित्येक अज्ञानी टीकाकार "हा पाहा स्वराज्य पक्षाचा अधःपात" असें म्हणतील. तर कित्येक म्हणतील "पाहा रे बुवा, स्वराज्य पक्षानें प्रतियोगी सहकारितेचीं नखें अखेर बाहेर काढलींच! पण ज्यांना स्वराज्य पक्षाच्या धोरणाचें खरें मर्म समजलें नव्हतें, किंवा ज्यांनीं त्यासंबंधीं मुद्दाम गैरसमज करून घेतला होता त्यांना स्वच्छ आरशांत पाहूनहि भ्रम पडावा त्याप्रमाणें उजवें तें डावें व डावें तें उजवें दिसणारच, त्याला कोण काय करील?

* * *

स्वराज्यपक्षाचें खरें धोरण प्रकट करण्याला हल्लींसारखें हें संरक्षक जकातीचें बिल पुढें आलें ही तरी एका अर्थानें मोठी फायद्याची गोष्ट घडली असें म्हटलें पाहिजे. प्रतियोगी सहकारिता म्हणजे प्रतियोगी असहकारिता हें समीकरण राजकारणी गणितज्ञ लोकांना चांगलें कळतें. आम्हीं वर दर्शविल्याप्रमाणें प्रतियोगी (अ)सहकारितेला वाघा-मांजरांच्या नखांची उपमा खरोखरच लागू पडते. तीं नखें वाटेल तेव्हां म्यानांतील तलवारीप्रमाणें बाहेर येतात, वाटेल तेव्हां पंजाच्या रेशमी गादींत दडून बसतात, स्वतःच्या पिलांना वाघ किंवा मांजरें यांच्या नखाची इजा कधींच होत नाहीं, आणि शत्रु किंवा खाद्य पुढें आलें म्हणजे तीं नखें ओरबडल्याशिवाय किंवा आंतड्यांत घुसल्याशिवाय राहावयाचींहि नाहींत. याच न्यायानें राष्ट्राच्या नुकसानीचें बिल पुढें आल्यावर जो पक्ष त्यावर वाघासारखा तुटून पडतो त्यानेंच राष्ट्राच्या फायद्या-

चें बिल पुढें आलें असतां आपल्या मौनानें किंबहुना प्रत्यक्ष मदतीनें तें मंजूर करण्यास सरकारच्या बाजूस असल्यासारखें दिसावें यांत आश्चर्य कोणतें? किंमत आहे ती नुसत्या मताला नाहीं, तर त्या मतानें घडून येणाऱ्या कार्याला आहे. मग म्हणाल "मवाळ तरी काय करतात?" त्याचें उत्तर इतकेंच कीं, राष्ट्रीय लाभाच्या वेळीं ते सरकारशीं सहकारिता करतात. त्यांत त्यांचें वैशिष्ट्य नसून, राष्ट्रीय हानीच्या प्रसंगीं ते करावा तितका सरकारला विरोध करीत नाहींत, यांतच त्यांचें अनिष्ट वैशिष्ट्य आहे. मवाळांनाहि स्वतःस वाघामांजरांची उपमा घेतां येईल. टीका करण्यांत तेहि कांहीं कमी नाहींत: पण नखदंतविहीन वाघाची उपमा मात्र त्यांना साजेल. कारण खऱ्या विरोधाच्या वेळीं बाहेर निघण्याला त्यांच्यापाशीं नखेंच नसतात. इसापनीतींतील गोष्ट प्रसिद्धच आहे. मनुष्यानें आपली मुलगी सिंहाला बायको करावयाला दिली, व उलट हुंडा म्हणून आधीं त्याचीं नखें व दांत त्यानें काढून घेतले! स्वार्थी, आशाळभूत व लोभी मवाळांना अनेक बाबतींत सरकारी कृपाप्रसाद मिळतो त्याचा मोबदला म्हणून त्यांना आपल्या विरोधाचें नखदंत कापून काढून सरकारच्या स्वाधीन करावे लागतात!

* * *

प्रतियोगी सहकारिता कित्येक प्रसंगीं कशी अपरिहार्य असूं शकेल याची उदाहरणें कोणासहि सहज सुचण्यासारखीं आहेत. समजा, उद्यां सरकारनें स्वतः होऊन विधायक कार्यक्रमांपैकीं एखाद्या कलमाचा अंमल होण्यासारखें बिल पुढें आणलें, तर असहकारितावादी झाला तरी तो काय करील? तो स्वतः कौन्सिलांत गेला नाहीं एवढ्यानें तो प्रश्न सुटत नाहीं. कारण आत्मौपम्यबुद्धीनें त्यासहि या प्रश्नाला उत्तर हें दिलेंच पाहिजे. समजा, खादीच्या दरएक पौंडागाणिक, पोलादी रुळाच्या टनाप्रमाणें, सरकारी खजिन्यांतून 'बौंटी' देण्याचें किंवा मद्यपानाला पूर्ण प्रतिबंध करण्याचें बिल सरकारनें पुढें आणलें तर त्यालाहि स्वराज्य पक्षानें विरोध करावा काय? हीं उदाहरणें आजच्या घटकेला काल्पनिक वाटतील पण सरकारनें दोन वर्षांपूर्वीं खरोखरच पोलीस लोकांना घरोघर चरखे देण्याकरितां कांहीं रक्कम मंजूर केली होती. या रकमेला कौन्सिलांत विरोध योग्य ठरला असता काय? तीच गोष्ट आजच्या संरक्षक जकातीच्या बिलाच्या रूपानें उदाहरणार्थ म्हणून प्रत्यक्ष पुढें आली आहे. हिंदी राष्ट्र आज चाळीस वर्षें देशी उद्योगधंद्यांना सरकारी संरक्षण पाहिजे, म्हणून मागणी करीत आहे. मग आतां तें संरक्षण देण्यासारखें

बिलच प्रत्यक्ष पुढें आलें असतां केवळ सरकारनें तें पुढें आणलें येवढ्या कारणाकरतां, त्याला स्वराज्य पक्ष विरोध करील तर तो आत्मघातकी ठरेल !

* * *

महात्मा गांधींनीं परवां एका गृहस्थाजवळ बोलतांना "मीहि पक्का संरक्षणवादी आहें" असें या प्रस्तुतच्या बिलासंबंधींच सांगितल्याचें वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झालें आहे. मग प्रश्न असा कीं, हें संरक्षण द्यावयाचें तर तें कसें देतां येईल? व्यक्तिमात्रानें स्वदेशी वस्तु विकत घेऊन व परदेशी वस्तूवर बहिष्कार घालून स्वदेशी धंद्यांना उत्तेजन देण्याचा व त्यांचें संरक्षण करण्याचा एक मार्ग आहे, तो हिंदी लोक अनुसरतीलच. पण यापलीकडे जाऊन देशांत उत्पन्न होणाऱ्या मालाला सार्वजनिक रीत्या लाखों रुपयांच्या देणगीनें मदत करावयाची, व तत्सदृश परदेशी मालावर संरक्षक जकात बसवावयाची तर तें कायद्याच्या मदतीशिवाय कसें होणार ? राष्ट्रीय सभेला मुंबई शहरांत आपल्या भांडवलानें खादीचा कारखाना किंवा भांडार काढतां येईल. पण परदेशी कापडावर जादा संरक्षक जकात बसवावयाची असेल तर, मुंबई बंदरावर स्वतःचें कस्टम ऑफिस उघडण्याचा अधिकार तिला कसा मिळेल? व समजा, तिनें 'गोमा गणेश पितळी दरवाजा' म्हणून असलें ऑफिस घातलेंच तर कोणता व्यापारी तिच्या हुकमाला जुमानून ही जादा जकात भरील? तात्पर्य, देशहिताच्या कांहीं गोष्टी व्यक्तिशः प्रयत्नानें करतां येण्यासारख्या व पुऱ्या पडण्यासारख्या असल्या तरी, दुसऱ्या कांहीं गोष्टी केवळ समष्टीनें, अर्थात् राज्ययंत्राच्या सत्तेनें करतां येण्यासारख्या, किंवा पुऱ्या पाडतां येण्यासारख्या असतात. आणि म्हणून हें राज्ययंत्रच स्वाधीन करून घेतलें पाहिजे व तोंपर्यंत जेव्हां क्वचित् आपल्या बाजूला तें यंत्र फिरतें तेव्हां त्याचाहि उपयोग करून घेतला पाहिजे.

* * *

असो. वरील प्रकारची विचारसणी सर्व समंजस लोकांना पटण्यारखी असल्यानें, सिमल्यास प्रायः सर्व पक्षांनीं ती अनुसरली आहे. यामुळें बिलाच्या तत्त्वास कोणाकडून विरोध होण्याचा संभव नाहीं. म्हणून क्षणभर विरोधाचें वादळ थंड झाल्यासारखें दिसल्यास आश्चर्य नाहीं. येवढेंच काय, दास नेहरू यांनीं महात्माजींना आधीं समक्ष दाखवून प्रसिद्ध केलेल्या स्वराज्य पक्षाच्या नव्या जाहिरनाम्याप्रमाणें, लोकनियुक्त अशा कमिट्यांतून स्वराज्यपक्षीयांनीं

शिरण्यास आतां हरकत नसल्यानें प्रस्तुत बिलाच्या 'सिलेक्ट कमिटीं'त नेहरू, पटेल, जमनादास, लोहोकरे वगैरे मंडळींना घालण्यांत आलें आहे. 'प्रतियोगी सहकारिता' या शब्दाला नाक मुरडणारे पंडित नेहरू, कायदेभंग कमिटींत केळकरांची कसून उलटतपासणी करणारे नेहरू, आतां सिलेक्ट कमिटींत कसे बसणार? असा प्रश्न येथें कित्येक कुत्सित लोक विचारीत आहेत. त्याचें खरें उत्तर हें वरील विवेचनावरून कळून येईलच. तें उत्तर अपुरें असलें तरी स्वतः पंडित नेहरू असल्या प्रश्नांना उत्तर देण्याला समर्थ आहेतच! देशाच्या फायद्याकरितां जे 'प्रतियोगी' म्हणून प्रत्यक्ष सरकारशीं सहकारिता केल्याचें दिसण्यास तयार झाले ते गृहस्थ म्हणजे पंडितजी, प्रतियोगित्वाचें धोरण केवळ महाराष्ट्रीयांनीं नामकरण केल्यामुळें प्रथम प्रसिद्ध झालें व पूर्वींपासून महाराष्ट्रीयांनींच सतत अनुवादिलें असतां आपण त्यास नापसंती दर्शविली, म्हणूनच केवळ तें त्याज्य ठरवावें, आणि योग्य वेळ आली असतांहि तें स्वीकारूं नये असें म्हणण्याइतके कोत्या मनाचे खास नाहींत.

* * *

असो. ता. २७ रोजीं बैठकीस सुरुवात झाली; तेव्हां प्रारंभीं सर आशुतोष मुकर्जी वगैरे जुन्या सभासदांच्या मृत्यूबद्दल डॉ. गौर यांनीं दुःखप्रदर्शक भाषण केलें. असलीं भाषणें करण्याची हाव डॉ. गौर यांना इतकी आहे कीं, सर अ. मुडिमन, सर भूपेंद्रनाथ मित्र, सर चिमणलाल सेटलवाड वगैरे गृहस्थांचें त्या त्या कारणाकरितां अभिनंदन करण्याचा मानहि आपणासच लाभावा म्हणून त्यांनीं एकाच भाषणांत सुखदुःखात्मक उद्गार काढून घेतले! तें पाहून कित्येकांस हॅम्लेट नाटकाची आठवण झाली. मृत राजाचें और्ध्वदेहिक व त्याच्या विधवा राणीचें पुनरुद्वाहमंगल हीं दोन्ही कामें एकाच समाराधनेंत उरकून घेण्यासारखेंच डॉ. गौर यांचें भाषण मितव्ययी झालें खरें! प्रेत जळण्याला उशीर होऊन भूक लागली म्हणून चितेवरच भाताचें मडकें शिजवून घेणाऱ्या भाडोत्री प्रेतवाहकासारखी वृत्ति दाखवून डॉ. गौर यांनीं आपलें हसें करून घेतलें. असो. प्रश्नोत्तरानंतर मुख्य बिल चर्चेला निघालें. तें मांडतांना सर चार्लस् इनेस यांनीं भाषण केलें, त्यांत अपवादात्मक असें फारसें कांहीं नव्हतें. मात्र खरें ममत्व दिसावें तितकें दिसलें नाहीं. बिलाला प्रत्यक्ष विरुद्ध असें भाषण कोणीच केलें नाहीं. येऊन जाऊन खरा विरोध युरोपियन व्यापाऱ्यांचा असावयाचा, पण मि. विल्सन यांनीं पोलाद व लोखंड

यांजवर जादा जकात न बसवितां फक्त पोलादाच्या निपजेवर 'बौंटी' द्यावी येवढेंच सुचविलें. जिना व सर पुरुषोत्तमदास यांचीं भाषणें झालीं तीं नुसत्या बौंटीनें कार्य होत नाहीं, येवढें सांगण्यापुरतींच झालीं.

* * *

पटेल जमनादास यांचीं भाषणें समर्थनपर झालीं. पंडित मदन मोहन यांनीं टीका केली ती या बिलाचा फायदा इकडे आलेल्या किंवा येणाऱ्या युरोपियन कंपन्यांनाहि मिळूं शकेल. तो न मिळण्याची तजवीज या बिलांत नाहीं, या मुद्द्यावर होती. याहिपेक्षां अधिक विरोधाच्या स्वरूपाचें दिसेल असें भाषण नारायण मल्हार जोशी यांनीं केलें. पण त्याचें कारण इतकेंच कीं, टाटांचे कारखान्यांत मजूर वर्गाचीं दुःखें व्हावीं तितकीं दूर होत नाहींत, व त्यांच्या संघटनेला कारखानदारांची संमति मिळत नाहीं. याच दृष्टीनें पण जोशी यांच्याहून अधिक कडक शब्दांची व खराखुरा विरोधच वाटेल अशी टीका दिवाण चमणलाल यांनीं मात्र केली. हिंदी उद्योगधंद्यांना संरक्षण देणें, म्हणजे हिंदुस्थानांतील भांडवलवाल्यांना संरक्षण देणें. श्रीमंतांना अधिक श्रीमंत व गरिबांना अधिक गरीब करणें असा हेतु यांत नसला तरी तसा याचा परिणाम होईल असा त्यांचा मुद्दा होता; अशा रीतीनें कांहीं भाषणें झाल्यावर सायंकाळीं साडेसात वाजेपर्यंत काम चालून वीस गृहस्थांची सिलेक्ट कमिटी नेमून त्या दिवसाचें काम संपलें. या कमिटीवर सर्व मताचे लोक घातल्यानें किरकोळ वादग्रस्त प्रश्नांचा निकाल कमिटींतच लागेल आणि कमिटीचा रिपोर्ट शुक्रवारीं सादर होऊन शनिवारीं किंवा सोमवारीं बिलाचें काम संपेल असें वाटतें. या विषयासंबंधानें आणखी बरेंच लिहावयाचें आहे पण तें पुढील पत्रीं लिहीन.

## पत्र नं. २

ता. ४-६-२४.

मागील पत्रीं लिहिल्याप्रमाणें संरक्षक बिलाची सिलेक्ट कमिटी दोन दिवस भरून तिनें आपला रिपोर्ट शुक्रवारीं असेंब्लीपुढें मांडला. बिल अवघें चारपांच कलमांचें आहे; पण त्याचा विचार वीस गृहस्थांच्या कमिटीनें केला. त्यांपैकीं अकरा लोकांनीं भिन्न मतपत्रिका लिहिल्या आणि त्यांनीं व इतरांनीं मिळून ७९ उपसूचना अध्यक्षांकडे लिहून पाठविल्या. पैकीं सुमारें ५० स्वराज्य पक्षाच्या सभासदांच्या होत्या. या उपसूचनांत द्विरुक्ति, गैरलागूपणा, क्षुल्लक-

पणा, दुरान्वितपणा, वगैरे दोषांमुळें पुष्कळांना बाध आला, आणि त्या वाद-विवादाच्या भजलेपर्यंत पोंचल्याहि नाहींत. खरा वाद असा आतांपर्यंत पांचचार उपसूचनांवरच झाला, आणि सिलेक्ट कमिटीनें मंजूर न केलेली अशी एक उपसूचना वादाच्या वादळांत सांपडली आहे. जमशेटपूर येथील मजुरांसंबंधाची उपसूचना अध्यक्षांनीं गैरलागू ठरवून काढून टाकली! पण त्या वेळीं अध्यक्षांच्या निर्णयाचा कोणी गिल्ला केला नाहीं. पटेल यांची स्वदेशी भांडवल-वाल्या कारखानदारांसच संरक्षण देण्याची उपसूचनाहि अध्यक्षांनीं प्रथम गैर-लागू म्हणून काढून टाकली व 'ठीक आहे' म्हणून पटेल खालींहि बसले. परंतु पं. मदन मोहन यांनीं याचा पुनः विचार न कराल तर आम्ही बिलाला विरुद्ध मत देऊं असा धाक घालून थैमान केलें; तेव्हां अध्यक्षांनीं आपला हुकूम फिरविला व ती उपसूचना पुनः चर्चेस घेतली!

* * *

अध्यक्ष सर चिमणलाल सेटलवाड हे तात्पुरतेच अध्यक्ष आहेत, पण येवढ्याच मुदतींतलें त्यांचें काम सर्व पक्षांच्या लोकांना असंतोषकारक असें झालें आहे. त्यांना ता. ८ रोजीं हायकोर्टांत खटले चालवावयाला जावयाचें असल्यानें, मागें वाघ लागल्यासारख्या घाईनें ते कामाचा निकाल करूं पाहतात. पण हें सभासदांना अर्थातच पटत नाहीं. गैरलागू किंवा गैरशिस्त ठरवून एखादा विषय बाजूस सारण्याच्या भरांत त्यांनीं परवांपासून चारपांच वेळां धडधडीत चुकीचे निकाल दिले. एक दोन वेळां सरकारी सभासदांनींच त्यांना तुमचा निकाल चूक ठरेल असें जाणविल्यावर मग ते सावध झाले व दुसरे एकदोन निकाल दिल्यावर मग ते चूक म्हणून त्यांनीं आपले आपणच फिर-विले! त्यांच्याविषयींचा आदरभाव अशा रीतीनें कमी झाल्यानें एका सभा-सदानें ता. २ रोजीच्या सभेंत अशी सूचना प्रत्यक्ष आणली कीं, "अध्यक्षांचा निकाल सभेच्या दृष्टीनें चूक आहे असें मला ठरवून घ्यावयाचें आहे. तरी तेवढीच चर्चा होईपर्यंत तुम्ही खुर्ची सोडून द्या व तुमच्या जागीं दुसरा बसूं द्या." पण ही सूचना फुकट गेली; त्याबरोबर त्याच सभासदानें (देवकी-प्रसाद सिंह) अशी दुसरी सूचना मांडली कीं, ज्या सभासदांनीं टाटा कंपनीचे भाग घेतलेले असतील त्यांनीं ह्या बिलाच्या चर्चेंत भाग घेऊं नये व मत देऊं नये. या वर्णनांत सर पुरुषोत्तमदास, जिना, दुमाशिया, जम्नादास, गौर यांच्याबरोबर स्वतः चिमणलाल सेटलवाड हे सांपडले व या मुद्द्यावर बरीच भवति

न भवति होऊन कांहींनीं आपण निर्णयाचे वेळीं मत देणार नाहीं म्हणून जाहीर केलें. देवकीप्रसाद यांचा खरा हेतु अध्यक्षांना खिजविण्याचा होता व तो बराच साधला. वास्तविक संयुक्त भांडवलाच्या कंपनींत भाग घेतले असतां देवकीप्रसाद यांची तक्रार लागू पडत नाहीं व हें बिल खासगी स्वरूपाचें नसून खुद्द सरकारानेंच परस्पर आणलेलें होतें. पण देवकीप्रसाद यांना अध्यक्षावर सूड घेण्यापुरता या मुद्द्याचा उपयोग झाला.

*　　*　　*

बिलासंबंधीं सरकार व लोकपक्ष यांत मतभेद आहेच ! पण कांहीं मुद्द्यांवर लोकपक्षाच्या सभासदांतहि मतभेद आहे. स्वराज्य पक्षांतहि त्याच्या कित्येक मुद्द्यांवर एकवाक्यता नसल्यामुळें कोणावर सक्ती अशी न करतां आतांपर्यंत ज्याला त्याला मतस्वातंत्र्य देण्यांत आलें, व सर्वांनीं या स्वातंत्र्याचा आपापल्या मनाप्रमाणें उपयोग केला. मतें देतांना कोणत्या प्रकारची शिस्त पाळण्यांत आली होती याबद्दल सामान्यतः दोन शब्द सांगितले असतां वाचकांना मतभेदाची खरी स्थिति कळून येईल. सरकारबरोबर 'लॉबींत' जाऊन कोणाहि स्वराज्यपक्षीयानें मत दिलें नाहीं. नॅशनॅलिस्ट पक्षांतील स्वतंत्र सभासदांनीं प्रायः सरकारतर्फें मतें दिलीं. तथापि त्यांच्यांतहि कोठें कोठें दुमत झालें. ज्यांना आपण कोणत्याच पक्षाला मत न दिलें तरी रीतीप्रमाणें व्हावयाचें तेंच होईल असें दिसून आलें, अशा स्वराज्यपक्षीय लोकांनीं सरकारच्या बाजूला तर मत दिलेंच नाहीं. परंतु स्वराज्यपक्षीयांतील एकाविरुद्ध दुसऱ्याला अनुकूल मत देऊन एक उपसूचना पाडावी व दुसरी उचलून धरावी असा पक्षपात होऊं नये म्हणून मुळीं मतच दिलें नाहीं. ही अडचणीची जबाबदारी मुख्यतः पुढाऱ्यांवरच स्वाभाविकपणें पडली.

पण हें बिल असें वादग्रस्त कां ठरलें याचा थोडासा खुलासा करणें जरूर आहे. बिलाची पीठिका अशी कीं, इन्डस्ट्रियल कमिशनांतून फिस्कल कमिशन निघालें, फिस्कल कमिशनांतून टारिफ बोर्ड निर्माण झालें, व टारिफ बोर्डानें ज्या सूचना केल्या त्यांतील बहुधा इकडचें अक्षर तिकडे न करतां सरकारनें प्रस्तुतचें बिल तयार करून असेंब्लीपुढें मांडलें. या तीनहि कमिशनांचे अभिप्राय, त्यांच्या सूचना, व खुद्द या बिलाचा मसुदा हीं प्रसिद्ध झालीं, तेव्हां लोकमतानें त्यांना सामान्यतः अनुकूल असाच अभिप्राय दर्शविला हें वर्त-

मानपत्राच्या वाचकांस माहीत असेलच. त्यांतून प्रत्यक्ष कायदा करण्याची वेळ आली असतां बिलांत उणेपणा असेल तर तो काढून टाकूं नये, असें कोणीच म्हणणार नाहीं, पण इतर बिलांच्या अपेक्षेनें या बिलासंबंधानें विशेष गोष्ट ही घडली कीं, रीतीप्रमाणें हिंदुस्थान सरकारनें आगाऊ मंजुरीकरितां बिलाचा मसुदा स्टेटसेक्रेटरीकडे पाठविला तेव्हां त्यांनीं मंजुरी दिली व असें प्रसिद्धहि केलें कीं, 'नव्या मनूंतील एका संकेताप्रमाणें, हिंदुस्थान सरकार व असेंब्ली यांचें एक-मत होईल तर संरक्षक जकातीच्या या कायद्यास आपण हरकत घेणार नाहीं.' या मंजुरीचें महत्त्व हेंच कीं, विलायतेंतील मजूरपक्ष सामान्यतः संरक्षण पद्धतीला प्रतिकूल असावयाचा; पण हिंदी राष्ट्राच्या स्वातंत्र्याचीहि त्याला थोडीबहुत चाड आहे; म्हणून स्टेटसेक्रेटरींना आपल्या पक्षाचीं सामान्य मतें बाजूस ठेवावीं लागलीं. अर्थात् बिलाचे कलमांतहि सरकार व असेंब्ली यांचा महत्त्वाचा बेबनाव झाला तर बिल बुडणार व संरक्षक जकाती व बौंटी यांचा प्रयोग अशक्य होऊन बसणार! ही आपत्ति कांहीं झालें तरी ओढवूं नये असें असेंब्लींतील पुष्कळ लोकांना वाटत होतें.

* * *

पुष्कळ गोष्टी अशा असतात कीं त्या दूर असेपर्यंत त्यांचें कौतुक व लोभ वाटतो. पण प्रत्यक्ष पदरीं पडण्याची वेळ आली म्हणजे मग खऱ्याखोट्या शंका-कुशंका निघून त्या गोष्टी स्वीकाराव्या किंवा नाहीं असा प्रामाणिक-पणाचाहि भ्रम पडूं शकतो. प्रस्तुत बिल स्वदेशी पोलादाच्या कारखान्याला संरक्षण देणारें होतें, तथापि खुला व्यापार व सप्रतिबंध व्यापार यांच्यांतील वाद हिंदुस्थानांतहि कां असूं नये? व तो वाद कित्येकांनीं उपस्थित केलाहि. पण स्वराज्य पक्षाच्या सभेंत निर्णयाची वेळ आली तेव्हां अवघीं तीनचार मतें विरुद्ध पडून बाकी सर्वांनीं बिलाचें तत्त्व मंजूर केलें. वास्तविक या तीन चार मतवाल्यांचाहि तत्त्वाला विरोध होता तो कसून असा नव्हता. कारण त्यांनीं बिलाच्या पहिल्या वाचनाच्या वेळीं विरुद्ध मतें दिलीं नाहींत व जे लोक सिलेक्ट कमिटींत जातात ते बिलाच्या तत्त्वाला अनु-कूल असतात असें समजण्याची रीतच आहे. पण या बिलाला जो विरोध झाला तो ते विरोधी लोक खरोखरच खुल्या व्यापाराच्या तत्त्वाचे भोक्ते होते म्हणून नव्हे, तर या प्रकरणांत टाटा कंपनीचा प्रत्यक्ष संबंध होता म्हणून. हीच दुसरी एखादी कंपनी असती तर हा वाद माजलाच नसता. टाटा कंपनी-

विरुद्ध या वेळीं तिचीं सर्व पापें उभीं राहिलीं. हल्लींच्या टाटांनीं प. वा. जमशेठजी टाटा यांचें परोपकारीपणाचें धोरण सोडून स्वार्थ बळावूं दिला; अनेक कंपन्या काढून लोकांचे कोट्यवधि रुपये भांडवलांत गुंतवून पुढें ते त्यांनीं धोक्यांत घातले; कंपन्यांच्या शेअरच्या किंमतींत कृत्रिम चढउतार केला; अकल्पित व्याजें देऊन व पुढें तीं बंद करून भागीदारीला जुगारीचें स्वरूप आणलें; कामांचा व्याप प्रथम फाजील वाढवून कित्येक शाखा पुढें बंद केल्या. स्वतःची बँक डबघाईस आणून ती दुसरींत सामील करून घेतली; जमशेटपूर येथील कारखानदारांना असंतुष्ट ठेवलें; संप झाला असतां तडजोडीला अडथळे आणले व दिलेलीं वचनें पुरीं केलीं नाहींत; आपल्या सर्व कारखान्यांतून गोऱ्या लोकांचें प्रस्थ फार माजविलें, व त्यांच्या पदरांत पैसे फार ओतले, स्वदेशी कारागीर शिकवून तयार करावे तसे केले नाहींत; मुळशीस जमिनी घेण्याच्या आणि सत्याग्रही लोकांना वागविण्याच्या बाबतींत निष्ठुरपणा दाखविला असा टाटा कंपनीच्या पापाचा पाढा वाचण्यांत आला!

* * *

पण या सर्व गोष्टी माहीत असून किंबहुना मान्य असूनहि, बिल हातचें गमावावें आणि 'अल्पस्य हेतोर्बहु हातुमिच्छन्' अशी आपली स्थिति करून घ्यावी असें पुष्कळांना वाटत नाहीं. प्रस्तुत प्रकरणीं बिलाच्या द्वारें राष्ट्र मदत देणार तें टाटा कंपनीला नसून पोलाद व लोखंड यांच्या स्वदेशी धंद्याला देणार आहे. ही मदत देऊनहि कारखाना बुडावयाचा असेल तर त्याचें नशीब! पण वेळीं मदत द्यावयाची ती न दिल्यानें नांवारूपास येणारा एक मोठा स्वदेशी धंदा बुडाला असा पश्चात्ताप पुढें होण्यास जागा उरूं नये, येवढ्याकरितांच हल्लींचें बिल मंजूर करून संरक्षणाचा प्रयोग घडवून पाहावा असें त्यांना वाटतें. पण बिलावर दुसरेहि कित्येक आक्षेप नव्हते असें नाहीं. उदाहरणार्थ, यापुढें तीन वर्षांच्या आंत परदेशी भांडवलवाल्यांनीं जर हिंदुस्थानांत येऊन लोखंडाचे कारखाने घातले तर बिलांतील मदतीचा व सवलतीचा फायदा त्यांनाहि मिळेल असा एक मोठा आक्षेप होता, व टाटा कंपनी आपल्या मजुरांना नीट वागवीत नाहीं या आक्षेपापेक्षां या वरील दुसऱ्या आक्षेपांत बरेच स्वारस्य होतें. पण एक तर तीन वर्षांत परदेशी कारखाने इकडे निघण्याचा फारसा संभव नाहीं, व समजा, एखादा निघालाच तर तीन वर्षांनीं हा कायदा रद्द करतां येईल किंवा परकी भांडवलवाल्यांना त्याचा फायदा मिळूं नये असा

निर्बंध तेव्हां घालतां येईल; आणि दरम्यान टाटा कंपनीबरोबरच एखाद्या परदेशी कंपनीला थोडासा नफा मिळाला तरी त्याचा मोबदलाहि इतर रीतीनें मिळेल. अर्थात् केवळ नसत्या संशयामुळें, आज संरक्षक पद्धति सरकारच्या गळ्यांत त्यांच्याच हातानें बांधणारें बिल दवडूं नये, व हा प्रयोग जरूर करून पाहावा असें पुष्कळांना वाटत होतें.

*　　*　　*

पण सरकारचा खरा हेतु जर स्वदेशी कंपन्यांनाच संरक्षणाचा फायदा देण्याचा आहे तर तसे शब्द या बिलांतच कां घालूं नयेत अशा मुद्द्यावर वादाला तोंड लागलें व त्यानें सबंध एक दिवस खाल्ला. फिस्कल कमिशननें या बाबतींत महत्त्वाच्या कबुल्या दिल्या व त्याबरहुकूम सरकारतर्फे ना. चतर्जी यांनीं जाहीर आश्वासनेंहि दिलीं. असें असल्यामुळें ते शब्द बिलांत घालण्यास सरकारास हरकत घेतां येईना. अशा गोंधळांत पंडित मोतिलाल नेहरू यांनीं तडजोडीची म्हणून एक उपसूचना मांडली व तिचा आम्ही विचार करूं असें सरकारतर्फे सांगण्यांत आल्यावर ता. ४ ची बैठक तहकूब झाली.

## पत्र नं. ३

ता. ११।६।२४

संरक्षक जकातीचें व बौंटीचें बिल अखेर प्रचंड बहुमतानें पास झाल्याची बातमी यापूर्वींच केसरीच्या वाचकांना वाचावयास मिळाली असेल. ही गोष्ट घडत नाहीं असें एक वेळ अर्धवट वाटत होतें. पण पंडित मोतिलाल यांची उपसूचना सरकारतर्फे मान्य करण्यांत आल्यामुळें सभागृह शांत झालें. नाहीं तर अनुकूल मतें दिलेल्या व तटस्थ राहिलेल्या अनेक सभासदांनीं प्रतिकूल मतें दिलीं असतीं. पंडित मोतिलाल यांची उपसूचना वास्तविक जशी होती तशीच सरकारनें मान्य केली असें नाहीं. पण अमान्य केलेला भाग इतर रीतीनें कबूल करून त्याप्रमाणें सर चार्ल्स इन्नेस यांनीं त्याच वेळीं तोंडी भाषणांत त्याविषयीं कबुलीहि दिली. हा सर्व प्रकार शुक्रवारीं सकाळीं १० व ११ यांचे दरम्यान झाला. त्याकरितां नॅशनॅलिस्ट पक्षाची सभा १० वाजतां मुद्दाम भरविण्यांत आली होती व पंडितजींशीं अखेर वाटाघाट करण्याकरितां सर चार्ल्स इन्नेस हेहि आपल्या कचेरींत येऊन बसले होते. अखेरच्या तडजोडीला पटेल तयार नव्हते व पंडितजींची उपसूचना पुढें ढकलली जाऊन

आपल्या उपसूननेवर मतें घेतलीं जावीं अशी त्यांनीं भरसभेंत पुष्कळ कायदेशीर हुजत घातली. पण एक तर अध्यक्षांनीं ती चालूं दिली नाहीं, व ती चालूं दिली असती तरी पटेल यांच्या उपसूचनेला बहुमत खास मिळालें नसतें.

* * *

मुख्य तत्त्वाचा भाग अशा रीतीनें पं. मोतिलाल यांच्या मध्यस्थीनें निकालांत निघाल्यावर मग अध्यक्षांची कात्री पुनः सुरू झाली. पूर्वी दिलेल्या निकालांना अनुसरून त्यांनीं पुष्कळशा उपसूचना कातरून टाकल्या. कांहींनीं आपण होऊन समजुतीनें त्या परत घेतल्या, आणि सर्व बिलच्या बिल मिळून मंजुरीला घालण्यांत आलें तेव्हां जरी कित्येक सभासदांनीं प्रतिकूल भाषणें केलीं व वादांत कित्येक खटकेहि उडाले, तरी अखेर बिल मंजूर होण्यास मुळींच पंचाईत पडली नाहीं. टाटांच्या कारखान्याला बौंटीच्या रूपानें मदत द्यावी हें सर्वांना मान्य होतें. मात्र ती देतांना टाटांनीं आपल्या मजुरांना चांगल्या रीतीनें वागविण्याचा जामीन म्हणून 'कन्सीलिएशन कमिटी' ( तडजोड मंडळ ) नेमण्याचें एक कलम, व या मजुरांच्या सांपत्तिक स्थितीची चौकशी करण्याविषयीं कमिटी नेमण्याचें एक कलम हीं याच बिलांत घालावीं अशी चमनलाल व देवकीप्रसाद सिंह यांची सूचना होती. पण अध्यक्षांनीं ती गैरलागू ठरविली, इतकेंच नव्हे, तर स्वराजिस्ट किंवा नॅशनॅलिस्ट या पक्षांपैकीं बहुमताचा या कलमांना पाठिंबा मिळाला नसता. " या दोन मुद्द्यांसंबंधानें स्वतंत्र ठराव आणा, आम्ही सर्व तुम्हांला मदत देतों, पण सरकार या बिलाच्या कामीं निमित्ताला टेकल्यासारखें दिसतें, याकरितां भलता आग्रह धरून बिल धोक्यांत घालूं नका " असें उभयपक्षांतील बहुमताचें म्हणणें होतें. जमशेटपूर येथील कारखान्यांतल्या मजुरांचीं गाऱ्हाणीं दूर करण्याचे प्रयत्न इतर रीतीनें याच अवधींत चालूहि होते. याचकरितां चेल्म्सफर्ड क्लबांत टाटा कंपनीचे डायरेक्टर व मजूरसंघाचे पुढारी श्री. शेट्टी यांचें म्हणणें ऐकून घेण्याकरितां केळकर, जोशी, पटेल, जम्नादास वगैरे मंडळी निमंत्रणावरून गेली होती; आणि ( १ ) मजूरसंघाला डायरेक्टरांनीं मान्यता द्यावी व ( २ ) तडजोड कमिटीची रचना निराळ्या प्रकारें करावी, हें स्पष्ट व सर्वानुमतें ठरलें. तसेंच ता. ७ रोजीं भरलेल्या स्वराजिस्ट व नॅशनॅलिस्ट पक्षांच्या संयुक्त सभेंत, केळकर यांच्या सूचनेवरून व चमनलाल यांच्या संमतीनें, जमशेटनगर येथील काम घडवून आणण्यास कमिटी नेमण्याचा ठरावहि

मंजूर करण्यांत आला. तात्पर्य, टाटाविरुद्ध त्यांच्या मजुरांना सर्वांची सहानुभूति होती पण या अवांतर मुद्द्यांकरितां पोलाद वगैरे धंद्यांना संरक्षक मदत देणारें व त्याकरितां परदेशी मालावर संरक्षक जकात बसविणारें बिलच्या बिल उलथून पडावें ही गोष्ट मात्र कोणासहि मनापासून मान्य नव्हती.

* * *

विद्यमान पोलादी कारखान्यांना मदत द्यावी हें ठीक, पण तें करतांना परदेशी भांडवलवाल्या कंपन्यांना मदत मिळेल तर ती गोष्ट सुमार, म्हणून तें टळलें तर पाहावें हा दुसरा मुद्दा होता. तत्त्वतः याविरुद्ध कोणास फारसें बोलतां येण्यासारखें नाहीं. तथापि (१) देशांत पोलादासारखा महत्त्वाचा कारखाना नसल्यापेक्षांहि परक्या भांडवलानें निघालेला एखादा असला तरी पुरवेल. (२) कारण फायदा परदेशांत गेला तरी त्या कारखान्यापासून देशांतल्या इतर किरकोळ धंद्यांना तदुपयोगी अशा कच्च्या मालाची मदत होते. (३) अशा कारखान्यांतील मुख्य क्रिया परदेशी कारागिरांच्या हातीं राहिल्या तरी त्यांच्या हाताखालीं काम करून पुष्कळ स्वदेशी कारागिरांना ती विद्या हळूहळू साध्य करून घेतां येते. (४) अशा कारखान्यांना लागणारा सामान्य असा सर्व मजूरवर्ग स्वदेशीच असतो. (५) कारखान्याचा फायदा बहुतेक परदेशांत गेला तरी त्यावरील इन्कमटॅक्स व परदेशी लोकांची खर्चाची रक्कम जागच्या जागीं राहते. (६) परदेशी भांडवलानें का होईना, पण देशांत कारखाना झाल्यास परदेशाहून येणाऱ्या त्या प्रकारच्या मालासंबंधीं किंमतींत चढाओढ सुरू होते. आणि (७) निदान या बिलाच्या तीन वर्षांत परकी भांडवलवाल्या कंपन्या पोलादसंरक्षणाचा फायदा मिळविणार असा संभव थोडाच आहे वगैरे वगैरे कांहीं गोष्टी निदान अशा आहेत कीं, त्यामुळें " परस्थ भांडवलवाल्या पोलादी कारखान्यांना या कायद्यानें कदाचित् मदत मिळण्याचा संभव म्हणून संरक्षक कायदाच नको, मग त्यापायीं टाटांचा चालू कारखाना बुडाला तरी चालेल " असें मनापासून म्हणणारे फार थोडे लोक असेंब्लींत होते. पण प्रयत्न सुरू होता तो इतकाच कीं, बिल तर न बुडावें आणि अशा बिलाचा फायदा परकी भांडवलवाल्यांना न देण्याचें तत्त्व तरी कसेंहि करून बिलांतच घुसडून देतां आलें तर पाहावें. या प्रयत्नांत स्वदेशी भांडवलासंबंधीं उपसूचना आणणारे डॉ. लोहोकरे, पटेल वगैरेंना इतरांची सहानुभूति होती. मात्र केवळ तिच्यामुळें

बिल बुडतें असें दिसून आल्यास काय करावें या मुद्द्यावर गोष्ट आल्यास त्यांना बहुमताची मदत मिळाली नसती. तथापि प्रथम लोहोकरे यांनीं उपसूचना पाठवून सिलेक्ट कमिटींत हा मुद्दा वादास काढल्यानें, आणि नंतर सभागृहांत पटेल यांनीं बिलाची चर्चा सुरू असतां विशेष आग्रह धरल्यानें सर्वांना अभिप्रेत अशी गोष्ट घडली. अर्थात् बिल मंजूर होऊन, शिवाय या संरक्षणाचा फायदा मिळण्यास कोणत्याहि कंपनींत स्वदेशी भांडवल व परदेशी भांडवल किती प्रमाणांत असावें हें ठरविण्यास कमिटी नेमण्याचेंहि सरकारनें कबूल केलें, असा दुहेरी फायदा पदरांत पडला यांत शंका नाहीं, आणि याबद्दल लोहोकरे व पटेल यांचें अभिनंदन करणें जरूर आहे.

* * *

असो. या वादासंबंधानें सांगण्यासारखी दुसरी एक गोष्ट अशी कीं, पं. मोतिलाल यांची एक व पटेल यांची एक अशा दोन उपसूचना या बिलावर पुढें आल्या. इतकेंच नव्हे, तर त्या परस्परविरुद्ध मतें घेण्याच्या चढाओढींत सांपडण्याचा रंग आला. या गोष्टीमुळें स्वराज्य व नॅशनॅलिस्ट पक्षांच्या शत्रूंना सहजच असें म्हणावयास फावलें कीं, "या पक्षांत फाटाफूट झाली. एकी बिघडली, आतां कौन्सिल पक्ष निर्बळ होणार!" पण ही गोष्ट वाटते तितकी व वाटते तशी खरी नाहीं. पंडितजी व पटेल यांच्या दरम्यान एका मुद्द्यावर मतभेद झाला तसाहि तो व्हावयास नको होता हें खरें. पण प्रथमपासून या विषयावर राष्ट्रीय व स्वराज्य पक्षांतील सभासदांना मतस्वातंत्र्य दिलें गेलें होतें. हें मतस्वातंत्र्य देण्याचें मूळ खरें कारण असें आहे कीं, मुख्य बिलावर फारसा मतभेद नव्हता, पण एकांतिक स्वरूपाच्या ज्या उपसूचना चमनलाल, देवकीप्रसाद, पटेल, लोहोकरे वगैरे आणणार होते त्यांवर पार्टीच्या सभेंतच मतें घेऊन निर्णय केला असतां तर त्या नामंजूर झाल्यानें त्या त्यांनीं सोडून द्याव्या, पुढें आणूच नयेत, असें बंधनहि त्यांच्यावर अर्थातच पडणार होतें. परंतु "मुख्य बिल मंजूर होतच आहे, मग आमच्या उपसूचना पुढें आणून त्यांवर आपलीं मतें प्रकट करण्याची नुसती संधि आम्ही मागतों ती आम्हांला कां देत नाहीं? आमच्या बाजूला तुम्ही मतें द्याच असा आमचाहि तुम्हांला आग्रह नाहीं. आम्हांला मिळतील तीं मतें घेऊन आम्ही स्वस्थ बसूं." अशी चमनलाल प्रभृतींनीं विनंति केल्यावरून सर्वांना मतस्वातंत्र्य देण्यांत आलें. पण मतस्वातंत्र्य दिलें याचा

अर्थ सहजच असा झाला कीं, आणखी मतें आपल्या बाजूस मिळतील तीं मिळविण्याची खटपटहि करण्यास हरकत नाहीं. पण त्यामुळें एकाच पक्षांत किरकोळ मतभेदामुळें चढाओढीचें स्वरूप यावयास नको होतें तें थोडेंसें आलें.

* * *

दुर्दैवानें त्यांतल्या त्यांत अशीहि एक गोष्ट झाली कीं, मुंबई म्युनिसिपालिटीच्या पाण्याच्या आयात नळावर नव्या बिलानें बसणारी जादा जकात माफ करावी अशी उपसूचना पटेल यांनीं पुढें मांडली असतां मतस्वातंत्र्याच्या भरांत पंडित मोतिलाल यांनीं तिजविरुद्ध भाषण केलें व पटेल यांची उपसूचना नामंजूर झाली. अशा गोष्टीचें उट्टें काढल्याशिवाय राहणारे गृहस्थ पटेल हे खास नव्हत; व पंडितजींची उपसूचना सरकारनें मान्य केल्यानें सर्व तंटा आतां मिटणार असा रंग दिसत असतां, त्यांनीं एखाद्या प्रतिपक्षाच्या उपसूचनेला हरकती घ्याव्या तशा मोतिलाल यांच्या उपसूचनेला घेतल्या! वास्तविक पटेल यांच्या कोणत्याच उपसूचनेस असेंब्लींतील बहुमत मिळण्याचा संभव नव्हता. पण वादच सुरू झाल्यावर मुख्य बिलापेक्षां आपल्या उपसूचनेचा अभिमान पटेल यांना अधिक उत्पन्न झाला असल्यास नवल नाहीं. एकानें गाय मारली म्हणून दुसऱ्यानें वासरूं मारूं नये; शिवाय किती झालें तरी पंडितजी हे अध्यक्ष व मुख्य पुढारी हें लक्षांत घेऊन पटेल यांनींच माघार घेणें शिस्तीला धरून होतें व इतर कोणी तें केलेंहि असतें. पण पटेल यांचा स्वभाव तसा नाहीं हें सर्व जाणतातच. कसेंहि असो, सदसद्विवेकबुद्धीच्या समाधानाकरितां मतस्वातंत्र्य दिलें, पण त्याचा परिणाम स्वराज्य पक्षांत फूट झाली असा देखावा क्षणभर जगाला दिसण्यांत झाला येवढें मात्र खरें. पंडितजींना या गोष्टीचा बराच राग आला; व रागाच्या भरांत त्यांनीं नॅशनॅलिस्ट पक्षाच्या जागेचा राजीनामाहि देऊं केला, पण दुसऱ्या दिवशीं गोस्वामी यांनीं पं. नेहरू यांना जी मेजवानी दिली तींत भाषण करतांना पटेल यांनीं झाल्या गोष्टीबद्दल दिलगिरी प्रदर्शित केली. तसेंच शनिवारीं भरलेल्या स्वराजिस्ट व नॅशनॅलिस्ट पार्टीच्या सभेंत सलोखा घडवून आणण्याकरितां केळकर, अणे, अभ्यंकर, रंगास्वामी, जम्नादास, शफी वगैरे गृहस्थांचें एक डेप्युटेशन नेमण्यांत आलें. त्यानें पंडितजींच्या घरीं जाऊन त्यांचीं

समजूत घातली, यामुळें पंडितजींनीं राजिनामा धटास न लावण्याचें कबूल केलें व हें प्रकरण येथेंच संपलें.

*  *  *

असो. संरक्षक जकातीचें बिल पास झाल्यावर वादाचीं कामें उरलीं नाहींत. ली-कमिशनच्या रिपोर्टपैकीं कांहीं बाबी अमलांत आणण्याची स्टेट-सेक्रेटरींना घाई आहे, करितां त्यावर असेंब्लीनें आपलें मत लवकर द्यावें, असा एक प्रकारचा तगादा होऊन त्या विषयाच्या चर्चेकरितां गेला सोमवार राखून ठेवण्यांत आला होता. त्याप्रमाणें चर्चा झाली. सर शिव-स्वामी व पं. मदन मोहन यांच्या सूचनांपैकीं कोणाची स्वीकारावी असा प्रश्न उत्पन्न झाला. पण सरकारसुद्धां सर्वांनाच ली कमिशन रिपोर्टाची तपशीलवार चर्चा सप्टेंबरपर्यंत तहकूब व्हावी असें वाटत असल्यानें तेंच घडलें. येऊन जाऊन कौन्सिल ऑफ स्टेटकडे गेलेलें संरक्षक जकातीचें बिल परत असेंब्ली-कडे यावयाचें इतकेंच असेंब्लीला काम उरलें, पण कौन्सिल ऑफ स्टेटनें प्रथम पुष्कळ वेळ व्यर्थ दवडला तरी पुढें झटपट काम आवरल्यानें सोमवारीं तेथें बिलाला मंजुरी मिळून चुकली. अर्थात् बुधवारीं औपचारिक रीत्या काम संपवून असेंब्ली सप्टेंबरपर्यंत तहकूब झाल्याचें जाहीर झालें. पण तें होण्याच्या आंतच सभासदांची पांगापांग सुरू झाली होती. सिमल्याचें हें 'सेशन' छोटें झालें. तथापि त्यापासून जो बोध मिळाला तो बराच महत्त्वाचा आहे. व त्याची स्वतंत्र चर्चा करावी असाच तो विषय आहे, याकरितां तो आज येथें सोडून देतों.

## पत्र नं. ४

दिल्ली आणि सिमला यांतील अंतर जमीन-अस्मानाचें म्हणविण्यास हरकत नाहीं. दिल्ली समुद्राच्या सपाटीपासून सुमारें तीनशें फूट उंच असेल तर सिमला सात हजार फूट उंच भरेल. सिमल्यावर चढलेल्याला झालें तरी आकाश ठेंगणें होतें असें थोडेंच आहे. पण हिमालय म्हटला म्हणजे पृथ्वीवरच्या कोणाहि मनुष्याला जरा आदरानेंच बोलावें लागतें. समुद्राच्या सपाटी-पासून तडक एकदम सात हजार फूट उंच चढणें हें आधुनिक वैमानिकालाहि थोडें अवघडच जाईल. 'सिमल्याची टेकडी' हें 'नगाधिराज हिमालया'चें एक लहानसें बछडें आहे. तथापि, हें बछडें आपल्या वडिलांचें नांव कांहीं अगदींच घालविणारें नाहीं. कारण येथें हिंवाळ्यांत तर बर्फ पडतेंच, पण ऐन उन्हाळ्यांत देखील येथून जवळच बर्फाच्छादित शिखरें दिसतात. हल्लीं

सिमल्यास हवा फारशी गार नाहीं. सिंहगड किंवा महाबळेश्वर येथील हवा देखील कदाचित् थोडी अधिक गार ठरेल, पण आठ पंधरा दिवसांपूर्वी येथें थंडीचा कडाका पडून लिंबाएवढया गारांचा पाऊस कोसळला होता असें आमच्यापूर्वी येऊन राहिलेले लोक सांगतात. उंच दर्जाच्या माणसाच्या स्वभावाप्रमाणें उंच जागेचें हवामान लहरी नसेल तरच आश्चर्य !

* * *

हिमालय पर्वतांत एकाहून एक उंच अशा शिखरांच्या रांगा एकामागें एक लागलेल्या असतात असें म्हणतात. त्याचा मासला सिमल्यास येतांना पाहावयास सांपडला. कालका येथें चढण्यास प्रारंभ केला तेव्हां वाटे हा डोंगर चढून गेलों म्हणजे सिमला दिसेल. पण सिमला नुसता दिसण्याला देखील त्याच्या सात हजार फूट उंचींतले सहा हजार फूट खर्ची घालावे लागले. आणि हें करतांना आगगाडीला वळसे इतके घ्यावे लागले कीं, आम्ही जिच्याकडे तोंड करून चाललों नव्हतों अशी एकहि दिशा उरली नाहीं. खुद्द सिमलाच पाठीशीं घालून चाललों कीं काय, असाहि कित्येक ठिकाणीं भास झाला ! वळणें घेण्याला सापाच्या गतीची उपमा देतात, पण आमच्या पूर्ण चक्राकार गतीनें ही म्हण साफ खोटी पाडली ! वळणांची एक रांग संपली कीं, पहिली दरी बुजून नवी दरी व नवें खोरें दिसूं लागे, यामुळें जमिनीपासून डोळ्याला उंची फारशी भासत नसे. पण नवीं संकटें उद्भवलीं म्हणजे जुन्यांचा विसर पडावा त्यांतलेंच हें आहे ! अगणित दऱ्याखोऱ्यांच्या पुडांत पुडें बसवून हिमालयाची बनावट एखाद्या गेंदेदार दिपमाळेप्रमाणें किंवा पाकळीदार फुलांच्या माळेप्रमाणें केलेली आहे. सिमल्याचा पर्वत हें या एकंदर माळेंतील शेंकडों फुलांपैकीं फक्त एक फूल आहे. या प्रत्येक फुलाच्या वाट्याला एकेक उंच गिरिशिखर आलेलें आहे. प्रायः हीं सर्व शिखरें श्रीशंकराच्या नांवानें प्रवित्र झालेलीं असावीं. आमच्यासमोर दिसतें त्या शिखराला 'चुडेश्वर' म्हणतात; व या 'जटाधारी' योगीश्वराच्या विरागी ऐश्वर्याची आठवण करून देणारा पवित्र भस्मराशीच कीं काय असा तो त्या शिखरावरील बर्फाचा विसकटलेला ढीग दिसतो. येथून केदार, कैलास, कांचनगंगा, धवलगिरी वगैरे शंकरजींच्या इतर आवडत्या निवासस्थानांची आठवण सहजच होते. आणि 'एवरेस्ट'वर चढण्याच्या 'प्रयत्नां'ची हकीकत आजच्या वर्तमानपत्रांत वाचली

त्यावरून अजून 'साहेब शिवला नाहीं' अशी देवतानिवासाची एक तरी जागा शिल्लक उरली आहे या विचारानें खरोखरच जरा बरें वाटलें.

* * *

हिमालय हा महादेवाच्या सहवासाला शोभण्यासारखा म्हणजे 'महा' या नांवाला योग्य असाच एक पर्वत आहे. पण महादेवाच्या स्वभावाचेंहि त्यानें थोडेंसें अनुकरण केलेलें आहे असें म्हणतां येईल. कारण हा पर्वत अजस्र व भयप्रद तर खराच; पण त्याच्या स्वभावरचनेंत भोळेपणाचें थोडें मार्दवहि आहे. सह्य पर्वताच्या काळ्याकभिन्न शिळांकडे पाहिलें म्हणजे निर्दयते-शिवाय दुसरी कल्पनाच येत नाहीं. हिमालय देखील टणक आहे. पर्वतच तो! पण त्याच्या अंगावरील माती केवळ कोपरानेंच नव्हे पण खोऱ्याकुदळीच्या युक्तीनें तरी अगदींच काढतां येणार नाहीं असें नाहीं, असें पाहणाराला वाटतें. तसेंच सह्याद्रीपेक्षां याच्यावर वृक्षसंपत्ति कांहीं कमी नाहीं. पण सह्याद्रीच्या अंगाला चिकटून बसणाऱ्या व अतएव त्यावरील प्रवेश दुर्गम करणाऱ्या खुरट्या झाडोऱ्यांची ती दाटी नव्हे. हिमालयाच्या अंगावरचे वृक्ष पन्नास-पाऊणशें फूट सहज उंच असतात. पण जमिनीपासून दहावीस हातांवर त्यांच्या खांद्या फुटल्यानें या झाडींतून मनुष्याला सुखानें वावरतां येते. सह्याद्रीवरील झाडी पाहिली म्हणजे उन्हाळ्यांत उघड्या अंगानें बसलेल्या एखाद्या केसाळ मनुष्याची आठवण होते, तीच हिमालयावरील झाडी पाहतां अवचित पाऊस आल्यानें डोक्यावर छत्र्या उघडून धरलेल्या प्रेक्षकांच्या जाहीर सभेची आठवण होते. हिमालयावरचा एकेकटा वृक्ष घेतला तरी त्याची उंची व त्याचा सरळ ताठपणा पाहून त्याच्याविषयीं आदरच प्रकटतो. आणि कालिदासानें देवदाराचें वर्णन 'अमुं पुरः पश्यसि देवदारुं पुत्रीकृतोऽसौ वृषभध्वजेन' असें जें केलें तें शोभण्यासारखेंच आहे असें वाटतें.

* * *

हिमालयांत अनेक जातींचे पहाडी लोक आहेत. त्यांचीं पूर्वीं लहान लहान संस्थानें होतीं. १८०३ सालीं दिल्ली हस्तगत झाल्यावर इंग्रजांचा प्रवेश पंजाबच्या या कोपऱ्याकडे झाला. पहाडी संस्थानिकांना लढवय्ये व निर्दय गुरखे लोकांचा त्रास होऊं लागला. तो टळावा म्हणून त्यांनीं इंग्रजांची मदत मागितली. इंग्रजांनीं नेपाळच्या युद्धांत गुरख्यांना आपल्या हद्दींत पिटाळून लावलें. हें कार्य झाल्यावर इंग्रजांनीं पहाडी संस्थानिकांना त्यांचा बहुतेक

मुलूख परत दिला. पण लष्करी दृष्टीनें कांहीं नाक्याच्या जागा म्हणून आपल्या ताब्यांत ठेवल्या. तात्पर्य, इसापनीतींतील 'मनुष्य आणि घोडा' या गोष्टीची येथें पुनरावृत्ति होऊन साहेब जो एकदां सिमल्याच्या पहाडावर चढला तो कांहीं केल्या खालीं उतरलाच नाहीं! परत दिलेल्या जागांत देखील उंच उंच हवाशीर पठारें पाहून तेथें दुखणाईत लोकांकरितां झोंपड्या व घरें बांधण्याची परवानगी त्यानें मिळविली, व अखेर हीं लष्करी ठाणीं व हीं पठारें मिळून सिमल्याची वस्ती बनली. सिमल्याच्या सात टेकड्यांवर मिळून आज सुमारें नव्वद हजार वस्ती आहे व सगळ्या हिंदुस्थानचा कारभार बारां-पैकीं सात महिने या पहाडावरून चालतो!

* * *

हल्लीं सिमल्यावर चढून येण्याला मोटारी चालण्यासारखा रस्ता व प्रत्यक्ष आगगाडीहि झाल्यामुळें दळणवळणाची कांहीं अडचण वाटत नाहीं. पण पहिले जे इंग्रज येथें आले त्यांना अमेरिकन वसाहतवाल्यांप्रमाणें धैर्य, काटक-पणा व स्वावलंबन या गुणांचा फार उपयोग करावा लागला. १८१९ सालीं सिमल्यावर साहेबाची पहिली झोपडी बांधली गेली. तेथपासून पुढें उन्हाळ्यांत चार दिवस व्हाइसरॉय व सेनापति यांनीं नुसते हवेखातर येथें येऊन राहावें असा प्रघात पडला. १८२७ मध्यें लॉर्ड आमहर्स्ट हे आपली खास कचेरी घेऊन सर्व उन्हाळाभर येथें राहिले. अखेर १८६४ सालीं ग. ज. लॉर्ड लॉरेन्स यांनीं सिमला ही कायमची राजधानी बनविली. या शंभर वर्षांत सरकारी रीत्या या ठिकाणावर किती कोटि रुपये खर्च झाले असतील याची कोणासहि सहज कल्पना करतां येईल. या राजधानींत सरकारच्या सर्व खात्यांच्या कचेऱ्या, दफ्तर, छापखाना, लष्करी छावणी, बिनतारी व साधीं तारायंत्रें, लष्करी विमानें, वगैरे सर्व कारखाने एप्रिलच्या प्रारंभापासून नोव्हेंबरच्या प्रारंभापर्यंत जोरांत चालू असतात. उरल्या पांच महिन्यांत सिमला योगनिद्रा घेतो.

* * *

एवढ्या सगळ्या हिंदुस्थानची राजधानी व ती एखाद्या पर्वताशिखरा-सारख्या अडचणीच्या जागेंत कां, असा प्रश्न सहजच सुचतो. पण त्याचें उत्तर पूर्वींच्या इतिहासांत व परंपरेंत आहे. कंपनी सरकारचा राज्यसंपादनाचा उद्योग प्रथमतः उत्तर हिंदुस्थानांत झाला; व कलकत्त्याहून राजधानी बदलून

दिल्लीस आली तरी वरील कारणांत कांहीं फरक झाला नाहीं. उलट कलकत्त्यापेक्षां दिल्लीला सिमला फारच जवळ. यामुळें ही सकारणता बळावली. नव्या दिल्लीची रचना व इमारती झाल्यापासून मात्र सिमल्याचें महत्त्व सरकारच्या मनांतून थोडें कमी झालें आहे. सर्व कचेऱ्या सात महिने येथें असतात त्या उठून बाराहि महिने दिल्लीस राहाव्या, व मुख्य मुलकी-लष्करी अधिकारी यांनींच वाटेल तर आपले खास नोकर व हस्तक बरोबर घेऊन उन्हाळ्यांत सिमल्यास राहावें अशी नवी योजनाहि पुढें-मागें होण्याचा संभव आहे. नाहीं असें नाहीं. पण आज तरी सात हजार मैल समुद्रापलीकडचा साहेब हिंदुस्थानांत येऊन सात हजार फूट उंचीच्या पहाडावर बसून राज्य करतो अशी विपरीत वस्तुस्थिति आहे खरी! हवाखोरीची आवड, एकतंत्री राजसत्ता, परक्या लोकांचा मुबलक पैसा, इतके गुणदोष एकत्र झाल्यावर पर्वतावर तर पर्वतावर पण सुखाला लागेल अशी राजधानी इंग्रजांनीं कां न करावी!

* * *

मैदानांतून उठून पर्वतावर जाऊन राहण्याची कल्पना आपल्याकडेहि नाहीं असें नाहीं. राजधानीचें ठिकाण ही उत्तम बचावाची जागा असावी अशी गरज पूर्वीच्या काळीं फार होती; याकरितां डोंगर नसेल तेथें भुइकोट किंवा गढी बांधीत, व डोंगर मिळाल्यास अर्थात् त्यावर राजधानी वसवीत. शिवाजीमहाराजांनीं आपली राजधानी करण्याकरितां रायगडाची जागा पसंत केली ती किती उंच व बिकट आहे हें ज्यांनीं ती प्रत्यक्ष पाहिली असेल त्यांच्या लक्षांत येईल. पण तो काळच तसा होता. उत्तर-हिंदुस्थानांत रजपुतांनीं देखील सांपडेल तेथें डोंगराचा आश्रय करूनच राजधान्या बांधल्या आहेत. आपल्या देवस्थानांची गोष्ट देखील अशीच आहे. मैदानांपेक्षां डोंगर-पर्वतांवरच अधिक देव बसविलेले आढळतात. देवतानिवास हा एकांतांत असला म्हणजे मुद्दाम उठून जाणाऱ्या भाविक यात्रेकरूंखेरीज इतरांकडून त्याच्या पावित्र्याला उपसर्ग पोंचत नाहीं. देवपूजा, जपजाप्य, योगसाधन करणारांना उंच व एकांतांतील जागा फार अनुकूल असते. शिवाय देवानें सगुण रूप घेऊन संसार मांडला व दागदागिने केले कीं त्यालाहि शत्रूची भीति उत्पन्न झालीच, याहिमुळें देव पर्वताचा आश्रय करतात. दक्षिणेंत व्यंकोबा बालाजी व उत्तरेकडे अबू, गिरिनार विंध्य-

वासिनि येथील देवस्थानें लक्षांत घेतलीं, म्हणजे देवांनाहि पर्वतावरील प्रसन्नतेइतकीच त्याजपासून मिळणाऱ्या सुरक्षिततेची गरज होती असें सहज सिद्ध होतें.

* * *

पण इंग्रजांनीं सिमल्यास राजधानी केली तिला वरच्यांपैकीं कोणतेंच कारण लागू पडत नाहीं. सुरक्षितपणा म्हणावा तर सिमल्यास तटबंदी कोठेंच नाहीं, उलट चिकट जागांतून वर सहज जातां यावें म्हणून वाटा, सडका किती तरी केल्या आहेत. एकांतप्रियता म्हणावी तर कलकत्ता, मुंबई येथील सरकारी बंगल्यांना जितकी गर्दी दूर तितकी येथें नाहीं. मुख्य सडक अशी एकच म्हणजे माल रोड. आणि संध्याकाळीं किंवा दुपारीं पाहावें तों रावांबरोबर रंकहि येथें खांद्याला खांदा लावून हिंडलेले दिसतात. मुंबई, कलकत्ता येथें गाड्या-मोटारी असल्यामुळें गर्दींत देखील श्रीमंताला गरिबाचा संपर्क लागत नाहीं. येथें पाहावें तों सगळ्या सिमल्यावर मुलकी लाट ( व्हाइसरॉय ), जंगी लाट ( सेनापति ), पतियाळाचे महाराज व भोपाळच्या बेगमसाहेब या चौघांखेरीज इतर कोणालाहि मोटार किंवा घोडागाडी वापरण्याची परवानगी नाहीं ! यामुळें मालवरील अरुंद रस्त्यांत सगळ्या बड्या अधिकाऱ्यांना पायानेंच चालावें लागतें. एखादा दुसरा घोड्यावरून जातो. कांहीं थोडे रिक्शांमधून जातात, पण बहुतेक पायीं जातात; यामुळें खांद्याला खांदा सहजच भिडतो. बरें, पावित्रपणा म्हणावा तर इंग्रजांनीं येथें देव-देवळांची भानगड फारशी ठेवलेली नाहीं. आणि सामाजिक व्यवहारांत पाहावें तर शहरापेक्षांहि येथें ख्यालीखुशाली व तदनुषंगिक गोंधळ अधिक माजतो म्हणतात.

( २ )

सिमल्याचा विस्तार सात टेकड्या मिळून सहा मैल लांबीचा आहे. त्या मानानें रुंदी फारच कमी भरेल. कोठें कोठें पर्वताच्या माथ्याचा सपाट भाग शंभर फूट देखील रुंद नाहीं. या सहा टेकड्यांना आधारभूत असलेला मुख्य पर्वत घोडनालाच्या आकाराचा आहे. त्याच्या मध्यभागीं दाट वस्ती असून इतर वस्ती टेकड्यांवर पसरलेली आहे. मुख्य वस्ती एकाच्या माथ्यावर एक म्हणजे एकानें आपल्या पडवींत बसून दुसऱ्याच्या धुराड्यांतून खालीं पाहावें अशी, वसल्यासारखी दिसते. काळ्या लोकांची वस्ती ही बाजारपेठ व त्या-

खालीं लागलेली वीस मजली घरांची उतरंड यांत सांठविलेली असून, सरकारी व युरोपियन लोकांचे खासगी मालकीचे बंगले बाजूच्या टेकड्यांवर पसरलेले आहेत. तथापि बाजूस झालें तरी महाबळेश्वराप्रमाणें येथें बंगल्यांना विस्तीर्ण कंपाउंड किंवा आवार नसतें. याचें कारण माथ्यावर सपाटी अशी फार कमी. स्वाभाविक मैदानी जागा नसल्यानें घर-बंगला बांधणाराला प्रत्येक ठिकाणीं झाडें तोडून डोंगराची कड खोदून जागा साफ करून घ्यावी लागली आहे. कोणत्याहि एका घरांतून दुसऱ्या घरांत जावयाचें असल्यास चढलें तरी पाहिजे किंवा उतरलें तरी पाहिजे. अशा स्थितींत दळणवळण किती अवघड होत असेल याची कल्पना सहजच करतां येईल. लांब पल्ल्याला चौघांच्या खांद्यां-वरून जावें लागतें! पण मोठे गाडीरस्ते नसले तरी लहान सडका व पाऊल-वाटा यांचा जणुं कांहीं नागमोडी मोक्षपटच पर्वताच्या सर्व अंगभर आंखल्या-सारखा दिसतो. सिमल्याची इतकी वस्ती, पण कोणीहि कोणाजवळ असा राहात नाहीं असें यथार्थतेनें म्हणतां येईल. कोणत्याहि वस्तीला पाण्याची सोय मुख्य लागते. ती सिमल्यास असावी तितकी नाहीं. या पहाडांत पाण्याचा सांठा फार होत नसावा असें वाटतें. कारण डोंगरकपारींतून निघालेला जिवंत वाहता झरा असा येथें सहसा दिसत नाहीं. येथील म्युनिसिपालिटीनें दुरून पाण्याचे नळ आणले आहेत. पण कित्येक बंगल्यांना पाणी बरेंच लांबून आणावें लागतें.

*　　　*　　　*

विजेची रोषनाई मात्र सिमल्याला भरपूर आहे. दुरून रात्रीं बड्या सिमल्या-कडे पाहिलें म्हणजे हिरे-मोत्यांचीं ताटेंच्या ताटें भरून तीं लीलेनें वर उध-ळून द्यावीं असा दाट विखुरलेल्या विजेच्या दिव्यांचा लखलखाट दिसतो. आणि दूर बाजूच्या टेकड्यांवर पसरलेले तुरळक दिवे पाहिले, म्हणजे आपण एखाद्या मोठ्या बंदरांत उभें असून, समोर रात्रीच्या वेळीं समुद्रांत नांगर-लेल्या शेंकडों आगबोटींचा काफिला पाहत आहों असा भास होतो. तारायंत्री तारांच्या जाळ्यांचा विस्तार पाहिला म्हणजे बिनवापराच्या जागेंत कोळ्यांनीं केलेल्या विणकामाची आठवण होते. एखादे वेळीं एकादें लष्करी विमानहि पहाडावर घिरट्या घालतें; तेव्हां खालच्या दरींतील चीड देवदार वगैरे वृक्षांच्या झाडींत नव्या फुलांवर मधाकरितां घोंगावणाऱ्या भुंग्यांच्या गुंजारवाचा प्रति-ध्वनीच आपण आकाशांत ऐकत आहों कीं काय असें वाटतें. तथापि अजूनहि

सिमला सगळाच कांहीं नवाळला नाहीं ! त्याच्या जुनाट परंपरेचा धागा अजूनहि शिल्लक आहे. कारण पहांटेच्या वेळीं 'कार्ट रोड' वरून लमाणी खेचरांचे तांडे वर घाट चढून येतात तेव्हां त्यांच्या गळ्यांतील घंटा आपल्या गोड आवाजानें जुनी परिचित रागदारी गाऊन, साखरझोंप घेणाऱ्या आळशी मनुष्याला जागें करून उषःकालाची वर्दी देत असतात. अजूनहि माल देऊन माल विकत घेणारे म्हणजे अडाणी तिबेटी लोक हिमालयांतून येऊन आश्चर्यचकित मुद्रेनें सिमल्याच्या बाजाराकडे पाहत उभे राहतात. अजूनहि आपलें सगळें अंग नखशिखान्त झाकून घेणाऱ्या पहाडी स्त्रिया, अर्धें वक्षःस्थळ उघडें टाकून फिरणाऱ्या गोऱ्या युरोपियन बायांकडे भिऱ्या दृष्टीनें पण तिरस्कारयुक्त मुद्रेनें पाहत जात असतात. अजूनहि एखादा जंगली गुराखी पहाडाच्या माथ्यावर बसून जुन्या पद्धतीनें अलगुज वाजवून खालचें दरीखोरें मधुर आवाजानें भारून टाकतो.

* * *

सिमल्यास सुमारें नव्वद हजार वस्ती आहे म्हणून सांगितलें, पण ती उन्हाळी वस्ती होय. ऐन हिंवाळ्यांत जेव्हां सरकारी कचेऱ्या येथून खालीं जातात व चोहोंकडे बर्फ पडतें तेव्हां ही वस्ती चवथ्या हिश्शाची राहते. बाकीची खालीं निघून जाते. घरधन्यापेक्षां पाहुण्यांचीच गर्दी अधिक अशांतला तेथील कायम वस्तीचा प्रकार आहे. आणि उन्हाळी वस्तींत देखील उद्योगी मधमाशांपेक्षां गुलहौशी फुलपांखरेंच अधिक ! सरकारी पेट्या, कागदाचीं पुडकीं, पट्टेवाल्यांची गर्दी, हें सर्व पाहून येथें चालणाऱ्या कामकाजाची कल्पना येते ती कांहीं अगदींच खोटी नसते. पण रस्त्यांत भेटणाऱ्यांपैकीं खऱ्या कामांत गढलेल्या अशा एका माणसागणिक दोन माणसें ख्यालीखुशालींच्या ढंगांत असतात असें म्हटल्यास फारशी चूक होणार नाहीं. सरकारी कचेऱ्या येथून हलल्या म्हणजे मग येथील कायम रहिवासी पहाडी लोक व नेपाळ-तिबेटाकडून येणारे फेरीवाले यांच्या स्वाधीन सगळा सिमला होतो. या दोन जातींचे लोक पाहतांच वेगळे म्हणून ओळखतां येतात. पहाडी मनुष्य हा अर्धशुभ्र, नाकाडोळ्यांनीं तरतरीत, व ठेवणीनें किंचित् छलकाटा असा असतो. आणि तिबेटी वगैरे प्रायः नकटे, खुजे, कुरूप, घाणेरडे पण मोठे बळकट असे असतात. हातगाड्या वगैरे ओढण्याचें काम पहाडी लोक करतात. पण पल्लेदार मजलीवरचें किंवा भारी ओझें वाहण्याचें काम हें दुसऱ्या

प्रकारचे लोक करतात. आमचे घाटी लोक खंबीर खरे, पण हे तिबेटी मोठीं ओझीं पाठीवर घेऊन उंचवट्यावरून खुशाल चढून गेलेले पाहिलें म्हणजे आश्चर्य वाटल्याशिवाय राहत नाहीं. या कायम रहिवाश्यांच्या यादींत सिमल्यावरील माकडांचाहि समावेश केल्यास चूक होणार नाहीं! कारण त्यांची वस्ती तशीच जुनाट व कायम आहे. माणसांबरोबर माकडांचा उल्लेख केल्यास मनुष्यजातीचा अपमान केलासा वाटेल, पण तसें वाटण्याचें कारण नाहीं. किप्लिंगनें आपल्या एका कवितेंत सिमल्यावरील माकडांना विशिष्ट प्रकारच्या युरोपियन लोकांपेक्षां अधिक मान दिला आहे. या कवितेचे दोन चरण असे आहेत:—

" Artful Bunder, who, never in his life,
Flirted at Peliti's with another's wife."

या कवितेमध्यें 'पेलिटी'सारख्या श्रीमंती थाटाच्या हॉटेलांत फॅशनेबल व स्वैर लोकांकडून घातल्या जाणाऱ्या गोंधळावर कवीनें कोरडा उडविला आहे.

* * *

सिमल्यावर सरकारनें हिंदी प्रजेचे कोट्यवधि रुपये पाण्यासारखे नासले व वर्षांतून सात महिने सगळ्या सरकारी कारभाराचा आखाडा सिमल्यावर ठेवला, यामुळें दरवर्षी लक्षावधि रुपयांचा व्यर्थ चुराडा होतो हें तर झालेंच; पण इंग्रज लोकांच्या दृष्टीनेंहि पाहतां त्यांना सिमल्याची कीर्ति फारशी प्रिय नाहीं. येथील समाजरचनेला असेंच कांहीं फाजील कृत्रिम स्वरूप आलेलें आहे कीं, तें सुजाण इंग्रजांना फारसें पसंत पडत नाहीं. 'रोग्यांना प्रकृति सुधारण्याची जागा' असें जोंपर्यंत सिमल्याला स्वरूप होतें तोंपर्यंत सर्वांना तें पसंत होतें. पण सगळा कारभारच्या कारभारच उचलून पर्वतावर नेण्यांत आला, तेव्हां खुद्द इंग्रजांनींहि त्याबद्दल तक्रार केली. १८५१ सालच्या 'दिल्ली स्केचबुक' नामक विनोदी पत्रांत या विषयावर फार चुरचुरीत टीका आलेली आढळली ती अशी—" पंजाबचा अंतस्थ मुलूख पाहण्याकरितां मुलकी लाट सिमल्याला गेला. मुलकी लाट गेल्यावर त्यचाया संरक्षणाला जंगी लाटला जाणेंच आलें! येवढे वरिष्ठ गेल्यावर कनिष्ठाचें कर्तव्य म्हणून लेफ्टेनंट गव्हर्नर गेला. कमिशनर म्हणाला, पर्वतावर जायचें म्हणजे कोण

त्रास ? पण कर्तव्य हें केलेंच पाहिजे म्हणून तो गेला. इतके अधिकारी वर गेल्यावर त्यांच्या टपालाची व्यवस्था करण्यास पोस्टमास्तर जनरलला जावेंच लागलें. मग कोणी या सर्वांचा बंदोबस्त ठेवण्याला म्हणून गेले. कोणी सरकारी काम उकरून काढून गेले. कोणी बढती मागण्याला म्हणून गेले. कोणी रजेचा रिकामपणा म्हणून गेले. कोणी आजाराचें निमित्त करून गेले. कोणी पुढचा आजार वांचवावा म्हणून गेले. कोणी स्वतःच्या करमणुकीला गेले. कोणी दुसऱ्याच्या करमणुकीला गेले. कोणी सुंदर बायका लग्नाला मिळवावयाला गेले. कोणी आपल्या सुंदर बायका लोकांना दिमाखानें दाखवावयाला गेले. मुलें असलेल्या बायका मुलांच्या प्रकृतीकरितां गेल्या. मुलें नसलेल्या बायका रिकाम्या म्हणून गेल्या. आणि कित्येक आपल्या नवऱ्यांच्या बढतीच्या किंवा बदलीच्या खटपटीकरितां म्हणून गेल्या. मिळून सगळे गेले. ज्यांना यांपैकीं कांहींच निमित्त मिळेना तेवढे मात्र राहिले !”

* * *

लंडन टाइम्सचा बातमीदार डॉ. रसेल सिमल्यास १८५८ त आला होता. तो लिहितो ‘मला आजारांत बरीच करमणूक आहे. येथें माकडें-वानरें पुष्कळ आहेत. त्यांच्याकडे पाहून कंटाळा आला म्हणजे सहल करण्यास जाणाऱ्या इंग्रज स्त्री-पुरुषांकडे पाहतों; दोघांच्याहि चेष्टा पाहण्यासारख्या असतात; आणि करमणूक सारखीच होते.’ इतर कित्येकांनीं येथें चालणाऱ्या बेसुमार जुगारीचें वर्णन केलेलें आढळतें. येथें मुलकी अधिकाऱ्यांना कांहीं तरी काम असतें; : पण लष्करी अधिकारी रिकामटेकडे असून फारच गोंधळ घालतात. नाच, वनभोजनें, शर्यती यांची मारे गर्दी उडते. १८७२ सालीं अँड्र्यूविल्सन नामक ग्रंथकार लिहितो, ‘सिमल्याचें इतकें बदनाम झालें आहे कीं, एखादा स्टेटसेक्रेटरी हें ठाणें येथून हलवील तर फार बरें.’ जागा लहान, लोक पुष्कळ जमतात, बरेचसे रिकामे असतात, आणि वर्तमानपत्रांत प्रसिद्ध करण्याला येथें सामाजिक ख्यालीखुशालीशिवाय दुसरें फारसें कांहीं नसतें. यामुळें हें बदनाम होतें हीहि गोष्ट कांहीं खोटी नाहीं. लॉर्ड लिटन यांच्या वेळीं सिमल्याच्या या अपकीर्तीचा कळस झाला होता असें म्हणतात. साम्राज्याभिमानी लेखक रडयार्ड किप्लिंग यानें ‘Plain tales from the hills’ नामक पुस्तकांत या अपकीर्तीला पोषक असेंच सिमल्याचें चित्र काढलें आहे. पण या गोष्टी जुन्याच नसून सिमल्यास इंग्रजांचा सामाजिक क्रम आहे तसाच चालू आहे. एक

विनोदी रहिवासी परवां 'जाक्को' नामक टेकडीसंबंधानें बोलतांना म्हणाला— "जाक्को हा शब्द 'यक्ष' शब्दाचा अपभ्रंश आहे. जुन्या काळीं खरेखुरे यक्ष-गंधर्व या पर्वतावर उतरून क्रीडा करीत असतील ही समजूत खरी असो वा खोटी असो; पण आधुनिक युगांतले हे गोरे 'सुपरमन' यक्षगंधर्वच होत; कारण, त्यांच्या क्रीडा येथें पूर्वींसारख्या हल्लींहि चालतात." या 'जाक्को' पर्वतावर मारुतीचें एक जुनाट देवालय आहे. हा मारुति श्रीरामदासांनीं येथें स्थापला अशी कांहीं हिंदु रहिवाश्यांची समजूत आहे. या मारुतीला उद्देशून हा विनोदी रहिवाशी म्हणाला, 'हा मारुति मात्र नवसाला पावतो असा इंग्रजांनीं लिहिलेल्या ग्रंथांतरींहि आधार आहे.' मी म्हणालों, "नवसाला पावतो कशावरून?" तो म्हणाला, "जाक्को पर्वताभोंवतीं अल्पपरिचित अशाहि अविवाहित इंग्रज युवयुवतींनीं एकदां प्रदक्षिणा पुरी घातली कीं प्रायः लगेच त्यांचे विवाह होतात! आमच्या 'यक्षपर्वता'वरील मारुति स्वतः ब्रह्मचारी आहे खरा, पण त्याला गौरकाय यक्षयक्षिणींचीं लग्नें लावण्याची फार हौस वाटते!" सारांश, सिमला हें जसें हिंदुस्थानांतल्या राज्यकारभाचें केंद्र आहे तसेंच तें हिंदुस्थानांतल्या इंग्रज समाजासाठीं लग्नाच्या सौद्याची मुख्य बाजारपेठ आहे असें म्हणणेंहि वावगें होणार नाहीं.

---

# सिमल्याची पहिली बडी हजेरी

## पत्र नं. १

ता. ९-९-२४.

आज तीन महिन्यांनीं केवळ कामानिमित्त या पर्वतशिखरावर पुन्हा आलों. पूर्वीं छोटी हजेरी झाली. आतांची ही बडी हजेरी आहे. तथापि सर्व लक्षणांवरून पाहतां चालू बैठक मागच्याहून फक्त एखादा आठवडाच अधिक चालेल असें वाटतें. साहेबांच्या भाषेंत छोटी हजेरी याचा अर्थ न्याहारी किंवा प्रातराश असा आहे. तेव्हां बडी हजेरी म्हणजे लक्षणेनें दोन प्रहरचा फराळ किंवा भोजन असा होतो. परंतु किती आहार घशाखालीं केव्हां जाईल हें घड्याळाच्या ठोक्यावर अवलंबून असत नाहीं तर जठरांतल्या भुके-वरच अवलंबून राहतें. चालू बैठकींतील कामकाजाच्या अंदाजावरून असेंब्लीला या खेपेस चरचरून भूक लागली नसावी असें वाटतें.

सिमल्याची हवा मात्र या खेपेस सभासदांच्या शारीरिक जठराला अधिक भूक लागण्यासारखी आहे. आम्ही मागें येथें आलों तेव्हां उन्हाळा असल्यानें हवा थोडी कडक व वातावरण धुळीनें भरलेलें असें होतें. हल्लीं पावसाळा संपत आला असून स्नान केलेल्या शुचिर्भूत मनुष्याप्रमाणें हिमालय स्वच्छ व ताजातवाना दिसतो. मात्र पूर्वीं गिरिशिखरांवरील बर्फ कपाळा-वरील भस्माच्या किंवा पांढऱ्या गंधाच्या पट्ट्यासारखें दिसे, त्या ठिकाणीं आतां पांढऱ्या-काळ्या ढगांची गर्दी पाहून या आद्य योगिराजानें स्नाना-नंतर वाळण्याकरितां जटांचा संभार विसकटून सोडला आहे असें वाटतें. चोहोंकडे प्रदेश हिरवागार झाला आहे. येथें पर्जन्य मात्र पक्षपाती व विश्वास-घातकी असा आहे. क्षणांत आकाश निरभ्र असतां कोठें तरी अवचित सर कोसळते. प्रातःकाळीं आठ-साडेआठ वाजेपर्यंत धुकें व ढग यांच्या गर्दीमुळें दहावीस हातांवरचेंहि एखादे वेळीं दिसत नाहीं.

* * *

नेहमीं ढग डोक्यावर व आपण खालीं असें इतरत्र असल्यानें महत्त्वाकांक्षी मनुष्याला आपला जो कमीपणा भासतो त्याचा सूड येथें सहज निघतो. आम्ही राहतों त्याखालीं मोठी दरी असल्यानें वरून खालीं जाणारे ढग आम्ही पायानें लथाडून खालीं ढकलतों असें म्हटल्यास त्यांत अतिशयोक्तीची भीति नाहीं. पूर्वीं उन्हाळ्यांत धुळीनें भरलेलें धुकटाचें एक निश्चल असें कडें, दूरवर पाहावें तिकडे दिसे, यामुळें चित्त सहजच अप्रसन्न असे. हल्लीं हजारों आकार धारण करणाऱ्या पांढऱ्या शुभ्र ढगांचे लहानमोठे तुकडे दाही दिशांना खेळ मांडून धावतांना पाहून मन प्रसन्न होतें. एखादे वेळीं असा भ्रम पडतो कीं, या दरींत कोणी अदृश्य असा अवतारी पिंजारी इंद्रधनुष्यानें अभ्रमंडळाचा कापूस पिंजीत बसला आहे व त्यामुळें तलम पोकळ रुईच्या दिखाऊ चांदव्यांनीं सूर्य कायमचा झाकून जाणार! पण स्वतः तापून दुसऱ्यांना तापविणारा रवि नऊ वाजण्याचे सुमाराला जरासा अवसानांत आल्याबरोबर आपल्या तीक्ष्ण व प्रखर अशा किरणांच्या केरसुणीनें पिंजलेल्या कापसाचा हा सगळा गोंधळ लीलेनें झाडून टाकण्याला समर्थ झालेला पाहून नित्यनैमित्तिक विवेकाचें तत्त्वज्ञान अखेर मनाला पटून हुशारी येते.

* * *

असो. चालू बैठकींत असेंब्लीला भूक फारशी दिसत नाहीं असें वर म्हटलें याचें कारण हेंच कीं, सिमल्याच्या प्रसन्न वातावरणाच्या अगदीं विरुद्ध, म्हणजे सर्वस्वीं अप्रसन्न असें सिमला येथील सरकारी वातावरण आहे. मे-जूनमधील छोट्या बैठकींत उभयपक्षांना एकाच विषयावरील जवळ जवळ एकाच स्वरूपाचें बिल मंजूर करून घ्यावयाचें होतें, म्हणून या अप्रसन्नतेला कारणीभूत असा विरोध फारसा दिसून आला नाहीं. पण या खेपेस येथून तेथून विरोधकारणांशिवाय दुसरें कांहींच दृष्टींत किंवा कल्पनेंत येत नाहीं. आणि नव्या कौन्सिलांतील विरोध किती त्रासाचा किंवा जिकिरीचा होतो हें सरकारांस आतां कळून चुकलें आहे. चालू बैठक सुरू होण्यापूर्वीच बंगाल्याकडून ज्या बातम्या आल्या त्यामुळें येथें सरकारी खुराड्यांतून बरीच चिंवचिंव व पंखांची फडफड झाली असें असोसिएटेड प्रेसच्या बातमीदारानें पूर्वी प्रसिद्ध केलेंच आहे. रणमैदानांत दूर बगलेच्या सैन्याचा पराभव झाल्याची बातमी ऐकली म्हणजे मधलें मुख्य सैन्य हातीं घेऊन बसणाऱ्या सेनापतीला तें विषादकारण व्हावें हें स्वाभाविकच आहे.

* * *

सिमल्याची बैठक सुरू होण्याच्या तोंडींच या मुख्य सैन्यावरहि एक मोठाच हल्ला झाला. त्याचा प्रकार असा—रेल्वेचें प्रचंड खातें, म्हणजे त्याचा कारभार व त्याचा पैसा, हीं इतर सर्व खात्यांपासून तोडून वेगळीं काढण्याचें सरकारनें आज कैक दिवस मनानें ठरविलें होतें. या 'सुधारणे'चें दिखाऊ कारण असें कीं, या खात्याचें बजेट व त्याचा कारभार हीं वेगळीं ठेवल्यानें त्याची व्यवस्था प्रगतीच्या दृष्टीनें सुसूत्र राहून त्याच्या नफानुकसानीला तोच धनी केला म्हणजे त्याची जबाबदारी वाढेल. पण या 'सुधारणे'चें खरें कारण असें आहे कीं, या खात्याचा जमाखर्च शंभर कोटींचा आहे. म्हणजे हिंदुस्थानच्या कारभाराचा तो एक निमा भाग होतो. शंभर कोटी रुपये खाणारें हें खातें हल्लीं सरकारच्या बेजबाबदार खात्यांतच वास्तविक समाविष्ट आहे. परंतु तटबंदी किल्ल्याचे आंत फिरून एक जसा बालेकिल्ला बांधावा किंवा चौफेर कांटेरी तारेचें कुंपण असलेल्या बागेंत फिरून 'कांटेरी' गुलाब चौफेर लावून एकादी खास फुलबाग तयार करावी तसें हें रेल्वेचें खातें सरकारला वेगळें, म्हणजे आमच्या संस्थानिकांच्या शेरी जमिनीच्यासारखें, खास मालकीचें करावयाचें होतें.

हा मतलब साधावा म्हणून निरनिराळ्या पक्षांतील सुमारें वीस सभासदांची एक कमिटी सरकारनें नेमली होती. खातें मोठें तर पोटकमिटीहि मोठीच असली पाहिजे! ही कमिटी दिल्लीस नेमून घेतली असल्याकारणानें तींत एकहि स्वराजिस्ट नव्हता. असें असतांहि चार दिवसांमागें या कमिटीची जी बैठक येथें झाली तींत दोनतीन सभासदांशिवाय इतर कोणीहि या प्रचंड 'सुधारणे'ला संमति देईना व ही 'सुधारणा' उपयोगाची नाहीं असा बहुमताचा निर्णय लवकरच प्रसिद्ध होईल. मग असेंब्लीच्या सभेंत "आम्हीं ही 'सुधारणा' परत घेतली" असें सभासदांना शिव्या शाप देत देत व त्यांच्या मंद बुद्धीला नांवें ठेवीत ठेवीत सरकारास जाहीर करावें लागणार असें दिसतें. रेल्वे खात्याचा पैसा-अडका व कारभार यांची सुधारणा करणार तर त्यांतच हिंदी लोकांना मोठ्या पगाराच्या जागा देणें, गोरे-निमगोरे लोक कमी करणें, उतारूंचे हाल नष्ट करण्याची जामिनकी देणें, देशी व्यापारी मालाला सवलती देणें, देशी कंत्राटदारांना कामें देणें, लोकपक्षाला संमत असेच कार्यक्रम आंखून घेणें या पोटसुधारणाहि करा असें कमिटीचें म्हणणें होतें. पण "असले प्रश्न काढणें म्हणजे या सुधारणेच्या मूळ मर्मावरच घाव घालणें आहे" असें म्हणून 'सुधारणा' न झाली तरी चालेल, पण "आम्ही असले हात बांधण्याचे अपमानास्पद कारारमदार करणार नाहीं" असला बहाणा व कांगावा सरकारनें केला. अशा रीतीनें ही कमिटी उधळली गेली. सर्वांत मोठें दुःख हें कीं, जींत स्वराजिस्ट सभासद औषधालाहि नव्हता अशा म्हणजे समंजस व विश्वासू मानलेल्या कमिटीकडून ही शोभा झाली!

* * *

रेल्वेसुधारणा-कमिटीच्या रिपोर्टाच्या नांवावर येत्या आठवड्याच्या रोजनिशींत तीन दिवस टाकले होते. पण तें काम आतां तास दोन तासांत उरकण्याचा संभव दिसतो, व तसें झालें म्हणजे ता. ३ पासून ता. १० पर्यंत असेंब्लीला जवळ जवळ सुटीच मिळणार असें वाटतें. त्यानंतर येणार **ली कमिशनचा रिपोर्ट.** त्याचें पत्रकवाचन गेल्या जून महिन्यांत थोडेंबहुत झालें. त्यांत खडाष्टक, एकनाड, वगैरे अनेक कुयोग दिसून आलेच. पण तेव्हां ती चर्चा थांबून, आतां ती निघाली म्हणजे कमिशनच्या रिपोर्टावर सडकून ताशेरा झडल्याशिवाय राहत नाहीं हें सरकारास कळून चुकलें आहे. वास्तविक सिव्हिल सर्व्हिसेसकरितां योजलेल्या पक्वान्नांचें रांधण तयार होऊन

बसलेंच आहे व असेंब्लीनें कांहीं केलें तरी तें त्यांच्या तोंडांत पडणारच आहे. परंतु हें पक्कान्नाचें जेवण उघड्यांत बसून जेवावें लागतें. त्यामुळें दृष्टिदोष घडतो व पाहणाराची दृष्ट लागून एखाद्या खात्याच्या पोटांत मळमळण्याचाहि संभव. म्हणून ही पक्कानाची मेजवानी पाहणारांनीं एक आपले डोळे तरी झांकून घ्यावे किंवा ते उघडे ठेविले तर आनंदानें भोजनाला परवानगी द्यावी, येवढ्याच हेतूनें हा विषय असेंब्लीपुढें ठेवण्यांत आलेला आहे. आतां असेंब्लीनें कितीहि त्रागा केला तरी ली रिपोर्टानें गोऱ्या सिव्हिलियनांकरितां तयार केल्यापैकीं एक लाडू देखील कमी होण्याचा संभव नाहीं. तरी पण असेंब्लीच्या वादांत जी धूळ उठेल ती या लाडवांवर दाट बसून त्यांची रुचि थोडी बिघडेल व वादांतील खकाण्यानें खाणाराच्या तोंडाला सुटलेल्या पाण्याबरोबर नाकांतूनहि पाणी वाहण्याचा संभव आहे!

* * *

ली रिपोर्टाची चर्चा झाली कीं मग सांगण्यासारखें सरकारी काम असें फारसें शिल्लक उरत नाहीं. मग खासगी सभासदच, त्यांना मिळालेल्या दोन चार दिवसांतच, काय धुमाकूळ घालतील तो खरा. पैकीं ता. १६ व ता. २३ असे दोन दिवस खासगी बिलांना दिले जातील. या खेपेस खासगी बिलें बरींच पाठविण्यांत आलीं आहेत. पैकीं सोळा तारखेकरितां सोडतीच्या पेटींत एकंदर वीस चिठ्या टाकल्या. त्यांत आठ-नऊ चिठ्या स्वराजिस्टांच्या नांवाच्या निघाल्या. श्री. केळकर यांनीं दोनच बिलें पाठविलीं होतीं. सोडतीच्या यादीवर त्यांना पुष्कळ खालची जागा मिळाली होती. पण चिठ्या काढल्या त्यांत त्यांच्या एका बिलाला पहिली व एका बिलाला तिसरी जागा मिळाली. याचा अर्थ त्यांना तीं बिलें सदर एकाच तारखेला पुढें मांडतां येतील. सोडतीच्या वेळीं केळकर जातीनें हजर नव्हते. तेव्हां हजर असलेल्या लोकांनीं केळकरांना पहिला व तिसरा नंबर मिळालेला पाहून "अरक्षितं तिष्ठति दैवरक्षितं" असे उद्गार विनोदानें काढले म्हणतात. या दोहोंपैकीं सोसायटीज् रेजिस्ट्रेशन बिल हें फारसें वादग्रस्त नाहीं. पण पासपोर्ट बिलाला मात्र सरकार कसून विरोध करणार आहे. किंबहुना त्या बिलाची चिठी सोडतींत निघाली तरी 'गव्हर्नर जनरलांनीं अद्यापि परवानगी द्यावयाची आहे' असा शेरा त्याजवर पडला आहे. १६ तारखेपूर्वीं हा शेरा निघून जातो का त्यांचेंहि भांडण करावें लागतें हें दिसून येईल.

* * *

ता. ३ रोजीं म्हणण्यासारखें कांहींच काम नसल्यामुळें सभेचें काम १ वाजण्यापूर्वींच संपलें. त्यापूर्वीं भरपूर काम ठेवीत नाहीं तर इतक्या आधीं आम्हांला कामधाम सोडून कां बोलावतां व बोलाविलेंच तर आतां खासगी कामाला अधिक दिवस कां देत नाहीं अशी पंडित मोतिलाल नेहरू यांनीं व इतरांनीं तक्रार केली. सरकारतर्फे असें सांगण्यांत आलें कीं, आठवड्याचें पांच दिवस व वर्षाचे ५२ आठवडे, इतके दिवस चर्चा चालली तरी न संपण्याइतके ठराव तुम्ही लोक पाठवितां, तेव्हां तुम्हांला आणखी दोन दिवस दिले काय न दिले काय सारखेंच. पण सर मुडिमन यांनीं ता. २४ रोजीं बैठक संपण्यासारखी आहे असें पूर्वीं सांगितलें असल्यावरून व 'आम्ही त्यापुढेंहि राहण्यास तयार आहों' असें कांहीं सभासदांनीं सांगितल्यावरून अध्यक्षांनीं मध्यस्थी केली व त्यामुळें खासगी ठरावांना आणखी एकदोन दिवस मिळण्याचा संभव दिसतो. या तीन-चार दिवसांत मिळून खास स्वराज्य पक्षाचे असे पांच-सात ठराव तरी मंजूर व्हावेत असा अदमास आहे.

* * *

येत्या सोमवारीं फॅक्टरीज बिल, पोस्टल् ॲक्ट अमेंडमेंट बिल, एक्सपोर्ट-इंपोर्ट ड्यूटी बिल इत्यादि बिलें विचाराकरितां पुढें येणार आहेत. त्यावरहि उपसूचना बऱ्याच आहेत. त्यानंतर बुधवार ता. १० रोजीं ली कमिशनच्या वादास तोंड लागेल. पंडित मोतिलाल नेहरू यांनीं सरकारी ठरावास विरोधक अशी उपसूचना पाठविली आहे व तींत सिव्हिल सर्व्हिसची भरती यापुढें इंग्लंडांत करूं नये, पब्लिक सर्व्हिस कमिशनची रचना ठरविण्याकरितां एक कमिटी नेमावी वगैरे सूचना आहेत. स्वतंत्र पक्षाची आतां संघटना झाली असून तो पक्षहि ली कमिशनच्या रिपोर्टाला विरोध करण्यांत स्वराज्य पक्षाबरोबर सहकार्य करील असा अंदाज आहे.

## पत्र नं. २

ता. १६-९-२४.

ता. ३ रोजीं असेंब्लीची बैठक झाल्यापासून आजतागायत अवघे चारच दिवस काम झालें. त्यांतूनहि ता. ३ व ८ रोजीं दोन दोन तासांतच काम उरकलें. परवांपासून ली कमिशनवरील चर्चा सुरू झाली असल्यामुळें काम जरा भरपूर चालेलसें वाटतें इतकेंच. ता. ८ रोजीं दोन सरकारी बिलें कांहींशा

महत्त्वाचीं अशीं पुढें आलीं. एक बिल कापसाचे जिन प्रेस यांत कापसाची भेसळ होते ती होऊं नये याकरितां कारखानदारांवर कांहीं नियम सक्तीनें लादण्यासंबंधाचें होतें. त्याला मध्यभागातर्फे डॉ. लोहोकरे व सरदार मुतालीक यांनीं व वऱ्हाड प्रांतांतर्फे श्री. माधवराव अणे यांनीं विरोध केला. विरोध करण्याचें कारण असें कीं, हें बिल सिलेक्ट कमिटीकडे एकदम जावें असा सर चार्लस इन्नेस यांचा इरादा होता. परंतु सिलेक्ट कमिटीच्या टांकसाळींत रुपें गेलें कीं त्याचें नाणें पडण्याला वेळ लागत नाहीं, व ज्या ज्या प्रांतांत कापसाचा व्यापार चालतो त्यांतील कारखानदारांना तर या बिलाची गंध-वार्ताहि नाहीं. म्हणून बिल सिलेक्ट कमिटीकडे न पाठवितां प्रांतानिहाय लोकप्रतिनिधींचीं मतें घेण्याकरितां आधीं पाठवावें अशी श्री. अणे यांनीं उपसूचना आणली व तिजवरील भांडण मतें घेण्यापर्यंत जाऊन बहुमतानें श्री. अणे यांची उपसूचना मंजूर झाली.

* * *

या वादांत सर पुरुषोत्तमदास यांनीं गिरणीवाल्यांची व श्री. अणे यांनीं कारखानदार व शेतकरी यांची बाजू घेतली होती. परंतु सर पुरुषोत्तमदास यांनींहि अखेर उपसूचनेलाच अनुकूल मत दिलें. तरी आतां कारखानदार लोक या बिलाचा नीट विचार करून आपापलीं मतें असेंब्लींतील प्रतिनिधीं-कडे पाठविण्याची हयगय करणार नाहींत अशी आशा आहे. कापसाची भेसळ खरोखर कोण व कोठें करतो, या भेसळांमुळें शेतकऱ्यांचें नुकसान होतें कीं गिरणीवाल्यांचें नुकसान होतें, व नव्या कायद्यानें घालण्यांत येणारे नियम कारखानदारांना कितपत जाचक व कितपत उपकारक होतील हे या वादांतील मुख्य मुद्दे आहेत. यापूर्वीं कॉटन ट्रान्सपोर्ट ॲक्ट नांवाचा कायदा झाला; त्याचा तरी खरा उपयोग शेतकऱ्यांना किती झाला, हाहि प्रश्न हल्लींच्या वादांत उपस्थित होणार आहे. तरी या प्रश्नाची वर्तमानपत्रांतून योग्य वेळीं सांगोपांग चर्चा व्हावी म्हणजे येत्या जानेवारी-फेब्रुवारींत दिल्लीस फिरून हा प्रश्न निघेल तेव्हां असेंब्लींतील सभासदांना या चर्चेचा पुष्कळ उपयोग होणार आहे.

* * *

दुसरें बिल लॅंड कस्टमच्या म्हणजे खुष्की मार्गावरील जकातीच्या संबंधाचें. हें बिल समुद्रावरील जकातीच्या १८७८ च्या कायद्याच्या आधारेंच

बनविण्यांत आलेलें असल्यामुळें एकाच बैठकींत त्रिवार वाचन करून बिल मंजूर करावें असा सर बेसिल ब्लॅकेट यांनीं डाव घातला होता. परंतु त्याला श्री. जम्नादास मेहता यांनीं जोराचा विरोध करून सिलेक्ट कमिटी नेमण्याची उपसूचना केली व ती सर बेसिल यांना अखेर मान्य करावी लागली. यांतील वादाचा मुद्दा असा होता कीं, देशांतल्या देशांत अनेक हिंदी संस्थानें असल्यामुळें सरकार या बिलाचा तसा उपयोग करून अनेक संस्थानांच्या सरहद्दींवर जकातीचीं नाकीं बसवील कीं काय? व तसें झाल्यास काठेवाडांतील प्रवाश्यांना अतिशय त्रास होईल तो होणें जरूर आहे कीं काय? यावर सर बेसिल यांनीं असें आश्वासन दिलें कीं, मलाया, बलुचिस्थान, पांडेचरी, चंद्रनगर वगैरेंच्या सरहद्दींवरच हीं जकातीचीं नाकीं बसविण्याचा आमचा विचार आहे. कारण कलाबतू, सॅकरीन वगैरे मौल्यवान् पदार्थ या सरहद्दींवरून आल्यानें जकातीचें नुकसान होतें; परंतु काठेवाड, बडोदें, हैदराबाद, अशा संस्थानांच्या हद्दींवर नाकीं बसविण्याचा आमचा विचार नाहीं.

जम्नादास मेहता यांनीं, विरमगांव येथें दहाबारा वर्षें जकातीचा कसा त्रास झाला व सत्याग्रहापर्यंत कशी मजल आली याची आठवण दिली व तिचा उपयोग होऊन बिल सिलेक्ट कमिटीकडे पाठविण्यांत आलेंच; पण शिवाय कमिटींत जम्नादास, केळकर, पटेल वगैरे स्वराज्यपक्षीय सभासद निवडले गेल्यानें मूळच्या बिलांत आणखीहि योग्य त्या दुरुस्त्या होण्याचा संभव आहे. एक सुधारणा अशी कीं, समुद्रावरील जकातीच्या कायद्यांत जकात चुकवून माल आणल्याबद्दल जे दंड वगैरे सांगितले आहेत ते दंड करण्याचा अधिकार कस्टम कलेक्टरला दिलेला असतो. परंतु अशानें कित्येक वेळां जुलूम होतो म्हणून तो अधिकार फौजदारी न्यायकोर्टाकडे द्यावा अशी सूचना पटेल व केळकर यांनीं आपल्या भिन्न मतपत्रिकेंत नमूद केली आहे. सरहद्दीवरील दोहों बाजूंचे लोक जवळ जवळ राहून एकमेकांत व्यापार वगैरे करतात; याकरितां बिनजकातीचा माल हवा तेथून न्यावा व फक्त जकात देणारा माल तेवढा नाक्यांवरून न्यावा अशीहि एक उपसूचना केळकर यांनीं मांडली आहे. तथापि अखेर भरसभेंत काय होतें तें पाहणें आहे.

* * *

रेल्वे खातें व त्याचा पैसा हा इतर खात्यांपासून वेगळा करण्याची सरकारी सूचना कमिटीनें नामंजूर केल्याचें मागील पत्रांत लिहिलें होतें. पण या

आठवड्यांत या बाबतींत पुरी चलबिचल झाली. कारण सरकारनें कांहीं सभासदांना गांठून वेगवेगळा उपदेश केला. पूर्वीच्या कमिटीचें प्रोसीडिंग लिहून पक्कें केलें नव्हतें. तेव्हां फिरून कमिटी बोलावण्याचा सरकारचा डाव बराच साधला व अखेर पांचसहा माणसेंच मूळच्या विरोधाला खडीं उभीं राहिलीं. यामुळें हा प्रश्न फिरून मोठ्या आशेनें येत्या पंधरा तारखेस सरकार पुढें आणणार आहे. इकडे कौन्सिल ऑफ स्टेटमध्यें सरकारच्या एका मानसपुत्रानें अशी सूचना काल पुढें आणली कीं, जी. आय. पी. व ई. आय. आर. या दोन आगगाड्या लवकरच सरकारच्या मालकीच्या होणार; त्या फिरून एखाद्या कंपनीला विकत किंवा भाड्यानें द्याव्या. पण सरकारची सरकारलाच याबद्दल लाज वाटून रेल्वे खातें इतर खात्यांपासून अलग होईपर्यंत या गोष्टीचा विचार करतां येत नाहीं असें सर चार्लस इन्नेस यांनीं उत्तर दिल्यावर या मानसपुत्रानें हा ठराव मागें घेतला ! सरकारला हवे ते ठराव सरकारच्या स्फूर्तीनें पुढें आणण्याचें एक सुरक्षित स्थान म्हणजे कौन्सिल ऑफ स्टेट होय. आणि कोणतेंहि कार्य आपल्या मनासारखें करून घेण्याचा सरकारचा प्रयत्न किती बारकाईनें सुरू असतो व अशा कामाला त्यास हस्तकहि कसे योग्य मिळतात हें यावरून दिसून येईल.

* * *

पक्षसंघटनेच्या दृष्टीनें पाहतां, राष्ट्रीय पक्ष या खेपेस फुटणार अशी जी शंका कित्येकांना आली होती ती निराधार ठरली. कारण स्वराज्य पक्ष व स्वतंत्र पक्ष असे दोन उपपक्ष वेगळे बनलेले असले तरी दोहोंचा मिळून एक राष्ट्रीय पक्ष एकमतानें काम करण्यास तयार आहे हें ली कमिशनच्या ठरावासंबंधानें दृष्टोत्पत्तीस आलें. कारण या विषयावर बराच मतभेद असला तरी स्वराज्य पक्षाचे पुढारी पंडित मोतिलाल नेहरू यांनाच या प्रश्नावर मुख्य उपसूचना पाठविण्याचा अधिकार राष्ट्रीय पक्षानें दिला; व मुदत न जावी म्हणून ज्या कित्येकांनीं आपल्या नांवानें स्वतंत्र उपसूचना पाठविल्या होत्या, त्या मागें घेण्याचें आनंदानें कबूल केलें. यामुळें ली कमिशनच्या शिफारसी मंजूर कराव्या असा मुख्य ठराव सरकारतर्फे सर अलेक्झँडर मुडिमन यांनीं मांडल्यानंतर मुख्य उपसूचना मांडण्याचा मान अध्यक्षांनीं पं. मोतिलाल नेहरू यांनाच दिला. पंडितजींचें भाषण सुमारें सवा तास नेहमींसारखें स्पष्ट व वकिली

थाटाचें झालें. असेंब्लीचे पुढारी या नात्यानें त्यांचा दर्जा पूर्ण प्रस्थापित झाल्याचा आणखी एक पुरावा हल्लींच्या या प्रसंगानें मिळालेला आहे.

* * *

काल व परवां दोन दिवस या विषयावरील चर्चा मोठी मनोरंजक झाली. असेंब्लीच्या दर एक बैठकींत कोणत्या तरी एका विषयाला विशेष महत्त्व येतें व त्यावरील चर्चेच्या दिवसांत इमारतीच्या खालच्यावरच्या सर्व गॅलऱ्या भरून जाऊन तोबा उडतो. तशी स्थिति या प्रसंगींहि झाली आहे. दिल्लीस स्वराज्याच्या मागणीच्या ठरावाच्या वेळीं लोकांत जी उत्सुकता दिसून आली तीच आज ली कमिशनरच्या ठरवावरहि दिसून येत आहे. एका दृष्टीनें हें उचितच आहे, कारण स्वराज्याचा प्रश्न व सिव्हिल सर्व्हिसचा प्रश्न हे एकांत एक इतके सांधले गेले आहेत कीं, एक सुटल्याशिवाय दुसरा कायमचा सुटणें शक्यच नाहीं. दिल्लीस स्वराज्याच्या ठरावावर चर्चा होत असतां सिव्हिल सर्व्हिसवर शिंतोडे उडत होते ते अप्रत्यक्ष होते; पण प्रस्तुतच्या चर्चेत सिव्हिल सर्व्हिसवर थेट आघाडीनें हल्ला करण्याचा प्रसंग असल्यामुळें उत्तरें-प्रत्युत्तरें चुरचुरीत होतात. राजकारण हा पोटापाण्याचा प्रश्न असूं शकतो किंवा उलट पोटापाण्याच्या प्रश्नाला राजकारणाचें स्वरूप येऊं शकतें ही गोष्ट या चर्चेत प्रामुख्यानें नजरेस येत आहे. सर ए. मुडिमन यांनीं सिव्हिल सर्व्हंट लोकांना 'भाडोत्री' म्हटल्याबद्दल बराच राग दाखविला पण पगारी नोकरांना 'भाडोत्री' म्हटलें न म्हटलें तरी नोकरासारखेच आम्ही लेखणार असा खडखडीत जबाबहि या वादांत त्यांना मिळाला आहे!

* * *

हें सर्व ठीक चाललें आहे. तथापि या विषयावर अखेर मतें घेतां कसा काय निर्णय होतो याविषयीं किंचित् चिंता उत्पन्न झाली आहे. त्याचें कारण असें कीं, सुधारणा-चौकशी-कमिटीपुढें साक्षी देतांना, कित्येक साक्षीदारांनीं असें तत्त्व प्रतिपादलें कीं, खऱ्या राष्ट्रीय दृष्टीनें पाहतां जातवार मतदारसंघ असणें योग्य नाहीं. वास्तविक या साक्षीदारांत स्वराज्य पक्षीय असा एकहि नव्हता. तथापि नेहमीं कावऱ्याबावऱ्या दृष्टीनें पाहणाऱ्या संशयग्रस्त मुसलमानांना डिवचण्याला हें एक आयतें साधन सरकार पक्षाला मिळालें. यामुळें त्यांनीं मुसलमानांच्या नाकांत अशा थापेची सुंठ फुंकली कीं, "ही पाहा स्वराज्यपक्षाची इमानदारी! तुम्हांला अधिक हक्क देण्याचें

बाजूसच राहिलें पण तुमचा जातवार मतदारीचा हक्कहि ते काढून घेऊं पाहतात." झालें, या नुसत्या बातमीनें मुसलमान सभासदांत चलबिचल होऊन त्यांनीं खास आपल्या लोकांची अशी सभाहि भरविली. परंतु लखनौप्रमाणें येथेंहि बॅ. जिना यांचा या कामीं बराच उपयोग झाला. ते स्वतंत्र पक्षाचे अध्यक्ष व मुसलमानांतील समंजस गृहस्थ, असें असल्यामुळें त्यांनीं आपल्या धर्मबंधूंना खरी स्थिति समजावून सांगितली असून तिचा चांगला परिणाम होईल असें वाटतें. शिवाय राष्ट्रीय पक्षाची सभा भरून तींत जातवार मतदारसंघाची व्यवस्था बदलण्याचा विचार आमच्या कार्यक्रमांत पूर्वी केव्हांहि नव्हता व हल्लींहि नाहीं असें त्यांना स्पष्ट आश्वासन देण्यांत आलें आहे. यामुळें ली कमिशनच्या शिफारशी फेटाळून लावण्याची पंडित मोतिलाल नेहरू यांचीच उपसूचना अखेर मंजूर होण्याची बरीच आशा वाटते.

## पत्र नं. ३

ता. २३।९।२४.

ली कमिशनवरील ठरावाचा कसा निकाल लागतो याविषयीं किंचित् चिंता वाटत असल्याचें मागील पत्रीं लिहिलें होतें, परंतु सत्याला मरण नाहीं म्हणतात, या न्यायानें चर्चा सुरू असतांच लोकपक्षाची बाजू अधिकाधिक सावरत गेली. पहिल्या दिवशीं होम-मेंबर सर मुडिमन यांचें वाचनमिश्रित भाषण घोडदौडीसारखें व गचाळ झालें. त्यांच्या ठिकाणीं सर माल्कम हेले यांची कुरेंबाजी व नटवेपणा नाहीं व प्रतिपक्षाला चिमटे घेण्याची बुद्धिहि थोडी कमी आहे. यानंतर मुख्य उपसूचना मोतिलाल नेहरू यांनीं मांडतांना बरेंच सौम्यपणाचें भाषण केलें. त्याचा परिणाम सरकार पक्षावरहि बराच झालेला दिसला. डॉ. लोहोकरे यांनीं पंडितजींच्या भाषणांतून वगळलेला विषय म्हणून सिव्हिल सर्व्हिसपैकीं वैद्यक खात्याचें गाऱ्हाणें विस्तृत रीतीनें सभेपुढें मांडलें. या कामीं हिंदुस्थानच्या निरनिराळ्या भागांतून डॉक्टरसंघाकडून त्यांनीं जीं मतें मागविलीं होतीं त्यांचा आधार त्यांना चांगला मिळाला. सर चार्लस इन्नेस यांचें भाषण नेहमींप्रमाणें, म्हणजे लवंग्या फटाक्यांचा सर सुटल्याप्रमाणें झालें. त्यांत त्यांनीं मुडिमन यांची उरलेली कुरेंबाजी भरून काढली.

* * *

पुढील दोन दिवसांच्या चर्चेत एकंदर सात युरोपियन सभासदांनीं भाषणें केलीं, त्यांत सर बेसिल ब्लॅकेट यांनीं मुख्य फडणिशी मुद्दा पुढें मांडला. तो असा कीं, ली कमिशनच्या शिफारशी मंजूर केल्यास सवा कोटीचा खर्च वाढणार खरा; परंतु तो सर्व प्रांतांवर मिळून वांटून जाणारा असल्यामुळें कोणत्याहि प्रांताला तें ओझें जड वाटण्यासारखें नाहीं, व या मुद्द्याचा परिणाम प्रतिपक्षाच्याहि मनावर तात्पुरता होण्यासारखा होता. परंतु या शिफारशींना खरी हरकत पैशाचे दृष्टीनें नसून ती राजकीय दृष्टीनेंच आहे, ही गोष्ट हिंदी वक्त्यांनीं पुढें स्पष्टपणें नजरेस आणली. युरोपियन सभासदांपैकीं पुण्याचे माजी कलेक्टर मि. हडसन यांचें भाषण मात्र मनुष्यस्वभावाच्या दृष्टीनें परिणामकारक झालें, आणि खर्चामुळें आम्हांला स्वदेशीं जातां येत नाहीं व कित्येक वर्षांत मुलांबाळांचें तोंडहि पाहावयास मिळत नाहीं, अशी जी केंविलवाणी तक्रार त्यांनीं केली ती हृदयस्पर्शी होती व तितक्यापुरताच सभेपुढें प्रश्न असतां तर ली कमिशनची ही शिफारस सभेनें मंजूरहि केली असती. पण वाळल्याबरोबर ओलेंहि जळतें या म्हणीप्रमाणें सिव्हिलियन लोकांच्या खोट्या तक्रारींबरोबर कांहीं खऱ्याहि निकालांत निघाल्यास त्याचा दोष लोकपक्षाकडे येऊं शकत नाहीं.

* * *

सरकारतर्फे झालेल्या भाषणांत सर नरसिंह शर्मा हे 'अर्थस्य पुरुषो दासः' या न्यायानें बोलले, व जें बोलले त्यांतहि त्यांनीं आपलें हसूं करून घेतलें, आणि कॅप्टन हिरासिंग हे जे दुसरे हिंदी गृहस्थ बोलले त्यांनीं खालीं उतरून तरवारीचे हात करून दाखवावयाचें तेवढेंच उरलें ! एरवीं त्यांनीं आपल्या लष्करी बाण्याचें नाटक इतकें केलें कीं, असला गृहस्थ आपली तरफदारी न करील तर बरें असें साहेब लोकांनाहि वाटूं लागलें ! याच्या खालोखाल एक डोळा गोऱ्या सिव्हिल सर्व्हंटांकडे व एक डोळा आपल्या हिंदी बांधवांकडे अशा थाटाचीं भाषणेंहि कांहीं झालीं. त्यांत सर शिवस्वामी अय्यर, सर चिमणलाल सेटलवाड व अबदुल कासम यांची गणना करावयास पाहिजे. कर्नल गिडने यांनीं शिवस्वामी व सेटलवाड यांच्याप्रमाणें सरकारतर्फेच मत दिलें तरी भाषण करतांना त्यांनीं सभासदांना वरचेवर असें विचारलें कीं, "मला तुम्हीं साहेब कां समजतां ? मला नेटिव्ह म्हणा, पण पदरांत घ्या." तेव्हां तें ऐकून त्यांची कींवच वाटली. वास्तविक हा एक प्रकारचा बहाणा होता.

कारण लाडूच्या वांटणींत गोऱ्यांना अधिक भाग मिळेल तेव्हां मी गोरा व काळ्यांना अधिक मिळेल तेव्हां मी काळा असें अँग्लो-इंडियनांचें धोरण असतें हें प्रसिद्धच आहे.

* * *

डॉ. दत्त हे ख्रिस्ती असूनहि त्यांनीं फार चांगलें भाषण केलें. किंबहुना विलायतेंतील अनुभव सांगून "ऑक्सफर्ड ही सिव्हिल सर्व्हिसकरितां राखीव शाळा आहे आणि हिंदुस्थान हें सिव्हिल सर्व्हिसकरितां राखीव कुरण आहे" असे उद्गार ऑक्सफर्डच्याच एका मोठ्या शिक्षकाचे म्हणून त्यांनीं प्रकट केले, तेव्हां राजनीतीच्या पोटांतील कपटाचें आंतडेंच बाहेर निघालें असें सर्व सभेला वाटलें. खास लोकपक्षातर्फे झालेल्या भाषणांत चेट्टी व जम्नादास यांचीं भाषणें चांगलीं झालीं. चेट्टी हे नुकतेच विलायतेस जाऊन आले असूनहि तिकडील मयसभेची भुरळ त्यांच्यावर पडली नाहीं हें पाहून सभासदांना बरें वाटलें. जम्मनादास यांनीं असे उद्गार काढले कीं, ली कमिशनचा रिपोर्ट पाहतां सिव्हिल सर्व्हिसच्या लोकांना जिवंतपणीं फुकट खानावळी व मेल्यावर दफनविधीचा खर्च इतक्याच सवलती देण्याचें आतां बाकी उरलें आहे. पटेल यांनीं अर्थात् सर्वांवर ताण केली व ती ते न करतील तर ते पटेलच नव्हत. टाकून बोलण्याचें काम त्यांच्याइतकें इतर कोणासच साधत नाहीं. पंडितजी किंवा जम्नादास टाकून बोलले तरी त्यांत चुकून भलेपणाची झांक क्वचित् उमटतेच. परंतु निर्भेळ किंवा वस्त्रगाळ निंदा हवी असेल तर ती पटेल यांजकडूनच मिळूं शकेल. किंबहुना असा एखादा विषय निघाला म्हणजे पटेलसाहेबांचा मंत्रपुष्प झाल्याशिवाय वाद पुरा होऊं नये असें उभयपक्षहि मानून चालतात. अखेर सात वाजतां म्हणजे ठरल्याप्रमाणें रोषनाईच्या रंगांत मतें मोजण्यांत आलीं, तेव्हां ६८ विरुद्ध ४६ मतांनीं ली कमिशनचा रिपोर्ट नामंजूर झाला व युरोपियन लोक दांतओठ चावीत सभागृहांतून बाहेर पडले!

* * *

ली कमिशनच्या शिफारशी असेंब्लींत अशा रीतीनें फेटाळल्या गेल्यानंतर सोमवार, ता. १५ रोजीं कौन्सिल ऑफ स्टेटमध्यें सरकारी ठरावरूपानें त्या चर्चेस निघाल्या. सरकारी ठरावावर सर सर्वाधिकारी व ना. करंदीकर यांच्या, हा विचार पुढें ढकलण्याबद्दल, उपसूचना होत्या. श्री. दादासाहेब खापर्डे

यांचीहि एक उपसूचना होती. कौन्सिल ऑफ स्टेटमध्यें सरकारचा ठराव पास होणार हें ठरलेलेंच असल्यामुळें, लोकपक्षाची बाजू भाषण करून कौन्सिलपुढें मांडण्याचा, उपसूचना पाठविणारांचा मुख्य हेतु होता व तो त्यांनीं साधला. कौन्सिल ऑफ स्टेट या बड्या लोकांच्या सभेंत बेताबेतानें व अदबीनें भाषणें चालतात. पण श्री. दादासाहेब करंदीकर यांनीं आपल्या जोरदार भाषणांत असेंब्लींत झालेल्या वादविवादाचा प्रतिध्वनि तेथें स्पष्ट उमटविला. "सिव्हिल सर्व्हिस ही हिंदुस्थानाकरितां आहे, हिंदुस्थान हें कांहीं सिव्हिल सर्व्हिसकरितां खास नव्हे; ज्यांना आपल्या स्वतःच्या संसारांतील जमाखर्चाची तोंडमिळवणी करतां येत नाहीं ते सिव्हिल सर्व्हंट हिंदुस्थानचा कारभार कसा चालविणार ? इंग्लंडांतून इकडे येतांना आपलें व्यवहारज्ञान हे लोक तेथेंच विसरून येतात कीं, काय ?" अशा तऱ्हेचीं करंदीकरांच्या भाषणांतील वाक्यें कौन्सिल ऑफ स्टेटच्या शांतपणें चालणाऱ्या कुजबुजींत कर्कश वाटली असल्यास नवल नाहीं. जी. आय्. पी. व ई. आय्. आर. या रेल्वे पुन्हा एखाद्या कंपनीकडे देण्यासंबंधानें असाच एक सरकारप्रेरित ठराव आला असतां श्री. करंदीकर यांनीं त्याविरुद्ध भाषण करून तोहि फेटाळून लावला. असो. क्रेरार यांनीं मांडलेला ठराव मतें न मोजतांच जरी मंजूर झाला तरी असेंब्लीनें ली रिपोर्टावर जो नामंजुरीचा शिक्का मारला तो कौन्सिल ऑफ स्टेटच्या या ठरावानें पुसटला जात नाहीं; आणि गेल्या खेपेच्या बजेट-नामंजुरीपासून तरी अशी म्हणच पडून गेली आहे कीं, "असेंब्लीसे गयी तो कौन्सिल ऑफ स्टेटसे आती नहीं."

* * *

असेंब्लींत ता. १५ रोजीं कांहीं सरकारी बिलांचा विचार झाला. पैकीं इंपीरिअल बँकेनें अडचणीच्या प्रसंगीं इतर बँकांना पैशाची मदत करण्यासंबंधाचें बिल विचाराला निघालें; तेव्हां या इतर बँकांत को-ऑपरेटिव्ह बँकांचाहि समावेश व्हावा किंवा नाहीं हा प्रश्न निघून त्यावर बराच वाद झाला आणि राष्ट्रीय पक्ष किंवा स्वराज्य पक्ष यांतील सभासदांनीं अमुकच प्रकारचें मत द्यावें असा निर्बंध नसतांहि ४६ वि. ४५ मतांनीं को-ऑपरेटिव बँकांच्या समावेशाची उपसूचना मंजूर झाली. या पराभवानें उद्विग्न होऊन सगळें बिलच सरकारतर्फे परत घेतलें जाईल असा रंग एक वेळ दिसला; परंतु हा धाक व्यर्थ होता व शेवटीं सर बेसिल ब्लॅकेट यांना मूग गिळून उपसूचनेसकट बिलाला

मंजुरी मागावी लागली व ती देण्यांत आली. ता. १६ हा दिवस खासगी बिलाकरितां देण्यांत आला होता व बिलेंहि कांहीं थोडींथोडकीं नव्हतीं. परंतु पूर्वींच्या बैठकींत पहिलें वाचन होऊन सिलेक्ट कमिटीकडे जाण्याकरितां अझून बसलेलीं बिलेंहि शिल्लक होतीं व त्यांपैकींच एकदोघांनीं अनपेक्षित रीतीनें सर्व वेळ खाल्ला. पहिलें बिल डॉ. गौर यांचें हिंदु धार्मिक ट्रस्ट यासंबंधाचें होतें. यावर चोहोंकडून मतें मागविलीं होतीं. त्यांत प्रतिकूल अशींच पुष्कळ होतीं व सरकारनें स्वतः तटस्थपणा राखला होता. चर्चा सुरू झाली तेव्हां श्री. बेळवी यांनीं बिलाला कसून विरोध केला व सांगितलें कीं, असल्या बिलाविणें कोणाचें कांहीं अडलेलें नाहीं. फार तर प्रत्येक प्रांतानें आपापलें बिल पुढें आणून वाटेल तशी व्यवस्था करून घ्यावी. मध्यम सुधारक पक्षानें या बिलाला संमति दिली; परंतु आश्चर्य हें कीं, पुराणमतवादी पंडित मदन मोहन यांनीं देखील बिल सिलेक्ट कमिटीकडे जाण्यास हरकत नाहीं असा अभिप्राय दिला! मद्रासकडील सभासद काय बोलतात याकडे पुष्कळांचें लक्ष होतें, परंतु मोठमोठाले मठ-देवस्थानें वगळून इतरांना मात्र हा कायदा लावावा असें मात्र जेव्हां त्यांनीं प्रतिपादन केलें तेव्हां त्यांचें धोरण दुटप्पी आहे असें दिसलें. यामुळें बिल सिलेक्ट कमिटीकडे जाणार व परत दुरुस्त होऊन आलें म्हणजे पासहि होणार असा अंदाज दिसूं लागला. पण डॉ. गौर यांनीं आपल्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें सरकारी विरोधाला भिऊन व दिवसाचा निमा वेळ खर्च करून बिल पुढें ढकलण्याची सरकारी सूचना स्वतःच स्वीकारली!

* * *

उरलेली दुपारची वेळ डॉ. गौर यांच्या क्रिमिनल लॉ अमेंडमेंट ॲक्ट रद्द करण्याच्या बिलानें घेतली, पण ती सर्वस्वीं सार्थकीं लागली. क्रि. लॉ अमेंडमेंट ॲक्ट म्हणजे समितीचा कायदा म्हणून प्रसिद्धच आहे. त्यांतील पहिला भाग पूर्वींच रद्द झालेला असून दुसराहि भाग रद्द व्हावा अशा अर्थाचें हें बिल होतें व त्यावर ठरल्याप्रमाणें हटातटाचें वाग्युद्ध झालें. गौर यांनीं बिलाचा इतिहास सांगितल्यावर सर मुडिमन यांनीं भाषण केलें. त्यांत ठराविक पद्धतीनें बंगाल्यांतील खून, दरवडे वगैरेंचे कागदी मुखवट्यांचे राक्षस पुष्कळच नाचविले; परंतु त्यांचे योगानें कोणीहि भ्यालें नाहीं. मुख्य मुद्दा, एका हेतूनें

कायदा केला व दुसऱ्या कार्याकरितां उपयोगांत आणला असा होता त्याला सरकारतर्फे झालेल्या भाषणांत कोणीच उत्तर दिलें नाहीं. तें देणार तरी कसें? कारण गुप्त कट व खुनी डाकू यांच्याकरितां केलेला कायदा दास, नेहरू, लजपतराय यांच्यासारख्या सज्जनांना डांबून त्यांना कैदेंत घातलें त्याचें समर्थन सरकार पक्ष झाला तरी कसें करूं शकणार? या खेपेस सरकारतर्फे कौन्सिलच्या कोणा तरी एका सभासदानें बोलावयाचें तें काम नामदार चतर्जी यांजकडे आलें व त्यांनीं उसन्या वकिलीचें प्रदर्शन करावयाचें तसेंच केलें. त्याला जिना यांनीं खरपूस उत्तर दिलें. जिना यांच्या भाषणाचा खरपूसपणा अर्थांत किंवा शब्दांतहि फारसा नसतो. पण सरकारपक्षीय सभासदांना प्रसंगविशेषीं तुच्छतादर्शक बुद्धीनें वागविण्याची जी हातोटी त्यांना साधली आहे तिचा या वेळीं पूर्ण उपयोग करण्यांत आला होता.

* * *

ली कमिशनवरील भाषणांत नेमस्तपणाचा आलेला आरोप या विषयावरील भाषणानें पंडित मोतिलाल नेहरू यांनीं पुरा धुऊन टाकला व सरकारला उघड बजावलें कीं, " हा कायदा मोडून मी एकदां तर तुरुंगांत गेलोंच आहें आणि माझ्या प्रांताला तो पुन्हा लावा म्हणजे मी तो पुन्हा मोडून तुरुंगांत जातों कीं नाहीं तें पाहा ! " कॉंग्रेस व्हॉलंटियर लोकांना या कायद्यानें अपराधी ठरविल्याचा गुन्हा पंडित मालवीय यांनीं सरकारच्या गळ्यांत बांधला, तेव्हां त्याला कांहींच उत्तर मिळालें नाहीं. नागपूरचे बॅ. अभ्यंकर यांनीं या चर्चेत भाग घेण्यापूर्वी भाषणें बेताबेतानें चालू होतीं. परंतु त्यांचें भाषण नेहमींच्या पद्धतीनें जोराचें झाल्यापासून जोराच्या भाषणाचा एक प्रकारचा शिरस्ताच पडल्यासारखाच होऊन आवेश अधिकाधिक भरत गेला; व एकंदर चर्चेचा परिणाम असा झाला कीं, अखेर ७१ विरुद्ध ३९ इतक्या प्रचंड बहुमतानें डॉ. गौर यांच्या बिलाच्या दुसऱ्या वाचनाला असेंब्लीची संमति मिळाली. दिल्ली येथील स्वराज्यविषयक मागणीच्या ठरावानंतर एवढ्या मोठ्या बहुमतानें असा सरकारचा पराभव याच वेळीं झाला आणि ली कमिशनच्या वेळीं सरकारतर्फे मतें देणारे सर चिमणलाल, सर शिवस्वामी अय्यर, अबुल कासम इत्यादि नेमस्त सभासदांनींहि या वेळीं लोकपक्षातर्फे मतें नमूद केलीं.

* * *

ता. १७ रोजीं रेल्वे खातें वेगळें काढण्यासंबंधानें सरकारी ठरावावर सबंध दिवसभर चर्चा झाली, परंतु अखेर निर्णय त्या दिवशीं लागला नाहीं. लोकपक्षाचे सभासद म्हणजे स्वराजिस्ट व नेमस्त मिळून सर्व अडून बसले व कांहीं केल्या हार जात नाहींत असें पाहून सर चार्लस इन्नेस यांनीं तडजोडीची म्हणून एक उपसूचना अखेर आणली. परंतु एक तर वेळ होऊन गेली व विचाराला अवकाश पाहिजे म्हणून सर पुरुषोत्तमदास यांनीं तहकुबी मागून घेतली व हा विषय फिरून उद्यां म्हणजे ता. १९ रोजीं चर्चेला निघेल तेव्हां अखेर निकाल काय होतो तो तारेनें कळेलच. (हा तडजोडीचा ठराव ता. २० रोजीं एकमतानें पास झाला.) तात्पर्य, या आठवड्यांत लोकपक्षानें सरकाराचा तीन वेळां पराभव करून ली-कमिशन व क्रिमिनल लॉ अमेंडमेंट या दोन महत्त्वाच्या बाबतींत बरेंच यश मिळविलें. यामुळें खासगी सभासदांचीं सर्व बिलें मागें पडलीं तरी त्याचें विशेष कोणास वाईट वाटत नाहीं! यांतील खऱ्या राजकीय स्वरूपाचीं अशीं बिलें रंगास्वामी अय्यंगार, पटेल व केळकर यांचीं होतीं. पैकीं पहिल्या दोहोंना सरकारी परवानगीचा गुंता नसल्यामुळें तीं पुढच्या बैठकींत निघूं शकतील. परंतु अग्मासाप्रमाणें केळकर यांच्या पासपोर्ट बिलाला सरकारी परवानगीची हरकत घेण्यांत आलेली आहे व या बाबतींत हिंदुस्थान सरकार व स्टेट-सेक्रेटरी यांचा पत्रव्यवहार सुरू झाला असून त्याचा निकाल लवकरच कळविण्यांत येईल असें केळकर यांस सांगण्यांत आलें आहे. असो. आज दोन प्रहरीं खासगी सभासदांचे कांहीं ठराव चर्चेला निघणार आहेत. परंतु त्या कामीं ज्या त्या सभासदांनीं आपापल्या मताप्रमाणें अभिप्राय द्यावेत, त्या कामीं पार्टी कांहीं बंधन घालूं इच्छित नाहीं असें सर्वांना सांगण्यांत आलेलें आहे. यामुळें सरमिसळ गडी घेऊन क्रिकेटचा डाव खेळतात तसा खेळीमेळीचा प्रकार व अखेर विचित्र प्रकारचे निकाल पाहण्याचा हा एक योग बरेच दिवसांनीं आलेला आहे.

* * *

या आठवड्यांत मिसेस बेझंट या सिमल्यास येऊन गेल्या. त्यांनीं प्रत्येक पक्षाच्या प्रमुख पुढाऱ्यांच्या वेगवेगळ्या भेटी घेतल्या व त्यानंतर ता. १५ रोजीं डेप्युटी प्रेसिडेंट रंगाचारियर यांच्या कचेरींत ११ निमंत्रित प्रतिनिधींची व बाईंची चर्चा झाली. राष्ट्रीय सभेचें स्वरूप पूर्वीसारखें मुख्यतः राजकीय राहील तरच सर्व पक्षांचा समेट होऊन सर्व त्यांत सामील होतील व महात्मा गांधी यांच्या हल्लींच्या धोरणाप्रमाणें तसें होणें कठीण

दिसत असलें तरी कांहीं पुढाऱ्यांनीं त्यांना प्रथम खासगी भेटून व या महिनाअखेर मुंबईस लहानशी कॉन्फरन्स भरवून या प्रश्नाचा विचार करावा असें सामान्यतः ठरलें. महात्मा गांधी यांना सिमल्यास बोलाविलें असतां ते खासगी विचारविनिमयाकरितां येऊं शकतील असें समजलें होतें. परंतु जागा व वेळ हीं दोनहि या कार्यास फारशीं सोईचीं न वाटल्यावरून वरील योजना ठरविण्यांत आली असें म्हणतात.

## पत्र नं. ४

शुक्रवार ता. १९ रोजीं लँड कस्टम्स बिल व प्रॉव्हिडंट फंड बिल हीं निकालांत निघालीं. लँड कस्टम्स बिलाला पटेल व केळकर यांनीं एकदोन उपसूचना दिल्या होत्या. पैकीं एक उपसूचना सिलेक्ट कमिटींत अध्यक्षांच्या एका मतानेंच नामंजूर झालेली होती, व तिजमध्यें गोवलेलें तत्त्व सर्वमान्य असेंच होतें. तथापि उपसूचना उपाहाराच्या ऐनवेळीं मतें मोजण्यास पुढें आली व सिलेक्ट कमिटींत अनुकूल मतें दिलेल्या मवाळांनीं आयत्या वेळीं पलट खाल्ली यामुळें ती उपसूचना ६१ विरुद्ध ४० इतक्या मतांनीं नामंजूर झाली. तथापि चर्चेमध्यें देशी संस्थानांच्या सरहद्दींवर जकातीचीं नाकीं बसविण्याचा सरकारचा विचार नाहीं असें सरकारतर्फे फिरून आश्वासन देण्यांत आलें, येवढाच त्यांतल्या त्यांत फायदा म्हणावयाचा. लँड कस्टम्स बिल हें प्रायः परराष्ट्रीय प्रजेला लागू होणारें आहे, अशा बेफिकिरीच्या भावनेनें सभासदांनीं त्या बिलाकडे जसें दुर्लक्ष केलें तसें त्यानंतर पुढें आलेल्या बिलासंबधानें म्हणजे प्रॉव्हिडंट फंड बिलासंबंधानें मात्र त्यांना करतां येण्यासारखें नव्हतें. हें बिल मुख्यतः रेल्वेखात्यांतील नोकरांना लागणारें आहे. म्हणून त्यांच्या हिताहिताच्या दृष्टीनें पाठविण्यांत आलेल्या उपसूचनांत डॉ. लोहोकरे यांनींहि उपसूचना पाठविल्या होत्या.

* * *

पहिली उपसूचना अशी होती कीं, रेल्वेच्या नोकराची नोकरी सुटली किंवा त्यानें सोडली म्हणजे जो प्रॅाव्हिडंट फंड मिळावयाचा तो अशा नोकराकडे चूक, नुकसानी वगैरे कारणांनीं निघणारी रक्कम कापून न घेतली जातांच मिळावा. ही उपसूचना सामान्य व्यवहाराच्या व

कायद्याच्या मूलतत्त्वांच्या विरुद्ध असल्यामुळें तिला विशेष कोणाची संमति न मिळाल्यामुळें ती मतें न मोजतांच नामंजूर झाली. परंतु डॉ.लोहोकरे यांच्या दुसऱ्या उपसूचनेंत बरेंच तथ्य होतें. सरकारी बिलांत अशी योजना होती कीं, रेलवे नोकराला कोणत्याहि कारणानें कामावरून दूर करण्यांत आल्यास प्रॉव्हिडंट फंडखातीं जमा झालेली सरकारी मदतीची रक्कम नोकराला न दिली तरी चालेल; पण रेलवे खात्याच्या नोकरींत गरीब बिचाऱ्या नोकरांना पुष्कळ वेळां किती क्षुद्र कारणांनीं व कित्येक वेळीं तर निष्कारण अन्यायानें बडतर्फ करण्यांत येतें ही गोष्ट प्रसिद्ध असल्यानें वरील योजना जुलमाची होणार हें उघड होतें. असा प्रकार घडला असतां आधीं निष्कारण बडतर्फी हा एक अन्याय व त्याच्या जोडीला प्रॉव्हिडंट फंडाची षूड हा दुसरा अन्याय ! असा दुहेरी अन्याय होऊं नये म्हणून हें कलमच अजिबात गाळलें जावें अशी उपसूचना पुढें मांडताना आपण स्वतः लहानपणीं रेलवे गुड्स-शेडमध्यें नोकर होतों असा अनुभव डॉ. लोहोकरे यांनीं सांगितला; त्याचा सभासदांच्या मनावर चांगला परिणाम झाला व यामुळें तत्त्वप्रियता व सहानुभूति या दोनहि कारणांनीं सर्व पक्षांच्या सभासदांनीं या उपसूचनेला अनुकूल मतें दिलीं व त्यांत एकदोन युरोपियनहि होते ! ही उपसूचना सरकारास नापसंत असल्यामुळें तें हें बिल अखेर मंजुरीला कदाचित् मांडणारहि नाहीं अशी एक वेळ भीति वाटली होती. परंतु ती निराधार ठरून दुसऱ्या दिवशीं तें बिल मंजूर करण्यांतहि आलें.

पण ता. २३ रोजीं क्रिमिनल लॉ अमेंडमेंट ॲक्ट रद्द करण्याचें बिल, त्याचें तिसरें वाचन पार पडून, मंजूर झालें; हा असेंब्लीचा विजय, या बैठकींतील विजयांपैकीं सर्वांत मोठा असें म्हणावेंसें वाटतें. बिल म्हटलें म्हणजे त्याला प्रारंभापासून कसकशीं विघ्नें येतात हें वाचकांना एक वेळ समजावून सांगण्यासारखें आहे. पण तूर्त मोघम इतकेंच सांगतों कीं, डॉ.गौर यांची इतर सर्व कृति पदोपदीं लोकांना अप्रिय वाटण्यासारखी असली तरी त्यांची कायद्याच्या अभ्यासाची तयारी व त्यांची चिकाटी हीं कोणालाहि नाकबूल करतां येत नाहींत. या बिलाच्या कामीं त्यांनीं दिल्लीच्या बैठकीपासून प्रयत्न चालविला होता व तो सिमल्यास फळाला आला. तिसऱ्या वाचनाच्या वेळींहि सरकारकडून बिलाला कसून विरोध झाला. परंतु नेमस्त व मुसलमान वगैरे सर्वांची चांगली मदत

होऊन ७१ विरुद्ध ४२ मतांनीं बिल मंजूर झालें. हें बिल आतां कौन्सिल ऑफ स्टेटकडे गेल्यावर काय व्हावयाचें तें दिसतेंच आहे. पण असेंब्लींत तें मंजूर झालें ही गोष्ट लहान नाहीं. कौन्सिलांत झालें तरी राजकारणाची खादी चातीच्या एका फेऱ्याबरोबर विणून तयार होत नाहीं किंवा शंभर शंभर सुतें एकदम निघत नाहींत. एकेक सूत काढूनच ताणा भरण्याची आशा करीत बसावें लागतें.

* * *

याशिवाय या आठवड्यांत निकालांत निघालेल्या इतर कामांपैकीं सांगण्यासारखीं दोनतीनच आहेत; करांची तपासणी व योग्य विभागणी करण्यासंबंधानें सरकारनें एक कमिटी पूर्वींच नेमली आहे. तींत रँग्लर परांजपे, डॉ. हैदर वगैरे लोक आहेत. या कमिटींत असेंब्लीच्या पसंतीचे कांहीं लोक घालावे व करांच्या चौकशीबरोबर एकंदर लोकांच्या सांपत्तिक स्थितीचाहि विचार करावा असा एक ठराव राम अय्यंगार यांनीं पुढें आणला व त्यावर पुष्कळच भवति-न-भवति झाली. इंग्रजी राज्यांत हिंदुस्थान अधिक श्रीमंत झाला, कीं अधिक गरीब झाला, हा वाद निघाल्यावर कशा तऱ्हेचीं भाषणें व प्रश्नोत्तरें झालीं असतील याचा अंदाज वाचकांना सहजच करतां येईल! सर बेसिल ब्लॅकेट यांची मजल तर अपशब्द बोलण्यापर्यंत गेली, म्हणून प्रेसिडेंट यांना नाजूक निषेधहि करावा लागला. अखेर दोन दिवस वाद होऊन बॅ. जिना यांची उपसूचना बहुमतानें मंजूर झाली. पूर्वींची कमिटी मोडून नवीन कमिटी नेमावी असा ठराव असला तरी तो मानला जाणार नाहीं व मानला गेला तरी नव्या कमिटीवर जुने लोकच नेमले जातील. पण सर्वसाधारण सांपत्तिक स्थितीची चौकशी करण्याकरितां दुसरी एखादी कमिटी नेमली जाण्याचा संभव दिसतो. ता. २४ रोजीं खासगी बिलांचा परामर्श घेण्यांत आला. तो प्रकार रमण्यासारखा किंवा ललितासारखा होता. हा एकच दिवस खासगी बिलवाल्यांना खरा मिळाला असल्यामुळें अनेक सभासदांनीं थोडथोडीं औपचारिक भाषणें करून आपलीं बिलें दाखल करून घेतलीं.

* * *

ता. २४ रोजीं कापडाच्या गिरण्यांवरील स्थानिक जकातीच्या ठरावावरील वाद संपून तो ठराव मतें न मोजतांच मंजूर झाला. या चर्चेंत प्रत्येक सरकारतर्फेच्या वक्त्यानें हा कर वाईट हेतूनें बसविण्यांत आला, तो अन्यायमूलक

आहे, सबब तो कर उठविणें योग्य आहे अशी कबुली दिली. मुंबईचे व्यापारी-प्रतिनिधि मि. कोक यांनीं व मुसलमान प्रोफेसर डॉ. हैदरी यांनींहि कराचा निषेध केला. पण पैशाची तजवीज झाली, खजिन्याची स्थिति सुधारली म्हणजे मग तो कर प्रत्यक्ष दूर करतां येईल अशी लंगडी सबब सरकारतर्फे पुढें आणण्यांत आली! या वादांत व्यापारी लोक राजकारणांत स्वार्थी बुद्धीनें पडतात या खोडसाळ आक्षेपास सर पुरुषोत्तमदास यांनीं अतिशय रागावून सणसणीत उत्तर दिलें. येत्या बजेटाचे वेळीं हा दर कमी करून व त्याच्याच बरोबर विलायती कापडावरील तितकीच जकात कमी करून गरीब लोकांना कापड स्वस्त करूं अशी आशा सरकारतर्फे या वादांत लावण्यांत आली आहे. पण प्रत्यक्ष काय होतें तें पुढें दिसून येईलच!

* * *

या ठरावानंतर स्वराज्य पक्षातर्फेचा राजकीय कैद्यांच्या बंधमुक्ततेचा ठराव पुढें यावयाचा होता, व तसेंच त्यानंतर दिवाण चमनलाल यांचा कामकरी वर्गासंबंधाचा ठराव येऊन त्यावर केळकर यांची पोस्ट व रेल्वे खात्यांतील कामकऱ्यांसंबंधाची उपसूचना निघावयाची होती. परंतु प्रथम गिरणींवरील कराच्या ठरावानें बेसुमार वेळ घेतला, व त्यानंतर महापुरांनीं झालेल्या अनर्थासंबंधाचा भुवनानंद दास यांचा ठराव उगाच पुढें येऊन त्यानेंहि बराच वेळ घेतल्यामुळें उपरिनिर्दिष्ट दोनहि ठराव पुढें येऊं शकले नाहींत! यामुळें राजकीय कैदी व रेल्वे-पोस्ट खात्यांतील नोकर लोक यांच्याबद्दल सहानुभूति वाटणाऱ्या लोकांची निराशा झाली असल्यास नवल नाहीं. असो. इतकें काम झाल्यावर सभा यंदापुरती बरखास्त केल्याचा व्हाइसरॉय यांचा संदेश वाचून दाखविण्यांत आल्यावर असेंब्लीचें काम संपलें.

---

## दिल्लीची ऐक्यसंशोधक सभा १९२४

दिल्ली येथें ता. २६ सप्टेंबरपासून ता. १ ऑक्टोबरपर्यंत ऐक्यपरिषद भरली होती, तिचा निकाल काय झाला हें वाचकांना यापूर्वी कळलेंच असेल. तथापि परिषदेची चांगली कल्पना यावी येवढ्याकरितां तिची थोडी कच्ची हकीकत खालीं देत आहें. एका दृष्टीनें परिषद अपूर्व होती. हल्लीं होत

असलेलें राष्ट्रीयत्वाचें रांधप असेंच कांहीं अवघड आहे, कीं तें चालू ठेविलें पाहिजे, व तें चालू असतांच मधून मधून त्यांतील पदार्थ तोंडांत घालून पाहून, असेल तसा बरावाईट म्हणून, पक्का किंवा चांगला होण्याकरितां तें रांधप तसेंच चुलीवर पुन्हा ठेवणें भाग आहे; खालीं उतरून चालावयाचें नाहीं.

*　*　*

या परिषदेची ही कल्पना मौ. महंमदअल्ली यांनाच प्रथम सुचली. महात्माजी हे दिल्लीस त्यांचे पाहुणे म्हणून प्रथम गेले होते. हिंदु-मुसलमानांची एकी करण्याचा त्यांचा हेतु या भेटींत होता. परंतु हिंदूंप्रमाणें मुसलमानांनीं त्यांच्यावर विश्वास टाकावा तितका टाकला नाहीं. हिंदूंनीं त्यांना पंच म्हणून एकदम मान्यता दिली, पण मुसलमान प्रथम ती देईनात; आणि कोणी न देईल ती मान्यता आग्रहानें मिळविणें ही गोष्ट महात्माजींच्या स्वभावांत नाहीं, हें प्रसिद्धच आहे. तेव्हां नेहमींप्रमाणें दुसऱ्याची चूक तें स्वतः आपलेंच पाप असें याहि बाबतींत मानून, स्वावलंबनानेंच जें करतां येईल तें करण्याचा महात्माजींनीं निश्चय केला. त्यांच्या स्वावलंबनांत आत्मनिष्ठेइतकीच देह-दंडनालाहि ते किंमत देतात. आणि या मनस्तापाला मदत म्हणून त्यांनीं २१ दिवसांचा उपवास करण्याचा निश्चय करून जाहीरहि केला. घरीं आलेल्या पाहुण्यानें सत्कार घेण्याऐवजीं उपोषणाचें व्रत स्वीकारावें हें पाहून कोणाहि यजमानाला काय वाटेल ? या गृहस्थी दृष्टीनें तर महंमदअल्लींना दुःख झालेंच; परंतु त्यांतल्या त्यांत आपल्या धर्मबांधवांच्या अत्याचारांमुळें हा प्रसंग ओढवला असें पाहून त्यांचें दुःख द्विगुणित झालें.

*　*　*

आपणावर महात्माजींचें कितीहि प्रेम असलें तरी केवळ आपल्या सांगण्यानें महात्माजी उपवासाचें व्रत मोडण्यास कबूल होतील असें महंमदअल्ली यांना वाटेना. त्यांनीं विनवणीची पराकाष्ठा केली. गच्चीवरून जाऊन महात्माजींच्या पायांवर अश्रुसिंचनहि केलें. तथापि महात्माजींचा निश्चय ढळेना. तेव्हां महंमदअल्लींच्या पोटांत कालवाकालव झाली असल्यास नवल नाहीं. म्हणून आपल्या मदतीला हिंदुस्थानांतील सर्व प्रमुख लोक बोलावून आणावे असें त्यांना सहजच वाटलें. इतर लोक आपल्या विनंतींत सामील झाले म्हणजे मग अपयशाची आपली जबाबदारी तरी कमी होईल असें त्यांस वाटलें असावेंच; परंतु हिंदु-मुसलमान पुढाऱ्यांनीं जमून परिषदेंत एकीचा ठराव व कायमचे

कांहीं नियम केल्यास, गांधींच्या उपवास-व्रताचें फल तें व्रत संपण्यापूर्वींच मिळालेंसें होईल; व मग व्रत मोडण्याविषयीं त्यांना हक्कानें प्रार्थना करतां येईल असेंहि महंमदअल्लींना वाटलें असावें यांत शंका नाहीं.

* * *

वरील हेतूनें महंमदअल्ली यांनीं परिषद भरविण्याचें ठरविलें. पण निमंत्रण दुतर्फी असलें पाहिजे म्हणून त्यांनीं स्वामी श्रद्धानंद यांचीहि त्यावर सही घेतली. अशा अडचणीच्या वेळीं बोलावलेल्या परिषदेच्या हातून व्हावी तितकी खुल्या दिलानें चर्चा होणार नाहीं व जे ठराव होतील त्यांना कायमचें स्वरूप मिळावें तितकें मिळणार नाहीं, अशी शंका स्वामीजींना प्रथम वाटत होती. परंतु निमंत्रणावर सही न करणें म्हणजे पुण्यमार्गाला आड येणें असें वाटून त्यांनीं सही दिली. शिवाय कोणीकडून तरी महात्माजींचा उपवास मोडवितां आला तर तेंहि एक सद्यःफलच आहे असेंहि त्यांस वाटलें असावें. परिषदेला व्यक्तिशः चारपांचशें लोकांना निमंत्रणें धाडण्यांत आलीं होतीं. शिवाय जाहीर दवंडीचें निमंत्रण सर्व लोकांना करण्यांत आलेंच होतें. त्याप्रमाणें परिषदेला सुमारें अडीचशें लोक बाहेरगांवांहून आले होते. परिषद होईल तितकी व्यापक व लोकमतप्रतिबिंबक करावी असा प्रयत्न महंमदअल्ली यांनीं आपणाकडून फार केला व या परिषदेची एकंदर जबाबदारी त्यांनीं आपल्या शिरावर घेतलेली पाहून त्यांचेविषयीं खरोखर सहानुभूति वाटण्याजोगी होती. परंतु परिषदेला हिंदु सभासदच पुष्कळ हजर होते इतकेंच नव्हे, तर लोकसंख्येच्या मानानेंहि पाहतां परिषदेंत जितका अंश मुसलमान प्रतिनिधींचा असावयास पाहिजे होता तितका देखील नव्हता. महंमदअल्लींना कोणी ही गोष्ट बोललाहि असावा. म्हणून एका प्रसंगीं ते जिकिरीला येऊन म्हणाले, "मला मिळवितां आले तितके मुसलमान मीं आणून हजर केले. पंजाबचे व बंगालचे मुसलमान यावे तितके आले नाहींत याला मी तरी काय करूं!" खरोखर महंमदअल्लींकडे कांहीं दोष नव्हता. पण ऐक्याची काळजी हिंदूंना अधिक वाटली, कीं मुसलमानांना अधिक वाटली हें मात्र त्यावरून कळून आलें.

* * *

असो. कोणत्या बाजूचे किती लोक आले याचा हिशेब न करतां परिषद ही सर्वव्यापक व खरी प्रातिनिधिक असें मानून होईल तें काम करणें हेंच

शहाणपणाचें होतें. पण एकदोघां गृहस्थांनीं परिषदेच्या दुसरे दिवशीं अशी हरकत कारणपरत्वें घेतली कीं, परिषद असावी तितकी सर्वमतनिदर्शक नाहीं. अर्थात् तिचे ठराव बाहेर फारसे कोणी मानणार नाहीं. तेव्हां ठराव असे कांहीं न केलेलेच बरे असें म्हणण्यापर्यंत जवळ जवळ त्यांची पाळी आली ! ही विचारसरणी खास चुकीची होती असेंच न्यायबुद्धीनें म्हटलें पाहिजे. कारण एक तर सर्व पुढाऱ्यांना जाहीर निमंत्रण असून प्रतिबंध कोणालाच नव्हता. अर्थात् ज्यांना कळकळ होती ते आले व जे आले त्यांनीं आपल्या-पुरतें तरी कार्य करणेंच योग्य. मग बाहेर तें कोणी मानो किंवा न मानो ! शिवाय दोन दिवस काम चाललें व पहिले एक-दोन ठरावहि मंजूर झाले तेव्हां ते करण्याला जर ही सभा प्रातिनिधिक ठरली तर उरलेल्या कामालाहि ती तशी कां ठरूं नये ?

* * *

जें आधीं बोलावयाचें तें मग बोलावें अशी सभांतून जणूं आपणाला सवय झाली आहे ! दोन दिवस परिषद चालल्यावर तिला प्रातिनिधिक म्हणावी किंवा नाहीं अशी शंका कित्येकांना आल्याचें वर सांगितलेंच आहे. तोच प्रकार ठरावाच्या अधिकृत मसुद्यासंबंधानेंहि झाला. दोन दिवस ठरावाची चर्चा झाल्यावर स्वागत कमिटीनें मुक्रर केलेला असा ठरावांचा मसुदा कोणता हा प्रश्न उपस्थित झाला ! या प्रश्नाचें अधिष्ठान परिषद बोलावणारांच्या दर-म्यानच्या अविश्वासावरच होतें. मूळ मसुदा म. गांधी यांनीं केला. पुढें दुसरा एक वेगळा मसुदा झाला, आणि मग म. गांधी यांचें नांव आपल्या फायद्या-पुरतें कोण कसा पुढें आणतो हें उघड कळून आलें. मूळ मसुदा स्वामी श्रद्धानंद व पं. मालवीय यांना जोंपर्यंत पसंत होता तोंपर्यंत तो महात्माजींचा म्हणून स्वीकारला असें तें सांगत व महात्माजींचें नांव यांत कां आणतां असें महंमदअल्ली म्हणत. पण दुसरे वेळीं असें घडे कीं, गांधींच्या उपवासाचें कारण सांगून सभेनें निकाल केलाच पाहिजे असें जेव्हां महंमदअल्ली म्हणत तेव्हां तें अमान्य असणारे म्हणत कीं, " गांधींच्या उपवासाचें पिस्तुल आमच्या डोक्यावर रोखून अडचणींत गांठून ठराव मंजूर कां करून घेतां? "

* * *

खरें हृदयाविष्करण करूनच बोलावयाचें तें बोला असें प्रत्येकजण दुसऱ्यास म्हणत होता. परंतु तें होणें अर्थातच शक्य नव्हतें. इतका दिल खुला

करून बोलण्याचें कोणास धैर्य होणार नाहीं व तसें कोणी बोलला तर तें पचणार नाहीं हें परिषदेंतील सर्व लोक जाणून होतें. शिवाय महात्माजींचा म्हणून जो मसुदा पुढें आला होता त्यांत वरील इच्छा सफल होण्याच्या कमालीच्या मर्यादा निर्दिष्ट केल्या गेल्या होत्या; व इच्छापूर्तीच्या हक्काचीहि गोष्ट त्यांत नसून परस्पर प्रतिबंध कोणत्या उपायांनीं करतां यावा इतकेंच सांगितलें होतें. महंमदअल्ली यांनीं स्वतःचा म्हणून जो एक मसुदा केला होता त्यांत वरील बाबतींत प्रत्येक समाजाच्या हक्कांचा निर्देश करून त्याबरोबर त्याच्या कर्तव्याचा व जबाबदारीचाहि उल्लेख केला होता. या दोन मसुद्यांतील फरक सांगावयाचा तर तो थोडक्यांत असा सांगतां येईल कीं, महात्माजींच्या मसुद्यांत सर्व भिस्त उभयसमाजांच्या परस्पर मोहबतीवरच ठेविली होती. महंमदअल्लींच्या मसुद्यांत नुसत्या मोहबतीवर भिस्त नसून हक्कांचा स्पष्ट उच्चार होता. गांधींच्या मसुद्यांतून असा ध्वनि निघत होता कीं, अजूनहि मोहबतीनें काम होण्याची आशा सुटली नाहीं, याकरितां कोणाच्याहि हक्काचा स्पष्ट निर्देष करूं नये. महंमदअल्लींच्या मसुद्यांतून असा ध्वनि निघत होता कीं, मोहबतीचा प्रयोग व्हावा तितका यशस्वी झाला नाहीं, म्हणून परस्परहक्कांचा स्पष्ट निर्देष झाला पाहिजे. एकदां हक्कांचें स्पष्ट विधान झाल्यावर मग अधिकांत अधिक वाईट काय होणार हें कळून येईल व त्यानंतर मोहबतीनें जितका निर्बंध परस्परांना घालतां येईल तितका फायदा पदरांत पडला असें हिशेबीं कळून येऊन बरें वाटेल.

*　　*　　*

वरील दोन मसुद्यांत नसणारा व मूळ चालकांनीं न सुचविलेला असा मजकूर म्हटला म्हणजे श्री. न. चिं. केळकर यांनीं सुचविलेली व श्री. विठ्ठलभाई पटेल यांनीं अनुमोदन दिलेली उपसूचना होय! या उपसूचनेनें मूळ ठरावाच्या अर्थांत किंवा महत्त्वांत फारसें कांहीं कमजास्त होत नव्हतें. परंतु हल्लींच्या ठरावांनीं जुने झालेले करारमदार किंवा जुन्या वहिवाटी या मोडावयाच्या, कीं काय असा एक प्रश्न स्वाभाविकपणें सुचणारा होता व त्याचें निर्णयात्मक उत्तर मिळावें म्हणून श्री. केळकर व पटेल यांनीं अशी उपसूचना दिली कीं, "आज होणाऱ्या ठरावांचा अंमल यापुढें होईलच, परंतु वाद्यें वाजविण्याची वा न वाजविण्याची, गोवध करण्याची किंवा न करण्याची अस्तिनास्ति पक्षीं वहिवाट स्थानिक करारमदार होऊन किंवा अनेक

दिवसांच्या वहिवाटीनें जेथें जेथें पडलेली असेल तेथें तेथें ते करार व त्या वहिवाटीच चालू राहाव्या; नव्या ठरावांचा आधार घेऊन जुनीं भांडणें उकरून काढण्याचा कोणास अधिकार नसावा." ही उपसूचना तत्त्वतः सर्वसंमत असल्यानें तिचा स्वीकार करून विषयनियामक कमिटीनें ती गोवध व वाद्यें यांजवरील ठरावांत उचित शब्दांनीं सामील केली.

* * *

अखेर मंजूर झालेला मसुदा पाहतां तो वरील दोनहि मसुद्यांचा मिळून बनलेला आहे असें दिसून येईल. कारण त्यांत प्रारंभीची भाषासरणी गांधींची घेतली आहे, तथापि महंमदअल्ली यांना इष्ट असा जो हक्काचा स्पष्ट निर्देश तोहि त्यांत आहे. मात्र त्यांतल्या त्यांत बारीक नजरेनें पाहतां गोवधाच्या बाबतींत मुसलमानांच्या हक्काचा जसा स्पष्ट निर्देश आहे तसा मशिदींपुढून वाद्यें वाजवीत जाण्याच्या हिंदूंच्या हक्कासंबंधानें झालेला नाहीं. मग ते शब्द चुकून राहिले असल्यास न कळे. गोवध व वाद्यें यांजविषयींच्या ठरावांची इतर भाषा एकाच साच्यांतून ओतल्यासारखी दिसत असतां हक्कांच्या शब्दांचा उल्लेख एकांत आहे व एकांत नाहीं म्हणूनच ती गोष्ट नजरेंत भरते. कसेंहि असो, विषयनियामक कमिटी पांच दिवस भरून तरी अखेर सर्वानुमतें असे कांहीं ठराव मंजूर करतां आले हीच गोष्ट विशेष समजली पाहिजे. कारण पहिल्या दोनतीन दिवसांच्या अनुभवावरून पाहतां मसुदा मुक्रर होण्याची आशा वाटत नव्हती, पण जी गोष्ट विवेकबुद्धि निर्णयात्मक करूं शकत नाहीं, ती गोष्ट पुष्कळ वेळां शारीरिक श्रम व निवळ कंटाळा करूं शकतो. महायुद्ध देखील अखेर लढणारांना कंटाळा येऊन संपलें, लढणें ही गोष्ट वाईट अशा पश्चात्तापानें ते संपलें नाहीं असें म्हणतात !

---

# ब्रिटिश ग्वायनाचें डेप्युटेशन १९२४

लोकपक्षाचा कायदेमंडळावर ताबा नव्हता, तेव्हां कायदे करण्यास सरकारची अनुकूलता मिळवावी लागे व तेवढ्यासाठीं सरकारची मनधरणी करण्यास शिष्टमंडळें तयार करून अधिकाऱ्यांशीं भेटीगांठी कराव्या लागत. पण आतां कायदे करण्याचा अधिकार लोकप्रतिनिधींच्या हातीं आल्यामुळें कोणताहि नवा कायदा करणें किंवा जुना कायदा बदलणें हीं कामें कोणास

करून घ्यावयाची असल्यास सरकारपेक्षां प्रथम लोकपक्षाच्या प्रतिनिधींची त्याबद्दल खात्री करून देऊन त्यांना वळवून घ्यावें लागतें. यामुळें दिल्लीस कायदेमंडळाच्या सभासदांकडे निरनिराळ्या हितसंबंधाचीं मंडळें येत आहेत. त्यांपैकींच एक ब्रिटिश ग्वायनाचें शिष्टमंडळ आलेलें असून, ब्रिटिश ग्वायनांत अधिक हिंदी लोकांनीं जावें अशा योजनेला हिंदी कायदेमंडळाची अनुमति मिळविण्याची त्यांची खटपट आहे. या शिष्टमंडळांत डॉ. नूनन व बॅ. लख्खू ( Luckhoo ) हे गृहस्थ आहेत. ता. ९ रोजीं लख्खू हे महाराष्ट्र कॅंपांत येऊन खासगी चर्चेच्या रूपानें त्यांनीं आपली योजना समजावून सांगितली व या विषयासंबंधीं कांहीं पुस्तकें व पत्रकेंहि त्यांनीं दिलीं, त्यांवरून पुढील माहिती देत आहे.

ब्रिटिश ग्वायना ही दक्षिण-अमेरिकेच्या उत्तर भागांतील ब्रिटिशांची वसाहत आहे. सबंध दक्षिण-अमेरिकेंत ब्रिटिश वसाहत अशी ही येवढीच एक आहे. या वसाहतीचें क्षेत्रफळ नव्वद हजार चौरस मैल असून ती दक्षिण-अमेरिकेंतील डच वसाहतीच्या दुप्पट व फ्रेंच वसाहतीच्या तिप्पट आहे. साधारणतः सिंध वजा करून मुंबई इलाख्याइतका हा प्रांत आहे. पण लोकसंख्या त्या मानानें अगदींच कमी म्हणजे जवळ जवळ अडीच लाख असून त्यांपैकीं निम्मे म्हणजे सवा लाख लोक हिंदी आहेत. यांना तिकडे ईस्ट इंडियन म्हणतात. कारण अमेरिकेंतील मूळच्या रहिवाश्यांना वेस्ट इंडियन हें नांव अगोदरच पडून गेल्यामुळें हे इंडियन निराळे हें कळण्याकरितां त्यांना ईस्ट इंडियन असें म्हणतात. बाकीच्यांत सुमारें एक लाख आफ्रिकन नीग्रो आहेत. पूर्वीं गुलामांचा व्यापार होता त्या वेळीं आफ्रिकेंतून गुलाम म्हणून हे लोक धरून आणले होते. पुढें १८३८ मध्यें गुलामगिरी नष्ट होऊन ते स्वतंत्र झाले. इतर वसाहतींत सुमारें तीन हजार चिनी, दहा हजार पोर्तुगीज आणि सुमारें साडेतीन हजार ब्रिटिश आहेत. ही वसाहत प्रथम १८०३ सालीं डच लोकांकडून इंग्रजांकडे आली. १८३८ पर्यंत तेथें गुलामांची पद्धत चालू होती. त्यानंतर मुदतबंदीच्या मजुरांची पद्धत सुरू होऊन एक प्रकारें गुलामगिरीच चालू ठेवण्यांत आली होती. ही मुदतबंदीची पद्धत १९१७ सालीं कायद्यानें नष्ट करण्यांत आली. १८३८ सालीं मुदतबंदीचे मजूर घेऊन हिंदुस्थानचें पहिलें जहाज तेथें गेलें. तेव्हांपासून मुदतबंदीच्या करारावर दरवर्षीं हिंदुस्थानांतून मजूर जात असत, व त्यांतल्या कांहीं लोकांनीं पुढें तेथेंच वस्ती

केली. पण १९१७ पासून मुदतबंदीची पद्धत बंद झाल्यामुळें हिंदुस्थानांतून थेट ब्रिटिश ग्वायनांत जाणाऱ्या बोटी बंद झाल्या व हिंदुस्थानचा व या वसाहतीचा संबंध तुटल्यासारखा झाला. हल्लीं या वसाहतींत जावयाचें झाल्यास प्रथम इंग्लंडला जावें लागतें व तेथून ग्वायनाची बोट मिळते. कलकत्ता-मुंबई-हून कधीं काळीं क्वचित् एखादीहि बोट मिळते. हा संबंध पुन्हा प्रस्थापित करण्याची ग्वायनाच्या शिष्टमंडळाची खटपट आहे.

शिष्टमंडळांपैकीं डॉ. ऑ. जोफेस नूनन हे आयरिश असून ग्वायनाचे ॲटर्नी जनरल आहेत. ब्रिटिश ग्वायनांतील रॉयल ॲग्रिकल्चरल व कमर्शियल सोसायटीचे ते प्रतिनिधी आहेत. आयरिश असल्यामुळें हिंदी लोकां-विषयीं त्यांना विशेष सहानुभूति वाटत असण्याचा संभव आहे. बॅ. जोसेफ लख्खू हे बॅरिस्टर, किंग्ज काउन्सेल व ग्वायनाच्या कायदेमंडळाचे सभासद असून हिंदी ख्रिस्ती आहेत. लख्खू यांचे वडील हिंदु होते. बिहारमध्यें गया जिल्ह्यांत एका खेडेगांवांत त्यांचा जन्म झाला. वयाच्या आठव्या वर्षीं इतर कांहीं लोकांबरोबर १८५० चे सुमारास ते ग्वायनांत गेले. तेथें ते ख्रिस्ती झाले व त्यांचे इकडे कोणी नातलग राहिले नाहींत, यामुळें हिंदुस्थानचा व त्यांचा संबंध तुटला. त्यांचे चिरंजीव बॅ. लख्खू यांस आपल्या हिंदुस्थानांतील मूळ गांवाचें नांव मात्र ठाऊक होतें. बॅ. लख्खू हे डेप्युटेशनकरितां हिंदुस्थानांत आल्यावर शोध करीत करीत आपल्या मूळ गांवीं गेले व तेथें कोणी लख्खू आडनांवाचे लोक राहात होते काय अशी चौकशी केली, पण पत्ता लागेना! अखेर एका ऐंशी वर्षांच्या म्हाताऱ्या ब्राह्मण बाईनें हें नांव आपल्याला अंधुक आठवत असल्याचें सांगितलें! लख्खू यांचा मूळ धर्म गेला त्याप्रमाणें भाषाहि गेली व ते जन्मापासून इंग्रजी भाषा शिकले. ग्वायनांतील इतर सर्व हिंदी लोकसंख्येची गोष्ट मात्र तशी नाहीं. ग्वायनांतील हिंदी लोकांत फक्त शेंकडा १० ख्रिश्चन आहेत. बाकीचे हिंदु व मुसलमान आहेत. तेथें उर्दू, हिंदी, तामीळ व तेलगू या भाषा चालतात. देवळें व मशिदी आणि त्याबरोबर पंडित व इमाम हेहि तेथें आहेत व हिंदी, उर्दू शाळाहि चालतात.

कीनिया व दक्षिण-आफ्रिका यांच्या खडतर अनुभवामुळें ब्रिटिश वसाहत हें नांव उच्चारल्याबरोबर साहजिकच एक प्रकारचा विपरीत ग्रह हिंदी माणसाच्या मनांत उत्पन्न होतो. वसाहतींत राहण्यास या असें सांगणारा इसम

हा भुलथापा देऊन फसवून संकटांत घालील असा संशय कां नसावा? पण ब्रिटिश ग्वायनांतील परिस्थिति, कीनिया व दक्षिण-आफ्रिका यांतील परिस्थिती-पेक्षां बरीच निराळी आहे. ब्रिटिश ग्वायना ही क्रौन कॉलनीहि म्हणतां येत नाहीं किंवा डोमीनियनहि म्हणतां येत नाहीं. १८०३ सालीं डच लोकांकडून हा प्रदेश घेतला त्या वेळींच त्यांची राज्यघटना लोकमतानुवर्ती करण्यांत आली. हल्लीं तेथें लोकांनीं निवडलेल्या १४ ला ८ इतक्या प्रमाणांत बहुमत असलेल्या प्रतिनिधींच्या कायदेमंडळामार्फत कारभार चालतो. बजेटावरहि या कायदे-मंडळाची हुकमत आहे. मताधिकार सर्वांस असून हिंदी व उर्दू मतपत्रिका प्रसिद्ध होतात व मागणी आल्यास त्या तेलगू व तामीळमध्येंहि प्रसिद्ध करतां येतात. बजेटामधील रकमा मंजूर करण्याचें काम लोकांचे हातीं असल्यामुळें एकदोन वेळां बजेट नामंजूर करण्याचा धाक घालून लोकांनीं आपलें म्हणणें सरकारवर लादलें आहे. हिंदी, नीग्रो व युरोपियन यांच्यांत इतर वसाहतीं-प्रमाणें ग्वायनांत बेबनाव नाहीं असें बॅ.लख्खू यांचें म्हणणें आहे. पूर्वींपासूनच या वसाहतींत सर्वांना सारखे हक्क होते. पण इतर वसाहतींतून हिंदी लोकांना वाईट रीतीनें वागविण्यांत येतें तसें येथेंहि येत असेल किंवा येईल असा संशयहि उत्पन्न होऊं नये, म्हणून १९२० सालीं एक जाहीरनामा काढून या वसाहतींत सर्वांना सारखे हक्क राहतील असें गव्हर्नरानें जाहीर केलें आहे.

ग्वायनांतील नीग्रो लोकांना आपली स्वतःची अशी भाषा नाहीं. ते बहुतेक ख्रिस्ती आहेत व त्यांना फक्त इंग्रजी भाषा येते. हिंदी लोकांनीं आपल्या हितसंबंधांकरितां जशी ब्रिटिश ग्वायना ईस्ट इंडियन असोसिएशन स्थापन केली त्याप्रमाणेंच तेथें नीग्रो लोकांची कन्व्हेन्शनहि आहे. आणि हिंदुस्थानांतून तेथें वस्ती करण्यास अधिक लोक यावेत अशा इच्छेनें खटपट करण्याकरितां जसें इंडियन डेप्युटेशन हिंदुस्थानांत आलें आहे, तसेंच नीग्रो कन्व्हेन्शनचेंहि डेप्युटेशन आफ्रिका व वेस्ट इंडीज यांत गेलें असून तेथून अधिक आफ्रिकन लोक आणण्याची खटपट करीत आहे. सन १९२० सालीं लख्खू, नूनन व प्रभूसा यांचें कमिशन हिंदुस्थानांत आलें होतें. त्यांनीं त्या वेळीं पुढें मांडलेली योजना हिंदी कायदेमंडळाच्या एका कमिटीनें तपासून तात्पुरती मान्यता केली होती; पण प्रत्यक्ष ग्वायनांत जाऊन अधिक चौकशी करून आल्याशिवाय या प्रश्नावर निश्चित निर्णय देतां यावयाचा नाहीं असें कमिटीनें आपलें मत दिलें होतें. या कमिटींत ना. शास्त्री, वाच्छा, असद अलीखान, कामिनी-

कुमार चांदा, सुरेंद्रनाथ बानर्जी, बी. एन्. शर्मा वगैरे हिंदी गृहस्थ होते. यानंतर ग्वायनांत जाऊन परिस्थिति प्रत्यक्ष पाहून रिपोर्ट करण्याचें काम लांबणीवर पडलें. अखेर दोन वर्षांनंतर पिल्ले, तिवारी व कीटिंग्ज यांची चौकशी-कमिटी १९२२ च्या फेब्रुवारींत जाऊन दाखल झाली व तिनें चौकशी करून लख्खू-नूतन यांच्या योजनेला अनुकूलता दर्शविली.

या कमिटींपैकीं कीटिंग्ज यांनीं आपला रिपोर्ट निराळा लिहिला. त्यांचा रिपोर्ट व पिल्ले-तिवारी या दोघांनीं मिळून केलेला रिपोर्ट यांत बरीच तफावत आहे. कीटिंग्ज यांच्यापेक्षां पिल्ले-तिवारी यांचा रिपोर्ट हिंदुस्थानला अर्थातच अधिक अनुकूल आहे. हिंदी लोक ग्वायनांत गेल्यावर त्यांच्या सुखसोयींची व संरक्षणाची हमी ग्वायना सरकारनें सर्व तऱ्हेनें द्यावयास पाहिजे असें पिल्ले-तिवारी म्हणत असून नूतन-लख्खू-योजनेपेक्षां बऱ्याच कमी सुखसोयी किंवा सवलती हिंदी लोकांस दिल्या तरी पुरे आहेत असें कीटिंग्ज यांचें म्हणणें आहे. पिल्ले-तिवारी व कीटिंग्ज या दोघांचेहि रिपोर्ट आजपर्यंत दप्तरांत पडून होते; पण ग्वायनांतील हिंदी लोकांचें डेप्युटेशन येथें आल्यामुळें तें आतां सरकारी रीत्या प्रसिद्ध झाले आहेत. मध्यंतरीं ही गोष्ट थोडी मागें पडण्यास दुसरेंहि एक कारण घडलें. लख्खू-नूतन-योजनेस प्रथम ग्वायना सरकारची पूर्ण अनुमति होती. पण मध्येंच गव्हर्नर सर विल्फ्रेड कोलेट यांनीं असें जाहीर केलें कीं, लख्खू-नूतन-योजना ग्वायना सरकारनें कायमची मान्य केलेली नाहीं; ती कच्ची—तात्पुरती योजना असून तींत फेरफार करण्याचा ग्वायना सरकारला अधिकार आहे. पिल्ले व तिवारी यांनीं आपल्या रिपोर्टांत एकदां देऊं केलेल्या सवलती अशा रीतीनें ग्वायना सरकारनें काढून घेणें रास्त नाहीं अशी टीका केली होती. अशा सवलती मध्येंच कमी होण्याचा धोका असेल तर हिंदी लोकांनीं ग्वायनांत न गेलेलेंच बरें असें पिल्ले-तिवारी कमिटीचें मत पडलें. पण एप्रिल१९२३ मध्यें थॉम्सन या नांवाच्या ग्वायनाच्या नव्या गव्हर्नरांनीं पिल्ले-तिवारी रिपोर्टांत मान्य केलेली लख्खू-नूतन यांची योजना पक्क्या स्वरूपाची मानली जाईल असें जाहीर केलें. त्यामुळें या प्रश्नास पुनः चालन मिळालें. ग्वायनाचें डेप्युटेशन येथें याकरितांच आलें असून हल्लीं हिंदुस्थानांतील निरनिराळ्या भागांत हिंडत आहे. सध्यां दिल्लीस असेंब्लीची बैठक चालू असल्यामुळें तें दिल्लीस आलें आहे.

हल्लीं मुख्य प्रश्न ग्वायना सरकारची वसाहतीची योजना हिंदी कायदे-मंडळांत पास करावयाची असा नाहीं. पण १९२२ चा इंडियन एमिग्रेशन ॲक्ट अमलांत असल्यामुळें सध्यां हिंदुस्थानांतून थेट ग्वायनांत हिंदी लोक नेण्याला बंदी आहे; इंग्लंडांत जाऊन तेथून ग्वायनांत गेल्यास जातां येतें व अशा रीतीनें कांहीं थोडे लोक जातात; यापेक्षां अधिक लोक आल्याशिवाय तेथील लोकसंख्या वाढून सुधारणा व्हावयाची नाहीं. याकरितां ब्रिटिश ग्वायनांत जाण्यास परवानगी राहील अशी इंडियन एमिग्रेशन कायद्यांत दुरुस्ती केली पाहिजे व हिंदी लोकांस तेथें चांगल्या सवलती मिळतील, त्रास होणार नाहीं, अशी कायदेमंडळाची खात्री झाल्याशिवाय या दुरुस्तीस कायदेमंडळाची संमति मिळणार नाहीं. यास्तव हिंदी लोकांना ग्वायनांत जेणेंकरून फायदेशीर होईल अशा तऱ्हेची योजना ग्वायना सरकारची हमी घेऊन पुढें मांडण्यांत आली आहे व ती समजावून देण्यास डॉ. नूनन व बॅ. लख्खू हे येथें आले आहेत. इंडियन असोसिएशनच्या विद्यमानें ता. २२ नोव्हेंबर १९२३ रोजीं ग्वायनांतील सर्व हिंदी लोकांची एक सभा भरून तींत नूनन-लख्खू यांच्या योजनेला व शिष्टमंडळाला पाठिंबाहि देण्यांत आला आहे.

नूनन-लख्खू यांच्या योजनेचा सारांश पुढें दिल्याप्रमाणें आहे. प्रथम हिंदुस्थान व ग्वायना यांमध्यें बोटींचें दळणवळण सुरू करण्यांत येईल. आरंभीं दर दोन महिन्यांत एक बोट निघेल पण मागाहून दरमहिन्यास हिंदुस्थानांतून ग्वायनास जाण्यास एक बोट निघण्याची व्यवस्था केली जाईल. दरवर्षी जास्तींत जास्त पांच हजार लोक जातील अशा मानानें व्यवस्था करण्यांत येईल. तेथें सवलतीचे दरानें त्यांस लागवड करण्यासारख्या जमिनींचे तुकडे देण्यांत येतील. मजुरांना सात तास काम करून रोजीं तीन रुपये मिळण्याची सरकार हमी घेईल. मजुरीच्या दरावर आर्बिट्रेशन बोर्डाची हुकमत राहील. नवीन आलेल्या लोकांना राहण्यास घरें मिळवून देण्याची सोय सरकार करील. तीन वर्षें मजुरीनें अगर स्वतंत्र रीतीनें शेतकी काम केल्यास पांच एकर जमीन बक्षीस देण्यांत येईल. या सर्व गोष्टींवर देखरेख ठेवण्याकरितां हिंदुस्थान सरकारचा एक प्रतिनिधि तेथें नेमून त्याचा पगार ग्वायना सरकार देईल. कोणालाहि तीन वर्षांनंतर परत हिंदुस्थानांत यावयाचें असेल तर १/२

भाड्यांत, पांच वर्षांनंतर यावयाचें असेल तर ½ भाड्यांत व सात वर्षांनंतर फुकट हिंदुस्थानांत परत पोंचविण्याची व्यवस्था करण्यांत येईल. पाणी-पुरवठा, ड्रेनेज वगैरेची सोय केलेली आहे व ती वाढविण्याची योजना सुरू आहे. तेथील हवा हिंदी लोकांना मानवणारी आहे. हिंदु-मुसलमानांना आपापल्या पद्धतीनें लग्नें करण्याची व मृतांची व्यवस्था करण्याची परवानगी आहे.

वर दिलेल्या गोषवाऱ्यावरून ग्वायनांत हिंदी लोकांना अनुकूल परिस्थिति असून ती अधिक अनुकूल करून देण्यास ग्वायनाचें सरकार तयार आहे असें सकृद्दर्शनीं दिसतें. पण या प्रश्नाला दुसरी बाजूहि आहे, आणि तिचा विचार मनांत आल्याशिवाय राहत नाहीं. आज ग्वायनांत लोकसंख्या थोडी, जमीन मुबलक, तांदूळ, ऊंस यांचीं पिकें काढण्याची अनुकूलता, इमारतीचें लांकूड व हिऱ्याच्या खाणी यांचा व्यापार वगैरे गोष्टी आहेत. पण याच सारख्या कायम टिकतील असें नाहीं. कौन्सिलांत लोकनियुक्त सभासदांचें बहुमत असलें तरी हिंदी प्रतिनिधि बॅ. लखू हे एकटे एकच आहेत. याचें कारण लखू यांनीं असें सांगितलें कीं, पूर्वीच्या मुदतबंदीच्या पद्धतीमुळें हलक्या जातीचे व गुन्हेगार, उडाणटप्पू वगैरे लोकांचा भरणा विशेष झाला. यामुळें इलेक्शनला कोणी हिंदी लोक उभेच राहत नाहींत. नीग्रो किंवा युरोपियन उभे राहतात व ते निवडून येतात. हिंदी लोकांचा शैक्षणिक दर्जा वाढून त्यांचा राज्यकारभारांत अधिकाधिक शिरकाव व्हावा याकरितां चांगले शिकलेले डॉक्टर, बॅरिस्टर, इंजिनियर वगैरे लोक येथें अधिक यावेत अशी लखू यांची इच्छा आहे. आज हिंदी, नीग्रो व युरोपियन यांच्यांत विशेष भेद नाहीं हें खरें, पण लोकसंख्या वाढून दाटी झाल्यावर यांच्यांत तेढ लागणार त्या वेळीं हिंदुस्थाननें त्या परिस्थितींतून कसा मार्ग काढावयाचा ?

यावर उलट असें म्हणतां येईल कीं, पुढें अडचणी येतील म्हणून आजच हातांत येण्यासारखी वसाहत कां सोडावी ? ग्वायनाची हवा युरोपियनांस अनुकूल व मानवणारी नाहीं. तेव्हां तंटा झाला तर तो नीग्रो लोकांशीं होईल. पण एशियाटिक व युरोपियन यांच्यापेक्षां एशियाटिक व नीग्रो हे अधिक सलोख्यानें वागत असून त्यांच्यांतील भांडणें सामोपचारानें मिटण्याचा संभव अधिक. शिवाय असें भांडण उपस्थित होईपर्यंत हिंदुस्थान स्वराज्याच्या मार्गांत बरेंच पुढें पाऊल टाकील व त्या वेळेपर्यंत कोणत्याहि अन्यायाचा प्रतिकार करण्यास आजच्यापेक्षां तें अधिक समर्थ होईल. फिजी किंवा दक्षिण

आफ्रिका यापेक्षां ब्रिटिश ग्वायनांतील परिस्थिति हिंदी लोकांना जास्त अनुकूल आहे ही गोष्ट महात्मा गांधी व सी. एफ्. अंड्रूज यांच्यासारख्या या कामीं तज्ञ म्हणून समजल्या जाणाऱ्या लोकांसहि मान्य आहे. तेव्हां ब्रिटिश ग्वायनांतील हिंदी वसाहतींची योजना स्वीकारून ती अंमलांत यावी या हेतूनें एमिग्रेशन ॲक्टांत दुरुस्ती करण्याचे वेळीं कायदेमंडळांच्या सभासदांनीं ग्वायना सरकारला अटीनें पक्कें बांधून घेऊन ही दुरुस्ती करावी हें योग्य दिसतें. सारांश, शक्य त्या रीतीनें अधिक सवलती देण्यास ग्वायना सरकारकडून हमी घेण्याचा प्रयत्न करणें व ही योजना अमलांत येण्यास सुरुवात झाल्यावर तिच्यावर बारीक लक्ष ठेवणें हें हिंदी लोकप्रतिनिधींचें कर्तव्य आहे. परदेशांत स्वतंत्रपणानें जातां येते ही गोष्ट मुख्य आहे. परदेशांत परक्या मनुष्याला त्रास सोसावा लागतो हें तर खरेंच. पण साहसाशिवाय वैभव नाहीं. इंग्रज लोक हिंदुस्थानांत आले त्या वेळीं आमच्या राजे लोकांनीं त्यांना ममतेनें वागविलें व त्यांचें कौतुक केलें हें निराळें. पण विलायतेस त्यांना अशा वागवणुकीची हमी कोणी दिली होती ? हिंदुस्थानची कूपमंडूकवृत्ति सुटली पाहिजे. त्याशिवाय पुढें निभाव लागणार नाहीं.

---

# हिंदी नौकानयन

( केसरी, ता. ११ मार्च १९२४ )

ब्रिटिश ग्वायनांतील शिष्टमंडळाप्रमाणें हिंदी आगबोटीच्या कंपन्यांचें हितचिंतकहि दिल्ली येथें येऊन असेंब्लीच्या सभासदांच्या गांठी घेत आहेत. कारण त्यांनाहि ; हिंदी नौकानयनास जाचक असे कांहीं प्रतिबंध कायद्यानें दूर करून अनुकूल सवलती मिळवावयाच्या आहेत. सर्व सभासदांप्रमाणें ते हितचिंतक महाराष्ट्रीय कँपांमध्यें येऊन ग्वायनांतील बॅ. लख्खू यांचेप्रमाणें त्यांनींहि माहिती सांगितली व कांहीं हस्तपत्रकेंहि दिलीं, त्यावरून पुढील माहिती देत आहें.

हल्लीं हिंदी व्यापारी नौकानयन कमिटी बसवून आपला अहवाल लिहीत आहे. ही कमिटी नेमण्याचा ठराव असेंब्लींत ता. १२ जानेवारी १९२२

रोजीं सर शिवस्वामी अय्यर यांनीं मांडला. १९२२ च्या मार्चमध्यें ना. लल्लुभाई सामळदास यांनीं कौन्सिल ऑफ स्टेटमध्यें तशाच स्वरूपाचे दोन ठराव मांडले. या ठरावांस अनुसरून सरकारनें १९२३ च्या फेब्रुवारी महिन्यांत 'इंडियन मर्केंटाइल मरीन' किंवा हिंदी व्यापारी नौकानयन कमिटी नेमली. गेल्या नोव्हेंबरपासून या कमिटीनें आपल्या चौकशीस सुरुवात केली. चौकशीकरितां मुंबई, कराची, रंगून, मद्रास वगैरे ठिकाणीं हिंडून येऊन, आतां त्या कमिटीनें चौकशी पुरी केली आहे व रिपोर्ट लिहिण्याचें काम चालू आहे. कमिटींत लल्लुभाई सामळदास हे हिंदी व्यापाऱ्यांची बाजू मांडण्याकरितां नेमले गेले आहेत. सर आर्थर फ्रूम हे इंग्रजी व्यापाऱ्यांचे हितसंबंध रक्षण करणारे म्हणून त्यांची नेमणूक झालेली आहे. कॅप्टन हेडलंड हे नौकानयनांत दर्दी (एक्स्पर्ट) म्हणून, रंगाचार्य हे हिंदी लोकांचे हितसंरक्षक म्हणून, सर जॉन बेयेस हे नौका बांधण्याचे कामांतील तज्ज्ञ म्हणून व रॉय बंगाली व्यापाऱ्यांचे वतीनें म्हणून अशा नेमणुका या कमिटीवर झालेल्या आहेत. नेहमींच्या अनुभवाप्रमाणें या कमिटीच्या रिपोर्टांतहि हिंदी व युरोपियन सभासदांचे परस्परविरुद्ध रिपोर्ट होणार असा अंदाज आहे. कारण युरोपियन लोकांचें अर्थातच म्हणणें असें कीं, नौकानयनाचें बाबतींत सध्यां चालू असलेल्या योजनाच हिंदी लोकांना पुरेशा आहेत, त्यांत फारशी सुधारणा करण्याचें कारण नाहीं. हिंदी सभासदांचें याच्या अगदीं उलट मत पडणार. हल्लीं व्यापारांत बस्तान बसवून प्रबल बनलेल्या युरोपियन कंपन्यांच्या विरोधामुळें, सरकारनें निरनिराळ्या रूपानें साह्य केल्याशिवाय हिंदी व्यापारी नौकानयनाची आजची शोचनीय स्थिति पालटणार नाहीं, असें हिंदी कमिशनर आपल्या स्वतंत्र रिपोर्टांत लिहिणार आणि शेवटीं सरकार या युरोपियन सभासदांचा रिपोर्ट स्वीकारून हें प्रकरण आजपर्यंतच्या हिंदी लोकांच्या हिताच्या अनेक इतर प्रकरणांप्रमाणें दप्तरांत बांधून ठेवून देणार अशी भीति वाटते. म्हणूनच लोकनियुक्त प्रतिनिधींनीं आगाऊच सावध झालेलें बरें.

## प्राचीन हिंदी जहाजें

सरकार पुढें काय करणार हा प्रश्न पुढचा आहे. पण सरकारनें आतांपर्यंत हिंदी लोकांच्या उन्नतीकरितां कांहीं केलें नाहीं याची हजेरी हिंदी कमिशनर

घेतल्याशिवाय राहणार नाहींत उलट युरोपियन सभासद सरकारच्या औदा-सीन्याचें समर्थनच करतील असा अंदाज आहे. गेल्या ७० वर्षांत सरकारनें हिंदी नौकानयनाच्या बाबतींत कांहीं केलें नाहीं. हिंदी लोकांना नौकानयनाचे बाबतींत लागणारें धाडस नाहीं. असें पुष्कळ युरोपियन लोकांनीं या कमिटीपुढें दिलेल्या साक्षींत सांगितलें; पण ही गोष्ट साफ खोटी आहे. हिंदी लोकांच्या प्रगतीच्या आड ज्या नेहमींच्या नालायकीच्या सबबी येतात त्यांतलीच ही एक सबब आहे. शंभर वर्षांपूर्वी हिंदुस्थानांत उत्तम जहाजें तयार होत असून तीं चीन, जावा, सुमात्रा, दक्षिण-आफ्रिका वगैरे भागांशीं दळणवळण ठेवीत असत असा स्पष्ट पुरावा आहे. इतकेंच नव्हे तर हिंदुस्थानांत बांधलेलीं जहाजें हिंदुस्थानांतला माल घेऊन ब्रिटिश जहाजां-बरोबर लंडनपर्यंत जात होतीं. ट्राफल्गारच्या प्रसिद्ध लढाईंत हिंदुस्थानांत बांधलेलें एक जहाज होतें असाहि पुरावा सांपडतो. हीं जहाजें तयार करण्याचे हिंदी कारखाने, त्यांतील कुशल हिंदी कारागीर, लांबलांबच्या सफरी करणारे हिंदी धाडसी खलाशी व व्यापारी या सर्व गोष्टी कशा नाहींशा झाल्या? ज्या ईस्ट इंडिया कंपनीनें हिंदुस्थानची इतर कारागिरी बुडविली तिनेंच हिंदु-स्थानचा हा धंदाहि बुडविला. सन १८०१ सालींच कोर्ट ऑफ डायरेक्टर्सनें हिंदी जहाजें उपयोगांत आणण्याची बंदी करून टाकली! अजूनहि ही जुनी दर्यावर्दीपणाची धाडसी वृत्ति शंभर वर्षांच्या सुप्तावस्थेंतून जागृत होऊं शकेल. पण तिला संधि कोठें आहे? युरोपियन कंपन्या आपल्या जहाजांना हिंदी खलाशांचा विटाळहि होऊं देत नाहींत. फक्त 'पी. अँड. ओ.' ही एकच इंग्लिश कंपनी 'लास्कर' म्हणून हिंदी खलाशांना नोकरीस ठेवते. पण 'जन्मा आला हेला व पाणी वाहतां मेला' या म्हणीप्रमाणें त्यांचा सारा जन्म हलकीं कामें करण्यांतच जातो.

एकदां 'लास्कर' कीं जन्माचा 'लास्कर'. त्याची बढती जास्तींत जास्त म्हणजे ५० रु. दरमहापर्यंत पोंचवायाची. इंग्लिश खलाशांची कामावर लाग-ण्याच्या वेळींच हिंदी खलाशांपेक्षां दुप्पट पगारावर सुरुवात होऊन त्यांची झपाट्यानें प्रगति होते. शिवाय इंग्लिश खलाशांच्या मृत्यूनंतर त्यांच्या बायकापोरांना मदत करण्याकरितां इंग्लंडांत मोठमोठे फंड उभारलेले आहेत. हिंदी खलाशांकरितां तशी कांहींच तजवीज नाहीं. अशी परिस्थिति असतां या धंद्याकडे कोणाचेंहि लक्ष न जाणें साहजिक आहे. हल्लीं आहेत हे 'लास्कर'

सुद्धां युरोपियन लोकांना नकोसे होऊन 'इजित' बोट बुडाल्याचे वेळीं त्यांच्याबद्दल खोट्या बातम्या प्रसिद्ध करून त्यांचें या धंद्यांतून कायमचें उच्चाटन करण्याचा घाट रचला गेला होता, हें पुष्कळांना स्मरत असेल. पण पुढें चौकशी-कमिटी नेमली जाऊन ही बोट बुडण्याचे वेळीं हिंदी 'लास्करांनीं' कामचुकारपणा व भित्रेपणा तर दाखविला नाहींच, पण उलट असामान्य धैर्यानें व तडफीनें आपलें कर्तव्य केलें असा शेरा मिळाला आणि हा उच्चाटनाचा घाट फसला. आहेत त्या खलाशांची ही दशा, तेव्हां नवीन तयार करण्याच्या कामाकडे कोठलें लक्ष जाणार?

## युरोपियनांचा कावेबाजपणा

आंतरराष्ट्रीय व्यापारात हल्लीं हिंदी आगबोटी बिलकूल नाहींत असें म्हटलें तरी चालेल. परदेशांशीं दळणवळण ठेवणाऱ्या आगबोटींत हिंदी आगबोटींचें प्रमाण हल्लीं शेंकडा दोनहूनहि कमी आहे. आणि प्रत्यक्ष हिंदुस्थानच्या किनाऱ्यानें सफरी करणाऱ्या बोटींतहि हिंदी बोटींचें प्रमाण शेंकडा बारांहून जास्त नाहीं. हिंदी व्यापाऱ्यांत धाडस नाहीं, म्हणून ते आपल्या बोटी तयार करीत नाहींत. असेंहि म्हणतां यावयाचें नाहीं. कारण गेल्या २५ वर्षांत मुंबई, कलकत्ता, चितागांग, तुतिकोरीन, खंबायत वगैरे ठिकाणीं मिळून २० हिंदी आगबोटींच्या कंपन्या स्थापन करण्यांत आल्या, पण त्या सर्व बुडाल्या! यांत हिंदी व्यापाऱ्यांनीं आपलें लाखों रुपयांचें भांडवल पाण्यांत बुडविलें. इतक्या कंपन्या अपेशी होऊन बुडण्याचें कारणहि त्यांचा अवगुण हें नसून कित्येक वर्षांचें बस्तान बसवून गबर झालेल्या युरोपियन कंपन्यांनीं केलेली गळचेपी हेंच त्याचें कारण होय. कोणतीहि नवी हिंदी आगबोट कंपनी निघून तिच्या बोटी चालू झाल्या म्हणजे जुन्या युरोपियन कंपन्या भाड्याच्या दराची शर्यत सुरू करतात, ती इतकी कीं, शेवटीं फुकट उतारू नेणें किंवा उतारू फुकट नेऊन शिवाय वर त्यांना चणेकुरमुरे बक्षीस देणें येथपर्यंत त्यांची मजल जाते! आधींच नव्या हिंदी कंपन्यांचें भांडवल अल्प; आणि त्यांतच ही घातकी शर्यत किंवा गळचेपी सुरू झाली कीं त्या लवकरच टेकीस येतात. नव्या कंपनीचें एकदां दिवाळें वाजलें कीं, या जुन्या युरोपियन कंपन्या पुनः दर खूप चढवून या चढाओढींत झालेलें नुकसान सव्याज भरून काढतात.

## डिफर्ड रीबेट

हिंदी बोटींच्या कंपनीला मारून आपलें राखीव कुरण कायम ठेवण्यास युरोपियन कंपन्यांजवळ दुसरेंहि एक शस्त्र आहे, तें 'डिफर्ड रीबेट' हें होय. या डिफर्ड रीबेटच्या पद्धतीनें हिंदी व्यापारी युरोपियन बोटींच्या कंपन्यांस कायमचे बांधले जातात व त्यांची इच्छा असली तरी त्यांना हिंदी आगबोट कंपनीस मदत करणें जड जातें. डिफर्ड रीबेट म्हणजे तहकूब किंवा राखून ठेवलेली कसर. मालाच्या वाहतुकीबद्दल जें भाडें व्यापाऱ्यांकडून मिळतें त्यापैकीं सुमारें शेंकडा १० इतकी रक्कम अनामत म्हणून त्या व्यापाऱ्यांच्या नांवें बाजूला ठेवण्यांत येते. ही सहा महिन्यांत सांचलेली रक्कम त्याचे पुढील सहा महिन्यांत या व्यापाऱ्यानें आपला माल दुसऱ्या कोणत्याहि कंपनीच्या बोटींतून रवाना केलेला नसला तरच त्याला परत मिळतें, नाहीं तर ती जप्त होते. सहा-सहा महिन्यांच्या या राखीव कसरीचा वर्षांतून दोनदां ठराविक वेळेला बटवडा होतो. म्हणजे नव्या हिंदी कंपनीमार्फत एखाद्या हिंदी व्यापाऱ्यानें एकदां माल पाठविला, कीं त्याची युरोपियन बोट कंपनीकडे तत्पूर्वी सहा महिने जमा असलेली सर्व भाड्याच्या शेंकडा दहाइतकी रक्कम जप्त होते. केव्हांहि झालें तरी व्यापाऱ्याची कांहींना कांहीं रक्कम रीबेटच्या स्वरूपांत बोटीच्या कंपनी-कडे अडकून पडलेली असणारच आणि अशा रीतीनें तो त्या कंपनीस कायमचा बांधलेला असतो. ही राखीव कसरीची पद्धत पुष्कळ सुधारलेल्या देशांतून बेकायदेशीर ठरविण्यांत आलेली आहे व हिंदुस्थानांतहि ती बेकायदेशीर ठर-वावी अशी हिंदी व्यापाऱ्यांची मागणी आहे. या पद्धतीपासून युरोपियन आगबोट कंपन्यांचा फायदा होत असल्यामुळें त्या कंपन्या या पद्धतीचे अनेक फायदे दाखवीत असतात. परंतु अमेरिका व ऑस्ट्रेलिया या देशांत ही पद्धति नसूनहि तेथील आगबोटींच्या कंपन्यांची येथल्याप्रमाणेंच सर्व उत्तम व्यवस्था राहते. जे फायदे बाहेर डिफर्ड रीबेटच्या पद्धतीशिवाय मिळूं शकतात तेच हिंदुस्थानांत मिळत असल्यामुळें त्यांचा डिफर्ड रीबेट पद्धतीशीं बादरायण संबंध जोडतां येत नाहीं, हें उघड आहे.

डिफर्ड रीबेटच्या पद्धतीप्रमाणें व त्याला पोषक अशी दुसरी एक पद्धति युरोपियन आगबोट कंपन्या पुरातन काळापासून अमलांत आणीत आहेत. ती पद्धत म्हणजे 'शिपिंग रिंगची' होय. रिंग म्हणजे एकाच टापूंत व्यापार कर-णाऱ्या दोन-चार आगबोट कंपन्यांचा एक संघ होय. या संघाचें कार्य हें कीं,

कोणतीहि नवी कंपनी त्या टापूंत स्थापन होऊं द्यावयाची नाहीं. यांच्यांत करारमदार होऊन भाड्याचे दर वगैरे ठरलेले असतात व नवीन कंपनीला मारण्यांत होणाऱ्या नुकसानीची त्या आपापसांत प्रमाणानें वांटणी करून घेतात. बहुधा या संघाचे मिळून सामान्य असें डिफर्ड रीबेट असतें. म्हणजे जोंपर्यंत व्यापारी या संघांतील कंपन्यांच्या बोटींतून माल पाठवील तोंपर्यंत त्याचें रीबेट जप्त होत नाहीं. तो या संघांतील कंपन्यांच्या बाहेर गेला तरच तें जप्त होतें. 'डिफर्ड रीबेट'प्रमाणें 'शिपिंग रिंग' बनविणें हेंहि अमेरिका, ऑस्ट्रेलिया वगैरेसारख्या सुधारलेल्या देशांतून गैरकायदा ठरविलें गेलें आहे. आगबोट कंपन्यांचे हे संघ त्याला पोषक अशी राखीव कसरीची पद्धति या दोनहि गोष्टींचा उदय हिंदुस्थानांत झाला! सन १८७५ सालीं कलकत्ता येथें 'कलकत्ता शिपिंग' या नांवाची पहिली 'शिपिंग रिंग' स्थापन झाली. सन १८७७ सालीं याच रिंगनें डिफर्ड रीबेटची पद्धति अमलांत आणली व तिचा इतर ठिकाणींहि प्रसार झाला.

## उतारूंचे हाल

रेल्वेच्या तिसऱ्या वर्गांतील उतारूंच्या कहाणीप्रमाणेंच युरोपियन कंपन्यांच्या आगबोटींवरील 'डेक पॅसेंजर्स'ची कहाणी असून त्या बाबतींतहि गरीब हिंदी लोकांचें हाल वांचविण्याबद्दल सरकारनें आतांपर्यंत कांहीं केलें नाहीं. तिसऱ्या वर्गाच्या यात्रेकरू उतारूंना मालगाडीच्या वाघणींतून नेतात तशासारखाच 'डेक पॅसेंजर्स'चा हा प्रकार आहे. डेक पॅसेंजर घेण्याची पद्धत प्रथम मुदतबंदीच्या मजुरांची ने-आण करण्यांत सुरू झाली. मुदतबंदीनें नेले जाणारे मजूर पूर्वींच्या गुलामांच्याऐवजीं नवे गुलाम म्हणून समजले जात असल्यामुळें त्यांची प्रवासाची व्यवस्थाहि त्या कल्पनेस अनुरूप झाली. डेकवर थंडीवाऱ्यापासून निवारा नाहीं. धड ना अन्न ना पाणी अशी या बिचाऱ्या उतारूंची स्थिति असते. गेल्या तीस वर्षांत 'डेक पॅसेंजर'-विषयीं चौकशी करण्याकरितां एकंदर तीन कमिट्या झाल्या, पण कमिट्यांनीं रिपोर्ट लिहावे व सरकारनें ते दप्तरांत बांधून कपाटांत ठेवून द्यावे असाच प्रत्येक कमिटीचे बाबतींत अनुभव आला. शेवटची कमिटी सन १९२१ मध्यें नेमली होती तिचा रिपोर्टहि सरकारी दप्तरांत पडून आहे.

किनाऱ्यालगतच्या व्यापारांत दरसाल सुमारें १० कोटी व परदेशच्या व्यापारांत सुमारें ४० कोटी रुपये मालाचें भाडें होतें. यांपैकीं दोनहि मिळून सुमारें

पांचसहा कोटी हिंदी कंपन्यांच्या वांट्याला येत असतील. बाकीचे म्हणजे चाळीस कोटींच्या वर भाडें दरसाल युरोपियन कंपन्यांच्या खिशांत जातें. व्यापारी नौकानयनाच्या बाबतींत युरोपियन कंपन्यांचा सवता सुभा असल्यामुळें त्यांना वाटेल ते दर ठेवून अतोनात फायदा घेतां येतो. बहुतेक सर्व उतारू नेणाऱ्या युरोपियन कंपन्यांना भांडवलावर शेंकडा २५ इतका नफा होतो व भागीदारांना शेंकडा १५ इतकें डिव्हिडंड त्या देतात. यावरून त्यांच्या सवत्या सुभ्याची कल्पना येईल. शिवाय हिंदुस्थानांतून कच्चा माल बाहेर नेणें व बाहेरून पक्का माल आणणें सुलभ जावें, अशा रीतीनें मालाच्या वाहतुकीचे दर ठेवल्यामुळें हिंदुस्थानला परावलंबी ठेवण्यासहि या आगबोट कंपन्या बराचसा हातभार लावतात.

## सरकारी मदत

असो. आतांपर्यंत ही थोडक्यांत वर्णन केलेली सर्वच बाबतींतील शोचनीय स्थिति सुधारण्यास सरकारी मदतीशिवाय तरणोपाय नाहीं. इंग्रजांची नौकानयनांतील प्रगति आपोआप स्वतंत्रपणें सरकारची मदत घेतल्याशिवाय झाली असेंहि कित्येक युरोपियन व्यापाऱ्यांनीं मर्कंटाइल मरीन कमिटीपुढें झालेल्या साक्षींत सांगितलें, पण तें साफ खोटें आहे. इंग्लंडच्या इतिहासांतील 'नॅव्हिगेशन लॉज्' सर्वांच्या परिचयाचे आहेतच. इंग्लंडनें समुद्रावरील वर्चस्व या कायद्याच्या साह्यानें मिळविलें व अजूनहि पोस्टाची ने-आण करण्याचीं कंत्राटें देणें, पुढें बोटीवर जाणाऱ्या मालास रेल्वेचे दर कमी ठेवणें, किनाऱ्यालगतच्या दळणवळणांत परदेशी बोटींना येऊं न देणें इत्यादि साधनांनीं खुद्द इंग्लंडांतहि आजमितीस नौकानयनास सरकारी मदत मिळते. इतर देशांतून तर उघड उघड बौंटी देण्याचीहि पद्धत प्रचलित आहे. विलायती कंपन्या असल्या म्हणजे त्या विलायती व्यापाऱ्यांस अधिक सवलती देणार, विलायती कंपन्यांकडेच इन्शुअर करणार, विलायती कंपन्यांकडून बोटींची दुरुस्ती वगैरे करविणार व विलायती खलाशांचें हितसंबंध अगोदर पाहणार; या सर्व गोष्टी ओघानेंच प्राप्त होतात व या प्रत्येक बाबतींत हिंदी लोकांचें नुकसान होतें.

ही सर्व स्थिति सुधारण्यास (१) 'डिफर्ड रीबेट' व 'शिपिंग रिंग' बेकायदेशीर ठरविणें, (२) हिंदुस्थानच्या किनाऱ्यावरील व्यापार फक्त हिंदी बोटींनाच राखून ठेवणें, (३) हिंदी बोटींच्या कंपन्यांना बौंटी देणें, (४) खलाशांच्या व नौकाबंधनाच्या शिक्षणाची व्यवस्था करणें असे उपाय हिंदी

व्यापारी सुचवीत आहेत. त्यांनीं यासंबंधीं निश्चित योजना व कायद्यांचे मसुदे खर्चांच्या हिशेबांसह तयार करून हिंदी व्यापारी नौकानयन कमिटीपुढें मांडलेलेहि आहेत. पण सरकारची इच्छा असेल तर कार्य घडेल. नाहीं तर कमिट्या-कमिशनें यांचा नेहमींचा कटु अनुभव आहेच. बौंटी देणें व शिक्षणसंस्था काढणें यांत खर्चाची तरी अडचण आहे. हा खर्च कशा रीतीनें भरून काढावा याच्या योजना हिंदी व्यापाऱ्यांनीं सरकारपुढें मांडलेल्या आहेत. पण त्या अनिश्चित व जोखमीच्या गोष्टी म्हणून सोडून दिल्या तरी किनाऱ्यालगतचा व्यापार हिंदी लोकांस राखून ठेवणें व कसरतहकुबीची व संघाची पद्धति कायद्यानें बंद करणें यांत सरकारला खर्चहि करावयाचा नाहीं. त्यासंबंधीं बिलेंहि लवकरच असेंब्लींत येणार आहेत. तीं पास होऊन अमलांत येऊन हिंदी नौकानयनाचें केव्हां नशीब उघडेल तेव्हां उघडेल.

---

# दिल्लीचीं बातमीपत्रें

## पत्र नं. १

ता. २१।१।२५

असेंब्लीच्या नव्या बैठकीला ता. २० रोजीं दिल्ली येथें सुरुवात झाली. तिच्या आधीं यावे तितके प्रतिनिधी यंदा आले नव्हते. बरेच बंगले परवां-पर्यंत रिकामे असे दिसत. पण गतवर्षापेक्षां यंदा बंगल्यांची संख्या बरीच वाढली आहे यामुळेंहि असें भासण्याचा संभव आहे. नव्या दिल्लींतील सर्वच नव्या इमारतींचें काम झपाट्यानें सुरू असून कदाचित् पुढच्या वर्षी कौन्सिलची सभागृहें व वड्या लाटसाहेबांचा बंगला यांचा प्रवेशसमारंभ एकदमच होईल. नव्या इमारतींचें काम पुरें झालें म्हणजे सर्व कचेऱ्या सिमल्याहून उठवून कायमच्याच दिल्लीस आणतात कीं काय पाहावें. तसें झाल्यास नव्या दिल्लीवर खर्च होणाऱ्या तेरा कोटी रुपयांचा कांहीं तरी उपयोग झाला असें म्हणतां येईल. पण आनुभविक हिंदी नोकर म्हणतात कीं, वरील व्यवस्था झाली तरी सिमल्याचा खर्च मात्र त्या प्रमाणानें कमी होणार नाहीं. काळ्यांना उन्हाळ्यांत दिल्लीच्या कडक हवेंत राबावें लागेल; पण गोऱ्या नोकरांचीं नसतील

तीं कामें निघून त्यांच्या सिमल्याच्या येरझारा हल्लींहून अधिक सुरू होतील व भत्त्याचीं बिलें बेसुमार फुगूं लागतील !

* * *

कौन्सिलच्या सभासदांना दिल्लीस लवकर येण्याकरितां आमिष म्हणून नव्हे, पण त्यांच्या येण्याच्या वेळींच तोफांचीं सलामी मिळण्याचा योग मात्र यंदा आपोआप आला खरा ! ही सलामी लष्करी युद्धाच्या एका रंगीत तालमींत घडून आली. हें युद्ध अर्थात् काल्पनिक होय. पण त्याचा प्रकार असा— पंजाब व संयुक्त प्रांत यांच्या दरम्यान ता. २५ डिसेंबर रोजीं युद्ध पुकारण्यांत आलें. राजपुताना हा पंजाबचा मित्र असून संयुक्त प्रांताचा हेवा करीत असे. त्यानेंहि आपलें सैन्य सज्ज केलें, पण तो प्रथम युद्धांत प्रत्यक्ष सामील झाला नाहीं. युद्ध सुरू होतांच दिल्लीच्या राजधानीचें रक्षण कसें करावें ही संयुक्त प्रांताला चिंता येऊन पडली. तेव्हां त्यानें रोहतकच्या रोखानें कांहीं सैन्य पंजाबी शत्रूच्या तोंडावर पाठवून मिळालेल्या वेळांत आपलें इतर सैन्य दिल्लीच्या आघाडीस आणलें. ता. १२ जानेवारी रोजीं बहादुरगडच्या लढाईंत संयुक्त प्रांताच्या फौजेचा पराभव होऊन तिला दिल्लीवर मागें हटावें लागलें. ही संधि साधून राजपुतान्याच्या सरकारनें दिल्ली सरकाराविरुद्ध युद्ध पुकारलें. अशा स्थितींत ओखला येथील यमुनेचा पूल काबीज करण्याकरितां उभयपक्षीं धडपड चालू झाली— अशी ही एक कपोलकल्पित कादंबरी आहे !

* * *

लटुपटीच्या या युद्धांतील पंजाबचें सैन्य अदृश्यच होतें व ओखला येथें यमुनेवर खरा पूलहि नव्हता ! पण लष्करी जवान व युद्धसामुग्री यांना तालीम देण्याकरितां उभारलेल्या या खेळांत सुमारें वीस हजार सैन्य गुंतलें असून ता. १९ रोजीं तोफखान्याची खरीखुरी सरबत्ती दीड तास मधून मधून होत होती. गुरगांवच्या आसपास डोंगराळ प्रदेशांत लहान-मोठ्या ८२ तोफा व अनेक मशीन गन्स सकाळीं ९ वाजतां सज्ज झाल्या व दक्षिण-पश्चिम कोपऱ्यांकडे तीन मैल दूरवर आणि दोन मैलांच्या रुंद पट्ट्यावर त्यांनीं भडिमार सुरू करून शत्रूस मागें खेचून आणलें व पायदळ पुढें चालून जाण्यास मदत केली. हा प्रकार आम्ही वर्तमानपत्रांचे प्रतिनिधि एका डोंगरपठारावरून मांड्या ठोकून पाहत बसलों होतों ! 'युद्धस्य कथा रम्या' तर खरीच, पण त्याहिपेक्षां लटुपटीच्या खेळांतीलच का होईना पण युद्धदर्शन अधिक रम्य होय यांत शंका नाहीं.

मशीन गन्सचा कडकडाट होई तेव्हां पृथ्वीच्या पोटांतला तापलेला रससमुद्र उकळी फुटून वर येतोसा वाटे. आमच्या डोक्यांवरून जाणारे तोफांचे गोळे गोफणीच्या दगडासारख्या आवाज करीत. अंतराळीं फुटून अग्निवर्षाव करीत आणि पडल्याजागीं धुराचे लोळ उठवीत. शेवटच्या सरबत्तीच्या वेळीं सगळ्या तोफा एकदम डागल्या गेल्या, तेव्हां तर त्यांच्या तोंडच्या आगीची रांगच्या रांग पाहावयास मिळाली.

* * *

कौन्सिलचे सभासद व वर्तमानपत्रांचे बातमीदार यांच्या साक्षीशिवाय खरीं युद्धें होऊं शकतात. पण खोट्या लढायांना त्यांच्या सान्निध्याशिवाय मौज येत नाहीं. त्यांतूनहि अलीकडे लष्करी खात्याला मुलकी खात्याप्रमाणें आपल्या कामकाजाची हकीकत प्रसिद्ध करण्याची जरूरी भासूं लागली म्हणून म्हणा किंवा आवड उत्पन्न झाली म्हणून म्हणा, पाहणारा दिसला कीं मोर जसा आपला पिसारा उभारतो म्हणतात, त्याप्रमाणें ऐकणारा भेटला कीं, आपल्या उपयुक्ततेचें पुराण बाचण्यास या खात्यानें सुरुवात केली आहे. या खात्याच्या वतीनें कर्नल क्रॉफर्ड नांवाचे एक अधिकारी १९२१-१९२२ सालांत पुण्यास मधून मधून येत असत. स्वतः माझे घरीं त्यांनीं दोनतीन वेळां येऊन लष्करी खात्याची माहिती देण्याचा प्रयत्न केला व असाच अनुभव इतर कित्येक वर्तमानपत्रकारांसहि असेल. तोच क्रम अजूनहि इतर रीतीनें सुरू आहे. पण हा प्रयत्न व्यर्थ होय. कारण लष्करी खात्याची जरूरी नाहीं असें कोणीच म्हणत नाहीं. तसेंच पदरीं सैन्य ठेवावयाचें तर तें तरतरीत, सज्ज व साधन-संपन्न असलें पाहिजे हेंहि खरें पण या सैन्यांत गोऱ्या सैनिकांचें व अधिकाऱ्यांचें संख्याबल हल्लींइतकें असलेंच पाहिजे व त्यांचा पगारहि इतका मोठा हवाच याविषयीं कोणाची कशी खात्री होणार ? लष्कराच्या हालचाली पाहून व तोफांची सरबत्ती ऐकून क्षणभर आश्चर्य वाटेल. पण त्या पहात व ऐकत असतां हिंदुस्थानच्या संरक्षणापेक्षां त्याच्या लुटीची कल्पनाच मनावर अधिक ठसते व हा अनुभव परवांच्या काल्पनिक रणांगणवरहि हिंदी प्रेक्षकांना आल्याशिवाय राहिला नाहीं.

* * *

जंगी लाटांच्या (सेनापतींच्या) या रंगीत तालमींचें जुळें भावंड म्हणजे मुलकी लाटांचा (व्हाइसरॉयसाहेबांचा) दरबारसमारंभ. तो ता. २० रोजीं

असेंब्लीच्या दिवाणखान्यांत झाला. या नाटकाचें वर्णन मीं गतवर्षीं केलेंच आहे. तोच प्रकार यंदा घडला. पण यंदा विशेष गोष्ट ही कीं, गतवर्षीं-पेक्षांहि लाटसाहेब अधिक गुर्मीत दिसले. गुर्मी अधिक दाखविण्याला कारण का, तर त्यांच्या हातून यंदा गतवर्षीपेक्षांहि अधिक अपकृत्यें घडलीं आहेत. खून करण्याचा इरादा मनांत असणाऱ्या मनुष्यापेक्षां खून करून तो अंगावर चढलेला मनुष्य अधिक बेगुमान असतो. अराजक चळवळीच्या सबबीवर प्रजेच्या नैसर्गिक स्वातंत्र्याचा खून करणारें ऑर्डिनन्स काढणाऱ्या अधि-काऱ्यास, त्याचा जाब देण्याची वेळ आल्यावर त्यानें बेगुमानपणाच्या व बिन-मुर्वतखोरपणाच्या नाटकी देखाव्यावर वेळ मारून नेण्याचा प्रयत्न करावा हें योग्यच आहे. पण कित्येक प्रेक्षकांना असेंहि वाटलें कीं, व्हाइसरॉयांचें दिमाखदार भाषण हें त्यांच्या खऱ्या धैर्याचें चिन्ह नसून तें मनांतून चल-बिचल व फजित झाल्याचेंच चिन्ह होय. रानांतून जाणारा प्रवासी मनांतून भ्यालेला असतो म्हणूनच तो तोंडानें शीळ घालून धिटाईचा बहाणा करतो, गाण्याच्या शोकानें नव्हे ! दारूनें झिंगलेला मनुष्यहि तोंडानें इतरांस बज-बजावून म्हणतच असतो " हां, मी पेलो न्हें ! "

* * *

लाटसाहेबांच्या या दरबाराला यंदा कित्येक लोक हजर असावयाचे ते नव्हते व कित्येक हजर नसावयाचे ते होते. स्वराजिस्टांपैकीं कित्येक असेंब्लीचे सभासद असतांहि या दरबारला मुद्दाम गेले नाहींत. अकल्पित प्रेक्षकांपैकीं प्रिन्स आर्थर ऑफ कनॉट व मौ. महंमदअल्ली हे होत. प्रिन्स आर्थर हे पत्नीसहवर्तमान व्हाइसरॉयसाहेबांच्या खास गॅलरींत बसले होते. मौ. महंमदअल्ली हे एका सभासदाकडून तिकीट मिळवून माडीवर इतरेजनां-च्या गर्दीत बसलेले दिसले. ते वर्तमानपत्राचे प्रतिनिधि म्हणून आले नसून कौन्सिलची गंमत पाहावयासच अर्थात आले होते. अजूनहि त्यांना कौन्सिलां-त जाणें हें हरामच वाटतें ! अजूनहि ते इंग्रज सरकारचें राज्य 'राज्य' असें जुमानीत नाहींत, पण 'कौन्सिलांत जाणें' हें निदान एका अर्थानें तरी त्यांना आतां हराम वाटत नाहीं ही गोष्ट परवां त्यांनींच जगाला जाहीर केली. खालून जम्नादास मेथा अल्लींना म्हणाले, 'हं ! आपण इकडे वाट कशी चुकलां ?' अल्लींनीं नेहमींच्या पद्धतीनें उत्तर दिलें ' To look down upon you ' ( तुमच्यासंबंधानें तुच्छता प्रदर्शित करावयाला सहज इकडे

आलों ), पण स्वराजिस्टांबद्दल तुच्छता प्रदर्शित करावयाला कौन्सिलांत प्रवेश करून घेणें सोपें आहे तितकें खिलाफत फंडाचा हिशेब देण्याकरितां स्वर्गांत प्रवेश करून घेणें मात्र सोपें नाहीं. केवळ मुसलमान असल्यानें त्यांना आपण गांधीपेक्षां श्रेष्ठ आहों असें तोंडानें म्हणतां येईल. पण सगळ्याच मुसलमानांना स्वर्ग मिळतोच असें नाहीं. तेथेंहि निवड करून तरतमभाव चालविण्याला कोणी चित्रगुप्त असणारच !

* * *

काल-परवांपासून नॅशनॅलिस्ट पक्ष व स्वराज्य पक्ष यांच्या खासगी सभा भरूं लागल्या, पण संघटित कार्याची स्थिति जवळ जवळ पूर्वीसारखीच आहे. म्हणजे एकीचा खरा जोर असावा तितका नाहीं. मुसलमान सभासद सभांना फारसे येत नाहींत. पण येतात ते निमूटपणें वागतात. स्वतंत्र पक्षांतील हिंदु सभासदांना स्वातंत्र्याचे गुण गतवर्षीपेक्षां यंदा अधिक आठवूं लागले आहेत. विद्यार्थ्यांच्या वर्गांत सर्वांत अधिक हुशार असणाऱ्या मुलाबरोबर वर्गाची प्रगति न होतां सर्वांत मद्ड असणाऱ्या मुलाच्याबरोबरच ती व्हावी लागते असा अनुभव येथेंहि येत आहे. यामुळें स्वराज्य पक्षालाहि असें वाटूं लागलें आहे कीं, या स्वतंत्र लोकांची मदत मिळेल तेव्हां घ्यावीच, पण ती न मिळेल तेव्हां आपणहि आपल्या पक्षाला योग्य वाटेल तें धोरण स्वतंत्रपणें अमलांत आणावें, पूर्वीप्रमाणें थांबून अडून बसूं नये. नॅशनॅलिस्ट पक्षाच्या वागणुकी-संबंधानें नवे नियम बनविण्याकरितां एक कमिटी नेमण्यांत आली असून या नवीन मसुद्यांत उभयपक्षांना फुटून वागण्याची सवड पूर्वींहून अधिक मिळाली तर तें एका अर्थानें बरें होईल. कारण स्वराज्य पक्षाचें स्वतःचें बहुमत असेंब्लींत नसलें तरी त्यांना स्वतःला योग्य दिसेल तसें वर्तन करण्यास जी आडकाठी अशी होती ती नाहींशी होईल. बंगाल्यांतील ऑर्डि-नन्सच्या संबंधांतच नॅशनॅलिस्ट पक्षाच्या संघटनेची खरी कसोटी दिसून येईल असें वाटतें ! कारण चालू आठवड्यांत असेंब्लीपुढें येणाऱ्या बिलांत व ठरावांत तीव्र मतभेदाचा असा इतर प्रसंग आज दिसत नाहीं.

* * *

मुंबईस नुकताच जो अत्याचार झाला तो या राजधानीच्या शहरीं सहजच चर्चेचा विषय होऊन बसला आहे. सर्व लोक इंदूरकर महाराजांना रागानें नांवें ठेवीत आहेत; इतकेंच नव्हे, तर अखिल संस्थानांच्या अस्तित्वावर

तिलांजलि वाहण्यास मनांतून तयार झालेले लोक-सत्तावादी या निमित्तानें हें संस्थान खालसा झालें तर बरें, असें म्हणतांनाहि ऐकूं आलें! पण त्यांना हें कळत नाहीं कीं, दोषारोपशाबितीनंतर महाराजांना वाटेल ती योग्य शिक्षा व्हावी; त्यांच्याकरितां एकादें कुत्रेंहि हळहळणार नाहीं; पण गुन्हा शाबीत होईपर्यंत तरी धीर धराल कीं नाहीं? आणि व्यक्तिशः संस्थानिकाच्या गुन्ह्याकरितां जर संस्थान खालसा करावयाचें तर जनरल डायरनें जालियांवालाबागेंत कत्तल केली त्या गुन्ह्याबद्दल इंग्रज सरकारचें राज्यच खालसा कां करूं नये? मुमताझ बेगमेच्या दुःखापेक्षां पंजाबच्या वीरनवालीचें दुःख सर्वच दृष्टींनीं हृदयास अधिक पाझर फोडणारें होतें. पण हल्लीं या खटल्यांतील मनोवेधक वार्ता देऊन पानेंच्या पानें अडविणाऱ्या इंग्रज वर्तमानपत्रकारांनीं वीरनवालीच्या वतीनें एक टाकभर तरी शाई खर्च करावयाची होती! होळकर सरकारचा एक मार्मिक टीकाकार मला म्हणाला, " इंदूरकर वेडे! त्यांनीं टिळक व गांधी अशांच्याविरुद्ध बोंबाबोंब करून व अराजक चळवळ हाणून पाडण्यास सरकारला मी मदत करतों असा बहाणा करून, त्याकरितां एखादें उपद्व्यापी खातें आपल्या संस्थानांत, स्वतः ते वयांत आल्यापासून, ठेवलें असतें म्हणजे त्यांना असले शंभर गुन्हे माफ झाले असते!"

## पत्र नं. २

ता. २९।१।२५.

मुंबईच्या ठरावाप्रमाणें ऐक्य-परिषदेची जी सभा दिल्लीस भरावयाची होती ती ता. २३।२४ रोजीं भरली. तिची हकीकत निराळी सविस्तर पाठविली आहे; तथापि तिजवरून वाचकांना या परिषदेंत काय फलश्रुति निघाली याची खरी कल्पना येणार नाहीं. कारण त्यांनाच्यशी काय पण येथें असणारांनाहि ती अद्यापि आली नाहीं याचें कारण कमिटीचा रिपोर्ट ता. १५ फेब्रुवारीपर्यंत प्रसिद्ध किंबहुना तयारहि होणार नाहीं; व त्यानंतर मार्च महिन्यांत फिरून ऐक्य-परिषदेची खास सभा भरणार! हल्लींच्या चिन्हांवरून या परिषदेपासून खरें ऐक्य असें फारसें निष्पन्न होईल असें वाटत नाहीं, कारण मुसलमानांना लखनौच्या तहाची दुरुस्ती होऊन; आहे तें राहावेंच पण आणखी मिळावें असें वाटत आहे. उलट गेल्या आठ वर्षांत जातवार मतदारसंघानें फारच धुमाकूळ घातला व त्यामुळें झाला इतका गोंधळ पुरे झाला असें हिंदु पुढाऱ्यांपैकीं कांहींना वाटूं लागलें आहे. पण कोणी कांहींहि म्हटलें तरी जातवार

प्रतिनिधित्वाचें भूत एकदां बोकांडीं बसलें तें निघणें कांहीं दिवस तरी शक्य नाहीं. उलट त्याला आपल्या 'झाडाला' किती 'छळून' घ्यावयाचें असेल तितकें तें एकदां घेवो म्हणजे मग त्याची 'गति घेण्याची' वेळ आपोआप येईल असें कांहीं समंजस लोकांनाहि वाटूं लागलें आहे. दोषी ताप मुदत पुरी झाल्याशिवाय हटत नाहीं, म्हणून त्याला दरम्यान औषधहि द्यावयाचें नाहीं असा डाक्तरी नियम आहे. त्याप्रमाणें जातवार मतदारीची हौस एकदां सर्वांची पुरी फिटली व तिचे दुष्परिणाम पुरे कळून आले म्हणजे जातवाले लोकच म्हणूं लागतील कीं, झाला हा खेळ पुरे झाला. आतां नजर थोडी मोठी करूं या व विस्तृत राष्ट्रीय भावनेनें देशाकडे पाहूं या.

* * *

हिंदु-मुसलमानांच्या समेटाचा येथील प्रयत्न फसल्यास पुनः अशा प्रयत्नांत कोणी वेळ घालविणार नाहीं इतकाच त्यांत लाभ मानावयाचा. चालू प्रयत्नांत महात्माजींचें या प्रश्नावरील मत कळून आलें व त्यांतहि त्यांचा एकांगीपणाच दिसून आला. कारण जातवार मतदारसंघ ही गोष्ट राष्ट्रहिताला विघातक आहे असें त्यांनीं आपलें मत प्रकट करूनहि फिरून उपदेश हाच केला कीं, एकीसाठीं मुसलमान मागतील तें सर्व कांहीं त्यांस द्या! अर्थात् एकी ही उभयपक्षांना इष्ट असतां ती साध्य होण्याची किंमत मात्र एकट्या हिंदूंनींच द्यावी असेंच झालें म्हणावयाचें! "आधीं बोलेल त्यानें दोन खावेत व मग बोलेल त्यानें तीन खावेत" अशी एक गोष्ट लहान मुलें सांगत असतात, त्याचप्रमाणें हिंदूंना ऐक्याची अधिक चाड म्हणून त्यांनीं अधिक हार खावी व मुसलमानांनीं फक्त असमंजस म्हणवून घेतलें म्हणजे त्यांचें काम संपलें; त्यांना दुसरा कांहीं एक स्वार्थत्याग करावयास नको असाच याचा अर्थ होत नाहीं काय? जातवार मतदारसंघ वाईट तर ते सोडून देण्याबद्दल महात्माजींनीं मुसलमानांस उपदेश कां करूं नये, असा प्रश्न सहजच सुचतो. पण त्याचें उत्तर कोण देणार? आपणास मुसलमानांचे पक्षपातीं म्हणतात ही गोष्ट हल्लींच्या वाटाघाटींत खुद्द गांधींच्याहि कानांवर गेली आहे. दिल्लींतील आर्यसमाजिस्ट गांधीजींना 'मिया महंमद मसलिम नवाजखां' असें म्हणतात. पण चुकून एका तरी मुसलमानाला 'पंडित महंमद शर्मा' असें नांव थट्टेनेंहि मिळण्याइतकें त्यांचें हिंदुपक्षपातित्व प्रकट होत नाहीं हें आश्चर्य नव्हे काय?

* * *

पोटकमिट्या नेमून विचारविनिमय करण्यास सुरुवात झाली व अजूनहि तो विनिमय सुरूच आहे. हिंदुमहासभेनें नेमलेली कमिटी वेगळी बसून आपला विचार करते. स्वराज्यघटनेची कमिटी वेगळी बसून आपला विचार करते. पण एवढ्यानेंहि न भागल्यामुळेंच कीं काय हिंदु-मुसलमानांच्या पोटकमिटीची फिरून त्यांतलीच एक उप 'पोट' कमिटी नेमिली जाऊन ती हकीम अजमलखान यांच्या घरीं दारें लावून बसूं लागली आहे. इकडे पर-गांवांहून आलेले लोक कंटाळून आपआपल्या गांवीं जाऊं लागले असल्यामुळें "पांडव किती, तर बाजल्याच्या खुरांइतके तीन" म्हणून हातानें दोन बोटें दाखविण्याची वेळ आली आहे! अर्थात् मोठी परिषद मार्च महिन्यापर्यंत पुढें ढकलण्याशिवाय गत्यंतर उरलें नाहीं. बेझंटबाईंचा मात्र निश्चय कायम ठरलेला दिसतो. मार्च अखेर त्या आपलें बिल घेऊन विलायतेस जाणार व आपल्या मित्रमंडळीच्या द्वारें तें पार्लमेंट-सभेपुढें मांडणार. मग त्यावर ऐक्य-परिषदेचा छाप असो वा नसो; हिंदुस्थान त्याला आपलें म्हणो वा न म्हणो. म्हणूनच इतर बाबतींत बाईंशीं कोणाचा कितीहि मतभेद असला तरी त्यांच्या एकनिष्ठेबद्दल व उद्योगाबद्दल उलट मताच्या मनुष्यालाहि आदर वाटल्यावांचून राहत नाहीं.

* * *

असेंब्लीच्या कामाचा खरा पहिला दिवस तारीख २२ रोजीं पडला. त्या दिवशीं बंगाल ऑर्डिनन्सबाबत वाद उपस्थित करून आपली नापसंती व्यक्त करावी असें स्वराज्य पक्षानें ठरविलें होतें. परंतु गृहमंत्री मुडिमन यांनीं वारा कसा वाहत आहे हें पाहून या विषयाच्या चर्चेला स्वतंत्र दिवस देण्याचें ठरविलें. यामुळें त्या दिवशीचा वाद शमला. तो ठरलेला दिवस ता २८ रोजीं मिळाला, पण त्याहि दिवशीं चर्चा पुरी न झाल्यानें पुढील आठवड्यांत आणखी एक दिवस या कामाला मिळणार आहे. या विषयावरील ठरावाची सूचना अनेकांनीं पाठविली होती; परंतु सोडतींत दोरास्वामी आय्यंगार यांचें नांव निघाल्यानें तो ठराव मांडण्याचें काम त्यांचेवरच पडलें व त्यांनीं तें फार चांगल्या रीतीनें बजाविलें. आपला अर्थ न गमावतां अस्खलित व वजनदार भाषेंत त्यांनीं आपली बाजू मांडली. त्यावर झालेल्या भाषणांत पाल यांचें भाषण विसंगत व बिनवकिली थाटाचें, कर्नल क्रॉफर्ड यांचें कांहीं पाल्हाळिक व

कांहीं धमकीवजा आणि जिना यांचें पोकळ ऐटदार असें झालें. सर मुडिमन यांनीं क्रिमिनल लॉ अमेंडमेंट बिलावरील जुन्या भाषणाचीच जवळ जवळ पुनरुक्ति केली. ते तरी दुसरें काय करणार? इकडे व्हाइसरॉय व लिट्नशहा नवा कायदा करून प्रतिष्ठित हिंदी गृहस्थांना अटकेंत ठेवून बसले. पण अद-मासाप्रमाणें बंगल्यांत नवे गुन्हे होत नाहींत, बॉंबगोळे फुटत नाहींत, पिस्तुलें उडत नाहींत व कटांच्या खऱ्याखोट्या नाटकांचा दर्शनी पडदा वर जात नाहीं. अर्थात् या कायद्याचा भावी उपयोग नाहीं. म्हणून, 'गुन्हे थांबले हेंच या कायद्याचें कार्य' अशी बतावणी करून सरकारला वेळ मारून न्यावी लागत आहे. नव्या वकिलानें दारावर नांवाची पाटी लावून दिली तरी कोर्टांत त्याच्या पाठीमागें कुळें किंवा अशील दिसत नाहींत तें कां, असें कोणी विचारल्यास, "मी माझ्या कुळांना आपसांत खटला तोडण्याची शिफारस करून त्यांना परत लावून देत असतों" असें वकिलाला सहजच खोटें सांगावें लागतें! तोच प्रकार ह्या कायद्यासंबंधाचा आहे. ऑर्डिनन्सला बंगालच्या कौन्सिलानें मंजुरी दिली असती म्हणजे मग त्याची मिजास पाहण्याजोगी झाली असती. पण त्याला दारांतच अपशकुन झाल्यानें आतां खुद्द बादशहांच्या मंजुरीची स्वारी वाजत गाजत निघाली तरी तिच्याकडे कोणी ढुंकूनहि पाहणार नाहीं. असेंब्ली-पुढें रीतसर बिल मांडून ऑर्डिनन्सच्या गांधर्व विवाहाला सालंकृत कन्या-दानाच्या ब्राह्मविधीचें स्वरूप द्या अशा अर्थाचा दोरास्वामी यांचा ठराव मंजूर झाला तरी सरकार तशी गोष्ट करणार नाहीं. पण ऑर्डिनन्सचें कार्य पुरें पडण्याला हायकोर्टाच्या नव्या अधिकाराबाबत एखादें बिल सरकारला असेंब्लीपुढें आणावें लागेल. अर्थात् या विषयाची उजळणी होण्याला ती आणखी एक संधि मिळेल.

* * *

असेंब्लींतील दुसरा वादग्रस्त विषय म्हटला म्हणजे चलनी नाणें, हुंडणा-वळ वगैरेसंबंधाचा. या विषयाची चर्चा एकदां तारीख २२ रोजीं सर बेसिल ब्लॅकेट यांच्या बिलाच्या कारणानें आणि तारीख २३ व २७ रोजीं खासदार व्यंकटपति राजू यांच्या ठरावाच्या कारणानें अशी दोन वेळां झाली. पैकीं राजू यांचा ठराव मंजूर झाला, पण ब्लॅकेट यांच्या बिलाचें काय होणार याचा आज-तारखेपर्यंत अदमास लागलेला नाहीं. याचें कारण असें कीं, चलनी नाणें, नोटा व गंगाजळी ठेवी यांचा खेळ सरकार आपल्या हातीं ठेवून प्रजेचें

नुकसान करतें याविषयीं सर्व पक्षांचें एकमत असलें तरी बिलाच्या हातांत व्यापाऱ्यांना देण्याचा खाऊ असल्यामुळें बिलाला विरोध करण्याचे कामीं त्यांची व त्यांचें पाहून इतर कित्येकांची चलबिचल होत आहे ! झाडलें तर पळतें व धरलें तर चावतें, अशी स्थिति या सभासदांची झाली आहे. या दोनहि विषयांवरील भाषणांत सर बेसिल ब्लॅकेट यांच्या युक्तिवादाचें अंग बरेंच ठिकाणीं उघडें पडलें. सर कॅम्बेल ऱ्होडस यांचें भाषण थट्टेवारीं गेलें; सर पुरुषोत्तमदास यांनीं आपल्या मताचा पुरस्कार करण्यापेक्षां ऱ्होडस यांचीं हजेरीच अधिक घेतली; रामचंद्रराव यांनीं नेमस्तांच्या कार्यपद्धतीचा एक नमुना दाखविला व जम्नादास मेहता व डॉ. लोहोकरे यांनीं मूळ विषयाला लागू पडतील असे अनेक मुद्दे मांडले.

* * *

अपुऱ्या राहिलेल्या विषयांच्या यादींतला रेल्वे-नोकरांच्या गाऱ्हाण्यांचा ठराव तिसरा होय. हा मद्रासचे श्रीयुत आचार्य यांच्या गळ्यांत सोडतीनें घातला. तो मूळ नारायण मल्हार जोशी यांचा होता. या ठरावावरील चर्चेची बरीच खिचडी झाली. कित्येक उपसूचना गैरलागू म्हणून काढून टाकण्यांत आल्या, व डॉ. लोहोकरे यांच्या उपसूचनेला आचार्यांनीं आपल्या ठरावांत समाविष्ट करून घेतल्यामुळें ती तेवढी बचावली. अपुरा राहिलेला चौथा ठराव आसामच्या सिल्हट व कचार या दोन जिल्ह्यांचा. हा देखील सोडतीच्या खेळामुळें श्रीयुत माधवराव अणे यांच्या गळ्यांत पडला ! पण त्यांनीं जातीची वकिली व आसामी लोकांबद्दल बंधुप्रीति ही आपल्या भाषणानें चांगली प्रत्ययास आणलीं. असेंब्लींतील सोडतीचा खेळ म्हणजे काय याचा अर्थ पुष्कळ वाचकांना उमजणार नाहीं. पण थोडक्यांत समजावून सांगण्यासारखाहि तो विषय नाहीं म्हणून तो केव्हां तरी वेगळाच लिहीन. तोपर्यंत इतकेंच सांगावयाचें कीं, सोडत म्हणजे बिलें किंवा ठराव पुढें आणूं पाहणाऱ्या लोकांच्या चिठ्या टाकून नांव निवडून काढणें असा त्याचा थोडक्यांत अर्थ आहे व हें तरी सांगून ठेवण्याचें कारण इतकेंच कीं, कित्येक पूर्वग्रहदूषित भोळ्या अतज्ज्ञ वाचकांना 'कौन्सिलांत जाणें हराम होय' हें माहीतच आहे, पण कौन्सिलांत जुगारहि चालतो असें वाटण्याचा कदाचित् संभव आहे !

* * *

आज आठ दिवसांत निश्चितपणें निर्णयांत निघालेला व प्रत्यक्ष अमलांत येणारा असा ठराव म्हटला म्हणजे जमशेटपूर येथील पोलादी कारखान्याला पन्नास लक्ष रुपये मदतीदाखल देणगी देण्यासंबंधींचा होय. हा ठराव सरकारतर्फेच पुढें आलेला होता व लोकपक्षालाहि तो इष्टच होता, म्हणून या बाबतींत उभयपक्षांची 'प्रतियोगी सहकारिता' घडून आली. वास्तविक ह्या ठरावांत मतभेदाला फारशी जागा नव्हती. पण मजूरांच्या हिताच्या दृष्टीनें म्हणून श्रीयुत जोशी यांनीं आणलेली उपसूचना, आणि रक्कम द्यावयाची ती देणगी म्हणून न देतां कर्जाच्या स्वरूपानें द्यावी अशा अर्थाची डॉ. लोहोकरे यांची उपसूचना, या अध्यक्षांनीं गैरलागू म्हणून ठरविल्यामुळें या विषयावर खरा वादविवाद असा झालाच नाहीं. जमशेटपूर येथील कारखान्याला दिलेली ही देणगी नवीन आहे असें मात्र नाहीं. सिमला येथें मे महिन्यांत पास झालेल्या बिलांतच मदत करण्याच्या या पद्धतीचा समावेश झालेला होता; व हल्लीं अमुक दिवसांत इतके रुपये द्यावेत एवढ्याच मर्यादित स्वरूपाचा प्रश्न असल्यामुळें अध्यक्षांनीं उपसूचना गैरलागू ठरविल्या. सदर कारखान्याचें पुढें काय होणार याची एक प्रकारें सर्वांना सारखीच चिंता आहे. टाटा कंपनीनें अनेक बाजूंनीं अप्रीति संपादन केल्यामुळें त्यांचा अवगुण कारखान्याला भोंवणें साहजिक आहे. शिवाय खुद्द कारखान्यांत झालें तरी मजुरांशीं त्यांचें वर्तन असावें तसें नाहीं व पगारापायीं त्यांनीं परकीयांची बरीच भर केली हेंहि खोटें नाहीं. पण देशी भांडवलानें चाललेल्या पोलादासारख्या वस्तूचा हा कारखाना पहिलाच. शिवाय आपल्या हातानें राष्ट्राच्या तिजोरींतून मदतीची रक्कम देशी कारखान्याला मदत म्हणून देण्याची संधि आली असतां तो देशाभिमानाचा मोह असेंब्लीला अनिवार व्हावा हें अस्वाभाविक कोण म्हणेल?

* * *

ऐक्य-परिषदेशिवाय चालू आठवड्यांत आणखी दोन सभा येथें भरल्या होत्या; एक कॉंग्रेस वर्किंग कमिटीची व दुसरी गोरक्षण-परिषदेची. गोरक्षण-कमिटीसाठीं ह. भ. प. चौंडेबोवा, डॉ. मुंजे, श्री. दाजीसाहेब बुटी वगैरे मंडळी मुद्दाम आली होती, व गोरक्षणाची एखादी निश्चित योजना अमलांत येईल असें वाटतें. वर्किंग कमिटीस दे. दास हजर राहूं शकले नाहींत. महात्माजींशिवाय पं. मोतिलाल नेहरू, केळकर, अणे, सरदार मंगळसिंग वगैरे सभासद हजर होते. सभेचें काम दोन दिवस मधून मधून सुरू होतें.

त्यांत बरेच दिवस भिजत पडलेलीं पुष्कळशीं प्रकरणें निकालांत निघालीं. सुमारें नऊ निरनिराळ्या कॉंग्रेस कमिट्या व स्पेशल कमिट्या यांच्या हिशेबांची वासलात लावावयाची होती. तसेंच कित्येक प्रांतिक कमिट्यांचे मदतीसंबंधाचे अर्ज, खादी-मंडळाच्या कामाची व्यवस्था व प्रांतिक कॉंग्रेस कमिट्यांच्या अधिकारस्थानाचे प्रश्न यांचीहि व्यवस्था लावावयाची होती. हें सर्व होऊन गतसालचे जमाखर्च व पुढील सालचें अंदाजपत्रक हीं मंजूर करण्यांत आलीं. तसेंच मतदारीच्या सुताच्या पुरवठ्यासंबंधाचे नमुनेदार नियम करून कॉंग्रेस कमिट्यांकडे विचाराकरितां पाठविण्याचें काम स्वतः महात्माजींकडे देण्यांत आलें आहे.

* * *

वर्किंग कमिटीचा कारभार या सभेंत जसा बिनतक्रार झाला तसाच तो वर्षभर होण्यास हरकत नाहीं असें वाटतें. तसें झाल्यास सुताच्या वर्गणीसंबंधाचा प्रश्न कानपूर येथें निर्विकार रीतीनें उपस्थित करतां येईल. दरम्यान सुताच्या मतदारीची चलनी नाण्यांतील किंमत अधिक निश्चितपणें कळेल. पण कसेंहि असलें तरी हा प्रश्न राष्ट्रीय सभेंत हल्लीं असलेल्या दोन पक्षांपुरताच राहील. कारण बेझंटबाई व नेमस्त पक्षाचे लोक यांनीं येथें इतर प्रश्नांची थोडी तरी वाटाघाट केली. पण राष्ट्रीय सभेंत सर्व पक्षांचा समावेश व सुताच्या मतदारीचा प्रश्न यांना दुरून काडीनेंहि स्पर्श केला नाहीं ! याचा अर्थ सुताची मतदारी राहील तर संयुक्त राष्ट्रीय सभा अशक्य होय. त्याकरितां सुताच्या मतदारीचा आग्रह सोडून देणें इष्ट ठरल्यास तो सोडून देण्याबद्दल महात्मा गांधींना आग्रह करणें किंवा त्यांच्याशीं स्नेहभावानें झगडा करणें ही गोष्ट अखेर महाराष्ट्र पक्षावरच येऊन पडणार असें भाकित करण्यास हरकत नाहीं. कौन्सिलबाबत ही जबाबदारी महाराष्ट्रानेंच स्वीकारली होती व ती पारहि पाडली व तशीच ही जबाबदारीहि तो पार पाडील. राष्ट्रीय सभा पुढेंमागें संयुक्त व्हावयाची तर सन १९१६ सालप्रमाणें ही गोष्ट घडवून आणण्यास पुढेंहि महाराष्ट्र पक्षच कारणीभूत होईल असें वाटतें. महाराष्ट्र पक्ष बंडखोर म्हटला जातो, पण त्याचा उपयोग इतरांना फार सोईचा होतो हें अशा अनेक उदाहरणांवरून सिद्ध करून देतां येईल.

## पत्र नं. ३

ता. ६-२-२५

ऐक्य-परिषदेच्या कामामुळें पहिल्या व दुसऱ्या आठवड्यांत खलबतांचीं इतकी गर्दी माजली होती कीं, त्यांत सांपडलेल्या सभासदांना सकाळचे नऊ वाजल्यापासून रात्रीचे नऊ वाजेपर्यंतहि कित्येक दिवस घराबाहेर राहावें लागे. यामुळें असेंब्लींतील कामाची प्रास्ताविक योजना कार्यकारी कमिटीकडून व्हावी तितकी झाली नाहीं. शिवाय कामहि बरेंचसें मामुली असल्यामुळें जो वादविवाद झाला तो प्रेक्षकांना कांहींसा नीरस वाटला असण्याचा संभव आहे. पण असेंब्लीच्या कामाची प्रथम हयगय होण्यापेक्षांहि वेळ फुकट गेला असें भासण्याचें कारण ऐक्य-परिषदेंतून अद्यापि कांहीं निष्पन्न झालें नाहीं हें होय. इतकी चर्चा होऊन शेवटीं दुहीचें पाऊल आहे तेथेंच आहे, असें दिसून आल्यामुळें विचारी लोकांच्या मनाला सहजच वाईट वाटत आहे. एखादें सुखस्वप्न ओसरून जागृति आली म्हणजे 'इतकें पाहून जागा झालों' असें कष्टानें दुसऱ्यास सांगावें लागतें, तसेंच हिंदु-मुसलमान पुढाऱ्यांना जगाला सांगण्याचा वेळ न येवो म्हणजे झालें.

* * *

ता. २२।१ पासून काल ता. ५ पर्यंत असेंब्लीचें जें काम झालें त्याची वर्गवारी केली असतां सरकारी ठराव एक व बिनसरकारी ठराव चार असे निकालांत निघाले. तसेंच पांच सरकारी बिलें निकालांत निघालीं असून दोन-तीन सरकारी बिलें वाट चालूं लागलीं आहेत. बिनसरकारी बिलांची संख्या मात्र सुमारें वीसपर्यंत गेलेली असून त्यांपैकीं बहुतेक नुसतीं उंबरघाट ओलांडून अलीकडे आलीं आहेत. त्यांपैकीं कांहीं सिलेक्ट कमिटीकडे तर कांहीं अभिप्रायार्थ प्रांतानिहाय पाठविण्यांत आलीं असून येथल्या येथें चर्चा होण्याच्या स्थितींत जीं आहेत तीं मार्चअखेर असेंब्लीला बहुधा पुरतील. मंजूर झालेला असा सरकारी ठराव म्हटला म्हणजे जमशेटपूर येथील पोलादी कारखान्यास बौंटी देण्याचा. पण या विषयावर मतभिन्नता फारशी नव्हतीच. मंजूर झालेल्या बिनसरकारी ठरावांपैकीं बंगाल ऑर्डिनन्स व चलनी नाण्यांची चौकशी हे बऱ्याच महत्त्वाचे होते. रेल्वे-नोकरांसंबंधाचा ठराव आपआपसांतील मतभेदामुळें उपसूचनेच्या भोंवऱ्यांत सांपडला. तथापि

ह्या खात्यांतील नोकरांचीं गाऱ्हाणीं असेंब्लीपुढें मांडणें हा जो त्याचा मुख्य उपयोग तो झाला असें म्हणण्यास हरकत नाहीं. चलणी नाण्याची व हुंडणावळीची चौकशीपूर्वक चर्चा करण्याकरितां सरकार चालू वर्षांत केव्हां तरी कमिटी नेमणारच होतें; व ती या ठरावामुळें सरकारी उद्देशापेक्षां कांहीं दिवस आधीं नेमली जाण्याचा संभव दिसतो. कमिटीच्या चौकशींत येणाऱ्या मुख्य विषयाची चर्चा परदेशांतून म्हणजे अमेरिका, इंग्लंड वगैरे देशांतून स्थिरावणाऱ्या हुंडणावळीनें परस्पर निकालांत निघतच आहे. पण लोक म्हणतील तें हटकून करावयाचें नाहीं, किंवा करावयाचें असलें तरी लांबणीवर टाकावयाचें, असा सरकारी क्रमच होऊन बसल्यासारखा झाला आहे. आणि या ठरावाच्या वादविवादांत सरकारी फडणविसांनीं केलेला विरोध वरील तत्त्वास अनुसरूनच होता. कसेंहि असो, सोन्याचें चलनी नाणें तर तूर्त हिंदुस्थानांत होत नाहींच, पण हुंडणावळीचा जुना भाव बदलून नवा निश्चित होण्याचा मात्र संभव दिसतो.

* * *

बंगाल ऑर्डिनन्सचा ठराव हा एका अर्थीं पोकळ असला तरी त्याला विशेष प्रकारचें राजकीय महत्त्व आहे व त्या महत्त्वाला अनुसरून असाच त्याच्या चर्चेला दोन दिवसांचा अवधि मिळाला, भाषणेंहि तशींच खणखणीत झालीं व निकालहि अदमासाप्रमाणेंच लागला. पण वैगुण्य इतकेंच कीं, ता. ५ रोजीं सदर ठरावाला मुद्दाम दुसरा दिवस देण्यांत आला असतां रेल्वेच्या ठरावानें निम्मा दिवस घेतला. यामुळें भाषणें व्हावीं तितकीं पुष्कळ झालीं नाहींत. तथापि मतें मोजतांना हिंदी सभासद सरकारच्या पक्षास फारच थोडे मिळालेले आढळून आले. ऑर्डिनन्सला कायद्याचें स्वरूप देण्याकरितां तो बंगाल कौन्सिलपुढें आणला व तेथें तो नापास झाला; असेंब्लींत आणा म्हणून आव्हान केलें पण तेथें तो आणण्याची सरकारची छाती झाली नाहीं. अखेर बादशहांकडून त्याला मंजुरी मागावी लागली! याचा अर्थ हाच कीं, स्वराज्य पक्षानें कौन्सिलें पुरीं काबीज केलीं.

* * *

मंजूर झालेल्या सरकारी बिलांपैकीं लोकांना खरोखर किंवा सर्वस्वीं नको असें बिल कोणतेंच मंजूर झालें नाहीं. उलट त्यांपैकीं बहुतेक लोकोपयोगी आणि म्हणून विरुद्ध मत न देतां प्रतियोगी सहकरिता करण्यासारखीं,

अशींच होतीं. उदाहरणार्थ, 'पेपर करन्सी बिल' मंजूर झालें. त्याविषयीं एक पक्ष जरी असें म्हणणारा होता कीं, या बिलानें थोडीशी महर्घता होण्याचा संभव आहे तरी पण सामान्य व्यापारीवर्गाला तें इष्टच होतें. किंबहुना यांत तिसरा एक वर्ग असाहि निघाला कीं, त्याला हल्लींच्या बिलानें होणारी चलनी नोटांची व नाण्यांची भर कमी न होईल अशी जामिनकीच उलट हवी होती. अर्थात् मताचे तीन फांटे फुटले तरी मूळ बुंधा एकच, अशीच स्थिति ह्या बिलाची होती. मजुरांबाबत अशीं दुसरीं दोन बिलें होतीं. पैकीं मजुरीचा विशिष्ट स्वरूपाचा लेखी करार मोडणें हा आजवर गुन्हा मानला जात असे तो यापुढें बंद करणारें बिल हें मजुरांच्या दास्यविमोचनाचेंच बिल होय, व सरकारानें तें पुढें आणून असेंब्लींतील कट्टर सोशिआलिस्ट लोकांचीहि शाबासकी मिळविली. तसेंच ट्रेड यूनियन्स नोंदण्याबाबतचें बिल प्रत्यक्ष मंजूर होण्यास अवकाश लागेल व सिलेक्ट कमिटींत त्याची छाननीहि होईल. तथापि तें एक प्रकारें मजूर लोकांच्या फायद्याचेंच बिल असून तें त्यांचा दर्जा व शक्ति वाढविणारें आहे. अर्थात् त्याला विरोध कोण करील? तो प्रतियोगी सहकारितेचाच विषय होय.

* * *

खासगी सभासदांनीं पुढें आणलेल्या बिलांत कांहीं वादग्रस्त, तर कित्येक किरकोळ महत्त्वाचीं आहेत. परंतु दुसरीं कित्येक ठसठसीत असून त्यांच्या तिखटानें उडालेला खाकाणा येत्या मार्चअखेरपर्यंत पुरेल असें वाटतें. डॉ. गौर यांचीं बहुतेक बिलें सामाजिक सुधारणेबाबत व व्यक्तिमात्रांच्या हक्कांबाबत असतात. त्या सर्वांतील तत्त्वें वाईटच असतात असें नाहीं. परंतु जुनें मत, नवें मत किंवा कायदेशीर अडचणी यांमुळें त्यावर सहसा एकमत होत नाहीं. तथापि डॉ. गौर यांची चिकाटी नांवाजण्यासारखी असते. संमतिवय वाढविणें, विशिष्ट विवाहांतील वधूचें वय २१ ऐवजीं १८ असल्यास चालेल अशी सवलत देणें, देवस्थानें व धर्मादाय संस्था कायद्याच्या नियंत्रणाखालीं आणणें, मुलांच्या नांवानें हिंदु आईबापांना आपल्या मिळकतीचा ट्रस्ट करण्याची परवानगी देणें, ट्रान्स्फर ऑफ प्रॉपर्टी ॲक्ट, सक्सेशन ॲक्ट व मृत्युपत्राचा कायदा दुरुस्त करणें, वगैरेसारखे त्यांच्या बिलांचे विषय आहेत. पास झालेल्या बिलांत श्रीयुत नियोगी यांचें रेल्वे ॲक्टाच्या दुरुस्तीचें बिल

लोकमतदर्शक होतें. हें बिल कौन्सिल ऑफ स्टेटमध्यें पास झाल्यास रेल्वेंतील एक अन्याय दूर होईल.

*　　　*　　　*

दुसरीं कित्येक खासगी बिलें म्हणजे मजुरांना दर महिन्यास पगार न देतां तो दर आठवड्यास द्यावा हें दिवाण चमनलाल यांचें बिल व आसाम वगैरे प्रांतांत किंबहुना सर्व हिंदुस्थानांत कारखान्यांतील मजूरदार बायांना बाळंतपणाच्या आधीं व नंतर विश्रांति देऊन धन्यांकडून त्यांना फुकट पोटाला देवविण्याचें बिल हींहि वादग्रस्त ठरण्याचा संभव आहे. तसेंच पाश्चात्य वैद्यकांच्या पदव्या देण्याचा अधिकार कोणास असावा याविषयीं कुमार शंकरराय यांचें बिल हेंहि उपयुक्त पण खटका उडविणारें आहे. हरचंदर रॉय बिशनदास यांनीं सिव्हिल प्रोसीजर कोडांत पंचायतींनीं निकाल करून घेण्याबाबत एक स्वतंत्र भागच घालण्याचें बिल पुढें आणलें आहे; तें मात्र पुरा वेळ मिळाल्यास कांहीं थोड्या फरकानें मंजूर होण्याचा संभव दिसतो. यानंतर सर पुरुषोत्तमदास यांचीं पेपर करन्सी व चलनी नाणें यासंबंधींचीं बिलें सरकारी परवानगीनें पुढें आलीं आहेत व सरकारी विरोध असतांहि तीं बहुधा मंजूर होतील. डॉ.लोहोकरे यांच्या चलनी नाण्याच्या बिलाला सरकारनें परवानगी देण्याचें नाकारलें व तें नाकारण्याचीं कारणें सांगण्याचेंहि नाकारलें! केळकर यांच्या पासपोर्ट बिलाला परवानगी मिळणार नाहीं असें भाकित झालेंच होतें व तें खरें ठरून परवानगी नाकारल्याचें लिहून आलें! नाकारण्याचें कारण हेंच कीं, बिलांत परराष्ट्रांच्या राजकारणाचा संबंध येतो.

*　　　*　　　*

शेवटीं एकाच प्रकारच्या बिलांची हकीकत सांगावयाची राहिली. तीं बिलें म्हणजे पांच-सहा बिलांचा एक झुबकाच आहे. स्वराज्य पक्ष कौन्सिलांत येतांच त्यानें दडपशाहीचे सर्व कायदे रद्द करण्याचा प्रयत्न सुरू केला व तो प्रयत्न म्हणजेच विठ्ठलभाई पटेल यांनीं पाठविलेलीं हीं चार-पांच बिलें होत. बंगाल, मद्रास, मुंबई या सर्व इलाख्यांतील जुने रेग्युलेशन्स म्हणजे बिनचौकशीनें तुरुंगांत ठेवण्याचे कायदे, १८५० चा राजकीय कैद्यांबाबत कायदा, १८६७ चा पंजाबांतील कायदा, १९११ चा राजद्रोही सभांबाबत कायदा, हे सर्व रद्द व्हावेत; तसेंच १२४ (अ) कलमांतील गुन्ह्याला सक्तमजुरी व काळेपाणी या शिक्षा न ठेवतां फक्त साध्या कैदेची शिक्षा ठेवावी वगैरे विषय या

बिळांत आहेत. झाडणीच्या एका फटकाऱ्यानें दडपशाहीच्या विषारी कोळ्यांचीं सगळीं जाळीं झटकून-झाडून टाकण्याचा स्वराज्य पक्षाचा हा प्रयत्न महत्त्वाकांक्षीपणाचा आहे. पटेल यांचीं बिलें असेंब्लीनें मंजूर केलीं तरी व्हाइसरॉयांचा 'नकार' त्यावर पडेल, पण त्याची चर्चा आतांच कशाला ?

* * *

रविवार ता. १ रोजीं न. चिं. केळकर यांचे अध्यक्षतेखालीं दलितोद्धार परिषद झाली. परिषदेस महात्मा गांधी, स्वामी श्रद्धानंद, लाला लजपतराय वगैरे पुढारी हजर होते. ही चळवळ इतक्या रंगारूपास आणल्याबद्दल अध्यक्षांनीं आपल्या भाषणांत महात्माजींचा प्रथम गौरवयुक्त उल्लेख केला. नंतर ते म्हणाले कीं, मुसलमानांच्या धर्मप्रसाराच्या धामधुमीमुळें अस्पृश्योद्धाराचा प्रयत्न प्रामुख्यानें पुढें आला असला तरी सामाजिक सुधारणेच्या विविध अंगोपांगांप्रमाणेंच अस्पृश्यतानिवारणाच्या चळवळीचा उगम मुसलमानांच्या चढाओढींत नाहीं. व्याकरणाच्या नियमाच्या आधारासाठीं भाषाप्रचार जसा अडून बसत नाहीं त्याप्रमाणें स्मृतींच्या आधाराकरितां आपण अडून बसूं नये. अस्पृश्यता दूर करण्यांत आपण स्वच्छ व शुद्ध राहणीचा नायनाट करतों असें नाहीं. पण ही स्वच्छतेची कसोटी सर्वच जातींना सारखी लागू केली जावी एवढेंच आमचें म्हणणें आहे. देवालयें व विहिरी वगळल्यास इतरत्र अस्पृश्यांना बिनहरकत प्रवेश मिळेल असें कित्येकजण सांगतात. पण ही केवळ टाळाटाळी आहे. देवालयासंबंधीं फार तर असें म्हणतां येईल कीं, नांदेड येथील गुरुद्वाराप्रमाणें देवालयाच्या गाभाऱ्यांत प्रत्यक्ष पुजाऱ्याखेरीज इतर कोणीच जाऊं नये हेंच सयुक्तिक आहे. अस्पृश्य वर्गांना साफसफाईचीं कामें करावीं लागतात हें खरें; परंतु तीं कामें करूनहि त्यांस स्वच्छ राहतां येतें. शिवाय तीं कामें या वर्गाकडून केलीं जातात म्हणूनच केवळ त्यांस अस्पृश्य मानणें हा दुहेरी अन्याय होय. परंतु हा अन्याय दूर होण्याला अस्पृश्य वर्गानेंहि उठल्यासुटल्या संपाचा धाक न घालतां शक्य तितकी आपली राहणी स्वच्छ ठेवावी. शिक्षणाचा प्रसार हाहि एक अस्पृश्यतेवर जालीम उपाय आहे, एकंदरींत उच्चवर्णाचे हिंदु आणि त्या त्या प्रांतांतला अस्पृश्य वर्ग यांनीं एकजुटीनें हें कार्य हातीं घेतल्यास तें सुकर होईल." यानंतर महात्मा गांधी, लालाजी, स्वामी श्रद्धानंद वगैरेंचीं भाषणें होऊन ही परिषद समाप्त झाली.

## पत्र नं. ४

ता. १३-२-२५

आतांपर्यंत पुढें आलेल्या बिलांची व ठरावांची साधारणपणें झडती मीं गेल्या पत्रांत दिलीं आहे. खासगी सभासदांचीं जुनीं बिलें व ठराव यांनीं आधींच इतकी जागा व्यापून ठेविली आहे कीं, त्यांत नवीनांचा समावेश होणें शक्य नाहीं. जुन्यांपैकीं किती निकालांत निघालीं इतकेंच आणखी कांहीं दिवस पाहत बसावें लागेल. सरकार पक्षाला मात्र ही अडचण अर्थात् भासत नाहीं. कारण त्यांचा सर्वच एकतंत्री कारभार. असेंब्लीचा सरकारी पुढारी म्हणजे होम-मेंबर. आपल्या कामांना हवे तितके दिवस आपल्या हातानें राखून ठेवितो. त्या दिवसांतहि नेमकीं कोणतीं बिलें पुढें आणावयाचीं हेंहि तोच ठरवितो. त्यांतूनहि कमजास्त करण्याचा सर्व अधिकार त्याला. त्याच्या पाठीमागें सेक्रेटरी सगळीं फायलें घेऊन उभे; सर्व पगारी सभासद व इतर कांहीं खाशा पथकांतील राखीव सभासद जागेवर मतें देण्याला हजर. 'मतगणती' मागावी कीं न मागावी हें त्याच्या एका करांगुलीच्या इशाऱ्यानें ते समजतात व त्याच्या बाजूच्या मतांत सहसा चलबिचल होत नाहीं. तात्पर्य, सरकार पक्षाचें काम पलटणीच्या कवाइती-प्रमाणें चालतें. याविरुद्ध असणाऱ्या सर्व दोषांचा मक्ता लोकपक्षाकडे हें ठरलेलेंच आहे. व्यक्तिशः महत्त्वाकांक्षा व ईर्षा, एकमेकांचीं एकमेकांस गर्दी व अडचण, शिस्तीचा अभाव, गैरसमज, भांडणें, व फसगमती या सर्व लोकपक्षाकडे पाहून घ्याव्या. यावरून कायद्यानें कागदावर दिलेल्या बहु-मताला गडांतरें किती हें वाचकांस कळून येईलच.

* * *

खासगी सभासदांच्या ठरावांपैकीं रेल्वे नोकरांच्या गाऱ्हाण्यांचा ठराव बहुमतानें पास झाला; पण पटेल यांचे जुलमी कायदे रद्द करण्याबाबतचें बिल विचाराकरितां लांबणीवर पडलें, व क्रिमिनल प्रोसीजर कोडाच्या दुरुस्तीचें बिल तारीख न ठरवितां, व कोणत्याहि प्रकारची अट घातली न जातां लांबणीवर टाकण्यांत आलें! जुलमी कायदे रद्द करण्याचें बिल मात्र अशा रीतीनें निकालांत निघालेलें नाहीं व आपण हा तंटा सामोपचारानें तुटतो कीं नाहीं हें पाहूं, असें सरकातर्फेच कळविण्यांत

आल्यामुळें तडजोडीची कांहीं थोडी आशा वाटते. या जुलमी कायद्यांत मुंबई, मद्रास, कलकत्त्याचे रेग्युलेशन्स मुख्यतः येतात, म्हणजे नातू बंधु, लजपतराय, कृष्णकुमार मित्र, सुभाष चंद्र बोस वगैरे गृहस्थ ज्यांच्या आधारें पकडून बिनहिशेबी कैदेंत ठेविले गेले ते हे कायदे! 'रिप्रेसिव्ह लॉज् कमिटी'चें या बाबतींत स्वराज्य पक्षासारखेंच मत होतें, म्हणूनच या कामीं नेमस्तांची तरफ सरकारच्या खालीं लावून त्यांना उचलून पाडतां येण्याचा संभव आहे. पटेल यांच्या दुसऱ्या बिलाच्या बाबतींत नेमस्त पक्षाचें पाठबळ नसल्यानें सर पुरुषोत्तमदास यांना आपल्या मनासारखें करतां आलें! या दुसऱ्या बिलांत, परकीय गोऱ्या लोकांना न्यायाचे कामीं ज्या सवलती मिळतात त्या मिळूं नयेत, अशी दुरुस्ती सुचविलेली होती. यावरून चांगल्या कामांत देखील नेमस्तांच्या प्रतिकूलतेनें धक्का कसा बसतो तें दिसून आलें.

* * *

या आठवड्यांत दोन सरकारी बिलें आलीं; त्यांपैकीं असेंब्लीच्या अध्यक्षाचा पगार ठरविण्याचें एक बिल होतें व दुसरें कोर्टाच्या बेअदबीच्या कायद्याची दुरुस्ती करण्याचें होतें. पहिलें निकालांत निघून त्यांत लोकपक्षाचा एकच मतानें पराभव झाला. बिलांत सरकारनें अध्यक्षाचा पगार दरमहा चार हजार ठरविला होता. त्यावर स्वराज्य पक्षानें तो पगार दोन हजारांपर्यंत खालीं आणण्याच्या निरनिराळ्या उपसूचना दिल्या होत्या. नॅशनॅलिस्ट पार्टीच्या सभेंत तीन हजारांवर हा तुटला होता. परंतु आयत्या वेळीं कित्येक ठराविक लोकांनीं कांहीं तरी सबब सांगून मतें दिलीं नाहींत. यामुळें प्रथम स्वराज्य पक्षाच्या उपसूचना नामंजूर झाल्याच, पण राष्ट्रीय पक्षाची उपसूचना तरी मंजूर होऊन सरकारी सूचनेंत एक हजार तुटण्याचा जो संभव होता तोहि गेला. पार्लमेंटच्या स्पीकरला पूर्वीं एक वेळ साडेसात हजार पौंड वार्षिक पगार मिळे व हल्लीं पांच हजार पौंड मिळतो. त्याला खुद्द पार्लमेंटच्या सभागृहांतच चांगलें व बिनभाड्याचें घर सामानासह मिळतें. शिवाय वरखर्चास सालीना एक हजार पौंड आणि पुढें पेन्शन. या मानानें पाहतां सालिना अठ्ठेचाळीस हजार रुपये म्हणजे तीन-सवातीन हजार पौंड हे फार नाहींत, असें कोणी म्हणेल पण हिंदुस्थानच्या मानानें ते खरोखरच फार आहेत. तथापि हिंदुस्थानांतहि वकील, जमीनदार वगैरे वर्गांत यापेक्षां पुष्कळ अधिक उत्पन्नाचे लोक असूं शकतात. म्हणून त्यांच्या दृष्टीनें हा स्वार्थत्यागच होय असा युक्तिवाद होऊं

शकतो, व त्याचाच पगडा या निकालावर पडला होता. चार हजार पगार ठरविण्याच्या दृष्टीनें पाहतां, चार हजार पगार हा ज्याला स्वार्थत्याग होऊं शकतो असाच मनुष्य अध्यक्ष असावा असें आपोआपच ठरतें! अध्यक्ष होणाऱ्यानें सर्व राजकीय पक्षांपासून व राजकारणापासून अलिप्त राहिलें पाहिजे, अशी अपेक्षा या वादांत बोलून दाखविण्यांत आलीच. पण अध्यक्षानें आपल्या अधिकाराच्या मुदतींत इतर कोणताहि कामधंदा करूं नये असे स्पष्ट शब्द, मंजूर झालेल्या एका उपसूचनेंत स्पष्टच घातले गेले आहेत. अर्थात् या अशा तिहेरी-चौफेरी चाळणींतून खालीं कोण गळतात व वर कोण राहतात याचा अंदाज करणें हा या घटकेला कल्पनेचा एक गमतीचा खेळ होऊन राहिला आहे. ही नेमणूक अवघी सव्वा वर्षपर्यंतच, म्हणजे सप्टेंबर १९२५ ते जानेवारी १९२७ पर्यंतच राहील. कारण पुढें नवी असेंब्ली व नवा अध्यक्ष! असो ही पहिल्या नेमणुकीची माळ हल्लीचे डेप्युटी प्रेसिडेंट रंगाचारियर यांचेच गळ्यांत पडेल असा अनेकांचा अंदाज आहे.

* * *

सरकारतर्फेचें दुसरें नवें पण आज केवळ पहिलें वाचन होऊन राहिलेलें बिल म्हणजे कोर्टाच्या बेअदबीचें. या बिलांत मुख्य तीन भाग आहेत. कनिष्ठ कोर्टाच्या बेअदबीचा गुन्हा घडला असतां तो गुन्हा करणारास त्याचा जाब विचारण्याचा अधिकार त्याच्या वरिष्ठ कोर्टांना, म्हणजे निरनिराळ्या हायकोर्टांना, दिला जाईल. हा पहिला भाग झाला. दुसऱ्या भागांत या गुन्ह्याची व्याख्या व त्याच्या इन्साफाची पद्धति सांगितली आहे. तिसऱ्या भागांत त्या गुन्ह्याची शिक्षा निश्चित म्हणजे सहा महिन्यांची किंवा दंड किंवा दोनहि अशी ठरविली आहे. हे तीनहि मुद्दे केसरीच्या वाचकांना आतां अपरिचित नाहींत. कारण या विषयावर केसरींत एक स्वतंत्र लेखमालाच कांहीं महिन्यांपूर्वीं लिहिली गेली होती. तींत मुख्य मुद्दे असेच घेतले होते कीं, गुन्ह्याची व्याख्या ठरीव नसून गुन्ह्याला शिक्षाहि निश्चित नाहीं हें अयोग्य आहे. केळकर यांजवरील गेल्या खटल्यांत हायकोर्टांत याच मुद्द्यावर त्यांजकडून विशेष जोर देण्यांत आला होता. पैकीं बेअदबीची जी व्याख्या हायकोर्टानें आजवर मानली तीच हुबेहूब या नव्या बिलांत घेतली आहे. परंतु बेअदबीच्या गुन्ह्याला झालें तरी जास्तींत जास्त शिक्षा किती असेल हें निश्चित ठरणार हाच या नव्या बिलाचा खरा मोठा फायदा होय. कारण यामुळें

माफीचे बिनतोड प्रसंग लोकांवरचे वांचतील. या बिलांत हायकोर्टाच्या अधिकारांना धक्का लावण्यांत येतो. हायकोर्ट मोठें कीं सरकार मोठें, असा एक मुद्दा यांत निघण्याचा संभव दिसतो. परंतु हायकोर्टांना विलायतेचा राजा-बादशहांची सनद असली तरी पिनल-कोड व प्रोसीजर कोड (अर्थात् गुन्ह्याच्या सदरांत पडतात, व त्याच्या आरोपाचा इन्साफ कोणी कसा करावा या गोष्टींचा कायदा) हिंदुस्थानांतील कायदेमंडळच ठरवितें व हा कायदा हायकोर्टांनाहि मान्यच करावा लागतो. तेव्हां हायकोर्टाच्या इभ्रतीच्या दृष्टीनें-हि नव्या बिलांत वावगें असें कांहीं नाहीं असें वरील मुद्दयाला उत्तर आहे.

* * *

ता. १२ रोजीं टांगानिका वसाहत व पोस्टखात्याचीं गाऱ्हाणीं याबाबतचा ठराव निकालांत निघून गेल्या आठवड्याचें काम संपलें. पोस्टखात्याच्या गाऱ्हाण्यांसंबंधीं ठराव येणार असें जाहीर झाल्यापासून हिंदुस्थानच्या सर्व भागांतून पोस्टखात्यांतील संघांकडून तारांची गर्दी उडाली होती. गेल्या सप्टेंबरांत सिमला येथें सदर ठराव बॅलटच्या सोडतींत केळकरांच्या नांवावर निघाला होता. परंतु इतर ठरावांवरील वाद लांबल्यामुळें त्यास अवसर मिळाला नाहीं. परंतु फिरून या खेपेस पुष्कळ सभासदांच्या सह्या घालून ठराव पाठविल्यामुळें यश आलें. सोडतींत नांव निघाल्यामुळें हा ठराव मांडण्याचें काम पालबाबूंवर पडलें. पण मुंबई पोस्टल यूनियनचे अध्यक्ष म्हणून बॅ. जिना यांनीं, पुणें यूनियनचे अध्यक्ष म्हणून केळकर यांनीं आणि सामान्य मजूरसंघातर्फें श्री. ना. म. जोशी यांनीं या ठरावावर भाषणें करून त्यास पुष्टि दिली. युरोपियन लोकांतर्फें मि. कोक व दि. ब. रामचंद्रराव यांनीं ठरावास विरोध केला! पण सर भूपेंद्रनाथ मित्र यांनीं स्वतःच डायरेक्टर-जनरलला घेऊन या प्रश्नाची चौकशी करूं व पोस्टल लोकांचें शिष्टमंडळ आल्यास त्याची गांठ घेऊन चर्चा करूं असें आश्वासन दिल्यावर जिना यांच्या सूचनेवरून येत्या सप्टेंबरपर्यंत हा प्रश्न तहकूब ठेवण्यांत आला. या चर्चेंत मतभेद होण्याचें मुख्य कारण असें कीं, रामचंद्रराव यांच्यासारखे लोक म्हणतात, "आधीं पोस्टाचे दर वाढले आहेत ते कमी करा व मग पोस्टल नोकरांचें पगार वाढवा." पण दर कमी केल्यावर पगार वाढविणार कशांतून?

* * *

असेंब्लींतील निरनिराळ्या पक्षांची डळमळ कशी होऊं लागली आहे हें गेल्या आठवड्यांत निदर्शनास आलें. सरकारला एका कामीं दोन मतांनीं व एका कामीं एकच मतानें जय मिळाला ही गोष्ट खरी, परंतु मतांचें अंतर थोडें हा मुख्य मुद्दा नव्हे, कारण बोलूनचालून सरकारच्या बाजूला संख्याबळ कमीच आहे. बजेटाची वेळ जसजशी जवळ येऊं लागली तसतसा तिचा परिणाम या डळमळीवर अधिक होऊं लागला आहे. यंदा एकंदर बजेट फेटाळलें जाण्याच्या कामीं स्वराजिस्ट व स्वतंत्र पक्ष यांचें एकमत होत नाहीं हें आतां निश्चित ठरलें आहे. स्वतः स्वराज्य पक्ष काय करणार हें मात्र अद्यापि ठरावयाचें आहे व तें ठरणें दोनतीन गोष्टींवर अवलंबून राहील. कारण असेंब्लींत स्वराज्य पक्ष असला तरी असेंब्लीच्या बाहेरहि एक स्वराज्य पक्ष आहे. यामुळें बंगाल्यांत व नागपूर प्रांतांत कौन्सिलाच्या कामासंबंधानें लोकमत कोणत्या दिशेला झुकतें हें पाहावें लागेल. कारण दिल्ली, कलकत्ता, नागपूर, किंबहुना मद्रास व मुंबई या सर्व ठिकाणीं एकच धोरण राहणें इष्ट आहे; शिवाय एका बड्या सल्लागाराचें मत असें असल्याचें बोलतात कीं, यंदा कोठेंहि सर्व बजेटच्या बजेट फेटाळून लावण्याचा प्रकार घडूं नये, मग हा प्रकार घडवून आणण्याइतकें हातीं बहुमत असलें तरी हरकत नाहीं. नागपुरच्या प्रश्नासंबंधानें स्वराज्य पक्षाची कार्यकारी सभा तारीख १३ रोजीं म्हणजे आज भरणार आहे. तेव्हां या सर्व गोष्टींचा विचार तेथें होईल.

## पत्र नं. ५

ता. २०-२-२५.

या आठवड्यांत नॅशनॅलिस्ट पक्षाचे नवे नियम व नव्या निवडणुका झाल्या. पैकीं नियमांतील फरक मात्र महत्त्वाचा आहे. गतवर्षीं स्वतंत्र व स्वराज्य पक्ष या दोघांचा मिळून नॅशनॅलिस्ट पक्ष बनला व तोहि अडवणुकीचें कार्य शक्य असेल तें दोघांनीं मिळून करण्याकरितां. पण यंदा प्रारंभापासूनच स्वतंत्र पक्षानें असें धोरण ठेवलें कीं, अडवणुकीची भाषाहि बोलावयाची नाहीं. मग गतवर्षीच्या नियमांचें काय करावयाचें ? ते एक तर पाळले पाहिजेत, नाहीं तर मोडून टाकले पाहिजेत! अर्थात् स्वतंत्र पक्षानें दुसऱ्या मार्गाचा उघड अवलंब केला. गतवर्षीं त्यांनीं प्रथमच असा नियम करून घेतला कीं, नॅशनॅलिस्ट पक्षांत अमुक इतक्या प्रमाणांत बहुमत झालें तरच अडवणुकीचा मार्ग

सर्वांनीं मिळून स्वीकारावयाचा. मग पक्षाची शिस्त मानावयाची. पण अखेर पाहावें तों तितक्या प्रमाणाचें बहुमत झालेंहि ! तेव्हां कण्हत-कुथत का होईना पण स्वतंत्र पक्षास बजेट फेटाळण्यास तयार व्हावें लागलें. 'चला, खाटिकखान्यांत घेऊन चला, येतों. फांसावर चढविणार, चढतों.' असे अभद्र व निरुत्साहकारक शब्द तोंडानें बोलत ते स्वराजिस्टांबरोबर सरकारविरुद्ध मतें देण्याला 'लॉबीं'त शिरले आणि अशा रीतीनें त्यांनीं आपलें इमान राखलें. पण यंदा त्यांनीं तसा प्रसंगच येऊं नये म्हणून आधींपासून सावधगिरी राखली.

* * *

वास्तविक स्वतंत्र पक्षाचें संख्याबल गतवर्षीपेक्षांहि यंदा थोडें अधिक आहे. शिवाय स्वराज्य पक्षाचे लोक यंदा गतवर्षाहून थोडे कमी हजर आहेत. यामुळें नॅशनॅलिस्ट पक्षाचे सभेंत त्यांना अडवणुकीच्या ठरावास लागणारें विशिष्ट बहुमत अशक्य करतां आलें असतें. पण या विषाची परीक्षाहि यंदा पाहावयाची नाहीं. पूर्वीं दुधानें तोंड पोळलें म्हणून यंदा ताकहि फुंकून प्यावयाचें असेंच त्यांनीं ठरविलें ! यंदा त्यांनीं असें बोलणें सुरू केलें, कीं अडवणूक हा विषयच मुळीं नॅशनॅलिस्ट पक्षाच्या कार्यक्रमांत यावयाचा नाहीं. अर्थात् त्याविषयीं कोणतेच नियम असे करावयाचे किंवा पाळावयाचे नाहींत. या कामीं एकट्या स्वतंत्र पक्षानें आपल्याला काय वाटेल तें करावें किंवा न करावें. चालूचलाऊ कामापुरता नॅशनॅलिस्ट पक्षाचा उपयोग समजावयाचा व अशा कामांतहि दोन-तृतीयांश बहुमतानें ठराव पास झालाच तर तो सर्वांनीं अमलांत आणावयाचा. अडवणुकीच्या कामीं दोनहि उपपक्षांना सारखीच स्फूर्ति उत्पन्न झाली तर दोघांनीं एकत्र होऊन बनेल तें करावें. पण याचा अर्थ उघडच आहे. स्वतंत्र पक्षाला अशी स्फूर्ति व्हावयाची नाहीं, व नॅशनल पार्टीचा ठरावहि व्हावयाचा नाहीं. मग स्वराज्य पक्षानें आपणापुरतें काय वाटेल तें करावें व स्वराज्य पक्षानें स्वतः व आपल्यापुरतें काय करावें हाच खरोखर त्यापुढें यंदा प्रश्न आहे.

* * *

नॅशनॅलिस्ट पक्षाबरोबर मिळून कार्य करावें कीं नाहीं, याविषयीं स्वराज्य पक्षाचे लोकांत थोडेंसें दुमत आहे. कित्येकांचें मतें आम्ही दोनहि पक्ष मिळून करूं तरच कांहीं होईल म्हणून संयुक्त पक्ष कायम ठेवावे व त्यामुळें पडणारें थोडेंसें बंधनहि मानावें. इतर कित्येकांचें म्हणणें असें कीं, स्वतंत्र पक्षाच्या

शेपटीला बांधून घेऊन फरफटत जाणें हें पुरें झालें. एकीचा फाजील लोभ धरल्यानें आयत्या वेळीं दगा व्हावयाचा तो होतोच. त्यापेक्षां या दिखाऊ एकीच्या नादीं न लागलेलेंच बरें आणि अशा विचारानें अनास्था उत्पन्न झाल्यामुळेंच स्वराज्य पक्षाचे सभासद यावे तितके दिल्लीला आले नाहींत व आलेल्यांपैकींहि कित्येक योग्य हजेरी ठेवण्याची हयगय करतात. परंतु असें वैतागाचें धोरण बरोबर नाहीं, कार्यावर नजर देणारा आपला पक्ष आहे, याकरितां "सभासदांनीं हयगय करूं नये" अशा अर्थाचीं पत्रें व तारा रवाना करून नाराज व गैरहजर लोकांना दिल्लीस बोलावण्यांत आलें आहे. पंडित नेहरू यांचा स्वभाव असावा तितका तुटक नाहीं असा कित्येकांचा त्यांचेवर आक्षेप आहे. पण खरोखर तोच त्यांचा गुण आहे. पण अननुभवी तरुण सभासदांच्या हें एकदम लक्षांत कसें येणार ?

* * *

भरींत भर म्हणून मंगळवार-बुधवार रोजीं झालेल्या कामांत पंडित नेहरू व व जिना यांचे कांहीं थोडे उलटसुलट शब्दहि सभेंत झाले, असा तिऱ्हाइतांस भास झाला. वास्तविक खरा तंटा डॉ. गौर यांच्याशींच होता. प्रिव्ही कौन्सिलच्या धर्तीवर हिंदुस्थानांत सर्व प्रांतांकरितां मिळून एक वरिष्ठ कोर्ट स्थापण्याची तजवीज सरकारनें करावी असा गौर यांचा ठराव होता. याविषयीं त्यांचा प्रयत्न आज दोनतीन वर्षें चालू आहे, पण त्याला यश येत नाहीं. हें कोर्ट सरकारला नको व लोकपक्षालाहि नको. अर्थात् गौर यांच्या ठरावाला यंदाहि पाठबळ मिळणार नव्हतेंच. कारण आहेत त्या न्यायकोर्टांत आणखी एकाची विनाकारण भर घालावयाची, दहापांच लक्षांचा नवा खर्च उभारावयाचा, आणखी चारदोन साहेब लोकांची वर्णी लावावयाची व प्रांता-निहाय वरिष्ठ वकिलांची पोळी पिकवावयाची. यापेक्षां सातासमुद्रांपलीकडे प्रिव्ही कौन्सिल आहे तेंच बरें! प्रिव्ही कौन्सिलचा खर्च जबर असल्यामुळें कज्जेदलाल लोकांना थोडा आळा तरी बसतो. पण या कामीं मि. जिना हे डॉ. गौर यांच्या बाजूचे होते. आणि स्वराज्य पक्षाप्रमाणें सरकारलाहि, निराळ्या कारणाकरितां का होईना हें नवें कोर्ट नको होतें. तेव्हां जिना हे थट्टेनें नेहरू यांस थोडें लावून बोलले कीं, "आमच्या विरुद्ध मतें द्यावयाला लॉबींत जातां, पण संभाळा तेथें सरकारी सभासदांच्या गळ्यांत मिठी पडेल." पण हा कांहीं

सरकारी ठराव नव्हे, आणि आमच्याकारखेंच सरसारचेंहि मत असल्या कारणानें आमच्याप्रमाणें तेहि लॉबींत चालून आल्यास त्यांत गळ्याला मिठी पडण्याची भीति कसली? आगगाडीच्या एकाच डब्यांत एकामेकांचे वैरीहि बसतात. पण या विनोदाची नेहरू व जिना या दोघांनाहि जाणीव होती. परंतु गौर यांना १५ च मतें मिळालीं, तेव्हां त्यांनीं चिडून स्वराज्य पक्षावर तोंडसुख घेतलें व त्या पक्षांतील लोकांनींहि गौर यांचे वाभाडे काढले.

* * *

अशा निरुत्साहजनक स्थितींत उत्साहजनक अशाहि गोष्टी घडून येतच आहेत. कारण वरील तंट्याचे दुसरेच दिवशीं व्यंकटपति राजू यांचा लष्करी कॉलेजचा ठराव चर्चेस निघाला, आणि फिरून हुल्लड होऊन सरकार पक्षाचा पराभव झाला; व या वेळीं गौर, शिवस्वामी, अबदूल कासीम, जोशी, तात्पर्य सर्व स्वतंत्र व नेमस्त पक्षांच्या लोकांनीं स्वराजिस्टांबरोबर एकाच लॉबींत जाऊन मतें दिलीं आणि पूर्वीं बेबनावसा दिसला त्याचे जागीं फिरून एकी दिसून आली. अशा रीतीनें बेकीची फिरून एकी झाली. तात्पर्य, प्रत्यक्ष बजेट फेटाळण्याची बाब सोडून दिली तर इतर अनेक गोष्टींत अनेक पक्षांचें मिळून सरकारविरुद्ध बहुमत सिद्ध होण्याचा संभव आहे. खुर्दानाण्यांचा व्यवहार एकमतानें होतो. बंदा रुपया खर्चण्याला मात्र एकमत होत नाहीं, यामुळें कच्चे करूनच काय मिळेल तें घेतलें पाहिजे असें या बाबतींत म्हणावें लागतें.

* * *

ता. १३ रोजीं स्वराज्य पक्षाची सभा येथें भरणार होती परंतु ती भरूं शकली नाहीं. ज्यांच्या प्रकरणाखातर ही सभा मुख्यतः भरावयाची त्यांचेच प्रतिनिधी येथें येऊं शकले नाहींत. डॉ. मुंजे यांच्या बंधूंना प्लेग झाला. श्रीयुत अणे यांचे कुटुंबाची तबियत फार बिघडली व डॉ. खरे यांजवर कंपनी ॲक्टा-प्रमाणें कांहीं प्रकरण याच वेळीं मुंबईस निघालें व अशा रीतीनें तिघांच्या तीन तऱ्हा झाल्या. इकडे देशबंधु दास यावयाचे तेहि पाटणा येथें आजारी होऊन पडले. मिळून सभा भरवितां आली नाहीं. दरम्यान बंगाल-कौन्सिलांत स्वराज्य पक्षाचा पराभव होऊन दिवाणांचे पगार बेजटांत दाखल करण्याचें ठरलें! याहि सभेला दासबाबू हजर राहूं शकले नाहींत. तथापि येत्या दोन आठवड्यांत नागपूरच्या स्वराज्य पक्षानें काय करावें याविषयींचें धोरण कार्य-कारी कमिटीस ठरवावेंच लागेल. तें धोरण कांहींहि ठरो पण दिल्ली काय, कल-

कत्ता काय, कोठेंहि स्वराज्य पक्षाचे सभासद संख्येनें थोडे, व त्यांच्या जोडीनें काम करण्यास व मत देण्यास तयार अशा दुसऱ्या एखाद्या भरदार पक्षाचें पाठबळ असावें तसें निश्चित नाहीं, यामुळें सरकारचें अजून फावत आहे हीच गोष्ट उघड दिसून येते. याचा अर्थ गेल्या निवडणुकींत स्वराज्य पक्षाला मिळाल्या त्याहून आणखी अधिक जागा मिळावयास पाहिजे होत्या. राष्ट्रीय सभेची संमति व असंमति यांच्या संधिप्रकाशांत गेल्या निवडणुकी झाल्या, यामुळें वरील प्रकार घडून आला. पण पुढील निवडणुकींत ही उणीव भरून निघेल असें वाटतें.

* * *

गेल्या मंगळवारीं बॅरिस्टर जम्नादास यांच्या ठरावानें एक महत्त्वाचा प्रश्न असेंब्लीपुढें आणला गेला व खासगी रीतीनें त्याचा विचार करण्यास आपण तयार आहों असें सरकारनें सांगितल्यावरून उभयतांच्या संमतीनें ठरावाची चर्चा येत्या सप्टेंबरपर्यंत पुढें ढकलण्यांत आली. या ठरावाचा विषय हिंदुस्थानच्या कर्जफेडीसंबंधींचा होता. हल्लीं हिंदुस्थान सरकाराला नऊ-साडेनऊशें कोटी रुपये कर्ज आहे. त्यापैकीं खरें कर्ज किती मानावें, कारखानदारींत घातलेलें भांडवल असें किती मानावें, किती रकमेला योग्य तारण आहे असें म्हणावें व किती रक्कम निवळ अंगावर आहे असें समजावें, हा तात्त्विक वाद झाला. पण खरा वाद असा कीं, दरसाल कर्जफेडीकरितां म्हणून चालू उत्पन्नांतून किती रक्कम काढून ठेवणें रास्त होईल. सरकारचा विचार असा दिसतो कीं, दरसाल सुमारें चार कोटी रुपये कर्ज-फेडीकरितां म्हणून बाजूला काढून ठेवावेत; किंबहुना त्यासंबंधानें एखादा कायदा करून घ्यावा म्हणजे ही रक्कम कमी करण्याचा अधिकार असेंब्लीला उरणार नाहीं. याच्या उलट विचारसरणी अशी कीं, चार कोटी रुपयांपर्यंत दरसाल यापुढें शिल्लक उरेल कीं नाहीं हें आधीं कोणी सांगावें? उरली तरी ते पैसे निष्कारण कर्जफेडीकडे खर्चून रयतेच्या डोक्यावरील कराचें असह्य ओझें आहे तसेंच पुढेंहि ठेवण्याचें काय कारण! विशेष मौज ही कीं, नव्या दिल्लीवर खर्च झालेली रक्कम ही दरसाल कोट, पाऊण कोट, रुपये परत देऊन सरकार दहापंधरा वर्षांत फेडूं पाहतें. पण नव्या दिल्लीवर बुडीत खर्च पुष्कळ झाला असला तरी इमारती वगैरेच्या रूपानें तारण म्हणून कांहीं राहणारच. सरकारी भाड्याची बचत व खासगी भाड्याचें उत्पन्न मिळून कांहीं रक्कम दर-

साल मिळणारच आणि नवी दिल्ली फिरून पंधरा वर्षांनीं नवी बांधावी लागेल असेंहि नाहीं. असें असतां कर्जफेडीची इतकी धांदल काय म्हणून असा प्रश्न सहजच सुचतो. स्वराज्य पक्षानें उपस्थित केलेल्या प्रश्नावर तज्ज्ञ लोकांचें मत अनुकूल असेंच आहे व खाजगी कमिटींत चर्चा निघाल्यामुळें कदाचित् येत्या अंदाजपत्रकांत या धोरणाचा अधिक खुलासा होईल असें वाटतें.

* * *

चालू आठवड्यांत नरेंद्रमंडळाच्या कार्यकारी कमिटीची सभा दिल्लीला भरली होती. बिकानेरचे महाराज, धोलपूरचे नबाब, सांगलीचे संस्थानिक वगैरे मंडळी आलेली आहेत. या सभेंत काम काय चालतें हें बाहेर कोणासहि कळूं शकत नाहीं, म्हणून त्याविषयीं तर्क चालविण्यांतहि अर्थ नाहीं. आजवर नाभा संस्थानचा प्रश्न मातबर म्हणून गणला जात असे. आतां त्यांत इंदूर-प्रकरणाची भर पडली आहे. संस्थानसंबंधानें असेंब्लींतील लोकांना कळकळ वाटत असतांहि असेंब्लींत संस्थानविषयक प्रश्नांची चर्चा करतां येत नसल्यामुळें सहजच कोंडमारा होतो. गतवर्षीं जैतो येथील कत्तलीचा विषय होता. यंदा नाभा येथील शीख कैद्यांच्या छळाचा प्रश्न उपस्थित झाला आहे. पं. मदन मोहन मालवीय यांना आज अमृतसरहून आलेल्या तारेवरून हा छळ अनन्वित होता असें दिसतें. खासगी रीतीनें त्याविषयीं माहिती काढण्याचा प्रयत्न सुरू आहे. इकडे व्हाइसरॉयसाहेब ग्वाल्हेर संस्थानांत पाहुणचार खात व शिकार करीत बसले आहेत! अशा स्थितींत संस्थानी प्रजेच्या गाऱ्हाण्यांची दाद ते कशी घेणार? कसेंहि असो, संस्थानांचा प्रश्न दिवसेंदिवस अवघड होत चालला आहे एवढें खरें. मध्यस्थांची स्थिति तर अशी झाली आहे कीं, संस्थानिकांची कृति ऐकून एका कानावर हात ठेवावा व संस्थानाविषयीं अभिमान नसणारे लोक जे उद्‌गार काढतात ते ऐकून दुसऱ्या कानावर हात ठेवावा!!

## पत्र नं. ६

ता. २७।२।१९२५

गेल्या आठवड्यांत असेंब्लीच्या दिवाणखान्यांत 'रेल्वे' यॉशिवाय दुसरा शब्द सहसा ऐकूं येत नव्हता. या खात्याचा जमाखर्च शंभर कोटींचा; खात्याची स्वतंत्र व्यवस्था यंदापासूनच प्रथम अमलांत आलेली; रेल्वे-

बजेटाची मांडणी, त्यावरील चर्चा, आणि जमाखर्चावरील वादविवाद यांना सबंध सहा दिवस मिळालेले; यंदाच प्रथम रेल्वे फायनॅन्स कमिटीनें रेल्वे-बजेटाची तपासणी केलेली; यामुळें या विषयांत असेंब्लीच्या सभासदांची बुद्धि किंचित् खोल अशी यंदाच प्रथम शिरली. चार दिवसांत मिळून पंधरा ठरावांच्या रूपानें खर्चाची मंजुरी द्यावयाची असल्यामुळें 'होय, नाहीं', 'असें कां, तसें कां' असें म्हणण्यास पुष्कळ सवड मिळाली. सभासदांनीं तिचा फायदा चांगलाच घेतला. लोकपक्षानें सरकारला इतकें खचित दाखविलें कीं, आपणालाहि रेल्वेच्या जमाखर्चाचा प्रश्न समजतो. आणि मतें देतांना स्वतंत्र व स्वराजिस्ट असा भेद अनेक प्रसंगीं झाला तरी रेल्वे-बोर्डाच्या मर्मावर निंदा व काटकसर यांचे अनेक घाव घालतां आले.

* * *

हिंदुस्थानांतील सगळें रेल्वे खातें सरकारच्या मालकीचें असावें व आज नाहीं तर उद्यां तरी तें तसें व्हावें हें धोरण सरकारच्या गळयांत ॲकवर्थ कमिटीच्या शिफारशीप्रमाणें पडलें. पण रेल्वे-मेंबर सर चार्लस इन्नेस व रेल्वे-बोर्डाचे सर्व मुख्य अधिकारी हे या धोरणाविरुद्ध, यामुळें तें प्रत्यक्ष पदरांत कितपत पडतें याविषयीं अजूनहि शंकाच होती. पण गेल्या सप्टेंबरांत सिमल्यास झालेल्या व्यवस्थेनें एका बाजूस जसे असेंब्लीचे तसेच दुसऱ्या बाजूस सरकारचेहि हात बांधले गेल्यासारखे झाले आहेत. कित्येक कंपन्यांशीं अनेक वर्षांचे करार या व्यवस्थेपूर्वीच होऊन गेलेले असल्यामुळें ते करार पाळणेंच आतां असेंब्लीला प्राप्त; शिवाय असे करार नसल्यामुळें रेल्वे-बोर्डाच्या हातीं इतर रेल्वेची व्यवस्था प्रत्यक्ष आली तरी जुनी कामाची पद्धत व जुने वतनदार यांना धक्का लावणें अवघड यामुळें रेल्वे खात्याचा ताबा हा फक्त कागदोपत्रीं सरकारकडे आला याहून अधिक नाहीं. अजूनहि रेल्वे-बोर्डांत कंपनीच्या पक्षपाताचा संभव डोकावतच आहे. अजूनहि एवढेंतेवढें निमित्त काढून आम्हाला बजावण्यांत येतच आहे कीं, तुम्ही रेल्वे-बोर्डाच्या कारभारांत ढवळाढवळ कराल तर पैशाचा तोटा होईल, कामहि बिघडेल, आणि रेल्वेचा कारभार सरकारकडे नको, तो परत कंपन्यांकडे द्यावा असें म्हणण्याची पाळी तुम्ही आपल्याच हातानें ओढून घ्याल. तात्पर्य, इतर खात्यांत सिव्हिल सर्व्हंटांचा बेभरंवसा व वरचढपणा प्रत्ययास येतो तसाच या खात्यांतहि येत आहे. खुद्द रेल्वे-बोर्डांत एक सिव्हिलियन व रेल्वे मेंबर हे

स्वतः सिव्हिलियन, तेव्हां वरचढपणाशिवाय इतर अपेक्षा कशी करावी ? रेल्वे चीफ कमिशनर हाइंडले हेहि मोठे रगेल व गुर्मीखोर आहेत.

* * *

पण इतर खात्यांत अखेर सिव्हिलियन लोकांचा पराभव झाला तसाच याहि खात्यांत पुढेंमागें मगरूर रेल्वे-सरदारांचा पराभव होईल याविषयीं शंका नाहीं. सिव्हिलियन लोक कांहीं अंशीं जुने पहारेवाले आरब व नवे तगादेदार पुरभय्ये यांच्यासारखे आहेत. त्यांना पगार भरपूर दिला म्हणजे मग ते इमानदारीचा बेलभंडारा उचलून देण्यास तयार होतात. नव्या सुधारणांच्या कायद्यानें सिव्हिलियनांचे किंवा सरसकट वरिष्ठ नोकरांचें पगार व भत्ते हे अबाधित केले, व उरलीसुरली उणीव ली कमिशननें भरून काढली. त्यामुळें आतां या अवजड नोकरांच्या इमानदारीची परीक्षाच तेवढी पाहावयाची राहिली आहे. पण इतर खात्यांतील सिव्हिलियनांप्रमाणेंच रेल्वे खात्यांतील वजनदार गोऱ्या लोकांना " आम्ही रेल्वेकारभाराचें नवें धोरण यशस्वी करून दाखवूं " अशी तोंडानें तरी कबुली द्यावी लागत आहे. हल्लींच्या वादविवादांत सर चार्लस इन्नेस यांनीं तशी कबुली उघडपणें दिली. " आमचें व्यक्तिशः मत तसें नसलें तरीं असेंब्लीच्या ठरावाप्रमाणें सरकारच्या हातीं आलेला रेल्वेचा कारभार आम्ही यशस्वी करून दाखवूं " असें त्यांनीं उघड सांगितलें. किंबहुना या वादाच्या कैचींत सरकार सांपडल्यानें रेल्वे-बोर्डावर एका हिंदी गृहस्थाची नेमणूक करण्याचें वचनहि सरकारनें गेल्या सप्टेंबरांत दिलें आणि संधि मिळतांच तें नक्की अंमलांत आणतों अशीहि कबुली सरकारास द्यावी लागली. रेल्वेबोर्डांत सगळेच तज्ज्ञ असतात असें नाहीं. सिव्हिलियन चालतो, मग गोऱ्यांचे ऐवजीं काळा कां चालूं नये ? सरकारला युक्तिवादानें रेटीत रेटीत विहिरीच्या कांठापर्यंत नेलें व आतां बचाव करण्याला एक पावलाचाहि अवकाश नाहीं इतका बिनतोड प्रसंग आणला, म्हणजे मग एखादी गोष्ट तें कबूल करतें.

* * *

रेल्वेखर्चाची मंजुरी हा एकच विषय चार दिवस चालला होता. पहिल्याच दिवशीं पक्षभेदानें लोकनियुक्त प्रतिनिधींचे धिंडवडे काढल्यामुळें दोनहि पक्षांचीं मतें पडून सरकारचा पराभव करण्याची पर्वणी किती थोड्या वेळां येईल याचा अंदाज करतां आला ! नॅशनॅलिस्ट पक्ष मोडणार अशाविषयीं

चिन्हें दिसत असल्याचें मागील पत्रीं मीं लिहिलेंच होतें व ती गोष्ट या पहिल्याच दिवशीं घडून आली. रेल्वे खात्याच्या खर्चाच्या पंधरा बाबींपैकीं पहिलीच बाब रेल्वे-बोर्डाच्या मंजुरीची होती. अर्थात् कायदेशीर नापसंती दाखविणें, विरोध करणें, अडथळा करणें या सर्वांची खरी संधि तीच होती, म्हणून यंदा काय करावयाचें हा प्रश्न निघाला तेव्हां "गतवर्षीं झालें तें झालें, या अडवणुकीच्या फंदांत यंदा आम्हीं पडूं इच्छीत नाहीं" असें स्वतंत्र पक्षानें उघड सांगितलें ! पण एवढ्यानेंहि कांहीं बिघडलें नसतें. कारण हा प्रसंग येऊन स्वराज्य पक्षाला केवळ आपल्या पायावर उभे राहण्याची वेळ केव्हां तरी यावयाचीच होती. त्याप्रमाणेंच या पहिल्या खर्चमंजुरीच्या बाबीला विरोध करण्याचें स्वराज्य पक्षानें ठरविलें व स्वराज्य पक्षाच्या बाजूनें मत द्यावयाचें नाहींच, पण उलट सरकारच्या बाजूनें मत द्यावयाचें असें स्वतंत्र पक्षानेंहि ठरविलें ! पं. मोतिलाल नेहरू यांनीं आपल्या विरोधाची राजकीय कारणें पुढें मांडलीं पण आज एकमेकांविरुद्ध बोलून घेऊं अशी एक प्रकारची खुमखुम कित्येकांना आलेली असल्यामुळें शब्दानें शब्द वाढण्यास उशीर लागला नाहीं. प्रथम मोतिलाल नेहरू यांनींच एक प्रकारें या वादास सूत-उवाच केलें. आजवर स्वराज्य पक्षाला सरकारचा तेवढाच विरोध होता पण आजचें वायुभारमापक यंत्र कांहीं वेगळाच प्रकार दाखवीत आहे. वादळाचा मध्यबिंदु सरकारकडून निघून आमच्या मित्रपक्षांतच घुसला आहे, वगैरे सूचक शब्द त्यांनीं योजले, तथापि त्यांत एक प्रकारचा भारदस्तपणा होता; व स्वतंत्र पक्षाकडूनहि भारदस्तपणाचें उत्तर मिळून जुन्या मित्रांचें हें नवें भांडण येथेंच संपलें असतें. पण एकदां वादाला सुरुवात झाल्यावर तो चक्रवाढ गतीनें वाढला व अखेर वादांत कोणासच भान न राहून स्वतंत्र पक्षानें स्वराज्य पक्षाला व स्वराज्य पक्षानें स्वतंत्र पक्षाला अशा जखमा केल्या, कीं त्या परस्परांनीं बरेच दिवस भोगाव्या !

* * *

अशा वादांत अविचारी बेताल वक्ते असतात, त्यांना तर मोठीच हौस वाटते; व अविचारी मनुष्यानें तोंडसुख घेतलें म्हणजे सुविचारी मनुष्याचाहि विचार सुटतो. प्रथम रंगा अय्यर यांनीं ताल सोडला. चमनलाल यांनीं सरकार व स्वतंत्र पक्ष या दोघांनाहि कोपरखळ्या मारल्या. जिना हे स्वतंत्र पक्षाची तरफदारी करूं लागले, त्यावर पटेल यांनीं जिना यांचा युक्तिवाद

त्यांचेवर उलटविण्याकरितां नॅशनॅलिस्ट पार्टीच्या सभेंतील खळमळ बाहेर काढून धुतली, आणि पालबाबू यांनीं स्वराज्य पक्षावर सूड उगवून घेतला. या यादवीची खबर सरकारला आगाऊच लागलेली असल्यानें त्यांनीं गप्प बसून मौज पाहण्याचें ठरविलें होतें. रंगा अय्यर यांचें विचित्र नाटकी बेभान वक्तृत्व सुरू होतांच कित्येक सरकारी सभासद त्यांच्या बाकापुढें मुद्दाम जाऊन बसून त्यांजकडे तोंड फिरवून हसून त्यांना अधिक बेभान होण्यासाठीं इरेला घालीत होते. पटेल यांना उत्तेजनाऐवजीं विरोध लागतो, व तो त्यांना मिळतांच पार्टीचे नियम वाचून दाखविण्यापर्यंत व खासगी संभाषणांतील उल्लेख करण्यापर्यंत त्यांनीं मजल गांठली. पालबाबूंना तर आपण लोकांची निंदा करतांना स्वतःचीहि अप्रत्यक्ष निंदा करतों याचें भान राहत नाहीं हें प्रसिद्धच आहे. तात्पर्य, सर्वांचे दोष एकत्र होऊन अत्यंत उद्वेगकारक असा देखावा लोकपक्षाच्या मित्रांना पाहावा लागला. कित्येक म्हणाले, पुढची रंगपंचमी आधींच झाली. पण रंगपंचमीपेक्षां धुळवड हा शब्दच या प्रकाराला अधिक शोभण्यासारखा होता. कारण एकमेकांनीं एकमेकांवर टाकले ते गुलालगोटे नव्हते, त्याहून कांहीं वेगळें होतें. अशा प्रकरणांत एकाचें बंधन सुटलें म्हणजे दुसऱ्याचें सुटतें. नेहमीं तटस्थ असणारे सभासदहि या विनोदांत सामील होतात. सरकारी सभासद फुटाण्यासारखे हर्षभरानें आपल्या जागेवर उडत होते. आणि सर्व सभासदांचा गंभीरपणा राखण्याची सुपारी ज्याला नेहमींची दिलेली ते अध्यक्षहि आपल्या तोंडाची इस्तरीची घडी विसकटून देऊन हास्यसुख उघडपणें भोगीत होते. एकानें त्यांना मध्येंच विचारलें कीं, 'हा सर्व प्रकार मुद्दयाला सोडून नाहीं काय?' तेव्हां ते म्हणाले कीं, "निम्मा चिवडा खाऊन झाल्यावर मग बरी हो तुम्हांला एकादशीची आठवण झाली!" पण खरोखरी त्यांना आमची ही गम्मत पाहण्याचीच मनांतून इच्छा होती.

* * *

या वादांत कोण काय बोललें, कोणी कोणत्या कोट्या केल्या, कोणाच्या हातून न कळत मर्मभेदक घाव बसले, हें सर्व सांगत बसलों तर फारच विस्तार होईल. पण कांहीं गोष्टी सांगण्यास हरकत नाहीं. जिना हे कोणतेहि कागदपत्र वाचण्याची तसदी घेत नाहींत, फक्त एखाद्याचा एखादा शब्द घेऊन बॅरिस्टरी थाटानें ऐटदार तोंडपाटिलकी करतात ही गोष्ट प्रसिद्ध आहे. या

वादांत तसाच कांहीं प्रसंग येतांच रंगा अय्यर यांनीं "जिना नेव्हर रीड्स" असें म्हणतांच सभागृह हशानें दणाणून गेलें. तसेंच "तुमची यंदाची वागणूक गैरशिस्त आहे" असें जिना यांनीं स्वराज्य पक्षास म्हणतांच, "तुम्हीं तरी गतवर्षी काय केलें?" असा उलट प्रश्न त्यांना टाकण्यांत आला. त्यावर कांहीं उत्तर देतां देईना, तेव्हां जिना प्रांजलपणें म्हणाले, "मीं गतवर्षी घोडचूक केली. पण यंदा शुद्ध मनोदेवता निकाल देईल तसा मी वागणार." त्यावर त्यांना फिरून प्रश्न टाकण्यांत आला. "मग गतवर्षीचें काय?" त्यावर ते म्हणाले, "गतवर्षी मी पार्टीच्या नियमांनीं बांधला गेलों म्हणून मला मनोदेवतेच्या आज्ञेप्रमाणें वागतां आलें नाहीं." त्यावर त्यांना फिरून प्रश्न करण्यांत आला कीं, यंदा तरी तुम्ही त्या बंधनापासून मोकळें कोठें आहां? यंदा नॅशनॅलिस्ट पार्टी नाहीं तर स्वतंत्र पार्टी म्हणून पार्टीच आहे. या पार्टीचे तीनचतुर्थांश मत तुमच्या मताविरुद्ध पडलें तर यंदाहि पुनः तुम्हांला खाटीकखान्यांतच जावें लागणार. या प्रत्येक प्रश्नोत्तराबरोबर सगळें सभागृह खदखदून हसत होतें. पार्टीशिवाय म्हणजे पक्षबंधनाशिवाय राजकारण नाहीं हें जिना यांना अद्यापि शिकावयाचें आहे.

पटेल यांचीहि गत तीच झाली. जिनांना उत्तर देतांना त्यांनीं राष्ट्रीय चळवळीची गोष्ट काढली. त्यावर जिना त्यास म्हणाले, "बजेट फेटाळल्यावर लोकांत जाऊन कर देऊं नका असें मी सांगत फिरेन असें तुम्हीच म्हणाला होता ना?" त्याला उत्तर म्हणून पटेल यांनीं आपल्या मागील भाषणांतील एक लांबलचक उतारा वाचून दाखविला व त्याचा फिरून खुलासा करण्याकरितां ते म्हणाले, "या माझ्या शब्दांना जर कांहीं अर्थ असेल तर–" झालें, पटेल यांना वाक्य पुरें करूं देतो कोण? सगळें सभागृह हसण्यानें कोसळून पडलें. हा न कळत विनोद घडला, कारण बोलणाराच्या तोंडूनच त्याचें स्वतःचें निंदात्मक वर्णन झालें! नंतर बिपिनबाबूंची पाळी आली. त्यांनीं ही संधि साधून स्वराज्य पक्षावर खूप तोंडसुख घेतलें. 'स्वराज्य पक्षाला सदसद्विवेकबुद्धि नाहीं' असें त्यांनीं म्हणतांच कोणी एकानें त्यांस विचारलें, 'बाबूजी तुमची सदसद्विवेकबुद्धि कोठेंशी राहते? त्यावर पाल यांनीं लावून बोलण्याच्या स्वरानें उत्तर दिलें, "माझी सदसद्विवेकबुद्धि माझ्याजवळ नेहमीं राहते. ती दिवसाच काय पण रात्रीदेखील मला सोडीत नाहीं." या भाषणानें फिरून हसण्याचा गजर झाला. त्यावर चिडून जाऊन "मीचसा काय पण स्वराज्य

पक्ष देखील सरकाराशीं सहकारिता करतो. टाटांच्या पोलादी कारखान्याच्या विनंतीला खंदकापार होऊन सरकारी किल्ल्यांत शिरण्याला सिमल्यास स्वराजिस्टांनींच पूल बांधून दिला कीं नाहीं ?" असा सवाल त्यांनीं केला. पण सरकार, टाटा व स्वराज्य पक्ष या तिघांची चेष्टा एकदम करण्याची कोटी आतां उष्टी व शिळी झाल्यानें तिला कोणी फारसें हसत नाहीं. या मुख्य वक्त्यांच्या गोष्टी झाल्या. शिवाय कबीर अहंमद, शामलाल नेहरू वगैरे ठराविक विदूषकांनीं मधून मधून कांहीं मार्मिक, कांहीं असमंजस असे उद्गार काढून सभा हसती ठेविली होती. पण हा हास्यरस लवकरच ओसरून स्वराज्य पक्षाविरुद्ध निकाल झाल्याबरोबर एका पक्षांतील कांहीं लोक 'पंडितजीका जय' म्हणून ओरडले व दुसऱ्या एका पक्षानें आनंद दर्शविण्याकरितां हात आपटून आपल्यापुढील टेबलें फोडण्याची वेळ आणली.

* * *

असो. पहिल्या दिवशीं नेहरूंच्या उपसूचनेवर स्वराज्य पक्षाचा पराभव झाला, पण लगेच पटेल व सरदार मुतालीक यांच्या उपसूचनांवर सरकारचा पराभव झाला. दुसऱ्या दिवशीं जोशी यांची तिसऱ्या वर्गाच्या उतारू संबंधाची उपसूचना मंजूर झाली. पण लाला दुनीचंद यांची रेल्वेंतील लांचलुचपतीसंबंधाची उपसूचना व कस्तुरभाई लालभाई यांची कोळशाच्या रेल्वेभाड्यासंबंधाची उपसूचना अशा दोनहि नापास झाल्या. तिसऱ्या दिवशीं आचार्य यांची हिंदी गृहस्थ रेल्वेंत मोठ्या पगारावर नेमण्याबद्दलची, दोरास्वामी अय्यंगार यांची रेल्वेंतील इन्स्पेक्शन चार्जेस कमी करण्याबद्दलची व पटेल यांची विलायतेंतील खर्चाची, अशा तीन उपसूचना मतें नोंदून मंजूर झाल्या. ली कमिशनच्या शिफारशीप्रमाणें गोऱ्या नोकरांचे पगार वाढविण्याकरितां सदतीस लक्ष रुपयांची मागणी होती. ती सर्वच्या सर्व नामंजूर करावी अशी केळकर यांची उपसूचना होती. तिला स्वतंत्र व स्वराज्य अशा दोनहि पक्षांची संमति होती. यामुळें तीहि मत घेतां मंजूर व्हावयाची, पण उपसूचना पुढें मांडल्याबरोबर सर चार्लस इन्नेस यांनींच ती मागणी आपण होऊन मागें घेतली, यामुळें मतें घेण्याचें कारणच पडलें नाहीं. याशिवाय स्वतंत्र पक्षाच्या किरकोळ निंदाव्यंजक उपसूचना कांहीं होत्या पण चर्चेनंतर ज्यांनीं त्यांनीं त्या परत घेतल्या; त्या परत घेतल्या नसत्या तर कदाचित् मंजूरहि झाल्या असत्या. कारण स्वतंत्र पक्ष आपल्या बाजूनें मतें देवो वा न देवो, आपण तरी

स्वतंत्र पक्षाचे बाजूनें मतें देऊन सरकारचा पराभव करावयाचा असें स्वराज्य पक्षानें कायमचें धोरण ठरविलें आहे. यावरून असेंब्लींत कोण कोणाचे पाय ओढतो व कोण कोणास मदत करतो हें दिसून येईल.

* * *

कौन्सिलांतील कामकाजांचें नांव निघालें कीं, सगळी बकवा असेंब्लीच्या नांवाची. कौन्सिल ऑफ स्टेटचें नांव फारसें कोठें ऐकूं येत नाहीं असें बाहेरगांवीं लोकांना वाटणें स्वाभाविक आहे. पण याचें कारण हेंच कीं, या वरिष्ठ सभागृहाचा उपयोग सरकारला नेहमीं असत नाहीं; फक्त कारणविशेषीं असतो. वास्तविक नवीन बिल किंवा ठराव आणावयाचे झाल्यास कनिष्ठ व वरिष्ठ अशा सभागृहांत सारखाच अधिकार व सारखीच सवड कायद्यानें ठेवली आहे. परंतु सरकार आपलीं बिलें आणावयाचीं तर तीं प्रायः प्रथम असेंब्लींतच आणतें. कारण या पहिल्या मोठ्या घरांच्या चाळणींतून खालीं उतरेल तें मग वरच्या लहान घरांच्या चाळणींत घालावयाचें. खासगी सभासदांनीं बिलें आणावीं, तर त्यांतील सभासद बहुतेक असें शिष्ट आहेत कीं, त्यांना जगाची खातर नाहीं. गेल्या सव्वा महिन्यांत कौन्सिल ऑफ स्टेटचें काम सगळें मिळून पंधरा-वीस तास झालें असेल! जेवणानंतर तोंडाचीं थोडीशी शतपावली झाली कीं लगेच झोंप! पण या सभेंतील लोक आळशी म्हणून निरुपद्रवी आहेत असें मात्र नाहीं. लोकपक्षाचें कोणतेंहि बिल पुढें आलें, कीं तें हाणून पाडण्याकरितां मारेकऱ्यासारखे ते टपून बसलेले असतात. सरकारविरुद्ध बोलतांना यांच्या तोंडांत लोणी विरघळत नाहीं व खडीसाखर फुटत नाहीं. पण स्वराज्य पक्षावर, किंबहुना असेंब्लीवर, रागावून बोलण्याचा प्रसंग आला असतां त्यांच्या आवेशाचा व कुचकटपणाचा सगळा ठेवा बाहेर येतो. सिमल्यास असेंब्लीनें मंजूर केलेलें गौर यांचें क्रिमिनल लॉ अमेंडमेन्ट बिल, नियोगी यांचें रेल्वे ॲक्टाच्या दुरुस्तीचें बिल व प्रॉव्हिडन्ट फंड बिलांतील एक महत्त्वाचें कलम अशीं बिलें वर जातांच सदर कौन्सिलानें तीं नामंजूर केलीं, व असेंब्लीचा सर्व उद्योग फुकट घालविला! नाहीं म्हणावयाला दादासाहेब करंदीकर, के. व्ही. रंगास्वामी आय्यंगार, नटेसन, सर देवप्रसाद सर्वाधिकारी, दादासाहेब खापर्डे वगैरे पांचचार लोक तेथें लोक-पक्षाचे आहेत, पण त्यांतीलहि एखादा क्वचित् गळतोच. स्वराज्य पक्षाचे सभासद असे एकटेच दादासाहेब करंदीकर हे बड्या कौन्सिलांत आहेत. आतां मद्रासचे ना. रामदास हे नवे निवडून आले आहेत व ते दुसरे होतील.

होमरूल बिल नापास केल्याबद्दल एका वेळीं विलायतेंतील लोकांना ' हाउस ऑफ लॉर्ड्स'चा जितका राग आला तितका क्रिमिनल लॉ अमेंडमेंट बिल नापास केल्यानें कौन्सिल ऑफ स्टेटचा राग सर्व हिंदुस्थानास यावयास पाहिजे. कौन्सिलच्या नव्या निवडणुका ह्या वर्षाच्या अखेर होतील, तेव्हां तरी लोकमताचा कांहीं परिणाम झाल्यास पाहावें.

* * *

गेल्या पंधरवड्यांत कौन्सिलाबाहेर बऱ्याच चळवळी सुरू होत्या. दयानंद-सरस्वती यांच्या शताब्दीचा उत्सव, दासनवमीचा उत्सव, कॉलेजांतील व्याख्यानमाला, इंजिनियरिंग कॉन्फरन्स अशा बऱ्याच उपयुक्त गोष्टी येथें घडल्या. तसेंच आरोग्याच्या दृष्टीनें शिशुसप्ताह उपयुक्त झाला आणि घोड्यांचें व फुलाचें प्रदर्शन सुरू आहे. बादशाही किल्ल्यांत लष्करी दिवट्यांचा खेळ भुताटकीसारखा प्रेक्षणीय झाला असें पाहणारे सांगतात. दयानंद यांची शताब्दि ही हिंदु-धर्माच्या दृष्टीनें फारच महत्त्वाची बाब होय. मथुरेस आम्हांस आग्रहाचीं निमंत्रणें होतीं, परंतु येथील पार्टीच्या सभांमुळें कोणास जातां आलें नाहीं. येथील महाराष्ट्रमंडळ दासनवमीचा उत्सव मोठ्या आस्थेनें करतें. त्यांत यंदा अनेक महाराष्ट्रीय वक्त्यांचीं व्याख्यानें झालीं. तसेंच कॉलेजांतील व्याख्यानमालेंत जिना, केळकर, जम्नादास, षण्मुखम् चेट्टी वगैरें-चीं व्याख्यानें झालीं. इंजीनियर लोकांची सभा दोन दिवस झाली. तेथील निबंधांत विशेष अर्थ नव्हता, पण तो एक नवा धंदेवाईक संघ बनत असल्यानें त्यांत हिंदी इंजीनियरांनीं शिरणें जरूर आहे. मुंबई इलाख्यांतील प्रिन्सिपल गोखले (कराची), शेट्ये, करमरकर (पुणे), भाण्डारकर (जळगांव), राजाध्यक्ष व अय्यंगार वगैरे इंजिनियर आले होते. नवी दिल्ली व त्यांतील काम याविषयीं त्यांचा अभिप्राय काय पडतो पाहावें. महाराष्ट्राच्या परिचयाचे सर विश्वेश्वरअय्या हेहि सांपत्तिक चौकशी-कमिटीचे अध्यक्ष म्हणून येथें आले असून त्यांचेंहि काम सुरू आहे.

* * *

नाभा येथील कैद्यांच्या छळासंबंधानें मागील पत्रीं लिहिलेंच होते. या छळाची चौकशी करण्याकरितां पं. मदन मोहन, केळकर व नियोगी यांनीं नाभा येथें जावयाचें असें ठरविलें होतें; पण तेथें तुरुंगांत प्रवेश करण्याची परवानगी अखेरपर्यंत हातीं न आल्यामुळें कुमार गंगानंदसिंह व डॉक्टर

लोहोकरे यांना अमृतसर येथें पाठविण्यांत आलें. तेथें नाभा येथून सुटून आलेले कांहीं कैदी होते त्यांच्या जबान्या या उभयतांनीं घेतल्या व डॉक्टरी तपासणीहि केली. त्यावरून छळाची कांहीं हकीकत खरी आहे असें निदर्शनास आलें. उभयतांचा रीतसर रिपोर्ट लवकरच सादर होईल.

## पत्र नं. ७

ता. ६।३।१९२५

मागील पत्रांत असेंब्लीमधील धुळवडीच्या प्रकाराचें वर्णन केलें आहे. पण क्रिया व प्रतिक्रिया हीं सारख्याच जोराचीं असतात, ही म्हण याहि बाबतींत खरी ठरेल अशी आशा दिसते. कारण इतकी बाचाबाची झाल्यावर पुढें कांहीं नाहीं म्हटलें तरी चार-दोन महिने तरी वितुष्ट शिल्लक राहावें असें ठिकठिकाणच्या अनुभवांवरून लोक सहजच अनुमान करतील व तसें अनुमान त्यांनीं केल्यास त्यांची चूक नाहीं. परंतु सुदैवानें तसा प्रकार या भांडणाचा झाला नाहीं. फिरून दुसऱ्याच दिवसापासून दोनहि पक्षांचे अध्यक्ष, चिटणीस व व्हिप (हुकूमनवीस) एकमेकांस भेटूं लागले आहेत व कांहीं गोष्टींत न तर न बनो, पण इतर बाबतींत तरी ऐक्यभाव दाखवूं असें म्हणून मतैक्याच्या बाबी ठरविण्याचा प्रयत्न करूं लागले आहेत. झालेल्या भांडणाचा प्रकार दोघांनाहि वाईट वाटला, हाच त्याचा अर्थ. बाहेरच्या इतर भांडणांत असें कां होत नाहीं, व येथेंच तें कसें घडूं शकलें, असा प्रश्न सहजच सुचतो. त्याला उत्तर हेंच कीं, भांडणानंतर फिरून लगेच एकत्र बसून काम करण्याचा प्रसंग व जरूरी आणि शिवाय उभयतांचा शत्रु प्रत्यक्ष डोळ्यांपुढें हजर, असा प्रकार बाहेर सहसा घडत नाहीं.

*   *   *

याचा प्रत्यय रेल्वेवरील खर्चमंजुरीच्या वादविवादांतच आला. शिवाय आज एकंदर जमाखर्चाच्या मंजुरीचा वादविवाद सुरू झाला. त्यांतहि दोन पक्षांत फिरून एकी– थोडीबहुत का होईना– झाल्याचेंच दिसून आलें. दरम्यान शत्रूकडूनच उपकार घडावा त्याप्रमाणें बुधवारच्या सभेंत मुख्य सेनापति लॉर्ड रॉलिन्सन यांनीं लष्करी बाबतींत हिंदी लोकांच्या आकांक्षांवर हरताळाचा कुंचला फासला. “ माझ्या अमदानींत मीं लष्करी खर्च पुष्कळ कमी केला व माझ्या कारकीर्दींत लष्कराची तयारी जितकी जय्यत राहिली तितकी पूर्वीं

केव्हांहि नव्हती.” अशा शब्दांनीं त्यांनीं आपली पाठ तर थोपटून घेतलीच, पण लष्करांतील वरिष्ठ जागा हिंदी लोकांना मिळण्याचे बाबतींत आपल्या अंतरंगांतले उद्गार म्हणून त्यांनीं असें सांगितलें कीं, हिंदी लोकांचे उच्च मनोरथ सफळ होण्याला फारच काळ लागेल. हिंदुस्थान हें एक मुळीं राष्ट्र नव्हे. यामुळें राष्ट्रीय त्या नांवाचें सैन्य हिंदुस्थानांत बनूं शकत नाहीं! मुख्य सेनापतीच्या उद्गारांचा निषेध सभासदांनीं तेथल्या तेथेंच केला. पटेल व जिना या दोघांनींहि आपआपल्या पद्धतीनें या मूर्खपणाच्या उद्गारांचा समाचार घेतला व नंबर ३६ च्या खर्चमंजुरीचा प्रश्न निघेल तेव्हां लष्करी खात्यावर अनेकांकडून फिरून हल्ला होईलच.

* * *

असेंब्लीच्या लोकनियुक्त सभासदांमध्यें जो पक्षभेद दिसून आला त्याचा सर बेसिल ब्लॅकेट यांनींहि फायदा घेतला. कारण बजेटावरील वादविवाद संपवितांना केलेल्या भाषणांत त्यांनीं संघटित पक्षभेदाची स्तुति गायिली; व पक्षभेदांतूनच विधायक आणि गुणदोषात्मक चर्चा संभवते, असें मोठ्या मानभावीपणानें सांगितलें. पण त्यांना हें कळलें नाहीं कीं, एकीला जशा स्वाभाविक मर्यादा असतात तशा बेकिलाहि असतात. कारभाराच्या निरनिराळया विषयांवर युक्तिवाद किंवा आंकडेमोड सुरू असतां कोणाचें मत असें, तर कोणाचें तसें पडावें हें सरळच आहे. परंतु सरकारी, बादशाही किंवा प्रतिगामी धोरणाचा प्रश्न जेथें जेथें उत्पन्न होतो, तेथें तेथें दोनहि पक्षांचे विचार एकाच प्रणालिकेंतून वाहावेत व पक्षभेदाची सांधमोड व्हावी यांत काय आश्चर्य? फरक इतकाच कीं, स्वतंत्र पक्षाचा मनुष्य मागेंपुढें अभिनंदनाचे किंवा स्तुतीचे शब्द घालून मध्यें निंदा रचील, तर स्वराज्य पक्षाचा मनुष्य एकजिनसी सरळ निंदाच करील. ‘लॉस्ट डोमिनियन’ म्हणजे ‘कमावलेलें राज्य गमावलें’ या नांवाचें एक नमुनेदार पुस्तक नुकतेंच प्रसिद्ध झालें आहे. त्यांत जहाल-मवाळांतील भेद सुंदर रीतीनें वर्णन केलेला आहे. तो वाचला म्हणजे इंग्रज देखील मवाळांचा उपयोग करून घेत असले तरी त्यांना ते मनांतून शत्रूच लेखतात हें दिसून येईल आणि जी गोष्ट इंग्रजांना कळते ती आम्हांलाहि कळतें याचें प्रत्यंतर हेंच कीं, गेल्या आठवड्यांतील भांडणानंतर लगेच आज जिना व नेहरू या दोघांनीं मिळून अनेक मित्रमंडळींना मेजवानी दिली.

* * *

बजेटावरील वादविवाद दोन दिवस झाला. तो बराचसा शुष्क होता. नाहीं म्हणावयाला नागपूरचे बॅरिस्टर अभ्यंकर यांनीं आपल्या स्पष्टोक्तीनें बरीच मौज उडवून दिली. पटेल यांनीं गतवर्षीं तोंड टाकून बोलण्याचा जो पायंडा घातला तो दर सेशनमध्यें स्वराज्य पक्षाचा कोणी ना कोणी सभासद चालवीतच असतो. पटेलनंतर हा मान बेळवी यांना गतवर्षीं मिळाला होता. चमनलाल हे तर नेहमींच भांडावयास उठल्यासारखे बोलतात. जम्नादास मेथा हेहि स्पष्ट बोलतात, पण त्यांच्या भाषणाची मांडणी, युक्तिवाद व आंकडे-मोड, यांजवरच प्रायः रचलेली असते. स्वराज्य पक्षातर्फे चालू बैठकींतील ही कामगिरी अभ्यंकर यांनीं बजाविली. त्यांनीं पहिल्याच वाक्यांत स्पष्टोक्ति सुरू केली व ती अखेरपर्यंत टिकविली. त्यांच्या शरिराचा भव्य बांधा व चढा आवाज, या दोघांचा मेळ त्यांच्या निष्ठुर स्पष्टोक्तीशीं चांगलाच पडला. बजेटाच्या बुकांतील अनुक्रमणिकेमधल्या फक्त दहा-पांच मथळ्यांच्या उच्चारा-खेरीज त्यांनीं आंतील विषयाला फारसा स्पर्श केला नाहीं. पण "तो ग्रंथ फेकून सर बेसिल ब्लॅकेट यांच्या डोक्यावर मारणें एवढींच त्यांनीं बाकी ठेविली" असे उद्‌गार त्यांच्या अँग्लोइंडियन टीकाकारांनीं काढले आहेत. कौन्सिलांतून शब्दांच्या माराशिवाय कोणता पक्ष झाला तरी सरकारास अधिक काय देणार? पण तेथेंहि एका पक्षानें सरकारास युक्तिवादाच्या गावींत पकडून धरावें, व दुसऱ्यानें त्याच्या डोक्यावर हातोड्याचे घाव घाला-वेत असा मेळ पडला तरच कार्यभाग कांहीं बरा होईल. स्वराजिस्ट अभ्यंकरांच्या उलट उदाहरण म्हटलें म्हणजे दिवाणबहादुर रंगाचारियर यांचें. ते भाषण करतांना म्हणाले, "फडणविसावर मला पुढें अप्रिय शब्दांनीं टीका करावयाची आहे, म्हणून त्याच्या आधीं त्यांच्या कामगिरीबद्दल योग्य स्तुति व अभिनंदन करून घेऊं दे!!"

* * *

सर्वसाधारण बजेटावरील वादविवाद आज सुरू झाला. पण सगळा दिवस गिरण्यांच्या कापडावरील जकातीच्या प्रश्नानें एकट्यानेंच खाल्ला. बजेटमंजुरींत पहिलीच बाब कस्टम खात्याची आहे. त्यावर कस्तुरभाई लालभाई यांनीं ८७००० रुपये व पंडित नेहरू यांनीं ७९००० रुपये खर्च कमी करावा, अशा उपसूचना दिल्या होत्या. पंडितजींचीच रक्कम त्यांतल्या त्यांत अधिक हिशेबी होती. कारण निरनिराळ्या प्रांतांत हा कर वसूल करण्याकरितां नेमलेल्या एकंदर

कामगार वर्गाचा पगार ७९००० होतो. कस्तुरभाई यांनीं फक्त मुंबई व मध्य-प्रांत एवढेच अंदाजांत धरले होते. असो. या दोनहि उपसूचना जमेस धरून वादाविवादास सुरुवात झाली व सर्व दिवसभर जोराचा वाद झाला. त्यांत सरकारी सभासदांशिवाय विरुद्ध असें कोणी फारसें बोललें नाहीं. जोशी हे कालपर्यंत हा कर कमी करण्याला कबूल होते; पण मुंबईहून त्यांना आलेल्या एका तारेंत असा मजकूर होता कीं, हा कर कमी न झाल्यास गिरणीकामगारांची मजुरी वीस टक्क्यांनीं आम्हांस कमी करावी लागेल. अर्थात् ही गिरणीवाल्यांची दहशत योग्य नाहीं असें म्हणून ते उलट गेले! स्वराज्य पक्षांतील देवकीप्रसाद सिंह हे खुल्या व्यापाराचे भोक्ते म्हणून कांहीं थोडें उलट बोलले. स्वराज्य पक्षाकडील पंडीतजींशिवाय दुसरें कोणी बोललें नाहीं.

* * *

युरोपियन सभासदांपैकीं दोघे-तिघे हा कर उठविण्याचे बाजूनें बोलले. सर्वांत अकल्पित गोष्ट अशी कीं, मुंबई सरकारनें आपले प्रतिनिधि मि. वेब यांच्या द्वारें हा कर उठविण्याला अनुकूल असा अभिप्राय असेंब्लीपुढें मांडविला. याचें कारण उघड आहे. गिरणीचा धंदा मुख्यतः मुंबई व अहमदाबाद येथें चालतो आणि कर उठल्यापासून फायदा होईल तो गिरणीवाल्यांच्या खिशांत गेला तरी त्या धंद्याला मदत होईल व प्रांतीच्या कराच्या रूपानें त्यांतील थोडा अंश तरी परत सरकारास मिळेल. कसेंहि असो, हिंदुस्थान सरकारविरुद्ध मुंबई सरकारचें मत असेंब्लींत उघड नमूद झालें ही विशेष गोष्ट होय. मुंबईच्या गिरणीवाल्यांचे प्रतिनिधी दिल्लीस येऊन त्यांनीं निरनिराळ्या सभासदांना भेटून खटपट केलीच, पण प्रांतिक खंडणीच्या बाबतींत मुंबई सरकारास सूट मिळावी ती न मिळाल्यामुळें त्याहि बाबतींत दाद व न्याय मिळण्याकरितां मुंबई सरकारच्या प्रतिनिधींनीं इतर सभासदांप्रमाणें आपल्या बाजूस मतें मिळण्याची रीतसर खटपट केली. आजार झाला कीं गरिबांप्रमाणें श्रीमंतांनाहि डॉक्टर-वैद्यांकडे धांव घ्यावीच लागते. निवळ राजकीय प्रश्न नसेल तेव्हां प्रातिनिधिक संस्थांची गंमत बघण्यासारखीच असते ती हीच.

* * *

ता. ९ रोजीं सुधारणा-कमिटीचा रिपोर्ट येथें व विलायतेंत एकदम प्रसिद्ध होईल. रिपोर्टापाठोपाठ सर बेसिल ब्लॅकेट व लॉर्ड रेडिंग हे दोघेहि चार

महिन्यांच्या रजेवर विलायतेस जाणार आहेत मग येतांना ते बरोबर काय घेऊन येतात पाहावें. चलनी नाण्याचा प्रश्न हल्लीं बराच रंगाला आलेला असून त्याची चौकशी करण्याकरितां कमिटी नेमावी अशी लोकपक्षाचीहि मागणी आहे, व फडणवीससाहेब या कमिटीची योजना विलायतेंत करूनच बहुधा इकडे येतील. लॉर्ड रेडिंग स्टेट सेक्रेटरीच्या भेटीला म्हणून जाणार, तेव्हां सुधारणा कमिटीचा रिपोर्ट हाच त्यांच्या तेथील चर्चेचा मुख्य विषय होईल हें सांगावयास नकोच. पण या चर्चेंत काय निष्पन्न होईल याविषयीं येथें अनेक तर्क चालत आहेत. कोणी म्हणतात, लॉर्ड रेडिंग हे नांवाला रजेवर जाणार पण तिकडेच राजीनामा देणार. कोणी म्हणतात, जिना, परांजपे, सप्रू वगैरेंनीं केलेल्या रिपोर्टाची तरफदारी करण्याकरितां व सुधारणांचा हप्ता भरीव मिळविण्याकरितां ते तिकडे जात आहेत ! पण पुष्कळ लोक असें म्हणतात कीं मवाळांनींच सुधारणांचा भला मोठा हप्ता एकदम मागितला याचें संकट विलायतेंतील मुत्सद्द्यांना पडेल तें दूर करण्याकरितांच ते जात आहेत. ढगांत पाहणाराला हवी ती आकृति दिसते म्हणतात त्याचेंच हें उदाहरण होय.

* * *

असेंब्लीचे प्रेसिडेंट सर फ्रेडरिक व्हाईट यांच्या जागेची मुदत वास्तविक फेब्रुवारींत संपली. पण हल्लींच्या नियमाप्रमाणें ते सेशनच्या प्रारंभीं खुर्चीवर असल्यास सेशन संपेपर्यंत त्यांना सरकारास तेथें ठेवून घेतां येतें. एका वर्षां-तील सर्व सभा मिळून एक 'सेशन' होतें असा त्या शब्दाचा कायदेशीर अर्थ होऊं शकतो व गतवर्षीं अनुभवहि तसा आला. यामुळें हल्लींचे अध्यक्ष चालू वर्ष अखेरपर्यंत खुर्चीला चिकटून राहणार असा तर्क आहे. यंदाच्या बजेटांत अध्यक्षांच्या पगाराची सात महिन्यांची तरतूद हल्लींच्या दरानें फडणवीस यांनीं केल्याचें दिसून येतें. एप्रिलपासून ऑक्टोबरपर्यंत सात महिने होतात. यावरून सिमला येथील सप्टेंबर महिन्यांतील बैठक संपेपर्यंत हल्लींचे प्रेसिडेंट जागेवर राहतील आणि नवीन निवडणूक बहुधा सप्टेंबरअखेर होईल. पण मग व्हाइटसाहेबांचें काय करावयाचें असा प्रश्न सहजच येतो. याचें उत्तर हेंच कीं, गुळाच्या ढेपेला चिकटलेला मुंगळा एकीकडून काढून टाकला तरी दुसरीकडे चिकटतोच, त्याप्रमाणें व्हाइटसाहेबांची वर्णी दुसरी-

कडे कोठें तरी बहुधा लागेल. सर फ्रँक स्लॉय यांचे जागीं ते नागपूरचे गव्हर्नर होणार अशी वंदता एक वेळ होती, ती खोटी ठरली. हल्लींची वदंता अशी कीं, ली-कमिशनच्या रिपोर्टांत सुचविलेल्या पब्लिक सर्व्हिस कमिशनच्या पहिल्या अध्यक्षागिरीचा मान व्हाइटसाहेब यांना मिळणार. पण हे नुसते तर्क आहेत.

## पत्र नं. ८

ता. १३–३–२५

मागील पत्र लिहिल्यानंतर दुसऱ्या दिवशीं बजेटांतील कांहीं मागण्यांची चर्चा होऊन असेंब्लीला चार दिवस सुटी देण्यांत आली. या दिवसाच्या चर्चेंत दोन धक्के दिले दोन घेतले असाच प्रकार झाला. कोणी केवळ शंभर रुपयांचा काट सुचवून चर्चा झाली म्हणजे तो परत घेत, कोणी शंभर रुपयांच्या काटावर मतें घेण्यापर्यंत मजल आणीत. कोणी एखाद्या बाबींवर निवळ औपचारिक काट न सुचवितां एकंदर रकमेच्या मानानें घसघशीत काट सुचवीत व त्यावर मतें घेतलीं जात, तर कोणी अडवणुकीच्या तत्त्वाला अनुसरून त्या बाबींवरील सर्वच्या सर्व रकमेचा काट सुचवीत. प्रत्येक पक्षाच्या अधिकाऱ्याच्या सहीनें त्या पक्षांतील सभासदांनीं कोणतें धोरण स्वीकारावें याविषयीं लेखी स्पष्ट हुकूम किंवा सूचना आगाऊ वांटल्या जात, तथापि क्वचित् प्रसंगीं शिस्त सुटे किंवा अवधान न राहिल्यामुळें कित्येकांकडून लहानसहान प्रमाद घडत किंवा सरकारनें केलेला खुलासा पटण्यासारखा वाटल्यास आयत्या वेळीं काय करावें याविषयीं कित्येकांच्या मनांत गोंधळ उडे. पण या चर्चेंत उभयपक्षांतील लोकांनीं पहिल्या दिवसाप्रमाणें एकमेकांवर टीका केली नाहीं यामुळें विशेष दर्जाचा प्रकार दिसून न येतां केव्हां लोकपक्षाचा तर केव्हां सरकारचा जय व्हावा असें चाललें होतें.

* * *

या दिवसाचा बहुतेक सर्व वेळ मीठ खात्यावरील खर्चमंजुरीनें घेतला. या बाबतींत लोकपक्षाची मुख्य तक्रार अशी होती कीं, हिंदुस्थानच्या लगत्याला बरीच मोठी समुद्रपट्टी असतां मीठ हवें तितकें स्वस्त व हवें तसें चांगलें मिळत नाहीं ही गोष्ट आश्चर्याची आहे, पण त्याला कारण एका अर्थानें सरकारच होय. उत्तर-हिंदुस्थानांतील लोक खाणींतून काढलेलें मीठ खातात.

त्यांच्याबद्दल प्रश्न नाहीं. पण बंगाल व कांहीं इतर भाग यांतील लोकांना परदेशांहून आणलेल्या मिठाची गोडी अशी लावून ठेवण्यांत आलेली आहे कीं, त्यांना आतां समुद्राचें मीठ चालत नाहीं. पण परदेशांहून येणारें मीठ झालें तरी तें कांहीं सर्वच खाणींतील मीठ नसतें. शिवाय इकडे समुद्रपाण्याचें मीठ झालें तरी तें काळें किंवा घाणेरडें असलेंच पाहिजे असा नियम नाहीं. तें मीठहि स्वच्छ पांढरें, दाणेदार असें तयार करतां येतें. पण सरकार हल्लींचें आपलें धोरण बदलून मिठागराचे परवाने अधिक व निरनिराळ्या ठिकाणीं हवे तसे देईल तर मीठ अधिक मुबलक व चांगलें पिकेल व सरकार ड्यूटी कमी करील तर लोकांना तें स्वस्त मिळून आज माणसांना अपुरें मीठ व गुरांना कांहींच नाहीं अशी जी स्थिति आहे ती बदलेल. ओरिसा प्रांतांत जुने मिठाचे कारखाने होते, ते बुडविल्याबद्दल नीळकंठदास वगैरेनीं तक्रार सांगितली व मद्रासचे व्यापारी-सभासद सर गॉर्डन फ्रेझर यांनीं मिठाच्या कारखानदारींत सरकारच आडवें कसें पडतें हें सांगितलें. त्यावर बरींच मनोरंजक प्रश्नोत्तरें झालीं. गोरे लोक सरकारविरुद्ध टीका करणारे इतके क्वचित् प्रसंगीं आढळतात कीं, तसा एखादा प्रसंग कधीं आल्यास सरकारला अडचण व इतरांना मौज सहजच वाटते.

* * *

ता. ८ ते ता. ११ हे चार दिवस सुटीचे होते. त्यांत हिंदूंची होळी व व मुसलमानांची शाबरात असे दोन सण पडले. या सुटीचा फायदा घेऊन पुष्कळ सभासद परगांवीं गेले. कोणी आपल्या गांवीं जाऊन घरचें थोडेंबहुत कामधाम पाहून आले. कोणी आसपासचीं प्रेक्षणीय स्थळें पाहण्याला गेले; कोणी तीर्थयात्रा साधून घेतली. लाला दुनीचंद यांच्या निमंत्रणावरून मीं त्यांजबरोबर या सुटींत अंबाला व पानपतचें मैदान हीं स्थळें मोटारीनें जाऊन पाहण्याचें ठरविलें होतें; परंतु पंडित मोतिलाल नेहरू यांनीं स्वराज्य पक्षाच्या कार्यकारी मंडळाची सभा पाटणा येथें भरविण्याचें ठरविल्यामुळें मला तिकडे जावें लागलें. ही सभा दिल्लीस व्हावी असें प्रथमच घाटत होतें; परंतु नागपूरच्या कौन्सिलदारांना या वेळीं इकडे येणें शक्य नव्हतें. नंतर सभा नागपुरासच भरवावी असा विचार सुचला; परंतु या सभेला देशबंधु दास, म्हणजे स्वराज्य पक्षाचे अध्यक्ष, हजर असलेले बरे, या विचारानें नागपूरचा बेत रहित करून सभा पाटणा येथें भरविण्याचें ठरलें. पाटणा

येथें दासबाबू हे आजारीपणामुळें आज बरेच दिवस येऊन राहिलेले आहेत; व त्यांना तूर्त बाहेर प्रवास करणें शक्य नाहीं. यामुळें एकाकरितां अनेकांची गैरसोय असें दिसलें तरी, सभा पाटणा येथेंच भरविणें योग्य होतें.

* * *

सदर कमिटीच्या सभेला दिल्लीहून पंडित नेहरू, केळकर, गोस्वामी व रंगास्वामी अय्यंगार असे चौघे सभासद गेले होते. बॅरिस्टर शेरवानी हे अलिगडाहून आले होते. शिवाय बॅरिस्टर अभ्यंकर हे पंडितजींच्या निमंत्रणावरून नागपूरच्या मंडळीचे प्रतिनिधि किंवा स्नेही म्हणून आले होते. पंडितजी व व बाकीचे सभासद यांना न्यायमूर्ति पी. आर. दास व नामदार सच्चिदानंद सिंह, बिहार प्रांताचे एक कार्यकारी कौन्सिलर, अशा दोघांचीं निमंत्रणें होतीं पण एकच पाहुणा दोन ठिकाणीं राहूं शकत नाहीं, म्हणून दोघां यजमानांनीं अखेर स्वतः स्टेशनवर येऊन निम्मे निम्मे पाहुणे वांटून घेण्याची तोड काढली. वरील हकीकती सांगण्याचें कारण इतकेंच कीं, सरकारी अधिकाऱ्यांनीं राजकीय चळवळींतील पुढारी आपल्या घरीं उतरवून घेणें व गृहस्थाश्रमाप्रमाणें त्यांचा पाहुणचार करणें, या बाबतींत गेल्या दहा-बारा वर्षांत किती अंतर पडलें आहे हें वांचकांच्या लक्षांत यावें. पूर्वी भावाभावांनाहि, एक सरकारी नोकर व दुसरा राजकीय पुढारी असला तर, एकमेकांच्या घरीं उतरण्यास संकोच वाटण्याइतका जाच सरकारनें करून ठेविला होता. पण आतां हायकोर्टाचे न्यायाधीश, कार्यकारी कौन्सिलर व जहाल पक्षाचे पुढारी यांना आपलें नातें किंवा मित्रत्व विसरण्याचें कारण राहिलेलें नाहीं. अर्थात् सरकार आतां इतकें माणसाळलें आहे.

* * *

दासबाबू यांची तबियत कलकत्त्यास बरीच बिघडली असली पाहिजे, कारण हल्लीं त्यांची प्रकृति पुष्कळ सुधारली असें म्हणण्यांत येत असतांहि ते पूर्वीच्या मानानें शरिरानें निम्मे उतरले आहेत. अजूनहि त्यांना रात्रीं चांगलीशी झोंप लागत नाहीं, यामुळें त्यांना मानसिक श्रमहि फारसे करवत नाहींत. शिवाय त्यांचा स्वभाव किंचित् भावनाप्रधान असल्यामुळें एखादी गोष्ट मनाजोगी घडली किंवा मनाविरुद्ध घडली तर त्याचा त्यांचे प्रकृतीवर बराच परिणाम घडतो. बंगाल कौन्सिलनें ऑर्डिनन्स फेटाळून लावले तेव्हां त्यांची प्रकृति थोडी सुधारली. तसेंच परवां दिवाण नेमावयाचे बाबतींत

बंगाल कौन्सिलचा निकाल त्यांना प्रतिकूल झाला, यामुळें त्यांची प्रकृति बिघडली असें कोणी त्यांचें वर्णन केलें तें मला पूर्वी खरें वाटलें नाहीं; पण आम्ही पाटणा येथें असतांना कलकत्त्याहून ज्या दोन बातम्या आल्या त्या त्यांना अनुकूल अशा वाटल्यामुळें अवघ्या दोन दिवसांत त्यांच्या तोंडावर अधिक तजेला आला असें दिसलें, ही गोष्ट मात्र कांहीं खोटी नाहीं. या दोन बातम्या म्हणजे बंगालचे एक कार्यकारी कौन्सिलर सर अबदुल रहिम यांना बंगालच्या गव्हर्नरची जागा देण्यांत आली नाहीं ही व दुसरी नबाबअल्ली चौधरी व संतोषचे जमीनदार यांना बंगालच्या दिवाणगिऱ्या देऊं केल्या ही होय. सर अबदुल रहिम यांना ॲक्टिंग गव्हर्नरची जागा न देण्यांत आल्यामुळें बंगाल कौन्सिलचे मुसलमान सभासद सरकारवर रागावतील व वरील दोघां दिवाणांची नादानी लक्षांत घेऊन बंगाल कौन्सिल त्यांना उधळून लावील असा दासबाबूंचा तर्क आहे. मग प्रत्यक्ष काय घडतें तें पाहावें.

* * *

कार्यकारी कमिटीचें काम चालू असतां नागपूरच्या कौन्सिलांतील द्विविध पक्षाची खटपट काय चालली याच्या मधून मधून बातम्या येत. त्यांतील कित्येक परस्परविरुद्ध अशाहि असत. परंतु स्वराज्य पक्षाचें धोरण तत्त्वतः ठरून राहिलेलें असल्यामुळें कमिटीनें निर्णय काय द्यावा याविषयीं फारसा मतभेद होण्यास जागा नव्हती. विचार व वाद झाला, तो फक्त शक्य तितका मध्यप्रांतांतहि दुहेरी लोकमताची अडचण लक्षांत घेण्याकरितां झाला. वऱ्हाडचें मत एका बाजूस, हिंदी विभागाचें मत दुसऱ्या बाजूस व खुद्द नागपुरास दोन तट अशी स्थिति असल्यामुळें एकंदर स्वराज्य पक्षांत दुफळी तर होऊं नये; बंगाल, नागपूर व दिल्ली येथील कायदे-कौन्सिलांतील धोरण परिस्थितीप्रमाणें शक्य तितकें सुसंगत राहावें; व एकंदर बजेट फेटाळल्यानें ज्या मतदारवर्गाला आपलें नुकसान गतवर्षी झालें असें वाटलें त्याचें नुकसान तर होऊं नये. तात्पर्य, असा दुहेरी तिहेरी मेळ घालतां यावा, अशी कार्यकारी मंडळाची इच्छा असल्या कारणानें तिचें काम सहजच लांबलें. नागपुरास इकडील मत कळविणें व तिकडून नागपूरचें मत आणविणें याहि गोष्टी कराव्या लागल्या. अखेर ता. १० रोजीं व ता. ११ रोजीं असे दोन दिवस मुद्दाम दोन माणसें पाठवून कार्यकारी मंडळानें आपले ठराव दोन हप्त्यांनीं नागपुरास कळविले. हे ठराव अद्यापि खासगी स्वरूपाचे असल्यामुळें त्याबद्दल

कांहीं लिहितां येत नाहीं. मात्र प्रत्येक क्षणीं नागपूरचा निकाल काय होतो, याकडे सर्व लोकांचें लक्ष मोठ्या उत्कंठेनें लागून राहिलें आहे.

* * *

पाटणा येथून दोन हप्त्यांनीं दोन कारकुनांबरोबर प्रथम निमे व नंतर निमे असे ठराव नागपुरास कार्यकारी मंडळाकडून पाठविण्यांत आले. ते नागपूर येथें अनुक्रमें ता. ११ व ता. १२ या दिवशीं म्हणजे अगदीं आयत्या वेळीं पोंचले. या ठरावांवर नागपूरच्या कौन्सिल-पक्षाचें धोरण अखेर ठरावयाचें असल्याकारणानें अगदीं शेवटल्या क्षणापर्यंत उलटसुलट कंड्याच नव्हे, पण उलटसुलट विचारहि सहजच चालू असतील. नागपूरच्या कौन्सिलदारांत मतभेद झाला असल्यास त्या गोष्टीला खरें महत्त्व नसून कार्यकारी कमिटी काय निर्णय देते व तो निर्णय नागपूर-वऱ्हाडच्या स्वराज्य पक्षाकडून मानला जातो कीं नाहीं यालाच खरें महत्त्व आहे. पण निरनिराळे लोक निरनिराळ्या कारणांनीं, किंबहुना परस्परविरुद्ध अशा कारणांनीं, याकडे डोळे लावून बसलेले, रोज ताजी बातमी देण्याकरितां वर्तमानपत्राचे बातमीदार टपून बसलेले, यामुळें नागपूरच्या निर्णयाविषयीं उलटसुलट अफवा उठणें अपरिहार्यच होतें. याचा प्रत्यय दिल्लीस आम्हाला आलाच. कारण आज सकाळीं तार अशी आली कीं, " सर मोरोपंत जोशी, गव्हर्नरसाहेब, डॉ. मुंजे वगैरेंचें खलबत सरकारवाड्यांत चाललें असून बॅरिस्टर "राघवेंद्रराव हे दिवाणगिरी पतकरून कारभार चालविणार असें जवळ जवळ नक्की ठरल्याचें समजतें." पण असोसिएटेड प्रेसनेंच फिरून दोन प्रहरीं चार वाजतां नागपूरची तार प्रसिद्ध केली, तींत असा मजकुर होता कीं, " राघवेंद्रराव यांनीं दिवाणगिरी स्वीकारण्याचें निश्चितपणें ना कबूल केलें ! " पण माझें हें बातमीपत्र व नागपूर कौन्सिलचा निकाल हे दोनहि वाचकांस एकदम वाचावयास मिळतील.

* * *

असो; येथील असेंब्लीचें काम आज रात्रीं आठ वाजेपर्यंत चाललें होतें. आजच्या दिवसांत पोस्ट, तार खातें, अफू व कर्जफेडीचें खातें इतक्या बाबी निकालांत निघाल्या. या शेवटच्या खात्यावरील वादविवाद विशेष चुरशीचा झाला. बॅरिस्टर जम्नादास मेथा यांचें भाषण माहितीनें पूर्ण व जोरदार असें झालें व तें सर्वांना आवडलें. कर्जफेडीची रक्कम एक कोटि तेहतीस

लक्षांनीं कमी करण्यासंबंधीं त्यांचा ठराव होता, व असेंब्लीला न विचारतां कर्जफेडीला मन मानेल तेवढ्या रकमा फडणवीस खर्च करितात, त्याला आळा घालावा असा त्यांचा मुद्दा होता. जम्नादास यांची सूचना नापास झाली तर निदान आपली पास व्हावी, म्हणून पटेल यांनीं ही रक्कम थोडी कमी करून दुसरी उपसूचना दिली होती व अखेर तारतम्य पाहून पटेल यांची उपसूचना जम्नादास यांनीं स्वीकारली. परंतु स्वतंत्र पक्षांतील दोन तीन गृहस्थांखेरीज बाकीच्यांनीं अनुकूल मत न दिल्यानें तीहि नापास झाली. या दोन-तीन सभासदांत षण्मुखम् चेट्टी, सर पुरुषोत्तमदास हे होते. पण मद्रासी मंडळींचा कंपू व त्यांचेबरोबर बॅरिस्टर जिना हे अडून बसले! वास्तविक जम्नादास यांनीं या विषयाचा नीट अभ्यास केला असून सर पुरुषोत्तमदास यांचेंहि मत त्यांजकडे मिळालें. असें असतां आपल्या पक्षांतील शहाणपणाच्या अभिमानाखातर जिना प्रभृतींनीं मत दिलें नाहीं. यामुळें प्रथम शिंदे होळकराविरुद्ध लढले व नंतर इंग्रज दोघांहि विरुद्ध लढले असा एक प्रकारचा दुःखद देखावा दिसून आला. तथापि एकंदर बजेटांत १८·३९ लक्षांचा आणि रेल्वे बजेटांत ९४·७८ लक्षांचा काट मंजूर झाला आहे.

## पत्र नं. ९

ता. २०।३।२५

ता. १२ ते १४ हे तीन दिवस उरलेली बजेटमंजुरी पुरी झाली. पण कोणत्याहि बाबतींत म्हणण्यासारखा काट घालतां आला नाहीं. अखेरच्या दिवशीं खासगी खटपटीनें एक्झिक्युटिव्ह कौन्सिलच्या भत्त्याची बाब चार घरें वर चढून मंजुरीला निघाली आणि स्वतंत्र व स्वराज्य दोनहि पक्षांनीं मिळून ती नामंजूर केली. ही बाब ६२ हजार रुपयांची म्हणजे लहानच खरी, पण एका अर्थानें ती महत्त्वाची व अडचणीची होय. दुसऱ्या खात्यांतून अनेक पोटखातीं मिळून मोठी रक्कम असते, आणि मुख्य खात्याला मंजुरी मिळाल्यावर पोटखात्यांच्या रकमेची अदलाबदल सहज करतां येते. पण ही बासष्ट हजारांची एकच स्वतंत्र बाब तिला आगापिच्छा नाहीं. अर्थात् ती नामंजूर झाल्यास व्हाइसरॉयसाहेब आपल्या अखत्यारींत ती दडपून मंजूर करणारच, कारण एरवीं एक्झिक्युटिव्ह कौन्सिलच्या सभासदांनीं थोडा तरी प्रवास कसा करायचा! पण

व्हाइसरॉयसाहेबांना आपल्या अखत्यारीचा उपयोग करण्यास भाग पाडणें याचेंच नांव लोकपक्षानें विजय मिळविणें, असें आज तरी आहे. म्हणून हा विजय स्वतंत्र व स्वराज्य पक्ष यांनीं एकजुटीनें मिळविला ही अभिनंदनाची गोष्ट होय.

* * *

ही बाब नामंजूर करावी अशी सूचना पंडित नेहरू यांनीं पुढें मांडली तिला उत्तर देतांना सर अलेक्झांडर मुडिमन यांनीं कांहीं मायावी व कांहीं विनोदी भाषण केलें. ते म्हणाले, "आमचा भत्ता नामंजूर केलांत, बरें झालें. आम्ही आपले पायानेंच सिमल्याला जाऊं, पोक्त वयांत प्रकृति सुदृढ ठेवण्याला तो एक चांगलाच उपाय आहे!" पण असेंब्लीनें भत्ता नामंजूर केला तरी व्हाइसरॉय तो मंजूर करून देणार, पदरचा पैसा घालावा लागत नाहीं व पायानेंहि चालत जावें लागत नाहीं अशी त्यांची मनांतून खात्री होती, म्हणूनच त्यांना हा विनोद सुचला हें उघड आहे. भत्ता बुडण्याची खरी भीति मनांत असती तर असे विनोदी उद्गार तोंडून निघतेच ना! राहतां राहिली असेंब्लीनें जाणवलेली निंदा. पण शंकरानें हलाहल प्राशन केलें त्याप्रमाणें नोकरशाहीनें लोकनिंदा कधींच पचनीं पाडली आहे. कुस्ती व मेहनत करकरून बोजड बनलेल्या पहिलवानांच्या कानांप्रमाणें सरकारनेंहि लोकनिंदेची आपल्या कानांना इतकी सवय केली आहे कीं, तिची बाधा त्यांना होऊं शकत नाहीं. पण आपलें कर्तव्य किंवा विद्यमान परिस्थितींत सरकारला टोचण्याचें तें एक साधन अशा बुद्धीनेंच बहुमताची मात सरकारवर करीत बसावयाचें, हेंच खरें.

* * *

ही एक बाब उभयपक्षांनीं मिळून नामंजूर केली, पण पुढें स्वराज्य पक्ष एकटा पडला. तथापि त्यानें होम डिपार्टमेंट व स्टेटसेक्रेटरीकरितां होणारा खर्च या दोन बाबींवर मतें घेण्यापर्यंत विरोध करून आपलीं तरी मतें स्पष्ट नमूद होतील अशी तजवीज केली. वास्तविक या तीनहि बाबी नामंजूर करावयाच्या असें स्वतंत्र पक्षानेंहि ठरविलें होतें. वर्तमानपत्रांतून ही गोष्ट त्यांनीं जाहीरहि केली होती. परंतु एक्झिक्युटिव्ह कौन्सिलच्या खर्चमंजुरीवरील वादांत पुढाऱ्यांची तोंडातोंडी झाल्यामुळें स्वतंत्र पक्षानें स्वराज्य पक्षावर रागावून स्वतःचें स्वतःस दिलेलें वचनहि मोडलें, मग एक्झिक्युटिव्ह कौन्सिलच्या बाबतींत तरी सरकारला विरोध करून मंजुरी नाकबूल करण्याची धोंड या पक्षाचे डोक्यावर

कोणी दिली होती? शोभेल तें करावें हाच मंत्र जर खरा, आणि युक्तिसिद्ध समंजसपणा हाच जर, हल्लींच्या स्थितींतहि का होईना, राजकारणाचा केवळ आत्मा असला पाहिजे ही गोष्ट जर खरी, तर कौन्सिलदारांच्या प्रवासी भत्त्याचे बासष्ट हजार रुपये नामंजूर करून स्वतंत्र पक्षानें जगाच्या दृष्टीनें समंजसपणा कोणता दाखविला? सरकारच्या दृष्टीनें लोकांनीं पाहिलें पाहिजे असें म्हणणारांनीं हे बासष्ट हजार नामंजूर करण्यांत सरकारची सोय कितीशी पाहिली? स्वराज्य पक्षानें सर्व बजेटाच्या बजेट नामंजूर करूं असें म्हणणें व स्वतंत्र पक्षानें हे बासष्ट हजार रुपये नामंजूर करणें हीं तत्त्वाच्या दृष्टीनें सारखींच होत. प्रवासी भत्त्याची बासष्ट हजारांची बाब रकमेनें लहान असली तरी, तिच्याशिवाय कारभार चालणें शक्य नाहीं, हें विचारी म्हणविणाऱ्या स्वतंत्र पक्षाच्या लक्षांत यावयास पाहिजे होतें. पण सगळ्या बजेटांत एकहि रक्कम आपण नामंजूर केली नाहीं तर हल्लींच्या काळांत लोक आपल्याला काय म्हणतील हा विचार स्वतंत्र पक्षाच्या मनांत आला असला पाहिजे. आपण लोकमत मानीत नाहीं, असें तोंडानें म्हणणें ठीक आहे, पण मी-मी म्हणविणाऱ्यालाहि अशा रीतीनें लोकमतापुढें मान लवविल्याशिवाय गत्यंतर नसतें.

* * *

बजेटमंजुरीच्या चर्चेला एकंदर पांच दिवस मिळाले. त्या अवधींत सुमारें सात बाबींवर खरी चर्चा अशी झाली. पण एकंदर बाबी सुमारें पासष्ट होत्या. त्या मानानें पाहतां चर्चा कांहींच झाली नाहीं असें म्हटलें तरी चालेल. सर्व बाबींवर चर्चा होणें एका अर्थानें अशक्यच होय. कारण प्रत्येक बाबीला कमींत कमी दोन तास धरले तरी एकंदर चर्चा संपायला दररोज पांच तास-प्रमाणें जवळ जवळ महिना लागावयाचा. पण एक तर प्रत्येक बाबींत इतकें खोल शिरून चर्चा करण्यासारखें कांहीं नसतें. शिवाय सरकारी उधळपट्टी-वर टीका, काटकसरीचें समर्थन, केवळ इतराजी दर्शविण्याकरितां देण्याचे काट वगैरेच्या रूपानें लोकपक्षाचें धोरण पांचचार बाबींवर व्यक्त झालें म्हणजे पुढें त्याच त्या गोष्टींची पुनरुक्ति करण्याचा सहजच कंटाळा येतो. शिवाय या दृष्टीनें होणारें कांहीं काम पूर्वीं फायनॅन्स कमिटींत झालेलेंच असतें. म्हणून बाजारांत ज्याप्रमाणें खरेदीचे वेळीं मालाचा नमुना तपास-तांना काय ती चिकित्सा व दरदाम ठरवितांना काय ती घासाघीस आणि

एवढें झालें म्हणजे मग बाकी सगळें माप बिनबोभाट पार पडतें, इकडे दुकानदार व गिऱ्हाईक गप्पागोष्टी मारीत असतां किंवा पानतंबाखू खात असतां स्वतः मापाडी लोकच सगळें माप घालून मोकळे होतात, त्याप्रमाणें बजेटांतील पहिल्या पांचसात बाबींवर जें काय रण माजावयाचें तें माजल्यावर, पांचव्या दिवशीं पांचाचे ठोक्याबरोबर, छापण्याच्या यंत्रावर भराभर प्रती काढाव्या त्याप्रमाणें सर्व मागण्या निकालांत निघाल्या. अध्यक्षांना एरवीं बोलण्याचें काम नसतें, तें त्यांना या शेवटच्या तासांत भरपूर मिळतें. कारण मागणीची सूचना वाचून दाखविणें, त्यावर मतें विचारणें व निकाल जाहीर करणें, या क्रमाचा पाढा त्यांना पन्नास-पंचावन्न वेळां वाचावा लागतो. कथेकऱ्यानें 'आशीर्वाद' द्यावा व श्रोत्यानें 'तथास्तु' म्हणावें, त्याप्रमाणें अध्यक्ष आपला पाढा वाचीत, व कांहीं सभासद 'होय' व कांहीं 'नाहीं' असें झोपेंत बोलल्याप्रमाणें एकसारखें म्हणत होते. तथापि आपण करतों तें काम अगदींच निरर्थक नाहीं, त्याला कांहीं महत्त्व आहे, या भावनेनें अध्यक्ष मात्र बाकीचा सर्व मंत्र तोंडानें नुसता पुटपुटत, पण खर्चाच्या बाबींचें नांव व रक्कम यांचा उच्चार मुद्दाम मोठ्यानें व स्पष्ट करीत. लग्नकार्यांतील वाङ्‌निश्चयांत उपाध्याय बाकीच्या सर्वत्राचा गडबडगुंडा करतो, पण वधूवरांचीं नांवें व विशेषतः गोत्रें यांचा उच्चार ठासून करतो त्याची या वेळीं आठवण होई.

* * *

ता. १६, १७ व १८ या तीन दिवशीं फायनॅन्स बिल चर्चेस निघून मंजूर झालें. या बिलाच्या प्रारंभीं व शेवटीं सरकारी धोरणावर सर्व-सामान्य चर्चा करतां येते. यामुळें पहिल्या दिवसाचा बराच भाग व तिसऱ्या दिवसाचा कांहीं भाग, अशा चर्चेंत खर्च पडला. फिरून या चर्चेंत उभयपक्षांत शिव्यांची गोळागोळी व विषारी चरकी बाणांचें युद्ध झालें. फिरून नेहरू, पटेल, जिना, चमनलाल, बिपिन पाल यांचीं परस्परांना दुरुत्तरें झालीं. एकानें म्हणावें यंदा अमुक करीत नाहीं. दुसऱ्यानें म्हणावें, तर मग गतवर्षीं तसें कां केलें? तिसऱ्यानें म्हणावें, गतवर्षीं केलें म्हणून यंदाहि तसेंच करावें हें शास्त्र कुठलें? चवथ्यानें म्हणावें, सुसंगत धोरण ठेवणें हा मोठा गुण आहे. पांचव्यानें म्हणावें, परिस्थितीप्रमाणें धोरण पालटावें लागतें. तात्पर्य, सर्व प्रकारचा ठराविक युक्तिवाद उभयपक्षीं करण्यांत आला आणि अनेकांनीं

परस्परांना त्यांच्या जुन्या चरित्राची व उद्गारांची आठवण करून देऊन फजीत करण्याचाहि प्रयत्न केला! एका टोकाला पटेल यांनीं म्हणावें कीं, आम्ही विध्वंसयागाची दीक्षा घेऊनच येथें आलों आहों, तर दुसऱ्या टोकास बिपिन-बाबूंनीं म्हणावें कीं, सरकारला अडथळा करणें हा गुन्हा असून सुधारणांच्या मांडणांत व्हाइसरॉयसाहेब हेच आमचे नैतिक प्रतिनिधि आहेत व तेच विलायतेंत आमची तरफदारी करतील! यावरून वादाच्या इरेस पडल्यानें जबाबदार माणसांच्याहि तोंडून कसे उद्गार बाहेर पडूं शकतात हें दिसून येईल. पंडित मदन मोहन मालवीय यांच्या स्फूर्तीमुळें गुदस्ता फायनॅन्स बिल फेटाळतां आलें हें प्रसिद्ध आहे. पण यंदा त्यांची हौस फार मावळून गेली होती. असेंब्लींतील पक्षभेदाच्या तीक्ष्णतेनें त्यांचें मन फार खट्टू झालेलें दिसत होतें. पण इतर कांहीं लोकांप्रमाणें त्यांनीं सरकारच्या बाजूस केव्हांहि मत न देतां तटस्थपणा धरला हें त्यांस भूषणावह आहे. या वादांत पंडित मोतिलाल नेहरू यांनीं खर्चमंजुरीच्या बाबतींत स्वतंत्र पक्षाचें धोरण व स्वराज्य पक्षाचें धोरण यांतील खरा फरक मात्र स्पष्ट करून सांगितला व तो तसा केव्हां तरी एकदां स्पष्ट करून सांगावयाला हवाच होता.

* * *

फायनॅन्स बिलावरील वादांत पोस्टाचे कार्डपाकिटांचे दर कमी करणें मोटार-स्पिरिटवरील ड्यूटी कमी न करणें व प्राप्तीवरील करांत कांहीं फेरबदल करणें, इतक्या बाबी उपसूचनांच्या रूपानें पुढें आल्या, पण त्या सर्व नामंजूर झाल्या. नाहीं म्हणावयास मिठावरील कर कमी करण्याचा आठ आण्यांचा सवाल नापास झाला, बारा आण्यांचा नापास झाला, पण एक रुपयाचा मात्र पास झाला! व अशा रीतीनें सवा रुपयाची ड्यूटी एक रुपयावर आणण्याचें श्रेय लोकपक्षाला मिळालें. पण हा विजय फार वेळ टिकला नाहीं. कारण लगेच कौन्सिल ऑफ स्टेटची स्पेशल बैठक ता. १८ रोजीं संध्याकाळीं पांच वाजतां भरवून फायनॅन्स बिल त्या सभेपुढें मांडण्यांत आलें! व आज ता. २० रोजीं मिठाच्या करासंबंधीं सरकारची उपसूचना मंजूर होऊन फिरून ती ड्यूटी सवा रुपया झाली! कौन्सिल ऑफ स्टेटनें जांवईशोध घातलेलें हें बिल फिरून उद्यां असेंब्लीपुढें मांडण्यांत येणार आहे आणि पूर्वीचें बहुमत फार थोडें असल्या-कारणानें असेंब्लीचा तरी पूर्वीचा निकाल कायम राहतो किंवा सरकारच्या पाताळयंत्रामुळें त्यांत कांहीं चलबिचल होतें हें पाहावयाचें आहे. अशी चल-

बिचल झाली तर सरकारचें आयतेंच काम झालें. बरें, ती न झाली तरी कौन्सिल ऑफ स्टेट व असेंब्ली यांची एकत्र बैठक करण्याचा अधिकार सरकारास आहे. तो बजावला म्हणजे काय होईल हें सांगावयास नकोच. अर्थात् व्हाइसरॉय यांना विशेष अधिकाराचा उपयोग करण्याची अप्रिय जबाबदारी अंगावर घेण्याचेंहि मग कारण राहणार नाहीं.

* * *

कौन्सिल ऑफ स्टेटला दुसरेंहि एक खाद्य फिरून वाढून आलें आहे तें असें— कालचा तारीख १९ हा दिवस खासगी बिलांकरितां देण्यांत आला होता. कार्यपत्रिकेवर शंभर कलमांची नोंद होती, पण त्यांपैकीं पटेल यांचें बंगाल-मुंबई रेग्युलेशन्स रद्द करण्याचें तेवढें एकच बिल चर्चेला निघालें, व सर्व वेळ त्यावरच खर्च झाला; पण सुदैवानें तें अखेर पास झालें. मतें मोजतांना झाडून सगळे स्वतंत्र, नेमस्त व मुसलमानहि स्वराज्य पक्षाबरोबर सरकारविरुद्ध मतें द्यावयाला आले. फक्त युरोपियन सभासद व सरकारचे कांहीं ठराविक बगलबच्चे त्यांच्या बाजूला गेले. एका दृष्टीनें हा मोठाच विजय म्हटला पाहिजे. पण तोहि फार काळ टिकणार नाहीं, हें सर्वांना माहीत आहे. कारण हें बिल कौन्सिल ऑफ स्टेटमध्यें अद्यापि जावयाचेंच आहे. पूर्वी क्रिमिनल लॉ अॅमेन्डमेन्ट अॅक्ट रद्द करणाऱ्या बिलाची जी वाट लागली तीच याची तेथें लागणार! कौन्सिल ऑफ स्टेटला मारेकऱ्याची उपमा मीं पूर्वी एक वेळ दिली आहे तीच माझी अजून कायम आहे. किंबहुना या ठिकाणीं पौराणिक दाखलाहि आठवतो. देवकीला मूल झालें कीं, लगेच कंसानें येऊन तें उचलून न्यावें व शिळेवर आपटून मारावें असा प्रकार अनेक वेळां झाला. त्याचप्रमाणें लोकहिताचें एखादें बिल असेंब्लींत मंजूर झालें कीं, सरकार लगेच तें उचलून कौन्सिल ऑफ स्टेटमध्यें नेतें व तेथें त्याचा नाश ठेवलेलाच असतो. किल्ला सर केला तरी पुनः बालेकिल्ला लढवावयाचा राहतोच व बालेकिल्ला हस्तगत न झाला तर जिंकलेला किल्लाहि सोडून द्यावा लागतो. कौन्सिल ऑफ स्टेटच्या नव्या निवडणुकी या सालअखेर आहेत, तेव्हां या गोष्टीचा विचार जनता केल्याशिवाय सोडणार नाहीं.

* * *

मुडिमन-कमिटीच्या रिपोर्टाची चर्चा इतर कौन्सिलप्रमाणें असेंब्लींतहि अप्रत्यक्ष रूपानें झाली. पण ती पुष्कळशी निष्फळ ठरली. कारण खुद्द सरकारचें

या विषयावरील धोरण अद्यापि ठरलेलें नाहीं अशी होम-मेंबर यांनीं स्पष्ट कबुली दिली व त्यामुळें वाद फिक्का पडला. 'टग ऑफ वॉर'च्या सामन्यामध्यें दुसऱ्या बाजूला ओढण्याला कोणी गडीच नसला तर तो खेळ होऊं शकत नाहीं. तसेंच याहि चर्चेंत झालें. कारण कित्येक सभासदांनीं रिपोर्टावर कांहीं टीका केली, पण ती उडती टीका झाली. रिपोर्ट उघडून वाचून आंतील तपशिलावर कोणी फारशी चर्चा केली नाहीं. पण या वादांत सरकार न शिरल्याचा एक वाईट परिणाम असा झाला कीं, सरकारचे वाभाडे काढण्याऐवजीं स्वतंत्र व स्वराज्य पक्षांनींच एकमेकांचे वाभाडे काढले. बहिरी ससाणा शिकारीला सोडला असतां त्याला शिकार मिळाली तरच बरी गोष्ट, नाहीं तर तो परत येऊन पारध्याचाच हात फोडतो म्हणतात. तसाच प्रकार या गोष्टींत थोडासा झाला. पण पक्षभेदाची ओळख न दाखवितां सरकार हा एकच व सर्वांचा मिळून शत्रु, या निर्मळ भावनेनें टीका करणारेहि कांहीं सभासद निघाले. बॅरिस्टर अभ्यंकर यांनीं फिरून एक वेळ सणसणीत भाषण केलें. बेळवी यांना चालू बैठकींत बोलण्याची संधि मिळाली नाहीं पण बसल्या बसल्या पांचचार उद्गारांतच त्यांनीं आपला कार्यभाग साधून घेतला. कारण होम-मेंबर हें बहुमतवावाल्यांचें समर्थन करीत असतां प्रसंग साधून बेळवी यांनीं ओरडून सांगितलें कीं, तुमच्या कमिटीचा रिपोर्ट कस्पटाइतक्या किंमतीचाहि नाहीं, केराची टोपली हेंच त्याचें योग्य ठिकाण आहे, व त्याला मी तेंच स्थान देणार आहे !" अशा रीतीनें 'श्लोकार्धेन प्रवक्ष्यामि यदुक्तं ग्रंथकोटिभिः' हें व्यासवचन त्यांनीं अमलांत आणून दाखविलें.

## पत्र नं. १०

ता. २६।३।२५.

मिठाचा कर असेंब्लींत कमी केला गेला, तो फायनॅन्स बिल कौन्सिल ऑफ स्टेटकडे गेल्यावर तेथें वाढवून पुनः पूर्वीप्रमाणें सवा रुपया केला जाणार अशी भीति मीं पूर्वीच्या पत्रांत प्रदर्शित केली होती ती तर खरी ठरलीच, परंतु अशा रीतीनें दुरुस्त केलेलें फायनॅन्स बिल परत असेंब्लीकडे येईल तेव्हां काय होणार याविषयींचा अदमास मात्र सगळा चुकला. कौन्सिल ऑफ स्टेटमधील सभासदांनीं बिलावरील चर्चेंत असेंब्लींतील लोकांना पुष्कळशा शिव्या देऊन घेतल्या. आपल्या मनाप्रमाणें जो मत देत नाहीं

त्याला बेजबाबदार म्हणणें ही अगदीं सौम्य अशी ठराविक शिवी होऊन बसली आहे. पण जमाखर्चासंबंधीं हें बिल असल्यामुळें तें कौन्सिल ऑफ स्टेटकडे जावेंच काय म्हणून, असा एक प्रश्न कित्येक कायदेपंडितांनीं उपस्थित केला आहे; व तो साधार असेल तर या कामीं खरी बेजबाबदारी कौन्सिल ऑफ स्टेटचीच आहे. नसत्या कामांत हात घालण्याचा दोष त्यांच्याकडेच येतो.

* * *

पण मूळ ज्या सभेनें फायनॅन्स बिल मंजूर केलें तिकडेच तें परत विचाराकरितां आलें असतां तिनें आपला पूर्वींचा विचार बदलून मिठावरील कर सवा रुपयापर्यंत नेऊन ठेवला ही गोष्ट मात्र फार वाईट झाली. प्रथम ड्यूटी चार आणे कमी केली तेव्हां ६१ अनुकूल व ५६ प्रतिकूल असें बहुमत होतें. अर्थात् उभयपक्षांत अंतर पांच-सहाचेंच होतें. पण पुढील खेपेस ड्यूटी सवा रुपया करण्याचे वेळीं पारडें इतकें उलटलें कीं होय म्हणणारे सत्तर झाले व नाहीं म्हणणारे अवघे पन्नास उरले! या विसांपैकीं पांच पहिले दिवशीं गैरहजर असलेले या दिवशीं आले; पण उलट दुसऱ्याहि बाजूस पांच सभासद अशाच कारणानें मिळाले; यामुळें हें कारण उभयपक्षींहि जमेस धरतां येत नाहीं. परंतु अकरा सभासदांनीं आपलें पूर्वींचें मत बदलून या वेळीं प्रत्यक्ष उलट मत दिलें व दुसरे चार गैरहजर किंवा तटस्थ राहिले. या एकंदर पंधरांपैकीं दहा मुसलमान सभासद होते ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

* * *

सरकारच्या करामतीमुळें या वेळीं उलट गेलेल्या लोकांप्रमाणें तीन-चार सभासद मात्र असे होते कीं, त्यांना त्यांच्या मतदारसंघांतील प्रमुख लोकांकडून तसें वागण्याविषयीं मुद्दाम तारा आल्या होत्या. याचें कारण असें कीं, हे सभासद मद्रास इलाख्यांपैकीं असून प्रांतिक खंडणींतील सूट यंदा मिळवूंच मिळवूं अशा ईरेला मद्रास इलाख्यांतील बहुतेक सभासद यंदा पडले होते. प्रांतिक खंडणींतील सूट ही बाब गतवर्षींपासूनच मोठी भानगडीची होऊन बसली आहे. मिठावरील कर कमी केला तर ही सूट तुमच्या प्रांताला मिळणार नाहीं, अशी धमकी यंदाप्रमाणें गुदस्ताहि फडणिसांनीं दिलीच होती. परंतु गतवर्षीं तिला कोणी भीक घातली नाहीं. कारण मिठावरील कर तेव्हां बेसुमार वाढला होता व तो कमी न करतां प्रांतिक सरकारला सूट देणें ही गोष्ट

अगदींच वाईट दिसली असती. पण चार आणे कमी करून सवा रुपयाची ड्यूटी रुपयावर आणणें हा एक निवळ चोचला आहे असा बहाणा करण्यास कित्येकांना सवड सांपडली व त्याचा त्यांनीं फायदा घेतला !

चार आणे ड्यूटी कमी झाल्यानें सालांतून सहासात शेर मीठ खाणाऱ्या मनुष्यास फार तर आणा-पाऊण आणा सूट मिळणार असे हिशेबहि कित्येकांना यंदा सुचले. पालबाबूंची गणिताच्या ज्ञानाविषयीं प्रसिद्धि नाहीं. तथापि हा तोंडचा हिशेब त्यांनीं असेंब्लींत तोंडानें करून दाखविला ! परंतु उलट उत्तरादाखलहि असेच आंकडेमोडीचे तीन काटक्यांचे म्हणजे त्रैराशिकाचे खंडोबा उभे करून सहज दाखवितां येतील. ज्या कित्येक प्रांतांना यंदा खंडणींतून सूट मिळाली आहे त्यांतील लोकसंख्येवर सुटीची रक्कम विभागून दिल्यास तें प्रमाण वरच्याइतकेंच पडतें. शिवाय सुटीची सर्व रक्कम सोपीव खात्याकडे देण्याचें वचन सरकारनें पाळलें तर त्या आणा-दीड आण्यांत शिक्षण, आरोग्य, सुधराई इत्यादि वांटेकरी आहेतच. अर्थात् पैशा दोन पैशाभराचें डॉक्टरी औषध रयतेला तो आजारी पडल्यावर मिळण्यापेक्षां आण्याभराचें मीठच त्याचे उदरांत अधिक गेलें तर त्याला रोग तरी होणार नाहीं असें हें बिनतोड उत्तर आहे.

* * *

कसेंहि असो. पण या कामीं असेंब्लीनें पूर्वी केलेला ठराव तिनें आपल्याच हातानें बदलला हा लोकपक्षाचा चालू बैठकींतील सर्वांत मोठाच पराजय होय. अशा अनपेक्षित रीतीनें का होईना पण कौन्सिल ऑफ स्टेटचा शब्द खरा झाला. कौन्सिल ऑफ स्टेटच्या सभासदांना वडील मुत्सद्दी 'एल्डर्ली स्टेट्समेन' असें म्हणण्याचा एक शिष्टसंप्रदाय आहे. त्यांच्या अनुरोधानें पाहिलें तर वडिलांचा शब्द खरा झाला ही आपत्ति मानतां येत नाहीं. अशा विनोदी भाषणानें या पराभवाच्या दुःखाचें निराकारण कित्येकांनीं नाइलाजास्तव केलें. पण वर जे आंकडे दिले आहेत त्यांवरून पाहतां असेंब्लीच्या ज्या सभासदांनीं ह्या दुसऱ्या प्रसंगीं बाजू उलटविली त्यांचे मनांत आपले वडील बंधूंचा मान राखावा अशी सद्बुद्धि नव्हती किंवा आपलें चुकलें, त्यांचें बरोबर होतें, अशी खात्रीहि पटलेली नव्हती. स्वराज्य पक्षाशीं विरोध व मत्सर हाच या फेरबदलाचे मुळाशीं होता.

या वडील मुत्सद्द्यांचें खरें शहाणपण व त्यांचेविषयीं असेंब्लीच्या मनांत असलेली खरी आदरबुद्धि ही दुसऱ्या एका प्रकारानें लवकरच निदर्शनास आली. तो प्रकार असा— बंगाल ऑर्डिनन्सचा कायदा व्हाइसरॉयसाहेबांनीं आपल्या अखत्यारींत केला व त्याला बादशहांकडून नुकतीच मंजुरीहि आली. हा कायदा म्हणजे बंगाल-मुंबई रेग्युलेशन्स यांची सुधारून वाढविलेली आवृत्तीच होय. पण इंग्लंडच्या माजी मुख्य न्यायाधिशाला हा कायदा न शोभण्यासारखा म्हणून त्या कायद्यान्वयें पकडलेल्या किंवा अटकेंत ठेवलेल्या लोकांना हायकोर्टाकडे दाद मागण्याची सवड दिल्याचा बहाणा करण्याची बुद्धि व्हाइसरॉयसाहेबांना सुचून त्यांनीं त्या कायद्याला पुरवणी म्हणून एक बिल असेंब्लीपुढें गेल्या सोमवारीं आणलें. तें बिल असेंब्लीनें धुडकावून लावलें किंवा त्याचे नाककान कापून त्याला हद्दपार केलें असें या नामंजुरीचें वर्णन केलें तरी शोभण्यासारखें आहे. पण सरकारनें व्हाइसरॉय यांचे शिफारशीनें फिरून मंगळवारीं पुनः तेंच बिल असेंब्लीपुढें मांडलें व तेव्हांहि त्याची तीच वाट लागली !

* * *

पण बापानें मारलें असतां आईच्या आश्रयाला जाऊन दडणाऱ्या खोडकर मुलाप्रमाणें असलें हें द्वाड बिल असेंब्लीनें दोन वेळां मारून परत घालविलें तरी सरकारला त्याची काय काळजी ! हल्लींसारखें सभासद भरलेले कौन्सिल ऑफ स्टेट जोंपर्यंत हाताशीं आहे, तोंपर्यंत सरकारला आपले हट्ट पुरण्याविषयीं निराश होण्याचें मुळींच कारण नाहीं. मंगळवारीं बंगाल ऑर्डिनन्सचें पुरवणी बिल असेंब्लीनें नामंजूर करतांच बुधवारीं तें कौन्सिल ऑफ स्टेटपुढें ठेवण्यांत आलें व गुरुवारीं म्हणजे आजच तें सर्वांच्या अजमासाप्रमाणें मंजूरहि झालें ! ठराविक पांच-चार माणसांनींच काय तो विरोध केला. या प्रसंगीं वरील मुत्सद्द्यांनीं आपलें शहाणपण बरेंच पाजळलें. रामदास, वेदमूर्ति यांनीं पहिल्या भाषणाच्या वेळेसच विरोध करून सभागृह सोडलें. यामुळें मतें मोजण्यांत आलीं तेव्हां दादासाहेब करंदीकर, के. व्ही. रंगास्वामी अय्यंगार व लाला सुखबीरसिंग एवढींच मतें प्रतिकूल पडलीं. यावरून या देशांत लोकमत एकमुखी होण्यापूर्वीं अजून किती मार्ग चालून जावयाचा आहे हें लक्षांत येईल.

* * *

असो. कौन्सिल ऑफ स्टेटनें आपल्या स्वभावाप्रमाणें या बिलास संमति दिली तरी असेंब्लीनें मात्र आपलें कर्तव्य उत्कृष्ट रीतीनें बजावलें ही फार आनंदाची गोष्ट होय. या बिलावरील पहिल्या दिवशीचा वादविवादहि मोठा आटपशीर, भारदस्त व गंभीरपणाचा झाला. बिलांत एका हातानें अटेंकत ठेवलेल्या कैद्यास अपिलाचा अधिकार दिला असा देखावा करून लगेच दुसऱ्या हातानें अपील-चौकशीपेक्षां अधिक व्यापक स्वरूपाचे असे जे अधिकार क्रिमिनल प्रोसीजर कोडनें हायकोर्टांना दिलेले आहेत, ते या बिलांत रद्द करण्यांत आलेले आहेत. वास्तविक अपिलाचा हक्कहि या कायद्यानें अटक केलेल्या प्रत्येक मनुष्यास सरांस दिलेला नाहीं, तर कमिशनर नेमून सरकार ज्यांची चौकशी करील त्यांनाच मात्र तो दिला आहे. पण चौकशी कोणाची करावी व कोणाची करूं नये ही फोड स्वतः सरकारच्या हातींच राहिल्यानें अपिलाचा हक्क सरकार आपल्या इच्छेप्रमाणें मर्यादित करणार असें उघडच होतें. पण शंभरांत एकाची चौकशी झाली तरी निदान त्याला अपील करतां येईल व 'को कालो फलदायकः' या न्यायानें कदाचित् त्याला न्यायहि मिळेल.

* * *

तात्पर्य, अशा रीतीनें हें बिल म्हणजे तो एक असेंब्लीला उलटासुलटा खोडाच होता. 'धरलें तर चावतें व सोडलें तर पळतें' ही म्हण या बिलाला अक्षरशः लागू पडण्यासारखी होती. शंभरांत एखाद्याला न्याय मिळेल या आशेनें किंवा दयाबुद्धीनें बिलांतील अपिलाच्या कलमाला संमति द्यावी असें म्हटलें तर त्याचा अर्थ पुरवणी-बिल ग्राह्य मानलें व त्याचा परामर्श घेतला; व त्याचा परामर्श घेतला याचा अर्थ अप्रत्यक्ष रीत्या मूळच्या बंगाल ऑर्डिनन्स ॲक्टालाच संमति दिली असा होत नाहीं काय? बरें हेंहि पत्करलें, पण हायकोर्टाचा अधिक विस्तृत अधिकार ( हेबियस कॉर्पसचा अधिकार ) नष्ट करणारें कलम काढून टाकलें तर आपलें सगळेंच गांठोडें बुडालें असा बहाणा सरकार करणार! बरें एक साधावें तर एक गमवावें, हा खोडा चुकविण्याकरितां सगळें बिलच बुडवावें म्हटलें तर 'सर्वनाशे समुत्पन्ने अर्धं त्यजति पंडितः' हें वचनहि असेंब्लीला माहीत नाहीं असा तिजवर आरोप येणार!

 * * *

पण खोड्यांतून असेंब्लीनें प्रथम चतुराईनें व नंतर धिटाईनें आपला पाय काढून घेतला. बिल प्रथम प्रविष्ट करण्यांत आलें तेव्हां असेंब्ली स्तब्ध बसली, तिनें हो नाहीं कांहींच म्हटलें नाहीं. दुसऱ्या वाचनाचे वेळीं तिनें सडकून टीका करून सरकारच्या पोटांतील कपटाचीं व दुष्ट बुद्धीचीं आंतडीं बाहेर काढलीं, पण मंजुरी-नामंजुरीदाखल हो नाहीं कांहींच म्हटलें नाहीं. नंतर कच्च्या वाचनाच्या वेळीं अपिलाचीं तेवढीं कलमें स्वतः होय न म्हणतां सरकारच्या मतानें परस्पर मंजूर होऊं दिलीं, पण पुढें आक्षेपार्ह अशीं जीं कलमें होतीं तीं बहुमत विरुद्ध देऊन नामंजूर करविलीं. अशा विवेचक रीतीनें बिलाचा परामर्श घेतल्याकारणानें, जो फांस किंवा खोडा सरकार लोकपक्षावर घालणार होतें तोच त्याच्यावर उलटून पाडला. प्रारंभीं जी अडचण लोकपक्षाला वाटली तीच अखेर रोकडीं सरकारला उत्पन्न झाली. तेव्हां त्यांनीं तिसरें वाचन न करतां बिलच परत घेतलें ! याच्या पुढची पायरी म्हणजे हें चेंदामेंदा झालेलें बिल आपल्या शिफारसीनें पुनः नीटनेटकें थापून मंगळवारीं असेंब्लीपुढें मांडण्यांत आलें ही होय. याहि वेळीं फिरून उभयपक्षांनीं पूर्ण एकविचारानें बिलाला विरोध करून तें बुडविलें. बंगाल कौन्सिलनें मूळ ॲक्ट नामंजूर केला व असेंब्लीनें त्याची पुरवणी नामंजूर केली आणि अशा रीतीनें मूळ ऑर्डिनन्स, व्हाइसरॉयांची शिफारस किंवा बादशहांची खास मंजुरी ह्या सर्वांना आपण कस्पटाप्रमाणें लेखतों असें सिद्ध केलें.

* * *

असो. मंगळवारच्या चर्चेच्या वेळीं एकजुटीमुळें उभयपक्ष आनंदी होते. परस्परांच्या मदतीची किंमत त्यांना या वेळीं मनांतून पटली आणि बजेट-मंजुरी व इतर कित्येक बाबी यांच्या प्रसंगीं उभयपक्षांत भांडणें व उत्तरें-प्रत्युत्तरें झालीं तरी सरकारच्या दडपशाहीला विरोध करण्याच्या बहुतेक प्रसंगीं फिरून एकोपा होऊं शकतो, ही गोष्ट पुन्हा प्रत्ययाला आली. पण भांडण नाहीं तेथें आवेश नाहीं व कुत्सितपणा नाहीं तेथें विनोद नाहीं; आणि जेथें आवेश व विनोद दोनहि नाहींत तेथें अमृत देखील जिभेला सपकच लागावें असा मनुष्यस्वभावाचा नियमच आहे. पण मंगळवारची ही चर्चा महत्त्वाची व गंभीर असली तरी फिकी पडेल अशी भीति कित्येक प्रेक्षकांना पडली होती ती मात्र अकल्पित रीतीनें टळली. विनोद पालविण्याचें काम विदुषकी कबीर अहमद व शिलेदारी कॅप्टन हिरासिंग यांचेकडे नेहमीं

असतें पण आज तें काम ब्रह्मदेशचे एक प्रतिनिधि मि. नायडू यांजकडे अकल्पित रीतीनें गेलें.

* * *

मि. नायडू हे वर्णानें कोळशांतील माणकाप्रमाणें असून सभागृहाच्या एका कोपऱ्याचे अंधारांत दिसत न दिसत असे बसलेले असतात. त्यांना बोलतां येत नाहीं, पण लोकमताच्या दृष्टीनें अगदीं केव्हां कोणी बोलूं नये अशा नेमक्या वेळींच, नेमक्या रीतीनें ते आपला आवाज लोकांना ऐकवितात. 'निवडणुकीला मी उभा होतों' अशी शेखी मिरविण्याचा ज्यांना आंचट षोक असतो त्यांतलेच हे एक गृहस्थ आहेत. पण सुदैवानें दुसरा उमेदवार कांहीं अकल्पित कारणानें निवडणुकींतून बाद झाला व त्याच्या अकालीं मृत्यूमुळें त्याचें शिलकी उरलेलें आयुष्य घेऊन हे सभासद जन्माला आले; आणि अशा रीतीनें म्हणावयाला लोकनियुक्त, पण कृतीनें सरकारचे पुरे बगलबच्चे अशा यांना अनेक वेळां पाहून सभासदांना मनांतून यांचा बरेच दिवस राग आला होता तो त्यांनीं या प्रसंगीं पुरा उगवून घेतला. नायडू हे पुरवणीबिलाला संमति देण्यासारखें बोलूं लागले असें पाहतांच पंधरा मिनिटेंपर्यंत असेंब्लीचें सभागृह हें डिबेटिंग सोसायटीच्या सभेपेक्षांहि अधिक पोरकट बनलें होतें व खुद्द अध्यक्षहि बैठकीचा हा शेवटचा दिवस असें समजूनच कीं काय ही सर्व गम्मत चालूं देत व आनंद घेत हसत बसले होते.

* * *

असेंब्लीनें अखेरच्या दिवशीं आणखी एक बिल नामंजूर केलें, तें डॉ. गौर यांचें संमतिवयाचें. डॉ. गौर हे आज तीनचार वर्षें या बिलाबद्दल खटपट करीत आहेत. पूर्वीं एकदोन वेळ त्यांचें बिल नामंजूर झालें होतें, पण यंदा हें बिल असें अचानक रीतीनें नामंजूर झालें कीं, अगदीं हाता-तोंडाला आलेला मुलगा गमावल्यासारखें दुःख त्यांना व त्यांच्या सहकारी मित्रांना झालें असलें पाहिजे! हें बिल प्रविष्ट होऊन बाहेर प्रांतांत अभिप्रायार्थ पाठविण्यांत आलें; त्याअन्वयें अभिप्राय आले पण ते बरेचसे प्रतिकूल असे आले. तथापि बिल सिलेक्ट कमिटीकडे पाठविण्याइतकी सहिष्णुता असेंब्लीनें दाखविली. पण कमिटीनें रिपोर्ट केला त्यांत बेसुमार मत-भेद दिसून आला. प्रत्येक सभासदानें स्वतःची वेगळी मतपत्रिका जोडली. 'आठ परभय्ये व दहा चौके' असा प्रकार झाला. अखेर चर्चेच्या दिवशीं

सर्व वेळ डॉ. गौर यांचें नशीब जोरावर आल्यासारखें दिसलें. कारण विरुद्ध पक्षाच्या सर्व उपसूचना नामंजूर झाल्या. पण शेवटीं सर्व बिलच्या बिल सवाला-दाखल टाकलें तेव्हां त्यांचे सर्व प्रतिपक्षी एकत्र झाले! सरकारनें विरुद्ध बाजूस मत दिलें व कांहीं मुसलमान तटस्थ राहिले. डॉक्टरसाहेबांनीं एक एक शत्रु वेगवेगळा मोडून काढला. पण अखेर सर्व शत्रु एक होऊन त्यांनीं डॉक्टर-साहेबांनाच मोडून काढलें!

* * *

पिनल कोडाच्या ३७६ व्या कलमांत संमतिवय १२ बारा हें आहे. डॉ. गौर यांच्या मतें परपुरुष गुन्हेगार असतां ही मर्यादा सोळा असावी, व गुन्हे-गार हा मुलीचा खुद्द नवरा असेल तर ती मर्यादा कमींत कमी चौदा असावी. शिवाय शिक्षेच्या बाबतींतहि त्यांनीं असा आग्रह धरला होता कीं, नवरा गुन्हे-गार असला तरी तो दोन वर्षांपर्यंत कैदेच्या शिक्षेस पात्र व्हावा. सिलेक्ट कमिटींत सरकारतर्फे गृहमंत्री हे तेरा वर्षांच्या वयोमर्यादेपुढें जाईनात व असेंब्लींतील चर्चेच्या वेळींहि त्यांनीं लोकमत सोडून फार पुढें जाऊं नका असा सावधगिरीचा इशारा दिला. पण डॉक्टर गौर व नव्या विचाराचे त्यांचे तरुण सहकारी मित्र हे बहुमताच्या जोरावर बेभान झाल्यासारखे दिसले, व एकहि उपसूचना त्यांनीं सामोपचारानें स्वीकारली नाहीं. याचा सहजच परिणाम असा झाला कीं, निरनिराळ्या उपसूचनांचे कामीं पराभूत झालेले सर्व सभासद एक-जीव झाले, व सरकारी सभासदहि इतरांबरोबर बिलाला तिलांजलि वाहण्यास तयार झाले. यामुळें नदीच्या परतीराला एक टोंक लागलें असतां दुसऱ्या टोकानें नाव सगळ्या उतारूंसह उभी बुडावी असा विपरीत प्रकार झाला.

* * *

परपुरुष गुन्हेगार असतां सोळापर्यंत संमतिवयाची मर्यादा वाढविली तर त्यांना धर्माची बाध कांहीं एक नसून उलट त्यामुळें स्वतः अल्पवयी मुलीला व तिच्या पालकाला तें एक प्रकारचें संरक्षणच वाटेल. पण विवाहित पतिपत्नीच्या संबंधांत वयोमर्यादा ठरविणें हें जपूनच झालें पाहिजे. कारण अलीकडे लग्नाची वयोमर्यादा वाढत असलेली स्पष्ट दिसते, तरी बालविवाह हा सर्वस्वीं नष्ट झालेला नाहीं. तसेंच ऋतुशांति वगैरेचे बाबतींत जुने धार्मिक विधी विशेष निष्ठेनें पाळणारे लोकहि अद्यापि आहेत. अशा स्थितींत नवरा गुन्हेगार व त्याचे आईबाप किंवा पालनकर्ते हे साथीदार ठरून भुताच्या हातीं कोलीत दिल्या-

प्रमाणें कायदा आपले घातकी खेळ करूं लागेल ही गोष्ट डॉ. गौर यांचे लक्षांत यावयास पाहिजे होती; पण कित्येक सभासदांनीं पूर्वी म्हणून दाखविल्याप्रमाणें डॉ. गौर यांना आपण नव्या युगांतले 'मनु' आहोंत असें खरोखरच वाटत असावें. पण मद्रासचे एक धर्मनिष्ठ सभासद श्रीयुत आचार्य यांनीं बिलाला विरोध करतांना आपल्या जळजळीत वाणीनें त्यांच्या डोळ्यांत असें अंजन घातलें कीं, डॉ. गौर यांचा भ्रम बिल नामंजूर होण्यापूर्वींच पार निघून गेला असावा. अशा रीतीनें दिल्ली येथील यंदाची असेंब्लीची बैठक त्रेसष्ट दिवस काम चालून गेल्या मंगळवारीं खलास झाली. सिमला येथील बैठक ऑगस्टच्या तिसऱ्या आठवड्यांत सुरू होईल व ती जवळ जवळ चार आठवडे चालेल.

---

# सिमल्याचीं बातमीपत्रें

## पत्र नं. १

ता. २१-८-२५

असेंब्लीची चालू बैठक ता. २० गुरुवार रोजीं सुरू झाली. परंतु त्यापूर्वी बरेच दिवस सभासदांचा आखाडा पडण्याला सुरुवात झाली होती. याचें कारण फायनॅन्स कमिटी, पब्लिक अकाउंट्स् कमिटी, लष्करी कमिटी व कित्येक बिलांवरील सिलेक्ट कमिट्या यांचें काम आठवडा दोन आठवडे आधीं सुरू झालें होतें. चालू बैठकींत खासगी बिलांना दोन दिवस म्हणजे ता. २६ ऑगस्ट व ९ सप्टेंबर व खाजगी ठरावांस दोन दिवस म्हणजे २ सप्टेंबर व १६ सप्टेंबर असे चार दिवस मिळणार असल्यामुळें खाजगी सभासदांना उद्दिष्ट कार्याच्या दृष्टीनें फारसा लाभ होणार नाहीं. तथापि असेंब्लीच्या अध्यक्षांकडे पाठविलेल्या बिलांत व ठरावांत अनेक प्रकारचे विषय गोंवले गेलेले आहेत. पैकीं राजद्रोहाच्या गुन्ह्याचें कलम, फौजदारी कायद्याच्या १४४ कलमाची दुरुस्ती, वैद्यकी पदव्या, किनाऱ्या-लगतचा व्यापार, सिल्हट प्रांताची रचना, मद्यपान-निषेध, लष्करी डॉक्टरी खातीं, आयात, भरड कापडावरील जकात वगैरे होत. पण यांपैकीं एकहि बिल प्रविष्ट करण्यास बहुधा अवसर मिळणार नाहीं. कारण पूर्वी प्रविष्ट होऊन राहिलेलीं खासगी सभासदांचीं अनेक बिलें शिल्लक आहेत. यामुळें तींच

सगळा वेळ खाऊन जातील. वेळ न मिळाल्यामुळें फुकट गेलेल्या बिलांना फायलावर अनुक्रमानें दाखल केलेल्या अर्जाइतकीहि किंमत उरत नाहीं. तर फुटलेलीं किंवा वाईट निघालेलीं कांचेचीं भांडीं जशीं फिरून भट्टींत पडतात तशींच हीं फुकट गेलेलीं बिलें बॅलटच्या सोडतींत घालून नशिबाची परीक्षा पाहावी लागते.

*  *  *

आज रोजीं स्वराज्य पक्षाची सभा भरली होती. रंगस्वामी अय्यंगार यांना पूर्वींप्रमाणेंच सेक्रेटरीच्या जागीं नेमण्यांत आल्यावर स्वराज्य पक्षास मिळालेल्या सात नवीन सभासदांचीं नांवें वाचून दाखल करण्यांत आलीं. पं. मोतिलाल नेहरू यांनीं स्कीन कमिटीवरील सभासदाची जागा पत्करल्याचा प्रश्न निघून त्यांनीं जागा स्वीकारली हें योग्य केलें असा सर्वानुमतें ठराव करण्यांत आला. नंतर पूर्वींच्या ठरावानुसार स्वतंत्र पक्षाकडे पाठविलेल्या पत्राला आलेल्या उत्तराचा विचार होऊन असेंब्लीच्या अध्यक्षाच्या निवडणुकीचे बाबतींत एक-मतानें कांहीं योजना करतां येतें कीं काय हें पाहण्याकरितां स्वतंत्र पक्षाच्या सहा सभासदांबरोबर स्वराज्य पक्षाचे सहा सभासद नेमून देण्यांत आले. स्वतंत्र पक्षातर्फे जिना, मालवीय, गौर, महंमद याकूब, पुरुषोत्तमदास व राम अय्यंगार असून स्वराज्य पक्षातर्फे नेहरू, केळकर, आचार्य, अभ्यंकर, समीउल्ला व चेट्टी असे लोक होते. या कमिटीचें काम सुमारें चार तास चाललें, पण एक-वाक्यता होण्याचा रंग न दिसल्यामुळें कोणत्याहि पक्षानें अमुक एका उमेद-वाराला मतें देण्याविषयीं हुकूम काढूं नये असेंच अखेर ठरलें. कमिटीच्या चर्चेंत पटेल व रंगाचार्य यांना उभयपक्षीं जबरदस्त आक्षेप घेण्यांत आल्यामुळें हे दोनहि उमेदवार बाजूस ठेवून स्वतंत्र पक्षातर्फे दि. ब. रामचंद्रराव व स्वराज्य पक्षा-तर्फे केळकर असे दोन नवेच उमेदवार पुढें आणवून मग त्यांच्यांतील कमी-अधिक पसंत ठरवून त्यालाच सर्वानुमतें निवडून आणावा अशी सूचना पुढें येऊन तिची बरीच चर्चा झाली. परंतु इतर रीतीनें एकमत होत नाहीं असें दिसून आल्यावर ही योजनाहि मागें पडून अखेर उभयपक्षानें वाटेल तें करावें असा निकाल ठरला. अर्थात् समेटाचें बोलणें निघून तें मोडल्यामुळें निवडणुकीच्या तयारीला उद्यां अधिक जोर येणार !

*  *  *

ठरल्याप्रमाणें लॉर्ड रेडिंग यांनीं आज ले. असेंब्लीच्या बैठकीचा यथाविधि प्रारंभ केला. लवाजमा, थाटमाट, वगैरे सर्व मामुली पद्धतीचे होते. फक्त झगा उचलणारे राजकुमार तेवढे नव्हते! असेंब्ली व कौन्सिल ऑफ स्टेट या दोहोंचे सभासद एकत्र जमल्यानें सर्व वर्गांच्या लोकप्रतिनिधींचें तें एक प्रदर्शनच भरल्यासारखें दिसलें. खादीचा नुसता शर्ट घालून अनवाणी चालणाऱ्या गरीब सभासदापासून तों दरभंग्याच्या महाराजांपर्यंत बडे लोक सरमिसळ बसलेले पाहून कोणासहि कौतुक वाटलें असेल. लॉर्ड रेडिंग यांनीं लिहून आणलेलें भाषण वाचण्यास बरोबर एक तास लागला. लॉर्ड बर्कनहेड यांच्या भाषणाचा तो निवळ प्रतिध्वनि होता असें म्हटलें असतां चालेल. रेडिंग साहेबांचा आवाज आधींच मोठा असून शेवटचा भाग तर त्यांनीं इतक्या कृत्रिम डुरकण्या फोडून वाचला कीं, नाटकांतला राक्षस किंवा मोहोरमांतला वाघ याची कित्येकांस आठवण झाली. हर्लींचें भाषण पूर्वीपेक्षां अधिक सामोपचाराचें व शांततावादी असलें तरी, निष्फळ होतें. नेमस्तांनींहि त्याच्यासंबंधानें चांगला उद्गार काढलेला ऐकिवांत आला नाहीं.

* * *

हिंदी नाण्याच्या पद्धतीचा विचार करण्यासाठीं जी नवी कमिटी नेमली आहे त्या कमिटींतील नांवें व्हाइसरॉयांनीं आपल्या भाषणांत जाहीर केलीं. तीं अशीं—

अध्यक्ष —कमांडर हिल्टन यंग. सभासद —१ प्रोफेसर कोयाजी, कलकत्ता, २ सर माणेकजी दादाभाई, ३ सर राजेंद्रनाथ मुकर्जी, ४ सर अलेक्झँडर मरे, ५ सर पुरुषोत्तमदास ठाकुरदास, ६ सर नॉरकॉट वॉरन, ७ सर हेन्री स्ट्राकॉश, ८ मि. ए. व्ही. व्ही. अय्यर, ९ मि. डब्ल्यू. ई. प्रेस्टन. या नांवांवरून सदरहू कमिटींत ब्रिटिश पेढीवाल्यांचेंच प्राबल्य दिसून येतें. अध्यक्ष कधींहि हिंदुस्थानांत आलेले नव्हते. अर्थात्‌च या कमिटीच्या रचनेबद्दल मुंबईचे व्यापारी नाखूष आहेत.

## पत्र नं. २

ता. २७–८–२५

### पाटील चावडींत बसला!

गेल्या शनिवारीं विठ्ठलभाई पटेल यांनाच अध्यक्षाच्या निवडणुकींत जें यश आलें तें, निवडणुकीचे आंकडे लक्षांत घेतां, लोकपक्षाच्या वाढत्या

आकांक्षेचेंच फळ होय. वास्तविक पटेल यांना ५८ व रंगचार्य यांना ५६ मतें मिळालीं. म्हणजे अंतर दोहोंचेंच पडलें. शर्यतींत घोड्यानें केवळ कान किंवा मान पुढें ढकलून पहिलें बक्षिस मिळवावें तसाच पटेल यांचा हा जय कित्येकांना तुटपुंजा वाटण्याचा संभव आहे. पण त्याच्या मागें थोडें गेलों असतां पटेल यांना मिळालेल्या बहुमताचें कौतुकच वाटेल!

* * *

स्वराज्य पक्षावर पटेल यांची मुख्य भिस्त. या पक्षाचें संख्याबल पूर्वी शेचाळीस होतें तें आतां त्रेपन्न झालें. म्हणजे सातांनीं संख्या वाढली. पण निवडणुकीच्या दिवशीं या पक्षाचे एकंदर नऊ सभासद गैरहजर होते. म्हणजे मुलगा नवे पांच श्लोक शिकतो व जुने सहा विसरतो अशी स्थिति होती! पण दोन-तीन गृहस्थांखेरीज बाकीच्यांना गैरहजर असण्यास सबळ अशींच कारणें होतीं म्हणून त्यांनाहि दोष देतां येत नाहीं. असो. पटेल यांच्या नांवावर पडलेल्या मतांपैकीं दोन मतें खूण बरोबर न घातल्याकारणानें फुकट गेलीं. मिळून त्यांना एकंदर साठ मतें पडलीं. पैकीं फक्त ४४ च स्वराज्य पक्षाचीं होतीं. बाकीचीं १६ मतें त्यांना या पक्षाबाहेरचीं मिळालीं. या मतांपैकीं कांहीं मतें दुसरे उमेदवार दिवाणबहादुर रंगाचार्य हे अप्रिय असल्यामुळें मिळालीं असलीं तरी इतर कांहीं मतें लोकपक्षाचा पाठपुरावा करण्याकरितां पटेल यांना दिलीं गेलीं यांत शंका उरत नाहीं.

* * *

पंडित मदन मोहन यांच्यासारख्या कांहीं गृहस्थांना पटेल हे रंगाचार्यांच्या इतकेच अप्रिय होते. पण त्यांच्यापुढें उभ्या राहिलेल्या बिनतोड विरोधाचा परिहार त्यांनीं अखेर केला तो स्वतःच्या मनाला एकच प्रश्न विचारून केला. तो प्रश्न हा कीं, दोघां उमेदवारांपैकीं वेळ पडल्यास सरकारची बाजू घेईल असा कोण व लोकांची बाजू घेईल असा कोण? या दुसऱ्या प्रश्नाचें उत्तर 'पटेल' असें आलें म्हणूनच त्यांनीं स्वपक्षीय रंगाचार्य यांस मत न देतां परपक्षीय पटेल यांना दिलें. हल्लींच्या तीव्र पक्षभेदाच्या काळीं हा मनाचा थोरपणा विशेषच कौतुकास्पद वाटतो. पंडितजी हे एरवीं स्वराज्य पक्षाविषयीं कितीहि नाखुषी दाखवोत, त्यांचें उदार मन अशा वेळीं पक्षभेद विसरूनहि लोकपक्षाकडे उडी घेतें ही तर त्यांची थोरवी! पटेलच्या नांवापुढें फुली घालतांना पं. मदन मोहन यांना खरोखरच चमत्कारिक वाटलें असेल, पण गतवर्षी

'फायनॅन्स बिल' फेटाळून लावण्याच्या कामीं त्यांच्या सात्त्विक स्फूर्तीचा विजय झाला, तसाच या निवडणुकीच्या बाबतींतहि झाला.

* * *

पटेल यांची निवडणूक व अध्यक्षपदावर त्यांचें प्रस्थापन या दोन गोष्टी एकत्र मिळविल्या असतां त्या प्रसंगाला 'ऐतिहासिक महत्त्वाचा' असें विशेषण लावतां येईल. आणि होममेंबर सर अलेक्झांडर मुडिमन यांनीं तें विशेषण जाणूनबुजून लावून आपल्या कृत्याचें आग्रहानें समर्थन केलें, त्याचें कारण असें कीं, इतिहास जरी प्रतिक्षणीं घडतच असतो तरी विशेष प्रसंगांना अनुलक्षूनच तो 'घडला' असें म्हणण्याचा परिपाठ आहे. प्रवासांत दरपावलागणिक वाट ओसरतच असते, पण मैल मोजून जागजागीं दगड पुरले जातात त्यांच्याच योगानें प्रवास सरला कीं उरला याचा हिशेब होतो. हिंदी राजाकारणाच्या प्रवासांत लोकनियुक्त कायदे-कौन्सिलांचा प्रारंभ हा जर एक लक्षांत ठेवण्यासारखा मुक्काम म्हटला तर असेंब्लीचा अध्यक्ष निवडून देण्याचा प्रारंभ हा त्याच्या पुढचा मुक्काम म्हणून म्हणावाच लागतो. अशा दृष्टीनें 'ऐतिहासिक' म्हणतां येण्यासारखा हा प्रसंग साजरा करण्याचा मान विठ्ठलभाई पटेल यांना मिळाला हें त्यांचें सुदैव कां म्हणूं नये ?

* * *

पटेल यांची निवडणूक झाली खरी, पण व्हाइसरॉयसाहेब ती मंजूर करतात कीं नाहीं हा पुढचा सवाल होता. पटेल सरकारला मनांतून कितीहि अप्रिय असले तरी अशा चढाओढीनें व चुरशीनें झालेली निवडणूक रद्द करण्याची व्हाइसरॉयसाहेबांची छाती होणार नाहीं, असें प्रत्येकाला वाटत होतें, व तेंच खरें ठरलें. सोमवारीं जुने अध्यक्ष सर फ्रेडरिक व्हाइट यांनीं लॉर्ड रेडिंग यांचा निरोप वाचून दाखवून, पटेल यांचें स्वागत करून, आपली जागा रिकामी केली, तो प्रसंग अनेक दृष्टींनीं पाहण्यासारखा व आठवण ठेवण्यासारखा होता. हल्लींच्या सुधारलेल्या काळांत क्वचित् एखादी प्रौढ सुशिक्षित वधू आपला पति आपणच पसंत करण्याची जबाबदारी घेते आणि मग त्याच्या सासू-सासऱ्यांना, जांवई मनांतून पसंत नसला तरी, मधुपर्काचे वेळीं, त्याचे पाय धुवावेच लागतात, आणि मेहुण्यांनीं बाजूला तोंड करून नाक मुरडलें तरी त्याचे मागें पंक्तींत उभें राहून वारा घालावा लागतो व वेळीं जोडाहि पुढें करावा लागतो ! पटेल यांच्या प्रतिपक्षीयांनाहि 'पदरीं पडलें, पवित्र झालें' या म्हणीप्रमाणेंच प्रसंगीं वागणूक ठेवावी लागली.

त्यांनीं भाषणें करून त्यांची थोडीबहुत स्तुति केली, हस्तांदोलनपूर्वक सत्कार केला. “ या, घर आपलेंच आहे ! ” असें म्हटलें व ‘झाल्यागेल्या सर्व गोष्टी विसरून आम्ही तुमच्याशीं सहकारिता करूं’ असेंहि आश्वासन दिलें !

जुने अध्यक्ष सर फ्रेडरिक व्हाइट यांची सर्व वर्तणूक मोठी नमुनेदार व अनुकरणीय अशी होती. त्यांनीं अधिकारन्यासाचा सर्व शिष्टाचार उत्तम पाळला. इतकेंच नव्हे तर पटेल यांचें स्वागत करतांना व स्वतः असेंब्लीचा निरोप घेतांना जें भाषण केलें तें सुंदर, गंभीर व रुबाबदार असेंच होतें. आणि आपल्या जागीं पटेल येऊन बसल्यावर त्यांच्या रिकाम्या जागीं जाऊन सामान्य सभासद म्हणून जेव्हां ते बसले, तेव्हां अधिकाराचा त्याग सात्त्विक कसा असूं शकतो, याचें एक उदाहरण सहज पाहावयास सांपडलें. अध्यक्ष व सामान्य सभासद यांच्यामध्यें अधिकाराच्या उपाधीखेरीज दुसरा फरक कोणताच नाहीं, व ही नैमित्तिक उपाधि नाहींशी होतांच नित्य-स्वरूपांत मिसळून जो इतर सभासदांशीं समरस होतो त्यालाच त्या उपाधीचें भूषण होतें, इतरांना तें दूषण होतें. सर फ्रेडरिक यांच्यामागून पटेल यांनीं केलेलें भाषण बरेंच फिक्कें पडलें. याचें कारण हा प्रसंग विशेष महत्त्वाचा असल्यामुळें पटेल हे एरवीं सभाधीट असले तरी, या प्रसंगीं ते किंचित् बुजल्यासारखे झाले व त्यांनीं भाषणाची कांहींच तयारी केली नव्हती. ही त्यांची बूज अर्थातच एकदोन दिवसांत निघून जाईल याविषयीं शंका नाहीं.

* * *

पटेल अध्यक्षाच्या पोषाकांत कसे दिसतात, हें पाहण्याची मात्र सर्वांना मनापासून उत्कंठा होती. आणि डोक्यावर ‘जांगिलमामाची टोपी’ व अंगांत खादीचा काळा झगा घालून जेव्हां ते येऊन बसले तेव्हां प्रेक्षकांना नाटकांतील ट्रन्सफर सीनची आठवण झाली. हा नवा प्रवेश यापुढें एक वर्षभर असाच उघडा शिल्लक राहावयाचा असल्यामुळें आणि या अवधींत पटेल हे स्वराजिस्ट न राहतां पगारी अधिकारी वर्गांत सामील झाल्यामुळें, पटेल यांच्या चरित्रावर तितका वेळ पडदा पडलेलाच राहणार. कसेंहि असो, असेंब्लीच्या अध्यक्षाची खुर्ची ही एक लोकसत्तेची नवी चावडी निर्माण झाली; तींत बसावयास कोणी तरी पाटील हवाच होता. तो पटेल नांवाचा पाटील आयताच मिळाला. लो. टिळक हे पटेल यांना नेहमीं ‘पाटील’ अशा नांवानें संबोधीत हें पुष्कळांना माहीत आहे. तें त्यांचें वर्णन गमतीनें आज खरें ठरलें असेंच कोणासहि वाटेल.

* * *

पटेल यांच्या निवडणुकीसंबंधानें एक गोष्ट सांगण्याची राहिली ती इतकीच कीं, स्वराज्य पक्षाचा उमेदवार निवडून येऊं नये म्हणून बॅरिस्टर जिना यांनीं जंग-जंग पछाडले. आपल्या पक्षाचा उमेदवार ( वास्तविक त्यांच्या पक्षानें त्याला उभेंहि केलें नव्हतें ) रंगाचार्य हे नालायक असल्याविषयीं त्यांनीं आपलें मत कोठेंच गुप्त ठेविलें नव्हतें. पण स्वराज्य पक्षाचा उमेदवार यशस्वी करण्यापेक्षां आपला नादान उमेदवार निवडून यावा, याविषयीं त्यांनीं अतिशय खटपट केली. त्यांच्या पक्षांतच या बाबतींत बंड झालें म्हणून गोष्ट निराळी. नाहीं तर पटेल यांना कोणीहि मत द्यावयाचें नाहीं असा लेखी हुकूम काढून त्यांनीं पटेल यांचे पाय ओढण्यास कमी केलें नसतें. झालेल्या निवडणुकीनें जर कोणाचा खरा पाणउतारा झाला असेल, किंवा कोणाच्या नाकाला मिरच्या खऱ्या झोंबल्या असतील, तर त्या जिना यांच्याच. निवडणुकीनंतर त्यांनीं आपला राग व्यक्त केल्याशिवाय सोडला नाहीं, कारण मागाहून झालेल्या औपचारिक भाषणांत पटेल यांचें मोकळ्या मनानें त्यांनीं अभिनंदन तर केलें नाहींच, पण आपल्या उर्मट भाषेनें त्यांना जवळ जवळ असेंच जाणविलें कीं, 'संभाळा, आतां परीक्षेला सज्ज व्हा आणि तींत तुम्हीं टिकलाच तर अभिनंदन पुढेंमागें पाहून घेऊं.'

* * *

मंगळवारपासून स्थिरस्थावर होऊन मामुली कामकाजाला सुरुवात झाली. पटेल यांच्या निवडणुकीमुळें स्वराज्य पक्षाच्या उपाध्यक्षाची जागा रिकामी झाली. तिजवर श्री. केळकर यांची निवडणूक होऊन, केळकर यांच्या रिकाम्या झालेल्या 'चीफ व्हिप' चे जागीं षण्मुखम् चेट्टी यांची योजना करण्यांत आली. स्वतंत्रपक्ष आधींच लहान असून अध्यक्षाच्या निवडणुकीच्या प्रकरणापासून तो अधिकच विस्खळित झाला आहे. लोकपक्षानें असेंब्लींत एकजुटीनें काम करण्याकरितां जी 'नॅशनॅलिस्ट पार्टी'ची म्हणून रचना मोठ्या प्रयासानें पूर्वीं केली होती, ती 'मोडण्याचें महत्कार्य मीं केलें' अशी शेखी मिरविणाऱ्या रंगाचार्य यांना योग्य तें बक्षीस निवडणुकींत मिळालेंच. पण 'नॅशनॅलिस्ट पार्टी' अकालीं मेल्यानें तिच्या उरलेल्या आयुष्याची जी वांटणी झाली त्यांतील मोठा हिस्सा स्वतंत्र पक्षापेक्षां स्वराज्य पक्षाच्याच हातीं पडला. स्वतंत्र पक्षाची संख्या कमी होऊन स्वराज्य पक्षाची संख्या वाढली. आणि मुंबई कौन्सिलांतील स्वराज्य पक्षाप्रमाणें असेंब्लींतील स्वराज्य पक्षानें त्रागा करून

मौनव्रत स्वीकारलें तर, स्वतंत्र पक्षाच्या गुर्मीखोर पुढाऱ्यांना आपलें खरें स्थान व खरें बळ कळून येऊन चिमणीएवढें तोंड होण्यास उशीर लागणार नाहीं. पण जी गोष्ट स्वतंत्र पक्षाला करवते ती स्वराज्य पक्षाला करवत नाहीं इतकाच फरक !

* * *

याचें प्रत्यंतर गेल्या मंगळवारींच आलें. करन्सी कमिटीवर झालेल्या नेमणुकी समाधानकारक नाहींत, हें व्यक्त करण्याकरितां 'तहकुबीची सूचना' स्वतंत्र पक्षाच्या पुढाऱ्याकडून पाठविण्यांत आली व तिची चर्चा होऊन ती ६४ विरुद्ध ४४ मतांनीं पासहि झाली. या मतमोजणींत स्वराज्य पक्षानें स्वतंत्र पक्षाला मदत केली. पण ही सूचना स्वराज्य पक्षानेंच पुढें आणली असती तर 'करन्सी कमिशनवर नेमलेल्या आपल्याच लोकांना आपण नांवें ठेवतों असा तिचा अर्थ होतो' असें म्हणून स्वतंत्र पक्षाच्या पुढाऱ्यांनीं मतें दिलीं असतीं किंवा नाहीं याची शंकाच वाटते. असो. या सूचनेवरील वादविवादांत सर बेसिल ब्लॅकेट यांनीं अगदीं पुळपुळीत भाषण केलें. "हिंदी लोकांचें हित पाहण्याकरितां हिंदी लोकांऐवजीं युरोपियन लोक कमिटीवर नेमले" हें म्हणतांना त्यांची त्यांनाच लाज वाटली. आणि हा मायावी युक्तिवाद सरकारच्या गळ्यांत पुरा घालून त्यांचें हसें करण्याकरितां पं. मोतिलाल नेहरू म्हणाले, :"इंग्रज लोकच जर आमचें हित पाहण्यास अधिक योग्य तर असेंब्लींतील सगळ्या लोकप्रतिनिधींच्या जागीं विलायतेंतले तुमचे इंग्रजच कां आणून बसवीत नाहीं ? म्हणजे आमचें खरें हित शंभरपटींनीं अधिक पाहिलें जाईल." या सर्व निर्भर्त्सनेचा कदाचित् परिणाम होऊन कमिटीवर आणखी एकदोन हिंदी गृहस्थ नेमले गेल्यास आश्चर्य मानण्याचें कारण नाहीं. पण कोणतेंहि वचन किंवा आश्वासन देऊन मी आपला हात गुंतवून घेऊं इच्छीत नाहीं व भलती आशा उत्पन्न करीत नाहीं असें मात्र सर बेसिल ब्लॅकेट यांनीं वारंवार बजावलें !

* * *

गेल्या आठवड्यांत स्कीन कमिटीचें काम चालू होऊन प्रश्नावलि तयार होत आली. महाराष्ट्रातर्फें या कमिटीवर नेमलेले सभासद कॅप्टन डफळे हे नुकतेच येऊन दाखल झाले आहेत. त्यांच्या अनुभवाचा फायदा कमिटीवरील इतर सभासदांस सहजच मिळेल. रेल्वे ॲडव्हायसरी कमिटीवर श्री. बापूजी

अणे यांचें काम वाखाणण्यासारखें झालें. ट्रेड यूनियन बिलाच्या सिलेक्ट कमिटीचें काम संपून तिचा रिपोर्ट लवकरच सादर होईल. या कमिटींत मजूर पक्षातर्फे बाजू मांडण्याचें काम केळकर व देवकीप्रसाद सिंह यांचेवरच पडलें होतें व हल्लीं नारायणराव जोशी हे विलायतेहून परत आलेले असल्यामुळें बिलांत आणखी दुरुस्ती घडवून आणावयाची असल्यास त्यांचीहि मदत होईल. सरदार मुतालीक व डॉ. लोहोकरे यांचें पब्लिक अकौंट्स-कमिटीवरील काम नुकतेंच संपलें. मुतालीक यांजकडे किनाऱ्यालगतच्या व्यापारसंरक्षणाचें बिल व डॉ. लोहोकरे यांजकडे वैद्यक-शिक्षणाचें बिल प्रविष्ट करण्याचें काम असून चालू आठवड्यांत योग्य संधि मिळाल्यास ते हें काम करतील. कौन्सिल ऑफ स्टेटमधील महाराष्ट्रीय सभासदांपैकीं दादासाहेब खापर्डे यांनीं सरकारी छापखान्यांतील कामगारांच्या तक्रारींसंबंधानें ठराव पुढें मांडला होता व तो नामंजूर झाला तरी त्यावरील चर्चेंत सदर कामगारांचा बराच फायदा होईल असें वाटतें. दादासाहेब करंदीकर यांची नेमणूक परदेशांतील हिंदी वसाहतीसंबंधानें स्थापलेल्या सल्लागारमंडळावर झालेली आहे आणि सिलोन व मलाया येथें जाणाऱ्या हिंदी मजुरांना मजुरी अधिक कशी मिळेल, कामाचे तास थोडे कमी कसे होतील व इतर रीतीनें त्यांचें आरोग्य वगैरेवर देखरेख कशी ठेवली जाईल याचा विचार मंडळाच्या एकदोन बैठकींत झाला.

* * *

चालू आठवड्यांत लाला लजपतराय हे सोलनहून सिमला येथें कांहीं दिवस राहण्यास आले होते. त्यांच्या अध्यक्षतेखालीं हिंदु महासभेच्या कार्यकारी मंडळाची बैठक झाली. निमंत्रणावरून केळकर, बेळवी व अणे हेहि हजर होते. प्रांतवार हिंदु सभेची संघटना कशी वाढवावी, स्वराज्य पक्ष हा हिंदु समाजाचें हित पाहावें तितकें पाहत नाहीं, असा बाहेर कित्येकांचा गैरसमज झाला आहे त्याचीं खरीं कारणें कोणतीं व तो गैरसमज दूर कसा करावा याचा विचार झाला. तसेंच पुढील निवडणुकीचे वेळीं हिंदु महासभेनें आपले म्हणून उमेदवार जरी उभे करूं नयेत, तरी मुसलमान समाज जसा आपलें हितरक्षण करतो तसेंच हिंदु समाजाचें हितरक्षण कायदे-कौन्सिलांतून होईल असे स्वराज्य पक्षीय उमेदवार निवडून येण्याविषयीं दुरून दक्षता ठेवावी, असें सामान्यतः ठरलें. शुद्धिकार्याचा अहवाल व त्याच्या भावी यशाची आशा

याविषयीं ठिकठिकाणच्या आलेल्या पत्रांवरून उत्साहजनक स्थिति आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

* * *

अध्यक्षनिवडणुकीच्या दिवशीं सभागृहाजवळ बॉंब पडल्याची अद्भुत वार्ता व तिचें निराकरणहि पूर्वींच प्रसिद्ध झालें आहे. पण ज्या वेळीं ही गोष्ट घडल्याचें जाहीर झालें आहे, त्याच वेळीं खुद्द सभागृहांत किंवा आसपासहि कोठें गडबड किंवा कुणकूण ऐकूं आली नाहीं. 'पिकतें तेथें विकत नाहीं' ही म्हण तर खरीच, पण असल्या कामीं न पिकतांहि विकतां येतें. असेंब्लीजवळ पडलेला बॉंब म्हणजे रिक्षावाल्यांनीं गुडगुडी ओढण्याकरितां जपून ठेवलेला धुमसणाऱ्या चिंध्यांचा बेलत्यांत बातलेला गोळाहि असेल. पण योगायोगाचें मर्म इतकेंच कीं, ज्या दिवशीं हा खोटा बॉंब असेंब्लीवर पडला त्या दिवशीं एक लाक्षणिक अर्थाचा बॉंब मात्र असेंब्लीवर खरोखरच पडला. तो म्हणजे पटेलसारखा अध्यक्ष निवडून आला याशिवाय दुसरा कोणता असणार?

## पत्र नं. ३

ता. ३-९-२५

मागील पत्र लिहून झाल्यावर असेंब्लींत पहिलें महत्त्वाचें खाजगी बिल चर्चेला निघालें, तें श्री. नारायण मल्हार जोशी यांचें. इंग्रजींत याला 'मॅटर्निटी बेनिफिट बिल' असें नांव आहे. बिलाचा हेतु असा होता कीं, लहान-मोठ्या कारखान्यांतून बायका कामावर असतात, त्यांच्या बाळंतपणाचे दिवस खाडे पडल्यानें त्यांना निर्वाहाचें साधन राहत नाहीं, म्हणून कारखानदारांनीं नेहमीं थोडथोडी वर्गणी देऊन फंड उभारावा व त्यांतून सरकारनें अशा बायकांना बाळंतपणाचे आधीं सहा आठवडे व मग सहा आठवडे पोटगी देण्याची योजना करावी. बिलांतील तत्त्व अर्थात् चांगलें आहे. त्यांत भूतदया दिसून येते. विलायतेंत मजूर पक्षाचें वाढतें बळ असल्यामुळें तिकडे अशा योजना अंमलांत आलेल्या आहेत. इतकें असूनहि बिल नामंजूर झालें. याचें कारण कारखानदारांना वर्गणी द्यावयास नको व सरकारला योजनेची जबाबदारी अंगावर घ्यावयास नको! पण जोशी यांनीं असाच प्रयत्न केल्यास हें बिल पुढेंमागें पास झाल्याखेरीज राहणार नाहीं.

डॉ. गौर यांच्या सामाजिक सुधारणांच्या बिलांनीं चालू आठवड्यांत बराच वेळ खाल्ला. त्यांचें एकहि बिल मंजूर झालें नाहीं; पण नसत्या उपद्व्यापांत अनेकांच्या शिव्या मात्र त्यांनीं खाल्ल्या. त्या कां हें त्यांचीं बिलें लक्षांत आणलीं म्हणजे आपोआप कळून येईल. १८७२ सालीं ब्रह्मो लोकांच्या विनंतीवरून लग्ननोंदणीचा कायदा करण्यांत आला. त्यांत वधूचें वय एकवीस वर्षांहून कमी नसावें असें कलम आहे; पण डॉक्टरसाहेबांना हें न खपून त्यांनीं असें बिल पुढें आणलें कीं, एकवीस वर्षांची ही वयोमर्यादा कमी करून अठरांवर आणवी. कां, तर अठरा वर्षांनंतर कायद्यानें अज्ञानाचा सज्ञान होतो. पण डॉ. गौर यांना असें कळेना कीं, 'मला कोणताच धर्म नाहीं' असें लिहून देऊन नुसत्या नोंदणीनें कायदेशीर लग्न करण्याचा अधिकार जोखमीचा असल्यामुळें वधू थोडी अधिक प्रौढ असलेली बरी! पण डॉक्टरसाहेबांना ही गोष्ट कशी पटणार? याचा परिणाम मात्र असा झाला कीं, पुराणमतवादी लोकांनीं तर त्यांना नांवें ठेवलींच, पण सुधारकांच्या परीनें सुधारकांनींहि नांवें ठेवलीं व ब्रह्मसमाजिस्ट असणाऱ्या सभासदांनींहि "आमच्या कामांत नसती ढवळाढवळ करावयास तुम्हांस कोणी सांगितलें!" असा रोकडा उघड सवाल केला!

* * *

डॉक्टर गौर यांचें दुसरें एक बिल असें कीं, हिंदु मनुष्यानें पुढें केव्हां तरी एखाद्या देवस्थानाला देऊन टाकण्याच्या हेतूनें जर आपल्या मिळकतीचा ट्रस्ट केला, तर दरम्यानच्या अवधींत आपल्या वंशजांवर व वारसदारांवर त्याला वाटेल तीं बंधनें घालतां यावीं. अशीं बंधनें घालणें हें कायद्याच्या दृष्टीनें व्यक्तिस्वातंत्र्याला घातक म्हणून नामंजूर व नापसंत आहे. सगळ्या जगाची प्रवृत्ति याच दिशेनें वाढत आहे. असें असतां 'मुसलमानांनीं आपणाकरितां अशा प्रकारचा कायदा करून घेतला, तेव्हां आपणहि हिंदूंकरितां तसा कां करून घेऊं नये?' असें डॉक्टरसाहेबांना वाटूं लागलें! पण ही नसत्या गोष्टींत मुसलमानांशीं स्पर्धा ठरली, मुसलमानांनीं जें केलें तेंच मुळीं चुकलें. पण त्यांचें अनुकरण करण्याची बुद्धि ठेवली ही डॉक्टर गौर यांची त्याहून अधिक चूक होय. याहि बिलाला सर्व मतांच्या हिंदु धर्मीयांनीं व विशेषतः वकील लोकांनीं खूपच नांवें ठेवलीं. सर चिमणलाल सेटलवाड हे तर गौर यांना बरेंच टाकून बोलले. सरकारनेंहि या बिलांना विरोध केला.

तात्पर्य, या दोन बिलांमुळें 'कुडाला तुंबड्या लावणारा रिकामा न्हावी' असें नांव डॉ. गौर यांना असेंब्लींत मिळालें आहे.

* * *

यानंतर वादग्रस्त झालेली अशी दुसरी बाब म्हटली म्हणजे 'कोर्टाच्या बेअदबीच्या' सरकारी बिलाची. हें बिल दिल्लीच्या बैठकींतच पुढें आलें; पण पहिल्या वाचनापलीकडे तें तेथें गेलें नाहीं. दरम्यान चोहोंकडील कायदे-पंडितांनीं त्यांवर पुष्कळसे प्रतिकूल असेच अभिप्राय दिले. बिलांत मुख्य कलमें तीन. पहिलें बेअदबीची व्याख्या करणें; दुसरें हायकोर्ट व ज्यूडीशिअल कमिशनर यांना त्यांच्या हाताखालच्या कोर्टाच्या बेअदबीबद्दल इन्साफाचा अधिकार देणें; व तिसरें गुन्ह्याला नक्की शिक्षा ठरविणें. पैकीं शिक्षा नक्की ठरविणें ही गोष्ट एका अर्थानें बरी होती. व्याख्या कोणासच पसंत नव्हती व कोर्टांना नवा अधिकार देण्याबद्दल दुमत होतें. अशा स्थितींत स्वराज्य पक्षानें बिलाला विरोध करावा असा सर्वानुमतें ठराव झाला. त्याप्रमाणें लेखी हुकूमहि दिला. बिलावरील चर्चेत स्वराज्य पक्षाचे उपाध्यक्ष केळकर, चिटणीस रंग-स्वामी अय्यंगार व चीफ व्हिप षण्मुखम् चेट्टी व कार्यकारी कमिटीचे सभा-सद अभ्यंकर यांनीं मुख्य भाग घेऊन बिलाला कसून विरोध केला. परंतु अध्यक्ष पंडित नेहरू यांनीं आयत्या वेळीं स्वपक्षांतील कोणास न विचारतां तडजोड सुचविली. अर्थात् लेखी हुकमाविरुद्ध स्वतः अध्यक्षांचेंच वर्तन झालें! एक हुकूम फिरवून दुसरा देण्याचाहि अध्यक्षाला अधिकार आहे खरा; पण दुसरा हुकूम लेखी नव्हता. नेहरूंच्या भाषणावरून त्याचें फक्त अनुमान करावयाचें होतें. हा सर्व प्रकार अकल्पित झाला. यामुळें मतमोजणीचा प्रसंग आला तेव्हां, स्वराज्य पक्षाच्या अध्यक्षांचें मत एकीकडे व आठ सभासदांचें मत दुसरीकडे असा देखावा दिसला! पण त्यांत कांहीं बिघडण्यासारखें नव्हतें. मात्र अध्यक्षांनीं आयत्या वेळीं हुकूम कितपत बदलावा याविषयीं स्वराज्य पक्षाच्या सभेंत बरीच चर्चा झाली. बिलावरील सिलेक्ट कमिटींत नेहरू, केळकर व रंगस्वामी यांचीं नांवें अधिक घालण्यांत आलीं आहेत. उद्यांपासून सिलेक्ट कमिटीची बैठक सुरू होईल व हें बिल व्याख्या वगळून मंजूर होईल असें वाटतें.

* * *

दुसरें महत्त्वाचें बिल 'नॅचरलायझेशन' संबंधाचें, म्हणजे खालसांतील प्रजाजनांचे हक्क, मूळ नसलेले, मिळविण्याबाबत होतें. यांवर श्री. अणे यांनीं समर्पक भाषण केलें. पन्नास-पाऊणशें वर्षें ब्रिटिश अंमलाखालीं असलेल्या वऱ्हाडसारख्या प्रांतांतून लोकांना हे हक्क अजून मिळत नाहींत. त्यांचा राजा इंग्रज कीं निजाम हें ठरत नाहीं. अणे यांच्यासारख्या कट्ट्या लोकमतवादी लोकनियुक्त सभासदाचा उल्लेख करतांना, या भानगडीमुळें अजूनहि नॉमिनेटेड (सरकारनें नेमलेले) सभासद असें कागदोपत्रीं लिहावें लागतें आणि नवीन बिलाच्या आधारें परदेशचा कोणीहि भुरटा माणूस थोडे दिवस इकडे येऊन राहतांच प्रजाजन बनतो. पार्लमेंटचा कायदा, गोरे वसाहतवाले व अमेरिकन लोक यांना ब्रिटिश नागरिकत्वाचे अधिकार देतो व ते आम्हांला इकडे मान्य करावे लागतात, आणि वसाहतींत किंवा अमेरिकेंत आम्हांला ते अधिकार दिले दिले, नाहीं नाहीं असें होऊं शकतें; हा सर्व अन्याय अणे यांनीं स्पष्ट करून मांडला. यामुळें बिलावरील सिलेक्ट कमिटींत अणे यांची निवडणूक झाली असून ते कमिटींत चर्चेला योग्य वळण लावतील असें वाटतें. सरकारच्या मनांत हें बिल जागच्या जागीं झटपट रंगवून घ्यावयाचें होतें. परंतु स्वराज्य पक्षाच्या विरोधानें तो प्रसंग टळला.

* * *

बुधवारीं खासगी सभासदांचे ठराव चर्चेला निघण्याचा दिवस ठरला होता. पैकीं सिलहट जिल्हा बंगालला जोडण्यासंबंधाचा अणे यांचा ठराव त्यांनीं आसामी सभासदांकरितां पुढें आणला होता व स्वतः सरकार कांहीं एक अनुकूल योजना करीत असल्यामुळें सदर आसामी सभासदांच्या सांगण्यावरून त्यांनीं तो परत घेतला. दुसरा ठराव हाजी वाजीउद्दीन यांचा मद्यपानप्रतिबंधाचा होता. त्यावर डॉ. दत्त व श्री. केळकर यांनीं उपसूचना पाठविल्या होत्या. ठराव व उपसूचना यांत मद्यपानप्रतिबंधाचें ध्येय व 'लोकल ऑप्शन'ची तावडतोब मागणी या गोष्टी सारख्याच असून इतर गोष्टींत कांहीं फरक होता. ठराव व उपसूचना मिळून अनुकूल भाषणें झालीं. त्यांत केळकर, जम्नादास मेथा, व डॉ. दत्त यांचीं भाषणें महत्त्वाचीं झालीं. सर पुरुषोत्तमदास यांनींहि केळकर यांच्या उपसूचनेस पाठिंबा दिला. जम्नादास यांच्या भाषणांत उभयपक्षांचे बरेच खटके उडाले व सरकारवर तोंड टाकून बोलण्यांत जम्नादास

२४

यांनीं कांहीं बाकी ठेवली नाहीं. केळकर यांचीं विनोदी वर्णनें इंग्रज सभासदांना बरींच झोंबलीं. सरकारतर्फे सर बेसिल ब्लॅकेट यांचें भाषण बरेंच ढिलें झालें. आणि कर्नल क्रॉफर्ड यांनीं भाषण जोराचें केलें तरी त्यांनीं सावळागोंधळ घालण्याची जी उपसूचना पुढें आणली होती ती नियमाप्रमाणें अध्यक्षांनीं अग्राह्य ठरविल्यानें फुकट गेली. अखेर मतें घेण्याची वेळ आली तेव्हां केळकर यांची उपसूचना आपणांस अधिक मान्य आहे असें सांगून हाजी वाजीउद्दीन यांनीं आपला ठराव व डॉ. दत्त यांनीं आपली उपसूचना मागें घेतली आणि केळकर यांच्या उपसूचनेवर मतें घेण्यांत येऊन ६९ विरुद्ध ३९ मतांनीं ती मंजूर झाली. अनुकूल मतें देण्यांत स्वतंत्र सभासदहि कांहीं सामील झाले होते. प्रस्तुतच्या ठरावानें प्रांतिक सरकारांना मद्यपान-निषेधाच्या धोरणासंबंधानें एक नवा इशारा देण्यांत आला असून त्याचा प्रत्यक्ष कितपत उपयोग होतो हें पाहावें.

*　　*　　*

याच दिवशीं दुसरा महत्त्वाचा ठराव इस्माईलखान यांचें नांवावर निघालेला, लष्करी डॉक्टरांविषयींचा होता. ठरावाची मूळ कल्पना डॉ. लोहोकरे यांची असल्यामुळें तो मांडण्याचें मुख्य काम इस्माईलखान यांनीं लोहोकरे यांचेकडे दिलें व त्यांनीं तो चांगल्या रीतीनें मांडला. लष्करी वैद्यक खात्यांतील हल्लींची अनवस्था, तात्पुरते आय्. एम्. एस्. डॉक्टर कायम करण्यांत झालेला अन्याय, परीक्षेच्या अभावीं नेमणुका करण्यांत होणारा पक्षपात, शास्त्रीय शिक्षण, नोकरींत प्रवेश व प्रवेशानंतरची वागणूक या सर्व बाबतींत हिंदी लोकांविषयीं अनास्था, वगैरे मुद्दयांची चर्चा करून १९२६ सालापासून या मोठ्या हुद्दयाच्या डॉक्टरी परीक्षा इकडे व विलायतेंत अशा एकदम घेतल्या जाव्या, अशा अर्थाचें भाषण डॉ. लोहोकरे यांनीं केलें. त्याला लष्करी खात्याचे सेक्रेटरी मि. बर्डन व डॉ. कर्नल नीडहॅम यांनीं विरोध केला! पण स्टेट-सेक्रेटरी व हिंदुस्थान सरकार यांचे दरम्यानच या बाबतींत गैरसमज व विरोध असल्यामुळें या उभयतांना ठरावाला विरोध करण्यास कांहींच सबळ कारण दाखवितां आलें नाहीं व तो बहुमतानें मंजूर झाला. बंद झालेली आय्. एम्. एस्. परीक्षा लवकरच पुन्हा सुरू होईल असें सरकारी भाषणावरून दिसतें. पण त्याबरोबरच हिंदुस्थानांतहि परीक्षा घेण्याची सूचना मंजूर होईल असें मात्र वाटत नाहीं.

*　　*　　*

गृहमंत्री मुडिमन यांनीं संमतिवयाचें सरकारी बिल पहिल्या तारखेस प्रथम पुढें आणलें होतें व त्यावर काल रोजीं बरीच चर्चा होऊन वादास रंगहि चांगला चढला होता. वादाचा मुख्य मुद्दा म्हटला म्हणजे वयोमर्यादा बारा असावी कीं तेरा असावी हा होता. तरी त्याच्या अनुषंगानें सरकारनें धार्मिक गोष्टींत हात घालावा कीं नाहीं, शास्त्रांचा अर्थ कसा व कोणी करावयाचा वगैरे मुद्देहि निघाले. अर्थात् सामाजिक सुधारणेचा हा विषय १८९१ सालापासून चालत आलेला असल्यामुळें व बऱ्याच सभासदांना या विषयांत हिंदुसमाजाचे हितसंबंध गोंवले गेले आहेत असें वाटत असल्यामुळें पुष्कळ सभासदांनीं वादांत भाग घेतला व मतवैचित्र्यहि बरेंच दिसून आलें. सरकारनें धार्मिक विषयांत ढवळाढवळ बिलकूल करूं नये असें प्रतिपादन करणाऱ्या मद्रासच्या एम्. के. आचार्यांपासून तों कायद्यानें सामाजिक सुधारणा करून घेण्यास लोक जितके जास्त उत्सुक तितका त्यांच्या प्रगतीचा पारा अधिक चढलेला असें मत असणाऱ्या षण्मुखम् चेट्टी यांच्या दरम्यानच्या मतांच्या सर्व पायऱ्या वादांत दिसून आल्या. या बिलास पुष्टि देतांना केळकर यांनींहि भाषण करून सर्व स्थिति स्पष्ट करून मांडली व अशा सुधारणांच्या बाबतींत मध्यम मार्ग कसा परिणामीं हितकर व टिकाऊ ठरतो तें सांगितलें.

* * *

१८९१ सालच्या संमतिवयाच्या चळवळींत दिसण्यांत चळवळ सामाजिक सुधारणेविरुद्ध दिसली तरी तिचा खरा कटाक्ष त्या वेळच्या कायदेकौन्सिलांच्या असमाधानकारक स्थितीवरच होता. तेव्हां लोकनियुक्त असा एकहि सभासद कौन्सिलांत नव्हता. आज कायद्यानें लोकनियुक्त सभासदांचें बहुमत कौन्सिलांत आहे. हल्लींच्या सभासदांना आपण लोकप्रतिनिधी नाहीं असें म्हणतांच येत नाहीं. मतदारवर्ग अधिक मोठा झाल्यास हल्लींहून अधिक प्रातिनिधिक स्वरूपाचे लोक आले पाहिजेत व पुढें येतीलहि आणि एखाद्या विषयावर मतदारांना प्रतिनिधीनें स्पष्ट वचन दिलें असेल तर तें त्यानें पाळलेंच पाहिजे. पण अभावितपणें कोणताहि विषय पुढें आल्यास सामान्य लोकस्थिति व स्वतःची विवेचकबुद्धि यांना अनुलक्षून त्यानें सामाजिक, धार्मिक कोणत्याहि विषयांची कौन्सिलांत चर्चा केली पाहिजे व आपलें प्रांजल मत दिलें पाहिजे. तसेंच संमतिवय चौदा करण्याच्या विरुद्ध आपण मत कां दिलें, पण बाराची मर्यादा तेरापर्यंत वाढविण्यास आपण संमति कां देत आहों याचाहि केळकर

यांनीं खुलासा केला. श्री. बेळवी यांनीं सदर बिलास कसून विरोध केला. त्यांनीं सांगितलें कीं, मी १८९१ सालीं जो संमति बिलाचा कायदा झाला तेव्हां वयोमर्यादा दहापासून बारापर्यंतच आणली म्हणून त्यास पूर्णपणें अनुकूल होतों. पण हल्लीं ती बारापासून तेरापर्यंत वाढविण्यात येत आहे तें मला पसंत नाहीं, कारण खेडेगावांत अजून मागसलेलीच स्थिति आहे.

* * *

अखेर मतें घेतांना बेळवी, अणे, मुतालीक यांनीं बिलाविरुद्ध मतें दिलीं; केळकर यांनीं अनुकूल मत दिलें व लोहोकरे आणि अभ्यंकर यांनीं कोणत्याच बाजूस मत दिलें नाहीं. असा यादवीचा किंवा कृष्णार्जुन-युद्धाचा हा प्रकार फक्त महाराष्ट्रीय प्रतिनिधींतच झाला असें नाहीं तर प्रत्येक प्रतिनिधि-संघांत असाच गमतीचा प्रकार दृष्टीस पडला. बिलाला अनुकूल मत देणाऱ्या ८२ पैकीं ८१ लोकांना हें बिल आजच पुढें आणावें असा उत्साह होता असें नाहीं. कारण त्यांपैकीं एकानेंहि या बिलाची स्वतंत्र सूचना केलेली नव्हती. तथापि दुसऱ्या कोणी असलें बिल पुढें आणलें तरी प्रांजलपणें अभिप्राय देणें हेंच योग्य, मग तो अभिप्राय कोणास बरोबर वाटो, कोणास चुकीचा वाटो, या तत्त्वावरच मतें देण्यांत आलीं. सरकारनेंहि हा प्रश्न स्वतंत्र बुद्धीचा विषय म्हणून आपल्या सभासदांना हवीं तशीं मतें देण्यास मोकळीक ठेवली होती. या बिलावर उपसूचना पुष्कळ होत्या. तरी शेवटीं त्या सर्व नापास होऊन सरकारी बिल ८२ विरुद्ध ११ मतांनीं मंजूर झालें व विवाहित मुलींच्या बाबतींत वयाची अट तेरा व तद्व्यतिरिक्त इतरांस चौदा वर्षें असें ठरलें.

* * *

यानंतर लगेच कोळशाचें वर्गीकरण करण्याचें बिल व्यापारखात्याचे सभासद सर चार्लस इन्नेस यांनीं पुढें आणलें व तेंहि मंजूर झालें. तथापि आतांपर्यंत असेंब्लींत जें काम झालें त्यापेक्षां प्रत्यक्ष राजकीय सुधारणांच्या दृष्टीनें जास्त महत्त्वाचें असें काम येत्या आठवड्यांत व्हावयाचें आहे. कारण सोमवार व मंगळवार म्हणजे ७ व ८ हे दोन दिवस 'सुधारणा-चौकशी-कमिटी'च्या रिपोर्टाचा विचार होणार असून सरकारतर्फे होममेंबर मुडिमन हे स्वतः बहुमतवाल्यांच्या शिफारशी अंमलांत आणण्याचा ठराव पुढें मांडणार आहेत. स्वराज्य पक्ष व स्वतंत्र पक्ष या दोघांचा या बाबतींत काय धोरण स्वीकारावें याचा विचार चालू असून उभयपक्षांच्या मिळून एकच ठरावाची

बनावट या परस्पर वाटाघाटींतून निघेल असें वाटतें. सुदैवानें तसें झाल्यास अगदीं पहिल्या बैठकींतील 'राउंड टेबल कॉन्फरन्स'च्या ठरावावर जसा देखावा असेंब्लींत दृष्टीस पडला तसाच या वेळींहि दिसेल असें म्हणावयास हरकत नाहीं.

## पत्र नं. ४

ता. १०-९-२५

गेल्यां आठवड्यांतील मुख्य विषय म्हटला म्हणजे राजकीय सुधारणांच्या ठरावाची चर्चा. हा ठराव सरकारनेंच आपण होऊन पुढें मांडला होता. विलायत सरकारनें कबूलच केलें होतें कीं, असेंब्लीचें मत आम्ही घेऊं व मगच आमचा निकाल काय करावयाचा तो करूं. निकाल काय करावयाचा हें लॉर्ड रेडिंग विलायतेस जाऊन आधींच ठरवून आलेले आहेत व असेंब्ली मत काय देणार याचाहि अंदाज उभयसरकारांना नव्हता असेंहि नाहीं. पण सगळ्या गोष्टींत शास्त्र म्हणून आहे. आणि या बाबतींतलें शास्त्र असें कीं, काय करावयाचें हें सरकारनें मनाशीं ठरवावें, पण लोकमत काय आहे हें समजून घेण्याचें आमचें अडलें आहे असें तोंडानें म्हणावें. तो शास्त्राचा विधि या आठवड्यांत उरकला. आतां फलश्रुति जेव्हां प्रकट होईल तेव्हां पाहतां येईल.

* * *

सुधारणा अपुऱ्या आहेत हें सुधारणांचा कायदा झाल्यापासूनच लोकांचें म्हणणें सुरू आहे. सरकारी इमारतखात्यांत एका हातानें काम पुरें झाल्याचें सर्टिफिकेट द्यावें व दुसऱ्या हातानें त्याच इमारतीच्या रिपेरीचा हुकूम लिहावा तसा प्रकार या सुधारणांचा झाला आहे. जीं नवीं कौन्सिलें झालीं त्यांवर कांहींनीं बहिष्कार घातला. पण जे त्यांत शिरले त्यांच्यांतल्याच एकानें असा ठराव मांडला कीं, स्वराज्यसंस्था देण्याची ताबडतोब तजवीज व्हावी. त्यावर तेव्हांचे होममेंबर सर विल्यम व्हिन्सेंट यांनीं अशी उपसूचना सुचवून, मांडून घेऊन, मान्य केली कीं, कायद्यांत १९२९ सालीं कमिशन नेमून पुढच्या हप्त्याविषयीं चौकशी व्हावी असें लिहिलें असलें तरी ती चौकशी त्याहून आधीं केली जावी. पण या दुरुस्त ठरावाचाहि कांहीं अंमल झाला नाहीं. गतवर्षीं स्वराज्य पक्ष असेंब्लींत आल्यावर या प्रश्नास पुनः चालन

मिळालें. रंगाचार्य यांच्या ठरावावर नेहरू यांची उपसूचना मंजूर झाली, व त्याचाच परिणाम मुडिमन कमिटीची नेमणूक होय.

*   *   *

कमिटींत कोण होते हें वाचकांस माहीतच आहे, व अखेर सरकारपक्षीय सभासदांचें बहुमत व बिनसरकारी सभासदांचें अल्पमत अशा दोघांचे दोन रिपोर्ट झाले. सरकार पक्षांतील सर महमद शफी यांनीं बहुमतवाल्यांच्या रिपोर्टावर तेव्हां सही केली. पण तोंडांवरील नोकरीचा बोळा निघतांच त्यांनीं उलट मत प्रकट केलें व ज्याला बहुमतवाल्यांचा रिपोर्ट असें नांव मिळालें तो खरोखर अल्पमतवाल्यांचा रिपोर्ट असें करून सोडलें. कॉंग्रेसच्या कायदेभंग कमिटीच्या रिपोर्टांतहि पूर्वीं अशीच गोष्ट शेठ छोटानी यांच्या मतामुळें झाली होती ही गोष्ट कित्येकांच्या स्मरणांत असेलच. असो. सर महंमद शफी यांचें मतहि या कमिशनच्या भिंतींत सांधजोड करणारी एकच वीट होती ती निखळून गेल्यामुळें परकी लोकांचें एक मत व हिंदी लोकांचें दुसरें मत अशी भेग या भिंतींत खालपासून वरपर्यंत पडली. राहतां राहिले बरद्वानचे महाराज ! पण ते बिनपगारी सरकारी नोकरासारखे असल्यामुळें त्यांचा उल्लेख न केलेलाच बरा.

*   *   *

असो. मुडिमन-कमिटीच्या रिपोर्टांत अशा रीतीनें भेग पडली खरी, पण असेंब्लींतील दोन पक्षांतहि अशीच भेग पडणार कीं काय असें वाटत होतें, पण सुदैवानें या दोन पक्षांची चांगलीच सांधजोड झाली. गतवर्षीं या विषयावर चर्चा झाली तेव्हां संयुक्त नॅशनॅलिस्ट पार्टी तरी होती. त्यानंतर अलीकडे जिना, नेहरू वगैरे पुढाऱ्यांची जाहीर रीतीनें एक प्रकारची बाचाबाची होऊन स्वतंत्र व स्वराज्य असे दोन पक्ष अगदीं अलग राहून काम करीत होते. विषय महत्त्वाचा आणि स्वतंत्र पक्षांतल्या लोकांनीं अल्पमतवाल्यांचा रिपोर्ट तयार केलेला. अशा स्थितींत या दोन पक्षांची एकवाक्यता कशी होणार हा मोठा प्रश्नच येऊन पडला होता. पण तो फार चांगल्या रीतीनें सुटला ही आनंदाची गोष्ट होय. उभयपक्षांतील पुढाऱ्यांच्या बैठकी चार दिवस एकसारख्या होत होत्या. पण दुखणें बरें व्हावयाचें असलें म्हणजे प्रत्येक गोष्ट पथ्यावरच पडते, तशीच स्थिति झाली. तापलेले दोन लोखंडाचे तुकडे सहज सांधले गेले.

*   *   *

स्वराज्य पक्षानें आपल्या धोरणांत यथाकाल किंचित् फरक केला तसाच स्वतंत्र पक्षानेंहि केला म्हणून कोणी कोणास नांवें ठेवण्याचें कारण उरलें नाहीं. केवळ राउंड टेबल कॉन्फरन्सची मागणी व अस्सल देशी थाटाचें स्वराज्य याविषयीं दासबाबूंची कल्पना या दोन गोष्टी स्वराज्य पक्षानें सोडल्या; व झाल्या एवढ्या सुधारणांत कसें तरी समाधान तूर्त मानून घ्यावें व मग पुढें पाहावें, ही विचारसरणी सोडून देऊन स्वतंत्र पक्षानें जणूं काय निर्वाणीचा खलिता अशा स्वरूपाच्या मागण्या मागण्यास तयारी दाखविली. अशा रीतीनें दोन पक्ष एक झाले ही गोष्ट अर्थातच सरकारला आवडली नाहीं. आणि ही एकी खरी नव्हे, असा टोमणा मारून स्वतंत्र पक्षाला खजिल करण्याचाहि प्रयत्न मुडिमन यांनीं आपल्या भाषणांत केला. पण त्याचा फारसा उपयोग झाला नाहीं.

* * *

मुडिमनसाहेबांच्या ठरावावर कोणी दोघां-चौघांनीं उपसूचना पाठविल्या होत्या. पण त्या केवळ नांवाला असून त्यांनीं त्या पुढेंहि आणल्या नाहींत. एकच लहानसा ठराव व त्यावर नेहरू यांची एकच उपसूचना एवढ्यावर दोन दिवस भरभक्कम वाद झाला. बोलूं इच्छिणाऱ्या लोकांची इतकी गर्दी झाली कीं, स्वराज्य पक्षाची खास सभा भरवून चिठ्या टाकून नांवें काढावीं लागलीं. पंधरा-वीस मिनिटांपेक्षां अधिक फारसें कोणास बोलूं दिलें नाहीं. इतके बोलणारे झाल्यावर या संकीर्ण युद्धांत हास्यास्पदापासून उदात्तापर्यंत सर्व प्रकार पाहावयास सांपडले यांत नवल नाहीं. पं. नेहरू यांचें भाषण एक तास वीस मिनिटें झालें. पण तें सर्व त्यांनीं निबंधासारखें वाचलें. पं. मदन मोहन यांनीं अगदीं शेवटीं बरेंच थोडक्यांत पण मोठ्या कळकळीचें भाषण केलें. पं. मदन मोहन व बॅ. जिना हे बोलण्याचे बाबतींत उत्तर-दक्षिण ध्रुवासारखे आहेत. मदन मोहन यांचें बोलणें पंजाबमेलसारखें अस्खलित, पण एकेरी आवाज, सृष्टीच्या उत्पत्तीपासून जगाचा इतिहास सांगण्याची सवय व भाषण किती वेळ चालेल काय कीं, अशा प्रकारची ऐकणाराच्या मनांतील भीति यांच्यामुळें परिणाम करण्यास थोडें कमीच पडतें.

* * *

उलट बॅ. जिना यांचें भाषण निरनिराळ्या चालींची कवाईत दाखविणाऱ्या जिलेबीच्या घोड्याच्या नाचासारखें असतें. प्रत्येक शब्द तुटक, स्पष्ट व एखाद्या

नटानें म्हणावा तसा त्यांचा निघतो. मागून वाचलें तर भाषण अगदीं रूक्ष, त्यांत विद्वत्ता किंवा विनोद यांचा मागमूसहि लागावयाचा नाहीं. पण त्यांच्या भाषणाचे वेळीं सभागृह तटस्थ राहतें. तोंड टाकून बोलणारे पटेल तोंड बांधून घेऊन खुर्चीवर बसले होते! पण त्यांची जागा चमनलाल यांनीं भरून काढली. किंबहुना, इंग्रज लोक हे हिंदुस्थानचे ट्रस्टी नसून चोर व दरोडेखोर आहेत असे शब्द वापरून पटेल यांच्यावरहि त्यांनीं ताण केली! बोलणाऱ्यांच्या सोडतींत महाराष्ट्रीयांपैकीं अणे व अभ्यंकर यांचींच तेवढीं नांवें निघालीं व त्या दोघांनीं महाराष्ट्रीयांच्या मनांत असतें तेंच सरकारास कळविलें.

*     *     *

नेमस्त पक्षातर्फे झालेल्या भाषणांत सर शिवस्वामी अय्यर व रंगाचार्य यांचीं भाषणें लोकांना विशेष आवडण्याचें कारण ते नेमस्त असतां त्यांनीं सरकारचा अधिक्षेप एक प्रकारच्या ममतेनें पण विशेष कळकळीनें केला. सर शिवस्वामी हे अगदीं स्वतंत्र वृत्तीचे असे मानले जातात. सरकारच्या दृष्टीनें प्रत्येक गोष्टीकडे पाहण्याची त्यांची प्रवृत्ति. पण बाहेर ऊन पडलें म्हणजे घराच्या खोलींतील थर्मामिटरचाहि पारा थोडासा चढतोच, तशी स्थिति स्वराज्य पक्षाच्या सान्निध्यानें यांची कांहींशी झाली आहे. कोणत्याहि ठरावावर मतांची नोंद होतांना नेमस्तपक्षीय सभासद 'लॉबीं'त किती आले अशी पृच्छा झाली असतां सर शिवस्वामीहि आले म्हणजे गणती तेथेंच पुरी करण्याची पद्धत पडलेली आहे. त्यांनीं सरकारविरुद्ध मत दिलें म्हणजे खुशाल समजावें कीं, सरकारच्या बाजूला बरी म्हणण्यासारखी एकहि गोष्ट आतां उरली नाहीं. म्हणूनच आपल्या बाजूला त्यांचें मत पडणें हा स्वराज्य पक्षाला सरकारवर मिळविलेला विजय वाटतो. पं. नेहरू व सर शिवस्वामी यांची विचारसरणी सामान्यतः जुळणारी नव्हे; पण या उपसूचनेच्या बाबतींत ती जुळली. पूर्वी लखनौ कॉंग्रेसमध्यें स्वराज्यघटनेचा ठराव एकमतानें झाला, त्यानंतर आज नऊ वर्षांनीं इतक्या एकमतानें स्वराज्यघटनेच्या मागणीचा असेंब्लींतला परवांचा हा ठराव झाला असें म्हणण्यास हरकत नाहीं.

*     *     *

बुधवारचा सर्व दिवस रंगाचार्य यांच्या एकट्याच्या बिलानें खाल्ला. जमावाचा दंगा झाला असतां लोकांवर क्वचित् प्रसंगीं पोलीस किंवा लष्करी लोक यांना गोळीबार करावा लागतो. अशा वेळीं हल्लीं जी कांहींच खबरदारी

घेण्यांत येत नाहीं ती यावी, मॅजिस्ट्रेटचा हुकूम घेतल्याशिवाय गोळीबार करूं नये, तो करावयाचा झाला तरी आधीं लोकांना समजेशी ताकीद द्यावी, गोळीबार जरूरीपुरताच करावा, अधिक करूं नये, झाल्या प्रकाराचा ताबडतोब वरिष्ठांकडे रिपोर्ट करावा आणि योग्य खबरदारी न घेतां गोळीबार झाल्यानें कोणाचे जीव गेले तर त्यांच्या वारसांना गोळी घालणाऱ्या अधिकाऱ्यांवर किंवा शिपायावर सरकारच्या परवानगीची जरूरी न राहतां खटला करतां यावा अशा अर्थाचें हें बिल आहे. तें विचारास निघालें तेव्हां नवीन सेनाधिपति फील्ड-मार्शल सर विल्यम बर्डवड यांनीं असेंब्लींत प्रथमच भाषण केलें. त्यांची भाषणपद्धति वाखाणण्यासारखी होती, पण भाषणांत बिलाला एकजात विरोधच होता. सर्व दिवसभर वादविवाद होऊन बिल मंजूर झालें. पण लगेच मनाला वाटूं लागलें, कीं लोकपक्षाचा हा विजय असला तरी, कौन्सिल ऑफ स्टेटरूपी समंधाला हा एक नवा बळी निर्माण झाला याहून या विजयाचें महत्त्व नाहीं!

* * *

कौन्सिल ऑफ स्टेटची पहिली पांच वर्षांची मुदत संपून नव्या निवडणुकी बहुधा येत्या नोव्हेंबरांत होतील. हा प्रसंग साधून स्वराज्य पक्षाचा प्रवेश या कौन्सिलमध्यें करावा अशी इच्छा स्वराज्य पक्षाला सहजच झाली आहे. तथापि ती पुरी होणें ही गोष्टहि तितकीच अवघड आहे. प्रांतिक कायदेकौन्सिलें किंवा असेंब्ली यांच्यापेक्षां कौन्सिल ऑफ स्टेटची मतदारी उच्च दर्जाची जाणून-बुजून ठेवण्यांत आली आहे. तेथें राजेरजवाडे, श्रीमान् व्यापारी, मोठे जमीनदार यांचाच भरणा विशेष. तेथील एकांतवास व खानदानी ही थेट 'चिनी बादशहाच्या थडग्या'सारखी आहे. यामुळें सदर कौन्सिलांत शिरण्याचा सहसा कोणास उत्साहच वाटत नाहीं. तथापि या कौन्सिलांत स्वराज्यपक्षीय सभासद शिरविण्याचा प्रयत्न केल्यास तेथेंहि बरीचशी चळवळ होऊं शकेल म्हणून ती करून पाहावी असें स्वराज्य पक्षास वाटूं लागलें आहे. आणि त्याकरितां प्रत्येक प्रांतांतून मिळतील तेवढे तरी स्वराज्यपक्षीय सभासद कौन्सिल ऑफ स्टेटमध्यें पाठवून पाहावेत असें वाटणें स्वाभाविक आहे. मद्रास इलाख्यांत कौन्सिल ऑफ स्टेटच्या जितक्या जागा तितके स्वराज्य-पक्षीय उमेदवार उभे करण्यांत आले आहेत. पण मुंबई इलाख्यांत उभा राहील व निवडून येईल असा स्वराज्य पक्षाचा म्हणवून घेणारा उमेदवार मिळणें कठीण झालें आहे. त्याकरितां स्वराज्य पक्षाच्या सभेनें न. चिं. केळकर

यांचें नांव मंजूर केलें असून पाटणा येथें भरणाऱ्या स्वराज्य पक्षाच्या सभेंत सर्व प्रांतांच्या उमेदवारांचीं नांवें निश्चित केलीं जातील.

* * *

कौन्सिल ऑफ स्टेटचा ताज्यांतला ताजा पराक्रम नुकताच गेल्या आठवड्यांत घडला. दडपशाही कायदे रद्द करण्याचें बिल असेंब्लींत मंजूर झालें होतें. पण त्याला कौन्सिल ऑफ स्टेटचीहि मंजुरी पाहिजे, याकरितां तें तेथें मांडण्याची सूचना मद्रासचे स्वराज्यपक्षीय सभासद मि. रामदास यांनीं केली. अशा बिलाला स्वराज्य पक्षीयांशिवाय दुसरा पुरस्कर्ता किंवा पुरोहित कोण मिळणार ? आणि पुरस्कर्तृत्व तर राहिलेंच, पण हें बिल पुढें आलें तेव्हां सर माणेकजी दादाभाईंच काय पण सर दिनशा वाच्छा यांनींहि विरोध केला ! पूर्वीं जहालांना शिव्या देणारे पण स्वतः सरकारविरुद्ध निखाऱ्यासारखी जळजळीत भाषा बोलणारे वाच्छा आणि हल्लींचे सरकारतर्फे लोकपक्षावर भडिमार करणारे वाच्छा पाहिले म्हणजे फोटोग्राफरनें एकाच कांचेवर चुकून दोन-तीन फोटो घेतल्यानें जसें विचित्र चित्र निघेल, तसेंच वाच्छा यांच्या आयुष्यक्रमाचेंहि झालें आहे. सर माणेकजी दादाभाई यांच्याविषयीं बोलावयास नकोच. त्यांची आणि दादासाहेब खापर्डे व दादासाहेब करंदाकर यांची या बिलावरील चर्चेंत बरीच बाचाबाची झाली. दोघांहि दादासाहेबांनीं उघड सांगितलें कीं, लोकपक्षाचें खरें प्रतिनिधित्व असेंब्लीकडे आहे; पण आतां या गोष्टीची लाज कौन्सिल ऑफ स्टेटच्या मतदारांना वाटली पाहिजे. या मतदारसंघांत श्रीमान व खानदानीच्या लोकांचा भरणा कांहीं असला तरी नव्या विचाराचे लोक त्यांत मुळींच नाहींत असें नाहीं. उदाहरणार्थ, म्युनिसिपालिट्या, लोकल बोर्डें यांचे अध्यक्ष-उपाध्यक्ष, कायदेकौन्सिलांचे सभासद, युनिव्हर्सिटीचे फेलो, जातइनामांचे धनी व निवळ रयतवारीचे मोठे खातेदार असे लोक हल्लीं या मतदारसंघांत आधींच कांहीं आहेत व वरीलपैकीं कांहीं लोकांची संख्या दिवसेंदिवस वाढणारी आहे. अर्थात् कौन्सिल ऑफ स्टेट हें असें असणें इष्ट नसलें तरी त्यांत लोकमताचा प्रवाह वाहूं लागणें मतदारसंघानें मनावर घेतल्यास अशक्य नाहीं. म्हणून ती खटपट होणें जरूर आहे व त्याकरितांच स्वराज्यपक्षीय उमेदवार पुढें करण्यांत येत आहेत.

* * *

गुरुवारचा सर्व दिवस परदेशी कागदावरील संरक्षक जकातीच्या प्रश्नाचा विचार करण्यांत गेला. टारीफ बोर्डाच्या शिफारशीवरून विशेष प्रकारच्या परदेशी कागदावर दर पौंडास एक आणा याप्रमाणें आयात जकात बसविण्याविषयीं सर चार्लस इन्नेस यांनीं ठराव व बिल पुढें मांडलें होतें. एका दृष्टीनें ही जकात थोडी भारीच होते. तथापि टारीफ बोर्डाचा रिपोर्ट पाहतां कांहीं वर्षें इतकी जकात ठेवल्याशिवाय हल्लीं चालू असलेल्या देशी कागदाच्या गिरण्या टिकणार नाहींत. लिहिण्याचे कागद व उंची प्रतीचे कागद हे थोडेसे महाग होतील, परंतु वर्तमानपत्रांचा कागद महाग होण्याचें कारण नाहीं. सदर ठरावास मद्रासचे कांहीं सभासद यांनीं व मुंबईकडील केळकर व दुमाशिया यांनीं कांहीं उपसूचना पाठविल्या होत्या. पैकीं दुमाशिया यांची उंची कॅलेंडर-पेपर जकातींतून मुक्त करण्याची उपसूचना मंजूर झाली. परंतु बाबूंच्या जोडीनें गवती कागदाचाहि समावेश ठरावाच्या व बिलाच्या शब्दांत करावा ही केळकर यांची उपसूचना आणि देशी गिरण्यांना कर्ज वगैरे देण्याविषयीं फेरविचार करण्याची रंगास्वामी अय्यंगार यांची उपसूचना नामंजूर झाली. जोशी यांची मजूरवर्गासंबंधाची यांतच घुसडून दिलेली उपसूचना सोमवारीं विचाराला निघेल, पण ती मंजूर होणार नाहीं. आणि ठराव व बिल हीं अखेर त्या दिवशीं मंजूर होतील.

* * *

पुढील आठवड्यांत दोनतीन दिवसच काम चालणार. पैकीं ता. १६ रोजीं खासगी सभासदांचे ठराव चर्चेला निघतील. त्यांत सर पुरुषोत्तमदास यांचा देशी गिरण्यांवरील जकातीचा, श्यामलाल नेहरू यांचा निवडणुकीच्या उमेदवारांवरील नालायकीचीं कलमें काढून टाकण्याचा, राजकीय कैद्यांची बंधमुक्तता करण्याविषयीं केळकर यांचा व तुरुंगांच्या सुधारणेसंबंधाचा सादिक हसन यांचा असे ठराव मुख्य आहेत. पण पहिल्या एकदोन ठरावांतच सगळा दिवस निघून जाईल असें दिसतें. पण या खेपेस खासगी ठरावापेक्षां खासगी बिलांचीच दुर्दशा अधिक झाली. पांचपंचवीस खासगी बिलें दोन दिवस कार्यक्रमपत्रिकेवर आलीं असतां, जुन्या चालू बिलांनींच सर्व वेळ खाल्ल्यामुळें नवें बिल एकहि प्रविष्ट झालें नाहीं. पिनल कोडाचें १२४ अ कलम व क्रि. प्रो. कोडाचें १४४ कलम यासंबंधाचीं बिलें पहिल्या दिवशीं शेवटच्या अनुक्रमांत होतीं म्हणून निघालीं नाहींतच. पण गेल्या मंगळवारकरितां काढलेल्या

सोडतींत केळकर यांच्या नांवें या बिलांना पहिलें स्थान मिळालें असतांहि तो सर्व वेळ इतर बिलांनींच घेतला. यामुळें हीं सर्व बिलें आतां पुनः पुढील जानेवारींत सोडतीच्या भट्टींत घालावीं लागतील. चालू बैठक संपत आल्यामुळें निरनिराळ्या कमिट्यांतील पोट-निवडणुका करून घेण्यांत आल्या. मि. कोक केळकर यांच्या नेमणुका रेल्वे फायनॅन्स कमिटीवर एकमतानें झाल्या व गोस्वामी यांची निवडणूक परकी भांडवलाच्या कमिटीवर झाली. कोर्टाच्या बेअदबीसंबंधीं बिल सिलेक्ट कमिटींत इतकें दुरुस्त केलें गेलें कीं, सरकार तें चालू बैठकींत पुढें आणीलसें वाटत नाहीं.

## पत्र नं. ५

ता. १७ ९-२५

चालू आठवडा हाच या बैठकीचा शेवटचा. यांत पहिला विषय कागदावरील जकातीचा. हल्लीं कागदाच्या गिरण्यांना माल तयार करण्यास खर्च अधिक पडूं लागला आहे; यामुळें निदान आयात जकातीच्या रूपानें तरी धंद्याला कांहीं मदत मिळावी म्हणून कारखानदारांनीं अर्ज केला. टारीफ बोर्डानें साक्षीपुरावा घेऊन चौकशी केली व अर्ज मंजूर केला. टारीफ बोर्डाच्या शिफारशींत दोन कलमें होतीं. आयात मालावर ( हलक्या प्रतीचा कागद वगळून ) दरपौंडास एक आण्याप्रमाणें जादा जकात बसवावी व बांबूच्या रांध्याचा कागद करणाऱ्या कंपनीला भांडवल कर्जाऊ द्यावें. पैकीं फक्त पहिली सूचना सरकारनें मान्य करून त्याप्रमाणें ठराव व बिल पुढें आणलें व तें पासहि झालें.

* * *

या विषयावरील चर्चेंत वादाचे दोन मुद्दे निघाले; एक, ठरावांत व बिलांत बांबूच्या रांध्याचा जसा उल्लेख केला तसाच गवताचाहि करावा; कारण इकडे गवताचाहि कागद करण्याचा प्रघात आहे. वरील अर्थाची उपसूचना केळकर यांनीं मांडली. टारीफ बोर्डाची शिफारस किंचित् एककल्ली आहे व गवतापासून कागद करतां येण्याविषयीं अद्यापि निराशा झालेली नाहीं; म्हणून बांबूबरोबर गवत हाहि शब्द घालावा किंवा कोणताच शब्द घालूं नये असें ते म्हणाले. पण ही उपसूचना ४० विरुद्ध ४९ मतांनीं नामंजूर झाली. दुसरी उपसूचना, सुपरकॅलेंडर म्हणजे हलक्या प्रतीच्या पण तजेलदार कागदावर ही

वाढती जकात न घेण्याविषयीं. ती आदल्या दिवशीं मुंबईचे दुमाशिया यांच्या सूचनेवरून सरकारनें मंजूर केली. परंतु त्या गोष्टीचा लगेच बाहेर गवगवा झाला व चोहोंकडून तारा आल्यावरून तें कलम वगळून पूर्वसंकल्पाप्रमाणेंच बिल मंजूर झालें ! संरक्षक जकातीचा हा प्रश्न असल्यामुळें हिंदी मजुरांच्या दृष्टीनें ना. म. जोशी यांनीं व देशी भांडवलाच्या दृष्टीनें डॉ. लोहोकरे यांनीं उपसूचना आणल्या होत्या, पण त्या नामंजूर झाल्या. कागदाप्रमाणें जमशेटपूर येथील पोलादाच्या कारखान्याला मदत चालू ठेवण्याचाहि ठराव यापुढेंच आला व या बाबतींत आतां मतभेद उरला नसल्यामुळें तो सहज मंजूर झाला.

* * *

यानंतर वादग्रस्त झालेला असा विषय म्हटला म्हणजे रेल्वे खात्याचे हिशेब व हिशेबतपासणी हा होय. गतवर्षीं रेल्वेचा जमाखर्च व इतर सर्व सरकारी जमाखर्च हे वेगवेगळे करण्यांत आले. त्यावर आतां रेल्वे खात्यानें अशी योजना केली आहे कीं, रेल्वेचे हिशेब खात्याच्या अधिकाऱ्यानें स्वतंत्र ठेवावेत इतकेंच नव्हे, तर खर्च करण्याच्या आधीं जी तपासणी लागते तीहि खात्यांतील हिशेबनिसांनींच करावी, मात्र स्टेट-सेक्रेटरीच्यातर्फे जी तपासणी व्हावी लागते तिच्याकरितां जी वेगळी व्यवस्था करावी लागेल तिचा खर्च रेल्वेनें द्यावा. हा विषय वादग्रस्त होण्याचें कारण असें कीं, हिशेब खातें व तपासणी खातें यांचा याविषयीं मतभेद असल्याची बातमी बाहेर फुटली होती व रेल्वे फायनॅन्स-कमिटींतील लोकांनीं मागितलेले या विषयाचे कागद देण्याचें सरकारनें नाकारलें. यामुळें संशय दुणावला व सर्व कागद पाहून पुरी चर्चा होईपर्यंत चार-पांच महिने हा विषय पुढें ढकलावा अशी उपसूचना केळकर यांनीं मांडली व नियोगी यांनीं तिला जोराचा पाठिंबा दिला. परंतु रेल्वे फायनॅन्स कमिशनर यांनीं सभासदांत हिंडून बरीच खटपट केल्यामुळें व सर बेसिल ब्लॅकेट यांनीं जरूर ते कागद दाखविण्याची तयारी दर्शविल्यामुळें उपसूचना नामंजूर झाली. हिशेबी नोकर रेल्वे एजंटाचे हाताखालीं राहण्याऐवजीं फायनॅन्स कमिशनरच्या हाताखालीं ते राहावेत ही डॉ. लोहोकरे यांची उपसूचना सरकारनें मान्य केली. नवीन योजनेला ईस्ट इंडिया व औध-रोहिलखंड या रेल्वेपुरता सालीना तीन-चार लक्ष रुपये खर्च येणार आहे व पुढें ही व्यवस्था सर्व सरकारी रेल्वेंना लागू झाल्यास हा खर्च पंधरा-वीस लक्षांपर्यंत जाईल. शिवाय फायनॅन्स कमिशनर व रेल्वे एजंट हे एकाच शरिराचे डावेउजवे

ह्यात असल्यासारखें. यामुळें हिशेबतपासणी जितकी स्वतंत्र व्हावी तितकी न होतां खात्यांतील गैरवाजवी खर्चाला आळा बसणार नाहीं, ही तक्रार शिल्लकच राहणार. प्रयोगाअंतीं काय आढळेल तें खरें!

यानंतर लागोपाठ दोन दिवसांत सरकारचा थोड्या मतांनींच पण ज्यांत पराभव झाला अशा बाबी चार निघाल्या. फौजदारी कायद्याचें कलम १०९ याप्रमाणें उडाणटप्पू ठरलेल्या मनुष्याला जामीन न मिळाला तर साधी कैद देण्याचा प्रघात आहे, पण हे लोक तुरुंगांत फुकट खातात या विचारानें त्यांना सक्तमजुरी देतां यावी अशी इच्छा धरून सरकारनें एक बिल पुढें आणलें होतें! पण दिवाणबहादुर रंगाचार्य वगैरे लोकांनीं त्याला कसून विरोध केल्यामुळें एकच मतानें का होईना पण सरकारचा पराभव झाला. नाशिक येथें स्टँप वगैरे छापविण्याकरितां नवा कारखाना उभारणार, त्याच्या इमारती वगैरेकरितां लक्षावधि रुपये खर्च होणार, ते चालू खर्चांत घालावेत किंवा कालांतरानें फेड करण्याच्या कर्जाचे खातीं घालावेत या प्रश्नावर मतभेद होऊन ते चालू खातीं घालण्याचा सरकारचा डाव फसला. हा प्रश्न मोठ्या तत्त्वाचा असून त्याचें भांडण जम्नादास मेहता यांनीं गेल्या बजेटापासून उकरून काढलें आहे, व हल्लींच्या या प्रकरणामुळें पुढील बजेटाचे वेळीं त्याला बराच जोर येईल. तिसरी बाब शामलाल नेहरू यांच्या ठरावाची. सहा महिन्यांच्या शिक्षेचा गुन्हा घडल्यास कौन्सिल-उमेदवारीला मनुष्य नालायक ठरावा असें पूर्वींचें कलम होतें. ही मुदत एक वर्षावर हल्लीं नेण्यांत आली आहे. तथापि कैदेमुळें कौन्सिल-उमेदवारीला नालायक ठरण्याचें हें तत्त्वच मुळांतून खुडून काढावें असा या ठरावाचा आशय होता, व बऱ्याच चर्चेनंतर रंगास्वामी अय्यंगार यांच्या उपसूचनेसह तो मंजूर झाला. या विषयाच्या चर्चेंत काजीमअल्ली नांवाच्या ऐंशी वर्षें वयाच्या सभासदानें आपणावर गुरखे शिपायांना मारल्याचा खोटा आरोप येऊन कैद कशी झाली याची हकीकत सांगितली ती फार परिणामकारक झाली. शेवटला मतभेदाचा व पराभवाचा विषय म्हटला म्हणजे गिरण्यांवरील एक्साईज जकातीचा. या बाबतींत सर पुरुषोत्तमदास, दुमाशिया व कस्तुरभाई यांचीं जोराचीं भाषणें झालीं. नारायणराव जोशी यांनीं ठरावास हरकत घेतली नाहीं; मात्र गिरण्यांची स्थिति खालावली असल्यास तो दोष गिरणीवाल्यांकडेच येतो, असें प्रतिपादन करून त्या लोकांवर बरेच कोरडे ओढले. सरकारतर्फे समर्थन करण्याचें काम किती अवघड होऊन

बसलें आहे हें सर बेसिल ब्लॅकेट यांच्या लटपटीत भाषणावरून दिसून आलें. यानंतर कैदखान्यांच्या सुधारणेसंबंधानें सादिक हसन यांचा आणि राजकीय कैदी सोडण्याविषयीं केळकर यांचा ठराव हे पुढें यावयाचे होते. पण पहिल्या दोन ठरावांनींच सहा वाजेपर्यंत सर्व वेळ घेतल्यामुळें ते ठराव त्यांना मांडतां आले नाहींत.

*　　　*　　　*

कौन्सिल ऑफ स्टेटचें काम ता. १६ रोजीं खलास झालें. व दुसऱ्या दिवशीं व्हाइसरॉयसाबांनीं स्वतः हजर राहून ही सभा यथाविधि बरखास्त केली. सभेनें फार चांगलें काम केलें, म्हणजे सरकारला बरीच मदत केली, अशा अर्थाचें सर्टिफिकेट सर नरसिंह शर्मा व खुद्द व्हाइसरॉय यांनीं कौन्सिल ऑफ स्टेटला दिलें हें सांगावयास नकोच. पण पंडित नेहरू यांची उपसूचना असेंब्लींत स्वराज्य व स्वतंत्र पक्षांनीं एकदिल होऊन मंजूर केली असतां तिला या कौन्सिलानें मूठमाती दिली हा त्याच्या पापाच्या रांजणांत शेवटचाच खडा होय. हें कौन्सिल पांच वर्षें पुरीं झाल्यानें आपल्या मरणानेंच मेलें हें खरें. तथापि आतां त्याच्या जुन्या चारित्र्यापेक्षां भावी चारित्र्याकडेच लोकांचें लक्ष अधिक लागणार. या कौन्सिलांत अगदीं प्रथम लोकपक्षाची बाजू मांडणारा एखाददुसरा इसम असे, ती संख्या अखेर वाढतां वाढतां जेमतेम पांचांपर्यंत आली होती. पण पुढील पांच वर्षांकरितां होणाऱ्या निवडणुकींत ही स्थिति बदलून तेथें स्वराज्य पक्षाचे किंवा स्वराज्य पक्षासारखाच बिनमुर्वतखोर विरोध करणारे दहापंधरा सभासद सर्व प्रांतांतील मिळून यावेत व स्वराज्यपक्षाचा एक आखाडा तेथेंहि पडावा अशा इच्छेनें सर्व प्रांतांतील पुढाऱ्यांची खटपट सुरू झाली आहे. मुंबई इलाख्यातर्फे मात्र स्वराजिस्ट उमेदवार उभा करण्याची पंचाईत पडलेली होती. ती दूर करण्याचा मार्ग म्हणून स्वराज्य पक्षातर्फे केळकर यांचें नांव उमेदवार म्हणून जाहीर झालें आहे. तथापि या सर्व गोष्टींचा पुरा विचार पाटणा येथें ता. २३ रोजीं व्हावयाचा आहे. इतर प्रांतांतील उमेदवारांच्या याद्यांचाहि विचार तेथेंच होईल.

*　　　*　　　*

वरील मजकूर लिहून झाल्यानंतर फार महत्त्वाची अशी एक उलाढाल येथें झाली व तिला अपेक्षेप्रमाणें स्वरूप आल्यास एक प्रकारची क्रांतीच घडून

आल्यासारखी होईल. सुधारणांसंबंधाची योजना किंवा मागणी असेंब्लींतील उभयपक्षांनीं एकदिलानें मंजूर केली. पण ही मागणी सर्व देशाला मान्य आहे कशावरून ? शिवाय कौन्सिल ऑफ स्टेटनें ती फेटाळूनच लावली ! असें गुर्मीखोर बेजबाबदारीचें उत्तर सरकारकडून मिळण्याचा संभव लक्षांत घेऊन त्याला आपण आपलें प्रत्युत्तर काय द्यावें याचा विचार उभयपक्षांचे पुढारी करीत असून त्यांनीं कांहीं विचारहि मनाशीं ठरविला आहे परंतु तें निश्चित ठरून सिद्धीस जाईपर्यंत तोंडाची वाफ दवडण्यांत अर्थ नाहीं, म्हणून त्या-विषयीं तूर्त कांहीं लिहीत नाहीं. कदाचित् हें पत्र प्रसिद्ध होण्यापूर्वीच कांहीं नवलाची बातमी तारेनें वाचकांस कळण्याचा संभव आहे. पण तो विषय पुढील आठवड्याचा आहे असें समजून हें बातमीपत्र येथेंच पुरें करतों.

---

# ठाणें जिल्हा परिषद १९२५

(केसरी ता. १ डिसेंबर १९२५)

ठाणें जिल्ह्याची तिसरी परिषद १९२१ च्या डिसेंबर महिन्यांत शहापुरास भरली होती. त्यानंतर तीन वर्षें अनेक कारणांमुळें परिषदेचा योग न येऊन यंदाचें अधिवेशन पालघरास भरण्याचें ठरविण्यांत आलें. पालघर हा गांव माहिम तालुक्यांतील प्रमुख गांव असला तरी किंचित् आडवळणीं म्हणून गैरसोयीचा होता; तथापि तांबे-प्रकरणांतून हिंदुस्थानच्या राजकीय वातावरणांत जे ढग उठले त्या बाबतींत ठाणें जिल्हा कोणत्या बाजूचा कौल देतो इकडे सर्वांचें लक्ष वेधल्यानें या छोटेखानी जिल्हा-परिषदेस प्रांतिक परिषदेचें महत्त्व अभावितपणें प्राप्त झालें.

श्री. बापूजी अणे भाषण करतांना म्हणाले—" बेळगांवच्या राष्ट्रीय सभे-नंतर पांच महिन्यांनीं साताऱ्यास प्रांतिक परिषद भरली आणि अमृतसरच्या धर्तीवर राजकीय धोरण न्यावें असें त्या परिषदेंत ठरलें. महाराष्ट्रांतील कांहीं असहयोग्यांस साताराचें धोरण पसंत नव्हतें. परंतु पाटणाच्या ऑल इंडिया-कॉंग्रेस-कमिटींत म. गांधींनीं तें धोरण स्वीकारतांच त्याविरुद्ध बोलण्याची त्याच महाराष्ट्रीय असहयोग्यांची छाती झाली नाहीं हें त्यांच्या स्वतंत्र बुद्धीचें द्योतक खास नव्हे. प्रतियोगी सहकारितेच्या धोरणावर पं. मोतिलाल वगैरे

पुढाऱ्यांनीं ज्या गोष्टी केल्या त्यांस आम्हीं अनुमोदन दिलें. गेल्या दोन वर्षांच्या अनुभवावरून अधिकाराच्या जागा स्वराज्य पक्षानें पत्करल्यावांचून गत्यंतर नाहीं अशी आमची खात्री झाली आहे. गंगोत्रीच्या गंगेचें स्वरूप जाऊन ती समुद्रास मिळाल्यानें तिची उंची समुद्रसपाटीइतकी राहते; तसेंच अधिकाराच्या जागा पत्करल्यानें स्वराज्य पक्षाचें होईल अशी कांहीं स्वराजिस्टांस भीति पडली आहे, परंतु राजकीय गंगा सामान्य लोकांच्या आटोक्यांत आली पाहिजे व ती याच उपायानें येणार आहे ही मुद्द्याची गोष्ट त्यांच्या लक्षांत येत नाहीं. अधिकाराच्या जागा घेऊन तें कार्य साधणार आहे. विघातक कार्य करीत असतांहि विधायक कार्य आपल्याला करतां येतें असें स्वराज्य पक्षास या उपायानें दाखवितां येईल. एकीकडे खंबीर लोकांचा पक्ष म्हणून स्वराज्य पक्षास शाबासकी देणें व दुसरीकडे स्वराज्य पक्षाच्या लोकांनीं अधिकाराच्या जागा पत्करल्या असतां ते लोभाविष्ट होतील असें म्हणणें या परस्पर विरुद्ध मताची संगति कशी लावावयाची हेंच मला समजत नाहीं. स्वराज्य पक्षाचा कार्यक्रम आतां कानपुरास ठरावयाचा आहे. अशा वेळीं योग्य तो सल्ला निर्भीडपणानें देणें हें ठाणें जिल्ह्याचें कर्तव्य आहे." अशा आशयाचें अध्यक्षांचें अस्खलित, जोरदार व कळकळीचें भाषण सुमारें तासभर झाल्यानंतर परिषदेनें ठरावांचा विचार करण्यास सुरुवात केली.

## प्रतियोगी सहकारितेचा ठराव

शनिवारीं तिसरे प्रहरीं प्रतियोगी सहकारितेचा वादग्रस्त व खळबळ उडवून सोडणारा ठराव ठाण्याचे प्रसिद्ध वकील व मुंबई-कायदेमंडळाचे सभासद श्री. गोविंदराव प्रधान यांनीं मांडला व त्यास श्री. अच्युत नारायण खरे, वकील, डहाणू, यांनीं अनुमोदन दिलें. हा ठराव पुढीलप्रमाणें—

(अ) साताऱ्यास गेल्या मे महिन्यांत प्रांतिक परिषद भरून ९ नंबरचा जो ठराव पास झाला त्यांतील मुद्द्याच्या मुख्य भागाचा अंगिकार पाटणास ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीनें केला याबद्दल ही परिषद आपलें समाधान व्यक्त करीत आहे.

(आ) देशांतील एकंदर परिस्थिति लक्षांत घेतां राष्ट्रीय सभेनें राजकीय कार्यक्रम पुनः त्वरित पत्करणें इष्ट आहे. आणि यासाठीं सर्व राजकीय

पक्षांस राष्ट्रीय सभेंत प्रविष्ट होण्याचा मार्ग सुकर करणें जरूर असल्यानें राष्ट्रीय सभेनें प्रतियोगी सहकारिकतेच्या तत्त्वाचा अंगिकार करावा आणि सुधारणा-कायदा असमाधानकारक, निराशाजनक व अपुरा असला तरी लोकमतावर नजर देऊन त्याचा शक्य तितक्या सर्व मार्गांनीं उपयोग करावा आणि या धोरणास अनुसरून सन १९२६ सालअखेरच्या कौन्सिल-निवडणुकी लढवाव्या; तसेंच स्वराज्य पक्षानेंहि आपला कार्यक्रम याच धोरणावर आंखावा असें या परिषदेचें मत आहे.

( इ ) राष्ट्रीय सभेच्या सभासदत्वाच्या अटींत सभासदानें खादीचा पोशाख विशिष्ट प्रसंगीं घालावा अशी जी अट आहे ती राष्ट्रीय सभेंत सर्व पक्ष येण्यास गैरसोयीची असल्यानें ती काढून टाकावी अशी येत्या राष्ट्रीय सभेस या परिषदेची शिफारस आहे.

## बॅरि. जयकर यांचें भाषण

वरील ठरावास पुष्टि देतांना बॅरि. जयकर म्हणाले, प्रतियोगी सहकारितेच्या बाजूनें बोलणाऱ्या तिघांपैकीं मी एक आहे. गेलीं दोन वर्षें मी व माझे सहकारी यांनीं मुंबई कायदेमंडळांत काम केलें त्याचा अनुभव असा आला कीं, सत्तेवांचून शहाणपण फुकट आहे. गेल्या दोन वर्षांत आम्हांस कौन्सिलांत जो कटु अनुभव आला त्यामुळें अधिकाराच्या जागांची आम्हांस जरूर अधिक भासूं लागली. बहुजनसमाज अनेक लहानसान गोष्टी कौन्सिलमार्फत करून घेण्यास तयार आहे. आमच्या स्वराज्य पक्षामार्फत कौन्सिलाच्या दर बैठकीस रयतेकडून पांचशेंपर्यंत प्रश्न विचारण्यांत येतात. मुंबई-कौन्सिलांत स्वराज्य पक्षानें भाग न घेण्याचें गेल्या खेपेस ठरवितांच आमच्याकडे तसें न करण्याविषयीं ७५ तारा आल्या. दिवाण, दिवाणांच्या बगलेंतील ब्राह्मणेतरादि सभासद व सरकार यांचें सध्यां संगनमतच झालें आहे. दारूबंदी व सक्तीचें प्राथमिक शिक्षण या कामीं दिवाण व कौन्सिलांतील त्यांचे बगलबच्चे सभासद यांनीं सरकारपाशीं हट्ट धरूं नये व सरकारनें मोबदला म्हणून उलट त्यांचे नोकऱ्या वगैरेंनीं जातवार फायदे करून द्यावे असें या संगनमताचें स्वरूप आहे. कायदेभंगाची तयारी नाहीं आणि उलट कौन्सिलें अशीं बिघडून गेलीं आहेत. अशा स्थितींत स्वराज्य पक्षानें आणखी एक पाऊल पुढें जाऊन अधिकाराच्या जागा पत्कराव्या याशिवाय दुसरा मार्गच आतां राहिलेला नाहीं.

## रविवारचा वादविवाद

रविवारीं सकाळीं ८ वाजतां सदर ठरावावर फिरून ऊहापोह चालू झाला. ठरावास विरोध करणाऱ्या मंडळींचे अध्वर्यु श्री. जम्नादास मेहेता यांनीं सदर ठरावावर उपसूचना मांडली. तिचा आशय असा कीं, " गेल्या पांच वर्षांत द्विदल-राज्यपद्धति अयशस्वी ठरली आहे, यासाठीं करबंदी व कायदेभंग हे इलाज राष्ट्रीय सभा व स्वराज्य पक्ष यांनीं त्वरित अमलांत आणावे अशी या परिषदेची विनंति आहे."

या उपसूचनेवर भाषण करतांना बॅ. मेहेता म्हणाले, " प्रतियोगी सहकारितेचे पुरस्कर्ते श्री. तात्यासाहेब केळकर यांजविषयीं माझा अत्यंत आदरभाव आहे. अमृतसर आणि कानपूर यांचे दरम्यान सात वर्षांचें अंतर पडलें आहे. तेवढयांत देशाची प्रगति इतकी झाली आहे कीं, अमृतसरास परत जाणें आतां शक्य नाहीं. त्या काळांत ४० हजार माणसें तुरुंगांत गेलीं. आतां करबंदी व कायदेभंग हीच त्यापुढची पायरी होय."

श्री. मेहेता यांच्या उपसूचनेस श्री. सखारामपंत पाटील यांनीं अनुमोदन दिलें. उपसूचनेस अनुमोदन देतांना श्री. नरीमन म्हणाले कीं, "अधिकाराच्या जागा खुद्द स्वराज्य पक्षानें न पत्करतां त्या जागांकरितां श्री. गोविंदराव प्रधान यांसारखे स्वतंत्र पक्षाचे लोक तरी निवडण्यांत यावेत."

### केळकर यांचें भाषण

नरीमननंतर श्री. न. चिं. केळकर हे मूळ ठरावास पुष्टि देतांना म्हणाले, जम्नादासांप्रमाणें मीहि कायदेभंगास ते म्हणतील त्या घटकेस तयार आहें. कायदेभंग केल्याबद्दल मजवर यापूर्वीं तीन खटले झाले आहेत, व एकवार तुरुंगवासहि मला पत्करावा लागला आहे. पण नुसत्या कायदेभंगाच्या वल्गना करण्यांत हशील नाहीं. म. गांधीं व कायदेभंग-कमिटी यांनीं कायदेभंग करण्यासारखी देशाची स्थिति नाहीं असें आपलें मत दिलें आहे. जम्नादास यांची कायदेभंगाची जर एवढी प्रबळ इच्छा, तर गेल्या दोन वर्षांत असेंब्लींत गेल्यानंतर त्यांनीं कायदेभंगाची चळवळ कां केली नाहीं ? पानावर जेवावयास बसून नुसती समोर मिरची टांगल्यानें तिखट खावयास मिळत नाहीं. मला जेवणांत तिखट पाहिजे, नुसती टांगलेली मिरची नको. मी व जम्नादास यांचा परस्परसंबंध लेखणीच्या टांकाच्या दोन टोकांसारखा आहे. ते स्वतःस

जर माझा धाकटा बंधु समजतात तर माझें म्हणणें त्यांनीं ऐकावें व वाद माजवूं नये. जनतेपुढें मी गेलीं तीस वर्षें आहें. दिवाणगिऱ्यांसारख्या स्वार्थाला लोभावून मी प्रतियोगी सहकारिता पुकारतों असे क्षुद्र आक्षेप ज्या कोणास मजवर आणावयाचे असतील त्यांनीं खुशाल आणावे. त्यांची मला क्षिति नाहीं. पंडितजी व जम्नादास यांचा प्रतियोगी सहकारितेवर राग आहे. पण त्यांनीं गेलीं दोन वर्षें प्रतियोगी सहकारिताच केली ! पुण्यास विद्यार्थिदशेंत टिळकांचीं भाषणें ऐकून टिळकांचें राजकारण मला समजलें असें नरीमन म्हणतात. पण तीस वर्षें टिळकांपाशीं राहिलेल्या मला तें अधिक समजलें कीं नरीमन यांस निवळ ऐकून समजलें, याचा श्रोत्यांनींच विचार करावा. आमची लढाई दुहाती आहे. जें मिळेल तें आम्ही डाव्या हातानें घेतों व उजवा हात लढण्याकरितां पुढें करतों. प्रतियोगी सहकारिता ती हीच.

श्री. केळकर यांच्या मागून मुंबईचे श्री. रामचंद्र अर्जुनराव गोळे व दामले यांचीं मूळ ठरावास प्रतिकूल व श्री. नारायणराव गुंजाळ, डॉ. सावरकर आणि तपस्वी बाबासाहेब यांचीं अनुकूल भाषणें झालीं.

याप्रमाणें चर्चा होऊन श्री. जम्नादास यांच्या उपसूचनेवर मतें घेण्यांत आलीं. त्या वेळीं उपसूचनेस अनुकूल १३६ व विरुद्ध २५४ मतें पडून उपसूचना दुप्पट बहुमतानें नापास झाली व प्रतियोगी सहकारितेचा मूळ ठराव पास झाला.

---

# नेहरू व प्रतियोगी पक्षाचा समेट

(केसरी, ता. ८ डिसेंबर १९२५)

गेल्या आठवड्यांत प्रतियोगी सहकारितेच्या वादाला एक नवीन वळण लागलें. याचा प्रकार असाः— पं. नेहरू यांनीं नागपूर येथील कार्यकारी मंडळाच्या सभेनंतर वऱ्हाड-नागपूर प्रांतांत निष्कारण दौरा काढून, आपल्या अप्रयोजक धमकीच्या उद्गारांनीं जयकर-केळकर यांच्या स्वाभिमानाला झालेल्या जखमेवर नागपूरच्या सभेनें धरलेली खपली काढली, व आपल्या भरमसाट विषारी विधानांनीं ती जखम पुनः वाहावयास लावली. पण आपल्या जाबास

केळकर-जयकरांकडून बरोबर सणसणीत उलटा जाब मिळेल हें कदाचित् तेव्हां त्यांच्या लक्षांत आलें नसावें. पंडितजींचा दौरा तिकडे सुरू होतांच इकडे पुणें व मुंबई येथें प्रतियोगी सहकारितेच्या बाजूनें व्याख्यानें व सभा यांच्या द्वारें जोराची चळवळ सुरू झाली. ठाणें जिल्ह्याची परिषद, महाराष्ट्र प्रांतिक कॉंग्रेस कमिटी, व महाराष्ट्र प्रांतिक स्वराज्य पक्षाची सभा या तीनहि सभांनीं प्रतियोगी सहकारितेस सर्वस्वीं अनुकूल असे ठराव मान्य केले. आणि मुंबईस ता. ४ रोजीं उभयपक्षांची खासगी सभा भरून तिजमध्यें झालेला तात्पुरता तह बनला नसता तर ही चळवळ पुढील दोन तीन आठवड्यांत महाराष्ट्रांतच काय पण इतर प्रांतांतूनहि जोरानें सुरू झाली असती. पण या चळवळीचीं पूर्वचिन्हें दिसूं लागतांच, विशेषतः आपल्या धमकीला भीक न घालतां उलट स्वराज्य पक्षांतच राहून चळवळ करण्याचा आग्रह जयकर-केळकरांनीं धरलेला पाहून, आणि आपल्या प्रत्येक उत्तरास खरमरीत प्रत्युत्तर मिळूं लागलेलें पाहून हा वाद तूर्त तरी मिटता घ्यावा अशी पं. नेहरू यांना सुबुद्धि सुचली. त्याप्रमाणें त्यांनीं केळकरप्रभृतींना तारा करून आपण सर्वजण मुंबईस भेटून अखेरची कांहीं तडजोड होते कीं नाहीं तें पाहूं असें कळविलें. आणि कोणाच्याहि सामोपचाराच्या सूचनेस अमान्यता दर्शविण्याचा केळकर-जयकर यांचा स्वभावच नसल्यानें व आपल्याच पक्षांतील हा वाद मिटला तर बरा असें वाटून त्यांनीं पंडितजींच्या सूचनेस मान्यता दिली.

ठरल्याप्रमाणें ता. ४ रोजीं दोनप्रहरीं टाटा यांचे बंगल्यावर समेटाची सभा भरली. सभेला नेहरू, केळकर, जयकर, मुंजे, लाला लजपतराय, सरोजिनी नायडू, श्रीनिवास आय्यंगार, रंगास्वामी आय्यंगार, जम्नादास मेथा, दा. वि. गोखले, अभ्यंकर, वेलकर, गोस्वामी वगैरे बरीच मंडळी हजर होती. सभेचें काम सुमारें चार तास चालूं होतें; व शेवटीं नेहरू, केळकर, जयकर व मुंजे यांच्या सह्यांनिशीं खालील अटी उभयपक्षीं पाळावयाच्या म्हणून मान्य झाल्या —

( १ ) कानपूर येथील राष्ट्रीय सभा समीप आल्यामुळें, स्वराज्य पक्षाच्या कार्यक्रमाविषयीं प्रसिद्धपणें चालू असलेला वाद व तदनुषंगिक चळवळ उभय-पक्षांनीं राष्ट्रीय सभा भरेपर्यंत थांबवावी.

( २ ) कानपूर येथील राष्ट्रीय सभेनंतर व स्वराज्य पक्षाच्या सभेंत होणाऱ्या ठरावानुसार तेथून पुढें, म्हणजे कायदेकौन्सिलांच्या येत्या निवडणुकीचा कार्यक्रम निश्चित होईपर्यंत, प्रत्येक सभासदाला एतद्विषयक आपापलीं मतें प्रकट करण्यास पूर्ण स्वातंत्र्य राहील.

( ३ ) प्रधानमंडळें बनविणें किंवा अशाच प्रकारचे स्वराज्य पक्षाच्या कार्यक्रमांविषयीं इतर कोणतेहि प्रश्न, हा कार्यक्रम निश्चित करण्याकरितां भरणाऱ्या स्वराज्य पक्षाच्या सभेपुढें किंवा सभांपुढें, वेळोवेळीं कोणाहि सभासदास मांडतां येतील.

वरीलप्रमाणें ठराव होऊन त्यावर सह्या झाल्या आणि त्याची अंमलबजावणीहि ताबडतोब करण्यांत आली. ती अशी कीं, त्याच दिवशीं सायंकाळीं मुंबई शहरांत व बाहेर प्रतियोगी सहकारितेला अनुकूल व प्रतिकूल अशीं व्याख्यानें व सभा होणार होत्या, त्या थांबविण्यांत आल्या. तसेंच ता. ५ पासून पुणें, नाशिक, जळगांव वगैरे शहरीं पंडित नेहरू यांनीं व्याख्यानाचा कार्यक्रम ठरविला होता, तोहि बंद करण्यांत आला. अशा रीतीनें राष्ट्रीय सभेपर्यंत तरी हा वाद तहकूब करण्यांत आला हें योग्यच झालें. वास्तविक हा वाद इतका वाढण्याचें कारणच नव्हतें. पण स्वराज्य पक्षांतील सभासदांच्या हक्कांविषयीं व स्वतःच्या अधिकारमर्यादेविषयीं पंडितजींच्या विपरीत कल्पना असल्यामुळें, आणि आपण कोणत्या दर्जाच्या लोकांना कशा रीतीनें वागवितों व त्यांच्यावर कशा प्रकारचे आरोप करतों याचें भान त्यांना मुळींच न राहिल्यामुळें, हा वाढला. पंडितजींच्या जागीं अधिक विनयशील व अधिक कुशल असा पुढारी असता तर त्यानें नागपूरच्या सभेंतच हा वाद कायमचा संपवून केळकर-जयकर-अणे यांना अवश्य तेवढें मतस्वातंत्र्य देऊन वरती स्वराज्य पक्षांत मतभेद जणूं काय केव्हां झालाच नाहीं असें मनमिळाऊ वर्तन ठेविलें असतें. पण पंडितजींचा मूळ स्वभाव, स्वराज्य पक्षासारख्या पुढारलेल्या पक्षाचें त्यांना मिळालेलें आधिपत्य व महात्मा गांधींचा व त्यांचा जगास दिसणारा ऋणानुबंध या त्रिदोषामुळें त्यांचें व्यवहारचातुर्य सर्वस्वीं नष्ट झालें होतें, त्याला कोणाचा काय उपाय ?

मुंबईस झालेल्या या समेटामुळें केळकर-जयकरांना पाण्यांत पाहणाऱ्या कित्येक लोकांचें मात्र अपरिमित नुकसान झालें यांत शंका नाहीं. पंडितजींना

पुण्यास आणून केळकरांविरुद्ध परस्पर चार प्रतिकूल उद्गार मंडईवाल्यांना ऐकविण्यास मिळणारी त्यांची संधि फुकट गेली ! वाहत्या गंगेंत, किंवा नागझरींत म्हटलें असतां अधिक शोभेल, खळबळण्याकरितां पुढें सरसावलेले हात कित्येकांना अशा अनपेक्षितपणें मागें घ्यावे लागले ही हानि कांहीं लहान नव्हे. उलट पंडितजी व कट्टर या शत्रुग्रहांची ही युति पाहण्याची तिऱ्हाइतांची मौजहि फुकट गेली. पण अशा रीतीनें दुसऱ्याच्या हातांत काठीसारखें जाऊन तिसऱ्यावर प्रहार करण्यापेक्षां, केळकर-जयकरांकडून व स्वराज्य पक्षाच्या यच्चयावत् हितचिंतकांकडून आपल्या हातून घडणाऱ्या अतिप्रसंगाबद्दल स्वतःवर होणारे टीकेचे आघात थांबविणें हेंच पंडितजींना अधिक श्रेयस्कर व आवश्यक वाटलें असल्यास त्यांत त्यांची चूक म्हणतां येत नाहीं. महाराष्ट्रांत हिंडून केळकरांची अपकीर्ति गाण्यापेक्षां स्वतःची अपकीर्ति टाळणें हेंच त्यांना अधिक हिताचें वाटलें. उलटपक्षीं केळकर-जयकर-अणे या त्रिवर्गांना झालें तरी हा अप्रिय वाद अशाच रीतीनें पुढेंहि चालू ठेवण्यांत काय लाभ होता ? त्यांना जरूर तें मतस्वातंत्र्य राष्ट्रीय सभेनंतर देण्याचें पंडितजींनीं आपल्या सहीनिशीं कबूल केल्यानें एका दृष्टीनें वादाचें मूळ बीजच योग्य रीतीनें खुडलें गेलें. शिवाय पंडितजी आतांपर्यंत जें बोलले त्याला केळकर, जयकर व अणे यांनीं सव्याज प्रत्युत्तर देऊन टाकलेलेंहि होतें ! या दृष्टीनेंहि वाद पुढें चालणें आवश्यक नव्हतें. आतां कानपूर येथें स्वराज्य पक्षाची सभा भरेल तेव्हां हा विषय अर्थातच चर्चेला निघेल. पण तेथेंहि झालें तरी कार्यक्रमांत फेरबदल करण्याविषयीं कोणाहि सभासदास जाहीर रीतीनें मतप्रसार करण्याचा योग्य तो हक्क देण्यांत येईल, त्यास व्यत्यय येणार नाहीं, असेंच आमचें अनुमान आहे. तें खरें ठरल्यास या वादग्रस्त विषयाची पूर्ण चर्चा होण्याला पुढें चारसहा महिने सहजच अवसर मिळेल. उलट हें मतस्वातंत्र्यहि देण्याचें स्वराज्य पक्षानें नाकारल्यास प्रतियोगी सहकारितावादी स्वराजिस्टांना कोणता मार्ग स्वीकारावा लागेल हें उघड आहे. पण त्याविषयीं आजच अधिक लिहिण्याचें कारण नाहीं.

---

# कानपूरची राष्ट्रीय सभा

## विषयनियामक कमिटीची बैठक

(केसरी, ता. २९ डिसेंबर १९२५)

ऑल-इंडिया काँग्रेस कमिटीचें काम समात झाल्यानंतर विषयनियामक कमिटीला सुरुवात झाली. प्रथम म. गांधी यांनीं योग्य शब्दांत सर्वांचे आभार मानून श्री. सरोजिनीबाई यांची स्तुति केल्यावर त्या अध्यक्षाच्या जागेवर बसल्या व त्यांनीं दे. बं. दास व सुरेंद्रनाथ बानर्जी यांच्या मृत्यूबद्दलचा ठराव मांडला व तो एकमतानें मंजूर झाला. नंतर पाटणा येथें वर्किंग कमिटीनें घटनेंत दुरुस्त्या केल्या आहेत त्या मान्य करण्याबद्दलचा ठराव म. गांधी यांनीं पुढें मांडला. या ठरावास पं. मोतिलाल नेहरू यांनीं दुजोरा दिला (दोन हजार वार सूत अगर वार्षिक चार आणे वर्गणी करण्याबद्दलचा ठराव) त्यास न. चिं. केळकर यांनीं दोन उपसूचना आणल्या. 'फक्त चार आणे वर्गणी ठेवावी' ही एक व 'काँग्रेसच्या कामकाजाच्या वेळीं खादीचा पोषाक न घातला तर त्या इसमास मत देण्याचा अधिकार नसावा हें कलम गाळावें' ही दुसरी.

सदर उपसूचनेस अनुकूल अशीं भाषणें डॉ. बाबासाहेब परांजपे, डॉ. मुंजे, बॅरि. जयकर, मद्रासचे सांबमूर्ति, दा. वि. गोखले, मुंबईचे श्री. जोगळेकर यांनीं केलीं व प्रतिकूल बोलणारांत शौकतअली आदिकरून गृहस्थ होते. शेवटीं म.गांधी यांनीं उत्तर देतांना सांगितलें कीं, हा ठराव वर्किंग कमिटीचा असल्यानें त्यांत फेरबदल करणें आतां इष्ट नाहीं. हिंदुस्थानास स्वावलंबी बनण्यास खादीचाच आश्रय केला पाहिजे. सरकार गिरण्या बंद करूं शकेल; पण त्यास आमचे हातमाग व चरखे मोडतां येणार नाहींत व हात तोडतां येणार नाहींत. तशांतहि ज्यांचा खादीस व सुतास तत्त्वतः विरोध असेल त्यांना राष्ट्रीय सभा सोडून जाण्याचा मार्ग मोकळा आहे!! शेवटीं उपसूचना नापास होऊन मूळ ठराव बहुमतानें पास झाला.

### पंडित नेहरू यांचा ठराव

यानंतर मोतिलाल नेहरू यांनीं स्वराज्य पक्षाच्या कार्यक्रमासंबंधाचा ठराव मांडला तो असा—

" पाटणा येथें ता. २२ व २३ सप्टेंबर रोजीं भरलेल्या काँग्रेस कमिटीचा ठराव मान्य करून ही काँग्रेस असें ठरवितें कीं, देशाच्या हितासाठीं काँग्रेसनें राजकीय कार्यक्रम हातीं घ्यावा व तो अमलांत आणावा.

सविनय कायदेभंगासाठीं लोकांना तयार करण्यासाठीं किंवा समर्थ करण्यासाठीं जो कार्यक्रम उपयोगीं पडेल तोच हातीं घेण्यांत येईल व त्यास विरोधी अशा कोणत्याहि चळवळींत काँग्रेस भाग घेणार नाहीं.

कौन्सिलांतील काम पुढील पद्धतीनें करावें. ता. १८ फेब्रुवारी १९२४ रोजीं असेंब्लीमध्यें मंजूर झालेल्या ठरावांवर जोर देऊन असेंब्लींतील स्वराज्य पक्षाचे सभासद सरकारला आपला शेवटचा निकाल देण्यास सांगतील आणि सरकारनें तसा निकाल फेब्रुवारीच्या अखेरपर्यंत दिला नाहीं अथवा दिलेला निकाल काँग्रेसच्या कार्यकारी मंडळानें असमानधारक असा ठरविला तर स्वराज्य पक्ष असेंब्लीमध्यें सरकारास कळवील कीं, हल्लींच्या कौन्सिलावर पूर्वीप्रमाणें स्वराज्य पक्ष बहिष्कार घालील आणि लोकांमध्यें चळवळ करण्यास लागेल. परंतु गैरहजेरीमुळें आपली जागा जाऊं नये म्हणून किंवा अंदाजपत्रक नामंजूर करण्यासाठीं व करभार वाढविण्यासंबंधींचे ठराव फेटाळून लावण्यासाठीं त्यांना हजर राहतां येईल. सरकार जोंपर्यंत राष्ट्राच्या मागण्यांस समाधानकारक उत्तर देणार नाहीं तोंपर्यंत सरकारच्या हातीं असलेल्या नेमणुकीच्या जागा स्वीकारण्यांत यावयाच्या नाहींत."

या ठरावावर भाषण करतांना पंडितजी म्हणाले, सविनय कायदेभंग ठराविक काळांत अशक्य आहे, असेंच म. गांधींप्रमाणें माझें मत आहे. पण सविनय कायदेभंग जितका जवळ येईल तितकें स्वराज्यहि जवळ येईल. याकरितां ही कल्पना जनतेसमोर आपण सदैव ठेविली पाहिजे. राष्ट्रातर्फे आम्हीं दोन वर्षांपूर्वीं असेंब्लींत मागणी केली. आतां लवकरच सरकारला आपला निर्णय देण्याबद्दल आम्ही निर्वाणीचा खलिता देणार आहों. मला वाटतें, त्याचें उत्तर बहुतेक येणारच नाहीं व आलें तर त्यामुळें कोणाचें समाधान होणार नाहीं. सरकारनें दिलेलें उत्तर वर्किंग कमिटीला असमाधानकारक वाटल्यास स्वराज्य पक्षाचे सर्व सभासद कौन्सिलांतून बाहेर पडतील. सरकारचें उत्तर समाधानकारक आल्याखेरीज सरकारनें दिलेली जागा स्वीकारण्यांत येणार नाहीं. या ठरावाला श्रीनिवास अय्यंगार यांनीं दुजोरा दिला.

## ठरावावरील वादविवाद

लाला लजपतराय म्हणाले, "सविनय कायदेभंग हें एक साधन आहे, साध्य नव्हे हें लक्षांत ठेवा. हें शेवटचें शस्त्र म्हणून राखून ठेवा. नाहीं तर त्याचा दुरुपयोग होण्याचा संभव आहे."

मौ. महंमदअल्ली म्हणाले, "राष्ट्राची नक्की मागणी काय हें प्रथम समजलें पाहिजे."

या ठरावास विरोध करतांना बॅ. जयकर म्हणाले, "पंडितजींनीं स्वराज्य पक्षाचें धोरण व त्यानें केलेली मागणी काँग्रेसला मान्य करण्यास लावली हा स्वराज्य पक्षाचा मोठाच विजय होय व याबद्दल पंडितजींचें अभिनंदन केलें पाहिजे. राष्ट्रीय प्रगतीस हानिकारक अशा सरकारी धोरणास प्रतिकार करण्याची जरूरी आपण मान्य केलीच आहे. हेंच प्रतिकाराचें धोरण प्रत्येक खात्यांत सुरू करा असें माझें म्हणणें आहे. या बाबतींतील वैयक्तिक वाद विसरून जा. मी व माझे मित्र हे वाटल्यास म. गांधींना असें वचन देऊं कीं, जागा पत्करणेंच काय, पण जरूर तर कौन्सिलासाठीं आम्ही पुन्हा उभेहि राहणार नाहीं. आमचा वाद तत्त्वासाठीं आहे. मोठमोठ्या जागा मोठ्या जबाबदारीच्या असून त्यांमागें हुकमत असते. त्या सरकार अ-राष्ट्रीय लोकांकडून भरतें, असा आमचा अनुभव आहे. सरकारी जागा मोह पाडतात असें म्हणण्यांत अर्थ नाहीं. आपले खरे देशभक्त तेथें पाठवा. जागा पत्करणें त्या स्वराज्य पक्ष पुढें आंखील त्या धोरणाला धरून पत्करण्यांत येतील."

या उपसूचनेस श्री. रंगा अय्यर यांनीं विरोध केला. मागणी ती काय? या महंमदअल्लींच्या प्रश्नास उत्तर देतांना पं. नेहरू म्हणाले, असेंब्लीची ता. २५ सप्टेंबरची मागणी ही सर्व पक्षांची तडजोड म्हणून होती. ती मलाहि मान्य नाहीं. काँग्रेसला असेंब्लीची मागणी सर्वथा मान्य नसेल तर ती किमान मागणी म्हणून तरी राष्ट्रीय सभेनें मान्य करावी.

श्री. जयकर यांच्या उपसूचनेस टी. प्रकाशम्, श्री. श्रीनिवास अय्यंगार व सेनगुप्त यांनीं विरोध केला.

डॉ. मुंजे उपसूचनेस पाठिंबा देतांना म्हणाले, "उपसूचनेस विरोध करणारे कौन्सिल-प्रवेशाला विरोध करतांना असेंच म्हणत होते. मध्यप्रांतांत स्वराज्य पक्षाचें पूर्ण बहुमत आहे. तेथें आंतून पूर्णपणें विरोध करण्याला पुष्कळ सवड आहे."

बॅरि. अभ्यंकर यांनीं उपसूचनेस विरोध केला.

उत्तर देतांना पं. नेहरू म्हणाले, "जोंपर्यंत प्रचलित घटनेंत दुरुस्ती नाहीं व सरकारकडून योग्य उत्तर नाहीं तोंपर्यंत जागा पत्करणें इष्ट नाहीं. आजच्या स्थितींत प्रधानांस कांहींच करतां येत नाहीं. या ठरावावर शेवटीं मतें घेण्यांत आलीं, व जयकर यांच्या उपसूचनेस अनुकूल २१ व प्रतिकूल १३५ मतें पडून मूळ नेहरूंचा ठराव मान्य झाला.

## विषय-नियामक कमिटींतील वादविवाद

दुसरे दिवशीं पंडित मोतिलाल नेहरू यांच्या स्वराज्य पक्षाच्या कार्य-क्रमाच्या ठरावावर फिरून विषय-नियामक कमिटींत कडाक्याचा वादविवाद झाला. संयुक्त प्रांतांतले एक प्रतिनिधि किरण शंकर राय यांनीं अशी उप-सूचना मांडली कीं, कौन्सिलच्या स्वराजिस्ट सभासदांनीं कौन्सिलावर बहि-ष्कार घालण्याचें जाहीर केल्यावर बंगाल ऑर्डिनन्ससारख्या महत्त्वाच्या अगर आकस्मिक कारणासाठीं त्यांना कौन्सिलांत हजर राहण्याला खास परवानगी देण्यांत यावी. ही उपसूचना पंडितजींनीं मान्य केली.

टी. प्रकाशम् यांनीं ता. १८ फेब्रुवारी १९२४ ची राउंड टेबल परिषदेची मागणी हीच देशाची व कॉंग्रेसची मागणी असें मानण्यांत यावें अशी उपसूचना केली व तीहि स्वीकारण्यांत आली.

## जयकर व पं. नेहरू यांची खडाजंगी

स्वराजिस्टांनीं सरकारच्या हातीं नेमणूक असलेली कोणतीच जागा कमिटी-वर अगर कमिशनवर देखील पत्करूं नये अशी उपसूचना श्रीहरि यांनीं मांडली. या उपसूचनेनें स्कीन कमिटीवरच घाला पडत असल्यानें पं. नेहरू यांनीं तिला विरोध केला, व सांगितलें कीं, स्कीन कमिटींत अध्यक्ष व चिटणीस दोघेच युरोपियन आहेत, आणि जे लष्करी प्रकरणाचे गुप्त कागद एरवीं आम्हांला पाहावयाला मिळाले नसते ते आम्हांस दाखविण्यांत येतात !

एक सभासद—पण ही प्रतियोगी सहकारिता नव्हे काय ?

नेहरू—मी प्रतियोगी सहकारिता करीत नाहीं असें कधीं म्हटलें ? जरूर पडेल तेव्हां मी संयोगी सहकारिताहि करीन ! लष्करी शिक्षणाचा अभाव हेंच आमच्या दुबळेपणाचें कारण असल्यानें हा दुबळेपणा नाहींसा होणें हें रिफॉर्म्स ॲक्टाच्या दुरुस्तीपेक्षांहि महत्त्वाचें आहे.

एक सभासद—पण ही जागा स्वीकारण्यापूर्वी तुम्हांला 'रिस्पॉन्स' मिळाला होता काय ?

उत्तर—कमिटी नेमली हाच रिस्पॉन्स !

प्रश्न—या कमिटीचे सर्व सभासद लोकनियुक्त आहेत काय ?

उत्तर—पण ही कमिटी सर्वांना मान्य झाली आहे ! (नाहीं, नाहीं, व होय, होय, असा एकच गिल्ला सुरू होतो.)

डॉ. मुंजे—या कमिटीवर काम करणें स्वराज्य पक्षाच्या आद्यतत्त्वाला धरून आहे काय ?

नेहरू—राष्ट्राच्या जीविताच्या आद्यतत्त्वाला तें धरून आहे.

बॅरि. जयकर—मी तरी तेंच म्हणत असतों; सगळ्याच सरकारी जागा कांहीं सारख्याच नसतात. कांहीं स्वीकारण्यालायक असतात व कांहीं नाकारण्याच्याच लायकीच्या असतात. म्हणून स्कीन कमिटी ही अपवादात्मक समजावी आणि पंडितजींनीं त्या कमिटीचें काम सोडूं नये.

नेहरू—जे शब्द मी बोललों नाहीं ते माझ्या गळ्यांत बांधूं नका.

बॅरि. जयकर—कालच आपण म्हणत होतां कीं, सरकारच्या हातची कोणतीहि जागा स्वीकारूं नये. त्या वेळीं मी सांगत होतों कीं, कित्येक जागा अपवाद म्हणून समजून स्वीकाराव्या. त्या वेळीं तुम्हांस पटलें नाहीं, आणि आतां तुम्ही स्वतः तेंच तर्कशास्त्र लढवीत आहां ! एवढी अपवादाची सवलत आम्हांस पुरे आहे. या गारुड्याच्या पोतडींतून जरूरीप्रमाणें वाटेल त्या वेळीं वाटेल तें निघेल.

याप्रमाणें वादविवाद होऊन मि. श्रीहरि यांची उपसूचना नामंजूर झाली.

पुढील नेमणुकीची व्यवस्था स्वराज्य पक्षानें न करतां प्रांतिक कॉंग्रेस कमिट्यांनीं करावी, ही अबदुल हमीदखान यांची सूचना मान्य करण्यांत आली.

'कायदेभंगाला देश तयार नाहीं' असें वाक्य मूळ ठरावांत आहे तें गाळावें अशी सांबमूर्तींची उपसूचना पुढें आली. प्रथम ती नापास म्हणून अध्यक्षांनीं जाहीर केलें. त्यावर मतें मोजण्याचें ठरलें व दोहों बाजूंस सारखींच म्हणजे ४९ मतें पडलीं, तेव्हां उपसूचनेस प्रतिकूल असणाऱ्यांना पुनः हात वर करण्यास सांगण्यांत आलें; त्याबरोबर महात्माजींनीं आपला हात सगळ्यांच्या

आर्धीं वर केला. तें पाहिल्यावर इतरांनींहि भराभर हात वर केले व उपसूचनेला अनुकूल मतें अगदींच थोडीं पडून प्रतिकूल मतांची नोंद ७० झाली!

---

# अकोल्याची परिषद्

## ( प्रतिसहकार पक्षाची स्थापना )

( केसरी-१९२६ )

जाहीर झाल्याप्रमाणें अकोला येथें ता. १४ व १५ रोजीं बृहन्महाराष्ट्रांतील प्रतियोगी सहकारीवाद्यांची परिषद् बॅरि. मुकुंदराव जयकर यांच्या अध्यक्षत्वाखालीं यशस्वी रीतीनें पार पडली. १९२१ सालीं अकोला येथें महाराष्ट्रीयांची पहिली परिषद् भरली होती व तींत कौन्सिल-प्रवेशाची प्राणप्रतिष्ठा करण्यांत आली होती. तेव्हां आतां दुसरी परिषदहि त्याच स्थळीं भरून प्रतियोगी सहकारितेच्या धोरणावर शास्त्रोक्त अक्षता पडाव्यात व पुष्पमुकुट चढावा आणि पहिल्या परिषदेचें कार्य परिसमाप्त व्हावें हें यथायोग्यच होतें. स्थलैकत्व हा जसा एक शुभसूचक योगायोग होता. तसेंच अकोला येथील सर्व वातावरण 'लोकमान्य'मय झालें होतें हीहि एक आनंददायक गोष्ट होती. पुरस्कार ज्या राजकीय धोरणाचा करावयाचा तें लोकमान्य टिळकांचें; पुरस्कार करणारी जी मंडळी ती सर्व त्यांच्याच राजकीय आखाड्यांत तयार झालेली व पुरस्कार ज्या स्थळीं करावयाचा तें देखील संस्थांच्या अनेक द्वारें लोकमान्यनामांकित! अशा स्थितींत ज्याप्रमाणें १९२१ सालीं अकोल्यास जमलेले महाराष्ट्रीय गृहस्थच, स्वराज्यद्वेष्ट्या तर्कशास्त्रज्ञांनीं त्यांस अक्कलमंद ठरविलें असतांहि, अखेरीस प्रत्यक्ष राष्ट्रीय सभेच्या कबुलीनें अक्कलवंत ठरले, त्याप्रमाणेंच १९२६ सालीं त्याच शहरीं जमणारेहि ठरतील यांत काय संशय?

### प्रतिनिधींचें आगमन

असो; प्रत्यक्ष परिषद् जरी १४ तारखेस सुरू व्हावयाची होती तरी एक दोन दिवस अगोदरच मंडळी जमावयास लागली होती. श्री. न. चिं. केळकर, तपस्वी बाबासाहेब, बाबासाहेब खापर्डे, बामणगांवकर, बापुजी अणे,

बॅरि. जयकर, बॅरि. बॅप्टिस्टा वगैरे मंडळी कोणी १२ व कोणी १३ या तारखेस येऊन दाखल झाली. डॉ. वेलकर, तळपदे वकील, दा. वि. गोखले, रामभाऊ मंडलीक, नगरचे सप्तर्षि, एरंडोलचे पु. गो. जोशी, जळगांवचे पाठक, शिरपूरचे खरे, साताऱ्याचे ना. स. मराठे वगैरे मंडळी ता. १४ रोजीं सकाळीं दाखल झाली व त्याच दिवशीं डॉ. मुंजे, परांजपे, बॅरि. देशमुख, ओगले, डॉ. चोळकर इत्यादि नागपूरची मंडळीहि आली. पाहुणे मंडळीची उतरण्याची व्यवस्था स्वागत कमिटीचे अध्यक्ष श्री. आठल्ये वकील, व प्रजापक्षाचे उत्पादक श्री. जोगळेकर, यांचे घरीं व 'लोकमान्य' दिवाणखान्यांत अशी करण्यांत आली होती. महाराष्ट्र व मराठी मध्यप्रांत यांच्यापेक्षां खास वऱ्हाडांतील मंडळी पुष्कळच जमावी हें साहजिकच होतें व त्याप्रमाणें जमलीहि होती. बापुजी अणे, बामणगांवकर, बाबासाहेब खापर्डे, यांच्याखेरीज अण्णासाहेब जतकर, बुलढाण्याचे कानिटकर, सदाशिवराव केळकर, काळे, देशपांडे, चिपळूणकर वगैरे बरीच वऱ्हाडी मंडळी परिषदेंत होती. हा सर्व प्रतिनिधिसमूह, तीन रुपये वर्गणी असतांहि व ' सुधारणा-कायद्याचा उपयोग करून घ्यावा ' अशा आशयाच्या पत्रकावर सही करणें जरूर असतांहि, सुमारें दोनशेंपर्यंत गेला याचें खरोखरच सर्वांस आश्चर्य वाटलें.

## परिषदेचा प्रारंभ

रविवार ता. १४ रोजीं सकाळीं परिषदेच्या कामास प्रारंभ झाला. प्रतिनिधि, प्रेक्षक व स्वागत-कमिटीचे सभासद असे मिळून लोकमान्य नाटकगृह भरून गेलें होतें. आरंभीं रीतसर पद्यगायन झाल्यावर स्वागत-कमिटीचे अध्यक्ष श्री. आठल्ये वकील यांनीं स्वागतपर भाषण केलें. पाहुण्यांची व्यवस्था करण्यास आम्हांस फारच थोडा अवधि मिळाला, तेव्हां त्यांनीं आमची व्यवस्था गोड करून घ्यावी अशी विनंति करून, त्यांनीं पहिल्या परिषदेचा थोडा इतिहास सांगितला व ही परिषद् कोणाची याचें विवेचन केलें. मवाळ पक्ष व प्रतिसहकार पक्ष यांतील भेद कोणता हेंहि श्री. आठल्ये यांनीं दाखविलें व पुन्हा एकवार परिषदेस जमलेल्या गृहस्थांचें स्वागत करून आपलें भाषण संपविलें. नंतर सदाशिवराव केळकर यांनीं बॅरि. मुकुंदराव जयकर यांचें नांव अध्यस्थानाकरितां सुचविलें त्याला न. चिं. केळकर यांनीं थोडक्यांत अनुमोदन दिलें. ते म्हणाले, पहिल्या परिषदेचा अध्यक्ष मी होतों, तेव्हां आतां

श्री. जयकर यांनीं अध्यक्षस्थान स्वीकारावें. या सूचनेस पाठिंबा देण्याचा माझा हक्कच आहे. शिवाय लढाईंत ज्याच्या अंगावर जास्त गोळ्या झडतात तोच खरा वीर, तसेंच जयकर यांनीं या राजकीय रणक्षेत्रावर आतांपर्यंत खूप गोळयांचा मार खाल्ला आहे, तेव्हां त्यांनींच अध्यक्ष व्हावें हें अगदीं उचित. सदर सूचनेस पु. गो. जोशी, बाबासाहेब खापर्डे, डॉ. मुंजे यांनींहि पुष्टि दिली व अध्यक्ष स्थानापन्न झाले. यानंतर परिषदेचे एक चिटणीस श्री. खुशालराव देशपांडे यांनीं यशचिंतनपर आलेलीं पत्रें व तारा वाचून दाखविल्या. दादासाहेब खापर्डे, दादासाहेब करंदीकर, अप्पासाहेब केतकर, बाबासाहेब नानल, अण्णासाहेब भोपटकर, किराड, वि. प्र. लिमये, डॉ० लागू, जावडेकर, मेहेकरचे सोभण, गोंदियाचे गवळी, डॉ० आठवले, पां. म. भागवत, त्रिंबकराव आवटे, उंबरगांवचे देवघेकर, दांडेकर, बापट, खेडचे दीक्षित, वा. मो. पोतदार, प्रो. पोतदार वगैरे गृहस्थांचीं सहानुभूतिपर तारापत्रें आलीं होतीं. संदेशवाचन झाल्यानंतर अध्यक्षांनीं छोटें पण समर्पक इंग्रजी भाषण केलें व रविवारचें सकाळचें काम संपलें.

### विषय-नियामक कमिटी

या परिषदेंत औपचारिकापेक्षां अनौपचारिक भाग म्हणजे विषयनियामक कमिटींतील अघळपघळ वादविवाद हाच अधिक महत्त्वाचा होता; व रविवार दोनप्रहरपासून सायंकाळपर्यंत लोकमान्य नाटकगृहांत व त्यानंतर रात्रौ श्री. आठल्ये यांचे बंगल्यावर वादाचा खल सारखा सुरू होता. इतकेंच काय तर सोमवारीं सकाळीं औपचारिक सभेस सुरुवात होण्याच्या वेळींहि, प्रतिनिधिसमुदाय व प्रेक्षक मंडळी समोर हजर असतांना देखील, बराच वेळ पुढाऱ्या-पुढाऱ्यांत कुजबूज व येरझारा चालू होत्या. हा प्रकार जेव्हां लवकर संपेना तेव्हां कांहीं प्रेक्षक विनोदानें म्हणाले सुद्धां कीं, 'विलायतेंतील ज्यूरी-प्रमाणें एकमत होईपर्यंत सर्व पुढाऱ्यांस एकत्र कोंडून ठेवावें !' तथापि वाद-विवाद एवढ्या कडाक्याचा व चिकाटीचा होता तरी त्याचा एक विशेष असा होता कीं, तो अगदीं तात्त्विक, निर्लेप व खेळीमेळीचा असा आरंभापासून अखेरपर्यंत होता. आणि म्हणूनच त्याचा निकालहि सर्वमान्य असाच झाला. सर्व पुढारी व प्रतिनिधि प्रतियोगी सहकारितेच्या निशाणाखालीं जमलेले यांत शंकाच नव्हती; पण वनस्पतिकंदाच्या सालाच्या आंत साल असावेत किंवा चिरोट्याच्या पापुद्र्याखालीं पापुद्रे असावेत त्याचप्रमाणें या धोरणाच्या

आचरणपद्धतींत थोड थोडे श्लेष होते व त्यांचा निरास करावयाचा तो उघडया डोळ्यानें, कोणाचेहि मनांत कांहींहि किंतु न राहतां, होतां होईल तों व्हावा या हेतूनेंच मनमुराद वाद चालला होता आणि अखेरीस 'मतभेद प्रदर्शित करून मग त्यांच्या समन्वयांतून जी एकी उद्भवते ती एकी खरी,' या न्यायानें प्रतिसहकार पक्षाची ऐक्यपूर्ण प्राणप्रतिष्ठा झाली.

## वादाचे दोन मुद्दे

वादाचे मुद्दे मुख्यतः दोन होते. एक, नवीन पक्षाचे सभासद होण्यास राष्ट्रीय सभेचा सभासद होणें अवश्य असावें कीं नाहीं हा; व दुसरा, अधिकाराच्या जागा स्वीकारावयाच्या त्यांत कार्यकारी मंडळाच्या सदस्यत्वाचा समावेश होतो कीं नाहीं, हा. साधारणपणें नागपूरकर मंडळी एका बाजूस व बॅरि. जयकर, बॅरि. बॅप्टिस्टा वगैरे मंडळी दुसऱ्या बाजूस अशी ही रस्सीखेच पुष्कळ तास सुरू होती. महाराष्ट्र व वऱ्हाड या प्रांतांतील कांहीं मंडळी एका तर कांहीं दुसऱ्या बाजूस अशी वांटली गेली होती. डॉ. मुंजे, परांजपे, जपे, ओगले, बॅरि. गोविंदराव देशमुख ही मंडळी 'मध्य'प्रांतीय असूनहि किंचित् एकदेशी बनली होती व शेवटपर्यंत त्यांचें म्हणणें असें कीं, राष्ट्रीय सभेच्या सभासदत्वाचा निर्बंध ठेवलाच पाहिजे आणि अधिकाराच्या जागांत एक्झिक्युटिव्ह कौन्सिलरशिपचा समावेश होऊं नये. या वादास बॅरि. देशमुख यांनीं प्रारंभ करून दिला. ते म्हणाले, लो० टिळक हे नेहमीं 'कॉंग्रेसशीं मी एकनिष्ठ राहीन' असेंच म्हणत व ही अट काढून आपण आपल्या पक्षांत खिचडी होऊं देतां कामा नये. आठल्ये वकिलांनीं त्यांस उत्तर दिलें कीं, राष्ट्रीय सभेचें तारूं कोणीकडे जाईल याचा नेम नाहीं; अशा स्थितींत आपल्या पक्षानें निष्कारण या भानगडींत पडूं नये. डॉ. मुंजे यांनीं अर्थात् देशमुख यांस दुजोरा दिला. दा. वि. गोखले यांनीं विचारलें कीं, टिळकांच्या स्वराज्य-संघांत तरी ही अट कोठें होती? व राष्ट्रीय सभेच्या सभासदापेक्षां मतदार-संघ हाच आतां अधिक महत्त्वाचा व जोरकस नाहीं का? त्यांच्याकडेच यापुढें आपलें लक्ष गेलें पाहिजे. बापुजी अणेहि असेंच म्हणाले, 'आपलें लक्ष लोक काय बोलतात यापेक्षां उद्दिष्ट कार्य कसें साधावयाचें इकडे पाहिजे. आम्हाला राजकीय विचाराची व्यापकता पाहिजे आहे, एम्पायर पार्लमेंटरी असोशिएशन ही कोठें राष्ट्रीय सभेस जोडलेली आहे? शिवाय ज्यांस आमचीं तत्त्वें मान्य आहेत, पण ज्यांचा कॉंग्रेसवर तात्पुरता रोष त्यांस आम्ही कां मुकावें?'

बामणगांवकरांनीं अशी पृच्छा केली कीं, ही अट काढून टाकल्यानें असे कोण मोठे लोक येऊन मिळणार आहेत ? श्याम कवि यांनीं काँग्रेसमध्यें राहूनच कार्य करावें, असें प्रतिपादन केलें. बल्लाळ म्हणाले, सर मोरोपंत जोशी, डॉ. परांजपे आले तरी वाहवा, न आले तरी वाहवा; पण त्यांना यावयाचें असेल तर मनाई कां करावी ! नारायणराव वैद्य यांनीं असें प्रतिपादिलें कीं, राष्ट्रीय सभेस वगळून चालणें कमकुवतपणाचें आहे. निमकर म्हणाले कीं, आपल्या पक्षास तत्त्वजनक पुरुष हवेत. बाबासाहेब परांजपे यांचें म्हणणें असें पडलें कीं, म. गांधीहि असें म्हणतात कीं, काँग्रेस जोंपर्यंत त्यांना अनुकूल तोंपर्यंत तिच्या अनुरोधानें वागावयाचें, नसेल तेव्हां तिच्याशीं फटकून चालावयाचें. तत्त्वप्रसार ही मुख्य गोष्ट. मतदार-संघाकडे तोंड फिरविलें म्हणजे राष्ट्रीय सभेच्या आडनांवाची किंमत नाहींशी होते. नागपूरचे डॉ. परांजपे हे उद्गारले कीं, वाटेल तें असलें तरी राष्ट्रीय सभेच्या पुण्याईकडे कानाडोळा करून चालणार नाहीं. थोडी मानहानि सोसूनहि लो० टिळकांना काँग्रेसमध्यें घुसण्याची जरूरी भासलीच कीं नाहीं ? मत-दार-मतदार म्हणतां तर त्यांच्याकरितां मतदार-संघ काढावे व त्यांत मात्र ही अट ठेवूं नये. आपलें मत काँग्रेसला स्वीकारावयास लावणें हें आपलें काम. नगरचे सप्तर्षि यांनीं आपलें मत असें प्रदर्शित केलें कीं, अट काढून टाकली तर मवाळांत व आपणांत फरक काय राहिला ? काँग्रेसच्या नांवांत जादू आहे. सदाशिवराव केळकर हे म्हणाले कीं, आपला पक्ष स्थापन करीत असतां, आपल्या पक्षाच्या सभासदानें दुसऱ्या एखाद्या संस्थेचे सभासद असावें कीं नाहीं हा प्रश्नच येतो कसा ? पन्नालाल व्यास ह्यांनीं हिंदींत भाषण करून, 'राष्ट्रीय सभेशीं संबंध कायम राखला पाहिजे' या मताचाच पुरस्कार केला. बॅप्टिस्टाकाका म्हणाले, महाराष्ट्र राजकीय शहाणपणाकरितां प्रसिद्ध आहे. मग तेथें राष्ट्रीय सभेची अट ठेवून वाद कां माजवितां ? जे राष्ट्रीय सभेंत आहेत त्यांनीं बाहेर यावें असें कोणीच म्हणत नाहीं. पण इतरांना आंत येण्याचा आग्रह कां ? पक्षाच्या तत्त्वावर विश्वास ही एकच अट पक्षांत सामील होण्यास बस्स आहे. न. चिं. केळकर म्हणाले, मी स्वतः राष्ट्रीय सभेच्या सभासदत्वाची अट असली पाहिजे याच मताचा आहे. निदान बृहन्महाराष्ट्रापुरती तरी ही अट प्रारंभीं ठेवावी. इतर प्रांतांना व

मुंबई शहराला वाटेल तर मोकळीक ठेवावी. अट ठेवली तरी बेझंटपक्षाचे लोक आंत येतील. बरें, अट काढून टाकली तरी नेमस्त, लिबरल किंवा ब्राह्मणेतर आंत येणार नाहींत, मग अट कां काढा ? अट काढून टाकल्यानें इतर प्रांतांतून पुष्कळ प्रमुख सभासद झाले असें दिसलें तर एकवाक्यतेकरितां ती काढून टाकावी कीं काय याचा विचार पुढें पाहूं. शेवटीं मुकुंदराव जयकर यांनीं आपलें मत निवेदन केलें व ते म्हणाले, खास महाराष्ट्रापुरता या प्रश्नाचा विचार केला तर राष्ट्रीय सभेच्या सभासदत्वाचा निर्बंध अपायकारक नाहीं. तथापि महाराष्ट्रीय परिस्थिति व मुंबईची व इतर प्रांतांतील परिस्थिति यांत फार फरक आहे. तेव्हां या बाहेरच्या प्रांतांच्यां दृष्टीनेंहि या विषयाचा विचार करावा.

## अधिकाराच्या जागांचा स्वीकार

रविवार सायंकाळपर्यंत अशा तऱ्हेची चर्चा झाली. रात्रीं दुसऱ्या वादग्रस्त मुद्द्यांचा परामर्श सुरू झाला. त्या वेळीं बॅरि. जयकर, बॅप्टिस्टा वगैरे पुढाऱ्यांनीं अशा तऱ्हेचा कोटिक्रम केला कीं, अधिकाराच्या जागा म्हटल्या म्हणजे त्यांत दिवाण व कार्यकारी-मंत्रि असा विधिनिषेध करूं नये. कायदा, पोलीस, जमाबंदी हीं खातींहि अत्यंत महत्त्वाचीं आहेत, तींहि आपल्या हातांत आलीं तर घेतलीं पाहिजेत. बॅरि. देशमुख, डॉ. मुंजे वगैरे मंडळी दिवाणगिरीपर्यंत जाण्यास सर्वथैव कबूल, पण पुढें मात्र एक पाऊलहि जाण्यास तयार होत ना. ते म्हणत तुमची विवेचन-पद्धति वगैरे सर्व कांहीं आम्हांस पूर्णपणें पटते, पण केवळ आमच्या भावनेसाठीं एक वर्ष वाट पहा. भिकमसिंह म्हणाले, श्री. तांबे यांची नेमणूक हा एक स्वराज्य पक्षाचा मी विजयच समजतों. आयरिश देशभक्तांनींहि सर्व सरकारी जागा पटकावल्याच कीं नाहीं ? सर्व सिव्हिल सर्व्हंट्स जर हिंदी झाले तर स्वराज्य जवळ येईल असें मला वाटतें. अधिकारावर आपलीं माणसें असलीं म्हणजे किती फायदा होतो याचा मला अनुभव आला आहे. डॉ. मुंजे म्हणाले कीं, दिवाणगिऱ्या व कौन्सिलाचे अध्यक्षपद हीं घेण्यास हरकत नाहीं, पण कार्यकारी मंडळाचें सभासदत्व आपण कांहीं काळपर्यंत स्वीकारूं नये.

## नवीन पक्षाचें नामकरण

वादग्रस्त मुद्द्यांचा इतका कीस काढून चर्चा आगाऊ होऊन गेल्यामुळें औपचारिक काम फारच थोडक्यांत व सहज उरकलें जावें हें साहजिक होतें व

त्याप्रमाणें सोमवारीं सर्व काम बिनधोक पार पडलें. दोनहि मुद्द्यांवर कशी तडजोड झाली हें पुढें दिलेल्या ठरावांवरून दिसून येईलच. पण या दोन महत्त्वाच्या मुद्द्यांचा लवकर निकाल लागला तरी नवीन पक्षाचें नांव काय असावें, त्याची घटना कशी असावी, या विषयावर थोडीफार चर्चा झालीच. नागपूरकरांचें म्हणणें असें कीं, 'स्वतंत्र स्वराज्य पक्ष' हें नांव द्यावें. तपस्वी परांजपे यांनीं 'कॉंग्रेस लिबरल' हें सुचविलें! बामणगांवकरांचें म्हणणें कीं, जुनेंपुराणें 'इंडियन नॅशनॅलिस्ट' हेंच बरें. न. चिं. केळकर म्हणाले कीं, ज्याच्याकरितां आपण इतकें भांडतों तेंच म्हणजे 'प्रतियोगी सहकारपक्ष' या नांवानेंच आपण आपणांस संबोधून घेणें हें योग्य. एकानें 'प्रतियोगी स्वराज्य पक्ष' हें नांव पुढें आणलें. पण अखेरीस बॅरि. बॅप्टिस्टा व अणे यांनीं केळकर यांच्या सूचनेस पाठिंबा दिला व तेंच नांव मुक्रर झालें.

### घटना

नवीन पक्षाची घटना कशी असावी याचीहि थोडी चर्चा झाली. तींत दोन पक्ष होते. एका बाजूची विचारसरणी अशी होती कीं, अध्यक्ष वगैरे कांहीं नको, प्रत्येक प्रांताला एकेक चिटणीस असावा व त्याला एक सल्लागार मंडळ असावें. दुसऱ्या बाजूचें मत असें कीं, पक्ष म्हटला म्हणजे तो सायसंगीन पाहिजे. अध्यक्ष पाहिजे, उपाध्यक्ष, चिटणीस वगैरे सर्व प्रभावळ पाहिजे. या दुसऱ्या पक्षाचें म्हणणेंच सर्वांस योग्य वाटलें व त्याप्रमाणें सर्व नेमणुकी वगैरे करण्यांत आल्या. आणखी एकदोन ठराव मंजूर करण्यांत आल्यावर, बॅरि. जयकर यांनीं समारोप केला व आपल्यापुढील कार्य अत्यंत कठीण आहे हें जाणून आपण सर्वजण त्यास हात घालूं या, म्हणजे यश आल्याखेरीज राहणार नाहीं, असें आत्मविश्वासपूर्वक त्यांनीं सांगितलें. अध्यक्षांचे आभार मानण्याच्या सूचनेस पाठिंबा देण्यास बॅरि. बॅप्टिस्टा उठले व म्हणाले, 'आजचा हा प्रकार पाहून मला एका शेतकऱ्याच्या गोष्टीची आठवण होते. यंत्र सुरू होण्यापूर्वी तो म्हणाला कीं, हें मुळीं सुरूच होणार नाहीं. पुढें तें सुरू झालें तेव्हां तो म्हणाला कीं, आतां हें कधीं थांबणारच नाहीं! आपणहि यापुढें या खात्रीनें कामास लागूं या.' नंतर सर्व प्रतिनिधींचेहि चिटणिसांनीं आभार मानले व परिषद् समाप्त झाली.

---

# दिल्लीचीं बातमीपत्रें

## पत्र नं. १

नवी दिल्ली, ता. २१-१-२७

लेजिस्लेटिव्ह असेंब्लीची नवी यात्रा सुरू झाली. क्षेत्र भरूं लागलें, भरलें म्हटलें तरी चालेल. असेंब्ली, स्टेट कौन्सिल वगैरे सर्वांचे सभासद यंदापासून नव्या दिल्लींतच एकत्र राहावयाचे म्हणून अधिक बंगले बांधण्यांत आले. रहदारी वाढणार म्हणून मुख्य रस्ते मुंबईसारखे डांबरी केले. सगळ्या कौन्सिलांचें काम नव्या इमारतींत एकाच ठिकाणीं चालावयाचें. सर्व सरकारी कचेऱ्या नव्या सेक्रेटरीएटच्या इमारतींत आल्या. यामुळें दिल्ली शहराचा संबंध पुष्कळसा तुटला. मात्र नव्या दिल्लींत अजून बाजार दुकानें नाहींत आणि वाहतुकीचीं साधनें कमी; स्वतःच्या मोटारी ठेवणाऱ्या श्रीमान् लोकांनींच या नव्या शहरांत राहावें अशी योजना दिसते. राजपुत्र गौतमबुद्ध याला सुख व श्रीमंती यांशिवाय दुसरें कांहीं दृष्टीस पडूं नये अशी व्यवस्था करण्यांत आली होती. तशीच नव्या दिल्लींत व्हाइसरॉय राहावयास आल्यावर व्हावयाची असावी.

*    *    *

"यंदा दिल्लीस थंडी नेहमींपेक्षां अधिक" हें पालुपद नेहमींचेंच आहे. पण खरें बोलावयाचें तर थंडी केवळ लहरीप्रमाणें केव्हां कमी केव्हां अधिक पडते इतकेंच. तथापि थंडी सकाळपेक्षां संध्याकाळींच अधिक भासते. सूर्य क्षितिजावर बराच असतां आपला प्रभाव दाखविण्यांत थंडीला पराक्रम वाटत असावा. सकाळीं आठाचे आधीं रहदारी सुरू होत नाहीं व रात्रीं साताचे पुढें ती टिकत नाहीं. नवी दिल्ली हें बंगले व राजवाडे यांचें शहर असलें तरी अजून इतकें उदास व जंगली आहे कीं, रात्रीं आठ वाजल्यापासूनच कोल्हेकुईची गर्दी ऐकूं येते. उलट माणसाच्या वस्तीला चिकटून राहणाऱ्या कोंबड्यांचें आरवणें क्वचितच ऐकूं येतें. साऱ्या जगाचा हा अरुणदूत नव्या दिल्लींत फारसा आढळत नाहीं. नाहीं म्हणावें तर असा बंगला क्वचितच असेल कीं जेथें त्याचा उपयोग तीन त्रिकाळ आहाराकरितां केला जात नसेल.

खावीं उकड अंडीं सकाळीं ।
दुपारीं कुक्कुटबाळें कोंवळीं ॥

माता-पितर संध्याकाळीं ।
वंश क्षय एका दिवशीं ।।

या मंत्राचा जपच नसला तरी त्याचा प्रत्यक्ष आचार येथें सर्वत्र सुरू आहे ! मग शुक्राचार्यांच्या पोटांत गेलेल्या कचानें आरोळी द्यावी, त्याप्रमाणें स्वतःला भक्ष्यस्थानीं घालणाऱ्या लोकांना हे कोंबडे पहांटे पोटांतूनच आरोळी देत असतील तर कोणास ठाऊक ?

* * *

यंदाच्या असेंब्लीच्या कामाला सुरुवात होण्यापूर्वी एक पुण्याहवाचनाचा समारंभ झाला. खरोखर ती वास्तुशांति होती; पण समारंभाच्या भाषणांत व्हाइसरॉयसाहेबांनीं शांतिपाठ म्हटला, म्हणून त्याला पुण्याहवाचन म्हटलें तरी चालेल. हा समारंभ कौन्सिलच्या नव्या इमारतीचा प्रवेशसमारंभ होय. ह्या इमारती आज ५ वर्षें होऊं घातल्या होत्या. अजूनहि त्या पुऱ्या झाल्या नाहींत. तथापि वास्तुशांतीला जितकें घर पुरें व्हावें लागतें तितक्या ह्या इमारती पुऱ्या झाल्या आहेत. नरेंद्रमंडळाची सभा पुरी तयार झाली आहे आणि असेंब्लीचें कामहि नव्या सभागृहांत परवांपासून सुरू झालें. समारंभ बराच टोलेजंग झाला. तो पाहून पुष्कळांना, लॉर्ड कर्झन व लॉर्ड हार्डिंज यांच्या वेळच्या दरबारांची आठवण झाली. शिवाय त्या दरबारांना कॅनव्हासच्या तंबू-शिवाय अधिक वैभव लाभलें नव्हतें. हल्लींचा समारंभ एवढ्या प्रचंड इमारती-पुढें झाला कीं, समारंभापेक्षां इमारतीकडेच प्रेक्षकांचें लक्ष अधिक वेधलें होतें. कौन्सिलचे सभासद तर हजर होतेच. पण राजे महाराजेहि होते, आणि कांहीं तर जवाहिराच्या मुंडवळ्या बांधून इतके नटले होते कीं, समारंभाचे आद्यदैवत व्हाइसरॉय नसून हे राजपुत्रच असावेत असें वाटे ! व्हाइसरॉय यांच्या भाषणांत मामुली विचारापलीकडे कांहीं फारसें नव्हतें. पण वाटोळ्या इमारतींचे गुण सांगतांना, वर्तुळ ही अविनाशाची खूण आहे असें जेव्हां त्यांनीं सांगितलें. तेव्हां पुष्कळांना मनांत हसूं आलें. कांहीं झालें तरी हल्लींची पिढी पुढें काय होईल हें पाहण्याला जगत नाहीं हें खरें. तथापि दिल्लीच्या प्रचंड आणि उध्वस्त झालेल्या राजवाड्यांच्या समोर बांधलेल्या ह्या नव्या इमारती पाहून व्हाइसरॉयसाहेबांचें अविनाशी पुराण कोणाला पटण्यासारखें नव्हतें. ब्रिटिश सरकारच्या राज्यापर्यंत तरी या इमारती टिकतील, हें त्यांचें म्हणणें मात्र खरें होईल यांत शंका नाहीं. पण राजेलोक सहसा आपलें राज्य

आणि इमारतींचें जीवित, ह्यांचा मेळ घालून त्या बांधीत नाहींत; तर वैभव-लालसेला भुलूनच त्या बांधतात. बाकी वैभवाची फुशारकी वाटावी अशाच ह्या इमारती आहेत ह्यांत शंका नाहीं. कारागिरानें ग्रीक, रोमन, मुसलमानी ह्या सर्व प्रकारच्या शिल्पकलांचा समावेश करून इमारती अशा बांधल्या आहेत कीं पाहणाराला त्यांत नखाइतकीहि नाजूक कारागिरी दिसणार नाहीं! पण इमारतीचा विस्तार, त्यांची उंची व त्यांची प्रमाणबद्धता हीं खरोखर मनांत भरण्यासारखीं आहेत.

* * *

तारीख १९ रोजीं सभासदांचा शपथविधि झाला. श्री. पटेल ह्यांची निवडणूक या वेळीं झाली नसल्यामुळें, मद्रासचे एक आनुभविक सभासद मि. रतनस्वामी पिले यांची नेमणूक अध्यक्षाचे जागीं सरकारनें केली होती. दुसऱ्या दिवशीं पटेल यांची रीतसर निवडणूक झाली. पण मतें मोजण्यापर्यंत निवडणुकीची पाळीच आली नाहीं. कारण पटेल यांना कोणी प्रतिस्पर्धी उभा राहिला नव्हता. डॉ. गौर यांनीं थोडी गडबड करून पाहिली, पण त्यांना मत कोण देणार? पटेल स्थानापन्न झाल्यावर ठरावाप्रमाणें अभिनंदनपर भाषणें झालीं. पटेल यांचें उत्तर विशेष पंडितगिरीचें नव्हतें. निवडणूकहि दुसऱ्या वेळची आणि प्रतिस्पर्धी कोणी नाहीं म्हणून सहजच कौतुक कमी होतें, आणि सर्व विधि औपचारिक झाला, पण पटेल यांनीं आपल्या स्वभावाप्रमाणें, ज्यांनीं त्यांना पूर्वीं मत दिलें नव्हतें त्यांना जातां जातां हळूच तडाखा दिला.

* * *

ता. २० रोजीं फक्त अध्यक्षांच्या निवडणुकीचेंच काम झालें. अध्यक्षांचें सर्व पक्षांतर्फे व सरकारतर्फे निरनिराळ्या सभासदांनीं अभिनंदन केलें. पं. नेहरू यांनीं पटेल हे आपल्या पक्षांतले असल्याबद्दल धन्यताबुद्धि प्रदर्शित केली! पटेल यांनीं उत्तर देतांना अध्यक्षस्थानावरून करावयाच्या कामांत राजकीय मतें बाजूस ठेवीन असें सांगितलें. पण हें त्यांनीं सांगण्याचीहि जरूरी नव्हती. कारण एकदां अध्यक्ष झाल्यापासून त्यांचीं राजकीय मतें मौनव्रताच्या पडद्यांत दडूनच बसलेलीं आहेत व केवळ अध्यक्षस्थानावरून नव्हे तर बाहेरहि हीं बाजूस ठेवलेलीं मतें जवळ बोलावण्याचें पाप त्यांच्या हातून होत नाहीं! 'जन्मभूमि' या मच्छलीपट्टमच्या पत्रकर्त्यानें म्हटल्याप्रमाणें कौन्सिलांतील एकजात अडवणुकीचे उत्पत्तिस्थितिलयकर्ते पटेल हेच होत! कायदेभंग

चौकशी-कमिटीची कौन्सिलविध्वंसनार्थ कौन्सिलप्रवेशास अनुकूलता मिळविण्यास पटेल हेच कारण. पुढें या धोरणाची तीव्रता कायम ठेवणारे पटेलच व नंतर अध्यक्षपद स्वीकारून या अडवणुकीच्या धोरणास मूठमाती देणारेहि तेच होत!

* * *

बिनसरकारी सभासदांचें बिल आणि ठराव यांची पहिली सोडत निघाली; तींत श्री. केळकर यांचीं दोन बिलें, नियोगी यांचीं दोन, डॉ. गौर यांचीं दोन, मौ. महंमद याकूब यांचीं दोन, दोरास्वामी अय्यंगार यांचीं दोन अशीं सुमारें बारा बिलें आहेत. केळकरांचें बिल सक्तीनें जमीन घेण्याबाबतच्या (लॅन्ड ॲक्विझिशन ॲक्टाच्या) कायद्याबाबत दुरुस्तीचें आहे. ज्यांची जमीन कायद्यानें घेतली जाते त्यांना उपद्रव कसे होतात, त्यांचें नुकसान कसें होतें, त्यांना ह्या कायद्यानें उपाय सुचविले आहेत. श्री. नियोगी यांचींहि बिलें उपयुक्त आहेत. ठरावाची सोडत निघाली त्यांत जोगिया यांचें राजकीय कैदी व त्यांचा इनसाफ यासंबंधानें, भूपेंद्र रॉय यांचे त्याच आशयाचे, बी. दास यांचे राजकीय मागणीचे, अमरनाथ दत्त यांचे राजकीय कैद्यांचे आणि नीळकंठदास यांचे त्याच अर्थाचे, असे ठराव असून इतरहि कांहीं आहेत. तात्पर्य, ठरावाच्या पहिल्याच जोडींत राजकीय कैद्यांचा प्रश्न पुढें येणार हें ठरलें.

* * *

ता. २१ रोजीं नित्यक्रमांतील कामापेक्षां नैमित्तिक कामासच विशेष महत्त्व आलें. हें नैमित्तिक काम म्हणजे पं. मोतिलाल नेहरू यांनीं आणलेली तहकुबीची सूचना होय. तहकुबीची सूचना हा एक पार्लमेंटाचा रूढ संप्रदाय असून तो जसाच्या तसाच आपल्या कौन्सिलांत उचलला आहे. तो असा कीं, रीतसर ठरावरूपानें एखाद्या प्रश्नाबद्दल मतप्रदर्शन करावयाचें असल्यास त्याला नियमाप्रमाणें आगाऊ सूचना लागते, पण तहकुबीची सूचना ही वाटेल तेव्हां आणतां येत असल्यामुळें, अमुक गोष्टीचा विचार करण्यासाठीं असेंब्लीची बैठक तहकूब करावी अशा अर्थाचें वाक्य तहकुबीस जोडून, आगाऊ सूचना नसतांहि कोणताहि प्रश्न उपस्थित करतां येतो. मात्र त्यास अध्यक्षांची परवानगी लागते. पंडित नेहरू यांची सूचना अशी होती कीं, बंगालच्या रेग्युलेशन अन्वयें चौकशीवांचून तुरुंगांत ठेवलेले श्री. सत्येंद्रचंद्र मित्र हे असेंब्लीसाठीं निवडून आलेले असल्यामुळें त्यांस असेंब्लींत हजर राहण्याची मोकळीक

मिळावी. या सूचनेस अध्यक्षांनीं परवानगी दिली व चालू काम संपल्यावर ती विचारार्थ निघाली.

* * *

पंडित मोतिलाल नेहरू म्हणाले कीं, श्री. मित्र यांना असेंब्लींत येण्याला प्रतिबंध करण्यांत मतदारसंघाच्या व श्री. मित्र यांच्या कायदेशीर हक्काची पायमल्ली होत आहे. बंगाल-कौन्सिलचे सभासद असतांनाच त्यांना पकडण्यांत आलें व तेथेंहि त्यांस सरकारनें हजर राहूं दिलें नाहीं. यानंतर ते असेंब्लींत बिनहरकत निवडून आले. त्यांना बैठकीस हजर राहण्याबद्दल व्हाइसरॉयांचें निमंत्रणहि गेलें. पण व्हाइसरॉयांचें निमंत्रण पाळण्याच्या आड मधले अधिकारी येत आहेत. यानंतर त्यांनीं पार्लमेंटच्या सभासदांस बैठकीपूर्वी व मागून ४० दिवस पकडतां येत नाहीं या विलायतेंतील रूढीचा उल्लेख केला. पण सर अलेक्झांडर मुडिमन यांनीं आपल्या भाषणांतील एकाच वाक्यांत या संबंधांतील सरकारी अंतःकरणाचें अंतःस्वरूप उघडें केलें. असेंब्ली हें पार्लमेंट नव्हे, तेव्हां असेंब्लीच्या सभासदांना जो हक्कच नाहीं त्याची पायमल्ली कशी होणार असा त्यांनीं सवाल टाकला! असेंब्ली हें पार्लमेंट नव्हे तर त्याचें एक पोकळ सोंग आहे येवढें त्यांनीं सांगून टाकलें असतें म्हणजे त्यांच्या वाक्याची समस्यापूर्ति झाली असती. यानंतर मि. अमरनाथ दत्त, श्रीनिवास अय्यंगार, जिना, रंगा अय्यर, गोस्वामी व मालवीय यांचींहि या उपसूचनेवर भाषणें झालीं. आणि दोन तासांच्या या चर्चेनंतर ती ६४ वि. ४६ मतांनीं मंजूर झाल्यावर सरकारचा निषेध म्हणून त्या दिवशीची बैठक खलास झाली.

* * *

घर केलें म्हणजे चुली मांडण्याचा उद्योग सुरू होतो, त्याप्रमाणें निरनिराळ्या राजकीय पक्षांच्या घटनांचें काम सुरू आहे. पण लोकांना सांगण्यासारखें नवें कांहींच नाहीं म्हटलें तरी चालेल. स्वराज्य पक्ष, स्वतंत्र काँग्रेस पक्ष, प्रतिसहकार पक्ष, मुसलमान पक्ष, युरोपियन पक्ष आणि जो कशांतच समाविष्ट होत नाहीं अशा लोकांचा एक पक्ष किंवा आवळ्यांची मोट इतके घटक असेंब्लींत आहेत. अगदीं नियम बांधून एकी करावयाची म्हटलें तर खरोखर एकी कोणाचीच होणार नाहीं. पण उपक्रम सरकारचे हातीं, आणि सरकारचें काम बरेंचसें वादग्रस्त व जनतेच्या अनाहिताचें असल्यामुळें ह्या निरनिराळ्या पक्षांची एकी न बोलतांच होणार आहे. बाकीचे भेद हे खाण्या-

पिण्याचे भेद किंवा पोषाक-पेहरावाचे भेद ह्यासारखे राहतील; म्हणजे त्यांत मतस्वातंत्र्य, त्रिगुणात्मक स्वभाव आणि छानछोकीचे किंवा ऐटदारी कपडे दाखविण्याची हौस यापलीकडे त्यांत फारसें कांहीं असणार नाहीं.

* * *

ता. २१ रोजीं स्वराज्य पक्षाची सभा होऊन पं. नेहरू यांना अध्यक्ष व श्रीनिवास अय्यंगार यांस उपाध्यक्ष, श्री. रंगास्वामी अय्यंगार व नीळकंठदास यांस चिटणीस व मि. किडवाई व षण्मुखम् चेट्टी यांस मुख्य व दुय्यम प्रतोद नेमण्यांत आलें. स्वराज्य पक्ष हें नांव आतां जाऊन कॉंग्रेस पक्ष हें नांव सर्वत्र उपयोगांत येत आहे. इतर पक्षांचीहि संघटना होत आहे. मंगळवारीं असेंब्ली हॉलमध्यें निरनिराळया पक्षांची बसण्याची व्यवस्था स्वतंत्र व्हावयाची असून प्रत्येकास किती जागा लागतील याबद्दल अध्यक्षांना कळवावयाचें आहे. कॉंग्रेस पक्षाचें बळ सुमारें ४५, राष्ट्रीय पक्षाचें बळ २० असें असून कोठेंच न जुळणारे असे स्वतंत्र २० व युरोपियन १२ अशी वर्गवारी पडेल असें वाटत आहे. मंगळवारपर्यंत अर्थातच प्रत्येक पक्ष आपापलें बळ वाढविण्याचा प्रयत्न करील. कदाचित् स्वतंत्र पक्षांतूनहि आणखी कांहीं पोटपक्ष निघतील. पण पंडित मोतिलाल नेहरूंच्या तहकुबीच्या सूचनेसारखें राष्ट्रीय महत्त्वाचे प्रश्न उपस्थित झाल्यास सर्व लोकपक्षीय एकत्र होतात हें त्यावरील ६४ या मतसंख्येवरून दिसून आलें व तसेंच पुढेंहि होईल.

* * *

तारीख २४ रोजीं व्हाइसरॉयसाहेबांचें भाषण असेंब्लीला उद्देशून होईल. पण खऱ्या कामाला सुरुवात अशी तारीख २५ पासून होणार आहे. प्रथमपासूनच वादग्रस्त गोष्टी पुढें येणार असल्यामुळें वादाला भर व रंग येईल असें दिसतें. हुंडणावळीचा प्रश्न सर्वांत मोठा. १६-१८ चें भांडण ऐकण्यांत अनभिज्ञ लोकांना तर हरदासी गोष्टीची आठवण होईल. “दोन साधू भेटले; एकानें दोन बोटें उचललीं व दुसऱ्यानें त्याला उत्तर म्हणून तीन बोटें उचललीं.” पण हा वाद वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झाल्यावर तरी ह्या १६-१८ चें महत्त्व काय आहे, आणि त्याच्याहि पोटांत असलेल्या सोन्याच्या नाण्याच्या प्रश्नांतील रहस्य काय आहे, हें कळून आल्याशिवाय राहणार नाहीं. सर पुरुषोत्तमदास ठाकूरदास, सर व्हिक्टर ससून, विद्यासागर पांड्या वगैरे तज्ज्ञ लोक दुसऱ्या बाजूला असल्यानें अगदीं आंतलीं आंतडीं बाहेर निघाल्या-

शिवाय राहणार नाहींत. बंगालचे राजकीय कैदी यांचाहि प्रश्न, असाच कोणत्या तरी स्वरूपांत पुढें येईलसें दिसतें. या सर्वांवरून कौन्सिलच्या कामांत सहकारितेला अवसर किती आणि भांडण्याला किती हें आपोआपच कळून येईल.

## पत्र नं. २

ता. २८-१-२७

दिल्लीस लेजिस्लेटिव्ह असेंब्लीच्या कामास ता. १९ रोजींच सुरुवात झाली. परंतु नव्या ले. असेंब्लीची ही पहिलीच बैठक. तिला व्हाइसरॉयांच्या आशीर्वादावांचून खरा शास्त्रोक्तपणा येणार नसल्यामुळें असेंब्लीचें खरें काम ता. १९ रोजीं सुरू न होतां ता. २४ रोजीं व्हाइसरॉयांनीं सूत्रधार बनून नांदी म्हटली त्याच वेळीं सुरू झालें असें म्हणण्यास हरकत नाहीं. व्हाइसरॉय भाषण करणार त्या अर्थी तें महत्त्वाचें असलेंच पाहिजे असा सदर भाषणाबद्दल सामान्यतः ग्रह व्हावा व त्यांच्या तोंडांतून काय वाक्यें पडतात इकडे जनतेचें लक्ष असावें, यांत सांगण्यासारखें तें काय आहे! पण हिंदी राजकारणांतील थंडगारपणा लक्षांत घेतां व्हाइसरॉयांच्या भाषणांत चित्तवृत्ति उचंबळून जाण्यासारखा गुण असेल अशी या वेळीं कोणी अपेक्षा तरी कां करावी?

*  *  *

माजी व्हाइसरॉय लॉर्ड रेडिंग असेंब्लींत बोलावयास येत तेव्हां उजवीकडे व डावीकडे वळून पाहात. पण विद्यमान व्हाइसरॉय लॉर्ड आयर्विन कोणीकडेहि वळून न पाहतां असेंब्लींत नाकासमोर पाहात आले. रेडिंगसाहेब बसून बोलत तर आयर्विनसाहेब उभ्यानेंच बोलले. लॉर्ड रेडिंग यांचा आवाज खडा व साखरेसारखा गोड होता; पण लॉर्ड आयर्विन यांचा आवाज श्रोत्यांस कान ताणून ऐकावा लागत होता. हाच काय तो दोन व्हाइसरॉयांमधील फरक आणि त्याहूनहि मोठा फरक आयर्विनसाहेब सर्वांत तीन ताड उंच आहेत हा. पण या फरकामुळें व्हाइसरॉय लॉर्ड आयर्विन यांच्या भाषणांतील धोरणांत मुळींच फरक पडला नाहीं. रेडिंगसाहेब दहा वेळां जें बोलले होते तेंच आयर्विनसाहेब अकराव्या वेळीं बोलले. काय झालें व काय होणार हे कोणत्याहि व्हाइसरॉयांच्या भाषणांतील दोन मुख्य भाग असावयाचे. दक्षिण-आफ्रिकें-

तील लढ्याचा समाधानकारक निकाल लागण्याची आशा आहे. गेल्या वर्षीं जाहीर झाल्याप्रमाणें हिंदुस्थानास मिळावयाचें आरमार तयार होऊन हिंदुस्थानच्या किनाऱ्याकडे डोळे लावून बसलें आहे. बंगालचे राजकीय कैदी सोडावयाचेच आहेत, परंतु ते सोडल्यानंतर बंगाल्यांत ब्रिटिश राज्य उलथून पाडण्याची खटपट होणार नाहीं अशी खात्री पटल्यानंतर ते सोडावयाचे आहेत. हिंदुस्थानास यापुढील राजकीय हक्कांचा हप्ता देण्याचा अधिकार पार्लमेंट सभेचा आहे. ब्रिटिश सरकारशीं शत्रुत्व करावयाचें सोडून मित्रत्वानें वागूं लागाल तर पार्लमेंट तुमची इच्छा तृप्त करील. इ. गोष्टी त्यांच्या भाषणांत होत्या.

* * *

लॉर्ड आयर्विन यांनीं या सांगितलेल्या सर्व गोष्टी अलीकडे सर्वांस चांगल्याच पाठ झाल्या आहेत. त्या ऐकून श्रोत्यांचा कोणताहि मनोविकार जागा होण्याची भीति नव्हती. परंतु अशा प्रकारचें आपलें शिळें भाषण कोणासच आवडणार नाहीं अशी व्हाइसरॉय लॉर्ड आयर्विन यांसहि शंका वाटली असावी. नाहीं तर हिंदुस्थानांतून चीनवर सैन्य पाठवावयाचें आहे ह्या बातमीची तिखट मिरची त्यांनीं आपल्या भाषणांत मुळींच येऊं दिली नसती. ती मिरची घातल्यामुळें असेंब्लींतील बऱ्याच सभासदांस ठसके लागले असून त्यांचे प्रतिध्वनी हल्लीं सर्वत्र उठत आहेत. अशा प्रकारें हिरवी मिरची घालून व्हाइसरॉयांनीं हिंदुस्थानावर मोठीच खैर केली यांत शंका नाहीं. कारण त्यामुळें कॉंग्रेसचे अध्यक्ष एस्. श्रीनिवास अय्यंगार, लाला लजपतराय व पं. मदन मोहन मालवीय हे पुढारी बरेच खवळले व या प्रश्नाची वाटाघाट करण्याकरितां असेंब्लीस वेळ मिळावा याबद्दल अय्यंगार यांनीं उद्योग सुरू केला. परंतु व्हाइसरॉय आडवे आल्यामुळें त्यांचा निरुपाय झाला ही गोष्ट वेगळी. ब्रिटिश साम्राज्य बुडवावें अशी चीनची मुळींच इच्छा नाहीं. त्याला केवळ स्वतःच्या देशांत स्वतंत्रपणें वागावयास पाहिजे आहे. पण चीनची ही स्वातंत्र्यप्रियता ब्रिटिश सरकारास आवडत नसून चीनच्या पायांतील शृंखला शाबूत राखण्याकरितां पारतंत्र्याचे कडीतोडे पिढ्यानुपिढ्या वागविणाऱ्या हिंदी शिपायांस चीनवर पाठविण्यांत येत आहे. आणि हें पाप हिंदी शिपायांच्या हातून करविण्यांत येत आहे.

* * *

मंगळवार ता. २५ रोजीं असेंब्लीच्या नित्यक्रमाप्रमाणें काम सुरू झालें. पण त्याचे प्रारंभीं सर्वांस अनेक दृष्टींनीं बोधप्रद असा एक नैमित्तिक प्रसंग उपस्थित झालाच. चीनमध्यें सुरू झालेल्या स्वातंत्र्य-युद्धामुळें सर्वत्र हिंदुस्थानांत खळवळ उडाली व त्या खळबळीचें, विशेषतः हिंदुस्थानांतून हिंदी सैन्य पाठविण्याच्या सरकारी उपक्रमाबद्दल लोकांना आलेल्या संतापाचें प्रदर्शन कोणत्या तरी रीतीनें होणें जरूर होतेंच; तेव्हां या प्रश्नासंबंधीं विचार करण्यासाठीं श्रीनिवास अय्यंगार यांनीं ताबडतोब तहकुबीची सूचना पाठविली. पण असेंब्लीला परराष्ट्रीय धोरणाबद्दल चर्चा करण्याचा अधिकारच नाहीं ही अडचण मुडिमन यांनीं उपस्थित केली. त्याच्यावरहि तोड म्हणून पं. नेहरू, मालवीय व जिना यांनीं असें सांगितलें कीं इतर धोरणासंबंधीं चर्चा न करतां, कायदेमंडळाचा सल्ला घेतल्याखेरीज सैन्य परदेशांत पाठविणें बरोबर नाहीं, येवढ्याच मुद्द्यावर आम्ही चर्चा करूं. या प्रकारच्या मर्यादित चर्चेसहि मुडियन यांनीं हरकत घेतली. कारण या चर्चेस उत्तर देतांना सरकारच्या बाजूनें परराष्ट्रीय धोरणांतील गुप्त गोष्टींचा स्फोट करण्याचा प्रसंग येणार ! पटेल यांनीं मुडिमन यांची पहिली हरकत मान्य केली. कारण पटेल झाले तरी असेंब्लीच्या अधिकारक्षेत्राचा विस्तार कसा करूं शकणार ! पण आपल्या अधिकारमर्यादेंत दुसरी हरकत त्यांना बाजूला सारण्यासारखी होती व ती त्यांनीं तशी बाजूला सारलीहि.

* * *

पण एका अधिकारमर्यादेच्या कक्षेंतून ते निसटले तरी दुसरी मर्यादा शिल्लक होतीच व तिचा उल्लेखहि त्यांनीं या मर्यादित चर्चेस परवानगी देतांना केला. तो असा कीं, गव्हर्नर जनरलांनीं मनाई केली तर या चर्चेस परवानगी देतां येणार नाहीं व तसा मनाई हुकूम लगेच आलाहि ! सरकारच्या गोटांत जाऊन काम करावयाचें म्हणजे अशाच अनेक बंधनांच्या व्यूहांतून काम करावें लागतें व त्यांतच जितक्या मर्यादेपर्यंत लोकपक्षाचें कार्य रेटतां येईल तितकें रेटावें लागतें व तेवढें काम स्वराजिस्ट पटेल यांनीं फार चांगलें केलें. या तहकुबीच्या सूचनेबद्दल जीं प्रारंभीं लोकपक्षातर्फे भाषणें झालीं त्यांत हिंदी सैन्य पाठविण्याच्या सरकारी धोरणास लोक विरुद्ध आहेत हें स्पष्ट झालेंच. परवानगी दिली असती तर जळजळीत व झणझणीत भाषणांनीं तें आणखी स्पष्ट झालें असतें हें खरें. पण उलट परवानगी न मिळाल्यानें

असेंब्लीचे व तिच्या अध्यक्षाचे अधिकार कसे जखडून टाकले आहेत याचेंहि एक प्रदर्शन झालें. मर्यादा न घातली तर विरोध, घातली तर मर्यादा घालण्याच्या जाचकपणाचें प्रदर्शन, अशी दुहेरी अडचण सरकारी गोटांत शिरल्यानें आणतां येते, हें स्वराजिस्ट पटेल यांनीं उत्तम रीतीनें दाखवून दिलें. आतां गव्हर्नर जनरलांनीं नियमाप्रमाणें बंधन घातलें म्हणून पटेल यांनीं राजीनामा द्यावा असें कित्येक म्हणतील; पण त्यालाहि पटेल यांचें उत्तर ठरलेलें आहेच. तें असें कीं, मीं नियमाप्रमाणें वागण्याची अधिकारग्रहणाचे वेळींच शपथ घेतली आहे. कांहीं नियमबाह्य वर्तन झालें तरच मी राजीनामा देऊं शकेन !

* * *

तहकुबीच्या सूचनेची अशी बोळवण झाल्यावर फडणिसांनीं 'निगोशिएबल इन्स्ट्रुमेंट्स' म्हणजे हुंड्या, चेक इत्यादिकांसंबंधाच्या हल्लींच्या कायद्यांतील किरकोळ दुरुस्तीचें एक बिल व सिक्युरिटी अॅक्टाच्या दुरुस्तीचें बिल पुढें मांडलें. मि. मुडिमन यांनीं सिव्हिल प्रोसीजर कोड, रजिस्ट्रेशन अॅक्ट व लिमिटेशन अॅक्ट यांच्यांत दुरुस्त्या करण्यासंबंधाचीं बिलें पुढें मांडलीं, यानंतर सर चार्लस इन्नेस यांनीं पोलादाच्या धंद्यास संरक्षण देण्यासंबंधींचीं दोन बिलें प्रविष्ट केलीं. त्या वेळीं त्यावर वादविवाद झाला नाहीं. बिलें प्रविष्ट करण्याचे वेळीं त्यावर वाद होत नाहीं. पुढें पहिल्या व दुसऱ्या वाचनाचे वेळीं खरा वाद होतो. पण हुंडणावळ व चलन यासंबंधाचा प्रश्न मात्र फडणिसांच्या कारवाईनें इतका वादग्रस्त होऊन बसला आहे कीं, त्यासंबंधाचीं बिलें पुढें येण्यापूर्वींच वादास सुरुवात झाली. ब्लॅकेटसाहेबांच्या तीन बिलांपैकीं रिझर्व्ह बँकेसंबंधाचें बिल लोकमत अजमावण्यासाठीं प्रसिद्ध करण्याला त्यांनीं परवानगी मागितली व ती देण्यांत आली. हुंडणावळीचें पहिलें बिल त्यांनीं नुसतें 'सूत उवाच' करून ठेवलें आणि त्यावरील चर्चा बजेट प्रसिद्ध झाल्यावर व्हावी असें त्यांनीं सांगितलें. आजपर्यंत हिंदुस्थानला इंग्लंडच्या पद्धतीप्रमाणें चलन मिळेल, म्हणजे रुपये किंवा नोटा दिल्या असतां प्रत्यक्ष सोनें मिळण्याची व्यवस्था होईल असें सांगण्यांत येत होतें व सर शिवस्वामीसारख्यांनीं याच मुद्द्यावर करन्सी कमिशनच्या शिफारशींना पाठिंबा दिला होता. पण चलनाच्या बिलांत पाहावें तों सोनें देण्यासंबंधींचें कलम गाळलें असून फक्त सरकार-निर्णित दरानें परदेशच्या हुंड्या मिळतील येवढीच योजना केलेली आहे !

* * *

या बिलावरील वादविवाद बजेट पुढें आल्यानंतर व्हावा असें ठरविण्यांत फडणविसांचा कावा उघड दिसून येतो. सरकारानें रुपये पाडण्याचें बंद करून आगाऊ हुंडणावळीचा भाव वाढवून ठेवला आणि मग रॉयल कमिशन नेमलें. हेतु असा कीं, १८ पेन्सांचा भाव हा चालू व स्वाभाविक भाव आहे असें कमिशनला भासवितां यावें. त्याचप्रमाणें अगोदर १८ पेन्सांचा दर गृहीत धरून बजेट करणार आणि नंतर लोकांपुढें दराचा प्रश्न मांडणार. आगगाडीचें तिकीट विकत घेऊन मग 'मी अमक्या गांवाला जाऊं का' असें विचारण्या-सारखीच ही गोष्ट नव्हे काय ? कारण जाऊं नको म्हटलें तर आगाऊ तिकीट घेऊन ठेवलें तें फुकट जाऊन नुकसान होईल. सारांश १६ पेन्सांच्या दरानें बजेटामध्यें घोटाळा होईल अशी परिस्थिति दाखवावयाची व असेंब्लींतील कांहीं अर्धवट बोटचेपे झालेले सभासद अनुकूल करून घ्यावयाचे अशा हेतूनें ही सर्व लटपट चालू आहे. याचाच अर्थ असा कीं, आज सरकारच्या विरुद्ध बहुमत असल्याबद्दल फडणविसांची खात्री झालेली असल्यामुळें बजेट पुढें येई-पर्यंत थांबून हें लोकपक्षीय बहुमत फोडण्याचा प्रयत्न ते करणार आहेत व पुढें 'मुंडितमुंडो नक्षत्राणि पृच्छति' या म्हणीप्रमाणें अगोदर मुंडण करून मग त्याचा मुहूर्त योग्य का अयोग्य याची भवति न भवति करणार ! फडणिसांच्या या लटपटी सर पुरुषोत्तमदास ठाकुरदास, घनश्यामदास बिर्ला व जम्नादास मेहता या व्यापारी व तज्ज्ञ सभासदांनीं उघडकीस आणून त्यांचा ताबडतोब तीव्र निषेध केला.

ता. २६ रोजीं टॅरिफ बोर्डाच्या सूचनेनुसार पोलादाच्या धंद्याचें संरक्षण करणारें बिल सिलेक्ट कमिटीकडे सोंपविण्याबद्दल सर चार्लस इन्नेस यांनीं सूचना मांडली. या कमिटींत जयकर, जिना, लजपतराय, जम्नादास मेहता, आचार्य, बिर्ला, षण्मुखम् चेट्टी यांचेसारखी मंडळी असल्यामुळें ब्रिटिश साम्राज्यांतील मालाला सवलत देण्याचें घातक तत्त्व या सिलेक्ट कमिटीच्या हस्तें गाडलें जाऊन, बौंटीबरोबरच पूर्वीसारखीच जकातहि कायम केली जाईल, अशी आशा आहे. ता. २७ रोजीं या आठवड्याची बैठक संपली त्या दिवशीं कामकाज विशेष झालें नाहीं. प्रश्नोत्तरांना प्रथमच या दिवशीं सुरुवात झाली व एखादा विचित्र प्रश्न अगर मासलेवाईक उत्तर यांनीं उडालेल्या हशाशिवाय विशेष लक्ष वेधणारें त्यांत कांहीं नव्हतें. या प्रश्नांत सर्वांत जास्त म्हणजे एकंदर ३७ प्रश्न श्री. केळकर यांचे होते. केळकर आजारी होऊन मुंबईस गेले

असल्यामुळें त्यांचे प्रश्न श्री. अणे यांनीं विचारले. दुसरा क्रमांक मि. याकूब यांच्या प्रश्नांचा लागला. लाला लजपतराय यांची सुधारणा-कमिशनवर नेमणूक होईल काय असा प्रश्न विचारून मि. याकूब यांनीं हसें करून घेतलें! पण त्यांच्या प्रश्नांत नुसतें हसून घालविण्यापेक्षां खोल असा एक अर्थ होता. सुधारणा-कमिशनमध्यें एकादा मुसलमान नेमण्याची खटपट चालली असावी व त्याच्या जोडीला हिंदु सभासद कोण नेमला जाईल याची काळजी मि. याकूब यांना पडलेली असावी.

* * *

बॅकबे कमिटी हिंदुस्थान सरकारनें नेमलेली असून तिचा रिपोर्ट प्रसिद्ध झाला असल्यामुळें सरकारी कार्यक्रमांतच या रिपोर्टाच्या चर्चेला जागा मिळावयास पाहिजे होती; पण सरकारतर्फे या चर्चेला सुरुवात होणार नाहीं, लोकांच्या प्रतिनिधींनीं वाटल्यास ठराव आणावेत असें सर बी. एन्. मित्र यांनीं सरकारतर्फे सांगितलें! आधींच बिनसरकारी ठरावांना दोन किंवा फार तर तीन दिवस सर्व बैठकींत मिळून मिळतात. त्यांतच सरकारी पण सरकारास अप्रिय असें काम लोकांच्या गळ्यांत घालण्याचा प्रयत्न अशा रीतीनें होत असतो. दुसऱ्या एका प्रश्नास उत्तर म्हणून मि. भोर यांनीं सांगितलें कीं, दक्षिण, आफ्रिकेंतून जें सरकारी शिष्टमंडळ येथें आलें त्यास रु. ७०,००० व येथून आफ्रिकेंत गेलेल्या शिष्टमंडळास ११७००० रुपये खर्च झाला. लग्नांत अडलेल्या पक्षाला दोहोंकडचा खर्च करावा लागतो. तसाच हा प्रकार होय! असो. प्रश्नोत्तरानंतर फडणविसांनीं आणलेलें प्रांतीवरील करासंबंधाचें बिल लोकमत अजमावण्यासाठीं प्रसिद्ध करावें अशी सर व्हिक्टर ससून यांनीं सूचना आणली. त्यांचीं सूचना फडणविसांनीं मान्य केल्यामुळें त्या दिवसाचें काम लवकरच संपलें. आतां येत्या सोमवारीं उपाध्यक्षांची निवडणूक व्हावयाची असून त्यासाठीं उमेदवारांची चढाओढहि बरीच आहे, पण त्यांतल्यात्यांत खरी चुरस खासदार नियोगी, शेरवानी व याकूब हसन यांच्यांत आहे.

## पत्र नं. ३

ता. ८-२-१९२७

कॉंग्रेसचे अध्यक्ष श्रीनिवास अय्यंगार हे असेंब्लींतील थंड कारभारानें इतक्यांतच थंडावल्यासारखे दिसतात. असेंब्लींत सरकारविरुद्ध चुरचुरीत अगर दणदणीत वक्तृत्व गाजविण्याची संधि फारशी लाभत नाहीं यामुळें

त्यांनीं एक निराळीच योजना सुचविली आहे. ती अशी कीं, प्रांतिक व वरिष्ठ कायदेमंडळांतील सर्व लोकनियुक्त सभासदांनीं एक 'कन्व्हेन्शन पार्लमेंट' भरवावें. सरकार राउंड टेबल परिषद् बोलावीत नाहीं, ती अशा रीतीनें लोकांनीं भरवावी. या परिषदेंत स्वराज्याची योजना बारीकसारीक तपशिलासह तयार करावी व ती ब्रिटिश व हिंदी सरकारपुढें मांडून त्यांचेकडून ठराविक मुदतींत उत्तर मागावें. वक्तृत्वाच्या दृष्टीनें नसली तरी राष्ट्रीय चळवळीच्या दृष्टीनें श्री. अय्यंगार यांची ही सूचना विचार करण्यासारखी आहे. या योजनेस स्वराज्य पक्ष किंवा काँग्रेस यांचें पाठबळ मिळण्याची मात्र फारशी आशा नाहीं. कारण स्वराज्यासंबंधीं विधायक योजना करून ती सरकारपुढें मांडण्याचें काम करणें म्हणजे ध्येयवादाच्या उच्च वातावरणांतून व्यवहाराच्या भूमिकेवर उतरण्यासारखें आहे. आणि व्यावहारिकपणाचा यत्किंचितहि संबंध आणणें म्हणजे आपल्या मानीव उज्ज्वल जहालपणास बट्टा लावण्यासारखें होय असेंच अजूनहि काँग्रेसमधील बऱ्याच लोकांना वाटतें. पूर्वीं बेझंटबाईनीं केलेला कॉमनवेल्थ ऑफ इंडिया बिलाचा प्रयत्न याच स्वरूपाचा होता. पण त्या वेळीं काँग्रेसनें तो विचारांत घेण्याचें देखील नाकारलें! श्रीनिवास अय्यंगार यांनीं देखील ही सूचना नुसती बोलून न दाखवितां प्रत्यक्ष अमलांत आणण्याचें ठरविलें तर त्यांना देखील अजूनहि या व्यवहारविन्मुख ध्येयवादी वृत्तीचा निराशाजनक अनुभव येण्याचा संभव आहे.

* * *

असेंब्लीच्या बाहेरील दिल्लीचें वातावरण सध्यां हिंदु-मुसलमानांच्या वादानें ग्रस्त झालेलें दिसतें. चीनला सैन्य पाठविण्याबद्दल हिंदूंची निषेधप्रदर्शक सभा झाल्यावर लगेच मुसलमानांनीं सभा भरवून सैन्य पाठविल्याबद्दल सरकारचें अभिनंदन केलें! याचा फायदा सरकारच्या बाजूच्या वर्तमानपत्रांनीं घेऊन चिनांत सैन्य पाठविण्यास फक्त हिंदूंचीच हरकत आहे असें जाहीर केलें! सरकार व मुसलमान यांचें हिंदूंविरुद्ध संगनमत कसें होत असतें याचें हें एक उदाहरण आहे. शुद्धि-संघटनेच्या चळवळीकडे हिंदूंचें अधिक लक्ष वेधत चाललें आहे. शनिवार ता. २९ रोजीं अखिल भारतीय शुद्धिसभेची चौथी बैठक श्रीनिवास अय्यंगार यांचें अध्यक्षतेखालीं झाली. श्रीनिवास अय्यंगार यांनीं जरा जपूनच भाषण केलें. दुसऱ्या लोकांचीं मनें दुखावतील अशा रीतीनें शुद्धि-संघटन करूं नका असा त्यांनीं हिंदूंना उपदेश केला, पण आपलें

संघटन व संवर्धन करण्यास प्रत्येक धर्मास सारखाच हक्क पोंचतो एवढें त्यांनीं मान्य केलें. शनिवारीं व रविवारीं निरनिराळ्या ठिकाणच्या आर्यसमाजिस्ट प्रतिनिधींची परिषद होऊन आर्यसमाजिस्टांच्या मिरवणुकींना मुसलमानांकडून मशिदीपुढें होणाऱ्या अडथळ्यांचा विचार करण्यांत आला. मुसलमानांच्या वाद्यबंदीच्या हट्टाला धर्मांचा, इतिहासाचा व इतर देशांतील वहिवाटीचा बिलकूल आधार नाहीं अशा अर्थाचीं भाषणें झालीं.

* * *

सोमवार ता. ३१ रोजीं असेंब्लीच्या उपाध्यक्षांची निवड झाली. या जागेसाठीं प्रथम चार उमेदवार उभे होते. सर अबदुल कयूम, मौ. महंमद याकूब, मि. शेरवानी व मि. के. सी. नियोगी. पैकीं सर अबदुल कयूम यांनीं आपलें नांव परत घेतल्याचें अध्यक्षांनीं जाहीर केलें. स्वराजिस्टांनीं आपल्यातर्फे शेरवानी नांवाचे मुसलमान गृहस्थ उभे केले होते. हेतु असा कीं, मुसलमानांची मतें मिळून ते निवडून येतील व स्वराज्य पक्षाचा आणखी एक विजय जगापुढें मिरवतां येईल ! दुसरा कोणी मुसलमानच उभा नसता तर हा डाव साधलाहि असता. पण दुसरे मौ. याकूब हेहि मुसलमान उमेदवारच उभे राहिल्यामुळें हा डाव साधला नाहीं. पहिल्यानें तिघांच्या नांवांवर मतें मोजण्यांत आलीं, त्यांत मि. याकूब यांना ५३, शेरवानी यांस ४० व नियोगी यांस १८ मतें पडलीं. दुसऱ्यांदा मतें घेतां मि. याकूब यांना ५९ व शेरवानी यांना ५४ मतें पडून याकूब हे निवडून आले. ता. ३१ रोजीं मि. सकलातवाला दिल्लीस आले व असेंब्लींत प्रेक्षक म्हणून ते हजर होते. ता. १ रोजीं श्रीनिवास अय्यंगार यांनीं त्यांस उपाहार दिला. त्या वेळीं त्यांनीं आपल्या भाषणांत असेंब्ली हें एक पार्लमेंटचें पोकळ सोंग आहे असें सांगून त्यांत रमणाऱ्या सभासदांचा त्यांनीं उपहास केला ! सायंकाळीं प्रांतिक कॉं. कमिटीतर्फे जाहीर सभेंत त्यांचें भाषण झालें.

* * *

ता. ३१ रोजीं झालेल्या प्रश्नांत श्री. केळकर यांचा सिंधमधील पुराणवस्तुखात्याला सांपडलेल्या ऐतिहासिक अवशेषांचें काय करणार याबद्दलचा प्रश्न होता. त्यांच्याबद्दल फक्त ब्रि. म्यूझियमकडूनच मागणी आली आहे असें सांगण्यांत आलें. या अवशेषांचें काय करावयाचें याची सरकारी योजना

अद्याप ठरली नाहीं. स्कीन-कमिटीच्या रिपोर्टासंबंधीं हिंदुस्थान सरकार व स्टेटसेक्रेटरी यांच्यांत पत्रव्यहार चालू असून त्याबद्दल सरकार लवकरच खुलासा करील असें एका प्रश्नास सरकारतर्फे उत्तर देण्यांत आलें. अमेरिकेंतील डॉ. सुधींद्र बोस यांनीं तेथील ब्रिटिश वकिलाकडे अर्ज केल्यास त्यांना पासपोर्ट मिळेल; पण त्यांनीं परत सुरक्षित अमेरिकेंत पोंचण्याबद्दलची हमी मागितली आहे व ती हिंदुस्थान सरकारास देतां येणार नाहीं असें गयाप्रसादसिंग व बेळवी यांच्या प्रश्नांस उत्तर मिळालें. करन्सी कमिशनपुढील अप्रसिद्ध अशा ६३ साक्षीहि प्रसिद्ध कराव्या अशी श्री. केळकर यांनीं एका प्रश्नांत मागणी केली होती. त्यास फडणविसांनीं असें उत्तर दिलें कीं, सर्व साक्षी छापून काढणें खर्चाचें काम आहे; तरी सभादांना कमिशनच्या दप्तरांतून या सर्व साक्षी पाहण्यास मिळतील. प्रश्नोत्तरांनंतर सर अलेक्झांडर मुडिमन यांनीं मुदतीच्या कायद्यांत दुरुस्ती करणारें बिल मांडलें. मक्केच्या यात्रेकरूंचे बोटींच्या अनियमितपणामुळें होणारे हाल वांचविण्यासाठीं मर्चंट शिपिंग ॲक्टामध्यें दुरुस्ती करणारें बिल मि. भोर यांनीं मांडलें व तें बऱ्याच मुसलमान सभासदांच्या सिलेक्ट कमिटीकडे सोंपविण्यांत आलें. सर बेसिल ब्लॅकेट यांचें हुंड्या व चेक यांच्यासंबंधाचें दुरुस्तीचें बिलहि व्यापारी सभासदांच्या सिलेक्ट कमिटीकडें सोंपविण्यांत आलें. त्याचप्रमाणें फडणविसांनीं आणलेलें सिक्युरिटी ॲक्टाच्या दुरुस्तीचें बिल श्री. अणे यांच्या सूचनेवरून सिलेक्ट कमिटीकडे सोंपविण्यांत आलें.

* * *

मंगळवारीं व बुधवारीं असेंब्लीच्या बैठकी अगदीं थोड्या वेळांत आटोपल्या. मंगळवारीं एकंदर १३ बिनसरकारी बिलें प्रविष्ट करण्यांत आलीं. श्री. केळकर हे लँड ॲक्विझिशन ॲक्टांतील दुरुस्तीचें बिल मांडण्यासाठीं मुद्दाम डॉक्टरांची परवानगी घेऊन एका दिवसापुरते दिल्लीस आले होते. सरकारनें कोणतीहि जमीन कायद्यानें मिळविण्याचें ठरविल्यास ती ज्या कामासाठीं घेतली जाते तें काम सार्वजनिक हितसंबंधाचें आहे कीं काय, याबद्दल कायदे-कौन्सिलांत चर्चा व्हावी व तेथें तें कार्य सार्वजनिक हिताचें ठरलें तरच सरकारास जमीन घेतां यावी आणि कॉंपेन्सेशन ठरविण्याचें काम पंचांमार्फत व्हावें अशी या बिलानें जुन्या कायद्यांत दुरुस्ती सुचविली आहे. श्री. हरविलास सारदा यांच्या बालविवाहप्रतिबंधक बिलास पुढील वाचनाचे वेळीं आपण

विरोध करणार आहों असें मुडिमन यांनीं जाहीर केलें. त्यानंतर असेंब्लीच्या कामकाजासंबंधींच्या नियमांत रंगास्वामी अय्यंगार व दोरास्वामी अय्यंगार यांनीं सुचविलेल्या दुरुस्त्या सिलेक्ट कमिटीकडे सोंपविण्यांत आल्या. या दुरुस्त्या मंजूर झाल्या तर बिनसरकारी कामकाजास अधिक दिवस मिळून अध्यक्षांसहि कांहीं अधिकार जास्त मिळणार आहेत.

* * *

बुधवारीं झालेल्या प्रश्नांत फिजी बेटांतील हिंदी लोकांसंबंधाचा प्रश्न महत्त्वाचा होता. फिजी बेटांतील युरोपियन लोकांच्या वस्तीपेक्षां हिंदी लोकांची वस्ती १६ पट असून कौन्सिलांत युरोपियन प्रतिनिधी ६ तर हिंदी प्रतिनिधी फक्त ३ च घेण्याचें तेथील सरकारनें कबूल केलें आहे. यापेक्षां अधिक प्रतिनिधी मिळण्याविषयीं सरकारनें आग्रह कां धरिला नाहीं असा प्रश्न विचारतांच मि. भोर यांनीं सरकारतर्फें असें सांगितलें कीं, 'फार ताणून धरलें असतां कांहींच मिळणार नाहीं, तेव्हां मिळालें तेवढ्यांत समाधान मानलें पाहिजे. पुढें अधिक अनुकूल काल आला म्हणजे आणखी अधिक मागतां येईल.' सरकारनें फिजीमधील हिंदी लोकांच्या हितसंबंधाचे बाबतींत स्वीकारलेलें हें दुर्बळपणाचें धोरण अर्थात-च त्वेष आणण्यासारखें होतें. फिजीमधील हिंदी लोकांच्या परिस्थितीबद्दलचा सरकारी कमिशनचा रिपोर्टहि सरकारनें जाहीर केला नाहीं. कारण काय तर त्या रिपोर्टासंबंधीं फिजी बेटांतील सरकारचा विरोध आहे. या सरकारच्या अनिष्ट धोरणासंबंधानें निषेध प्रदर्शित करण्यासाठीं पं. हृदयनाथ कुंझरू यांनीं तहकुबीची सूचना आणण्याची परवानगी मागितली. पण सरकारतर्फें त्याला हरकत घेण्यांत आली व अध्यक्षांना ती हरकत रास्त वाटून त्यांनीं परवानगी देण्याचें नाकारलें! व्हाइसरॉयांचा मनाई-हुकूम आणविण्याचीहि नोकरशाहीस गरज पडली नाहीं. यानंतर सिव्हिल जस्टिस कमिटीच्या शिफारशींना अनुसरून सिव्हिल प्रोसिजर कोडामध्यें दुरुस्ती करणारें बिल मुडिमन यांनीं मांडलें. या बिलान्वयें हायकोर्टाचे हक्क कमी होत असल्यामुळें बॅ. जयकर, श्रीनिवास अय्यंगार, बॅ. जिना व पं. नेहरू यांनीं विरोध केला व तें ४२ वि. ५८ मतांनीं नामंजूर झालें. नंतर रजिस्ट्रेशनच्या कायद्यांत दुरुस्ती करण्यासंबंधाचें सरकारी बिल वाद न होतां मंजूर झालें.

* * *

गुरुवारचा दिवस बिनसरकारी ठरावांचा होता व पहिलाच ठराव बंगालचा १८१८ चा कायदा रद्द करून बिनचौकशीच्या राजकीय कैद्यांना सोडण्या-संबंधींचा होता. ठराव मांडणारे सभासद श्री. जोगिया यांनीं हा कायदा कोणत्या परिस्थितींत करण्यांत आला व आजच्या परिस्थितींत तो शिल्लक ठेवणें व लागू करणें कसें अरेरावीचें आहे हें मुद्देसूद रीतीनें दाखवून दिलें. या ठरावावर पंडित मोतिलाल नेहरू यांनीं एक उपसूचना आणून त्याचें व्यापक क्षेत्र बंगालचे राजबंदी सोडण्यापुरतें मर्यादित केलें. हेतु असा कीं, या मुख्य मुद्द्यावरच सर्व चर्चेचा भर पडावा व वादाला अवांतर फांटे फुटूं नयेत. पण पंडित नेहरूंची ही सूचना योग्य मुदतीच्या आंत दाखल केली नव्हती म्हणून त्यास अध्यक्षांची विशेष परवानगी मागावी लागली. अध्यक्षांनीं अशी अट घातली कीं, इतरांनीं आपापल्या उपसूचना मागें घेऊन ही एकच उपसूचना शिल्लक राहिली तर परवानगी मिळेल. त्याप्रमाणें इतरांनीं आपापल्या सूचना मागें घेतल्या व बऱ्याच वादविवादानंतर पंडित नेहरू यांच्या उपसूचनेनें दुरुस्त केलेला जोगिया यांचा ठराव ६३ वि. ५० मतांनीं मंजूर होऊन सरकारचा पराभव झाला.

* * *

मुडिमन यांनीं अर्थातच सरकारतर्फे ठरावास व सूचनेस विरोध केला. त्यांच्या भाषणांतील पूर्वार्धांत १९२३ पासून आतांपर्यंत झालेल्या अराजक गुन्ह्यांचें वर्णन व उत्तरार्धांत व्हाइसरॉयांच्या भाषणाचा अनुवाद असल्यामुळें त्यांत नवीन असें कांहीं नव्हतें. मात्र कांहीं तरी अटी लिहून घेऊन या कैद्यांना सोडण्याचा सरकारचा विचार असावा असें अनुमान त्यांच्या भाषणां-तून काढतां येण्यासारखें होतें. पंडित नेहरूंच्या उपसूचनेस अनुकूल अशीं एम्. के. आचार्य, लाला लजपतराय, गोस्वामी, के. सी. रॉय, श्रीनिवास अय्यंगार, हृदयनाथ कुंझरू, पंडित मालवीय इत्यादिकांचीं भाषणें झालीं. श्री. गोस्वामी यांचें भाषण नेहमींप्रमाणें झणझणीत असें झालें. लाला लजपतराय व पंडित मालवीय यांचीं भाषणेंहि सडेतोड व प्रसंगानुरूप अशींच झालीं. या एका ठरावावरचा वादविवादच इतका लांबला कीं, मतें घेण्याचे वेळीं ६ वाजले. अर्थात् इतर ठराव तसेच राहून सोमवारपर्यंत बैठक तहकूब झाली. पंडित नेहरू यांच्या उपसूचनेस पाठिंबा देण्याचें राष्ट्रीय व स्वतंत्र पक्षानें

आगाऊच ठरविलें होतें. यामुळें सरकारचा पराभव निश्चित होता. राष्ट्रीय महत्त्वाच्या ठरावावर एक होण्यास सर्व पक्ष कसे तयार असतात हें या वेळीं पुनः दिसून आलें.

* * *

गुरुवारच्या कार्यक्रमपत्रिकेंत दुसरा ठराव मि. भुवनानंद दास यांच्या नांवावर असून तो स्वराज्याच्या मागणीसंबंधाचा होता. पण राजा गझनफर अल्लीखान यांनीं त्यावर एक उपसूचना पाठवून मुसलमानांच्या अवास्तव मागण्यांचा राष्ट्रीय मागणींत अंतर्भाव करण्याचा घाट घातला होता. असेंब्लींत आपसांतील भेदाचें प्रदर्शन होऊन सरकारला त्याचा फायदा मिळेल यासाठीं मि. दास यांनीं आपला ठराव परत घ्यावा असें स्वराज्य पक्षानें त्यांस सुचविलें. राजा गझनफर यांच्या या उपसूचनेंत, अल्पसंख्याक मुसलमानांना परिणामकारक प्रमाणांत जागा देणें व जेथें ते बहुसंख्याक असतील तेथें त्यांचें बहुमत कायम ठेवणें अशी मुसलमानांची दुहेरी फायद्याची मागणी नमूद करण्यांत आली होती! शिवाय नवीन प्रांतविभागणी करावयाची असल्यास बंगाल, पंजाब व सरहद्द प्रांत यांतील मुसलमानांच्या बहुमतास धक्का लागूं नये इत्यादि मुसलमानांच्या विशिष्ट अटीहि या उपसूचनेंत ग्रथित झाल्या होत्या! श्रीनिवास अय्यंगार यांनीं बोलून दाखविलेली 'कन्व्हेन्शन पार्लमेंटची' सूचना कृतींत आणली तर तेथेंहि याच अवास्तव मुसलमानी अटी पुढें येऊन अडचण उपस्थित होईल. पण तसें झालें तर हिंदी स्वराज्याच्या मार्गांत खरा अडथळा कोणाचा आहे तें तरी एकदां स्पष्ट होईल.

* * *

"१६ पेन्स का १८ पेन्स' या हुंडणावळीच्या वादासंबंधीं कॉंग्रेस पक्षाचें एकमत झालेलें नाहीं. ता. ५ रोजीं कॉंग्रेस पक्षाची सभा भरून या प्रश्नावर वादविवाद झाला. सर पुरुषोत्तमदास ठाकूरदास यांनीं विस्तृत भाषण करून आपली बाजू मांडली, तेव्हां ब्लॅकेटसाहेबांनाहि बोलावून त्यांची बाजू ऐकावी असें दोरास्वामी अय्यंगार यांनीं सुचविलें! श्रीनिवास अय्यंगार यांना १६ पेन्सांचा दर मान्य तर दिवाण चमनलाल हे १८ पेन्स दराचे पुरस्कर्ते! मोतिलाल नेहरूंचें म्हणणें असें कीं, ह्या प्रश्नावर वाटेल त्याला वाटेल तसें मत देण्याची मुभा ठेवावी. याप्रमाणें मतभेद दिसून येऊन कांहींच निर्णय झाला नाहीं. त्यानंतर लगेच कॉंग्रेसच्या वर्किंग कमिटी-

ची सभा होऊन त्यांत ५ विरुद्ध १ मतानें १६ पेन्सांच्या बाजूचा निकाल झाला. हें एक विरुद्ध मत पं. नेहरू यांचें असून या बाबतींत प्रत्येकास मत-स्वातंत्र द्यावें असें त्यांचें म्हणणें आहे. असेंब्लींतील शिस्तीचा भोक्ता काँग्रेस पक्ष वर्किंग कमिटीच्या बहुमताचा निर्णय मानतो का सर्वांना स्वेच्छेनुसार मत-नोंदणीची परवानगी देतो हें लवकरच दिसेल. ब्लॅकेटसाहेबांच्या कारवाईचा परिणाम प्रतिसहकारपक्षावर होत नसून स्वराज्यपक्षावरच कसा होत आहे हें यावरून दिसून आल्याशिवाय राहत नाहीं.

## पत्र नं. ४

ता. ११-२-२७

ब्लॅकेटसाहेबांनीं हुंडणावळीच्या बिलाची असेंब्लीच्या पहिल्याच बैठकींत चर्चा केली असती तर हा प्रश्न एकदां कोणत्या तरी बाजूनें निकालांत निघाल्यासारखा झाला असता. पण हें बिल लांबणीवर टाकण्याचें ठरविल्यामुळें हा वाद धुमसत राहिला आहे. फडणविसांच्या दिरंगाईबद्दल चालू आठवड्यांत पहिल्याच दिवशीं तहकुबीची सूचना येणार होती. पण त्या दिवशीं गृहमंत्री मि. मुडिमन हे सरकारतर्फें खुलासा करणार असल्यामुळें ती त्या दिवशीं पुढें न येतां दुसऱ्या दिवशीं पुढें आली. पण सोमवारीं मुडिमन यांनीं केलेल्या खुलाशांत खुलेपणा कांहींच नसून सरकारच्या आग्रहाचें आग्रही समर्थनच होतें. त्यांचा खुलासा असा कीं, ता. १५ जानेवारीच्या आंतच सरकारला बजेटाचे आंकडे निश्चित करावे लागतात. आणि गेल्या असेंब्लीनें ऑगस्ट महिन्यांत हुंडणावळीच्या प्रश्नाचा विचार न करतां तो प्रश्न पुढें ढकलला. तेव्हां सरकारला १८ पेन्सांच्या भावानें बजेट तयार करणें भागच पडलें. तेव्हां आतां हा वाद अगोदर झाला किंवा नंतर झाला तरी बजेटांत जी दुरुस्ती करावी लागेल ती लागेलच म्हणून हुंडणावळीचें बिल ता. ७ मार्चला मांडण्याचें सरकारनें ठरविलें आहे. त्याचे आधीं ता. १८ फेब्रुवारी रोजीं रेल्वेखात्याचें बजेट सादर करण्यांत येऊन त्यावर ता. २२ रोजीं सामान्य वाद-विवाद होईल व ता. २४ पासून खर्चाच्या रकमा मंजुरीसाठीं मांडण्यांत येतील.

* * *

सारांश, तारखा जाहीर करण्यापलीकडे मुडिमन यांच्या खुलाशांत नवें किंवा लोकपक्षाचें समाधान करण्यासारखें कांहींच नव्हतें. सोमवारीं झालेल्या

प्रश्नोत्तरांत सर पुरुषोत्तमदास यांच्या प्रश्नाला उत्तर देतांना फडणविसांनीं १६ पेन्स दरास अनुकूल असलेल्या हिंदुस्थानांतील निरनिराळ्या ठिकाणच्या व्यापारी संस्थांची यादी वाचून दाखविली. त्यावरून सर्व ठिकाणचें लोकमत फडणविसांच्या १८ पेन्सांच्या दरास कसें विरुद्ध आहे हें त्यांच्या तोंडूनच जाहीर झालें. मुडिमन यांच्या खुलाशानंतर श्री. अणे यांच्या सूचनेनुसार सिक्युरिटीज अॅक्टांत दुरुस्ती करणारें बिल सिलेक्ट कमिटीकडे सोंपविण्यांत आलें. यानंतर नादारीच्या कायद्यांत दुरुस्ती करणारीं दोन बिलें मुडिमन यांनीं मांडलीं. नादारानें कोर्टाच्या परवानगीशिवाय सावकारांशीं केलेली तड-जोड रद्द करण्यासंबंधीं योजना या बिलांत आहे. मुदतीच्या कायद्यांत दुरुस्ती करण्याच्या सरकारी बिलावर यानंतर चर्चा झाली. त्यास प्रथम श्रीनिवास अय्यंगार यांनीं उपसूचनेच्या रूपानें हरकत घेतली. पण त्यांच्या उपसूचनेंतील तत्त्व कौन्सिल ऑफ स्टेटमध्यें बिल मांडण्यांत येईल त्या वेळीं बिलांत समाविष्ट केलें जाईल असें सरकारतर्फे आश्वासन मिळाल्यावर बिल मंजूर झालें. सोमवारचें काम संपण्याचे वेळीं आणखी एक मोठा वादविषय म्हणजे पोलाद-संरक्षणाच्या बिलावरील सिलेक्ट कमिटीचा अहवाल हा असेंब्लीपुढें सादर करण्यांत आला.

* * *

ठरल्याप्रमाणें तहकुबीचा ठराव मंगळवार ता. ८ रोजीं पुढें आला. प्रथम त्यास रीतीप्रमाणें मुडिमन यांनीं हरकत घेतली व तहकुबीची सूचना आणण्याइतका हा प्रश्न तांतडीचा नाहीं असें सांगितलें. पण अध्यक्षांनीं ही हरकत मानली नाहीं व नेहमींच्या पद्धतीप्रमाणें इतर कामकाज आटोपल्यावर या तहकुबीच्या सूचनेवर वाद झाला. श्री. नीळकंठदास यांनीं ओरिया भाषा बोलणाऱ्या लोकांचें एका प्रांतांत एकीकरण करण्यासंबंधाचा ठराव मांडला. ओरिया लोकांचें एका प्रांतांत एकीकरण झाल्यावर तो कोणत्याहि प्रांतास जोडला तरी त्यास नीळकंठदास यांची हरकत नव्हती. मौ. महंमद याकूब यांनीं सांगितलें कीं, ओरिया लोकांचा प्रांत बिहारला जोडला तर मुसलमानांचें प्रमाण कमी होईल ! श्री. गयाप्रसादसिंग यांनीं हा प्रांत बिहार-ओरिसामधील ओरिसाविभागास जोडावा अशी उपसूचना मांडली व तिला डॉ. मुंजे यांनीं अनुमोदन दिलें. इतर बरींच भाषणें झाल्यावर मुडिमन यांनीं बिहार-ओरिसाच्या कौन्सिलानें हा प्रांत जोडून घेण्याचें मान्य केल्यास तशी

व्यवस्था करण्यांत येईल असें आश्वासन दिल्यामुळें ठराव परत घेण्यांत आला. रंगा अय्यर हे सुधारणांचें रॉयल कमिशन न नेमतां राउंड टेबल परिषद् बोलवावी असा ठराव मांडणार होते. पण स्वराज्य पक्षानें त्यास पाठिंबा न दिल्यानें तो परत घ्यावा असें स्वराज्य पक्षाच्या सभेंत ठरलें होतें. श्री. रंगा अय्यर यांनीं तो सर्व वाचून दाखवून परत घेतल्याचें जाहीर केलें! आपण मांडला होता तो ठराव कसा होता तें तरी सभासदांस कळावें असा त्यांचा उद्देश असावा! दुधाची तहान त्यांनीं ताकावर भागवून घेतली.

* * *

सायंकाळीं ४ वाजतां तहकुबीची सूचना पुढें आली. बजेटाच्या पेचांत धरून असेंब्लीकडून आपला १८ पेन्सांचा दर मंजूर करून घेण्यासाठीं फडणविसांनीं कसा व्यूह रचला आहे तें श्रीनिवास अय्यंगार यांनीं सांगितलें व केवळ एका बजेटाच्या तोंडमिळवणीकडे न पाहतां देशाचे सामान्य हितसंबंध पाहूनच हुंडणावळीचा दर ठरविला पाहिजे असें बजावलें. गेल्या ऑगस्टमध्यें फडणविसांना हुंडणावळीचीं बिलें आणण्याची घाई झाली होती. पण आतां लोकमताचा विरोध पूर्णपणें दिसून आल्यावर ते दिरंगाई करीत आहेत असेंहि त्यांनीं सांगितलें. प्रांतिक खंडण्यांतील सूट १६ पेन्सांच्या दरानें कमी होतें असें दाखवून प्रांताप्रांतांत कलागती लावण्याचा फडणविसांचा विचार असल्याचें बॅ. जयकर यांनीं सांगितलें. उलट फडणविसांनीं १६ पेन्स भाव ज्यांना पाहिजे आहे त्यांना उगीच गडबड करून असेंब्लीच्या डोळ्यांत धूळ फेकावयाची आहे असा त्यांजवर आरोप केला व कोणताहि दर ठरला तरी प्रांतिक खंडणीच्या बाबतींत सरकारी धोरण बदलणार नाहीं असें आश्वासन दिलें. सर पुरुषोत्तमदास यांनीं सांगितलें कीं, बजेटाचा निकाल लागेपर्यंत एखादें बिल थांबवून धरण्याचें हें पहिलेंच उदाहरण आहे. १८ पेन्सांच्या दरानें बजेटांत कधींच तूट पडणार नाहीं अशी ब्लॅकेटसाहेब हमी देऊं शकतील काय? हुंडणावळीचा दर निश्चित झाल्याशिवाय रेल्वेबजेटाचा विचार करतां येणेंच शक्य नाहीं. सर चार्लस इन्नेस व मि. आर्थर मूर यांनीं सरकारी धोरणाचें समर्थन केलें व जमनादास मेथा, डॉ. हैदर व मि. अय्यर यांनीं उपसूचनेस पाठिंबा दिल्यावर ५२ वि. ४५ मतांनीं तहकुबीची सूचना मंजूर झाली आणि सरकारचा तिसऱ्यांदा पराभव झाला.

* * *

बंगालच्या कैद्यांविषयीं प्रश्नोत्तरांत नेहमीं कांहींना कांहीं प्रश्न उपस्थित होतोच. बुधवारीं अशाच एका प्रश्नास उत्तर देतांना या बाबतींत हिंदुस्थान सरकार व बंगाल सरकार यांचा पत्रव्यवहार चालू असल्याचें मुडिमन यांनीं सांगितलें. यानंतर एकंदर २३ पुरवणी-मागण्यांसंबंधीं चर्चा होऊन त्या मंजूर झाल्या. पुरवणी-मागण्या नामंजूर करण्याचा स्वराज्य पक्षाचा किंवा त्यांतील कांहीं लोकांचा तरी विचार होता असें म्हणतात. पण त्याचें काय झालें कोणास ठाऊक? कारण अलीकडे स्वराज्य पक्षाच्या बैठकी दारें लावून गुप्त रीतीनें होऊं लागल्या आहेत. पण या गुप्त बैठकी होऊन अखेर निकाल पाहिला तर शून्यवतच दिसतो. स्वराज्य पक्षांत दोन परस्परविरोधी गट उत्पन्न होऊन अखेर कोणत्याहि प्रश्नावर वाटेल त्यानें वाटेल तसें मत द्यावें असा मोघम निर्णय बाहेर पडतो. हुंडणावळीच्या प्रश्नासंबंधीं स्वराज्यपक्षीय लोक काय करणार हेंहि अजून अनिश्चितच आहे. बुधवारीं जादा मागण्यांपैकीं कांहीं मागण्या तरी निषेधप्रदर्शनार्थ फेटाळल्या जातील असें कित्येकांस वाटत होतें, पण तो अंदाज फोल ठरून सर्व मागण्या किरकोळ वाद होऊन मंजूर झाल्या. गुरुवारीं येणाऱ्या ठरावांवरहि असेंच 'मतस्वातंत्र्य' स्वराज्यपक्षीयांनीं ठेवलें होतें.

* * *

गुरुवारीं प्रश्नोत्तरें न होतां एकदम ठरावांची चर्चा सुरू झाली. प्रारंभीं गृहमंत्र्यांनीं पुढील आठवड्याचा कार्यक्रम सांगितला. त्यावरून सोमवार ता. १४ व बुधवार ता. १६ रोजीं पोलादसंरक्षण बिलाची चर्चा होणार असें कळलें. या बिलांत 'इंपीरिअल प्रेफरन्स'च्या नव्या घुसडण्यांत आलेल्या तत्त्वावर बरेंच रण माजेल. ता. १५ रोजीं बिनसरकारी बिलें येणार असून त्यांत श्री. केळकर यांच्या जमीन संपादनाच्या कायद्यांतील दुरुस्तीच्या बिलावर चर्चा होईल. ता. १८ रोजीं रेल्वेबजेट सादर करण्यांत येईल. याप्रमाणें कार्यक्रम सांगितल्यावर ओरिसा प्रांतांप्रमाणें दुसऱ्या एका मागासलेल्या प्रांतासंबंधाचा ठराव पुढें आला. हा प्रांत म्हणजे संताळ परगणा हा होय. हिंदुस्थानांत मागासलेल्या जाती पुढारलेल्या जातींबरोबर येण्याची धडपड करीत असतात व सरकार त्यांना अधिक सवलतहि देतें. पण प्रांतविभागांत देखील मागासलेले व पुढारलेले असे भेद आहेतच व सुधारणाकायद्याच्या अंमलबजावणींतून मागासलेले प्रांत वगळण्यांत आले आहेत. पूर्वी हिंदुस्थान सरकारचा

राज्यविस्ताराचा खटाटोप चालू असतां मागासलेले व पुढारलेले प्रांत किंवा नॉन-रेग्युलेशन व रेग्युलेशन प्रांत ही विभागणी जरूर असली तरी आतां एक-छत्री अंमल झाल्यावर कांहीं प्रांत मागासलेले ठेवणें चुकीचें आहे. पण आश्चर्य हें कीं, मागासलेल्या जातींबद्दल कळवळा दाखविणारें सरकार मागासलेल्या प्रांतांस सुधारणा लागू करण्याच्या प्रश्नाच्या नेहमीं विरुद्ध असतें! त्या धोरणास अनुसरून मि. मुडिमन यांनीं संताळ परगण्यासंबंधींच्या श्री. गंगानंद सिंह यांच्या ठरावास विरोध केला. संताळ लोकांच्या कल्याणासाठींच आपण या ठरावास विरोध करीत आहों असें सरकारी सभासदांनीं नेहमींप्रमाणें सांगितलें. ठरावांत केलेली मागणी मूठभर सुशिक्षितांची आहे, बाकी संताळ लोक आहे या परिस्थितींत सुखी आहेत हाहि नेहमींचाच सरकारी कोटिक्रम पुढें आलाच. पण लोकपक्षीय सभासदांनीं तो न मानतां ५० विरुद्ध ४० मतांनीं हा ठराव मंजूर केला. यानंतर मि. हाजी यांनीं हिंदी बँकांच्या सद्यःपरिस्थितीची पाहणी करून हिंदी शेतकरी व उद्योगधंदे यांना भांडवल मिळण्यासाठीं कोणते उपाय योजावेत यासंबंधीं सूचना करण्यासाठीं एक चौकशी-कमिटी नेमावी असा ठराव मांडला. सरकारची या सूचनेस अनुकूलता नाहीं असें फडणविसांच्या भाषणावरून दिसलें. पण वादविवाद पूर्ण न होतां असेंब्लीची बैठक सोमवारपर्यंत तहकूब ठेवण्यांत आली. पुढें बिनसरकारी ठरावांच्या दिवशीं या ठरावाचा विचार होईल.

* * *

कौन्सिल ऑफ स्टेटचें काम बड्या लोकांचें असल्यामुळें तें अगदीं सुखवस्तु व आरामशीर थंडपणानें चालतें. आठवड्यांतून तीन दिवसांपेक्षां जास्त दिवस ते चालत नाहीं व प्रत्येक दिवशीं ३ तासांपेक्षां अधिक लांबविण्यांत येत नाहीं. कौन्सिल ऑफ स्टेटमधील या बड्या आरामशीर लोकांकरितां कौन्सिल हॉलांत आरामखुर्च्या व हुक्का ठेवण्यासाठीं व्यवस्था अजून सरकारनें केली नाहीं हेंच आश्चर्य! या कौन्सिलचें काम ता. ८ रोजीं सर हेनरी मॉंक्रिफ स्मिथ यांच्या अध्यक्षतेखालीं सुरू झालें. नव्या सभासदांचा शपथविधि होऊन कांहीं प्रश्नोत्तरें झाल्यावर तीन सरकारी बिलें प्रविष्ट करण्यांत आलीं. ता. ९ रोजीं बिनसरकारी ठरावांचा दिवस होता. असेंब्लींत बिनसरकारी ठरावांचे वेळीं अधिकांत अधिक सभासद हजर असतात. पण कौन्सिल

ऑफ स्टेटचें सर्वच उलट आहे. कारण या दिवशीं अगदींच थोडे सभासद हजर होते. दारूबंदीच्या ठरावास कौन्सिलांत यऊन विरोध करण्याच्या ऐवजीं बहुतेकांनीं घरबसल्या सक्रिय विरोध आचरला असावा! लोकपक्षीय ठराव येथें पास होणें म्हणजे कपिलाषष्ठीचा योगच होय. त्यांतल्या त्यांत रामदास पंतलू यांचा दारूबंदीचा ठराव म्हणजे येथील बड्या श्रीमंतांस तर फारच चमत्कारिक वाटला. रामदास पंतलू यांच्या ठरावास शेठ गोविंद-दास यांनीं पाठिंबा दिला, पण बरद्वानचे महाराज व वऱ्हाडचे नबाब दादा-साहेब खापर्डे यांनीं विरोध केला! महाराजांनीं सांगितलें कीं, काबाडकष्ट करून थकलेल्यांना दारू पिण्याची बंदी करणें अयोग्य ठरेल. खरेंच, गादीवर लोळून थकलेल्या श्रीमंतांनाहि जर दारूची जरूर लागते तर कष्टाळू गरिबांना तिची जरूरी किती तरी अधिक लागत असेल अशी त्यांनीं गादीवर बसल्या बसल्या कल्पना केली असावी? पण श्रीमंतांच्या पैशाच्या पिशवीइतकी गरिबांची पिशवी लांब नसते हें त्यांना कसें कळणार? दारूची गोडी ते चाखतात, पण तिचे अनर्थ मात्र गरिबांना भोगावे लागत असून ते श्रीमंतांना धांवत्या मोटारीं-तून कसे दिसणार? असो. हा ठराव २१ वि. १४ मतांनीं नामंजूर झाला व मद्यपान नियमित करण्यासंबंधीं उपसूचना मंजूर झाली. पोस्ट व टेलिग्राफ हीं खातीं वेगळीं करण्याचा ठराव व रेल्वेचे दर उतरविण्याचा ठराव हेहि नामंजूर झाले व या वादाच्या श्रमाचा परिहार होण्यासाठीं ता. १० रोजीं सुटी घेऊन ता. ११ रोजीं या आठवड्यांतली शेवटची बैठक झाली.

* * *

शुक्रवारीं कांहीं किरकोळ सरकारी बिलांचा विचार झाला. चर्चा फारशी झाली नाहीं. मि. कॉर्बेट यांनीं हिंदुस्थानांतील दीपगृहासंबंधाचा कायदा दुरुस्त करण्यासंबंधाचें बिल प्रविष्ट केलें. एस. आर. दास यांच्या सूचनेवरून बंगाल टेनन्सी ॲक्टांत दुरुस्ती करणारें बिल, वाद न होतांच मंजूर झालें. प्रॉव्हिडंट फंडाच्या कायद्यांत दुरुस्ती करण्याचें बिल, मुदतीसंबंधाच्या कायद्यांत दुरुस्ती करणारें, असेंब्लींत मंजूर झालेलें बिल आणि रजिस्ट्रेशनचा कायदा व मद्रासचा मिठासंबंधींचा कायदा दुरुस्त करणारीं बिलेंहि फारसा वाद न होतांच मंजूर करण्यांत आलीं व कौन्सिल ऑफ स्टेटचें या आठवड्याचें काम संपलें.

# पत्र नं. ५

ता. १८-२-२७.

चालू आठवड्यांत टाटा स्टील प्रोटेक्शन बिल व खासगी सभासदांचीं चार-पांच बिलें यांचेशिवाय असेंब्लींत दुसरें कांहीं काम झालें नाहीं. इतर काम म्हटलें म्हणजे सर चार्लस इन्नेस यांनीं रेल्वे खात्याचें अंदाजपत्रक सभेपुढें औपचारिक रीत्या मांडलें. पण त्यावर सर्व वादविवाद, चर्चा, उपसूचना वगैरेचें काम पुढील आठवड्यांत होईल; व तें बहुधा सर्व आठवडा खाईल. टाटा स्टील प्रोटेक्शन बिलासंबंधानें आतां थोडीबहुत लोकांना कल्पना आली असेल. एकंदर योजना तीन. एक सरकारी; या योजनेंत टाटांच्या कारखान्यांना आजवर प्रत्यक्ष पैशाची देणगी देऊन मदत करण्यांत येत असे, ती यापुढें बंद करून त्यांच्याशीं चढाओढ करूं पाहणाऱ्या मालावर आयात जकात बसवून त्यांना जें संरक्षण मिळेल तेवढेंच द्यावें अशी. दुसऱ्या सूचनेंत ह्या जकातीवरच भिस्त ठेवण्यांत आली आहे. पण सरकारी योजनेप्रमाणें तींत ब्रिटिश साम्राज्यांतील मालाला जो पक्षपात दाखविला आहे तो नाहीं; व तिसऱ्या योजनेंत, आजपर्यंत चालत आलेला जुन्या पद्धतीचा अंगिकार केला असून, जमशेटपूर कारखान्याला मदत द्यावयाची ती अंशतः जकातीच्या रूपानें व अंशतः प्रत्यक्ष देणगी देऊन द्यावी असें सुचविलें आहे. सिलेक्ट कमिटीकडे बिल गेले तेव्हां बैठकीचा दिवस सोईचा नसल्यामुळें, व कांहीं सभासद बाहेरगांवीं गेले असल्यानें तींत सरकार पक्षाचें बहुमत होऊन रिपोर्टावर सह्या झाल्या. पण कमिटींतील एकंदर सभासदांची संख्या लक्षांत घेतां, हें मत खरें बहुमत नाहीं असें दिसून आलें. कारण भिन्न मत दर्शविणाऱ्या पत्रिका जोडण्यांत आल्या एवढेंच नव्हे तर, हजर नसलेल्या सभासदांनींहि तक्रार केली. यामुळें स्वराज्य पक्ष व नॅशनॅलिस्ट पक्ष यांनीं मिळून असें योजिलें कीं, बिल फिरून सिलेक्ट कमिटीकडे पाठविण्याची उपसूचना शक्य तर मंजूर करून घ्यावी, म्हणजे पुनः एक वेळ सगळेंच गांठोडें सोडून उसकटण्याला संधि मिळेल.

* * *

पण स्वराज्य पक्षाच्या हल्लींच्या दुबळेपणामुळें हा बेत पदरांत पडला नाहीं, आणि सोमवार व बुधवार या दोन दिवशीं बिलावर बराच वाद होऊन शेवटीं ६१ विरुद्ध ५० इतक्या बहुमतानें बिल सिलेक्ट कमिटीकडे परत पाठविण्याची

उपसूचना नामंजूर झाली. स्वराज्य पक्षाचा दुबळेपणा दोन प्रकारें दिसून आला तो असा कीं, त्यांच्या पक्षांतील दोन सभासदांनीं दोन निरनिराळ्या उपसूचना पाठविल्या, यामुळें मुख्य सूचनेवर मतभेद दिसून आला व दुसरा हा कीं, स्वराज्य पक्षाच्या एकंदर ४०-४२ सभासदांपैकीं सुमारें १२-१३ सभासद गैरहजर होते! बॅरिस्टर जिना यांनीं या कामीं बोलून चालून सरकारी योजनेचें वकीलपत्र घेतलें होतें व ते आणि त्यांचे १०-१२ मुसलमान अनुयायी यांनीं सरकारच्या बाजूला मतें दिल्याकारणानें असा परिणाम झाला. सांगण्यासारखी गोष्ट एवढीच कीं, स्टेट्स्मन पत्राचे संपादक मि. मोअर व सरकारनियुक्त सभासद मि. एन्. एम्. जोशी यांनीं सरकारविरुद्ध मत दिलें.

* * *

सरकारी योजनेंत विलायती मालाला संभाळून घेण्याचा व पक्षपात दाखविण्याचा प्रयत्न उघड आहे. सर चार्लेस इन्नेस यांना हा प्रयत्न लपवितां कसा येणार? मात्र त्यांनीं आमचा तसा प्रयत्न आहे असें सांगितलें नाहीं. उघडच आहे ते तसें कसें सांगतील? पण बॅरिस्टर जिना यांना आपण सत्पक्षाकडे आहों हें दाखविण्याकरितां सरकारी योजनेंत पक्षपात नाहीं असें ठासून सांगावें लागलें आणि सर चार्लेस इन्नेस यांनाहि त्यांनीं असें भरीला घालून पाहिलें कीं, "पक्षपाताची बुद्धि नाहीं असें तोंडी आश्वासन द्या म्हणजे झालें." रुसलेल्या मनुष्यानें आपली समजूत दुसऱ्यानें कशी काढावी हें भांडतां भांडतां हळूच सुचविण्यासारखी जिनासाहेबांची युक्ति होती, पण ती कशी साधणार? सर चार्लेस इन्नेस यांना तसें उघड आश्वासन देतांच आलें नाहीं. आणि सरकारी योजनेंत पक्षपात आहे या मुख्य मुद्द्यावरच बहुतेक वादविवाद झाला, व त्यांत पंडित नेहरू व बॅ. जयकर ह्या दोघांचीं भाषणें विशेष मुद्देसूद व परिणामकारक झालीं. पण संख्याबलापुढें वक्तृत्व अर्थातच दुर्बल ठरलें. या बाबतींत पराभव झालेला पाहून स्वराज्य पक्षानें आपल्या गैरहजर असलेल्या सभासदांना निकडीचीं बोलावणीं पाठविलीं आहेत. पण जे येतील तेहि आतां वरातीमागून आलेले घोडे ठरतील! कारण सभेपुढें आतां करन्सी बिलाशिवाय अधिक हातघाईचा असा प्रश्न राहिला नाहीं.

* * *

यंदाची असेंब्ली पुनः नवी कोरी असल्यानें खासगी सभासदांच्या ठरावांना व बिलांना फिरून श्रीगणेशापासून सुरुवात आहे. गणपतीचा उत्सव संपला म्हणजे चित्रकार उरलेली, कुटलेली, मळलेली झाडू व माती फिरून भिजत टाकतो, व दुसरा उत्सव सुरू होण्याच्या वेळीं, तीच घेऊन, कुटून नवीं चित्रें बनवूं लागतो. अर्थात् या कृतीमुळें अपुऱ्या अर्ध्या-मुर्ध्या, फुटक्या-तुटक्या चित्रांचा पुनर्जन्मच होतो. अशा रीतीनें तारीख १ रोजीं, सुमारें पंधरा नवीं बिलें प्रविष्ट झालीं. आणि तारीख १५ रोजीं त्यांतील पांचांचाच परामर्श घेतां आला. पैकीं दोरास्वामी अय्यंगार यांचें रजिस्ट्रेशन ॲक्टाच्या सुधारणेचें बिल व मौलवी महंमद याकूब यांचें सक्सेशन ॲक्ट सर्टिफिकेटाचें बिल, हीं त्यांच्या इच्छेविरुद्ध मतें अजमावण्याकरितां बाहेर पाठविण्यांत आलीं. दुसरें बिल केळकर यांचें १८६० च्या सोसायटी नोंदणीच्या दुरुस्तीचें बिल. हें लहान असल्यामुळें तें ताबडतोब विचारांत घ्यावें अशी सूचना केळकर यांची होती. तिला सरकारतर्फे, तत्त्वावर नसला तरी तपशिलावर म्हणून, विरोध झाला. तथापि बहुतेक बिनसरकारी पक्षांची या बिलाला संमति दिसून येत असल्यामुळें, सर अलेक्झांडर मुडिमन यांनीं आपला विरोध मतें मोजण्यापर्यंत नेला नाहीं. या बिलाचा हेतु, साध्या शिक्षणसंस्था वगैरेप्रमाणेंच राजकीय शिक्षण देणाऱ्या संस्थाहि नोंदल्या जाण्याला हरकत येऊं नये, म्हणजे त्यांना कायदेशीर संघटित स्वरूप घेतां यावें, अशी दुरुस्ती करण्याचा आहे. सरकारचें म्हणणें हें कीं, हाच हेतु १९१३ च्या कंपनी ॲक्टानें साधतो. पण ह्या उपदेशाची सहजच थट्टा झाली. कारण कंपनी ॲक्टाखालीं, नोंदलेल्या संस्था प्रायः धंदेवाईक नफेबाजीच्या असतात व त्यांना आपलें खरें स्वरूप लपवून ठेवावयाचें असलें तर, सरकारकडून लायसेन्स घ्यावें लागतें! १८६० च्या कायद्यानें दिलेल्या सवलतीचा फायदा सात्त्विक हेतूनें प्रवृत्त झालेल्या संस्थाच घेत असतात. त्यांच्या कामाला पैसे हवे असले तरी त्यांत वैयक्तिक स्वार्थाचा अंश नसतो. असो. केळकर यांचें हें बिल असेंब्लींत मंजूर झालें तरी अद्यापि कौन्सिल ऑफ स्टेटच्या भट्टींत जाऊन तें पडावयाचें आहे. तेथें सरकार आपला हट्ट कितपत चालवितें तें लवकरच कळून येईल.

* * *

चौथें बिल लँड ॲक्विझिशन ॲक्टाच्या दुरुस्तीचें. हें वादग्रस्त होण्याचा संभव व त्यांत प्रामाणिक मतभेदाला जागाहि बरीच, यामुळें आधीं लोकमत मागवून मगच तें सिलेक्ट कमिटीकडे पाठवावें अशी स्वतः केळकर यांनींच उपसूचना मांडल्यामुळें सरकारी विरोधाला जागाच नव्हती. परंतु लोकमत मागण्यापूर्वीं केळकर यांचें म्हणणें जसें लोकांपुढें जाईल तसें सरकारचेंहि जावें असा साळसूद युक्तिवाद करून मि. भोर यांनीं व दोन-तीन इतर सरकारी सभासदांनीं बिलाच्या तत्त्वाला व तपशिलालाहि विरोध केला. पण त्यांपैकीं कोणाचें म्हणणें अधिक सयुक्तिक हें ठरविण्याला आणखी पांच-सहा महिने तरी जावे लागतील. बाहेरून लोकमत निरनिराळ्या सरकारांकडून व संस्थांकडून लिहून आलें म्हणजे बहुधा येत्या सप्टेंबरांत हें बिल सिलेक्ट कमिटीकडे पाठविलें जावें अशी उपसूचना केळकर हे आणतील.

* * *

पांचवें बिल समितीचा कायदा रद्द करण्याचें डॉक्टर गौर यांनीं मांडलें तें. वास्तविक हें बिल पूर्वीं एकदां असेंब्लींत पास झालें पण कौन्सिल ऑफ स्टेट-मध्यें नापास झालें होतें. परंतु दडपशाही बिलाच्या डोक्यावर घणाचे घाव, लोकपक्षाला निराश न होतां, दरवर्षीं घातलेच पाहिजेत. आणि डॉ. गौर यांनीं अशा बिलाची पाठ पुरविण्याचें व्रत आज दोन-तीन वर्षें स्वीकारलें होतें तेंच त्यांनीं पुन्हा यंदाहि सुरू केलें आहे. मंगळवार संध्याकाळपर्यंत या बिलावरील चर्चा न संपल्यानें तें पुढें ढकललें गेलें आहे. पण मार्च महिन्यांत पुन्हा खासगी बिलांना एखादा दिवस मिळाला तरच या व इतर कांहीं बिलांचा परमर्श असेंब्लीला घेतां येईल. गेल्या एक महिन्यांत आणि पुढील पंधरा दिवस जमेस धरले तर सुमारें दीड महिन्यांत, खासगी ठराव व खाजगी बिलें यांना अवघे चारच दिवस मिळाले! यावरून हें दिसून येईल कीं, उपक्रमाची सत्ता सरकारचे हातीं असल्यानें गर्दींतून कोंडी फोडणें बरेंच अवघड असतें. पण ही विषमता नाहींशी होऊन आपलें कामकाज काढून घेण्याला अधिक दिवस मिळावेत असा लोकपक्षाचा प्रयत्न हल्लीं सुरू आहे. त्यांतून कांहीं निष्पन्न झालें तर, पुढील वर्षापासून खासगी कामाचे दिवस कदाचित् वाढतील. निदान अर्ध्यामुर्ध्या असलेल्या कामाची तरी तड पोंचविण्यास अधिक मदत होईल.

* * *

शुक्रवारीं सर चार्लस इन्नेस यांनीं रेल्वे-बजेट सभेपुढें मांडल्यावर, स्टील प्रोटेक्शन बिलावरील वादविवादाला पुन्हा सुरुवात झाली. सरकारी योजनाच अखेर मंजूर होणार असा उघड रंग दिसत आहे. तथापि मुंबई, कलकत्ता, दिल्ली, किर्लोस्करवाडी, वगैरे ठिकाणच्या कारखानदारांकडून आलेल्या तक्रारी-अर्जांमुळें, विलायती व परदेशी 'तयार मालावर' बसावी तितकी अधिक जकात न बसली तरी इतर कारखानदारांस उपयोगी पडणाऱ्या लोखंड, पोलाद वगैरे कच्च्या मालावरील जकात थोडीबहुत कमी होण्याचे किंवा भरलेली जकात थोडीबहुत परत देण्याचे ठराव होण्याचा संभव दिसतो. टाटांच्या कारखान्याचें एक नांव गाजत असलें म्हणजे नगाऱ्याच्या पुढें टिमकीचा आवाज ऐकूं येत नाहीं त्याप्रमाणें लहानसान कारखानदारांच्या हिताकडे सभासदांचें फारसें लक्ष जात नाहीं. तरी पुढील वर्षापासून, जकातीची नवीन योजना प्रसिद्ध होतांच कारखानदारांनीं, वेळींच आपले प्रतिनिधी पाठवून, सभासदांच्या गांठी घेवविल्या तर अधिक बरें होईल.

* * *

कॉंग्रेस पक्षाची बहुतेक बडी मंडळी हल्लीं दिल्लींत आहेत व चालू सालचे कॉंग्रेसचे अध्यक्ष येथेंच असल्यामुळें ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीची सभा भरवावी, किंबहुना बडें राउंड टेबल कॉन्फरसच्च भरवावें असा श्रीनिवास अय्यंगार यांचा घाट असल्याची बोलवा आहे. पण यापैकीं कांहीं सभा बोलावल्या तरी नीट भरणार नाहींत व भरल्या तरी त्यांत कांहीं काम होणार नाहीं. यांत मुळींच शंका नाहीं. असेंब्लींत श्रीनिवास अय्यंगार यांना जितकी मान्यता दिसते तितकीच मान्यता बाहेर देशांतहि आहे, म्हणजे मुळींच नाहीं. त्यांनीं पंडित मोतिलाल नेहरू यांच्या हट्टी स्वभावाचें थोडेंसें अनुकरण केलें असलें तरी पंडितजींची वजनदारी त्यांना संपादतां आलेली नाहीं. शिवाय मद्रास प्रांतांत दिवाणगिरी स्थापित झाली ती श्रीनिवास अय्यंगार यांच्या पूर्ण संमतीनें झाली, याविषयीं येथें लोक अगदीं उघड बोलतात व त्यांना उत्तर देण्याच्या भानगडींत, श्रीनिवास अय्यंगार किंवा त्यांचे स्नेही पडत नाहींत. पण पडणार कसे ? जमिनींत मुरणारें पाणी आपण होऊन वर निघत नसतें. दिल्लींत आल्यापासून, हिंदु सभेच्या बाजूला असलेली त्यांची सहानुभूति मात्र प्रकट झालेली आहे. यामुळें पंडित मोतिलाल नेहरू त्यांच्यावर नाराज आहेत असें म्हणतात. अशा परस्पर नाराज

पुढाऱ्यांची जोडी शेजारी शेजारी असेंब्लींत पाहिली म्हणजे तिऱ्हाइतास हसूं येतें. गॅलरींत एका बाजूला महंमदअल्ली, दुसऱ्या बाजूला सरोजिनी नायडू, खालीं नेहरू व अय्यंगार आणि अध्यक्षस्थानीं पटेल असा संच पाहिला म्हणजे गेल्या पांच-सहा वर्षांच्या राजकारणाचें चित्र एखाद्या चित्रपटावर दाखविल्याप्रमाणें डोळ्यांपुढून गेल्याशिवाय राहत नाहीं.

* * *

मुसलमानांनीं आपलें धोरण आतां निश्चित ठरवून टाकलें आहे. चालू बैठकींत त्यांचीं मतें प्रायः सरकारच्या बाजूला पडणार व जिनासाहेबहि, मी जात-गोत मानीत नाहीं असें म्हणत म्हणत, एक एक पावलानें कट्टर मुसलमानांच्या कळपांत ओढले जाणार! येत्या मे महिन्यांत मुसलमानांचें स्वतंत्र डेप्युटेशन विलायतेस जावयाचें आहे. कारण चालू वर्षाअखेर, रॉयल कमिशन नेमावयाची वार्ता निघाल्यामुळें सवत्या सुभ्याचें निशाण लंडनमध्यें सर्वांत आधीं फडकवावें अशी त्यांनीं उमेद धरली आहे व अखेर कमिशनपुढें, हिंदु विरुद्ध मुसलमान असाच राजकीय प्रश्न देखील उपस्थित होणार. पण होणार असला तरी, आतां त्याला भिऊन कांहीं चालत नाहीं. असेंब्लीमध्यें, पं. नेहरू यांनीं स्वराज्याच्या मागणीचे ठराव मुसलमानांच्या उपसूचनेच्या भीतीमुळें मागें घेतले, पण असें किती दिवस करणार? स्पष्ट बोलण्याचा दिवस यावयाचा उरलेला नाहीं. येऊन गेला आहे– आजच पुढें उभा आहे. तेव्हां मनांत असेल तें साफ बोलावें व आपला सात्त्विक आग्रह सोडूं नये यांतच हिंदूंचें खरें शहाणपण आहे.

* * *

यंदा दिल्लीस दक्षिणी सभासदांचा संच थोडा रोडावला आहे. मुतालीक, करंदीकर, अभ्यंकर ही मंडळी नाहींत. तथापि केळकर, अणे, मुंजे, बेळवी हे सभासद एकत्र राहतात. श्री. खापर्डे व श्री. जयकर हे वेस्टर्न होस्टेलमध्यें राहत आहेत. श्री. नारायण मल्हार जोशी व सर्व्हंट ऑफ इंडिया पत्राचे संपादक वझे हे शहरांत राहतात. डॉ. मुंजे यांच्या असेंब्लीच्या कामाबरोबर हिंदु-संघटनेचें काम सुरू असून ते नुकतेच गुरगांव वगैरे ठिकाणीं सभांना जाऊन आले. कामाचा मुख्य भर यंदा श्री. अणे यांच्यावर पडला आहे. नॅशनॅलिस्ट पक्षाचे ते चिटणीस असून अनेक कमिट्यांवर त्यांची नेमणूक

झालेली आहे. श्री. एस्. सी. जोशी, मुंबई कौन्सिलचे सभासद, हे पोस्ट-खात्यांतील नोकर लोकांच्या संघाच्या कामाकरितां व किर्लोस्करवाडीचे श्री. गुर्जर हे स्टील प्रोटेक्शन बिलाच्या चर्चेसंबंधानें हिंदी कारखानदारांचें हिताहित सभासदांना समजावून देण्याकरितां दिल्लीस येऊन गेले. कॅप्टन पटवर्धन वैमानिक हेहि दिल्लीस आलेले असून विमानविषयक नवी सरकारी योजना चर्चेस निघेल तेव्हां ही नवी विद्या हिंदी लोकांना शिकविण्या-संबंधानें त्यांतल्या त्यांत काय करतां येईल, याची चर्चा करण्याकरितां ते राहिले आहेत. दिल्लींतील दक्षिणी लोकांचें मुख्य आश्रयस्थान 'महाराष्ट्रीय स्नेह-संवर्धक समाज' यामार्फत दासनवमीचा उत्सव सुरू असून बहुतेक प्रमुख दक्षिणी गृहस्थांचीं व्याख्यानें होत आहेत.

## पत्र नं. ६

ता. २५-२-२७

स्टील प्रोटेक्शन बिलाचे कामीं स्वराज्य व राष्ट्रीय ह्या दोन पक्षांचा मिळून पराभव झाल्यानें, त्यापुढेंहि लोकपक्षाचा असाच पराभव होत जाणार कीं काय अशी सहजच भीति वाटूं लागली होती; पण रेल्वेखात्याचें अंदाजपत्रक पुढें आलें तेव्हां, एकंदर रेल्वेबोर्डाकरितां मागितलेली ९-९॥ लक्षांची रक्कम नामंजूर करावी अशी सूचना पुढें आली व ती रक्कम बहुमतानें नामंजूर झालीहि. या मतमोजणींत बॅ. जिना हे तटस्थ राहिले. परंतु त्यांचे कांहीं मुसलमान अनुयायी व सर पुरुषोत्तमदास ठाकुरदास यांनीं अनुकूल मत दिलें. ह्या रकमेवरील वादविवाद इतका रंगेल असें पूर्वी वाटलें नव्हतें. पण रेल्वे-बोर्ड हें आपलें काम चांगलें करीत नाहीं, बोर्डावर सरकार अद्याप एकहि हिंदी गृहस्थ नेमीत नाहीं, रेल्वे-बोर्ड विलायती कारखानदारांना पक्ष-पात दाखवितें व एकंदर कारभार उधळेपणाचा व मिजाशीचा चालतो, लोकांच्या तक्रारींकडे किंवा कनिष्ठ लोकांच्या स्थितीकडे लक्ष पुरविलें जात नाहीं अशा अनेक मुद्द्यांवर लोकपक्षाकडून हल्ले सुरू झाले, आणि "रावा बोले तों तो पिंजऱ्यांत पडे" ह्या म्हणीप्रमाणें रेल्वे-बोर्डाच्या अधिकाऱ्यांचें वक्तृत्व पोकळ ठरून तें त्यांच्याच गळ्यांत जसजसें येऊं लागलें, तसतसा वादाला विशेष रंग चढला. पूर्वी ज्यांनीं ह्या नामंजुरीला संमति दिली नसती अशा कित्येक मुसलमान व इतर गृहस्थांनीं सरकाराविरुद्ध मतें दिलीं.

तसेंच पंडित कुंझरू यांनीं रेल्वे-बोर्डाचा एक रुपया तोडून निंदाव्यंजक ठराव पुढें आणला, त्याहि बाबतींत सर वॉल्टर वुइल्सन यांनींहि लोक-पक्षाकडे मत दिलें व तोहि ठराव बहुमतानें मंजूर झाला. रेल्वे-बजेटाच्या वादविवादांत रेल्वे-बोर्डाच्या अधिकाऱ्यांवर शिव्यांच्या लाखोलीची परमावधि झाली. तुम्ही नालायक, बादशाही मिजाशीचे, खाल्ल्या घरचे वासे मोजणारे, नादान, कृतघ्न, स्वार्थी, हिंदुस्थानच्या पैशानें आपल्या जातीचें पोट भरूं पाहणारे, अशा एक ना दोन, निरनिराळ्या शब्दांनीं, रेल्वे-बोर्डाची पुरी पूजा बांधली गेली! आणि मुख्य मागणीचा निकाल लागला तरी, आणखी दोन दिवस ह्या निंदेचा ध्वनि-प्रतिध्वनि सारखा ऐकूं येत होता.

* * *

अशा नुसत्या शिव्या देऊन काय होणार असें कित्येकांना वाटेल. पण पूर्वी रेल्वे-खात्याचा कारभार ज्या त्या कंपनीचा होता तेव्हां, कारभार आमचे हातीं नाहीं आणि कंपनीच्या कारभारावर ताबा चालविण्याचा तोहि मर्यादितच असणार, अशा सबबी सरकाराला सांगतां येत होत्या. पण आतां कंपनीचा कारभार जाऊन तो प्रत्यक्ष सरकारच्या हातीं आला. रेल्वे-खातें व सरसकट फायनॅन्स-खातें यांचा संबंध पुरा तोडून प्रत्येकाचा सुभा सवता करण्यांत आला, यामुळें रेल्वे-बोर्डाची जबाबदारी पूर्वीपेक्षां फारच वाढली. वर्षांतून पांच-सहा दिवस सात-आठजणांच्या तोंडून, उघड चर्चा, टीका, निंदा सोसावी लागत असल्यामुळें, साहेब कितीहि स्वार्थी, निलाजरा असला तरी त्याला थोडें तरी वरमावें लागतें यांत शंका नाहीं. राज्यक्रान्तीचा भूकंप होऊन सगळीच सुधारणा एकदम होईल, आणि झाडावरून फळ तुटून हातांत पडल्याप्रमाणें, सगळें राजसूत्र एकदम लोकांच्या हातीं येईल, त्या दिवसाची वाट पाहत बसलेंच पाहिजे. पण तें घडून येईपर्यंत, हल्लींचा क्रमहि थोडाबहुत चालू ठेवलाच पाहिजे.

* * *

अशा रीतीनें दिल्लींतील गेल्या आठवड्याला 'लोहयुग' याशिवाय दुसरें नांव देतां येत नाहीं. स्टील प्रोटेक्शन बिल म्हटलें तरी, लोखंड-पोलादाचाच कारभार; आणि रेल्वेखातें म्हटलें तरी, लोखंडाचेंच साम्राज्य. म्हणूनच कीं काय, या दोनहि विषयांवरील चर्चाहि लोखंडासारखी खणखणीत झाली! मात्र पहिल्या बाबतींत यश आलें नाहीं, दुसऱ्या बाबतींत यश आलें ही गोष्ट

वेगळी. ह्याच आठवड्यांत पुढें येऊन मागें राहिलेले आणखी दोन विषय म्हणजे, दक्षिण-आफ्रिकन सरकारनें हिंदुस्थान सरकारशीं केलेला करार आणि विलायती वैमानिक कंपनीला हिंदुस्थानावरून विमानें नेण्याच्या बाबतींत पैशाची वगैरे मदत करण्याची सरकारची योजना. दक्षिण-आफ्रिकेशीं झालेल्या करारासंबंधानें स्वतः सरकार कोणताच ठराव मांडणार नसून, नॅशनॅलिस्ट पक्ष व स्वराज्य पक्ष ह्यांनीं आपापले ठराव पाठविले आहेत. मग इतर कोणी सुचेल त्याप्रमाणें त्याला दुरुस्त्या पाठवील. लोकमताचा साधारण ठराव म्हटला म्हणजे असा कीं, अडचणीच्या स्थितींत, शिष्टमंडळ जाऊन त्यांना करतां येण्यासारखें होतें तें त्यांनीं केलें, पण झालें तें कांहीं मनासारखें झालें नाहीं. आणि हिंदुस्थान सरकारनें असेंब्लीला विचारल्याशिवाय त्याला संमति दिली हेंहि कांहीं बरें केलें नाहीं. विलायतेंतल्याप्रमाणें येथेंहि आधीं तह आणि मग चर्चा हेंच तत्त्व अनुसरलें गेलें तर त्यांत नवल काय? तहाची नापसंती म्हणून शिष्टमंडळाची निंदा करावी असा कांहीं कोणाचे मनांत अर्थ नाहीं. कारण परिस्थिति बिकट होती हें सर्वच जाणतात. शिष्टमंडळावर दक्षिण आफ्रिकेच्या मेजवानीनें गुण केले म्हणावें तर त्यापूर्वी दक्षिण-आफ्रिकेचें शिष्टमंडळ इकडे आलें आणि आमच्या लोकांनीं त्यांना मेजवान्या दिल्या त्या अन्नाचाहि परिणाम उलट बाजूला थोडासा दिसून आला नसेल असें तरी कसें म्हणावें? पण हिंदुस्थान सरकार, विलायत सरकार व वसाहत सरकार ह्या तिघांच्या मुत्सद्देगिरीची ही एक परीक्षाच होती. आणि सामान्यपणें बरें मानण्याइतका ह्या तऱ्हेनें या तिरंगी सामन्याचा निकाल लागला हीच गोष्ट विशेष मानावयाची.

* * *

इकडून गेलेल्या शिष्टमंडळापैकीं, फिरोज सेठना हे कौन्सिल ऑफ स्टेट-मध्यें आहेत; आणि त्यांनीं सर दिनशा वाच्छा यांजकडून ठराव मांडवून शिष्टमंडळाची पाठ यापूर्वींच थोपटून घेतली आहे. शिष्टमंडळापैकीं दुसरे दोन सभासद, नामदार शास्त्री व सर डार्सी लिन्डसे हे असेंब्लींत आहेत. त्यांची मात्र पाठ थोपटण्यासारखे ठराव मंजूर होणार नाहींत. फक्त पाठ थोपटली जाणार नाहीं इतकेंच काय तें. तेरा वर्षांपूर्वी जनरल स्मट्स यांच्याशीं तह मांडून एक योजना करण्यांत आली त्या वेळीं ना. गोखले हे दक्षिण-आफ्रिकेंत शिष्टाईला गेले होते. आज त्यांचे शिष्य नामदार शास्त्री हे गेले होते. दोनाहि

प्रसंगीं महात्मा गांधी हेच परीक्षक असून त्यांनीं हल्लींच्या तहांतील एक-दोन दोष दाखविले असले तरी एकंदरींत या तहाला त्यांनीं आशीर्वादच दिला आहे. शिवाय सर्व चर्चा झाल्यावर ना. शास्त्री असेंब्लींतील टीकाकारांना जर असें म्हणाले कीं, आमच्या जागीं तुम्ही जाऊन तरी अधिक काय केलें असतें, तर तो प्रश्न फारसा वावगा होणार नाहीं. आणि उलट टीकाकारांनीं जर त्यांना असेंब्लीचे सभासद म्हणून, हिंदी लोकांचे प्रतिनिधी या नात्यानें, आमचे जागीं तुम्ही असता तर तुम्ही कसा ठराव केला असता असा प्रश्न विचारला तर तोहि वावगा होणार नाहीं.

* * *

दुसऱ्याचें अन्न खाल्ल्यानें मिंधेपणा येतो म्हणतात आणि कित्येक स्वार्थी धूर्त लोक या कपटनीतींचा उपयोग जाणूनबुजून करतात ही गोष्ट प्रसिद्धच आहे. तिलाच अनुसरून कदाचित् गेल्या सोमवारीं घोडदौडीच्या मैदानावर विमानाचे खेळ सरकारनें हजारों लोकांना फुकट दाखविले आणि मंगळवारीं कौन्सिल ऑफ स्टेट व असेंब्ली यांच्या सभासदांना एका मोठ्या विमानांत बसवून फिरवून आणलें. पण सरकारचा तसा हेतु होताच असें म्हणण्यांत फारसा अर्थ नाहीं आणि असला तरी, त्या हेतूला कोणी फारसे बळीहि पडलें नाहीं. त्या सामान्य शिष्टाचाराच्या गोष्टी होत. घोडदौडीवरील खेळाचे आदले दोन दिवस, शेंकडों विमानें चोहोंकडून जमविण्यांत आलीं होतीं आणि आठ-आठ दहा-दहा विमानांच्या चार टोळ्या करून त्यांनीं नव्या-जुन्या दिल्ली-वरील नभोमंडळ आपल्या आवाजानें दुमदुमून सोडलें होतें. विमानांची गर्दी इतकी झाली होती कीं, हे नवे भाऊबंद कोण आले अशी नभोमंडळांत फिरणाऱ्या घारींना दुरून शंका वाटली असावी. विमानांचे खेळ दाखविले त्यांत उलट्या उड्या, चक्री उड्या, सूर, ऊठबशा, वगैरे शेंकडों चमत्कारिक प्रकार होते. मंगळवारीं हीं सर्व विमानें कॅंटोन्मेन्टच्या मैदानावर आणून ठेवलीं होतीं. किर्लोस्करांच्या कारखान्याबाहेर जसे नांगर अंथरून ठेवलेले दिसतात तशींच हीं विमानें लांबून दिसत होतीं.

* * *

सभासदांना फिरवून आणणारें विमान सर्वांत मोठें असून, प्रत्येक वेळीं त्यांतून १८ माणसांची तुकडी नेण्यांत येई. विमानाचा आकार देवमाशाचा, पंख गरुडाचे, पुढील पंखे राक्षसी आकाराच्या झुरळाच्या मिशांसारखे, शेंपूट

सामान्य पक्षाचें आणि अंगावरील रंग मोहरमांतील सोंगासारखा चित्रविचित्र असें हें विमानाचें ध्यान होतें. त्याच्या तोंडांतील शेंकडों हॉर्सपॉवरचें एंजिन एखाद्या 'फटफटी' गाडीच्या पंचवीस पट मोठा आवाज एकसारखें करीत होतें. तोंडापुढचे पंख गरगर फिरून राहिल्यानें वावटळीसारखा वारा जवळ उभें राहणाऱ्याला लागत होता. विमानाचा डबा एखाद्या चिंचोळ्या आगगाडीच्या कंपार्टमेंटसारखा असून डोक्याच्या उंचीबरोबरीनें बाहेर पाहण्याला लहान लहान खिडक्या झरोके—ठेवलेले होते. समोरच दोन ड्रायव्हर एका लोखंडी कणगींत उतरून फक्त वर डोकें दाखवीत होते. विमानाचें दार लावून घेतल्यावर, आडरानांत चालणाऱ्या मोटारीसारखे धक्के देत देत विमान प्रथम चाललें, चक्राकार फिरलें, आणि न कळतां हळूच जमीन सोडून वर निघालें. उंच उंच झाडें पायाखालीं दिसूं लागलीं तेव्हांच तें वर चढलें असें समजलें! सुमारें १० मिनिटांत नव्या-जुन्या दिल्लीला प्रदक्षिणा करून विमान परत आलें. त्याचा वेग दरताशीं सुमारें ८० मैल असावा व सुमारें १२०० फूट उंचीवर तें गेलें असावें. कारण त्यांतून नव्या दिल्लींतील राजवाडा आणि नवीं सभागृहें हीं दिवाळींत लहान मुलें किल्ले बांधतात तशीं दिसत होतीं. यमुनेचें पात्र १०-१५ फूट रुंद आहे असें वाटे. ८० मैलांचा वेग होता तरी आंतल्या बाजूला तोंड फिरवून बसणाऱ्याला यत्किंचित् देखील गति भासत नव्हती! आगगाडींत थोडी तरी गति जाणवते. विमान वर खालीं होण्याकरितां पंख हलवी तेव्हां मात्र आगबोटीप्रमाणें किंचित् सूक्ष्म हेलकावे बसलेसे वाटत; आणि विमान चालतांना आजूबाजूचे पदार्थ जरी चालतात असें दिसलें तरी आगगाडींतून तारे पाहावेत त्याप्रमाणें ते आपल्याबरोबरच येत आहेत कीं काय असें वाटतें. विमानाच्या खिडकींतून बाहेर पाहणाऱ्याला घाटांतून आगगाडी जात असतां, आपण वर व दऱ्या आणि झाडें खालीं दिसतात तसा देखावा दिसत होता. तात्पर्य, डोळे मिटून बसणाऱ्याला किंवा आंतल्या आंत पाहणाराला आपण अंतरिक्षांत इतके वर चाललों आहों असें वाटण्याचा संभव नाहीं. पुराणांतरीं पर्वताला पंख होते असें आपण वाचतों. आजचें विमान पर्वताहून लहान खरें, पण जड पदार्थाला पंख फुटून गति मिळाली हें मात्र अनुभवसिद्ध ठरलें! हिंदु पुराणांतील पर्वतांना पंख आहेत तर खिस्ती पुराणांत देवदूतांना पंख आहेत. आणि विमान शरिरानें जरी जड तरी आंतील इंजिनांच्या प्रचंड शक्तीमुळें देवदूताप्रमाणें जिवंत आहे असेंहि कां म्हणूं नये?

पण आतां हे नवे देवदूत जगाचें कल्याण करणार, कीं जगाची हानि करणार हें कोणी सांगावें ?

*  *  *

कौन्सिल ऑफ स्टेटमध्यें चालू आठवडयांत एक कधीं न घडणारी गोष्ट घडली. लोकपक्षाचा एखादा उपयुक्त ठराव येऊन तो मंजूर होणें हा या कौन्सिलांत एक कपिलाषष्ठीचा योगच होय. तो मद्रासचे श्री. रामदास पंतलू यांनीं आणला. शेतकरी लोकांना जमिनीच्या तारणावर लांब मुदतींचीं कर्जें देण्यासाठीं 'लँड मॉर्गेज बँका' स्थापन कराव्या अशा अर्थाचा हा ठराव होता. या सूचनेस सरळ विरोध करणें सरकारला शक्यच नव्हतें. पण हा प्रांतिक सरकारच्या हातांतला विषय आहे आणि सध्यां शेतकी कमिशन त्याचा विचार करीत आहे, तेव्हां त्याचा आतांच वरच्या कौन्सिलांत विचार करणें अयुक्त होय असें सरकारतर्फे सांगण्यांत आलें. असल्याच युक्तीनें साधारणतः या कौन्सिलांत ठराव परत घेतले जातात. पण श्री. रामदास यांनीं ठराव परत न घेतां मतें मोजण्यापर्यंत तड पोंचविली व २१ विरुद्ध २० इतक्या अल्प अंतरानें का होईना पण तो पास झाला. दक्षिण-आफ्रिकेच्या निकालाबद्दल असेंब्लींत तूर्त कांहींच ठराव न आणण्याचें ठरलें असलें तरी ता. २३ रोजीं कौन्सिल ऑफ स्टेटनें सर दिनशा वाच्छा यांच्या शिष्टमंडळाचें अभिनंदन करणारा ठराव मंजूर करून टाकला. श्री. केळकर यांचें सोसायट्यांच्या रजिस्ट्रेशनसंबंधींच्या कायद्यांतील दुरुस्तीचें असेंब्लींत पास झालेलें बिल ना. खापर्डे यांनीं तेथें मांडलें व किरकोळ शाब्दिक फरक होऊन तेंहि मंजूर झालें.

## पत्र नं. ७

ता. ४-३-२७

गेल्या आठवड्यांत शुक्रवार तारीस २५ फेब्रुवारी व शनिवार तारीख २६ फेब्रुवारी रोजीं रेल्वेखात्याच्या कारभारावरील टीका समाप्त झाली. उरलेले अनेक मुद्दे तींत चर्चेला निघाले होते. रेल्वेखात्याचा खर्च बेसुमार आहे अशाविषयीं पंडित कुंझरू यांची उपसूचना बहुमतानें मंजूर झाली. श्री. अणे यांची हिंदी कामगारांच्या नेमणुकांसंबंधाची उपसूचना अवघ्या दोन मतांनीं नामंजूर झाली. स्वराज्य पक्षाचे टी. प्रकाशम् ह्यांनींहि दोन कोटींचा 'दांडगा' कांट देणारी एक उपसूचना मांडली होती. पण एवढ्या

मोठ्या टीकेचा घास त्यांचा त्यांनाच घेववला नाहीं. त्यांनीं केलेलें समर्थन कोणालाच पटण्यासारखें नव्हतें व सूचनेला पाठबळ देण्याकरितां कोणत्याहि पार्टीचे हुकूम सुटले नव्हते. अर्थात् प्रकाशम् यांच्या बाजूला पांच-पंचवीस मतें पडलीं. शनिवारीं संध्याकाळीं बरोबर पांच वाजतां नियमाप्रमाणें ह्या खात्याच्या चर्चेची मुदत संपली, आणि छापखान्यांत कापण्याच्या यंत्राखालीं कागदाच्या जुड्या ठेवून भराभर कापून काढतात, त्याप्रमाणें सर चार्लस इन्नेस यांच्या बाकीच्या सर्व मागण्या अवघ्या दोन मिनिटांत मंजूर झाल्या. कागदावर आणखी पुष्कळ सूचना उरल्या होत्या, आणि त्यांतील खरोखरच कांहीं उपयुक्त होत्या. पण हरिदासी नमनानें वेळ खाल्ल्यानें आख्यानाला वेळ उरला नाहीं.

* * *

मताला न घालण्याच्या आणि केवळ दिग्दर्शनानें परत घेण्याच्या अशाच कांटाच्या ज्या सूचना होत्या त्यांत प्रत्येक पक्षाच्या कांहीं कांहीं होत्या. श्री. नियोगी, नारायण मल्हार जोशी, केळकर वगैरेनीं आपलें म्हणणें काय तें पुढें मांडलें, पण उपसूचना मताला घातल्या नाहींत. केळकरांची उपसूचना रेल्वे सल्लागार मंडळ व मालाच्या वाहतुकीचे दर यासंबंधाच्या होत्या. किर्लोस्करबंधु आपले कारखान्यांत सर्व प्रकारचीं शेतकीचीं औतें तयार करीत असतात, त्यांतील कांहीं मालाला शेतकीचीं औतें मानण्यांत येतें आणि कांहींला तसें मानण्यांत येत नाहीं, आणि अशा बाबतींत, मुंबई शेतकीखातें, मुंबई सरकार वगैरेनीं मध्यें पडून भांडून स्पष्ट शब्दांनीं शिफारशी केल्या असल्या तरी, रेल्वेबोर्ड त्या मानीत नाहीं यामुळें त्या कंपनीचें नुकसान कसें होतें हें केळकरांनीं आंकडेवार सांगितलें. तसेंच हिंदुस्थानांतील कांचेच्या कारखान्यांकडून टॅरिफ बोर्डाकडे कांहीं संरक्षणादाखल मदत मिळण्याकरितां अर्ज गेलेला आहे, त्यांत रेल्वे असल्या कारखान्यांना योग्य ती सवलत देत नाहीं अशी तक्रार केली आहे वगैरे गोष्टींचाहि उल्लेख त्यांजकडून साधार करण्यांत आला, आणि श्री. गोस्वामी वगैरे इतर प्रांतांतील लोकांनींहि अशाच तक्रारी सांगितल्या.

* * *

सोमवार ता. २८ रोजीं सायंकाळीं पांच वाजतां, सर बेसिल ब्लॅकेट यांनीं आपलें जमाखर्चाचें अंदाजपत्रक सादर केलें. ब्लॅकेटसाहेबांच्या फडणविशीचें

हें पांचवें वर्ष. कित्येकांच्या मतें त्यांची मुदत वाढविलीहि जाईल. कारण त्यांच्या कारकीर्दींत दरवर्षी खर्चापेक्षां जमेची बाजू अधिक भरून कांहीं शिल्लकच उरते. गेल्या पांच वर्षांत भिठावरील कर थोडा कमी होऊन, कांहीं प्रान्तांना प्रांतिक खंडणींतच सूट मिळाली. पण त्याच्या उलट पोस्टाचे दर कायमचे वाढले आणि आयात जकातीहि वाढल्या व मुख्यत्वेंकरून पूर्वीचे फडणवीस सर माल्कम हेले यांच्या वेळीं, नुकतेंच युद्ध संपल्यामुळें, अनिश्चितपणाचीं जीं कारणें होतीं, तींहि नाहींशीं झालीं. यामुळें सर बेसिल ब्लॅकेट यांना सुसूत्रता लाभली. अर्थात् केवळ जमाखर्चाच्या बाबतींत एकाला निंदावयाला व दुसऱ्याला वंदावयाला फारसें कारण नाहीं. तसेंच माल्कम हेले यांच्या कारभारांत हुंडणावळीचा फारच घोटाळा झाला होता. तितका जरी नाहीं तरी, सर बेसिल ब्लॅकेट यांनीं थोडासा घोटाळा केलाच आहे. हुंडणावळ वाढती ठेवून त्याकरितां हिंदुस्थानांतील सोनें खर्चणें, आणि नाण्याची बरीचशी नाकेबंदी करणें इत्यादि गोष्टी त्यांनीं केल्याच. पण कायमची हुंडणावळ वाढवून ठेवण्याचा त्यांचा विचार नेहमींच होता व आजहि आहे. 'चार इंची तोफा आणि सहा इंची तोफा' यांचें हें युद्ध येत्या आठवड्यांत असेंब्लींत होणारच आहे, तेव्हां कोणाचा जय होतो पाहावें. सर बेसिल ब्लॅकेट यांच्यामध्यें दक्षता, सुबुद्धता इत्यादि कांहीं चांगलेहि गुण आहेत. म्हणून वरील विशेष कारणें सोडून दिलीं असतां, त्यांच्या प्रवृत्तीचा मनुष्य फडणविसाचे जागीं असल्यास तितकें बरें असें म्हणण्यास हरकत नाहीं. मुंबई इलाख्याला विशेष समाधानकारक अशी गोष्ट त्यांनीं केली व ती म्हटली म्हणजे सुमारें ५० लाखांहून अधिक खंडणीची सूट त्यांनीं यंदा मुंबई इलाख्याला दिली. मुंबई इलाख्यांत यंदा दुष्काळाचें स्वरूप अधिक भासत असल्यानें व तोट्याचें अंदाजपत्रक प्रसिद्ध झाल्यानें सर्व तोटा भरून निघण्याइतकी सूट मिळणें म्हणजे कच्छांतील रणाच्या वाळवंटांत गंगोदकाचा झरा प्रकट होण्यासारखेंच मुंबई सरकारला होणारें आहे.

* * *

इंग्रज वैमानिक कंपनीला मदत करण्याकरितां आणि हिंदुस्थानांत दोनचार ठिकाणीं विमाननौकांसाठीं बंदरें बांधण्याकरितां जी ९-९॥ लक्ष रुपयांची देणगी मागण्यांत आली होती तिची उरलेली चर्चा मंगळवारीं पुढें चालविण्यांत आली व ती संपलीहि. ह्या देणगीला विरोध करण्याची सूचना लाला लजपतराय

यांनीं दिली होती आणि स्वराज्य पक्षानेंहि विरोध करण्याचें ठरविलें होतें आणि त्यावर षण्मुखम् चेट्टी, डॉ. मुंजे वगैरेंचीं भाषणें फारच चांगलीं झालीं. डॉ. मुंजे यांचें सविस्तर असें हें पहिलेंच भाषण असल्यामुळें त्यांची स्पष्टोक्ति, निर्भीडपणा व कोटिक्रम सभासदांना बराच आवडला. पण दोन वाजल्यापासून कांहीं तरी तडजोड करण्याचीं खलबतें चालू झालींशीं दिसलीं. देणगी नामंजूर होऊं नये हें सरकारला इष्टच होतें. पण देणगी दिली तर उलट आपणाला फायदेशीर अशीं कांहीं कलमें मिळवितां येतील कीं नाहीं असाहि लोकपक्षाचा विचार सुरू होता. 'सोडलें तर पळतें आणि धरलें तर चावतें' अशीच किंचित् लोकपक्षाच्या मनाची स्थिति होती. आज देणगी नामंजूर केली तर व्हाइसरॉय ती मंजूर करणारच. पण आज आपण मंजूर करतांना कांहीं कलमें आपल्या हातानें घातलीं तर तीं मान्य होण्याचा जसा आज जास्त संभव तसा उद्यां नाहीं, अशा उभय पक्षांच्या अडचणीमुळें, सर भूपेंद्रनाथ मित्र व विशेषतः सर बेसिल ब्लॅकेट यांनीं, वैमानिक कंपनी निघाल्यास ती बहुतांशीं हिंदी लोकांच्या ताब्यांत राहील अशी व्यवस्था करण्याचें आणि हिंदी तरुणांना विमानविद्या शिकविण्याचें आश्वासन दिल्यामुळें, मतें घेतांना जरी अनेकांनीं तोंडी नकार दिला, तरी प्रत्यक्ष मतें मोजण्यापर्यंत कोणीहि पाळी आणली नाहीं. ह्या प्रसंगाचा फायदा घेऊन वैमानिक कॅप्टन पटवर्धन यांनीं गेल्या दोन आठवड्यांत अनेक सभासदांच्या गांठी घेतल्या, त्यांनीं विमान-विद्येचें महत्त्व व स्वतःचा अनुभव सांगितला; आणि हिंदुस्थानांत खासगी क्लब बनविले असतां ही नवी विद्या स्वतंत्र रीतीनें लोकांना शिकतां येण्याची व्यवस्था होऊं शकेल ही गोष्ट पटवून दिली. ह्यामुळें असेंब्लींतील कांहीं प्रमुख सभासदांच्या साह्यानें अशा क्लबाची एक योजनाहि तयार होत आहे.

* * *

काल गुरुवारपासून अंदाजपत्रकावरील सर्वसामान्य चर्चा सुरू आहे. पण सोमवारपासून तिला खोट पडणार आणि पुनः दोन दिवसांनीं ती पुढें चालेल. याचें कारण तारीख सात व आठ हे दिवस हुंडणावळीच्या चर्चे-करितां निश्चित करण्यात आले आहेत. यंदाच्या ह्या बैठकीला मुख्य वादाचा प्रश्न हाच होय आणि आपल्या पक्षाची सरशी व्हावी ह्या हेतूनें दोनहि बाजूंचे यत्न सुरू झाले आहेत. मुंबई इलाख्यांतील करन्सी लीगशीं संबंध असलेली बहुतेक मंडळी हल्लीं दिल्लीस आहेत. हुंडणावळीच्या प्रश्नाबरोबर

हिंदी चलनाचा प्रश्नहि शक्य तर समाधानकारक रीतीनें सुटावा, अशी इतर प्रांतांतून भावना आढळते. तारीख ७ रोजीं येणाऱ्या करन्सी बिलाला अनेक उपसूचना आल्या आहेत. पैकीं हुंडणावळीचा भाव १६ पेन्स आणि रुपयाच्या नाण्यांतील ऐवज सोन्याचा ७.५३३४४ ग्रेन्स ( ट्रॉय ) इतका मानला जावा अशाविषयीं उपसूचना जम्नादास मेथा, केळकर, षण्मुखम् चेट्टी, विद्यासागर पांड्या वगैरेनीं दिल्या आहेत. पण सोन्याचें नाणें कोणत्या ना कोणत्या रूपानें चालू राहावें, म्हणून नवी मोहोर पौंडाच्या बरोबरीची हिंदी टांकसाळींत पाडावी, आणि सॉव्हरिन हें चलन सरकार बंद करीत आहे तें कायम ठेवावें, आणि सोन्याची जामिनकी असलेल्या चलनी नोटाच काढाव्या व यांपैकीं कोणी मागेल तें मागेल त्याला द्यावें अशाविषयीं उपसूचना मुख्यतः केळकर, विद्यासागर पांड्या यांच्या आहेत. कांहीं लोकांचें म्हणणें, सुवर्णचलनाचा प्रश्न हुंडणावळीच्या प्रश्नांत तूर्त मिसळूं नये. आणि इतरांचें म्हणणें, ह्या बिलांत हात घालून, सुवर्णचलनाचे कांहीं प्रकार मिळाले तर हीच उत्तम संधि आहे. एरवीं अशा बिलांना सरकारी परवानगीची अडचण येण्याचा संभव आहे. पण उपसूचना आतां दाखल होऊन गेल्या आहेत आणि एकंदरीनें पाहतां, सुवर्णचलनाविषयीं अनुकूल मत आहे, ह्यामुळें प्रगतिपर असें ह्यांतून कांहीं निष्पन्न होतें कीं नाहीं पाहावें. ह्या बिलाची चर्चा कदाचित् दोन दिवसांत संपणारहि नाहीं, आणि बिल मंजूर होण्याला बराच अवधि लागेल व तें सिलेक्ट कमिटीकडे सोंपविलें गेलें म्हणजे बरें किती होईल आणि वाईट किती होईल ह्याचा अंदाज कांहींच करतां येत नाहीं.

* * *

## पत्र नंबर ८

ता. ११-३-२७

हुंडणावळीचें युद्ध आज बरेच दिवस गाजत होतें, त्याचा एका मुद्द्यापुरता निकाल गेल्या मंगळवारीं लागला. सरकारच्या बाजूला ६८ व लोकांच्या बाजूला ६५ मतें पडून अवघ्या तीन मतांनीं सरकार पक्षाचा विजय होऊन हुंडणावळीचा दर रुपयास १८ पेन्स हा ठरला. ह्या प्रश्नाला इतकें महत्त्व आलें होतें कीं, पूर्वीं केव्हां कोणत्याहि वादग्रस्त प्रश्नाच्या वेळीं कधीं हजर नव्हते तितके सभासद ह्या निकालाच्या वेळीं हजर होते. एकशें तेह-

तिसांनीं तर प्रत्यक्ष मतें दिलीं, आणि दोघांनीं हजर असून मतें दिलीं नाहींत. ८४३ सभासदांपैकीं १३५ हजर होते, ह्यावरून दोघां पक्षांनीं ह्या प्रश्नाची चुरस किती मानली होती हें आपोआप कळून येईल. मंगळवारच्या पूर्वी दोन-तीन दिवस फारच कसून प्रयत्न झाला. त्यांत सरकारच्या बाजूचे प्रयत्न कशा स्वरूपाचे होते ह्याचें स्पष्ट दिग्दर्शन जिना यांनीं आपल्या भाषणांत केलें.

* * *

लोकपक्षाच्या बाजूला झालेल्या प्रयत्नांत मुख्य प्रयत्न हा होता कीं, १६ पेन्सांपेक्षां १८ पेन्स हा दर अधिक चांगला, निदान आज घटलेला तरी तो चांगला, अशी समजूत असणाऱ्या लोकांशीं सांगोपांग चर्चा करणें; जे नुसते संशयात्मे म्हणून मिरवीत होते, त्यांचा संशय दूर करून त्यांची समजूत काढणें आणि ज्यांची समजूत पडणें अशक्य ठरलें त्यांना प्रसंगाचें महत्त्व समजावून देणें. १६ पेन्स व १८ पेन्स हे दर तुल्यबल इतकेंच फार तर कोणाला म्हणतां येईल. परंतु अशा स्थितींत सरकारनें जी बाजू उचलली तींत सरकारच्या फायद्याचें व लोकांच्या तोट्याचें असें कांहीं तरी बीज असलेंच पाहिजे आणि नफातोट्याचें बीज नसलें तरी, हा निदान चुरशीचा सामना तर खास. ह्यांत लोकपक्षाचा जय होणें आणि सरकारचा पराजय होणें हाच नफा. इतक्या-पर्यंत एका-दोघांशीं युक्तिवाद न्यावा लागला!

* * *

अशा लोकांपैकीं स्वराज्य पक्षांत चार-पांच होते, आणि नॅशनॅलिस्ट पक्षांत अवघा एकच होता. राजकीय पक्ष म्हणून बनविला तर त्याची शिस्त म्हणून कांहीं असतें, ती तरी पाळा असेंहि शेवटीं म्हणावें लागलें. परंतु यांत कांहीं फारसें दूषण नव्हतें. कारण सरकारच्या बाजूनें ज्यांनीं मतें दिलीं त्या लोकांना तरी स्वातंत्र्य कोठें होतें? त्यांचे हातपाय अधिकच बांधले गेले होते. सरकारच्या बाजूला ६ इंची तोफा व लोकांच्या बाजूला ४ इंची तोफा एवढाच नुसता फरक नव्हता तर, त्याच्या ६ इंची तोफांत ज्या प्रकारची पिवळी दारू त्यांना भरतां आली, तशी लोकपक्षाच्या तोफांतून भरतां येणें शक्य नव्हतें. अशा स्थितींत "तुझ्या मनाला संशय वाटत असला तरी लोकांकरितां मत दे" असें दुसऱ्याला कोणी म्हटलें असलें तर त्यांत वावगें काय?

* * *

हुंडणावळीच्या बिलावर दोन दिवस वाद झाला, आणि झाला तोहि फारच थाटदार आणि वरच्या प्रतीचा झाला. विषयाला राजकीय स्वरूप नव्हतें असेंहि नाहीं, पुष्कळच होतें. पण बहुतेक भाग अर्थशास्त्रीय युक्तिवादावर पडलेला होता. हुंडणावळीचा १६ दर पेन्सांवरून १८ पेन्सांवर सरकारनें दोन वर्षांपूर्वीं नेऊन ठेवला त्या वेळीं ती गोष्ट हिंदुस्थान सरकार व विलायत सरकार ह्यांच्या संगनमतानें ठरली. "तुम्हां आम्हां दोघांच्याहि मनांत हुंडणावळीचा दर क्रमाक्रमानें २ शिलिंग म्हणजे २४ पेन्सांपर्यंत नेऊन ठेवण्याचें आहे. पण एकदम अशी गोष्ट करतां येत नाहीं आणि केली तरी ती पचत नाहीं, म्हणून १८ पेन्सांवरच तूर्त थांबा, ह्यापुढें जाण्याचा आग्रह आम्हांस करूं नका, तसें केलें तर हिंदुस्थानांतील सगळेच उद्योगधंदे बुडतील व हिंदुस्थानांत हाहाःकार होईल" असें विलायत सरकारला समजावून, सांगून 'जनाच्या आणि मनाच्या लाजेनें १८ पेन्सांवरच दर कायम करा, पुढें पाऊल टाकूं नका' अशा अर्थाच्या तारा हिंदुस्थान सरकारनें विलायतेस केल्या होत्या, त्या सर पुरुषोत्तमदास ठाकुरदास यांना विलायतेंत पाहावयास सांपडल्या. हल्लीं त्या प्रसिद्धहि झाल्या आहेत, त्यांचा उपयोग वादविवादांत करण्यांत आला व सरकारतर्फे त्यांना उत्तर देण्यांत आलें नाहीं. उत्तर तरी देणार काय?

* * *

या तारांची गोष्ट निघाली म्हणजे ब्लॅकेटसाहेब मुकाट्यानें मान खालीं घालीत. पण १८ पेन्सांच्या भावाशीं बाजारभावाचा मेळ बसला आहे का नाहीं असला प्रश्न निघाला, म्हणजे आडरानांत पळण्याला जशा शेंकडों वाटा, त्याप्रमाणें अस्तिपक्षीं, नास्तिपक्षीं युक्तिवादाला ते अनेक तोंडें पाडीत. एकानें दुसऱ्याला म्हणावें, "मोठी आली तुम्हांला शेतकऱ्यांची कळकळ म्हणून त्यांची सबब सांगून १६ पेन्सांचा दर मागतां!" त्याला दुसऱ्यानें उत्तर द्यावें, "मजुरांविषयीं कळकळ दाखवून तुम्ही १८ पेन्स दर मागतां, ती तुमची कळकळ किती खरी हें आम्हांला माहीत आहे!" अशा आडव्या-तिडव्या वादविवादामुळें, ऐकणाराची समजूत पडण्यापेक्षां बुद्धिभ्रंशच अधिक होत असे. हिंदी लोकांत देखील १८ पेन्स हा दर असावा अशा प्रामाणिक मताचे लोक नाहींत असें नाहीं. परंतु केवळ प्रामाणिक मतभेदानें ह्या प्रश्नाचा निकाल लागणारा नव्हता. सर बेसिल ब्लॅकेट यांनीं सर्वांत

एक मोठी गोष्ट करून ठेवली होती ती अशी कीं, १८ पेन्सांऐवजीं १६ पेन्स हा दर कायम केला तर, रेल्वेसुद्धां एकंदर राजकीय कारभारांत ७-८ कोटींची वार्षिक तूट पडेल अशा अर्थाचें एक पत्रक काढून त्यांनीं प्रसिद्ध केलें होतें. आणि एवढी तूट भरून काढावी लागणार त्याअर्थीं १८ पेन्सांचा दर ठरविणें बरें, अशा युक्तिवादाची भर प्रामाणिक मतभेदांत पडण्यासारखी होती. ह्या आठ कोटींच्या तुटीचा बाऊ पुष्कळांना भेवडावीत होता. जुन्या राजे लोकांच्या दरबारांत सर्व सभा निःशस्त्र बसलेली असतां, एक सरकारी शिपाई हातांत नागवी तरवार घेऊन उभा असावा अशी शिस्त असल्याचें सांगतात. त्याचा उद्देश असा कीं, सिंहासनावर राजा आणि शिपायाच्या हातांत नागवी तरवार, ह्यामुळें राजाशिवाय कोणी अप्रिय बोलला तर राजाची आज्ञा होतांच, त्याचा शिरच्छेद होण्याची तयारीच आहे असें सर्व सभासदांनीं लक्षांत ठेवावें. असेंब्लीच्या दरबारांतहि, ब्लॅकेटसाहेब हे सिंहासनावर उभे व आठ कोटींची तूट हीच ह्या दरबारांत नागवी तरवार उभी होती !

* * *

मंगळवारीं संध्याकाळीं, सर्वसामान्य वादविवादाचा लोकांना कंटाळा आला म्हणण्यापेक्षां मनावरील ताण इतका तीक्ष्ण झाला कीं, कोणाचाहि जय होवो अगर कोणाचाहि पराजय होवो; पण १६-१८ पेन्सांचा हा वाद मतें घेऊन, एकदां निकालांत निघावा असें प्रत्येकाला वाटूं लागलें, म्हणून अध्यक्षांनीं वाद बंद करून मतें घेतलीं. त्यांत निकाल वर सांगितल्याप्रमाणें झाला. एका अर्थानें वाद संपला, पण दुसऱ्या अर्थानें सुरू झाला असें म्हणण्यास हरकत नाहीं. कारण १८ पेन्स हा भाव तरी कितपत कसा टिकणार ह्याविषयीं लोकांना शंकाच आहे. तो टिकविण्याकरितां, सरकारला किती सोनें खर्च करावें लागतें, अथवा किती कर्ज काढावें लागतें, ह्याचा अनुभव यावयाचा आहे. शिवाय युरोपांत ज्याप्रमाणें महायुद्धानें, भूगोलाचें व हुंडणावळीच्या प्रश्नाचें शिक्षण सामान्य जनतेला दिलें, त्याप्रमाणें असेंब्लीच्या वादानें तें शिक्षण हिंदी लोकांनाहि दिलें असल्या कारणानें हा विषय यापुढें लोकांच्या चर्चेंत नेहमीं राहील असा संभव आहे. तसेंच नवीन रिझर्व्ह बँकेचें बिल यावयाचेंच आहे. तें मंजूर झाल्यास नवी मोठी बँक निघावयाची, तिचे शेअर्स लोकांत खपावयाचे, इत्यादि नव्या गोष्टींचीहि थोडी-बहुत चळवळ होणार आणि सोन्याचें नाणें हिंदुस्थानांत चालू व्हावें हाहि प्रश्न मध्यंतरीं

जो एका बाजूला पडला होता, तोहि प्रश्न चर्चेला अधिकाधिक निघणार यांत शंका नाहीं.

* * *

सुवर्णचलनासंबंधीं सरकारी बिलाला केळकर, विद्यासागर पांड्या, टी. प्रकाशम् ह्या तिघांनीं उपसूचना पाठविल्या आहेत त्या उद्यां चर्चेला निघतील. सरकारचें म्हणणें असें असल्याचें समजतें कीं, ह्या उपसूचना गैरलागू व बेशिस्त आहेत. कारण मूळ बिलाच्या प्रयोजनाच्या कक्षेबाहेर त्या पडतात. इतर लोकांचें म्हणणें असें कीं, करन्सी कमिशन व हल्लींचें बिल यांनीं सोन्याच्या नाण्यांचा सगळाच प्रश्न उपस्थित केलेला असून बिलांत ज्या तीन गोष्टी करण्याचें सरकारनें योजिलें आहे त्या करूं नयेत असें म्हणण्याचा व ज्यानें करण्याचें योजलें त्या करा म्हणण्याचा अधिकार उपसूचनावाल्यांना येतो. सोनें विकावें पण तें अंतर्गत व्यवहाराकरितां विकूं नये, असें बिलानें सरकार ठरविणार.अर्थात् परदेशीं पाठविण्याप्रमाणें, देशांत वापरण्यालाहि सरकारनें सोनें विकावें, अशी उपसूचना रास्तच ठरते. विलायती सॉव्हरिन आज कायदेशीर चलन आहे, पण हें नाणें बंद करावें असें कलम बिलांत आहे. अर्थात् तें चालू ठेवण्याची उपसूचना रास्तच ठरणार. तसेंच कोणत्याहि कामाकरितां कोणी रुपये दिल्यास सरकारनें त्याला सोनें द्यावें असें जर योग्य तर सोनें घेऊन कोणीं टांकसाळींत गेल्यास आणि नाणें पाडण्याचा खर्च दिल्यास, त्याची मोहोर पाडून द्यावी असें म्हणणें तरी बेकायदेशीर कसें ? उपसूचना मंजूर होवोत वा नामंजूर होवोत, तो प्रश्न वेगळा. अर्थात् ह्या प्रश्नाचा निर्णय सर्वस्वीं अध्यक्षांच्या हातीं आहे. ते निकाल काय देतात तें उद्यां सभा सुरू झाली म्हणजे कळून येईल. तात्पर्य, मुख्य लढाई संपली असली तरी आजूबाजूच्या चकमकी झडण्याला अजून जागा आहे.

* * *

बुधवारपासून अंदाजपत्रकांतील खर्चाच्या मागण्या मंजूर होण्यास सुरुवात झाली. ह्या मागण्यांचा छापील क्रम सोडून देऊन पुढल्या कांहीं मागण्या आधीं घ्यावा, म्हणजे त्यांत वाद करण्याला बऱ्याच जागा असतात. आणि यांतलीच एखादी घेऊन तिला राजकीय स्वरूप देतां येतें अशा हेतूनें व्हाइसरॉय-साहेबांचें जें एक्झिक्युटिव्ह कौन्सिल, त्याच्या फिरतीच्या खर्चाची साठ हजार रकमेची मागणी प्रथम वादाकरितां घेण्यांत आली. ह्या मागणीवर सूचना कोणत्या पक्षाच्या नांवानें दिली जावी, हा एक अर्थात् किंचित्

चढाओढीचा प्रश्न होऊन राहिला. कारण स्वराज्य पक्षानें हें यश आपणांस मिळावें म्हणून कांहीं सूचना हिकमतीनें दिल्या होत्या. परंतु अध्यक्षांनीं नॅशनॅलिस्ट पक्षानें दिलेली पहिली सूचना हीच सर्वांत ग्राह्य ठरविली, आणि त्याप्रमाणें श्री. जयकर यांनीं ती पुढें मांडली. ह्या वादाला राजकीय स्वरूप येणार असें ठरलें होतें आणि आलेंहि.

* * *

स्वराज्य पक्षातर्फे श्री. बेळवी यांचें भाषण नेहमींप्रमाणें स्पष्ट व सडेतोड झालें. श्री. जयकर यांच्या भाषणाचा सर्व सभागृहावर उत्कृष्ट परिणाम झाला. नॅशनॅलिस्ट पक्षातर्फे आणखी भाषणें श्री. केळकर व लजपतराय यांचीं झालीं. लाला लजपतराय ह्यांच्या भाषणापूर्वीं मौलवी महमद याकूब यांनीं हिंदु-मुसलमानांचा प्रश्न कांहींसा सौम्य स्वरूपांत काढला आणि त्याचा फायदा घेऊन लाला लजपतराय ह्यांनींहि हिंदुमहासभेचें म्हणणें काय आहे हें फारच उत्कृष्ट रीतीनें मांडलें. मुडिमन यांनीं प्रत्येक वक्त्यांच्या कोटिक्रमाला ठरीव सरकारी उत्तरें दिलीं; पण त्यांतूनहि त्यांची भाषासरणी विनोदाची असल्यामुळें सर माल्कम हेले ह्यांच्या भाषणाचा जो गंभीर परिणाम होत असे तोहि सरकारच्या बाजूला झाला नाहीं. आम्हाला चोर, दरवडेखोर म्हणणारे अभ्यंकर आज येथें नाहींत असें म्हणून मुडिमनसाहेबांनीं अभ्यंकरांची आठवण केली ! अखेर मतें मोजण्यांत आलीं तेव्हां श्री. जयकर यांच्या उपसूचनेला ६५ व सरकारच्या बाजूला ५६ मतें पडून राजकीय स्वरूपाच्या ह्या वादाचा निकाल लोकांच्यातर्फे लागला. ह्या वेळीं कांहीं मुसलमान सभासदांनींहि सरकारच्या विरुद्ध मतें दिलीं म्हणून हा जय मिळाला हें सांगितलें पाहिजे.

* * *

गुरुवारीं व शुक्रवारीं कस्टम खात्यावरील आणि तार व पोस्ट खात्यावरील उपसूचनांसंबंधीं वादविवाद संपून, एक-दोन वेळां मतें मोजून सरकारचा पराभव करण्यांत आला. कस्टम खात्यावरील चर्चेंत विशेष निष्पन्न कांहीं झालें नाहीं. तार व पोस्ट खातें यांच्या चर्चेंत पोस्टल रनरपासून बिनतारी तारायंत्राचें काम करणाऱ्या हिंदी कामगारांपर्यंत सर्वांच्या पगारवाढीची चर्चा थोडथोडी झाली; आणि सरकार तारखात्यांत पक्षपात कसा दाखवतें, त्यावर अधिक खर्च कसा करतें, त्यांत गोऱ्या लोकांची भरती कशी करतें वगैरे

मुद्दे निघाले होते. गेल्या ६ वर्षांत पोस्ट खात्याच्या वरिष्ठ अधिकाऱ्यांनीं आपल्या खात्यांतील लोकांचीं गाऱ्हाणीं बरींचशीं दूर केलीं ह्यांत शंका नाहीं. तथापि अजूनहि ह्या उपयुक्त खात्याला इतर वशिलेदार खात्याच्या मानानें सवलती मिळाल्या नाहींत ह्या गोष्टीविषयीं असेंब्लींतील सर्व पक्षांची एकी आहे. मतभेद असला तर तो इतक्यापुरताच आहे कीं, पोस्ट खात्याचे दर हल्लींहून कमी करतां येणें शक्य आहे कीं नाहीं ? व ते कमी करून उत्पन्नांत तूट पडल्यास खात्यांतील लोकांची पगारवाढ वगैरे कितपत होऊं शकेल ? पण यंदाचें वातावरण पाहतां पोस्ट खात्याचे दर कमी करण्याच्या उपसूचना फायनॅन्स बिलावर लादल्या जाण्याचा संभव नाहीं.

## पत्र नं. ९

ता. १७-३-२७.

चालू आठवड्यांत असेंब्लीच्या कामाला उतार लागला. स्टील प्रोटेक्शन बिल व हुंडणावळीचा दर या दोनच गोष्टी चालू बैठकींत महत्त्वाच्या अशा सहजच मानल्या गेल्या होत्या. ह्या दोहोंतहि सरकारी पक्षाचाच जय झाल्यामुळें आतां बाकी कांहीं विशेष उरलें नाहीं असें मानून सभासदांनीं हळूहळू दिल्लीहून पाय काढण्यास सुरुवात केली. करन्सी बिलावरील पहिल्या मतमोजणीचे दिवशीं १३५ सभासद हजर होते. ती संख्या घटून ११० वर आली असें काल केलेल्या मतमोजणीवरून दिसून आलें. असेंब्लीचें काम हिवाळ्याचे बैठकींत भरपूर अडीच महिने चालतें, तरी लोकपक्षाच्या वांटणीला म्हणजे त्यांचीं बिलें व ठराव पुढें आणण्याला अवघे चार-दोनच दिवस मिळतात. म्हणून या बैठकीच्या बरोबरीची दुसरी बैठक निदान दोन महिन्याची आक्टोबर-नोव्हेंबरमध्यें दिल्लीस भरवावी व सिमल्याची बैठक अजीबात वगळावी अशा सूचना सुरू झाल्या असून, अध्यक्ष मि. पटेल यांनीं ही मागणी खासगी रीतीनें व्हाइसरॉयसोहबांच्या कानावर घातलीहि आहे असें समजतें. खासगी सभासदांच्या कामाला वर्षांतून निदान पंधरा-वीस दिवस मिळाल्याशिवाय त्यांना आपलें कर्तव्य पूर्णपणें करतां येणार नाहीं हें निर्विवाद होय.

* * *

पण दुसऱ्या पक्षीं असेंब्लींत कित्येक सभासद असे असतात कीं, त्यांना दोन महिने आपल्या गांवाबाहेर काढणें सोयीचें नसतें. मोठा प्रतिष्ठित वकील

व श्रीमान् व्यापारी यांना एकसारखे महिना दोन महिने धंदा सोडून राहणें सहजच जड जातें. अर्थात् हल्लीं कौन्सिल भरतात तितके दिवसहि एकसारखे हजर राहण्याची अडचण, आणि हल्लींहून अधिक दिवस कौन्सिलें भरविण्याची आवश्यकता याचा मेळ पडणें मोठें कठीण दिसतें. पुढें प्रत्यक्ष काय होईल तें होवो, तूर्त तरी सभासद सर्व दिवस हजर न राहिल्यानें सरकारचें काम अनायासेंच अनेक वेळां साधतें. कारण त्यांच्या बाजूला जे पगारी नोकर आहेत त्यांना गैरहजर राहतांच येत नाहीं, आणि सरकारनियुक्त सभासदांपैकीं कोणाला हजर राहतां येत नाहीं, असें दिसलें कीं, आयत्या वेळींहि एकाच्या जागीं दुसरा मनुष्य नेमून सरकारला नगास नग उभा करतां येतो ! करन्सी बिलावरील पहिली मतमोजणी लोकपक्षांविरुद्ध गेली, तरी लोक जागा धरून राहते तर पुढील उपसूचना वगैरेंच्या कार्यांत कांहीं लाभ झाला असता पण दोर खेंचण्याच्या खेळांत एका पक्षाचें पाऊल एकदां ढळलें म्हणजे तो पावलापावलानें पुढें ओढला जातो, तसेंच लोकपक्षाचें होतें. ज्याला मतस्वातंत्र्य त्याच्या मनावर निराशा किंवा कंटाळा याचा असा परिणाम व्हावा हें स्वाभाविक होय. पण प्रत्यक्ष परिणाम हानिकारक घडतो खरा.

* * *

हुंडणावळीचा दर १८ पेन्स असावा अशी मूळ सरकारची सूचना. त्यावर तो १६ पेन्स असावा अशी उपसूचना. ती नामंजूर झाली तरी १८ पेन्सांची मूळची सूचना स्वतंत्रपणें मान्य झाली पाहिजे असें अध्यक्ष यांनीं ठरविल्यावरून गेल्या शनिवारीं तिच्यावर फिरून वादविवाद होऊन अखेर तीहि मंजूर झाली. अशा रीतीनें बिलाचें चौथें कलम निकालांत काढल्यावर फिरून पहिल्या कलमापासून चर्चा सुरू झाली. तेव्हां उपसूचनांतील पहिलीच सूचना श्री. केळकर यांची असल्यानें त्यांनीं ती मांडली. उपसूचना गैरलागू असें सरकारचें म्हणणें होतें पण अध्यक्षांनीं तें मानलें नाहीं. सोन्याची मोहोर लोकांना, त्यांच्या खर्चानें का होईना, पण सरकारनें टांकसाळींतून पाडून द्यावी, व अशा रीतीनें खऱ्या सुवर्ण-चलन पद्धतीला प्रारंभ व्हावा अशा अर्थाची ती उपसूचना होती. मार्मिक व व्यापक दृष्टीनें हुंडणावळीच्या दराच्या बरोबरीनें या मुद्द्याला महत्त्व आहे, असें संयुक्त लोकपक्षाला वाटत असल्याकारणानें तिच्यावर भर द्यावा ! असें उभयपक्षांचें ठरलें. हुंडणावळींत बिघडलें तर तें नाण्यांत दुरुस्त करावें असें सहजच वाटूं लागलें. केळकर यांनीं

सुवर्णचलनाच्या प्रश्नाची चर्चा सर्व बाजूंनीं आपल्या भाषणांत केली. बिला-वरील चर्चेला वेळेची मर्यादा नसते या गोष्टीचा त्यांनीं पूर्ण फायदा घेतला व सुमारें दीड तास भाषण करून सांगोपांग चर्चा केली.

* * *

उरलेली चर्चा फिरून बुधवारीं सुरू झाली तेव्हां मद्रासी व्यापारी पेढीचे सेक्रेटरी श्रीयुत विद्यासागर पांड्या यांनीं आपली उपसूचना पुढें मांडली. पण केळकरांच्या उपसूचनेलाच त्यांनीं मुख्यतः पाठबळ दिलें. तिचा व केळकर यांच्या उपसूचनेचा आशय एकच होता, परंतु कांहीं तपशिलाच्या बाबी वेगवेगळ्या होत्या. त्याच्यानंतर टी. प्रकाशम् यांनीं आपली उपसूचना न मांडतां केळकरांच्या उपसूचनेला अनुकूल असें भाषण केलें. पंडित मदन मोहन, षण्मुखम् चेट्टी व दोरास्वामी अय्यंगार यांनींहि केळकरांच्या उप-सूचनेला पाठबळ दिलें. सर बेसिल ब्लॅकेट यांनीं उत्तर दिल्यावर मतें घेण्यांत आलीं तेव्हां केळकर व पांड्या यांच्या उपसूचना ५० विरुद्ध ६० अशा बहुमतानें नामंजूर झाल्या. नवीन करन्सी पद्धतींत सरकारनें कांहीं ठराविक दरानें सोनें विकत घ्यावें व द्यावें असें बंधन बिलानें घालण्याचें योजलेलें आहे. पैकीं सरकारनें सोनें विकत घेण्याचा प्रश्न शनिवारींच निकालांत निघाला होता. या बाबतींत सरकारी सवाल १०६५ तोळ्यांचा असून केळकर यांची उपसूचना ३०० तोळ्यांची व शेष अय्यंगार यांची ४० तोळ्यांची अशी होती. यापैकीं केळकर यांची उपसूचना अधिक योग्य म्हणून आपण पत्करूं व आपली १०६५ तोळ्यांची मर्यादा सोडून देऊं असें सर बेसिल ब्लॅकेट यांनीं विरोध करतांना सांगितलें. परंतु अखेर मतें घेतांना शेष अय्यंगार यांचीच उपसूचना मंजूर झाली.

* * *

यांच्या जोडीचा दुसरा प्रश्न म्हटला म्हणजे सरकारनें सोनें विकत देण्याचा. याहि बाबतींत सरकारचा व लोकांचा मतभेद आहेच. व तोहि कमींत कमी किती सोनें मागितलें तर द्यावें यापुरता नसून, सोनें परदेशाला पाठविण्याकरितांच द्यावें किंवा देशांतल्या देशांत उपयोग करण्याकरितां मागि-तलें तरीहि द्यावें, यांतहि मतभेद आहेच. सरकारी पहिल्या बिलांत देशांतील अंतर्गत व्यवहारांकरितांहि सोनें द्यावें असें बंधन असतां दुसऱ्या बिलांत केवळ परदेशीं पाठविण्याकरितांच द्यावें अशी दुरुस्ती केलेली आहे. हा फरक

केळकर यांनीं आपल्या भाषणांत नजरेस आणून दिला तेव्हां सर बेसिल ब्लॅकेट यांनीं आपल्या भाषणांत हा भेद आपण काढून टाकूं व दोनहि कारणां-करितां सोनें द्यावें असें बंधन घालून घेण्यास सरकार तयार आहे असें सांगितलें. उरला प्रश्न किती तोळे एवढ्यापुरता. त्याचा निकाल बहुधा येत्या सोमवारच्या चर्चेंत लागेल.

* * *

नव्या करन्सी पद्धतींत सोन्याचें नाणें नवें चालू करण्याचें तर राहिलेंच, पण जुनी विलायती सॉव्हरीन किंवा गिनी चालू होती तीहि ह्यापुढें बंद करावी असें एक कलम नव्या बिलांत आहे. तें काढून टाकावें व गिनी कायम ठेवावी. निदान खास हिंदुस्थानचें असें सोन्याचें नाणें चालू होई-पर्यंत ती राहावी अशा हेतूनें केळकर, जम्नादास मेथा, षण्मुखं चेट्टी वगैरेंनीं उपसूचना दिलेल्या होत्या. त्यांपैकीं चेट्टी यांची उपसूचना अध्यक्षांनीं चर्चेला प्रथम घेतली त्यावर चेट्टी, केळकर, सर पुरुषोत्तमदास ठाकुरदास वगैरेंचीं भाषणें झाल्यावर बुधवारचें सभेचें काम संपलें. तें फिरून येत्या सोमवारीं सुरू होईल. दरम्यान होळीच्या सुटीमुळें चार दिवस असेंब्लीचें काम बंद राहील. या चार दिवसांत कोणी हरिद्वार, कोणी लाहोर, कोणी बनारस, कोणी मथुरा वगैरे ठिकाणीं लोक आपआपल्या इच्छेप्रमाणें जाऊन येणार आहेत. पुढें सोमवारीं काम सुरू झाल्यावर तारीख २४ रोजीं तें संपवावें असा सरकारचा मूळ हेतु होता. पण तसें घडण्याचें चिन्ह दिसत नाहीं. करन्सी बिलच आणखी दोन दिवस खाईल असा रंग दिसतो. त्यानंतर फायनॅन्स बिल चर्चेला निघेल. त्यांत मिठावरील जकात कमी करणें, पोस्ट खात्याचे दर कमी करणें, कातड्यावरील जकात कमी केली ती वाढविणें, चहावरील निर्गत जकात कमी केली ती वाढविणें, मोटारीवरील जकात कमी केली ती वाढविणें असे अनेक वादाचे प्रश्न आहेत. यांत सरकार-चा कोणत्याच बाबतींत पराभव होण्याचा संभव दिसत नसला तरी बिलाची चर्चा कमींत कमी दोन दिवस तरी होईल असें वाटतें.

* * *

सरकारी बिलें अजून बरींच उरलीं आहेत त्यांपैकींच फॉरेस्ट बिल हें पुढें यावयाचें असून ह्या संधीचा फायदा घेऊन श्री. अणे यांनीं या कायद्याचा सांगोपांग अभ्यास करून त्यावर सुमारें ५० उपसूचना देऊन ठेविल्या आहेत.

परंतु हीं सर्वच बिलें पुढल्या बैठकीवर जातील असा अंदाज आहे. विमा कंपन्यांचें बिलहि जवळ जवळ तयार असून तें लवकरच पुढें येणार आहे. शिवाय नवीन रिझर्व्ह बँक बिल व इंपीरिअल बँक बिल हीं महत्त्वाचीं बिलें पुढें येणार असल्या कारणानें यंदाची सिमल्याची बैठक अधिक महत्त्वाची होईल असा अंदाज दिसतो. चालू बिलाच्या चर्चेंत सोन्याच्या नाण्यांचा प्रश्न संपला असला तरी तो पुन्हा सिमल्यास उपस्थित होणार म्हणून दरम्यानच्या पांच महिन्यांत सर्व हिंदुस्थानभर करन्सी लीगकडून चळवळ व्हावी अशी येथील लोकांची अपेक्षा आहे. दुर्दैवानें इतर प्रान्त या चळवळींत विशेष लक्ष घालीत नाहींत, बहुतेक भर मुंबई शहर व इलाखा ह्यावरच पडतो आणि तो त्यांनीं घेतलाहि पाहिजे. कारण सुवर्ण-मापन आणि सुवर्ण-चलन हीं दोन सिद्ध झाल्यांशिवाय या हल्लींच्या हुंडणावळीचा किंवा नाण्यांचा प्रश्न समाधान-कारक सुटणार नाहीं. सरकारनें नाण्याची टंचाई करून किंवा रुपयाची किंमत सोन्यांत ठरवून किंवा बाजारभावाची नाकेबंदी करून हा प्रश्न सोडविण्याचा प्रयत्न केला तरी तो फुकटच जाणार आहे.

* * *

ऑल-इंडिया कॉंग्रेस कमिटीची बैठक भरणार होती ती आतां तहकूब झाली, हें केसरीच्या वाचकांस कळलेंच असेल. तहकुबीचें मुख्य कारण म्हटलें म्हणजे सभेंत करण्याला असें कामच कांहीं नव्हतें. परंतु उगीच आपल्या षोकाखातर राजानें मधून मधून दरबार भरवावा तशा रीतीनें, ही सभा बोलावण्यांत आली होती. अध्यक्ष श्रीनिवास अय्यंगार हे आपल्याकडून हिंदू-मुसलमानांच्या एकीचा प्रयत्न करीत आहेत. परंतु त्यांचें मुसलमानांवर तर नाहींच पण हिंदूंवरहि तितकें वजन नाहीं. आणि कॉंग्रेसच्या अधिकाराचा उपयोग करून ते मुसलमानांशीं भलतासलता तह करतील तर तो सर्व हिंदु-समाजास मान्य होणार नाहीं, ही गोष्ट त्यांना कळून आली आहे. असेंब्लीं-तील राष्ट्रीय आणि कॉंग्रेस पक्षाची एकवाक्यता करण्याचाहि त्यांनीं प्रयत्न केला. परंतु आधीं कॉंग्रेसमध्यें एकी साधा, मग असेंब्लींतील एकी तुमच्या हातचीच आहे, असें उत्तर लोकांनीं त्यांना दिलें. बरें, तें घडवून आणावें तर सकलातवाला हे आयत्या वेळीं येऊन उभे राहतील आणि सगळाच घोटाळा करतील कीं काय अशीहि भीति त्यांना वाटूं लागली आहे. ह्या अनेक कारणांमुळें श्रीनिवास अय्यंगार यांनीं आपल्या अधिकारांत सभा

तहकूब केली तथापि मद्रासकडील खादीवीर सांबमूर्ति हे येथें आले असून, त्यांनीं काँग्रेस पक्षाचे असेंब्लींतील काम पाहून, श्रीनिवास अय्यंगार यांजवर सडकून टीका चालविली आहे! रंगा अय्यर हे पं. नेहरू यांचेमागें हात धुऊन लागलेच आहेत. ट्रेड यूनियन काँग्रेसकरितां आलेल्या मुंबईच्या कांहीं लोकांनीं, विनंतिपत्र काढण्याचें ठरविलें आहे. ह्या अनेक कारणांमुळें कदाचित् येत्या एप्रिलमध्यें ऑल-इंडिया काँग्रेस कमिटीची बैठक मुंबईस होण्याचा संभव आहे. काँग्रेस कमिटीची बैठक पुढें ढकलली गेली तरी, काँग्रेस पक्षांतील दुही व असंतोष तेथें प्रकट झाल्याशिवाय आतां राहात नाहीं. त्या दुहीला आणि असंतोषाला अगदीं लहानसहान कारणेंहि बरींच आहेत. आणि पं. नेहरू यांचें लहानसहान गोष्टी विसरून न जाण्याचें धोरण कमी न होतां वाढतच आहे. हिंदूंशीं मिलाफ झाला न झाला तरी, आपलें म्हणणें सोडावयाचें नाहीं आणि अवश्य तर स्वतंत्रपणें आपल्या मागण्या पुढें येणाऱ्या कमिशनपुढें मांडावयाच्या, असें मुसलमान पक्षानें ठरविलें आहे. मुसलमानांनीं जशी आपली मागणी एकमुखी करीत आणली आहे, तशी हिंदूंनीं आपली मागणी एकमुखी केली नाहीं असें दुर्दैवानें म्हणावें लागतें. पण याचा विचार करण्यासाठीं येत्या तारीख २३ रोजीं असेंब्लींतील हिंदु सभासदांची सभा भरणार आहे. हिंदूंनीं मुसलमानांस उत्तरादाखल काय म्हणावें हें ह्या सभेंत निश्चित ठरल्यास मुसलमान आणि हिंदु प्रतिनिधींचें म्हणणें ऑल–इंडिया काँग्रेस कमिटीपुढें मांडण्यास ठीक पडेल, मग एकवाक्यता झाली तर बरें, नाहीं तर ज्याचा मार्ग त्याला मोकळा आहेच.

## पत्र नं. १०

ता. २४-३-२७

सोमवारीं असेंब्लींत प्रवेश करतांच लोकांना एक मोठा फरक दृष्टीस पडला. मागील आठवड्यांत छतांतून एक वीट पडल्यामुळें गवगवा झाला होता. त्यामुळें सर्व छताची तपासणी सुरू झाल्यामुळें छताला मळकट कनाथीचा अखंड पडदा उलटा लावण्यांत आलेला दिसला. या कारणानें आधींच थोडा उजेड असणाऱ्या या सभागृहांत काळोखाची छटा आली. सभोंवार खिडक्या उंच जागीं अगदीं छताजवळ आहेत. तेथें पडदा ठिकठिकाणीं बाजूला सारलेला आहे. परंतु पडदानशील स्त्रीला बुरख्याच्या फिल-

किल्या गवाक्षांतून दिसलें तरी फार थोडें दिसतें; त्याप्रमाणें या खिडक्यांतून उजेड येतो तरी तो बेताचाच येतो. अशा या छतामुळें एक चमत्कारिकच भास होऊं लागला. मुंबईच्या एखाद्या दुतर्फी चिंचोळ्या चाळीच्या अंगणांत कापडी मंडप उभारून लग्नसमारंभ सुरू असल्याचा देखावा तेथें भासूं लागला. "केसाच्या टोपाची टोपी घातलेला अध्यक्ष नवरदेवासारखा वाटला. त्याच्या डोक्यावरची लांकडी मेघडंबरी तोरणासारखी वाटली. दुतर्फा बसलेले सभासद वऱ्हाडी वाटले. करवल्या-विहिणींचा भास होण्याला गॅलरींतून नटलेल्या स्त्रिया होत्याच आणि प्रेस गॅलरींत रिपोर्टर मंडळी (म्हणजे सनईवाल्यासारखी आंत टाळी पडल्याची बातमी बाहेर जगाला ताबडतोब देण्याला टपून बसलेली) असल्यामुळें वाजंत्र्याचें प्रतीकहि सिद्धच होतें." असें वर्णन एका प्रेक्षकानें मजजवळ परवां हें सभागृह पाहून केलें. तें कल्पनेला जुळण्यासारखें होतें. या वर्णनाला आणखी पुष्टि अशी कीं, कार्यांत सूप पाखडलें जातें त्याप्रमाणें या बैठकीचें सूप लवकरच पाखडलें जाऊन पाहुण्यांना परत घरीं जाण्याला परवानगी मिळावी म्हणून कांहीं वऱ्हाडी उत्सुक आहेत, तर सूप लवकरच पाखडलें जातें कीं काय, व येथून पाय काढावा लागतो कीं काय अशा काळजींत दुसरे कांहीं आहेत!

* * *

असेंब्लीच्या बैठकीचा हा शेवटचा आठवडा. परंतु तेवढ्यांत अनेक प्रश्न कोंबले गेले होते. हुंडणावळीच्या बिलाचा व फायनॅन्स बिलाचा निर्णय लागणें यांना बरेंच महत्त्व होतें. पैकीं हुंडणावळीच्या बिलांत कांहीं हातीं लागलें नाहीं. फायनॅन्स बिलांत मात्र कांहीं थोडें हातीं लागलें. मागील पत्र लिहिल्यानंतर गेल्या सोमवारीं व मंगळवारीं करन्सी बिलावरील चर्चा संपली. सॉव्हरिनचें चलनी नाणें बंद करूं नये यावर चेट्टी, केळकर, पुरुषोत्तमदास वगैरेंचीं भाषणें झालीं व फायनॅन्स खात्याचे असिस्टंट सेक्रेटरी व करन्सी कमिटीचे चिटणीस मि. अय्यंगार यांनीं सरकारतर्फे उत्तर दिलें. अखेर उपसूचना ११ मतांनीं नापास झाली. यानंतर एकच म्हणजे पांचवें कलम उरलें. पण त्या बाबतींत सर बेसिल ब्लॅकेट यांनीं एक उपसूचना नवी बनवून मांडली; तींत सोनें विकत देण्यासंबंधीं कांहीं अधिक सवलत दिली आहे. या उपसूचनेला केळकर यांनीं विरोध केल्यावर ती बहुमतानें मंजूर झाली. कलमवार चर्चा संपल्यावर तिसऱ्या वाचनाचे वेळीं सर

पुरुषोत्तमदास, सर व्हिक्टर ससून, जम्नादास, जिना, पंडित मालवीय यांनीं विरोधाचीं भाषणें केलीं. तथापि अदमासाप्रमाणें बिलावर १२ मतें अधिक पडून बिल मंजूर झालें. अशा रीतीनें हुंडणावळीच्या दराचा प्रश्न आज दोन वर्षे घोळांत पडला होता त्याचा लोकपक्षाविरुद्ध निकाल झाला. सप्टेंबरच्या बैठकींत सुवर्णचलनाचे वगैरे अवांतर प्रश्न पुनः विचाराला निघतील तेव्हां काय होईल तें पाहावें.

*　　　　*　　　　*

फायनॅन्स बिलाच्या चर्चेला मंगळवारीं तिसरे प्रहरीं सुरुवात झाली. पहिला वाद मिठावरील कराचा निघाला. नेहमींप्रमाणें ड्यूटीचा दर सवा रुपयावरून शून्यापर्यंत आणण्याच्या दहापांच उपसूचना देण्यांत आल्या होत्या. त्या सर्व रीतसर मांडण्यांत आल्या. दोरास्वामी अय्यंगार यांनीं नेहमींप्रमाणें गमतीचें पण मुद्देसूद भाषण केलें. प्रकाशम् यांच्या भाषणांत कांहींच नव्हतें. निळकंठ-दास यांनीं उत्कल प्रांताचें गाऱ्हाणें पुढें मांडलें. अखेर लिलाव बोलल्या-प्रमाणें शून्य, आठ आणे, दहा आणे, बारा आणे, रुपया अशा अनेक सूचनांमुळें विषयाची थट्टा झाल्यासारखी दिसल्यामुळें लाला लजपतराय यांनीं चर्चेला गंभीरपणाचें वळण देऊन दहा आण्यांच्या उपसूचनेला सर्वांनीं मिळून संमति द्यावी असें सुचविलें. उत्तरादाखल सर बेसिल यांनीं "प्रांतिक खंडणींत सूट मिळणार नाहीं, संभाळा" असें म्हणून आज चार वर्षे त्यांच्या हातीं खेळणारें बुजगावणें पुन्हा सभेंत नाचविलें! परंतु त्याचा कांहीं उपयोग न होतां दहा आण्यांची प्रकाशम् यांची उपसूचना पास झाली. आणि हुंडणावळीच्या बिलाच्या चर्चेंत गरीब लोकांचें नांव श्रीमान् लोक उगीच पुढें आणतात असा जो आक्षेप आणण्यांत येत असे त्याला समर्पक उत्तर मिळालें. कारण मिठावरील जकात कमी करा म्हणण्यांत भांडवलवाले किंवा कारखानदार (ज्यांच्यावर पुष्कळ लोकांचा निष्कारण राग आहे) त्यांचा कांहींच संबंध येत नाहीं.

*　　　　*　　　　*

मिठावरील जकातीचें भावंड म्हटलें म्हणजे पोस्ट खात्याचे दर. त्याहि बाबत ठराविक उपसूचना आल्या होत्या. त्यावर दोरास्वामी, अणे, ठाकूर-दास, नियोगीं यांचीं भाषणें झालीं. परंतु कोणत्याहि उपसूचनेला बहुमत मिळालें नाहीं. सर भूपेंद्रनाथ यांनीं ठराविक कोलदांडा घालण्याचा प्रयत्न

अर्थातच केला. एकीकडून पोस्टखात्याच्या कामगारांची पगार-वाढ करा म्हणतां व दुसरीकडे खात्याच्या जमेचें नरडें आवळतां, तेव्हां या दोन गोष्टी परस्पर सुसंगत नाहींत. मग प्रश्न निघाला कीं, ह्या खात्याचा मूळ हेतु कोणता समजावा? (१) केवळ लोकोपयोगी असें समजून त्याकडून उत्पन्नाची अपेक्षा करूं नये, व जरूर पडेल तर सरकारच्या सर्वसाधारण उत्पन्नांतून त्याला उलट मदतहि द्यावी! किंवा (२) त्याची जमा व त्याचा खर्च याचा मेळ पडला म्हणजे भागलें म्हणावें ? किंवा (३) पोस्ट हेंहि एक व्यापारी खातेंच समजून त्याचा प्रत्यक्ष खर्च भागावा; इतकेंच नव्हे तर त्यावरच्या भांडवलाचें मामुली व्याजहि सुटण्याची अपेक्षा करावी ? पण असले प्रश्न एका उत्तरानें सुटणारे नाहींत. अर्थात् आयत्या वेळीं बहुमत पडून होतें तेंच खरें. मिठाची ड्यूटी कमी करण्याला बहुमत लाभलें, पोस्टाचे दर कमी करण्याला मिळालें नाहीं इतकेंच खरें. बाकी उपसूचना पत्राच्या आण्याचा अर्धा आणा करण्याचीहि नव्हती, तर कार्डाच्या दोन पैशांचा एक पैसा करण्यापुरतीच होती. पण मीठ आणि टपाल यांपैकीं मीठ हें त्यांतल्या त्यांत अधिक आवश्यक यांत शंका नाहीं. आणि असेंब्लीला हा विवेक राहिला हें एका अर्थी बरेंच झालें. असो. फडणविसांनीं बऱ्याच घालमेली करून तीन कोटींची बचत केली होती ती मिठाच्या ड्यूटीच्या काटानें लवंडून दिली.

* * *

यानंतर मोटारीवरील आयात जकात कमी करण्याचें सरकारनें योजिलें ती कमी करूं नये अशी उपसूचना चर्चेला निघाली. पण तिला सभागृहांत फारसें पाठबळ न मिळाल्यामुळें मतें न मोजतांच ती नामंजूर झाली! पण मागाहून कच्च्या कातड्यांवरील निर्गत जकात काढून टाकण्याचे सूचनेला बराच विरोध झाला. हिंदुस्थानांतील प्रत्येक प्रांतांत कातडीं कमावण्याचे व बूट-जोडे तयार करण्याचे कारखाने आहेत; या कारखान्यांचे कांहीं मालक युरोपियन आहेत. उलट परदेशाला कातडीं पाठविणारे कांहीं बंदरीं व्यापारीहि युरोपियन आहेत. यामुळें युरोपियन-युरोपियनांतलाहि हा तंटा होता. या जकातीनें नफा न होतां एकंदर हिंदुस्थानांतील कातड्यांच्या व्यापाऱ्यांचें नुकसान होतें असें सर चार्लस इन्नेस यांनीं जीव तोडून सांगितलें. अखेर मतें मोजतां तीं दुतर्फा सारखीं पडलीं, तेव्हां अध्यक्षांकडे पाहून सर्व हसूं लागले. परंतु पटेल यांनीं लोकपक्षाकडे मत

दिलें. पण हें त्यांचें करणें रीतसरच होतें. कारण अध्यक्षानें आपलें मत देण्याचा प्रसंग आला असतां आहे ती स्थिति कायम ठेवण्याकरितांच त्यानें मत द्यावें असा शिरस्ता आहे. अर्थात् नियमशुद्ध वर्तन साधलें आणि लोकपक्षाची तरफदारीहि साधली, असा अध्यक्ष पटेल यांचा दुहेरी फायदा झाला. पण लोकपक्षाला हे दोन जय मिळाले तेवढेच. प्रातीवरील कराच्या बाबतींत सर्व उपसूचना नामंजूर होऊन अखेर फायनॅन्स बिल गुरुवारीं दोन प्रहरीं मंजूर झालें.

* * *

परंतु या बिलाच्या तिसऱ्या वाचनाचे वेळीं एक लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट झाली. ठरावावरील भाषणाला मर्यादा असते. बिलावर भाषण किती वेळ करावें याला ती नसते; या गोष्टीचा फायदा घेऊन रंगा अय्यर यांनीं बुधवारीं सायंकाळीं भाषणाला सुरुवात केली व मी दोनतीन तास भाषण करणार आहें असें सांगितलें. पहिल्या दिवशीं एक तासभर बोलल्यावर सभा बरखास्त झाली. गुरुवारीं रंगा अय्यर यांचें पुनः दीड तास भाषण झाल्यावर युरोपियन सभासद कंटाळा व्यक्त करूं लागले. ते बहुतेक सर्व मधून उठून बाहेर जात. शेवटीं सर डॉर्सी लिंडसे यांनीं मध्यें तोंड घातलें; तेव्हां पूर्वी केळकरांनीं या गृहस्थांना सांगितलें त्याचप्रमाणें रंगा अय्यर यांनींहि "तुम्हांला वाटल्यास उठून बाहेर जाण्याला मोकळीक आहे" असें सांगितलें. नंतर सर अलेक्झांडर मुडिमन यांनीं एक नियम वाचून दाखविला पण तो पटेल यांनीं अमान्य केला. तेव्हां मुडिमन यांनीं पुनः हरकत घेतली तेव्हां पटेल त्यांना म्हणाले, "तुम्ही रंगा अय्यर यांच्या जागीं मनानें जाऊन त्या स्थितींत तुम्ही काय कराल याचा विचार करा." हा अधिक्षेप मुडिमन यांना झोंबून ते व त्यांच्या मागून सर्व अधिकारी सभासद उठून गेले. नंतर कांहीं वेळानें अध्यक्षांनीं खासगी चिठ्ठी पाठवून रंगा अय्यर यांस भाषण थांबविण्यास सांगितलें व तें त्यांनीं मान्य केलें. पण रंगा अय्यरप्रमाणें मि. हाजी यांनींहि वेळेचा फायदा घेऊन आपला विषय पुढें मांडला.

* * *

असेंब्लीचें काम ता. २६ ला संपवावें असा मूळचा अदमास होता. परंतु करन्सी बिलाची चर्चा लांबल्यामुळें आतां ही तारीख आणखी ४।५ दिवस पुढें ढकलली जाईल असें वाटूं लागलें आहे. यांत वास्तविक सरकारची चूक आहे. कारण हें वादग्रस्त बिल त्यांनीं फेब्रुवारींतच निकालांत काढावयास पाहिजे

होतें, व त्याला हरकत अशी कांहींच नव्हती. पण बजेट आणि हें बिल हीं जवळ जवळ एकाच वेळीं चर्चेला निघाल्यानें बजेटांत तूट येण्याच्या व प्रांतिक खंडण्या बुडण्याच्या धाका-धाकांत करन्सी बिल पास होण्यास मदत होईल अशी आशा सर बेसिल यांस वाटत असल्यानें त्यांनीं तें पुढें ढकललें. अशा रीतीनें पहिले आठवडे काम फार नसल्यानें जांभया देण्यांत गेले, तर पुढचे आठवडे कामाच्या गर्दीमुळें धापा टाकण्यांत गेले. करन्सी व फायनॅन्स बिलांखेरीज सरकारी काम या बैठकींत अजून म्हणण्यासारखें झालेंच नाहीं आणि खाजगी सभासदांचें काम तर नाहींच नाहीं. कारण त्याला दिवसच अवघे चार मिळाले. स्टँडिंग ऑर्डर कमिटीकडे सोंपविलेले नियम दुरुस्त झाले तर खासगी सभासदांना अधिक वेळ मिळण्याची कांहीं आशा आहे पण या बाबीचे कामाला वर्षावर्षांत मुहूर्त लाभत नाहीं! असो. अखेर अखेर कामाची गर्दी झाली. सरकार चुळबूळ करूं लागलें व स्वतः पटेल यांना ता. २ एप्रिल रोजीं विलायतेस जाण्याची घाई लागली यामुळें त्यांनीं एक दिवस ११ चे ऐवजीं १० वाजतां सभा भरविली व एक दिवस रात्रीं ९ वाजतां सभा बोलविण्याचा धाक घातला! पण तसें करण्याचें कारण पडलें नाहीं.

---

# सिमल्याचीं बातमीपत्रें

## पत्र नं. १

ता. १९-८-२७

असेंब्लीच्या चालू बैठकीच्या आधीं दहापंधरा दिवसपर्यंत येथें पावसानें धुमाकूळ माजविला. सभासद मंडळी गांवोगांवाहून निघण्याचे सुमारास वर्तमानपत्रांनीं सिमल्यावरील पर्जन्यवृष्टीच्या भयप्रद बातम्या छापल्या. 'एक पूल वाहून गेला, चार घरें पडलीं, दहा जागीं टेकाडें कोसळलीं' असें वाचलें. तेव्हां वाटलें कीं, आतां पुढें कसें? गुजराथेची आठवण झाली, पण त्यांतल्या त्यांत एक समाधान वाटलें. सिमल्यास अंगावर डोंगर कोसळो पण या साडेसात हजार फूट उंचीच्या जागीं पुरांत वाहून जाण्याची तरी भीति खचित नाहीं! झालें. गुजराथेच्या भीतीची आठवण टळली. सुख वाटलें. परिचित संकट नाहीं इतकी खात्री झाली म्हणजे झालें. अपरिचित संकटाला कोण

भितो ? कोल्हा काकडीला राजी; तर मनुष्य नुसत्या फरकावर खुष! असो. सुदैवानें मी मुंबईपासून सिमल्यापर्यंत अगदीं कोरड्या अंगानें आलों. येथें येऊन पोंचतांच पाऊस जोराचा सुरू झाला. पण वारा आणि थंडी यांची जोड नसल्यामुळें नुसत्या पावसाळी ओव्हरकोटाच्या वस्त्रानें हें पर्जन्यास्त्र मला परतवितां येत आहे.

*　　　*　　　*

पावसासारखाच पाऊस खरा. पण सिमल्यासारख्या उंच ठिकाणीं उभें राहून पावसाची जी शोभा पाहावयास सांपडते ती मात्र मैदानावरील शहरांत कधींहि पाहण्याला मिळण्याची आशा नाहीं. सिमल्याचें वातावरण अतिशय चंचल व लहरी. पण पावसाळ्यांत हे गुण दृष्टीस पडतात त्यांचा प्रकार कांहीं वेगळाच आहे! आमच्या ठिकाणावरून पाहतां सभोंवार डोंगराआड डोंगरांच्या आठ-दहा रांगा व त्यांत कमी-अधिक खोलीच्या दऱ्या. शिवाय नजरेचा पल्ला फार दूरवर पोंचतो त्यामुळें एकाच वेळीं अनेक प्रकारची शोभा दृष्टिगोचर होते. या दरींत पावसाळी धुक्याचा समुद्र भरलेला तर पलीकडच्या डोंगरावर धुक्याचा दुसरा डोंगरच चढलेला. कुशल नटानें एका डोळ्यानें हसावें व दुसऱ्यानें रडावें त्याप्रमाणें या टेकडीवर पावसाच्या सरी पडणाऱ्या पाहाव्या तर त्या दुसऱ्या टेकडीवर हवा कोरडी असून तेथलीं हिरवींगार रानें आणि पावसानें धुवून स्वच्छ केलेलीं घरें आपलीं सुप्रसन्न मुखकमलें वर काढून दूरच्या पावसाला हसतात. इकडे पाहावें तों दिवसा विजेचे दिवे लावण्याइतका बंगल्यांतून पावसाळी काळोख. पण तिकडे पाहावें तों पर्वतापलीकडच्या मैदानांत सूर्य प्रकाशमान असल्यानें खालून वर आलेल्या किरणांनीं अर्धें आकाश व्यापणारीं प्रचंड इंद्रधनुष्यें रंगविलेलीं.

*　　　*　　　*

पण मी कांहीं सिमल्यास सृष्टिशोभा पाहवयास आलों नाहीं; आणि पावसालाहि दुसरीकडे काम असेलच. म्हणून तारीख १८ पासून त्यानें आपलीं कांहीं ठाणीं येथून हलविलीं. असो. चालू बैठकीला दोन तीन गोष्टींमुळें थोडा नवीनपणा आला आहे. सरकारच्या बाजूचे दोन जुने पुढारी सर अलेक्झांडर मुडिमन व सर चार्लस इन्नेस हे पेन्शनींत निघाले असून त्यांच्या जागीं मि. क्रेरर व सर जॉर्ज रेनी हे आले आहेत. क्रेरर हे मुंबई इलाख्याचे सिव्हिलिअन असून एका गव्हर्नरचे प्रायव्हेट सेक्रेटरी होते. कौन्सिल ऑफ

स्टेटमध्यें त्यांनीं होममेंबरचें व सरकारी पुढाऱ्याचें काम केलेलें असून, सरकारला तें पसंत पडलें म्हणूनच त्यांनीं त्यांना बढती देऊन वरिष्ठ कौन्सिलाचे सभासद व असेंब्लीचे एक पुढारी नेमलें. सर जॉर्ज रेनी हे पूर्वीं टॅरिफ बोर्डाचे अध्यक्ष होते. स्टील प्रोटेक्शन वगैरेविषयीं पहिल्या चौकशी व शिफारसी त्यांनींच केल्या. रेल्वे, व्यापार वगैरे महत्त्वाचीं खातीं त्यांच्याकडे देण्यांत आलीं आहेत. सर चार्लस इन्नेस यांच्याप्रमाणें हेहि अत्यंत मेहनती आहेत असें म्हणतात. सरकारच्या बाजूला आणखी एक नवे गृहस्थ मि. दलाल या नांवाचे आले आहेत. त्यांनीं शिक्षण, जमीनबाब वगैरे खात्यांची चिटणिसी मिस्टर भोर यांजकडून कांहीं दिवस घेतली. दलाल हे गृहस्थ पारशी आहेत. भोर हे ख्रिस्ती पण मूळ पुणें प्रांताकडील मराठा जातीचे होते. पुण्यास त्यांचें शिक्षण झालें. त्यांची बहीण मिस् मेरी भोर ह्या पूना फीमेल हायस्कूलच्या लेडी सुपरिंटेंडेंट होत्या. भोर हे आपल्या कामांत दक्ष व वाकबगार आहेत असें येथें असेंब्लींत प्रत्ययास आलें. पण त्यांच्या गुणाप्रमाणें त्यांना बढती मिळण्याचा योग मात्र दिसत नाहीं.

* * *

असेंब्लींत अध्यक्ष मि. पटेल हे जुने असले तरी इंग्लंडाला जाऊन थोडेसे नवे होऊन आले आहेत. त्यांनीं तिकडे केलेलीं भाषणें व तिकडे व इकडे दिलेल्या मुलाखती प्रसिद्ध असल्यामुळें ते प्रकृति सुधारण्याकरितां कीं अन्य कामाकरितां गेले हें दिसून आलेंच असेल. त्यांनीं प्रसिद्ध केलेल्या रॉयल कमिशनसंबंधाचा अंदाज व टाइमटेबल हीं कितपत खरीं भविष्यें म्हणून ठरतात एवढेंच पाहावयाचें आहे. इकडील स्वराज्य पक्ष अजून वरकरणी ताठरून बसलेला आहे. आम्ही रागावून बसलों आहों, आमची कशी तरी समजूत काढा आणि आम्हाला हांक मारा म्हणजे आम्ही आलोंच असा निरोप विलायती मुत्सद्द्यांकडे पाठविण्याला हवा होता. आणि हें दूतकृत्य करण्याला पटेल यांच्यापेक्षां अधिक लायक मनुष्य कोणता मिळणार? या रॉयल कमिशनवर स्वतः पटेल यांची नेमणूक होणार होती. पण ती त्यांनीं नाकारल्याचें प्रसिद्ध झालें आहे. यामुळें ते मूळ ज्या पक्षाचे होते त्यापैकीं एखाद्या प्रतिष्ठित पुढाऱ्याला ती जागा मिळेल असें अनुमान उघड निघतें. आतां पटेल यांनीं जागा नाकारली ती कांहीं विशेष कारणानें नाकारली असें त्यांनीं प्रकट केल्यामुळें इतरांना मात्र थोडी अडचण झाली आहे. पण

इतरांना अडचण करून स्वतःचें महत्त्व वाढविणें याविषयीं पटेल यांचें कौशल्य कॉंग्रेसवाल्यांना माहीत आहेच.

* * *

कमिशनच्या जागेचा मान नाकारतांना पटेल यांनीं असें सांगितलें कीं, कमिशनचा अध्यक्ष कोणी हिंदी गृहस्थ नेमला जात नाहीं म्हणून मीं कमिशनवर जागा घेण्याचें नाकारलें. अर्थात् आतां ती जागा जो दुसरा कोणी घेईल तो पटेलसाहेबांपेक्षां कमी स्वाभिमानी व कमी राष्ट्राभिमानी ठरलाच कीं नाहीं ? कारण त्याला मात्र हिंदी अध्यक्ष नसला तरी हा मान चालतो असें ठरणार ! अशा रीतीनें मागाहून येणाराला अडचण करून ठेवण्याची ही गोष्ट त्यांच्या स्वभावास अनुसरूनच झाली आहे. न जेवतां उष्टें करावें कसें तर तें हें असें. पटेलसाहेबांनीं विलायतेंत जाऊन पार्लमेंटरी कर्मकांडाचा अभ्यास केल्याचें जाहीर झालें आहे. त्या अभ्यासाचा फायदा मात्र लोकपक्षाला ते थोडाबहुत दिल्याशिवाय राहणार नाहींत असें वाटतें. तिकडे त्यांनीं इतरहि कांहीं गोष्टी केल्या. हिंदुस्थानाला आतां सनदशीर चळवळीशिवाय दुसरा मार्ग नाहीं असें मत त्यांनीं प्रसिद्ध केल्याची तार सर्वांनीं वाचलीच आहे. पण त्यांनीं डी. व्हॅलेरालाहि असा उपदेश केला म्हणतात कीं, “ तुझें ध्येयवादित्व टाकून देऊन तूं नव्या आयरिश पार्लमेंटांत शीर.” अडवणूक कशी करावी याचेहि कांहीं धडे पटेल यांनीं डी. व्हॅलेरा यांना दिले, अशा बातमीचा झिरपा कांहीं कांहीं मडक्यांवर उमटलेला आहे. कर्मधर्मसंयोगानें नुकतेंच असें प्रसिद्ध झालें आहे कीं, डी. व्हॅलेरा पक्षानें पार्लमेंटरी शपथ न घेण्याचा हट्ट टाकून देऊन, ती घेऊन, आंत घुसून, सनदशीर आयरिश पुढारी कॉसग्रेव्ह याला उलथून पाडण्याचें योजिलें. मिळून पटेलसाहेबांच्या उपदेशानें का होईना पण डी. व्हॅलेरा सुद्धां कौन्सिलवादी बनले म्हणावयाचे !

* * *

ता. १८ रोजीं ठरल्याप्रमाणें असेंब्लीच्या कामाला सुरुवात झाली. नव्या सभासदांच्या शपथा व प्रश्नोत्तरें झाल्यावर सरहद्दीवरील हिंदु लोकांच्या करुण कहाणीचा प्रश्न निघाला. ही गोष्ट अलीकडची असल्यामुळें आपापल्या गांवाहून यापूर्वीं कोणी सभासदांनीं प्रश्न पाठविले नव्हते. पण तारीख १७ रोजीं मि. कोक, केळकर व इतर कांहीं लोकांनीं स्पेशल नोटीस देऊन अध्यक्षांकडे या विषयावर प्रश्न पाठविले. अर्थात् त्यांत फक्त सरकारकडून मिळण्यासारखी

माहिती मागितली होती. पण असला प्रश्न एखाद्या हिंदूनें विचारण्यापेक्षां तिऱ्हाइताकडूनच विचारलेला बरा; म्हणून कोक यांजकडून प्रश्न घालवून त्याला सर डेनिस ग्रे यांजकडून उत्तर देवविण्यांत आलें. त्यांनीं सांगितलेल्या हकीकतींत हिंदूंवर जुलूमजबरदस्ती झाली आणि त्यांना आपआपलीं गांवें सोडावीं लागलीं ही गोष्ट कबूलच करावी लागली. पण ह्या हिंदु लोकांचें दुसरें कांहींएक भांडण पूर्वींचेंच होतें, व इकडील हिंदु-मुसलमानांच्या शिव्यागाळीची व 'रंगीला रसूल' प्रकरणाची त्यांत भर पडली असेंहि सांगण्यांत आलें! तात्पर्य, सत्य लपवितां न आल्यामुळें डॉक्टर जसें सांगतो कीं, "रोग आहे पण कांहीं फारसा भारी नाहीं, रोग वाईट आहे पण असाध्य नाहीं" अशा प्रकारचें हें उत्तर होतें. कांहीं गुन्हेगारांना किरकोळ शिक्षा दिल्याचीहि हकीकत त्यांनीं सांगितली. आणि शेवटीं आश्वासन दिलें कीं, पेशावर येथें तिकडील जिरगे बोलाविले आहेत व या वाटाघाटींतून काय निघतें तें लवकरच प्रसिद्ध करूं!

* * *

नंतर के. सी. रॉय ह्यांनीं पूर्व—आफ्रिकेचा प्रश्न उपस्थित केला. आणि त्याची चर्चा आधीं व्हावी मग पुढचें काम, असें सुचविलें. त्यावर जोशी, डॉ. गौर, ब्लॅकेट वगैरे लोकांचीं भाषणें झाल्यावर तो विषय पूर्ण चर्चेकरितां चार वाजतां घेण्यांत आला व सरकारतर्फे विशेष विरोध न होतां के. सी. रॉय ह्यांची तहकुबीची सूचना मंजूर झाली. इतर काम सुरू झालें. पण त्याहिपूर्वीं आणखी दोन प्रकरणें नवीं निघालीं. बिहार प्रांतांतील एक सभासद बाबू अंबिकाप्रसाद सिंह हे वारल्याबद्दल दुःखप्रदर्शन नेहमींच्या रीतीनें करण्यांत आल्यावर अध्यक्षांनीं रंगास्वामी अय्यंगार यांच्यामार्फत गुजराथेंतील व ओरिसा प्रांतांतील अनर्थांचा प्रश्न चर्चेकरितां काढविला. ठराव सहानुभूतीचा होता आणि तो सर्वांना मान्यच होता. पण त्यांत सिंध प्रांताचा उल्लेख नव्हता तो पंडित मदन मोहन मालवीय यांनीं केळकरांच्या सूचनेवरून घातला. सरकार या दुःख-निवारणाच्या कामीं मदत काय करणार? एवढाच ह्या ठरावांत तत्त्वमसीचा प्रश्न होता. त्यावर सर बेसिल ब्लॅकेट यांनीं सांगितलें कीं, प्रांतिक सरकारच्या ताब्यांत दुष्काळ-फंड असतो तो खर्च करण्याला त्यांना मुखत्यारी आहे. आणि तो वाटेल तर त्यांनीं खर्च करावा. पण यासंबंधानें मुंबई-सरकारनें आमच्या-कडे लिहिलें असून आम्ही उत्तर दिलें नाहीं असें कोणी म्हणतात तें खरें नव्हे. सर्व हिंदुस्थानचा मिळून एक दुष्काळ-फंड आहे व त्याची एक कमिटी आहे.

त्या कमिटीच्या नांवानें मात्र अर्ज आला आहे आणि ती त्याचा लवकरच विचार करील. शेवटीं अध्यक्षांनीं भाषण केलें. त्यांत सांगितलें कीं, व्हाइसरॉयसाहेबांनीं मला मुद्दाम पत्र लिहून या ठरावाला आपली संमति आणि ५०० रुपयांची मदत पाठविली. पटेल यांनीं असेंहि सांगितलें कीं, " माझा भाऊ हें काम करीत आहे आणि मीहि गुजराथच्या दुःखनिवारणाकरितां गेलों असतों, पण अध्यक्ष होऊन राहिल्यानें इलाज चालत नाहीं. " शेवटीं ठराव सर्वानुमतें मंजूर झाला आणि तो प्रांतिक गव्हर्नरांकडे व काँग्रेस कमिट्यांकडे पाठविण्याचें ठरलें. गुजराथेप्रमाणेंच सिंध व ओरिसा येथील हकीकती इतर लोक सांगणार होते. परंतु प्रेसिडेंटांनीं मुख्य भर गुजराथेवर देऊन आटोपतें घेतल्यामुळें या दुसऱ्या प्रांतांची करुण कहाणी लोकांना ऐकावयास सांपडली नाहीं. काँग्रेस कमिट्यांचा संबंध आणण्याचें कारण असें कीं, ही बाब भूतदयेची म्हणून सरकारी अधिकारी एकदिलानें जें सहकार्य व प्रतिसहकार्य करीत आहेत त्यास असेंब्लीच्या सहानभूतीनें अधिक जोर यावा.

* * *

नंतर व्हाइसरॉयसाहेबांनीं संमति दिलेल्या बिलांची यादी वाचून दाखविण्यांत आली. तसेंच निरनिराळ्या खात्यांच्या अध्यक्षांनीं कोणी प्रश्नांतून मागितलेली हकीकत, कोणी सिलेक्ट कमिटीचा रिपोर्ट वगैरे कागद असेंब्लीपुढें ठेवले. त्यांतच रिझर्व्ह बँक बिलाच्या सिलेक्ट कमिटीचा रिपोर्ट आहे. तो आणखी दहा दिवसांनीं चर्चेला निघेल असें वाटतें. नंतर निरनिराळ्या खात्यांना सल्ला-मसलत देण्याकरितां सल्लागार मंडळें नेमण्याविषयींच्या सूचना सरकारतर्फे पुढें आल्या. पण ही गोष्ट वादग्रस्त होती. याचें कारण हल्लींची पद्धति अशी आहे कीं, असेंब्ली व कौन्सिल ऑफ स्टेट यांनीं कांहीं सभासद निवडून द्यावेत, आणि त्या यादींतून सरकारनें कांहीं निवडून घ्यावे. पण ही पद्धति मानहानिकारक आहे. असेंब्लीनें ९ सभासद निवडून द्यावे, पण सरकारनें त्यांतील तीन निवडून घ्यावे व बाकीचे सहा कारण न दाखवितांच नापसंत करावे, हा निष्कारण अपमान आहे; ह्या दृष्टीनें एकाच अर्थाच्या निरनिराळ्या सूचनेवर जोशी, नियोगी, केळकर, अणे, दिवाण चमनलाल वगैरेचीं प्रतिकूल भाषणें झालीं. शेवटीं नमुना म्हणून एक सूचना मताला घालण्यांत आली आणि ती ४३ विरुद्ध ३६ इतक्या मतांनीं मंजूर झाली.

* * *

याच दिवशीं कांहीं बिलेंहि सभेपुढें मांडण्यांत आलीं. पण तीं फारशीं वादग्रस्त नव्हतीं. त्यांत सुताच्या व कापडाच्या मुख्य गिरणीवाल्यांना आणि देशी कागदाच्या गिरणीवाल्यांना जी संरक्षक जकातीच्या द्वारें मदत करावयाची त्याविषयींचीं दोन बिलें होतीं. पहिलें वाचन म्हणून उलट-सुलट कांहीं टीका झाली नाहीं. पण दुसऱ्या वाचनाच्या वेळीं, कापड-गिरणीवाल्यांचा प्रश्न निघेल. वर्तमानपत्राच्या कागदावर मध्यंतरीं जी कांहीं एका चुकीमुळें भारी जकात घेण्यांत येत असे ती या बिलानें यापुढें थांबेल. तसेंच सुताच्या गिरण्यांना लागणारा माल, छपाईचीं व इतर यंत्रें, कृत्रिम रेशीम वगैरे वस्तूंवर जकात कमी होणार असून बिलाचा एवढा भाग बहुधा सर्वमान्य होण्यासारखा आहे.

## पत्र नं. २

ता. २६-८-२७.

मागील पत्रीं पर्जन्यानें आपलीं कांहीं ठाणीं सिमल्यावरून उठवून नेल्याचें लिहिलें होतें. पण केव्हां केव्हां चलाख सेनापति ठाणीं उठवून हुल्कावणी दाखवून परत अवचित छापा घालतो त्याप्रमाणें गेल्या शुक्रवारपासून पावसानें कहर केला आहे. धुकें व पाऊस बाहेर तोंड काढूं देत नाहींत तरी पण सरकारी नोकर नियमांनीं बांधून गेले म्हणून आणि सिमल्याची इतर वस्ती सरकारी नोकरांवर अवलंबून म्हणून सर्वांचे सर्व व्यवहार चालावयाचे तसे चालू आहेत. सुख काय तें इंग्रजाला. त्याला मुळांत सिमल्याच्या हवेंत राहिल्यानें स्वदेशांत राहिल्याचा सुखकर आभास होतो आणि सुखसोयी भरपूर मिळतील इतका मोठा पगार असतो. सिमल्यासारख्या ७॥ हजार फूट उंचीच्या निरुंद डोंगरावर सगळा संसार मांडून वर्षांतील सात महिने कारभार करावयाचा आणि कोट्यवधि रुपये खर्च करून बांधलेली नवी दिल्ली ओस टाकावयाची याहून हास्यास्पद किंवा राग येण्यासारखी गोष्ट दुसरी कोणती? विचारणार कोण? पण स्वतः सरकारच्या अंतर्मंडळांतच हा प्रश्न विचाराला निघाला असून सिमल्यावरील सात महिन्यांपैकीं दोन तरी तुटतील असा अंदाज आहे. असेंब्लींत यावर कांहीं प्रश्नोत्तरेंहि झालीं आहेत.

* * *

ता. १८ रोजीं असेंब्ली ओकी ओकी दिसत होती. त्यानंतर लोक येऊं लागले आहेत. स्वराज्य पक्षापैकीं श्रीनिवास अय्यंगार आले पण नेहरू गेले.

चमनलाल व गोस्वामी हे आले पण ते उडत्या पांखरासारखेच हजर असतात. काल डॉ. यौर यांचे क्रिमिनल लॉ. अमेंडमेंट बिलावर मतें घेण्याचा प्रसंग आला तेव्हां हे दोघेहि गांवांत असतां सभेस हजर नव्हते, याबद्दल लोकांत बरीच चर्चा झाली. राष्ट्रीय पक्षापैकीं लाला लजपतराय व मुनशी ईश्वरसरण हे विलायतेहून आले. फक्त बिर्ला आले नाहींत व तूर्त येत नाहींत. स्वतंत्र पक्षापैकीं बॅ. जिना हे आले आहेत. सर व्हिक्टर ससून हे गिरण्यांच्या मदतीकरितां तडक धांवून आले. पण ते बिल संपतांच तडक धांवून परत जातील. सर पुरुषोत्तमदास यावयाचे ते आले नाहींत. पण रिझर्व बँक बिलाच्या वेळीं यावयाला ते चुकणार नाहींत !

* * *

पं. नेहरू हे महिनाभर राहतील असें पूर्वीं लिहिलें होतें, पण विलायतेला जाण्याची त्यांची जरूरी अधिक ठरली ! त्यांची नेमणूक रॉयल कमिशनवर होणार असें कांहीं म्हणतात, व नेमणूक झाली तर ती न स्वीकारतां कमिशनवर बहिष्कारच घाला असा ते देशबांधवांना उपदेश करणार असें कांहीं म्हणतात. पण स्कीन कमिटीवर नेमणूक झालेली प्रथम स्वीकारून कांहीं सभांना हजर राहून मग चूक झाली म्हणून राजीनामा दिला हा तिसरा प्रकारहि त्यांनीं केलेला लोकांना माहीत आहे. तेव्हां त्यांच्याबद्दल कोणी अटकळ चालविण्याच्या भानगडींत पडूं नये हें बरें. असो. श्रीनिवास अय्यंगार यांची कारकीर्द सुरू होतांच त्यांनीं स्वराज्य पक्ष व राष्ट्रीय पक्ष यांचा एकजीव करण्याचा प्रयत्न सुरू केला आहे. आणि त्याप्रमाणें स्कीन कमिटीवरचा ठराव चर्चेला निघेल त्या वेळीं सर्वांनीं मिळून एकच धोरण ठेवावें म्हणून दोनहि पक्ष एकत्र बसले व त्यांनीं उपसूचना कोणती मांडावी हें ठरविलें. तसेंच पं. नेहरू हजर असतांच सरकारी समारंभांना व सरकारी अधिकाऱ्यांनीं केलेल्या समारंभांना स्वराज्य पक्षाच्या लोकांनीं हजर राहण्यास हरकत नाहीं असा ठराव झाला. यामुळें त्या पक्षांतले जुने तंटे व बाचाबाची यापुढें वांचतील असें वाटतें.

* * *

राष्ट्रीय पक्षाचे चिटणीस बापूजी अणे यांचें काम दक्षतेनें व मेहनतीनें सुरू आहे. सर्वांशीं स्पष्टास्पष्ट बोलून पण कोणाचें मन न दुखवितां काम करण्याची हातोटी त्यांना साधलेली असल्यामुळें त्यांच्या कामाबद्दल कुरबूर

कांहीं नाहीं. लाला लजपतराय हे राष्ट्रीय पक्षाचे पुढारी असले तरी पंडित मदन मोहन हे वजनदार सभासद, यामुळें त्यांच्या तंत्रानें लालाजींना बरेंचसें वागावें लागतें व ते एकमेकांना संभाळूनच वागतात. यामुळें या पक्षाचें कांहीं उणें पडत नाहीं. किंबहुना राष्ट्रीय पक्षांत कोण लोक किती दर्जाचे आहेत हें पाहिल्यास असेंब्लींतील पुढारीपण स्वराज्य पक्षांतून निघून राष्ट्रीय पक्षाकडे आल्यास कोणास आश्चर्य वाटणार नाहीं. गेल्या दोन आठवड्यांतील कामाचें सूत्रधारित्व या पक्षाकडेच प्रायः होतें. बॅ. जिना यांना त्यांच्या उदार-मतवादित्वाबद्दल मुसलमान कंपूनें दूर लोटल्यामुळें तेहि राष्ट्रीय पक्षाला अधिक जवळचे झाले आहेत. आणि पुरुषोत्तमदास यांचा ओढा या पक्षाकडे प्रथम-पासूनचाच आहे.

* * *

तीन दिवसांच्या सुटीनंतर ता. २२ पासून पुनः असेंब्लीच्या कामाला सुरुवात झाली. पाहिलेंच काम गिरण्यांना संरक्षण देण्याच्या बिलाचें निघालें. सर जॉर्ज रेनी यांच्या प्रास्ताविक भाषणानंतर सर व्हिक्टर सासून यांनीं गिरणी-वाल्यांची बाजू मांडली. त्यांत गिरणीच्या धंद्यानें देशाचें किती कल्याण होतें, शेतकऱ्यांवर किती उपकार होतात याचें वर्णन केलें. पण ही विचारसरणी कोणास फारशी पटली नाहीं. दास यांनीं आंकडे सांगितले. नियोगी यांनीं स्वदेशी चळवळींत गिरणीवाल्यांनीं बंगाल्याला कसें छळलें हें वर्णिलें. जयकर यांनींहि देशांत या गिरणीवाल्यांबद्दल वाईट मत आहे असें जाणविलें आणि नारायण मल्हार जोशी यांनीं गिरणीवाले व मजूर याचे संबंध सांगून कापड वापरणाऱ्या गरीब लोकांची तरफदारी केली. जम्नादास व जयकर या दोघांनींहि गिरण्यांना संरक्षण द्यावें असें सांगतांना सरकारनें स्वतः नेमलेल्या टारिफ बोर्डाच्या शिफारसी फेटाळून कशा लावल्या, विलायती गिरणीवाल्यांचें हित कसें पाहिलें व परदेशी सुतावर जकात बसवून हातमागांवर धंदा करणाऱ्या लोकांचें नुकसान कसें केलें हें सांगून सरकारांवर टीका केली. या सर्वांचें म्हणणें असें कीं, सिलेक्ट कमिटीकडे बिल पाठवा. पण तेथें कोणास कांहीं निराळी तोड सुचली तर सुचवावयास जागा ठेवा. पण सर जॉर्ज रेनी यांनीं ती गोष्ट नाकारल्यामुळें आतां मूळ बिलापेक्षां अधिक कांहीं करतां येणार नाहीं.

* * *

मंगळवार ता. २३ रोजीं खासगी बिलें चर्चेला निघावयाचीं होतीं. कार्यक्रमावर जुनीं १५ व नवीं २४ बिलें होतीं. पण डॉ. गौर यांच्या जुन्या एकाच बिलानें सर्व दिवस घेतला. पण तें तशाच महत्त्वाचें होतें यामुळें इतर कोणास आपलीं बिलें न निघाल्याचा विषाद वाटला नाहीं. गौर यांचें बिल १९०८ चा त्यांचा कायदा रद्द होण्याबद्दल होतें. गेल्या मार्चमध्येंच हें चर्चेला निघून थांबलें होतें. मागील खेपेस वेळेच्या अभावीं तें अपुरें राहिलें; पण आतां तें कडेला जाऊन त्यांत यशहि आलें. याहि दिवशीं वेळ पुरता ना; पण अध्यक्ष पटेल यांनीं बरीच मदत केली आणि वेळेचें महत्त्व जाणून पुष्कळ लोकांना बोलावयाचें होतें तरी त्यांनीं मुद्दाम आवरतें घेतलें. सरकारतर्फेंहि फक्त दोनच भाषणें झालीं, पैकीं नवे होममेंबर यांनीं या बिलाची अजून जरूरी आहे असें दाखविण्याकरितां १९२१ पासून मालेगांवचे दंगे, मोपल्यांचें बंड, बाबर अकाली लोकांचे अत्याचार, काकोरी येथील दरवडे, इत्यादि ठराविक अत्याचारांची माळ ओढली! पण लोकपक्षापैकीं कोणीच त्याला अनुकूल नसल्यानें कांहीं चालेना. शेवटीं बिलाचे दुसऱ्या व तिसऱ्या वाचनाचे वेळीं मतें न घेतां दोनहि वेळां सरकारचा मोड होऊन बिल पास झालें. येवढ्यानें सर्व भागलें असें मात्र नाहीं. कारण हें बिल पास झालें तरी कौन्सिल ऑफ स्टेटमध्यें काय व्हावयाचें तें ठरलेलेंच आहे. असेंब्लीनें जो एक बळी सजवून तयार केला, त्याच्या वधाचा समारंभ लवकरच वरिष्ठ सभागृहांत झालेला दिसेल. असो. खाजगी बिलाकरितां आणखी एक दिवस मिळणार आहे, तेव्हां इतर कांहीं बिलांचें काम होईल.

* * *

बुधवारीं कांहीं किरकोळ व कांहीं महत्त्वाचीं सरकारीं बिलें पुढें आलीं. दोन टॅरिफ बिलें पुढें सिलेक्ट कमिटीकडे धाडण्यांत आलीं. एकांत गिरण्यासंबंधी मालापैकीं कोणावर जकात घ्यावी, कोणावर माफ करावी हा विषय असून दुसऱ्या बिलांत छापण्याच्या कागदावरील जकातीसंबंधानें जो हल्लीं अन्याय होत आहे तो दूर करण्याची योजना आहे. सिव्हिल प्रोसीजरचें एक बिल अभिप्रायाकरितां बाहेर पाठविण्यांत आलें पण दुसरें नामंजूर झालें. या बिलांत अशी सूचना केली होती कीं, खालील दोन कोर्टांचे निकाल एकाच अर्थाचे झाले असतील तर हायकोर्टाकडे दुसरें अपील कोणास करावयाचें असल्यास त्यानें प्रतिपक्षाच्या खर्चाबद्दल जामीन दिला पाहिजे. याचा हेतु होतांहोईतों

हायकोर्टाकडील अपिलांची संख्या कमी व्हावी. पण हायकोर्टाकडच्या अपिलांत कायद्याचेच प्रश्न मुख्यतः असतात व त्यांना बंदी होणें अनिष्ट, याकरितां पुष्कळ सभासदांनीं त्याला विरोध केला. पैकीं श्री. जयकर यांचें भाषण फारच परिणामकारक झालें. आणि अखेर बहुमतानें बिल फेटाळून लावण्यांत आलें. संध्याकाळीं व्हॉलंटियर पोलीस बिल चर्चेला निघालें, पण वेळेच्या अभावीं तें पुढें ढकलण्यांत आलें.

*　　　　*　　　　*

गुरुवार हा खाजगी ठरावाकरितां ठेवलेला होता. प्रथम साराभाई हाजी यांचा मागच्या खेपेस अर्धा राहिलेला ठराव चर्चेला निघाला. यांत हिंदुस्थानांतील बँकांची हल्लींची स्थिति कशी काय आहे याची तपासणी करून बँका कशा वाढाव्या व त्यांना भांडवल कोठून कसें पुरवावें, याची चौकशी करण्याकरितां कमिटी नेमावी अशी सूचना केलेली होती. ह्या ठरावावर सर व्हिक्टर ससून, षण्मुखं चेट्टी, केळकर, लाला लजपतराय, शेष अय्यंगार वगैरे लोकांचीं भाषणें झालीं. खाजगी सभासदांपैकीं विरुद्ध कोणीच बोलला नाहीं. के. सी. रॉय ह्यांनीं उपसूचना मांडली कीं, ठरावांत सांगितल्याप्रमाणें कमिटी नेमावी. तिनें सूचना कराव्या व त्या सरकारनें अमलांत आणाव्या. ही उपसूचना हाजी यांनीं मान्य केली. सर बेसिल ब्लॅकेट यांनीं विरोध केला पण तो तीव्र स्वरूपाचा नव्हता. तुम्ही म्हणतां तें व्हावें, करावें, करणें योग्य आहे, पुढें-मागें आम्हीहि करूं पण फक्त आतांच नाहीं! तरी पण आम्हीं ज्या गोष्टी पूर्वी केल्या, चौकशी आरंभिली त्याचाच हा परिणाम आहे असें ते म्हणाले. असो. हल्लींचा हा ठराव परत घेण्याची सर बेसिल ह्यांची सूचना मान्य न झाल्यानें अध्यक्षांनीं मतें विचारतां ठराव जागच्याजागींच बहुमतानें मंजूर झाला. सरकारपक्षानें मतें मोजण्याचा आग्रह धरला नाहीं.

*　　　　*　　　　*

गुरुवारीं २॥ वाजतां डॉ. मुंजे ह्यांच्या स्कीनकमिटीवरील ठरावाच्या चर्चेला सुरवात झाली. लष्करी पेशा हा डॉ. मुंजे ह्यांचा आवडीचा विषय आणि सुदैवानें बॅलटच्या सोडतींत त्यांचें पहिलें नांव निघाल्यानें त्यांना तो स्वस्थपणें हक्कानें मांडतां आला. मुंजे यांचें भाषण दणदणीत झालें. पण डोळ्यांसमोर घड्याळ नसल्यानें त्यांना मिळालेल्या अर्ध्या तासांत त्यांनीं

मुख्यतः लष्करी दृष्ट्या झालेल्या चिकट स्थितीचेंच वर्णन केलें. तें सर्वांना पूर्णपणें पटण्यासारखें होतें. नंतर श्रीनिवास अय्यंगार ह्यांनीं ठरलेली उपसूचना मांडली. तींत मुंज्यांच्या ठरावाहून अधिक मुद्दा इतकाच होता कीं, आज आम्हांला स्कीन कमिटीचा रिपोर्ट मान्य असला तरी पुढें केव्हां स्वराज्याची घटना मांडण्याची व मागण्याची वेळ आली असतां लष्करी कारभारासंबंधानें जी काय मागणी करावयाची तिचा हक्क आम्ही राखून ठेवीत आहों. श्रीनिवास अय्यंगार यांचें भाषण सामोपचाराचें व नेमस्तपणाचें झालें. के. सी. रॉय ह्यांनीं एक उपसूचना दिली होती पण ती त्यांनीं परत घेऊन जोरदार भाषणानें श्रीनिवास अय्यंगार ह्यांच्या भाषणाला संमति दिली. कर्नल क्रॉफर्ड ह्यांच्या धोरणांत सरकारी धोरणाचें पिल्लूं हळूच बाहेर निघालें तें असें कीं, स्कीन कमिटीच्या शिफारसी अव्यवहार्य आहेत. मुसलमान प्रतिनिधी अबदुल लतीफ चौधरी यांनीं मार्मिक भाषण केलें व शेवटीं मुख्य सेनापति जनरल बर्डवुड ह्यांनीं भाषण केल्यावर काम संपून चर्चा तहकूब राहिली. सेनापतींनीं असें सांगितलें कीं, सरकार रिपोर्टाचा अद्यापि विचार करीत आहे म्हणून आमचें मत आम्हाला प्रकट करतां येत नाहीं. तथापि हिंदी अधिकारी नेमावयाचे तर ते कर्तृत्ववान पाहिजेत. कर्तृत्व शिक्षणाशिवाय येत नाहीं व अशा शिक्षणाच्या सोयी हिंदुस्थानांत नाहींत. आणि विलायतेंतील संस्था हिंदी विद्यार्थ्यांना शिक्षण देण्याचें मनावर घेतील कीं नाहीं कोणी सांगावें ? तात्पर्य, सेनापतींच्या भाषणावरून कमिटीच्या सूचनांना हरताळ फासण्याचा हिंदुस्थानसरकारचा विचार दिसतो.

## पत्र नं. ३

ता. ६ सप्टेंबर १९२७

शुक्रवार, शनिवार व रविवार हे तीनहि दिवस सुटीचे होते. पण सुटीच्या दिवशींच काम अधिक असतें याचा अनुभव पुष्कळांना आला. रिकामपणामुळें फावत नाहीं म्हणतात तें असेंच ! या तीन दिवसांत दोन सिलेक्ट कमिट्यांच्या सभा, दोन खासगी सभा व एक तीन पक्षांची मिळून सभा असा कार्यक्रम उपस्थित झाला, यामुळें बरीच तारांबळ झाली. संरक्षक जकातीच्या एका बिलाच्या सिलेक्ट कमिटीनें बहुमतानें प्रथम असें ठरविलें कीं, बिलांतील योजनेनें गिरण्यांचा फायदा होण्यापेक्षां हातमागांचें नुकसानच अधिक

होईल. याकरितां तें आहे असें मंजूर करूं नये. तथापि विचाराला वेळ घ्यावा असें ठरलें. काय करावें काय न करावें याविषयीं गिरणीवाल्यांच्या प्रतिनिधींचाच निश्चय होईना. आणि इतर लोक तर बोलूनचालून विरुद्ध. तथापि आतां मुंबईहून सकलातवाला व लालजी नारायणजी आले असून त्यांच्या विचारें कांहीं तरी निश्चित ठरेल. पण सरकार अधिक कांहीं करण्याला तयार नाहीं आणि बिल आहे असेंच पुढें आलें तर हातमागांच्या हिताकरितां बरेंच लोक त्याला प्रतिकूल जाणार. यामुळें गिरणीवाल्यांच्या पदरांत कांहींच पडणार नाहीं असाहि संभव आहे.

* * *

आयात कागदावरील जकातीच्या बिलांत फारशी भानगड नव्हती; कारण कांहीं उत्तम मौल्यवान कागद एक आण्याच्या संरक्षक जकातींतून सुटणें व वर्तमानपत्रांना लागण्यासारखा हलका कागद जकातीला पात्र होणें असा जो दुहेरी अन्याय गेल्या एप्रिलपासून कस्टमहाऊसमध्यें होऊं लागला होता तो बंद करण्याकरितांच हें बिल होतें आणि कांहीं फरक न होतां तें मंजूर झालें. एप्रिलच्या पूर्वीं कागदाचे सौदे झाले होते त्याप्रमाणें आलेल्या कागदावर भारी जकात वसूल झाली आणि सरकार झाली चूक सुधारून घेईल या आशेनें तक्रारी-पावत्या घेऊन जी जकात भरण्यांत आली ती परत मिळावी अशी सूचना सिलेक्ट कमिटींत करण्यांत आली; पण ती नामंजूर झाली. सरकारचा कायदा करतांना तसा हेतु नव्हता, पण सरकारी कायदेपंडितांनीं तसा अभिप्राय दिल्यामुळें जकात वसूल करणें भाग पडलें असा सर जॉर्ज रेनी यांनीं खुलासा केला. आणि आतां तरी कायदा दुरुस्त करीत आहों हें भाग्य समजा असें विनोदानें सांगितलें. पण इसापमुनीनें ही नीति पूर्वींच शिकविली आहे. कोल्हा बगळ्याला म्हणालाच कीं: नाहीं, कीं तुझी मान तोंडांत असतांच तोडली नाहीं हें भाग्य समज!

* * *

सोमवारपासून रिझर्व्ह बँक बिलावरील वादविवादाला सुरुवात झाली. पण ह्या बिलाची खुद्द कौन्सिलांत एक तासभर चर्चा, तर बाहेर चार तास चर्चा असा कार्यक्रम सुरू आहे. मुंबईस व कलकत्त्यास असें बहुमतानें ठरलें कीं, नवी बँक भागीदारांच्या भांडवलानें उभारूं नये, आणि डायरेक्टरबोर्डांत वरिष्ठ व कनिष्ठ कौन्सिलांनीं निवडून दिलेले सहा प्रतिनिधि असावेत. पण

सरकारपक्षाला ही गोष्ट मान्य झाली नाहीं म्हणून सर बेसिल ब्लॅकेट यांनीं जुनी भागीदारीची सर्व योजना उपसूचनेच्या रूपानें कौन्सिलकडे पाठविली. मूळ बिल सर बेसिल यांचें, म्हणून सिलेक्ट कमिटीचा रिपोर्ट असेंब्लीपुढें मांडणें, हेंहि त्यांचेंच काम आणि कर्तव्य आणि तें त्यांनीं केलेंहि. पण बिल विचारांत घ्यावें ही सूचना मांडतांना त्यांनीं सिलेक्ट कमिटीच्या रिपोर्टाविरुद्ध भाषण केलें. सकृद्दर्शनीं ही गोष्ट विपरीत म्हणून अध्यक्ष पटेल यांनीं असें बजाविलेंहि कीं, ज्यानें सूचना मांडावी त्यानेंच एक प्रकारें त्याच्याविरुद्ध बोलावें हें गैरशिस्त दिसतें. तथापि देखाव्यापेक्षां वस्तुस्थितीलाच या ठिकाणीं महत्त्व अधिक; यामुळें अध्यक्षांनीं अधिक हरकत घेतली नाहीं.

* * *

रिपोर्टावरील सामान्य चर्चा जवळ जवळ तीन दिवस चालू होती. तींत सर बेसिल ब्लॅकेट, पं. मदन मोहन मालवीय, षणमुखं चेट्टी, विद्यासागर पांड्या, जम्नादास मेथा, सर अलेक्झांडर मरे, किकाभाई प्रेमचंद, सर पुरुषोत्तमदास ठाकुरदास, केळकर, कोक, सर व्हिक्टर ससून, रंगास्वामी अय्यंगार, मुनशी ईश्वरसरण, लाला लजपतराय, लाहिरी, चौधरी इत्यादि लोकांचीं भाषणें झालीं. त्यांत भागीदारीच्या योजनेचें समर्थन सर बेसिल ब्लॅकेट, किकाभाई प्रेमचंद व कोक यांच्याशिवाय इतर कोणीच केलें नाहीं. खुद्द युरोपियनांपैकींच अलेक्झांडर मरे व आर्थर मूर हेहि त्या योजनेविरुद्ध बोलले! इतरांच्या भाषणांत मुख्य कटाक्ष डायरेक्टरबोर्डाच्या योजनेसंबंधानें होता. कांहींनीं कायदे-कौन्सिलांना डायरेक्टर निवडून देण्याच्या योजनेचें जोरानें समर्थन केलें, तर कांहींनीं थोडी पड घेऊन, ही योजना नसली तर बरें होईल असें दर्शविलें. एका अर्थानें हा मतभेद स्वाभाविक होता. कारण सिलेक्ट कमिटीवर असेंब्लीनें आपले प्रतिनिधी निवडून दिले होते. आणि जरूर तर तिच्या अभिप्रायाला पाठिंबा देण्याला स्वराज्य पक्ष व राष्ट्रीय पक्ष दोघेहि तयार होते. तरी कायदेमंडळाला ह्या कामीं मत देण्याला अधिकार असावा कीं नाहीं याविषयीं व्यक्तिशः पुष्कळांमध्यें मतभेद होता. तथापि सर बेसिल यांना विरोध करणारांनीं केवळ विध्वंसक टीका न करतां उघडपणें असें दर्शविलें कीं, आम्हाला येऊनजाऊन लोकनियुक्त डायरेक्टरांचें बहुमत झालें पाहिजे. तें मिळवून देण्याची कोणतीहि योजना आली तरी आम्ही आमच्या मूळ सूचनेचा हट्ट सोडून देऊं. मग ही विधायक सूचना सरकार मांडो किंवा आम्ही मांडूं. ती सरकारनें मान्य करावी.

भागीदारीच्या प्रश्नावर समेट होणें शक्यच नव्हतें. आणि स्वतंत्र पक्ष व युरोपियन पक्ष यांतहि त्यास प्रतिकूलता असल्यामुळें सरकारचे पाय लुले पडलेले होते. फक्त सर बेसिल ह्यांनीं ओढूनताणून चंद्रबळ आणलें होतें आणि खिशांतला तो एक डाव प्रतिपक्षाला दशहत घालण्याचें तें एक साधन म्हणून त्यांनीं शिल्लक ठेविला होता इतकेंच. राहतां राहिला प्रश्न डायरेक्टर बोर्डाचा. पण भागीदारीच्या बाबतींत सरकार पक्षाला जसा लुलेपणा आला होता, तसाच कायदेमंडळांनीं डायरेक्टर निवडून देण्याचे बाबतींत लोकपक्षालाहि आला होता म्हणून दोनहि पक्षांना तडजोड करण्याची इच्छा व जरूरी उत्पन्न झाली. सर बेसिल ब्लॅकेट यांनीं असेंहि कळविलें कीं, डायरेक्टरबोर्डावर लोकनियुक्त हिंदी सभासदांचें बहुमत असावें ही गोष्ट आपण मान्य करूं. अर्थात् दिसावयाला लोकनियुक्त असले, तरी त्यांतल्या त्यांत होईल तेवढ्या मोठ्या मतदारसंघानें निवडून दिलेलेच डायरेक्टर्स असावेत ह्या दृष्टीनें सूचना पुढें येतील व त्यांत सर्वांत अधिक मान्य कोणती होईल इतकेंच पाहावयाचें उरलें. आणि ह्याच वाटाघाटींत तीन चार दिवस गेले.

* * *

असेंब्लींत पक्ष चार. पैकीं डायरेक्टरबोर्ड बनविण्याच्या बाबतींत युरोपियन पक्ष सरकारला डोळे मिटून मदत करणार ! उलट स्वराज्य पक्ष व राष्ट्रीय पक्ष या दोघांनीं पूर्णपणें सहकारिता करण्याचें ठरविलें. आणि उभय पक्षांना मान्य होईल अशा योजनेला संमति देण्याचें निश्चित झालें. राहतां राहिला स्वतंत्र पक्ष. यांत राष्ट्रीय पक्षाकडे झुकणारे सर पुरुषोत्तमदास ठाकूरदास व तिऱ्हाईतपणाची भूमिका ठेवणारे मि. जिना हे असून मुसलमान सभासदांचें पाहणें इतकेंच कीं, ज्या कोणत्या योजनेंतून आपणाला एकदोन डायरेक्टर्स मिळतील ती योजना आपण पसंत करूं ! मग त्यांत सरकार पक्षाला मिळावें लागलें तरी हरकत नाहीं आणि लोकपक्षाला मिळून मागलें तर उत्तमच. पण त्यांतल्या त्यांत असें दिसून आलें कीं, रिझर्व बँक अस्तित्वांत यावयाची तर लोकपक्षाच्या संमतीनें आलेली अधिक बरी. म्हणून सर बेसिल ब्लॅकेट यांनीं लोकपक्षाकडून येणाऱ्या सूचनांचा प्रथम विचार करूं आणि न च बनलें तर स्वतंत्र पक्षाची मदत घेऊं असें धोरण ठेवलें, एवढेंच नव्हे तर अर्धवट प्रकटहि केलें. पण उपसूचना देण्याच्या अखेरच्या तासापर्यंत एकमत

न झाल्यानें तीन पक्षांच्या तीन उपसूचना लेखी दाखल झाल्या. तेव्हां यांतून कोणत्या उपसूचनेला बहुमत मिळतें हें पाहण्याचें काम गुरुवारपर्यंत पुढें ढकललें गेलें. बुधवारीं ५-५। वाजतां सर्वसाधारण चर्चा संपल्यावर अध्यक्ष पटेल यांनीं मुद्दाम अधिक थोडा वेळ बसून बिलांतील पहिलीं सहा कलमें मंजूर करून घेतलीं.

* * *

दरम्यान सौम्यपणाचा उपाय म्हणून खुद्द व्हाईसरॉय यांचेकडे पांचसहा सभासदांचें शिष्टमंडळ गेलें आणि तेथें तडजोडीचा प्रयत्न झाला. पण तो फुकट गेला. या खाजगी सभेकरितां स्वराज्य पक्षाच्या एकदोन प्रतिनिधींना सर बेसिल ब्लॅकेट यांनीं बोलावणें केलें होतें. परंतु शिस्त बिघडेल म्हणून ते गेले नाहींत ! त्यांनीं प्रथम कबुली दिली होती. परंतु मागाहून त्यांचा विचार बदलला म्हणून ह्या खाजगी मुलाखतीवर जम्नादास मेथा यांनीं असेंब्लींत टीका केली. परंतु त्यांचें बोलणें या कामीं फिकें पडलें.

* * *

रिझर्व्ह बँकांशिवाय ह्या आठवड्यांतील चर्चेचा विषय म्हणजे हिंदु-मुसलमानांच्या एकीसंबंधाचा. डॉ. अन्सारी यांनीं आपलें पत्रक प्रसिद्ध केलेंच होतें. आणि ह्यासंबंधानें लोकमत कसें आहे हें अजमावण्याकरितां ते सिमल्यास आले होते. त्यांना ह्या बाबतींत सर्व पक्षांकडून जवळ जवळ संमतीच मिळाली. जम्नादास मेथा यांच्यासारख्या एखाद्यानें त्यांच्या धोरणाबद्दल वर्तमानपत्रांत नापसंती प्रकट केली असली तरी येथें त्यांना प्रतिकूल असें वातावरण मुळींच आढळलें नाहीं. पण राजकारणांतील ऐक्याप्रमाणेंच हिंदु-मुसलमानांच्या ऐक्याचा प्रश्न सोडवितां आला तर तोहि सोडवावा आणि अशा रीतीनें राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष ह्या नात्यानें आपले दोन हात तेथून बळकट करून घेऊन जावें अशी त्यांची स्वाभाविकच इच्छा होती. याकरितां त्यांच्याबरोबर अल्ली बंधू हेहि आले होते. प्रथम त्यांनीं पं. मालवीय यांच्या घरीं लाला लजपतराय, श्री. केळकर व अणे यांच्याशीं खाजगी वाटाघाट केली. शौकतअल्ली यांनीं खिलाफत कमिटीच्या कार्यकारी मंडळाकडून एक पत्र आणलें होतें तेंहि डॉ. मुंजे यांना हिंदुसभेचे अध्यक्ष म्हणून दिलें. या पत्रांत असा मजकूर होता कीं, जातिद्वेषाचा व धर्मद्वेषाचा वणवा फार पेटत चालला आहे. गोष्टी विकोपाला जातील. तरी खिलाफत कमिटी व तिचे

प्रतिनिधी व हिंदु सभेचे प्रतिनिधी यांनीं पुनः एकत्र बसून तडजोड निघाल्यास पहावी. विलंब करूं नये." या निमंत्रणाला डॉ. मुंजे यांनीं हिंदु-सभेतर्फे रुकार दिला.

* * *

दरम्यान सोमवारीं व्हाइसरॉयसाहेबांनीं असेंब्ली व कौन्सिल ऑफ स्टेट यांना एकत्र बोलावून कळकळीचें भाषण केलें. या भाषणांत रॉयल कमिशनचा व इतर विषयांचा, म्हणजे बंगाल्यांतील कैद्यांना सोडणें वगैरेचा उल्लेख होईल अशी पुष्कळांची अपेक्षा होती. पण इतर कोणत्याहि विषयाचा उल्लेख त्यांनीं आपल्या भाषणांत केला नाहीं. सुमारें अर्धा तास भाषण केलें. त्यांत त्यांनीं हिंदु-मुसलमानांतील तंट्यांचा उल्लेख केला, ह्या बिघाडापासून होणाऱ्या अनर्थांचें विवरण केलें आणि शेवटीं असें सांगितलें कीं, उभय पक्षांच्या खाजगी सभा माझ्या विद्यमानें बोलावून चर्चा व तडजोड करण्याची पुढाऱ्यांची इच्छा असल्यास त्यांनीं मला तसें कळवावें, मी ती गोष्ट अवश्य करीन; किंबहुना कांहीं तरी तडजोड निघावी व देशांतील कलह मोडावेत याकरितां, माझ्या हातून होतील ते सर्व प्रयत्न करीन. या भाषणाचा सर्वांवर अर्थातच बराच परिणाम झाला.

* * *

तथापि हें भाषण होण्यापूर्वींच उभय पक्षांची सभा होण्याचें ठरलेलें होतें. आणि त्याप्रमाणें पहिली सभा असेंब्लीच्या जागेंत सोमवारीं संध्याकाळीं व मंगळवारीं दुपारीं भरली. सभेला दोनहि पक्षांतील ३० ते ४० गृहस्थ हजर होते. सोमवारच्या सभेंत असें ठरलें कीं, प्रथम तूर्तातूर्त उभय पुढाऱ्यांच्या सह्यांनीं ताबडतोबीचा जाहिरनामा प्रसिद्ध करून, समेटाची वाटाघाट होणार आहे असा इषारा लोकांना देऊन अत्याचारांना आळा घालावा, निदान तहकुबीची तरी विनंति कळकळीनें करावी. पण ही व्यवस्था अर्थात् तात्पुरतीच. कायमच्या तडजोडीचा विचार झाल्याशिवाय ही फुकट. म्हणून ह्या सभेंत असेंच ठरलें कीं, हिंदु-मुसलमानांच्या पुढाऱ्यांनीं प्रत्येक बाजूच्या मागण्या व गाऱ्हाणीं ह्यांसंबंधानें एक यादी तयार करावी व तिचा विचार करण्याकरितां तारीख ७ सप्टेंबर रोजीं फिरून सभा बोलवावी. मंगळवारच्या सभेंत जाहिरनाम्याचा मसुदा मंजूर होऊन त्याच्यावर सह्या घेऊन तो प्रसिद्ध करण्याचें ठरलें आणि त्याप्रमाणें तो आतां प्रसिद्धहि झाला आहे.

* * *

ह्या खासगी सभेंत जशीं सामोपचाराचीं बोलणीं झालीं तशींच स्पष्ट-पणाचींहि बोलणीं झालीं. उभय पक्षांना कांहीं तरी तडजोड करावी असें वाटत होतें, असें उघड दिसलें. पण ही सर्व नुसती शिकारीची तयारी होय. प्रत्यक्ष शिकार काय साधेल तें अजून पाहावयाचेंच आहे. सिमल्यास जमलेल्या पुढाऱ्यांनीं कांहीं ठरविलें तरी देशांत सर्व समाजाला तें मान्य होईल कीं नाहीं असाहि प्रश्न निघाला. आणि पूर्वी दिल्लीस झालेली ऐक्य-परिषद, मुंबईस झालेली ऑल-इं. कॉ. कमिटीची सभा ह्यांतून ठराव मंजूर झाले, तरी बाहेर त्याविरुद्ध प्रतिकूल मत प्रतिपादण्यांत आलें असा अनुभवच आहे. परंतु 'फिरून प्रयत्न करून पाहा' ही म्हण विसरून चालतां येत नाहीं. म्हणून पुढाऱ्यांनीं तरी एकमत करावें, मग बाहेर समाज कितपत ऐकेल न ऐकेल तें पाहतां येईल, हाच विचार पसंत पडून कामाला सुरुवात झाली. अगदीं आकुंचित व एककल्ली विचाराचे लोक, पण वजनदार लोक दोनहि समाजांत आहेत ही गोष्ट कांहीं खोटी नाहीं. तथापि पुढाऱ्यांनीं आपल्यावरची जबाबदारी ह्या सबबीवर टाकतां येत नाहीं व तशी ती टाकून देणें श्रेयस्करहि नाहीं. स्वतंत्र स्फूर्तीनें व स्थानिक परिस्थितीमुळें दंगेधोपे होतात, आणि त्यांत सुशिक्षित लोक सामील असत नाहींत हें खरें असलें तरी बाहेरच्या समाजाचे डोळे थोडेबहुत तरी पुढाऱ्यांच्या डोळ्यांकडेच लागलेले असतात. आणि वरच्या लोकांत फूट पडली म्हणजे जर तिचा परिणाम खालच्या समाजांत आढळून येतो तर त्याच वरच्या समाजांत थोडीबहुत एकी झालेली दिसली तर तिचा परिणाम खालच्या समाजावर व्हावा हें अनुमान सयुक्तिकच होय. कोणत्याहि गोष्टीला प्रारंभच करावयाचा तर कांहीं थोड्या व्यक्तींनींच करावा लागतो आणि हा थोडा प्रयत्न पुढारी न करतील तर ते पुढारी कसले ? 'नदी मुखेनेव समुद्रमाविशत्' या कवीच्या उक्तीप्रमाणें समाजाच्या समुद्रांत कोणतीहि गोष्ट शिरावयाची तर ती पुढाऱ्यांच्या नदीमुखांतून शिरणें हाच राजमार्ग होय. अशा विचारानें हिंदु-मुसलमान पुढाऱ्यांनीं फिरून एक वार प्रयत्न करून पाहावा असें ठरविलें आहे.

* * *

कौन्सिल ऑफ स्टेटच्या कामालाहि गेल्या मंगळवारपासून सुरुवात झाली आहे. येणार ते बहुतेक सभासद आले आहेत. गेल्या तीन दिवसांत असेंब्लीनें मंजूर केलेलीं कांहीं बिलें कौन्सिल ऑफ स्टेटकडून मंजूर करण्यांत आलीं. या-

शिवाय डॉ. गौर यांचा हिंदुस्थानांत वरिष्ठ कोर्ट स्थापन करण्याचा वरचेवर येतो तो ठराव कौन्सिल ऑफ स्टेटमध्यें सर शंकरन् नायर ह्यांनीं मांडला व तो २५ विरुद्ध १५ मतें पडून नामंजूर झाला. असेंब्लीमध्येंहि ह्या ठरावासंबंधानें पक्कें दुमत असून सरकारलाहि ती गोष्ट त्यांच्या विशिष्ट कारणांकरितां मान्य झालेली नाहीं. सर फेरोज सेठना यांनीं स्कीन कमिटीचा रिपोर्ट अमलांत आणावा अशा अर्थाचा ठराव मांडला. कमांडर इन चीफ बर्डवुड ह्यांनीं तो ठराव परत घ्यावा असा आग्रह केला, परंतु शेवटीं २३ विरुद्ध १७ मतें पडून हाहि ठराव नापास झाला! मागील आठवड्यांत असेंब्लीमध्यें डॉ. गौर यांचें समितीचा कायदा रद्द करण्याचें बिल मंजूर झालें तें बहुशः ह्या आठवड्यांत कौन्सिल ऑफ स्टेटपुढें येईल. आणि तें बिल नामंजूर करून कौन्सिल ऑफ स्टेट असेंब्लीला उलट अहेर करणार असें दिसतें! असेंब्लीनें बळी सजवून तयार करावा व कौन्सिल ऑफ स्टेटनें त्याचा वध करावा अशी मुळांत योजना झालेलीच आहे, तिचा अनुभव असा हा वरचेवर येतो त्याला इलाज नाहीं.

## पत्र नं. ४

ता. ८-९-२७

गेल्या आठवड्यांत रिझर्व्ह बँक बिलांची चर्चा गुरुवार व शुक्रवार दोन दिवस झाली. गुरुवारीं सर बेसिल ब्लॅकेट यांनीं एक महत्त्वाची उपसूचना पुढें मांडली. तिच्यावर जवळ जवळ सर्व दिवसभर वादविवाद होऊन ती नामंजूर झाली. उपसूचना अशा अर्थाची होती कीं, नव्या होणाऱ्या रिझर्व्ह बँकेचा डायरेक्टर हा प्रांतिक किंवा वरिष्ठ कायदे–कौन्सिलचा सभासद असूं नये. डायरेक्टरांच्या निवडणुकीकरितां कायदेमंडळाचा मतदारसंघ बनवावा कीं नाहीं हा प्रश्न अजून निघावयाचाच होता. तरी पण राजकारणी लोकांवर सरकारचा इतका कटाक्ष कीं, बाहेरच्या एखाद्या मतदारसंघानें जरी कायदेमंडळांतील एखाद्या सभासदाला डायरेक्टर म्हणून निवडलें तरी त्याला डायरेक्टर होतां येऊं नये. कां तर त्यामुळें बँकेच्या कारभारांत राजकारण घुसतें. ह्या उपसूचनेवर चौफेर हल्ला झाला, यामुळें सरकारला बहुमत मिळण्याची आशा राहिली नाहीं.

* * *

राजकारण हें मनुष्याच्या अंगाला चिकटलेलेंच असतें. जसा त्याच्या अंगाचा रंग तसें त्याच्या मनांतील राजकारण. अर्थात् अंगावरील रंग जसा

खरडून काढतां येत नाहीं तसेंच कोणाच्याहि मनांतील राजकीय मतें खोडून काढतां येत नाहींत. तसेंच त्याबरोबर दुसरीहि गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे ती ही कीं, राजकीय विषयांत प्रत्येकाचीं ठराविक मतें असलीं तरी तीं उपयोगांत केव्हां आणावीं केव्हां न आणावीं हें समंजस मनुष्याला कळतच असतें. कोणी ज्यूरीवर ज्यूरर नेमला गेला तर तो त्या ठिकाणीं प्रायः न्यायबुद्धीच मनांत ठेवील. तो जहाल असला किंवा मवाळ असला तरी त्यामुळें त्याच्या मतांत फरक पडणार नाहीं. त्याला एखाद्या परीक्षेंत परीक्षक नेमला तर तो विद्यार्थ्यांनें उत्तरें कशीं दिलीं आहेत एवढेंच पाहील. त्याचा बाप कोणत्या राजकीय पक्षांतला आहे हें तो पाहणार नाहीं. तात्पर्य, मनुष्याच्या मनांत अनेक कप्पे असतात, यामुळें निरनिराळ्या विषयांवरील त्याच्या मताचा गोंधळ किंवा खिचडी सहसा होत नाहीं.

* * *

असो. अशा रीतीनें कायदेमंडळाच्या सभासदांची बेअब्रू करण्याचें सरकारनें योजिलें होतें, पण ती टळली. ह्या उपसूचनेवर लोकपक्षातर्फे जम्नादास मेथा, षण्मुखं चेट्टी, लाला लजपतराय, केळकर, अणे, शेष अय्यंगार वगैरेंचीं भाषणें झालीं; व अखेर ७० विरुद्ध ५१ मतें पडून ब्लॅकेट यांची उपसूचना नामंजूर झाली. त्यानंतर केळकर यांनीं सातव्या कलमावरील आपली उपसूचना मांडली. या कलमांत असें लिहिलें आहे कीं, जो शेतकी, उद्योगधंदा व व्यापार ह्या विषयांत प्रत्यक्ष काम करीत असेल, किंवा असें काम ज्यानें पूर्वी केव्हां तरी केलें असेल, अशाशिवाय कोणासहि बँकेचा डायरेक्टर नेमण्यांत येऊं नये. सरकारतर्फे ह्याला विरोध करण्यांत आला. सरकारचें म्हणणें असें कीं, बँकेचा डायरेक्टर होण्याला मनुष्याला व्यवहाराची माहिती चांगली असली पाहिजे, किंबहुना पहिल्या प्रतीची पाहिजे, हें कबूल. पण ही अट म्हणून घालतांना ह्या मुद्द्यावर ही खरी अडचण शब्दाची उत्पन्न होते, आणि हल्लींचे शब्द इतके स्थूल, व्यापक अतएव निरर्थक आहेत कीं, त्यामुळें नको असतील असेहि लोक आल्याशिवाय राहणार नाहींत व हवे असतील असे लोक येण्याला व्यर्थ अडचण मात्र होईल. कारण मनुष्य वरील प्रकारच्या व्यवहारांत पडला होता कीं नाहीं किंवा हल्लीं आहे कीं नाहीं, ही गोष्ट साक्षीपुराव्यानें ठरवयाची असते. आणि त्याचा फायदा घेऊन फिर्यादी-अर्यादी मात्र विनाकारण वाढतील.

* * *

वास्तविक या एवढ्या मोठ्या बँकेच्या निवडणुकींत भलतासलता उमेदवार म्हणून उभा राहणार नाहीं; आणि कोणी राहिला तरी तो निवडूनहि येणार नाहीं. व्यापारधंद्यांतील दिग्गजांचेंच तें काम. भलता त्या फंदांत पडतो कशाला ? दुसऱ्या पक्षीं हल्लींच्या निर्बंधक शब्दांतून खेडेगांवच्या को-ऑपरेटिव्ह सोसायटीच्या मॅनेजिंग कमिटीवर असलेला एखादा मनुष्य, शेतांतील मजूर, कारखान्यांतील मजूर, किरकोळ पेढीचा मुनीम किंवा विडीतंबाखू विकणारा दुकानदारसुद्धां नालायकींत येणार नाहींत. केळकर यांच्या उपसूचनेवर जोशी, पंडित ठाकरदास भार्गव, पं. कुंझरू वगैरे सभासदांनीं समर्थनपर भाषणें केलीं. परंतु २९ विरुद्ध ५७ मतें पडून बहुमतानें ती नामंजूर झाली. राष्ट्रीय पक्षांतील बहुतेक लोकांनीं अनुकूल मतें दिलीं व कांहीं स्वराज्य पक्षांतील लोकांनींहि पण दिलीं. एवढेंच नव्हे तर या उपसूचनेला अनुकूल मतें द्यावीं असें स्वराज्य पक्षानें प्रथम ठरविलें होतें. परंतु आयत्या वेळीं चलबिचल होऊन किंवा कदाचित् सर बेसिल ब्लॅकेट यांच्याशीं केलेल्या तहांत तें कलम चुकून लिहिलें म्हणून, एकाएकी उलट हुकूम फर्माविण्यांत आला ! यामुळें उपसूचना नामंजूर झाली. या कलमावर अधिक उपसूचना नसल्यानें तें कलम मंजूर झालें.

* * *

नंतर सर बेसिल ब्लॅकेट यांनीं वादांतील मुख्य कलमावर आपली पहिली उपसूचना मांडली. कलम ८ मध्यें बँकेचें बोर्ड कसें नेमलें जावें हा मुख्य विषय होता व त्यांत पुढीलप्रमाणें योजना होती. एकंदर डायरेक्टर १९ असावेत. पैकीं एक गव्हर्नर व एक डेप्युटी गव्हर्नर असावा. यांपैकीं एक हिंदी गृहस्थ असलाच पाहिजे. या दोघांची पहिली नेमणूक गव्हर्नर-जनरल-इन्-कौन्सिल यांनीं करावी. ती पांच वर्षें अमलांत राहावी आणि गव्हर्नर-जनरल-इन्-कौन्सिल ठरवील तो पगार त्यांना देण्यांत यावा. पांच वर्षांनंतर हा पगार डायरेक्टरबोर्डानें ठरवावा. दोन डायरेक्टर गव्हर्नर-जनरल-इन्-कौन्सिल यांनीं आपल्या मताप्रमाणें नेमावे. पण ते दोनहि हिंदी गृहस्थ असावेत. दोन डायरेक्टर युरोपियन व्यापारी मंडळानें व दोन देशी व्यापारी मंडळानें नेमावे. को-ऑपरेटिव्ह बँकांनीं निवडलेला एक डायरेक्टर असावा; आणि वरिष्ठ कायदेमंडळानें तीन व प्रांतिक कायदेमंडळांनीं मिळून तीन डायरेक्टर नेमावेत. प्रांतिक कायदेमंडळानें डायरेक्टर नेमणें ते शेतकी,

व्यापार व उद्योगधंदे यांचें हित पाहणारे असावेत. एक डायरेक्टर सरकारी अधिकारी असावा. पण त्याला मत देण्याचा अधिकार असूं नये. पहिल्या पांच वर्षांनंतर गव्हर्नर व डेप्युटी गव्हर्नर यांच्या नेमणुकांची शिफारस बोर्डानें करावी. व्यापारी मंडळानें व को-ऑपरेटिव्ह बँकांनीं निवडलेल्या डायरेक्टरांची मुदत पांच वर्षे असावी. या सर्व निवडणुकीचे बाबतींत सर्व नियम करावयाचे ते गव्हर्नर जनरल-इन्-कौन्सिल यांनीं करावेत.

* * *

ही सगळीच्या सगळी योजना वादग्रस्त ठरून त्यावरच सर्व रण माजलें. यापैकीं पहिल्याच पोटकलमावर सर बेसिल ब्लॅकेट यांनीं सरकारी उपसूचना मांडून वादाला प्रारंभ केला. ती उपसूचना अशी कीं, 'गव्हर्नर व डेप्युटी गव्हर्नर यांपैकीं एक हिंदी गृहस्थ असला पाहिजे' हे शब्द गाळण्यांत यावे. ब्लॅकेटसाहेबांचें म्हणणें असें कीं, 'एक हिंदी गृहस्थ असलाच पाहिजे" असे शब्द घातल्यानें काळा-गोरा, स्वदेशी-परदेशी अशा तऱ्हेचा भेदभाव कायद्याच्या शब्दांत येतो तो घालणें अनिष्ट आहे. असे शब्द नसले तरी सरकार गव्हर्नर व डेप्युटी गव्हर्नर यांपैकीं एक हिंदी गृहस्थ नेमणार नाहीं कशावरून ? एवढेंच काय पण कालांतरानें असेंहि दिसून येईल कीं, गव्हर्नर व डेप्युटी गव्हर्नर हे दोघेहि हिंदी गृहस्थ नेमले जातील. पण या युक्तिवादांत सहजच भोसके पाडण्यासारखे होते व ते कित्येक सभासदांनीं स्पष्ट बोलून पाडलेंहि.

* * *

जम्नादास मेथा यांनीं असें सांगितलें कीं, प्रांतांतील गव्हर्नर युरोपियन असावेत, हिंदी नसावेत असा निर्बंध कायद्यांत नाहीं. असें असतां आज १०० वर्षांत लॉर्ड सिंह यांच्याखेरीज हिंदी मनुष्याला ती जागा कधीं तरी देण्यांत आली आहे काय ? इतर लोकांनीं इतर खात्यांचे मुख्य अधिकारी युरोपियन कसे नेमले जातात हें सांगितलें. आणि एका दोघांनीं तर रेल्वे बोर्डावर एक हिंदी सभासद नेमण्याचें अभिवचन दिलें असतांहि तें पाळण्यांत आलें नाहीं ही गोष्ट निदर्शनाला आणली. डॉ. गौर ह्यांनीं असें विचारलें कीं, गव्हर्नर व गव्हर्नर जनरल यांच्या कौन्सिलांत पूर्वीं तुम्ही हिंदी गृहस्थ नेमीतच नव्हतां, आतां नेमूं लागलां, तर ते काय नालायक ठरले आहेत ! मुनशी ईश्वर शरण ह्यांनींहि अशा बाबतींत सरसकट विश्वासघात होत आला

आहे असें सांगितलें. जिना यांनीं असें सुचविलें कीं, दोहोंपैकीं म्हणजे गव्हर्नर व डेप्युटी गव्हर्नर यांपैकीं, एक तरी हिंदी गृहस्थ नेमला जाईल अशाविषयीं कायद्यांत शब्द नको असतील तर सरकारतर्फे याच ठिकाणीं उघड अभिवचन द्यावें व ती गोष्ट आम्ही आमलांत आणूं, वचन पाळूं, असें उघड कबूल करावें. पण श्रीनिवास अय्यंगार यांनीं अशा वचनाचा उपयोग होत नाहीं असें प्रतिपादिलें व जिना यांनीं मागितलेल्या अभिवचनानें आमचें समाधान होणार नाहीं असें सांगितलें. तरी पण जिना यांच्या सूचनेचा आधार घेऊन सर बेसिल ब्लॅकेट यांनीं तसें वचन सरकार देण्याला तयार आहे असें सांगितलें!

* * *

यानंतर मुंबईचे युरोपियन व्यापारी मि. कोक यांनीं अशी उपसूचना आणली कीं, एका डेप्युटी गव्हर्नराच्या ऐवजीं दोन डेप्युटी गव्हर्नर नेमण्यांत यावेत; आणि मग वाटेल तर एक हिंदी गृहस्थ नेमण्याचें अभिवचन द्यावें. ही उपसूचना कलकत्त्याच्या व्यापारी मंडळानें खासगी खलबत करून आणविली होती. कारण बँकेची एक मुख्य कचेरी जशी मुंबईस तशी कलकत्त्यास राहणार आहे. तेव्हां मुंबईप्रमाणें कलकत्त्यालाहि एक डेप्युटी गव्हर्नर हवाच! अशा रीतीनें या वादाला तोंड लागलें आणि शुक्रवारचा सर्व दिवस काम चाललें असतें तर कांहीं ना कांहीं तरी निकाल लागला असता. पण ह्या एका उपसूचनेचा निकाल लागल्यानें सर्व वाद संपत नव्हता. आणि जमली तर सलोख्यानें सर्वच्या सर्व सर्वानुमतें मंजूर होण्यासारखी एखादी योजना कोणी तरी पुढें आणावी व ती मान्य करावी अशी अनेकांची आणि विशेषतः सर बेसिल ब्लॅकेट यांची इच्छा असल्यामुळें अध्यक्षांनीं सुमारें १२॥ वाजतांच असेंब्लीचें काम संपवून तें सोमवारवर ढकललें.

* * *

अशा रीतीनें पुन्हा तीन दिवस खासगी वाटाघाटीला मिळाले. परंतु सोमवार सकाळपर्यंत या गोष्टीचा निर्णय लागण्याचा संभव दिसेना. म्हणून पुढील आठवड्याचा कार्यक्रम असा ठरविण्यांत आला कीं, इतर बरेच किरकोळ काम व्हावयाचें राहिलें होतें तें प्रथम घ्यावें आणि तें सर्व संपलें म्हणजे मग ह्या रिझर्व्ह बँकेच्या बिलावर पुन्हा चर्चा सुरू व्हावी. अशी कालगत होण्याचें

मुख्य कारण असें कीं, आपली सर्व योजना हटकून मंजूर होईल अशी सर बेसिल ब्लॅकेट यांनाहि खात्री वाटत नव्हती. पुन्हा शनवारीं सकाळीं व्हाइसरॉयसाहेबांकडे मध्यस्थी झाली. आणि पं. मदन मोहन मालवीय यांनीं त्यांची पुन्हा गांठ घेऊन मुदत वाढविण्याचें कबूल केलें.

रिझर्व्ह बँकेचें बिल अजून मंजूर व्हावयाचेंच आहे. तथापि रिझर्व्ह बँकेचें नांव देशांतील सर्व लोकांना आतां पाठ झाल्यासारखेंच आहे. जगांत नेहमीं आपण असें पाहतों कीं, आधीं प्राण्याचा जन्म आणि नंतर त्याचें नामकरण. पण या बाबतींत कदाचित् असेंहि घडण्याचा संभव आहे कीं, नांव तेवढें शिल्लक राहील आणि बिल परत घेतलें जाऊन किंवा नापास होऊन रिझर्व्ह बँकच अस्तित्वांत येणार नाहीं. या बँकेला दोहोंकडून गंडांतरें दिसतात. वर स्टेटसेक्रेटरीला ती मनांतून पसंत नाहीं. कारण तिच्यामुळें त्यांचें अधिकार नष्ट होतात. खालीं लोकांना ती पसंत नाहीं. कारण संस्थेची कल्पना चांगली असली तरी तिचीं सूत्रें लोकपक्षाच्या हातीं न येतां मधल्यामध्यें हिंदुस्थान सरकारच तीं आपल्या हातीं ठेवणार; मग ही रिझर्व्ह बँक हवी तरी कोणाला? या प्रश्नाचें उत्तर थोडेंसें चमत्कारिक वाटेल. पण ती बँक सर बेसिल ब्लॅकेट यांना हवी एवढी गोष्ट मात्र निश्चित् आहे व ती आतां सर्वांना कळून चुकली आहे. कोणी म्हणतात कीं, "गेल्या पांच वर्षांतील हिंदुस्थानची आर्थिक परिस्थिति पाहून हिंदुस्थानचें या बँकेनें कल्याण होईल अशी त्यांची समजूत आहे." कोणी म्हणतात, "आपल्या कारकीर्दीचें कायमचें स्मरण मागें राहावें व विलायतेंतील लक्ष्मीपुत्रांना हिंदुस्थानांतील सुवर्णनिधीची मदत व्हावी याकरितां यांची खटपट आहे." पण कोणत्याहि हेतूनें त्यांनीं या बँकेची कल्पना काढली असली तरी त्यावर त्यांचें मुलासारखें प्रेम आहे ही गोष्ट त्यांनीं दर्शविली व इतरांनींहि तीच उपमा तिला दिली.

* * *

असो. हें बिल बुडूं नये. ही जशी सर बेसिल यांची इच्छा, तशीच पुष्कळ सभासदांची म्हणून उभयपक्षांना किंबहुना सर्व पक्षांना मान्य होईल अशी डायरेक्टर बोर्डाची योजना तयार करण्याचा जो तो आपापल्याकडून प्रयत्न करूं लागला. आणि असेंब्लींतील लोकांचीं डोकीं इतकीं सुपीक ठरलीं कीं, या सर्व योजनांचे कागद एकत्र केले तर डोक्यानें वाहून नेण्याला जड असा एक तो भाराच होईल. कित्येकांना कलाकौशल्याची करामत दाखविण्याला

ही संधि फार उत्कृष्ट वाटली. दुसऱ्या कित्येकांनीं योजनेच्या मिषानें सर बेसिल ब्लॅकेट यांजकडे स्नेह वाढवून सरकारच्या अंतरंगांत घुसण्याची सवड मिळविली. कित्येकांनीं इमारतीचा नकाशा सर्वांगसुंदर म्हणून करतांना त्यांतल्या त्यांत आपल्याकरितां राखीव दालनांची योजना केली. बिचाऱ्या ताजमहालच्या इंजीनिअरानें नकाशाशिवाय ताजमहाल बांधला अशी गोष्ट सांगतात. पण या रिझर्व्ह बँक बिलाची इमारत शेवटीं नकाशाच्या घोटाळ्यांतच नाहींशी होईल कीं काय असा रंग दिसत आहे!

## पत्र नं. ५

ता. १५-९-२७

मागील पत्रांत रिझर्व्ह बँक बिलाला गंडांतर असल्याचें ध्वनित केलें होतें तें वाचकांच्या लक्षांत असेलच. तें अनुमान किंवा भविष्य लवकरच प्रत्ययास आलें. गुरुवारीं सायंकाळीं पुढील आठवड्याचा कार्यक्रम सांगतांना, सर बेसिल ब्लॅकेट यांनीं असें जाहीर केलें कीं, "रिझर्व्ह अंक बिलाचें काम पुढील आठवड्यांत चालणार नाहीं." मात्र तें बिल सरकारनें परत घेतलें असें कांहीं स्पष्ट शब्दांनीं त्यांनीं सांगितलें नाहीं. तथापि आंतल्या आंत काय चाललें होतें याची कुजबूज भिंतीच्या कानांना ऐकूं येत होती. या आठ दिवसांत सर बेसिल ब्लॅकेट हे असेंब्लींतील निरनिराळ्या पक्षांशीं चर्चा उघडपणें करीत होते, तरी त्याच वेळीं विलायतेंत स्टेटसेक्रेटरींशीं त्यांचा वाद तारेवर चालू होता. ह्या वादाचें खरें स्वरूप केव्हांहि गुतच राहणार. पण एकंदरीनें तर्क असा कीं, स्टेटसेक्रेटरींना व त्यांच्या आसपासच्या विलायती लक्ष्मीपुत्रांच्या कटाला रिझर्व्ह बँक बिल पसंत नाहीं. केवळ भागीदारांचीं बँक असली तरच ती त्यांना हवी. पण इकडे पहिल्याच दिवशीं भागीदारीच्या कल्पनेच्या डोक्यांत दगड पडून ही बँक सरकारी व्हावी असें निश्चित झालें होतें! येऊन जाऊन प्रश्न काय तो डायरेक्टर बोर्ड कसें निवडावें एवढाच उरला होता.

* * *

इतक्यांत स्टेटसेक्रेटरींनीं बिल पुढें चालविण्याची परवानगी काढून घेतली, यामुळें सर बेसिल ब्लॅकेट रागावले आणि त्यांनीं आपल्या जागेचा राजीनामाहि व्हाइसरॉयसाहेबांकडे सादर केला अशी बातमी ऐकूं आली. इकडे असेंब्लींतील पुढाऱ्यांशीं डायरेक्टर बोर्डाच्या रचनेविषयीं वाटाघाट चालू होती ती,

खुंटी उलटी पिरगळली गेल्यामुळें तार ढिली पडते, त्याप्रमाणें ढिली पडली. सोमवारपासूनचा पुढील कार्यक्रम सभासदांच्या हातीं आला तेव्हां लोकांना त्यांत रिझर्व्ह बँक बिलाचें नांवहि न दिसतां, इतर किरकोळ बिलेंच अधिक दिसलीं; तेव्हां सर्वांनाच आश्चर्य वाटलें. पण कोणत्याहि क्रियेनंतर प्रतिक्रिया सुरू होते तसेंच येथें झालें. बोर्डाच्या योजनेच्या वादांत एका बाजूला ब्लॅकेटसाहेब ओढीत होते आणि दुसऱ्या बाजूला तीन पक्षांनीं तीन निरनिराळ्या बाजूंनीं जोर लाविला होता. पण रस्सीखेंचीच्या खेळांत एका बाजूच्या गड्यांनीं दोर एकदम सोडून दिला म्हणजे प्रतिपक्षी आपल्याच पायानें भूमीवर जसे ढासळतात त्याप्रमाणें प्रकार घडला.

* * *

असेंब्लीच्या पुढाऱ्यांत दोनतीन प्रकार होते. कित्येकांचें मत असें कीं, रिझर्व्ह बँक म्हणजे पैसा मिळण्याच्या आधींच विकत घेतलेली लोखंडी तिजोरी होय! म्हणून हें बिल परस्पर फेटाळलें गेलें ही एक प्रकारें स्टेटसेक्रेटरींची कृपाच झाली. दुसरे कित्येक असें म्हणणारे होते कीं, अमुक एक प्रकारचें डायरेक्टर बोर्ड मिळालें तरच रिझर्व्ह बँक हवी, एरवीं बँक फायदेशीर यांत शंका नाहीं. तिसऱ्या प्रकारच्या लोकांचें म्हणणें असें कीं, बँक फायदेशीर व ती मिळाल्यानें स्टेटसेक्रेटरींचा ताबा निघून जाऊन आर्थिक कारभार इकडे हिंदुस्थानांत येणार तेव्हां प्रथम गव्हर्नर जनरलचा ताबा तिच्यावर बराचसा राहिला तरी हरकत नाहीं पण बँक अस्तित्वांत यावीच. मग डायरेक्टर बोर्ड कसलेंहि गळ्यांत पडलें तरी चालेल. अर्थात् वरील तिघांपैकीं शेवटल्या दोघांचीच काय ती निराशा झाली. आणि ' आश्चर्यवत्पश्यति कश्चिदेनम् ' अशी त्यांची स्थिति होऊन ते भांबावल्यासारखे झाले. त्यांना वाटूं लागलें कीं, आपण यापूर्वीच कांहीं तरी तडजोड कायम करून, ब्लॅकेटसाहेबांच्या संमतीनें बिलाच्या ८ व्या कलमांतील डायरेक्टर बोर्डाची योजना मंजूर करून घेतली असती म्हणजे निदान नदीच्या पैलतीरावर पाय ठेवल्यासारखें झालें असतें. पण हा घोटाळा झाल्यामुळें ब्लॅकेटसाहेब व आपण दोघेहि नदींत बुडण्याचा प्रसंग आला! वास्तविक ब्लॅकेटसाहेबांनीं धीर सोडलेला नाहीं. अजूनहि त्यांना धीर आहे. कारण वर त्यांची कारवाई सुरू आहे. आणि आपण फडणविशी सोडण्यापूर्वी रिझर्व्ह बँक स्थापून जाण्याची आकांक्षा पूर्ण करण्याची त्यांना उमेद आहे. उलट

स्टेटसेक्रटरींच्या या लुडबुडीमुळें असेंब्लींतील पुढाऱ्यांकडून सहानुभूति मिळवून बँकेचें बोर्ड आपल्या मनासारखें करून घेण्याची मनांतून त्यांना आशा वाटत आहे. या बोर्डाच्या रचनांचे भारे केवढे मोठे झाले होते हें मागें सांगितलेंच आहे. पण शेवटची योजना, किंबहुना त्यांतल्यात्यांत सर्वांत अधिक सर्वसंमत अशी योजना, पुढें आली होती ती खालीलप्रमाणें.

* * *

भागीदारीनें भांडवल उभारूं नये; तसेंच सरकारनेंहि आपल्या पदरचें भांडवल घालूं नये; तर ४ कोटी रुपयांचा स्टॉक म्हणजे एक प्रकारचे सरकारी कर्जरोखे काढावेत. ते प्रत्येक प्रांताला ४०–५० लाखांपर्यंत वांटून द्यावे. दरमाणशीं १०० रुपयांपासून पुढे कर्जरोखे घेण्याची सवलत ठेवावी. पण व्यक्तिशः कोणालाहि १०००० रुपये किंमतीपेक्षां अधिक किंमतीचे कर्जरोखे देऊं नयेत. शिवाय कोणी १०० रुपयांचा एक कर्जरोखा घेतला किंवा १०००० रुपयांचे कर्जरोखे घेतले तरी दोघांना निवडणुकींत एकेकच मत ठेवावें. कर्जरोखे धारण करणाऱ्यांचा प्रत्येक प्रांतांत एक मतदारसंघ बनवावा, त्यांनीं एका ठराविक संख्येइतके लोक आपल्यांतून अंतिम मतदार म्हणून निवडून द्यावे. आणि त्यांच्या जोडीला, त्या प्रांतातर्फे असेंब्लींत बसणारे लोकनियुक्त व सरकारनियुक्त सभासद यांनाहि मतदार गणावें. अशा रीतीनें १० डायरेक्टर निरनिराळ्या प्रांतांतून निवडून घ्यावे, आणि पूर्वी योजिलेल्या डायरेक्टर बोर्डाची संख्या वाढवावी.

* * *

अदमास असा आहे कीं, सोमवार ता. ५ रोजीं ही योजना पुढें आली असती तर मोठ्या बहुमतानें ती मंजूर झाली असती. पण स्टेटसेक्रेटरीसाहेबांनीं परवानगी काढून घेतल्यामुळें सर्वच जागच्या जागीं थबकलें. दरम्यान ८ दिवस इतर काम सुरू होतें. पण ब्लॅकेटसाहेबांचेंच काय पण त्यांच्याभोंवतीं असलेल्या कांहीं सभासदांचें लक्षहि या कामांत नव्हतें. स्टेटसेक्रेटरींनीं जसा एक चेंडू इकडे फेंकला तसाच दुसरा चेंडू लोकमताच्या आधारानें परत कसा फेकतां येईल याचेंच सर्व कारस्थान गुप्त रीतीनें सुरू झालें. आणि शेवटीं या कटांत असें ठरलें कीं, असेंब्लींत कोणी तरी ब्लॅकेटसाहेबांवर निंदाव्यंजक ठराव आणावा. आणि त्या ठरावांत रिझर्व्ह बँक बिल अवचित परत घेण्यांत आल्याबद्दल ब्लॅकेटसाहेबांना दोष द्यावा. पण ही घांट मांजराच्या गळ्यांत

बांधावयाची कोणी ? नॉमिनेटेड सभासदांकडून गोष्ट करावयाची तर कपट उघड दिसतें. स्वतंत्र पक्षाकडून करवावें तर सरकारवर निंदाव्यंजक ठराव पुढें आणण्याचें त्याचें शील नाहीं. तेंहि मायावीच दिसणार. राष्ट्रीय पक्षांत रिझर्व्ह बँकेविषयीं मोठेंसें प्रेम केव्हांच नव्हतें. आणि या पक्षाच्या पुढाऱ्यांना ही गोष्ट सुचविण्याची छाती ब्लॅकेटसाहेबांना नव्हती. स्वराज्य पक्षांतील कांहीं लोक ब्लॅकेटसाहेबांभोंवतीं नेहमीं संचार करणारे असल्यामुळें त्यांची मदत या कामीं सहज मिळाली असती. पण त्यांच्या पक्षाची संमति मिळाल्याशिवाय काय उपयोग ?

* * *

अशा रीतीनें मोठा पेंच येऊन पडला. पण दिवाण चमनलाल या एकांड्या शिलेदारानें हा पेंच सोडवून ब्लॅकेटसाहेबांवर कृपा केली. त्यांनीं हा प्रश्न स्वराज्य पक्षाच्या सभेंत मांडला. आणि मनांतून सामील असलेल्या दोघांचौघां सभासदांनीं हा उपकारी निंदाव्यंजक ठराव पुढें आणण्याला संमतीच दिली. पण बहुमतानें ती सूचना नामंजूर झाली. तेव्हां दिवाण चमनलाल यांनीं इतर एकदोघांच्या साहाय्यानें हसतमुखानें बंडखोरीचें निशाण उभारून कपटनाटकाला सुरुवात केली. वास्तविक रिझर्व्ह बँक म्हणजे श्रीमंतांच्या कारभाराचें आगर. त्यांत भांडवलवाल्या व्यापाऱ्यांचें प्रस्थ माजणार व मजूरवर्गाला एकहि डायरेक्टर देण्याचें कोणीहि कबूल केलें नव्हतें. अर्थात् दिवाण चमनलाल यांना रिझर्व्ह बँकेचें एवढें प्रेम कां यावें ? बोलावयाला उभे राहिले म्हणजे ते सरकारला टाकून बोलतात. किंबहुना चोर-दरवडेखोर म्हटल्याशिवाय एकहि भाषण त्यांचें सुनें जात नाहीं. असें असतां त्यांनीं या कटांत ब्लॅकेटसाहेबांशीं सामील व्हावें याचें सर्वांनाच आश्चर्य वाटलें. त्यांच्या ह्या बंडखोरीबद्दल स्वराज्य पक्षाच्या सभेंत अतिशय कडाक्याचा वाद झाला. श्रीनिवास अय्यंगार, जम्नादास मेथा, दोरास्वामी अय्यंगार वगैरे कांहीं सभासद वर्दळीवर आले. आणि किती राजीनामे येऊन कोसळतात असें क्षणभर वाटलें. पण स्वराज्य पक्ष आंतून पोखरत चालला आहे, त्याचा अखेर परिणाम होऊन वाईटावर चांगलें पांघरूण घालण्याकरितां दुसरे दिवशीं असें ठरलें कीं, दिसावयाला तरी दिवाण चमनलाल यांचा ठराव निंदाव्यंजक आहेच कीं नाहीं. झालें, स्वराज्य पक्षाचें व्रत तर सरकारला विरोध करण्याचें. तेव्हां ह्या ठरावाला स्वराज्य पक्षानें अनुकूल मत द्यावें. राष्ट्रीय पक्षानें यासंबंधानें बसून चर्चाच

केली नाहीं. त्यांना हें कपटनाटक उघड दिसून येत होतें, व त्यांत भाग घेण्याची त्यांची इच्छाहि नव्हती.

*　　　*　　　*

शेवटीं अशा रीतीनें सजविलेल्या ह्या ठरावाची सूचना दिवाण चमनलाल यांनीं मंगळवारीं दोनप्रहरीं असेंब्लीपुढें मांडली. बोलूनचालून निंदाव्यंजक ठराव म्हणून सरकारतर्फे त्याला विरोध व्हावयाला पाहिजे होता, पण ब्लॅकेट-साहेबांनीं प्रथम एका शब्दानेंहि त्याला विरोध केला नाहीं. आणि अध्यक्षांनींहि याला विरोध नाहीं असें म्हणून एका वाक्यांत गडबडगुंडा करून हा ठराव चार वाजतां चर्चेला घेऊं असें जाहीर केलें. या चर्चेत कित्येक सभासदांना अशी भीति वाटत होती कीं, बोलणारांना सुमार कमी म्हणून " आम्हीं अमक्या योजनेला मान्यता दिली असती, तमक्या योजनेला मान्यता दिली असती " असें बेसावधपणें उद्गार निघतील. पण पटेल यांनीं ही गोष्ट लक्षांत घेऊन कोणत्याहि योजनेचा निर्देश या चर्चेत करूं नये, फक्त कायदेशीर प्रश्नापुरतेंच बोलणारांनीं बोलावें असा निर्णय दिला. आणि त्याकरितां दिवाण चमनलाल यांना बोलतांना पदोपदीं अडविलें. पण हेंहि एक प्रकारचें नाटकच असें दिसून येत होतें. श्रीनिवास अय्यंगार यांनीं सूचनेला अनुकूल असें भाषण केलें. त्यांत लोकांना त्यांनीं बजावून सांगितलें कीं, सरकारला या कामीं मदत किंवा सहकारिता करण्याचा आमचा उद्देश आहे असें कोणी समजूं नये; फक्त निंदाव्यंजक ठराव म्हणूनच आम्ही अनुकूल आहों ! रंगास्वामी अय्यंगार व चेट्टी हें या कारस्थानांत होतेच. पण आपलें भांडवल चुकून बाहेर पडेल म्हणून ते या ठरावावर बोलले नाहींत. राष्ट्रीय पक्षांतील पं. मदन मोहन मालवीय व बॅ. जयकर यांनीं भाषणें केलीं. पैकीं पं. मदन मोहन यांनीं जॉइण्ट कमिटीची शिफारस मंजूर न केल्यामुळें हा सगळा घोटाळा झाला असें सांगून फक्त टीकात्मक असेंच भाषण केलें. जयकर यांनीं मात्र थोडीशी स्पष्टोक्ति वापरून या निंदाव्यंजक ठरावानें सरकारशीं म्हणजे हिंदुस्थान सरकारशीं एक प्रकारें सहकारिताच स्वराज्य पक्ष करीत आहे असें म्हणून स्वराज्य पक्षाचें मर्म प्रकट केलें !

पण कपटनाटकाचें खरें रूप इतर रीतीनें बाहेर पडतच होतें. कारण युरोपिअन सभासदांतर्फे मि. कोक यांनीं या ठरावाला संमति दिली. इतकेंच

नव्हे तर एखादद्दुसरा सरकारनियुक्त सभासदहि तीच गोष्ट करण्याला पुढें आला. युरोपिअन लोक व सरकारनियुक्त लोक निंदाव्यंजक ठरावाला मदत देतात यांतील वर्म लोकांच्या सहज लक्षांत येईल या भीतीनें तरी त्यांनीं भाषणें करावयाला नको होतीं. पण कपटनाटक सांगोपांग सिद्ध व्हावें एवढया-करितांच त्यांनींहि भाग घेतला. या गृहस्थांपैकीं कोणी बोलतांना स्टेटसेक्रे-टरींकडून ब्लॅकेटसाहेबांना तंबी आली अशा गोष्टीचा उल्लेख केला, तर कोणी ब्लॅकेटसाहेबांच्या राजीनाम्याचीहि गोष्ट पुढें आणली. सर्वांत कावेबाजपणाचें भाषण झालें तें स्वतः ब्लॅकेटसाहेबांचें ! बेकायदेशीरपणाच्या आक्षेपाला त्यांनीं असें उत्तर दिलें कीं, बिल मीं कायमचें मागें घेतलें आहे असें पूर्वी बोललों नाहीं व आजहि म्हणत नाहीं. पण बिलाची पुढील चर्चा तहकूब करण्याचें सरकारचें कारण इतकेंच कीं, असेंब्लीच्या बैठकीचे दिवस संपत आले व इतर कामेंहि तुंबलेलीं होतीं. रिझर्व्ह बँकेच्या वादाला हवा तेवढा वेळ मिळणार नाहीं एवढ्याकरितांच चर्चा थांबविली. मात्र हें बिल सरकार पुढें आणणार नाहीं असा त्याचा अर्थ नाहीं. विलायत सरकारच्या तंबीसंबंधानें त्यांनीं सर्वस्वीं मूग गिळले आणि उलट असें भासविलें कीं, मीं केली ही गोष्ट आपल्या जबाब-दारीनें केली. यांत स्टेटसेक्रेटरींचा कांहीं एक संबंध नाहीं. पण हे शब्द तोंडानें बोलत असतां त्यांचे अंतरंग निराळें आहे असें लोकांना दिसून येत होतें. इतकेंच नव्हे तर ही गोष्ट त्यांच्या मुखचर्येवरूनहि कोणाला सहज दिसत होती.

* * *

अशा रीतीनें हा निंदाव्यंजक ठराव म्हणजे सोल्जर लोक उशीचा मारामारी-चा खेळ खेळतात तसाच खेळ झाला. मऊ पिसें व शेवरीचा कापूस भरलेल्या उश्या घेऊन कडाक्याचें युद्ध केलें तर जखम कोणास होत नाहीं. उलट आघात-प्रत्याघात हे सुखकरच वाटतात, त्याप्रमाणें चमनलाल वगैरेनीं केलेली निंदा ही लुसलुशीत व ब्लॅकेटसाहेबांनीं केलेला आपला बचावहि लुसलुशीतच होता. अशा रीतीनें सुमारें एक तास सवा तास चर्चा होऊन शेवटीं निर्णयाची वेळ आली तेव्हां लोकपक्षाच्या बाजूनें जोराचा होकार निघाला व सरकारच्या बाजूनें इतका नाजूक नकार उच्चारण्यांत आला कीं, वसंतऋतूंतील पक्ष्यांचें गाणेंहि कमी मंजुळ असेल. पण अध्यक्ष पटेल यांनीं आणखीहि थोडी मौज केली. होकाराचा आवाज मोठा असें दिसत असतां नकाराचा आवाज

अधिक मोठा असा बहाणा करून त्यांनीं मतें मोजण्याचा आव घातला व फिरून एकदां मत प्रकट करा असें म्हणतांच पूर्वींइतक्या जोरानें होकार प्रदर्शित केला गेला. पण मतें मोजणीकरितां प्रत्यक्ष जावें लागेल तें टळावें म्हणून त्या पांच मिनिटांत हातोहात हुकूम देऊन नकारार्थी एकहि उद्गार निघूं नये अशी व्यवस्था सरकारनें केली. यामुळें पटेलसाहेबांचा डाव त्यांच्या अंगावर येऊन मोठा निंदाव्यंजक प्रसंग टळला. तेवढें घडलें असतें तर शेवटीं फार्स होऊन नाटक संपावें ही जी आपली जुनी नाटकपद्धति ती सर्वांगपूर्ण झाली असती. पण मत नोंदावयाला जाणें हें अनेकांना अनेक प्रकारें संकटच होतें. अनुकूल मत नोंदविणें हें कांहींना अवघड तर प्रतिकूल मत नोंदविणें हेंहि दुसऱ्या कित्येकांना अवघड. पण वरील युक्तीनें तो प्रसंग टळला. सरकारविरुद्ध निंदाव्यंजक ठराव इतक्या खेळीमेळीनें व खेदपूर्ण वातावरणांत आजवर दुसरा कोणताहि निकालांत निघाला नाहीं. पण निघणार कसा? अशीं नाटकें वरचेवर होऊं शकत नाहींत. असो. आतां ही सगळी कागदीं चर्चा स्टेटसेक्रेटरींकडे जाणार. तींत त्याला भांडणाचें स्वरूप दिसून येईल, पण असेंब्लींत झालेल्या या सरकारच्या निंदेच्या पोटांत सहानुभूति आहे हें त्या बिचाऱ्याला ६००० मैलांवर कसें कळणार! तें सर्व डोळ्यांनीं पाहणारालाच खरें दिसेल. वक्रोक्तीची मौज अशीच असते.

*　　*　　*

स्टेटसेक्रेटरींशीं झालेला वाद तारायंत्रावर कितीसा संपणार? अर्थात् लेखी खलित्यांनीं वाद करून शेवटीं मनासारखें करून घेण्यासाठीं लोकपक्षाच्या निंदात्मक शब्दांनीं आपल्या अंगाला झालेल्या जखमा दाखवून मिळेल ती सहानुभूति मिळवून आपला डाव साधावा असा ब्लॅकेटसाहेबांचा बेत उघड दिसतो आणि पुष्कळांची अशीच समजूत आहे कीं, या दोन अधिकाऱ्यांचा समेट झाला म्हणजे येत्या नोव्हेंबरमध्यें दिल्लीस पुन्हा एक वेळ या रिझर्व्ह बँक बिलाकरितां स्वतंत्र बैठक भरविण्यांत येईल. आणि मग ब्लॅकेटसाहेब आपल्या हस्तकांच्या मदतीनें कदाचित् कांहीं देऊन घेऊन पण एकंदरीनें रिझर्व्ह बँक बिल मंजूर करवून घेणार. इतरहि एकदोन गोष्टी महत्त्वाच्या अशा या नोव्हेंबरच्या बैठकींत निघतील असें लोक बोलतात. पण त्यांचा नामनिर्देश अजून कोठें स्पष्ट शब्दांनीं होत नाहीं. नोव्हेंबरची बैठक मात्र बहुधा निश्चित आहे असें घेऊन चालण्याला हरकत नाहीं.

# पत्र नं. ६

ता. २१-९-२७

गेल्या दोन आठवड्यांत किरकोळ काम बरेंच होतें व त्याला रिझर्व्ह बँक मागें ढकलल्यानें सवड मिळाली. गिरण्यांच्या संरक्षणाचें मूळ बिल जसें होतें तसेंच अखेर मंजूर झालें. मात्र प्रत्यक्ष मतें नोंदवूनच म्हणजे बहुमतानेंच तें पास करावें लागलें. गिरण्यांची यंत्रसामुग्री व त्याबरोबर इतर कांहीं यंत्र-सामुग्री यावरील जकात कमी करण्याचें बिलहि मंजूर झालें. फक्त छापखान्या-च्या यंत्रसामुग्रीवरील जकात सरकार अजिबात उठविणार होतें, पण तीं मात्र राहिली. हिंदुस्थानांतील टाइप फौंडरी म्हणजे कायम ठसे उठविण्याचे कारखाने यांच्यातर्फे सरकारकडे अर्ज गेला होता. शिवाय के. सी. नियोगी यांनीं बंगालतर्फे व केळकर यांनीं मुंबईतर्फे या कारखानदारांचें गाऱ्हाणें असेंब्लीपुढें मांडलें. आणि देशी कारखानदारांच्या संरक्षणार्थ आहे ती जकात कायम ठेविली पाहिजे, इतकेंच नव्हे तर ती वाढविली पाहिजे, असें प्रति-पादिलें. पण ती प्रत्यक्ष वाढविण्याचा अधिकार लोकपक्षाला नसल्यामुळें आहे तीच जुनी जकात कायम राहिली इतकेंच भाग्य समजून गप्प बसणें प्राप्त झालें. आयात कागदावरील जकातीसंबंधानें थोडा वाद झाला. त्यांत गेल्या मार्चपासून जुलैपर्यंत वसूल केलेली जादा जकात अन्यायाची म्हणून परत द्यावी असाहि मुद्दा केळकर यांनीं असेंब्लीपुढें मांडला. परंतु सरकारी कायदे-पंडितांनीं उलट सल्ला दिल्यामुळें आमची इच्छा नव्हती तरी ती वसूल करावी लागली म्हणून ती आम्हांला परत देतां येत नाहीं, तरी कागदांच्या व्यापाऱ्यांनीं कोर्टामार्फत वाटेल तर भरलेली जकात वसूल करून घ्यावी, असें सर जॉर्ज रेनी यांनीं सांगितलें.

* * *

सरकारी कर्जरोख्यांसंबंधानें एक भानगडीचें बिल सिलेक्ट कमिटीकडे जाऊन असेंब्लीपुढें आलें. या बिलांत सरकारचा डाव असा होता कीं, कर्ज-रोख्यांची मुदत संपून सरकारनें नोटीस दिल्यानंतर व्याज देण्याचें तर बंद व्हावेंच, पण कांहीं मुदतीनंतर मुद्दलहि देण्याची जबाबदारी सरकारवर राहूं नये! परंतु सिलेक्ट कमिटींत श्री. बापूजी अणे व इतर कांहीं सभासदांनीं कसून विरोध केल्यामुळें ऐनमुद्दलहि गिळंकृत करण्याचा सरकारचा डाव

फसला व फक्त व्याज मात्र नोटीस दिल्यानंतर थावें लागूं नये एवढेंच कलम मंजूर झालें. याहि बाबतींत श्री. अणे यांनीं उपसूचना पुढें आणली होती पण ती नामंजूर झाली.

* * *

याशिवाय किरकोळ अशीं अनेक बिलें बुधवारच्या बैठकींत पुढें आलीं आणि कांहीं पक्कीं व कांहीं कच्चीं निकालांत निघालीं. पण त्यासंबंधानें विस्तार फार होईल म्हणून लिहीत नाहीं. विशेष महत्त्वाचें बिल म्हणजे लोकांच्या धार्मिक भावनांना लिहून किंवा बोलून दुखविणें हा एक नवा गुन्हा निर्माण करण्यासंबंधानें होय. हें बिल 'रंगीला रसूल' खटल्याच्या वादामुळें पुढें आलें. आणि कांहीं परिस्थितींत याचा उपयोग होईल अशा समजुतीनें विशेष विरोध न होतां, असेंब्लीनें तें सिलेक्ट कमिटीकडे पाठविलें. तेथें त्याची बरीच सुधारणा झाली. तथापि दोन-तीन मुद्द्यांवर मतभेद शिल्लक राहील. लोकांचे हक्क सुरक्षित राहावेत या दृष्टीनें स्टेट्समन पत्राचे संपादक मि. आर्थर मूर, ए. रंगास्वामी अय्यंगार, केळकर, निर्मळचंद्र चंदर व असोसिएटेड प्रेसचे चालक के. सी. रॉय इतक्यांनीं मिळून एक भिन्न पत्रिका जोडली असून, इतर एक दोन मुद्द्यांवर केळकर यांनीं स्वतंत्र भिन्न मतपात्रिका जोडली होती. हें बिल ता. १६ आणि ता. १९ रोजीं असेंब्लीमध्यें चर्चेला निघालें. त्या बिलासंबंधानें कोणत्याहि पक्षांत एकमत नव्हतें. यामुळें प्रत्येक पक्षांतील कांहीं लोकांनीं दुसऱ्या कांहीं लोकांच्याविरुद्ध भाषणें केलीं व मतेंहि दिलीं.

* * *

ज्यांना वर्तमानपत्रें चालवावयाचीं नसतात त्यांना असें वाटत असतें कीं, हल्लीं जातिविषयक तंटे होतात व धर्मविषयक तंटे होतात त्यांना सर्व मूळ कारण वर्तमानपत्रांतले लेख ! पण वर्तमानपत्रांवर ही जबाबदारी सर्वस्वीं टाकणारे लोक हें ध्यानांत ठेवीत नाहींत कीं, कायमचीं वर्तमानपत्रें चालविणाऱ्या लोकांपेक्षां मौलवी, उपदेशक, व्याख्याते व मधून मधून हुल्लड करण्याची हुक्की येणारे लेखक हेच खरोखर अधिक उपद्रव करतात. असो. या विषयावर वर्तमानपत्राचा धंदा करणारे गृहस्थ व इतर यांमध्यें मतभेद व्हावा हें स्वाभाविकच होय. आणि म्हणूनच वर सांगितल्याप्रमाणें वर्तमानपत्रांशीं संबंध असणाऱ्या पांच गृहस्थांनीं भिन्न मतपात्रिका जोडल्या. असें बिल मुळांतच नको असें एका पक्षाचें म्हणणें व त्यांतीलच दुसऱ्या पक्षाचें म्हणणें असें होतें कीं, अशा

बिलाची आवश्यकता कांहीं दिवस आहे असें मानलें तरी रीतसर टीकेला प्रतिबंध न होईल किंवा अपाय न घडेल अशी योजना बिलांत असावी.

* * *

पहिल्या चर्चेंत केळकर, बेळवी, पं. ठाकूरदास भार्गव ह्यांनीं प्रतिकूल भाषणें केलीं. स्वराज्य पक्षांतील एक सभासद फरुकी यांनीं मूळ बिलाला अनुकूल असें भाषण केलें. शेरवानी तटस्थ होतें. बिलावरील चर्चा सर्व दिवस चालू होती व निरनिराळ्या २६ उपसूचनांचा विचार होऊन त्या सर्व सूचना नामंजूर करण्यांत आल्या. अध्यक्ष पटेल यांनीं त्या दिवशींच बिलाचें दुसरें व तिसरें वाचन संपविण्याच्या हेतूनें आधींच घिसाडघाई चालविली होती. परंतु साडे-पांच वाजेपर्यंत सर्व उपसूचनांचा निकाल न लागल्यामुळें बिलाची चर्चा सोमवारवर टाकण्यांत आली. सोमवार ता. १९ रोजीं बाकी राहिलेल्या उपसूचनांवर श्री. बापूजी अणे, पं. ठाकूरदास भार्गव, अमरनाथ दत्त वगैरेचीं भाषणें झालीं व मूळ बिल मंजूर झालें.

* * *

दुसरें महत्त्वाचें बिल हरविलास शारदा यांचें हिंदु समाजांतील बाल-विवाहासंबंधाचें होतें. बिलांत अशा अर्थाचें कलम आहे कीं, १२ वर्षें वयाच्या आधीं कोणत्याहि हिंदु मुलीचें झालेलें लग्न बेकायदेशीर व रद्द आहे असें समजण्यांत यावें. तथापि स्थानिक मॅजिस्ट्रेटकडे अर्ज केल्यास ११ वर्षें पूर्ण झालेल्या मुलीच्या लग्नाला त्यानें तारतम्य पाहून परवाना द्यावा. पण हें तारतम्य ठरवितांना, समाजाच्या अनिर्वाह्य अशा चालीरीती कोणत्या आहेत हें नीट पाहावें. तात्पर्य, ११ वर्षें पुरीं होण्याचे, आधीं झालेलें लग्न बेकायदा म्हणून रद्द, आणि ११ व १२ वर्षें पुरीं होण्याचे दरम्यान मॅजिस्ट्रेटच्या परवान्यानें लग्न लागलें तरच कायदेशीर अशी योजना या बिलांत आहे. अर्थात् बिलांत वाद-स्थळ म्हटलें म्हणजे, परवान्याशिवाय किंवा १२ वर्षांच्या आधीं हिंदु कुमारीचे लग्न झालें तर तें बेकायदेशीर तर खरेंच, पण रद्द समजावयाचें कीं काय व तसें रद्द झाल्यास परिणाम काय होईल हा मुद्दा महत्त्वाचा होता.

* * *

कारण एक तर १२ वर्षांच्या आंतील मुलीचें लग्न करणार आईबाप; पण विवाह रद्द होण्याची शिक्षा होणार वधूवरांना. यापेक्षां लग्न रद्द न ठरवितां लग्न लावणाऱ्या वडील माणसांवर खटला होऊन दंड किंवा इतर शिक्षाहि बिलांत

ठेवली गेली तरी पुरवेल असें कित्येक सुज्ञ लोकांस वाटत होतें. समजा कीं, लग्नाचे वेळीं मुलगी बारा वर्षांचे आंतील आहे, पण लग्नाचा बेकायदेशीरपणा पुढें बरींच वर्षें वादाला निघाला नाहीं; आणि या दंपत्याला मुलेंबाळें झालीं व नंतर हा वाद कोणी काढला, तर बिचाऱ्या संततीला मात्र बेकायदेशीर संततीचा छाप मारून घ्यावा लागणार. शिवाय वारसाईचे हक्कहि जाणार ! लग्नानंतर अमुक एका दिवसांतच विवाह बेकायदेशीर ठरवावा, पण त्यानंतर तो प्रश्न उपस्थित करतां येऊं नये, असें मुदतीचें कलमहि बिलांत नाहीं. त्याचा परिणाम सहजच असा होऊं शकेल कीं, जन्मभर नवराबायको नांदलीं, मुलांबाळांनीं मिळकत देखील वहिवाटली व नंतर त्यांचे ते हक्क हिरावून घेण्याची एखाद्याला बुद्धि सुचली तर त्यानें मुलांमुलींच्या जन्माचा दाखला हजर केला कीं लग्न बेकायदेशीर ठरलें. अर्थात् ही आपत्ति होय. म्हणून योग्य असा प्रतिबंधक उपाय कोणता योजावा ? म्हणजे लग्नच रद्द ठरवावें कीं लग्न करणारांना शिक्षा-दंड ठेवावा यासंबंधानें मतभेद होता. आणि तोहि हें बिल चर्चेला निघेल त्या वेळेला पुढें येईलच हें सांगावयासहि नको.

* * *

दुसराहि एक मुद्दा मतभेदाचा होता तो असा कीं, या बिलाचा विचार करण्याकरितां ताबडतोब सिलेक्ट कमिटी नेमण्यांत यावी किंवा लोकमत अजमाविण्याकरितां प्रथम तें बाहेर पाठवून अभिप्राय आल्यावर दिल्ली येथें सिलेक्ट कमिटी नेमावी. वास्तविक गुरुवार तारीख १९ रोजीं सर्व चर्चा झाली ती याच मुद्दयावर. आणि केळकर विरुद्ध जयकर, श्रीनिवास अय्यंगार विरुद्ध आचार्य वगैरे लोकांचें म्हणणें असें होतें कीं, हल्लींच्या मुलींच्या लग्नाची वयोमर्यादा बाराच काय पण चौदाहि ठेवली तरी ती आम्हाला मान्य आहे. पण लग्न रद्द ठरण्याचे परिणाम विचारांत घ्यावयास पाहिजेत व विशेषतः याच मुद्दयावर लोकमत अजमवावयास पाहिजे. सिलेक्ट कमिटी आज नेमली तरी बिल मंजूर होण्याकरितां पुढच्या जानेवारी-फेब्रुवारीशिवाय पुढें येत नाहीं. आणि अभिप्राय घेण्याकरितां बिल बाहेर पाठविलें तर, पुढील चार महिन्यांत या मुद्दयावर लोक काय म्हणतात तें कळेल. यावरून हें दिसेल कीं, आचार्य काय किंवा केळकर काय, हे बिलानें योजलेल्या सामाजिक सुधारणेला विरुद्ध नव्हते. तर सिलेक्ट कमिटी आज नेमावी कीं तीन महिन्यांनीं नेमावी व लग्न रद्द ठरवावें कीं काय, यापुरताच त्यांचा विरोध होता.

* * *

स्कीन कमिटीचा डॉ. मुंजे यांच्या नांवानें निघालेला ठराव तारीख १५ रोजीं चर्चेला निघाला होता. पण त्या दिवशीं त्याची चर्चा न संपल्यामुळें तो फिरून मंगळवारीं ( ता. १३ ) चर्चेला आला व मतें न नोंदतांच मंजूर झाला. मंगळवारच्या वादविवादांत भाषणें फारच थोडीं झालीं. मि. कोक यांनीं पूर्वीं कर्नल क्रॉफर्ड यांच्या भाषणांत झालेली घाण किंचित् धुऊन काढण्याचा प्रयत्न केला पण तो फुकट गेला. सर अबदुल कयूम यांनीं स्कीन कमिटीच्या रिपोर्टावर प्रत्यक्ष सही केली असतां, विरुद्ध भाषण केलें! राष्ट्रीय पक्षापैकीं हरविलास व मुनशी ईश्वर शरण यांनीं फार चांगलीं भाषणें केलीं. सर्वांत परिणामकारक असें भाषण बॅ. जिना यांचें झालें. ते स्कीन कमिटीचे एक प्रमुख सभासद होते. म्हणून अंतरगांतील खडान् खडा माहिती असल्यानें त्यांनीं कर्नल क्रॉफर्ड व सरकारी लष्करी खातें यांवर बरेंच तोंड-सुख घेतलें. या चर्चेचा सरकारवर थोडाबहुत परिणाम झाला. पण विलायतेंतील साम्राज्यसंरक्षक लष्करी खात्याच्या हातीं सर्व सत्ता असल्यामुळें, व स्टेटसेक्रेटरीचा खलिता अजून न निघाल्यामुळें, आपण इकडून काय खलिता पाठविला व रिपोर्टावर काय मत दिलें हें आर्मी सेक्रेटरी मि. यंग यांना असेंब्लीला सांगतां येईना; त्यामुळें त्यांचा सहजच कोंडमारा झाला. म्हणून मतें नोंदविण्यापर्यंत पाळीच आली नाहीं. आणि असेंब्लींतील सर्व चर्चा अभिप्रायासह विलायतेस पाठवूं असें सरकारतर्फे सांगण्यांत आलें.

* * *

हिंदु-मुसल्मानांच्या परिषदेनें निवडलेल्या कमिटीच्या दोनतीन बैठकी झाल्या. पैकीं शनिवारच्या बैठकींत असें ठरलें कीं, कमिटींत नेमलेल्या बाहेरगांवच्या लोकांना तारा करून बोलवावें व तारीख १६ पासून या कमिटीची बैठक रीतसर करून या प्रकरणाचा निकाल लावावा. दरम्यान हिंदु सभासदांच्या व मुसलमान सभासदांच्या खासगी बैठकी आपापसांत होतच आहेत. परंतु अमुक एका मुद्दयाचा निकाल अमुक प्रकारें लागेल असें कोणा-सहि नियमितपणें सांगतां येण्यासारखी परिस्थिति अजूनहि नाहीं. इकडे हिंदुस्थानांतील दंग्यांच्या बातम्या ठिकठिकाणांहून येत आहेत. नागपूर, कानपूर, सोलापूर, अहमदाबाद, रायबरेली वगैरे ठिकाणचे दंगे या परिषदे-च्या पहिल्या बैठकीनंतर व व्हाइसरॉयसाहेबांच्या उपदेशानंतर झाले ही एकच गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे अशा परिषदेचा कितपत उपयोग होणार हें

उघड दिसतें. पण करणें हातीं नाहीं हें खरें असलें तरी केल्याशिवाय राहवत नाहीं हेंच खरें आहे, आणि म्हणूनच हा प्रयत्न सुरू आहे. आज तारखेपर्यंत ऐक्य-परिषदेचें काम संपलें नाहीं.

---

# दिल्लीचीं बातमीपत्रें

## पत्र नं. १

तॉ. २-२-२८

दिल्ली येथील वरिष्ठ कायदेमंडळाची बैठक यंदा नेहमींपेक्षां दोन आठवडे उशिरा सुरू झाली. याचें कारण बहुधा सायमन कमिशनच असावें. त्यामुळें बाहेरगांवांहून येणारांचें थंडीचे दोन आठवडे कमी झाले इतकें मात्र खरें. तथापि यंदा थंडी नेहमींहून कमी असेंच सगळे म्हणतात. पावसाळा भरपूर झाला मग थंडी कां असावी ? पण इंद्राच्या दरबारच्या या गुप्त गोष्टी आहेत. आम्हाला जसें सरकारचें धोरण आगाऊ कळत नाहीं, तसेंच सरकारच्या हवाखात्याला इंद्राच्या दरबारचें धोरण कळत नाहीं! लौकिक भाषेनें बोलावयाचें तर या उत्तर-भागाकडील थंडीचें मान आरबी समुद्रांतील वातचक्रावर अवलंबून नसून हिमालयावरील व त्या पलीकडील वातचक्रावर तें अवलंबून आहे. यंदा कायदेमंडळाच्या सभागृहांत विजेच्या शेगड्या पेटल्या नाहींत. पण लोकक्षोभाच्या शेगड्या पेटल्याशिवाय मात्र खास राहात नाहींत.

* * *

कायदेमंडळाच्या प्रत्येक बैठकीच्या वेळीं कांहीं तरी एखादा मोठा विषय गाजत असतो. हरिदास प्रारंभीं जो अभंग किंवा पद लावील त्याला धरून सगळी कथा चालावयाची. आजवर केव्हां स्टील प्रोटेक्शन बिल, केव्हां हुंडणावळीचा भाव, केव्हां राउंडटेबल कॉन्फरन्स, केव्हां रिझर्व बँक बिल अशा विषयांचे अभंग लागले होते. यंदा सायमन कमिशनचा अभंग लागला आहे. या काळ्या पट्टीच्या सुरांत या बैठकीचें सगळें गाणें व्हावयाचें आहे त्याच्या जोडीला रिझर्व्ह बँक बिल आहेच. परंतु ती पट्टी सूरभरतीकरितां दाबली

जाणार आहे. घरींदारीं, सभागृहांत, सभागृहाबाहेर या विषयाशिवाय दुसरी गोष्ट नाहीं. विषय ठरलेला आहे. मतें ठरलेलीं आहेत. पण जाणारी मुंगी येणाऱ्या मुंगीजवळून गेली तर त्यांचा मुखस्पर्श झालाच पाहिजे त्याप्रमाणें कोणीहि दोन माणसें या नव्या दिल्लींत भेटलीं म्हणजे पहिला प्रश्न हा कीं, 'सायमन कमिशनचें काय होणार?'

* * *

वास्तविक पाहिलें असतां आतां कशाहि प्रकारच्या मतभेदाला जागा नाहीं. व्हाइसरॉयसाहेबांचें भाषण होईपर्यंत विचाराला थोडी तरी जागा होती. कारण बहिष्कार पुकारल्याचा बाऊ विलायतेंत फार वाटूं लागला आहे, म्हणून कमिशनच्या रचनेंत कांहीं फरक होईल असें आद्यबहिष्कारवाद्यांना वाटत होतें. त्यानंतर लॉर्ड बर्कनहेड यांनीं मधाचें बोट असें लावलें कीं, मी सर्व मुखत्यारी सर जॉन सायमन व लॉर्ड आयर्विन यांना देऊन टाकली आहे. त्यावरून कमिशनची घटना कांहीं बदलली तर बदलेल असें वाटण्यास जागा होती; परंतु ता. २ रोजीं लॉर्ड आयर्विन यांनीं आपल्या भाषणानें भ्रमाचा भोपळा फोडला ! कारण त्या भाषणांत नवें असें कांहींच सांगितलें नाहीं. जुन्याचेंच वेगळ्या भाषेनें समर्थन किंवा फार तर स्पष्टीकरण करण्याचा प्रयत्न केला. पण मात्रा तीच असल्यावर केवळ पुन्हा उगाळल्यानें तिचा गुण बदलत नाहीं किंवा तें वेगळें औषध होत नाहीं. सर जॉन सायमन हे मुंबईस उतरतांच कांहीं भाषण करतील असा एक संभव वाटत होता पण लॉर्ड आयर्विन यांच्या भाषणावरून तेंहि फारसें संभवनीय नाहीं.

* * *

तात्पर्य, ज्यांनीं बहिष्कार पूर्वींच पुकारला होता व ज्यांनीं कांहीं कारणाकरितां त्याला मुदत व अटी घातल्या होत्या ते सर्व आतां एकाच पदावर आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. अजूनहि बहिष्काराचीं दोघांचीं कारणें वेगळींच राहणार. लिबरल म्हणणार कमिशनवर हिंदी गृहस्थ नेमीत नाहींत म्हणून आमचा बहिष्कार. कॉंग्रेसवाले व प्रतिसहकारी म्हणणार स्वयंनिर्णयाची या कमिशनच्या योजनेंत कांहींच सोय नाहीं म्हणून आमचा बहिष्कार; पण मिळून बहिष्कारच. मग आतां प्रश्न उरला तो इतकाच कीं, या बहिष्काराची मर्यादा किती आंखूड किंवा किती लांब असावी. लिबरल लोकांच्या बोलण्याचा झोक असा कीं, बहिष्कार कमिशनपुरता आहे. जॉइंट पार्लमेंटरी कमिटीवर

बहिष्कार नाहीं; पण जॉइंट पार्लमेंटरी कमिटी तरी अधिक काय? तिच्यावरहि हिंदी गृहस्थ नेमण्याचा संभव नाहीं. म्हणून लिबरल पक्षाच्या लोकांनीं ही गोष्ट स्पष्ट केली पाहिजे. जॉइंट पार्लमेंटरी कमिटी कायदेमंडळाच्या कमिटीशीं सहविचार करील असें व्हाइसरॉय म्हणाले, पण तेंहि असावें तसें स्पष्ट नाहीं. असो. या प्रकरणाला नुकता कोठें प्रारंभ झाला आहे. खरें प्रकरण रंगावयाचें आहे तें पुढेंच; म्हणून तें तूर्त सोडून देऊं.

* * *

चालू आठवड्यांत असेंब्लीचें काम फक्त दोन दिवसच झालें; पैकीं एक दिवस व्हाइसरॉय यांच्या भाषणसमारंभानें खाल्ला. पण तो एक दिवस म्हणजे फक्त अर्धा तास! नित्यक्रमाचें काम झालें फक्त तारीख १ रोजीं. या दिवशीं नवे सभासद दाखल करून घेण्यांत आल्यावर प्रश्नोत्तरें झालीं. प्रश्नांच्या बाबतींत यंदा एकंदरीनें तुटवडाच दिसतो. कॉंग्रेस पक्षाचे सभासद पुष्कळ व ते प्रश्नहि पुष्कळ विचारतात. यंदा त्यांनीं नेहमींप्रमाणें प्रश्न पाठविले होते; परंतु मद्रास येथें वर्किंग कमिटीनें ठराव केल्यावर सर्वांनीं आपआपले प्रश्न परत घेतल्याचें अध्यक्षांना कळविलें. पहिल्या दिवशीं कार्यक्रमपत्रिकेवरून वादग्रस्त असें दिसण्यांत कांहींच नव्हतें. पण रिझर्व्ह बँक बिल हें येथूनतेथून सर्वच वादग्रस्त असल्यामुळें जेथें दिसत नव्हता तेथूनच वाद उत्पन्न झाला. गतवर्षीं रिझर्व्ह बँक बिल पुढें येऊन तें सिलेक्ट कमिटींतून तपासून निघून कायदेमंडळापुढें आलें व त्याचीं कांहीं कलमें मंजूरहि झालीं. पण इतक्यांत विलायतेस माशी शिंकली त्यामुळें बिलाच्या पुढील यात्रेला अपशकुन झाला! सर बेसिल ब्लॅकेट यांना विलायतेस जावें लागलें. तेथें स्टेटसेक्रेटरीशीं करारमदार करून त्यांनीं बिलाचा नवा मसुदा तयार करून तो गेल्या आठवड्यांत सरकारी गॅझेटांतून प्रसिद्ध केला. आणि ता. १ रोजीं ते हें दुसरें बिल प्रविष्ट करणार अशी जणूं साधी गोष्ट साळसूदपणानें कार्यक्रमांत लिहिली होती! पण दुसऱ्या बिलांत लोकांना नको अशा स्वरूपानें रिझर्व्ह बँक पुढें येणार असल्यामुळें हरकत घेण्याची ही संधि कायदेमंडळानें दवडली नाहीं. पहिल्या बिलाला मूठमाती दिल्याशिवाय दुसरें बिल त्याच विषयावर पुढें काय म्हणून यावें एकाच विषयावर दोन बिलें कायदेमंडळापुढें कशीं राहूं

शकतात ? म्यानांत एक सुरी आधींच आहे तेथें दुसरी कशी घालतां येईल ? पाटावर एक मनुष्य जेवयाला बसला आहे त्यावरच दुसरा कसा बसणार ?

*   *   *

या, अर्थात् कायदेशीरपणाच्या हरकती होत्या. पण " पहिलें बिल रीतसर परत घ्या, म्हणजे परत घेण्याची परवानगी मागा आणि दुसरें प्रविष्ट करा " असें म्हणण्यांत प्रतिपक्षाचा डाव होता. तो हा कीं, पहिलें बिल परत घेण्याला सर बेसिल ब्लॅकेट यांनीं परवानगी मागितली व ती सभेनें दिली नाहीं तर सगळाच कारभार आटोपला ! पहिलें बिल तसेंच शिल्लक राहतें म्हणून दुसरें बिल पुढें येण्याचें आपोआपच थांबतें ! आणि लोकपक्षाची भीति सरकारला नसती तर सर बेसिल ब्लॅकेट यांनीं हाच सरळ मार्ग स्वीकारला असता. पण 'माणूस वाघाला भितो तसा वाघहि माणसाला भितो' अशीच स्थिति यांत झाली. न जाणो या पहिल्या लढाईतच आपला पराभव झाला तर आज दोन वर्षे केलेली खटपट फुकट गेली, विलायतेची सफर फुकट गेली आणि रिझर्व्ह बँक बिल कायद्याच्या बुकांत कायमचें नोंदल्यानें फडाणिसांना अपूर्व कर्तृत्वाची कीर्ति मिळणार तीहि फुकट जावयाची !

*   *   *

सर बेसिल यांनीं या प्रसंगीं सरकारला नियमांनीं जास्तींत जास्ती जो हक्क मिळतो तो बजावण्याचा घाट घातला होता. मंडळाच्या बैठकीच्या अवधींत वाटतील तितके दिवस व त्यांतून वाटेल तो दिवस सरकारला आपल्या कामाला घेतां येतो. येऊनजाऊन नड काय ती खाजगी सभासदांच्या कामाला ! शेंकडा ९० दिवस सरकारचे व फार तर १० दिवस लोकांचे. कोणतेंहि बिल किंवा ठराव किंवा सूचना पुढें आणण्याला सरकारला मुदतीचें बंधन नाहीं. उद्यां काय मांडावयाचें तें आदल्या दिवशीं संध्याकाळपर्यंत ठरविलें तरी चालतें ! खासगी सभासदांना मात्र बिल पुढें आणण्याला दोन महिन्यांची मुदत, ठरावांना १४ दिवसांची मुदत, प्रश्नांना १० दिवसांची मुदत अशा मर्यादा आहेत. तसेंच खासगी सभासदांनीं पुढें आणलेलें बिल किंवा ठराव किंवा उपसूचना सभेच्या परवानगीशिवाय परत घेतां येत नाहींत ! पण असलें कोणतेंहि बंधन आपणांवर नाहीं अशी सरकारची समजूत व ती बहुतांशीं खरीहि असते.

*   *   *

रिझर्व्ह बँक बिलाच्या बाबतींत अशी गोष्ट झाली होती कीं, बिलाचें वाचन सुरू होऊन १-२ मुद्द्यांवर लोकपक्षाला जय मिळाला होता. अशा स्थितींत सुलतानी सत्तेनें हा विजयहि त्यांना पचूं देऊं नये असा सर बेसिल यांचा हा डाव होता. म्हणून तिडिक अर्थातच कपाळापर्यंत गेली. असें हें वादग्रस्त बिल सरकारला सुखासुखी परत घेतां आलें व त्याच्या जागीं वेगळ्या स्वरूपाचें दुसरें प्रविष्ट करतां आलें म्हणजे सरकारच्या पोरखेळाला सीमाच राहिली नाहीं! या गोष्टीची चीड येऊन विरोध करण्याचें ठरलें होतें. त्याप्रमाणें राष्ट्रीय पक्षाचे सेक्रेटरी श्री. बापूजी अणे यांनीं दूरदृष्टीनें अध्यक्षांना नोटीसहि देऊन ठेवली होती. म्हणूनच अध्यक्षांनीं ती तक्रार चर्चेला घेतली आणि तीवर उभयपक्षीं बराच वाद झाला. अखेर अध्यक्ष काय निकाल देतात याकडे सर्वांचें लक्ष उत्सुकतेनें लागलें होतें. आणि त्यांनीं निकाल दिला तो लोकपक्षाला अनुकूल असाच दिल्यानें या मुद्द्यापुरती तरी बाजू पुष्कळच सावरली गेली.

* * *

पटेल यांनीं आपल्या मताचा सुगावा कुणालाच आधीं लागूं दिला नाहीं; आणि त्यांनीं आपला निकाल घरून काळजीपूर्वक लिहून आणून वाचला. तो एखाद्या न्यायकोर्टाच्या निकालासारखा समर्पक होता. या निकालांत त्यांनीं या बिलाचा जुना इतिहास, पार्लमेंटरी दाखला, स्वतः सर बेसिल यांचें पूर्वींचें भाषण, कामकाजाच्या नियमांचें मर्म व कायदेमंडळाची इभ्रत या सर्व गोष्टी लक्षांत घेऊन सर बेसिल यांच्या अरेरावीचा तीव्र निषेध केला. अर्थात् सरकारी पक्ष अगदीं चकित झाला; आणि त्यांच्यांतील अनेकांनीं 'अध्यक्षांनीं मोठा घात केला' असें म्हणून त्यांना आपापसांत शिव्याहि दिल्या असतील. पण सरळ दृष्टीनें पाहणारा झालें हेंच बरोबर झालें असेंच म्हणेल.

## पत्र नं. २

ता. १०-२-१९२८

गेल्या आठवड्यांत हवेंत एकदम फार चलबिचल झाली. मधून मधून पाऊसहि पडला. थंडी विशेष वाढली नाहीं तरी हवेची नेहमींची प्रसन्नता नाहींशी झाली. "चंद्राला पडे खळें आणि शेतकऱ्याच्या खळ्याचें वाटोळें" या म्हणीचा अनुभव आला. चार दिवसांपूर्वीं सकाळीं आठ वाजतांच आभाळ

एकदम भरून आलें, ढग गडगडूं लागले, विजा चमकूं लागल्या, आणि पाऊस सुरू झाला. गारांचीहि वृष्टि इतकी झाली कीं, बंगल्यासमोरील हिरव्या गवताचें मैदान पांढऱ्या फुलांनीं एकदम फुलून गेलें. एक भाविक गृहस्थ म्हणाले, 'हा अकालीं पर्जन्य म्हणजे ईश्वराचा सायमन कमिशनवरील कोप दिव्य मार्गांनीं प्रकट होत आहे!' कमिशनवरील कोप ठीक आहे. पण बिचाऱ्या शेतकऱ्यांनीं काय अपराध केला? पण पंचांगांत नसलेली ही सतग्रही त्याला बाधली खास! कारण या पावसानें पिकांचें नुकसान झाल्याच्या बातम्या चोहोंकडून येत आहेत.

* * *

सोमवारीं रिझर्व्ह बँक बिलाचें काय होणार याचा संशय फिटून, जुन्या बिलाचीच चर्चा सरकार पुढें चालू ठेवणार असें कळलें. त्याप्रमाणें ती सुरूहि झाली. पहिल्या कलमांत कांहीं विशेष वादग्रस्त नव्हतें. पण एकाऐवजीं दोन डेप्युटी गव्हर्नर नेमण्याच्या सूचनेवर लोकपक्षाचा पराभव झाला. तसेंच नारायणराव जोशी यांनीं डायरेक्टराची एक जागा मजूरसंघांना द्यावी अशी सूचना आणली होती तीहि नामंजूर झाली. मंगळवार सुटीचा म्हणून गेला आणि खरें वादाचें तोंड बुधवारीं लागलें. कारण आठवें कलम बँकेच्या डायरेक्टर बोर्डाच्या घटनेचें होतें. आणि त्यावर वरिष्ठ व प्रांतिक कायदे कौन्सिलांनीं तीन तीन डायरेक्टर्स निवडून द्यावेत अशी सिलेक्ट कमिटीची सूचना होती. या मुद्द्यावर सिलेक्ट कमिटींत ब्लॅकेटसाहेबांचा पराभव झाला होता. पण बँकेचें भांडवल व बोर्डाची रचना या गोष्टी हव्या तशा घातलेलें एक नवीन बिल त्यांनीं तयार करून पुढें आणण्याचा बेत केला होता तो फसला; म्हणून उभयपक्षीं याच मुद्द्यावर सामना होणार होता. पण दुर्दैवानें काँग्रेसच्या वर्किंग कमिटीनें असहकारितेचा हुकूम फर्मांविल्यामुळें स्वराज्य पक्षाचे लोक सभेला हजर राहत नाहींसे झाले. यामुळें मुख्य दोन पोटकलमांवर लोकपक्षाचा पराभव झाला. संख्याबल कमी पडल्यानें कांहीं चाललें नाहीं. पण नशिबाला गमतीचा खेळ करावयाचा होता म्हणून त्यानें या सर्वांचा वचपा अखेर काढून दिला.

* * *

डायरेक्टर बोर्डावर वरिष्ठ कायदेमंडळाचे तीन व प्रांतिक कायदेमंडळाचे तीन मिळून सहा डायरेक्टर्स असावेत असें मूळ कलम. पण ब्लॅकेटसाहेबांनीं त्याविरुद्ध उपसूचना देऊन सहाहि सभासद काढून टाकण्याचा घाट घातला

व तो साधला. एकदोन मतांनीं या दोनहि कलमांवर लोकपक्षाचा पराभव झाला. नंतर अशा रीतीनें सहा डायरेक्टर गाळलेल्या बोर्डाचें कलम मताला घालण्यांत आलें. तेव्हां कर्मधर्मसंयोगानें लोकपक्षाला ५० मतें व सरकारपक्षाला ४९ मतें पडून सगळें कलमच्या कलमच नामंजूर झालें! पण हें कलमच इतकें महत्त्वाचें होतें कीं, तें नामंजूर झाल्यानें सगळें बिलच नामंजूर झाल्यासारखें होतें. कारण डायरेक्टर बोर्ड नाहीं तर बँक चालविणार कोण? अर्थात् हें झाल्याबरोबर ब्लॅकेटसाहेबांनीं उठून चेहरा लाल करून सांगितलें कीं, "एकंदरीनें या कायदेमंडळाला रिझर्व्ह बँकच नको असा अर्थ मी समजतों. म्हणून बिलाचें पुढें काय करावयाचें याचा विचार करण्याला मला वेळ पाहिजे." अशा रीतीनें या दिवसाचें काम संपलें. पूर्वी अध्यक्ष पटेल यांच्या प्रतिकूल निकालानें आणि या दिवशीं प्रतिकूल बहुमतानें ब्लॅकेटसाहेबांना दगा दिला. शेवटचा हा प्रकार मात्र इतका अकल्पित घडला कीं, तो घडेपर्यंत ह्याचा परिणाम काय होणार याची कोणास कल्पनाहि आली नाहीं. पूर्वीच्या पराभवानें लोकपक्ष हताश झालेला होता आणि कसें तरी ओढत काम चाललेलें होतें. हें बिल येथें मंजूर होणार व त्यांत पदोपदीं बिघाड झाला तरी कौन्सिल ऑफ स्टेटकडे पाठवून तें हवें तसें सुधारून आणून, ब्लॅकेटसाहेब पुनः असेंब्लीच्या बोकांडी बसविणार अशी जवळ जवळ सर्वांची खात्री होऊन राहिली असल्यामुळें, स्प्रिंग ढिली झालेला फोनोग्राफ जसा वाजतो त्याप्रमाणेंच या बिलावरील चर्चेचें काम सुरू होतें. पण हें आठवें कलम सबंधच्या सबंध नामंजूर झाल्यानें एकदम ट्रॅन्सफर सीनचा देखावा दिसला. नदीवरील पुलाच्या कमानीच्या चावीचा दगड कोसळून पाडावा अशी बिलाची स्थिति झाली. इकडचीं कलमें इकडे व तिकडचीं कलमें तिकडे पडलीं व तीं जोडण्याला सांधा शिल्लक राहिला नाहीं!

* * *

आठव्या कलमांतील बोर्ड नामंजूर झाल्यानें पुढें पदोपदीं या बोर्डाचा उल्लेख येणार यामुळें तिकडून अडचण. जुन्या बिलाची असेंब्लीपुढें अर्धवट चर्चा झालेली म्हणून नवें बिल या बैठकींत आणतां येत नाहीं. जुन्या बिलाची चर्चा पुढें चालू ठेवावी तर ती होऊं शकत नाहीं. कौन्सिल ऑफ स्टेटमध्यें स्वतंत्र बिल पास करून इकडे आणावें तर एकाच बैठकींत एकाच विषयावर दोन बिलें येऊं शकत नाहींत. एकीकडून स्टेटसेक्रेटरीशीं करारमदार केल्या-

मुळें लोकपक्षाशीं समेटहि करतां येत नाहीं. आणि लोकांशीं पडतें घेऊन बिल पार पाडावें म्हटलें तर तिकडे स्टेटसेक्रेटरी हातांत दंडा घेऊन बसलेला! अशा रीतीनें ब्लॅकेटसाहेबांचा चोहोंकडून कोंडमारा झाला. या खिंडमाऱ्याची कल्पना असेंब्लींतील कांहीं लोकांना होती. परंतु ८ वें कलम नामंजूर झाल्याचा निकाल अध्यक्षांनीं सांगितल्याबरोबर जो टाळ्यांचा गडगडाट झाला व जें पावसाच्या सरीसारखें हसें कोसळलें त्याबरोबर एका क्षणांत या सर्व भानगडीचा प्रकाश इतर सभासदांचे मनावरहि एकदम पडला. या रिझर्व्ह बँक बिलांत महत्त्वाचीं अशीं दुसरीं अनेक कलमें आहेत. तीं बँकेच्या व्यवहाराचीं असल्यामुळें सामान्य लोकांना तीं कळण्यासारखीं नाहींत. म्हणून ब्लॅकेटसाहेबांना विरोध न होतां तीं सहज पार पडलींहि असतीं. पण डायरेक्टर-बोर्डांत कायदेमंडळांना अधिकार द्यावयाचा कीं नाहीं यावर पहिल्या दिवसापासून रण माजलें होतें तें परवांपर्यंत पुरलें व त्या रणधुमाळींतच बिलाचा अंत झाला. सरकारचे कायदेपंडित यांतूनहि आणखी कांहीं शक्कल काढतात कीं काय पाहावें! पण तूर्त तरी या बिलाचें पेकाट मोडलें असेंच म्हणणें प्राप्त आहे.

* * *

पहिल्या दोन दिवसांत लोकपक्षाचा पराभव झाला म्हणून सांगितलें. त्याचें कारण असेंब्लींतील कॉंग्रेस पार्टींतील गोंधळ हें होय. कमिशनवरील बहिष्काराच्या त्वेषांत अर्धबाडग्या असहकारितेच्या जुन्या वादानें पुनः उचल खाल्ली आणि मद्रास कॉंग्रेसमध्यें कायदेमंडळाच्या कामासंबंधानें नसत्या उपद्व्यापाचा ठराव करण्यांत आला. त्याचा परिणाम असेंब्लींत आजवर बराच भोंवला व पुढेंहि भोंवेल असा रंग दिसतो. "देवळांत भवानी आणि गांवभर नायटे" अशी स्थिति झाली आहे! गाडी गांवांत वळणा-वळणाच्या रस्त्यांतून चालणार आणि घरांत बसून घरधनी म्हणणार कीं, "माझ्या हातीं घोड्याचा लगाम ठेवीन, कारण मालक मी आहें!" कॉंग्रेसच्या वर्किंग कमिटीला मनांतून कौन्सिलाचें काम करावयाचें नाहीं आणि कॉंग्रेसचें नांव घेणारे लोक तर निरनिराळ्या कायदेमंडळांतून काम करूं इच्छितात. ही विलक्षण जोडी जमल्यामुळें अनेक गंमती पाहावयास सांपडतात. कांहीं लोकांना वर्किंग कमिटीच्या या ठरावाचें निमित्त पुरून ते दिल्लीला आलेच नाहींत. दिल्लीला आले त्यांतील कांहीं सभागृहांत हजर राहात नाहींत. हजर राहणारे प्रश्न पाठवीत नाहींत. पाठविले तरी विचारीत नाहींत. ठराव पाठवीत नाहींत व

पाठविले तरी मांडीत नाहींत. उपसूचना धाडीत नाहींत, व धाडल्या तरी पुढें आणीत नाहींत. सरकारला विरोध करण्याची इच्छा म्हणून सभागृहांत यावेंसें त्यांना वाटतें; पण वर्किंग कमिटीची आठवण होऊन तोंडाला कुलूप पडतें. हजर असले तरी कोणी मत देतो तर कोणी वर्किंग कमिटीवर रागावून गॅलरींत जाऊन बसतो व आपल्याच लोकांचा पराभव होतों हें पाहत असतां खालीं उतरून मत देत नाहीं. कोणी आपल्या उपसूचना लोकांकडून मांडतात. कारण स्वतःला उपसूचना पाठविण्याची परवानगी नाहीं. पण या लोकांनीं त्या मांडल्या म्हणजे मग हे त्यावर बोलतात. कारण त्यावर बोलणें हें सरकारला विरोध करणें होय असा शास्त्रार्थ निघूं शकतो. तात्पर्य, वर्किंग कमिटीनें उंटावरून शेळया हाकण्याचें काम चालविलें आहे.

* * *

सायमन कमिशनचा प्रवेश नव्या दिल्लींत चार तारखेला झाला. गांवांत हरताळ होता. पण सरकारनें त्यांना 'नवी दिल्ली' स्टेशनावर उतरून घेतलें; आणि त्यांच्या स्वागतार्थ कांहीं मंडळी सजवून नेली होती. व्हाइसरॉसाहेबांशीं दोन दिवस खलबत करून त्यांनीं जाहीरनामा काढला तो आतां प्रसिद्ध झालाच आहे. त्यांच्या राहण्याची सोय रायसिनांतील मोठ्या हॉटेलांत केली आहे. लाला लजपतराय यांच्या खोलीला लागून सायमनसाहेबांना खोली दिली असून जयकर यांच्या खोलीजवळ लॉर्ड बर्नहॅम यांची खोली आहे. अशा रीतीनें एका अर्थानें कमिशननें लोकपक्षाच्या अंतरंगांत प्रवेश केला असला तरी खऱ्या अर्थानें त्यांचा प्रवेश इतका दूर आहे कीं, लजपतराय-जयकर यांचीं व या लोकांचीं एरवीं जीं रोज भेटी-जेवणीं-खाणीं झालीं असतीं तीं आतां होत नाहींत. भाषण दूरच पण उलट एकमेकांना टाळून जाण्याची बुद्धि होते. असेंब्लींतील राष्ट्रीय पक्षानें सभा भरवून ठरावहि करून टाकला कीं, कमिशन दिल्लींत असेपर्यंत, कोणाहि सरकारी अधिकाऱ्याच्या घरीं चहापाण्याला जावयाचें नाहीं व कोणी खासगी गृहस्थानें बोलावलें तरी सायमन कमिशनचा त्यांत वास येत असेल तर तेंहि स्वीकारावयाचें नाहीं. असहकारितेचे अध्वर्यु पं. मोतिलाल नेहरू हे आतां आले म्हणजे मात्र स्वराज्य पक्षांत काय होईल तें पाहावें !

## पत्र नं. ३

ता. १७।२।२८

या आठवड्यांत प्रारंभीं रिझर्व्ह बँक बिलाचा विषय व आठवड्याच्या शेवटीं सायमन कमिशनचा विषय असे आल्यानें या आठवड्याला सहजच विशेष महत्त्व आलें. बँक बिल परत घेण्यांत येणार हें जवळ जवळ कळूनच चुकलें होतें; पण प्रत्यक्ष तोंडानें उच्चार व्हावयाचा तो शुक्रवारीं झाला. बिल परत घेतलें असेच स्पष्ट शब्द ब्लॅकेटसाहेबांनीं उच्चारले नाहींत, पण बिन-मुदतीनें तें लांबणीवर टाकलें असें सांगितलें. त्याचा अर्थ तें या बैठकींत येत नाहीं व ब्लॅकेटसाहेब फडणवीस आहेत तोंपर्यंत येत नाहीं. मिळून येत नाहीं असेंच घ्यावयाचें. नवा फडणवीस येईल तो ठिकठिकाणीं गळ टाकून पाण्याचा ठाव घेईल व मग काय करील तें पुढेंच आहे. कौन्सिलाचे नियम-उपनियम यांचे खंदक व चोहोंकडचे मारे यामुळें बिचारें बिल गतप्राण झालें!

* * *

मध्यंतरीं अशी बोलवा निघाली होती कीं, व्हाइसरॉयसाहेबांनीं चालू बैठक खलास करून, दोन दिवसांनीं नवी बैठक सुरू केल्यास नवें बिल आणतां येईल, म्हणून ब्लॅकेटसाहेबांनीं तशी विनंति व्हाइसरॉय-साहेबांनीं करून पाहिली; परंतु त्यांनीं ही जबाबदारी घेण्याचें नाकारलें. कसेंहि असो. या सुलतानी संजीवनी मंत्राचा जप न झाल्यानें शुक्रवारीं ब्लॅकेटसाहेबांच्या भाषणानंतर उभयपक्षांच्या सभासदांनीं बिलाचें और्ध्व-देहिक मंत्र स्वरावर म्हटले व म्हणतांना, समोरासमोरचे वेद-पद-पाठी ब्राह्मण पदें तोडतांना एकमेकांकडे हात करतात, त्याप्रमाणें हात करून हा घात तुम्हीं केला असें म्हणून एकमेकांकडे जबाबदारी लोटण्याचे प्रयत्न झाले! एवढें बिल मंजूर करून घेऊन "प्रवर्ततां प्रकृतिहिताय पार्थिवः" असें भरतवाक्य म्हणून ब्लॅकेटसाहेबांना विलायतेस जावयाचें होतें तें मात्र साधलें नाहीं.

* * *

चालू आठवड्यांत खाणींतील कामगारांच्या कामाच्या तासासंबंधींचें बिल सिलेक्ट कमिटीकडे पाठविण्यांत आलें. हिंदु कुटुंबांतील लोकांना जमिनीचें वाटप करावयाचें तर तें लेखी व रजिस्टर्ड पाहिजे तरच त्याचा पुरावा ग्राह्य होईल व अशा अर्थाचें बिल कौन्सिल ऑफ स्टेटकडून मंजूर करून असेंब्लींत

आणण्यांत आलें होतें. त्यावर वकील मंडळींनीं बरीच टीका केल्यामुळें त्याची चर्चा थांबविण्यांत आली. हें बिल मंजूर झाल्यास बाहेरगांवच्या लोकांना त्रास होईल व विनाकारण स्टॅंप रजिस्ट्रेशनचा खर्च करावा लागेल. सरकारनें ही एक उत्पन्नवाढीची बाब काढली आहे! पुन्हा तें चर्चेला निघेल तेव्हां काय होतें पाहावें. बिलाच्या विचाराला वेळ द्यावा या म्हणण्याला कांहीं युरोपियन व मुसलमान सभासदांनींहि दुजोरा दिला; पण कॉंग्रेस पक्षाचे लोक हजर नाहींत यामुळें ती गोष्ट साधली नाहीं!

* * *

ता. ९ रोजीं खासगी बिलांचा दिवस होता. त्या दिवशीं महंमद याकूब यांचें वारसाईसंबंधानें बिल सिलेक्ट कमिटीकडे पाठविण्यांत आलें. परदेशी मालावर जरूर त्या खुणा असण्यासंबंधाचें नियोगी यांचें बिल लोकमत मिळविण्याकरितां बाहेर पाठविण्यांत आलें. तसेंच हिंदुस्थानच्या किनाऱ्यानें वाहतूक करणाऱ्या आगबोटींसंबंधाचें त्यांचेंच बिल मताकरितां पाठविण्यांत आलें. हल्लीं अनेक खासगी लॉ रिपोर्ट्स प्रसिद्ध होतात त्यांना आळा घालण्याविषयीं महंमद याकूब यांनीं बिल आणलें होतें; त्यावर गौर, जयकर, केळकर यांनीं बरीच टीका केली व नंतर तेंहि लोकमत आजमवण्याकरितां धाडण्यांत आलें. सर हरिसिंग गौर यांचीं दोन बिलें फौजदारी कायद्यासंबंधाचीं होतीं, पण त्यांना भरपूर पाठबळ मिळालें नाहीं. यानंतर गौर यांचीं चार-पांच बिलें, केळकर यांचीं तीन बिलें, हाजी यांचीं दोन बिलें, नारायणराव जोशी यांचें एक बिल अशीं १०-११ बिलें असेंब्लींत प्रविष्ट करण्यांत आलीं व त्या दिवसाचें काम संपलें. कॉंग्रेस पक्षाच्या लोकांनीं कांहीं बिलें पाठविलीं होतीं व तींहि प्रविष्ट झालीं असतीं; परंतु तसें करण्याला शास्त्राधार नव्हता म्हणून ते हजर राहिले नाहींत व बिलांचा प्रवेश खुंटून राहिला!

* * *

बुधवारीं हिंदुस्थानांतील नागरिक सैन्यासंबंधाचीं दोन बिलें लष्करखात्याचे सेक्रेटरी मि. यंग यांनीं पुढें आणलीं व तीं ताबडतोब विचारांत घ्यावीं असें त्यांनीं सुचविलें. परंतु डॉ. मुंजे, नियोगी, कुंझरू यांनीं त्या बिलांतील दोष दाखविल्यामुळें बिलें सिलेक्ट कमिटीकडे पाठवून चर्चा करण्याला सरकारनें संमति दिली. या बिलांचा हेतु टेरिटोरिअल सैन्यांत शिरणाऱ्या स्वयंसेवकांच्या शिक्षणाची हल्लींहून अधिक व्यवस्था करण्याचा आहे. या दृष्टीनें बिलांतील

आणण्यांत आलें होतें. त्यावर वकील मंडळींनीं बरीच टीका केल्यामुळें त्याची चर्चा थांबविण्यांत आली. हें बिल मंजूर झाल्यास बाहेरगांवच्या लोकांना त्रास होईल व विनाकारण स्टँप रजिस्ट्रेशनचा खर्च करावा लागेल. सरकारनें ही एक उत्पन्नवाढीची बाब काढली आहे! पुन्हा तें चर्चेला निघेल तेव्हां काय होतें पाहावें. बिलाच्या विचाराला वेळ द्यावा या म्हणण्याला कांहीं युरोपियन व मुसलमान सभासदांनींहि दुजोरा दिला; पण कॉंग्रेस पक्षाचे लोक हजर नाहींत यामुळें ती गोष्ट साधली नाहीं!

* * *

ता. ९ रोजीं खासगी बिलांचा दिवस होता. त्या दिवशीं महंमद याकूब यांचें वारसाईसंबंधानें बिल सिलेक्ट कमिटीकडे पाठविण्यांत आलें. परदेशी मालावर जरूर त्या खुणा असण्यासंबंधाचें नियोगी यांचें बिल लोकमत मिळविण्याकरितां बाहेर पाठविण्यांत आलें. तसेंच हिंदुस्थानच्या किनाऱ्यानें वाहतूक करणाऱ्या आगबोटींसंबंधाचें त्यांचेंच बिल मताकरितां पाठविण्यांत आलें. हल्लीं अनेक खासगी लॉ रिपोर्ट्स प्रसिद्ध होतात त्यांना आळा घालण्याविषयीं महंमद याकूब यांनीं बिल आणलें होतें; त्यावर गौर, जयकर, केळकर यांनीं बरीच टीका केली व नंतर तेंहि लोकमत आजमवण्याकरितां धाडण्यांत आलें. सर हरिसिंग गौर यांचीं दोन बिलें फौजदारी कायद्यासंबंधाचीं होतीं, पण त्यांना भरपूर पाठबळ मिळालें नाहीं. यानंतर गौर यांचीं चार-पांच बिलें, केळकर यांचीं तीन बिलें, हाजी यांचीं दोन बिलें, नारायणराव जोशी यांचें एक बिल अशीं १०-११ बिलें असेंब्लींत प्रविष्ट करण्यांत आलीं व त्या दिवसाचें काम संपलें. कॉंग्रेस पक्षाच्या लोकांनीं कांहीं बिलें पाठविलीं होतीं व तींहि प्रविष्ट झालीं असतीं; परंतु तसें कारण्याला शास्त्राधार नव्हता म्हणून ते हजर राहिले नाहींत व बिलांचा प्रवेश खुंटून राहिला!

* * *

बुधवारीं हिंदुस्थानांतील नागरिक सैन्यासंबंधाचीं दोन बिलें लष्करखात्याचे सेक्रेटरी मि. यंग यांनीं पुढें आणलीं व तीं तावडतोब विचारांत घ्यावीं असें त्यांनीं सुचविलें. परंतु डॉ. मुंजे, नियोगी, कुंझरू यांनीं त्या बिलांतील दोष दाखविल्यामुळें बिलें सिलेक्ट कमिटीकडे पाठवून चर्चा करण्याला सरकारनें संमति दिली. या बिलांचा हेतु टेरिटोरिअल सैन्यांत शिरणाऱ्या स्वयंसेवकांच्या शिक्षणाची हल्लींहून अधिक व्यवस्था करण्याचा आहे. या दृष्टीनें बिलांतील

बराच भाग ग्राह्य दिसतो. विशेषतः मोठमोठ्या शहरांतून लष्करी शिक्षण देण्याची सोय करण्याची जी सूचना या बिलांत आहे ती लोकांना पटण्यासारखी आहे. हीं बिलें मंजूर झालीं तरी मूळ बजावणी सरकारच्याच हातीं असल्यानें प्रत्यक्ष किती लोकांच्या शिक्षणाची सोय होणार, स्वयंसेवकांचें सैन्य किती वाढविलें जाणार व त्यावर खर्च किती होणार हें आजच सांगतां येत नाहीं. पण थोडीबहुत प्रगति होईल असा अंदाज दिसतो.

* * *

गुरुवारीं सायमन कमिशनसंबंधानें अनेक ठराव व उपसूचना आल्या होत्या त्या चर्चेला निघाल्या. दोन-तीन ठराव व पांच-सहा उपसूचना होत्या; पण त्यांत खरे पक्ष असे दोनच होते. एक असें म्हणणारा कीं, कमिशनची योजना ठीक झाली आहे, त्या अर्थी लोकांनीं त्याच्याशीं सहकारिता करावी. उलट पक्षाचें म्हणणें असें कीं, कमिशन असावें तसें नाहीं म्हणून त्याच्याशीं लोकांनीं सहकारिता करूं नये. हे सगळे ठराव व सगळ्या उपसूचना रीतसर पुढें मांडावयाच्या तर दिवस पुरणार नाहीं. म्हणून अध्यक्ष पटेल यांनीं हें सूचना-उपसूचनांचें जंगल कांहीं सभासदांच्या स्वतःच्या संमतीनें व कांहीं आपला अधिकार चालवून बरेंचसें तोडून मोकळें केलें आणि एका बाजूला लाला लजपतराय यांचा ठराव व दुसऱ्या बाजूला सर झुल्फिकार अल्लीखान यांची उपसूचना असे दोनच गडी उभे करून रान तोडून मोकळें केलेल्या या मैदानांत त्यांची कुस्ती लावून दिली. एका दिवसाच्या वादांत जयकर, जिना, सर डार्सी लिंडसे, रा. ब. राजा, झुल्फिकार अल्लीखान, शहा नवाज, महंमद नवाजखान व होम मेंबर क्रेरार यांचीं भाषणें झालीं व संध्याकाळचे आंत वादविवाद संपून मतें घेऊन सोक्षमोक्ष करावा अशी लोकपक्षाची इच्छा असल्या कारणानें पक्षानिहाय मुख्य पुढाऱ्यांशिवाय इतरांनीं बोलूं नये असे हुकूम काढण्यांत आले होते. पण सुमारें चार वाजतां अकल्पित रीतीनें वाद थांबून तो शनिवारावर पुढें टाकण्यांत आला.

* * *

त्याचें कारण असें कीं, नॅशनॅलिस्ट पक्षांतील कराचीचे एक सभासद शेठ हरचंदराय विशनदास हे गुरुवारीं सकाळीं दिल्लीस आल्यापासून एकदम अतिशय आजारी पडले व ते वारल्याची बातमी चार वाजतां सभेंत येऊन थडकली. हरचंदराय यांना मुद्दाम तार करून कराचीहून बोलावण्यांत आलें

होतें व ते आजारी असतांहि कर्तव्यनिष्ठेनें इतका दूरचा प्रवास करून दाखल झाले. ते आजारी म्हणून चारपायीवर घालून सभागृहांत आणण्याची व्यवस्थाहि झाली होती. पण दुर्दैवानें चारपायीवरून सभागृहाकडे न येतां चार इष्टमित्रांच्या खांद्यांवरून त्यांनीं यमुनातीरावरील स्मशानाकडे जावें असा योग होता, त्याला काय कोण करणार! त्यांच्या मृत्यूची वार्ता आल्यामुळें असेंब्ली-चें काम होतें तेथेंच थांबवावें लागलें. सायमन कमिशनवरील ठरावाकरितां सर्वच पक्षांनीं आपले लोक परगांवांहून तारा करून बोलाविले होते, त्याच-प्रमाणें नॅशनॅलिस्ट पक्षानेंहि हरचंदराय यांना बोलाविलें. इतके आजारी असतांहि ते आले व शेवटीं घर सोडून दूर दिल्लीस त्यांचा अंत झाला याबद्दल सर्वांनाच त्याचा फार खेद वाटला. असो. ठरावावरील सामना चुरशीचा होणार यांत शंका नाहीं. त्यांत लोकपक्षाचा जय होईल पण तो फार तर दोनतीन मतांनीं होईल असा अंदाज आहे.

* * *

सायमनसाहेबांचा मुक्काम आतां येथून हललाच म्हणावयाचा. ठरल्याप्रमाणें लोकपक्षांतील कोणीहि त्यांची भेट घेतली नाहीं. आणि मेजवान्यांवर व चहापार्ट्यांवरहि बहिष्कार पडल्यामुळें चुकून गांठ पडावयाची तीहि पडली नाहीं. असेंब्लीचें काम चालू असतां सायमनसाहेब सभागृहांत केव्हांहि आले नाहींत. इतर एकदोन सभासद क्वचित् एखादे वेळीं येऊन बसून निघून जात. यामुळें ती गोष्ट कोणाच्या विशेष लक्षांतहि आली नाहीं. कमि-शनचे सभासद कौन्सिल ऑफ स्टेटमध्यें काम चालू असतां मधूनमधून हजर होते, एवढेंच नव्हे तर त्या सभेंतील पार्लमेंटरी पार्टीनें सायमनसाहेबांची प्रत्यक्ष मुलाखत घेतली व त्यांना कांहीं सूचनाहि केल्या; पण सायमनसाहे-बांनीं सर शंकरन् नायर यांना पत्र लिहून त्या सूचना अमान्य असल्याचें कळविलें! अशा रीतीनें तटास बाहेरून कोणी खिंडार पाडून वाट करण्याचा प्रयत्न केला तरी सायमनसाहेच आपल्याच हातानें ती बुजवीत आहेत; यामुळें यापुढें कशांतहि कोणताहि फेरबदल होणार नाहीं व कमिशनपुढें जाणारा जो ठराविक वर्ग आहे त्याचे तेवढेच लोक जातील असें म्हणण्यास हरकत नाहीं.

* * *

कमिशन येऊन निदान त्याला अनुकूल असलेल्या लोकांचीहि भेट खुद्द असेंब्लीच्या सभागृहांत न झाली तर अगदींच वावगें दिसेल म्हणून सुटीच्या दिवशीं तरी त्यांना अध्यक्षांनीं सभागृहांत बोलवावें अशी लेखी सूचना युरोपियन सभासदांच्या पुढाऱ्यांनीं पटेल यांजकडे पाठविली व पटेल यांनीं तीहि मान्य केली नाहीं असें दिसतें. वास्तविक सुटीच्या वेळीं सभागृह मोकळेंच असतें, त्यांत कोणीहि जाऊन बसावें. पण अध्यक्षांनीं ही सूचना अमान्य केली. ५-२५ लोक जमले तरी त्यांत खरें स्वारस्य कांहीं राहणार नाहीं हें उघडच आहे. गुरुवारच्या वादविवादांत सरकार पक्षाचा जय झाला असता तर असेंब्लीनें कमिशनला मान्यता दिली ही गोष्ट कायदेशीर व निश्चित समजून पटेल यांना त्यांनीं सभेंत बोलावणें प्राप्त झालें असतें. पण कमिशनचे लोक सभागृहांत येण्याचें समजल्यावर लोकपक्षाचे सभासद तेथें हजर राहतात कशाला ? व तसें झालें म्हणजे तात्पर्य तेंच. असो; अशा रीतीनें कमिशन व लोकपक्ष यांचा बेबनाव दिल्लीस पुरा होऊन कमिशन आतां बाहेर फिरतीवर निघणार ! पण तेथेंहि त्यास दिल्लीसारखाच अनुभव येईल.

* * *

ता १२ पासून सर्वपक्षीय परिषद बहुतेक सर्व आठवडाभर चालू होती असें म्हणण्यास हरकत नाहीं. परिषदेला बाहेरगांवांहून कांहीं मंडळी आली होती. प्रथम समाज सुमारें १०० पर्यंत होता. पुढें तो हळूहळू रोडावला, त्याचें कारण आपल्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें तोच तोच विषय अनेकांनीं त्याच त्याच रीतीनें प्रतिपादण्याचा क्रम व कोणतीहि गोष्ट निकालांत न काढण्याचा क्रम हें होय. एका बाजूला मुसलमान, विशिष्ट कॉंग्रेस पक्ष व दुसऱ्या बाजूला त्रयस्थ-विशिष्ट हिंदुसभा पक्ष अशी रचना होती. सायमन कमिशनवर बहिष्कार सक्रिय घालावयाचा तर हिंदुस्थानच्या लोकांनीं स्वतःची अशी कांहीं तरी स्वराज्य-विषयक निश्चित घटना करणें आवश्यक होय. ही घटना कशी असावी याचा पहिले दिवशीं वाद झाला. एका बाजूला स्वातंत्र्यवादी जवाहरलाल नेहरू व दुसऱ्या बाजूला कॉंग्रेसशीं संबंध नसलेले सप्रू व जिना असे होते. म्हणून एक म्हणे स्वातंत्र्याच्या ध्येयाला धरून घटना झाली पाहिजे आणि दुसऱ्या पक्षाचें म्हणणें घटना कशीहि केली तरी प्रथम ब्रिटिश पार्लमेंटनेंच तिला कायद्याचें स्वरूप दिल्याशिवाय गत्यंतर नाहीं, म्हणून वातंत्र्याची भाषा व्यर्थ आहे; पण अखेर हा वाद तुटून या दोहोंला अविरोधी

असे मोघम शब्द घालून घटना तयार करावी असें ठरलें. पण त्या घटनेला हात घालण्यापूर्वीं हिंदु-मुसलमानांच्या ऐक्याचा प्रश्न जोरानें पुढें आला. यांतहि संयुक्त मतदारसंघ असावेत असेंच खरोखर सर्वांचें म्हणणें होतें; पण त्याच्याबरोबर सिंध, बलुचिस्थान, सरहद्दीवरील प्रांत यांची व्यवस्था मुसलमानांना हवी तशी झाली पाहिजे, निदान ती करण्यासंबंधानें हिंदूंनीं संमति दिली पाहिजे, तरच घटना होऊं शकते असा डाव मुसलमान मांडून बसल्यामुळें काल बुधवारपर्यंत कोणतीच गोष्ट निकालांत निघाली नाहीं.

## पत्र नं. ४

ता. २४-२-२८

'दिल्ली येथील दासनवमी' असें म्हणणें हें पुष्कळांना आपल्यांतील 'शेख मिरा व गोकुळअष्टमी' या म्हणीसारखें असंबद्ध वाटेल. पण येथील स्नेहसंवर्धक महाराष्ट्रीय समाजाच्या कृपेमुळें असेंब्लीच्या व इतर कामांकरितां आलेल्या महाराष्ट्रीयांना दासनवमीचा आठवडा सुना गेला नाहीं. ही संस्था अलीकडे कांहीं वर्षं महाराष्ट्रीय पाहुण्यांची व्यवस्था फार चांगल्या रीतीनें ठेवीत असते. तसेंच दिल्लीस नोकरी, व्यापार वगैरे धंद्यांमुळें जे महाराष्ट्रीय लोक कायमचे राहिले आहेत ते दरवर्षीं गणपति-उत्सव, शिवाजी-उत्सव, दासनवमी सप्ताह वगैरे सण पाळतात व समारंभ करितात. या सप्ताहांत यंदा नारायणराव जोशी, केळकर, दादासाहेब करंदीकर, डॉ. मुंजे, महादेवराव विद्वांस वगैरे गृहस्थांनीं व्याख्यानरूपानें हजेरी दिली. सहारा वाळवंटांत कोठें कोठें झाडें व पाणी असलेलीं बेटें लागतात व तीं वाळवंटाच्या रखरखीतपणांतून डोळ्यांना किंचित् विसांवा देतात, त्याप्रमाणें येथील लहानशा महाराष्ट्रीय वसाहतीला हे उत्सव व समारंभ महाराष्ट्राची आठवण करून देण्याला व जिव्हाळा कायम ठेवण्याला उपयोगीं पडतात.

* * *

असेंब्लीच्या शनवारच्या बैठकींत सायमन कमिशनवरील बहिष्काराचा ठराव ६ मतें अधिक पडून मंजूर झाला ही गोष्ट आतां केसरीच्या वाचकांना कळलीच आहे. हा मोठा आणीबाणीचा प्रसंग होता, परंतु बराच निभावला म्हणावयाचा! क्रिया एकच असतां तिचे हेतु अनेक प्रकारचे असूं शकतात ही गोष्ट इतर व्यवहारांप्रमाणें याहि प्रसंगीं दिसून आली. कॉंग्रेस पक्षाला पार्ले-

भेटचा संबंधच मुळीं नको. जिनाप्रभृति लोकांना स्वातंत्र्य किंवा वसाहतीचें स्वराज्य हें तावडतोब मागण्याची इच्छा नाहीं! त्यांचा राग इतक्याकरितांच कीं, कमिशनवर हिंदी गृहस्थांची नेमणूक झाली नाहीं. तशी झाली असती तर हिंदुस्थानला बरोबरीचें नातें थोडेंसें लाभलें असतें. तिसरा पक्ष लजपतराय, केळकर, जयकर, अणे, मुंजे, पं. कुंझरू यांचा. यांची एकवाक्यता अशावर, कीं कमिशनवर नुसते २-३ हिंदी गृहस्थ नेमले नाहींत हें तर झालेंच पण कायदे-मंडळानें जी कमिटी नेमावयाची तिलाहि कमिशनच्या बरोबरीचें अधिष्ठान व अधिकार नाहींत. ठरावावरील वादांत तीनहि पक्षांनीं आपापलें म्हणणें सयुक्तिक मांडलें. दिसण्यांत पाहणाराला याहून तें थोडें निराळें, त्याहून तें थोडें निराळें, असें दिसलें. परंतु बहिष्कारावर सर्वांची एकवाक्यता होती. जयकरांचें भाषण मुद्देसूद व विवेचक असें झालें. इतर दोन पक्षांतील भाषणांपेक्षां त्यांच्या भाषणांतील विशेष हा होता कीं, त्यांनीं नुसतें नकारात्मक मुग्ध भाषण न करितां काय व्हावयास पाहिजे होतें हें तर सांगितलेंच, पण इच्छा असली तर अजूनहि तें करा असें सांगितलें व अशा रीतीनें दोनहि बाजूंनीं बहिष्काराची जबाबदारी सरकारच्या गळीं बांधली. असेंब्लींत मिळालेल्या या यशाला कौन्सिल ऑफ स्टेटनें गालबोट लावलेंच! आणि सर माणेकजी दादाभाई यांचा आभाराचा व अभिनंदनाचा घसघशीत ठराव पास केला. अशा रीतीनें सरकारनें कमिशनचा गाडा एका चाकावर सावरून धरला. तरी पण एकचाकी गाडा चालूं शकत नाहीं हें सरकारासहि माहीतच आहे. सायमनसाहेब, सरकार, व विलायतेंतील कांहीं पत्रें यांनीं अजून आशा न खुंटल्यासारखीं बोलणीं चालविलीं आहेतच. आणि कित्येकांचा अदमास असा आहे कीं, सप्टेंबरच्या बैठकींत फिरून हा विषय असेंब्लीपुढें येईल. दरम्यान अंदाज-पत्रकावरील चर्चेंत कमिशनच्या खर्चाच्या मंजुरीचा प्रश्न निघणारच आहे. परंतु कदाचित् तो सरतेशेवटीं ठेवून मतें न घेतांच ठरीव वेळ संपल्यामुळें मंजुरींत निघण्याचा संभव दिसतो.

* * *

कमिशनवरील बहिष्काराचा ठराव मंजूर झाला ही गोष्ट अध्यक्षांच्या तोंडून बाहेर पडतांच एक अकल्पित गोष्ट घडून आली व तिनें क्षणभर गोंधळ केला. अध्यक्ष निकाल सांगून बसण्यापूर्वी लोकपक्षाच्या सभासदांनीं उठून टाळ्या वाजविण्याला हात उचलला. निम्म्या वाजल्याहि. पण उरलेल्या वाजण्या-

पूर्वी ब्लॅकेटसाहेबांच्या डोक्यावर एक वस्तु पडून ते बसल्याजागीं बेशुद्ध होऊन बाकावर कलंडले. हा प्रकार इतका अवचित घडला कीं, टाळ्या वाजविण्याचा हात वरच्यावरच राहिला व 'वंदे मातरम्' म्हणण्याच्या तयारीनें आनंदानें कांहीं लोकांनीं तोंडें उघडलीं तोंच वरील प्रकार घडल्यामुळें त्याच उघड्या तोंडांतून फक्त खेद व आश्चर्यप्रदर्शक ध्वनि निघाला. वरून वस्तु पडली, ती एखाद्या ब्राऊन पेपरमध्यें झांकलेली पडली असें ज्यांची नजर सहज तिकडे होती त्यांना दिसलें. आणि ब्लॅकेटसाहेब बेशुद्ध पडल्यामुळें खचित कांहीं तरी अत्याचाराचा प्रकार झाला अशी कल्पना एकदम मनांत विजेसारखी चमकून गेली. पण क्षणार्धांत असें दिसून आलें कीं, ती पडलेली वस्तु ही लिहिण्याचें सामान व कागदपत्र ठेवण्याची कातड्यांची एक पोकळ पेटी होती. ब्लॅकेटसाहेब कुशीवर पडतांच लोक वरच्या गॅलरीकडे धांवले, आणि ज्याच्या हातून पेटी पडली त्याला एकदम पकडण्यांत आलें. हा गृहस्थ एका वर्तमानपत्राचा बातमीदार होता. आणि त्यानें आपल्याच हातून पेटी पडली असें कबूलहि केलें. पण पेटी त्याची नव्हती. ती प्रथम खालीं ठेवलेली होती व कठड्यावरून पडती तर ब्लॅकेटसाहेबांच्या डोक्यावर पडण्याइतकें अंतर थोडें नव्हतें. या कल्पना निघून पेटी मुद्दाम फेकण्यांत आली असा कांहींचा समज झाला; व त्याप्रमाणें पोलीसअधिकाऱ्यांनीं त्यावर खटला भरण्याच्या उद्देशानें त्याचा जामीन घेऊन मगच त्याची सुटका केली. या त्याच्या कृत्याला गुन्ह्याचें स्वरूप येऊन कोर्टांत चौकशी होणार हें आतां ठरलें आहे! अर्थात् आजवर या कायदेमंडळांत किंवा इतर कोठें न घडलेला प्रकार झाला खरा. ब्लॅकेटसाहेबांची बेशुद्धि लवकर उतरली व मोठी इजा झाली नाहीं म्हणून सर्व गोष्टी हसण्यावारी गेल्या. दुसरे दिवशीं दुसऱ्या एका बातमीदाराचे लिहिण्याचे कागद वरून अध्यक्षांच्या टेबलाशीं पडले व त्यावरून आदले दिवशींहि असाच प्रकार चुकून झाला असावा अशी जी कांहीं लोकांची समजूत झाली होती तीच दृढ झाली.

* * *

सोमवारीं सर जॉर्ज रेनी यांनीं रेल्वे अंदाजपत्रक व हिशेब असेंब्लीपुढें खात्याचे मांडले. रेनीसाहेब हे शांत, धिम्मे, सुस्वभावी, विनयशील दिसतात. त्यांच्या भाषणांत लोकांना चिमटे नसतात. उलटा अदमास असतांहि सुदैवानें गतवर्ष रेल्वे खात्याला उत्पन्नाच्या दृष्टीनें बरें गेलें, यामुळें रेनीसाहेबांवर टीकेचा फारसा

मारा झाला नाहीं. बुधवारचा दिवस अंदाजपत्रकावरील चर्चेला ठेवला होता; आणि मधल्या सुटीपर्यंत जम्नादास मेथा, केळकर, पुरुषोत्तमदास, शेष अय्यंगार, जोगिया, नियोगी वगैरेंचीं भाषणें झालीं. सुटीनंतर चर्चा पुढें व्हावयाची. पण सभेंत गणभरती नव्हती यामुळें अध्यक्षांनीं सभा बरखास्त केली. आणि अशा रीतीनें चर्चेला येऊनजाऊन एक दिवस मिळावयाचा त्याचाहि फायदा मिळाला नाहीं ! कॉंग्रेस पक्षांतील सगळीं बाकें मोकळीं आहेत असें पाहून सरकार पक्षाचे लोकहि फारच थोडे हजर राहिले. रेल्वे खात्याच्या खर्च-मंजुरीचा वाद आज पुढें सुरू झाला आहे. परंतु त्यांतहि कॉंग्रेस पक्षाचे लोक भाग घेतील असें दिसत नाहीं.

* * *

हिंदुस्थानला विलायतेचा आरमारी कायदा लावण्याचें बिल मंगळवारीं चर्चेला निघालें. बिलाचा झोक असा कीं, आरमार खात्यांतील लोकांना तिकडे जी शिस्त आहे तीच फक्त आम्ही येथें लावणार आहोंत. परंतु ज्या कायद्यानें ती शिस्त लावावयाची तो कायदा मूळ पार्लमेंटच्या मंजुरीचा आणि तो पास झाला तेव्हां पार्लमेंटच्या कांहीं सभासदांनीं हिंदुस्थानच्या दृष्टीनें त्यावर टीका केली होती. पण अशा १-२ सभासदांचें काय चालणार ? असेंब्लीच्या पुढें बिल आलें तेव्हां तें लोकपक्षाच्या तडाक्यांतून सुटणें शक्य नव्हतें. म्हणून याहि प्रसंगीं अनेक पक्ष एकत्र होऊन त्यांनीं बहुमतानें बिल फेटाळून लावलें. सरकार पक्षाचा या बैठकींतील महत्त्वाचा असा हा तिसरा पराजय असें म्हणण्यास हरकत नाहीं. तुम्ही आरमारी बिल बुडवितां तर तुम्हांला आरमारच नको असें अनुमान काढूं आणि आरमार नाहीं तर स्वराज्य कोठलें असे टोमणे सरकार पक्षानें दिले. पण वेळ आली म्हणजे सैन्य मिळेल व सैन्याबरोबर आरमारहि मिळेल व तोंपर्यंत तुमचें सैन्य व तुमचें आरमार आमच्या दृष्टीनें सारखेंच आहे; आमच्या तुरुंगांवरील पहारे-वाल्याला आमच्या दिमतीला दिलेला नोकर असें सरकारनें म्हटलें तरी तें आम्हांला कसें पटणार ? अशीं उत्तरें लोकपक्षाकडून देण्यांत आलीं व एका युरोपियन सभासदानें म्हटल्याप्रमाणें लोकपक्षाची टार्पेडो लागून अखेर हें विलायती आरमार बुडालें ! उपमा युद्धविषयक खरी पण सगळाच कारभार नुसता तोंडचा.

* * *

गुरुवारीं खासगी ठरावांचा दिवस होता. पैकीं दोनच ठराव निकालांत निघाले. त्यांपैकीं पहिला यामिनखान यांचा असा कीं, दिल्लीच्या आसपास असलेलीं थडगीं, मशिदी, दरगे, इमारती या सर्वांची दुरुस्ती करण्याला दरसाल सरकारनें बरीच रक्कम खर्चावी. या ठरावावर बापूजी अणे, हरविलास शारदा, लाला लजपतराय, आर्थर फ्रूम वगैरे लोकांचीं भाषणें होऊन ठराव मतें घेतल्याशिवायच नामंजूर झाला. अनुकूल बोलणारा कोणीहि मिळाला नाहीं! मुसलमानांच्या कबरस्थानावर हा पैसा खर्च होणार असें लोकांना वाटूं नये म्हणून त्यांनीं ठरावांत हस्तिनापूरच्या वस्तू उकरून काढण्याची गोष्ट घुसडून दिली होती; पण त्यामुळें कोणी फसण्याचा संभव नव्हता. दुसरा ठराव जयकर यांचा. तो अस्पृश्य लोकांना विशेष सवलती देण्यासंबंधाचा होता. त्यावर लजपतराय यांनीं सरकारनें दरसाल १ कोटी रुपये खर्चावे अशी उपसूचना आणली होती. पण ती नामंजूर होऊन जयकरांचा मूळ ठराव तेवढा मंजूर झाला व सरकारनेंहि मतें मोजण्यापर्यंत पाळी आणली नाहीं.

* * *

सर्वपक्षीय परिषद ता. १२ पासून ता. २२ पर्यंत चालू होती. तिच्या उद्देशांपैकीं स्वराज्यघटनेची कमिटी नेमण्याचा ठराव पहिल्याच दिवशीं मंजूर झाला होता पण ९-१० दिवस रण माजलें तें मुसलमानांना सवलती कोणत्या द्यावयाच्या यावरच माजलें होतें आणि दुर्दैव असें कीं, एका हिंदुसभेच्या प्रतिनिधीखेरीजकरून बाकी सर्व पक्षांचे लोक भुरळ पडून गेल्याप्रमाणें सर्व कांहीं मुसलमानांच्यातर्फे बोलत होते. लखनौ येथें टिळक प्रभृति लोकांनीं केलेल्या समेटाला व मुसलमानांना दिलेल्या सवलतींना नांवें ठेवीत असतां, फिरून आपण त्यांच्यापेक्षां वाईट सवलती त्यांना देत आहों हें मात्र कोणाच्या ध्यानीं येत नाहीं! संयुक्त मतदारसंघ करावयाचा तर खुशाल करावा. त्यांत असलें तर हिंदु व मुसलमान या दोघांचें हितच आहे. पण सिंध वेगळा तोडून मुसलमानांच्या स्वाधीन करण्याचें संकट काय म्हणून घालतां हाच वाद चालू होता. कोणीहि माघार घेईना. जयरामदास, प्रो. छबलानी, डॉ. चोइतराम वगैरे गृहस्थांनीं फार परिश्रम केले व सिंधमधील हिंदूंचें भांडण ते कसून भांडले; व शेवटीं "एकी झाली नाहीं म्हटलें तरी चालेल. पण सिंध प्रांत विनाकारण बळी देण्याला आम्ही तयार नाहीं" असें

मत हिंदुसभेच्या प्रतिनिधींनीं नमूद करविलें. इकडे तोंडानें म्हणावयाचें कीं, सायमन कमिशनवरचा बहिष्कार खंबीर करण्याकरितां ही एकी आम्ही करीत आहों; आणि इकडे पाहावें तर ह्या कमिशनच्या हातून होणाऱ्या स्वराज्यघटनेंत मुसलमानांना हव्या त्या सुधारणा कशा घुसडून द्याव्या याचाच पुरस्कार नेहरू व काँग्रेस पक्षाचे इतर लोक उघड उघड करीत होते. पण ही असंबद्धता लक्षांत येण्याइतका विवेक त्यांच्यांत राहिला नव्हता. हें प्रकरण अशा रीतीनें निकालांत निघाल्यावर आतां स्वराज्य-घटनेची कमिटी आपल्या पुढील कामाला सुरुवात करणार आहे.

* * *

गेल्या आठवड्यांत प्रिन्सेस चेंबरची ( नरेंद्रमंडळ ) सभा दिल्लीस व्हाइस-रॉयांच्या अध्यक्षतेखालीं ४–५ दिवस चालू होती. खरोखर ५६ देशचे राजे जुळले होते व असेंब्लीच्या इमारतीच्या आसपास रंगीत डगले, फेटे, तुरे, शेमले, रेशमी पोशाख व जवाहिर यांचें वैभव चार दिवस प्रकट होत होतें. नरेंद्रमंडळाचें सर्व काम पडद्यांत चालू होतें. तथापि कित्येक इंग्रजी पत्रांतून फुटकळ बातम्या छापल्या गेल्या, त्यावरून असें दिसतें कीं, मंडळाच्या सभेंत बऱ्याच महत्त्वाच्या विषयांची चर्चा झाली. संस्थानिकांना मुखत्यारी १८ व्या वर्षीं द्यावी, कीं २१ व्या वर्षीं द्यावी असल्या संस्थानिकांच्या हिताच्या प्रश्नांची चर्चा झाली. पण त्याबरोबर संस्थानिकांनीं आपल्या राज्यांत न्यायमुनसफीची अधिक स्वतंत्र व चांगली व्यवस्था करावी, खासगी तनखे तोडून द्यावे, प्रजेला कांहीं कांहीं हक्क तोडून द्यावे अशा म्हणजे प्रजेच्या हिताच्या दृष्टीनेंहि कांहीं विषयांची चर्चा झाली. व्हाइसरॉयसाहेबांनीं संस्थानिक लोकांची संभावित शब्दांनीं पण बरीच कानउघाडणी केली म्हणतात. उलट संस्थानिकांनीं लाखों रुपये खर्च करून एक बडा बॅरिस्टर आणून आपल्या हक्कांकरितां सरकारशीं भांडण्या-झगडण्याचा घाक घातला आहे. पण त्यांतून काय निष्पन्न होणार या-विषयीं आपण कशाला एव्हांच बोला !

## पत्र नं. ५

ता. २।३।१९२८

गेल्या आठवड्यांत रेल्वे खात्याच्या खर्चमंजुरीशिवाय दुसरा कांहींच विषय असेंब्लींत चर्चेला निघाला नाहीं. सरकारनें खर्चमंजुरी मागितली असतां तिचा फायदा घेऊन टीका करणें व लोकांचीं गाऱ्हाणीं वेशीवर मांडणें याचे

दोन प्रकार असतात. एक म्हणजे सहज एखादा १० किंवा १०० रुपयांचा काट देण्याची सूचना करावी व त्याचें निमित्त करून आपलें काय म्हणणें आहे तें सरकारपुढें मांडावें. असलेहि काट सरकार पत्करीत नाहीं. परंतु उलट चर्चा करणें एवढाच त्याचा हेतु असल्यामुळें, मतें मोजण्यापर्यंत कोणीहि पाळी आणीत नाहीं. दुसरी एक काट देण्याची पद्धत अशी कीं, एखाद्या पोटखात्यावर खर्चाकरितां मागितलेली सर्वच्या सर्व रक्कम नामंजूर करण्याची सूचना पाठविणें. या दोनहि प्रकारचे काट गेल्या आठवड्याच्या चर्चेंत पुढें आले होते.

*   *   *

जम्नादास मेथा यांनीं रेल्वे बोर्डाचा सगळाच्या सगळा खर्च नामंजूर करून फक्त १ रुपया शिल्लक ठेवावा अशी सूचना केली होती. पण त्याचा अर्थ इतकाच होता कीं, हा ठराव रेल्वे खात्यानें निंदाव्यंजक असा समजावा. व्यवहारांत शहाण्याला शब्दाचा मार तसाच राज्यकारभारांतहि अधिकाऱ्याला नुसत्या शब्दाचाच मार. दुसरा मार कसला कोण देणार? असो. मेथांच्या सूचनेची थोडीबहुत थट्टाच झाली. एक अधिकारी म्हणाला, "एक रुपया पगारावर सगळें रेल्वे बोर्ड चालविण्याचा पत्कर तुम्ही घ्याल तर तें आम्ही तुमच्या हातीं खुशाल देऊं." त्यावर दुसऱ्यानें उत्तर दिलें, "अहो, एक रुपया तरी कशाला? तोहि देऊं नका. विनाकारण नवे बोगदे पाडणें, स्टेशनांचीं आवारें मोठीं करणें, नव्या इमारती बांधणें यांचीं कंत्राटें देण्याचा अधिकार आमच्या हातीं मिळाला तर आम्ही तुमच्या रेल्वे बोर्डाचें काम एक पैसाहि न घेतां फुकट करूं." वरील उत्तरें-प्रत्युत्तरें अर्थात् विनोदाचींच आहेत. पण कित्येक वेळां वेडांत कांहीं एक प्रकारचा शहाणपणा असतो तसेंच याहि विनोदांत थोडेंबहुत कां बरेंच तथ्य होतें. कारण मुंबई डेव्हलपमेंट खात्याच्या पापाचे घडे भरले म्हणून त्यास जसा 'नरीमन' भेटला तसा या रेल्वे खात्यालाहि एखादा 'नरीमन' भेटला म्हणजे कळेल. या सूचनेवरील वादविवादांत जम्नादास मेथा यांनीं एकंदर रेल्वे बोर्डाच्या धोरणावर बरीच टीका केली. अखेर चुरशीखातर सूचना मताला घालण्यांत आली; पण थोड्या मतांनीं ती नामंजूर झाली. ती मंजूर झाली असती तर अर्थात् व्हाइसरॉय-साहेबांनीं आपल्या संजीवनीनें रेल्वे बोर्ड जिवंत केलें असतें. परंतु झालेल्या

प्रकारावरून रेल्वे बोर्डाच्या कारभारासंबंधानें किती असंतोष आहे एवढें दिसून यावयाचें तें आलें.

*    *    *

कुंझरू यांनीं दुसऱ्या एका मुद्द्यावर लहानसाच काट सुचविला होता व तोहि अशाच चुरशीनें मताला घातला असतां नामंजूर झाला! पण तो मुद्दा महत्त्वाचा होता. तो हा कीं, रेल्वे खात्यांत वरिष्ठ जागा गोऱ्या- निमगोऱ्या लोकांना देण्यांत येतात, देशी--काळ्या लोकांना देण्यांत येत नाहींत. कुंझरू यांनीं याविषयीं बरींच उदाहरणें सांगितलीं. केळकर यांनीं विलायतच्या होम बोर्डाकडे जी. आय. पी. रेल्वेच्या लोकांनीं पाठविलेल्या अर्जाचा उल्लेख करून एजंटसाहेबांच्या मखलाशीचें आविष्करण केलें. एजन्टांनीं कानांवर हात ठेवून असें भासविलें आहे कीं, "आम्हीं वरिष्ठ जागांच्या बाबतींत वर्गवारी किंवा जातवारी मानीत नाहीं, तर फक्त 'ए' वर्ग व 'बी' वर्ग इतकेंच फरक करतों." त्याला अनुलक्षून केळकर यांनीं पार्सन्स यांना विचारलें कीं, या साळसूदपणाच्या वर्गीकरणाचा असाच अर्थ करावयाचा ना कीं, 'A' म्हणजे अँग्लो-इंडियन व 'B' म्हणजे ब्लॅक (काळा)? सर व्हिक्टर ससून थट्टेनें म्हणाले 'B' याचा अर्थ 'ब्राऊन (निमकाळा) असा असेल! केळकर म्हणाले त्याचाहि अर्थ तोच होतो व असाच अर्थ मनांत असेल तर वर्णभेद दाखविणारीं वर्णाक्षरें आयतींच तशीं मिळालीं म्हणावयाचीं! कर्नल गिडने (अँग्लो-इंडियन) म्हणाले, केळकरांना 'A' व 'B' अक्षरें माहिती आहेत, पण त्यांना 'I' हें अक्षरहि माहिती असावें. पण 'I' याचा अर्थ 'मी' असाच आहे व गिडने यांचा 'I' म्हणजे अँग्लो इंडियनच. बी. बी. सी. आय. रेल्वेवर गार्ड व इंजिन ड्रायव्हर हा पार्शी म्हणजे हिंदी चालतो; मग जी. आय. पी. व ई. आय. रेल्वे यांनाच निम-गोरे कां लागतात? यावर बी. दास थट्टेनें म्हणाले, "काळा इंडियन ड्राय-व्हर नेमला व त्याच्यामध्यें 'ड्रायव्हिंग पॉवर' नसली तरी इंजिन चालणार नाहीं. मग काय करावें!" शेवटीं पार्सन्स यांनीं असें कबूल केलें कीं, मला याचा खुलासा करतां येत नाहीं. मी विचारून सांगेन. या विषयावर जयकर, मुनशी ईश्वर शरण यांचीहि जोराचीं भाषणें झालीं. मुंबईचे कोक यांनीं मध्येंच तोंड घातलें व त्यांना सर पुरुषोत्तमदास यांनीं ताबडतोब उत्तर दिलें. अशा रीतीनें ही सूचना निकालांत निघाली. पण केळकर यांनीं पार्सन्ससाहेबांना

सरकारचें स्पष्ट धोरण काय तें सांगा असें सांगितल्यावर पार्सन्स यांनीं सरकारतर्फे म्हणून असें स्टेटमेंट केलें कीं, यापुढें तरी हा वर्णभेद नाहींसा होईल अशी आम्ही व्यवस्था करूं.

* * *

रेल्वेवरील देशी विदेशी मालाच्या वाहतुकीच्या दरासंबंधानेंहि बरीच चर्चा झाली. त्यासंबंधानें राष्ट्रीय पक्षाचे सभासद मुखत्यारसिंग यांनीं अनेक मालांचीं उदाहरणें देऊन सरकारचा पक्षपात त्यांच्या गळीं बांधला. पं. कुंझरू यांनीं फुकट रेल्वे पासाची बाब पुढें आणली व खिस्ती धर्मोपदेशकांना ज्या सवलती मिळतात त्या हिंदी लोकांना मिळत नाहींत असें सांगितलें. तिसऱ्या वर्गाच्या उतारूंचें भाडें व गैरसोई या विषयावरहि बरीच चर्चा झाली व त्यावर नारायणराव जोशी वगैरे सभासदांनीं बऱ्याच तक्रारी सांगितल्या, पण त्यांच्या सूचनेला बहुमत मिळालें नाहीं. रेल्वे खात्याच्या इतरहि अशाच अनेक बाबी निघणार होत्या. परंतु सभागृहांत गणभरती न भरल्यानें दोन दिवस वादाचे फुकट गेले. त्याची जबाबदारी बरीचशी कॉंग्रेस पक्षावरच आहे !

* * *

स्वराज्य-घटना-कमिटीच्या बैठकी सुरू आहेत. घटना करावयाची ती उद्यां सायमन कमिटी ज्या शिफारशी करील त्या डोळ्यांपुढें ठेवून करावयाची किंवा पुढें केव्हां तरी खरें स्वराज्य लोकांच्या हातीं येईल तो काळ लक्षांत आणून करावयाची असा विकल्प पदोपदीं डोळ्यांपुढें उभा राहत असे. पण एकंदर धोरण ध्येयवादित्वाचेंच आहे. आणि अखेर घटना होईल, ती कदाचित शेंपन्नास वर्षें चळवळीला पुरेल अशीच होण्याचा संभव दिसतो. कारण कोणी त्यांत निर्भेळ स्वातंत्र्याची कल्पना घुसडूं पाहतो तर कोणी वसाहतीचें स्वराज्य उद्यांच्या उद्यां मिळेल असें घेऊन चालतो, तर कोणी समाजसत्तावादांतील सोव्हिएटचे विचार आंत घुसडतो. अशा रीतीनें घटनेची तीन तऱ्हेनें ओढाताण होत आहे. पण कांहीं तरी घटनेचा मसुदा होणार व मार्चमध्यें होणाऱ्या कन्व्हेनशनपुढें ती ठेविली जाणार यांत शंका नाहीं.

* * *

पूर्वी सर्वपक्षीय परिषदेमध्यें हिंदु-मुसलमानांच्या एकीसंबंधानें जो निर्णय बहुमतानें झाला त्याचें निमित्त करून जिनाप्रभृति मुसलमान पुढारी आपलें धोरण पुन्हा बदलणार असा संभव दिसतो. त्यांचा पहिल्यापासूनच झोक असा आहे कीं, तुम्हाला संयुक्त मतदारसंघ हवेत तर आम्ही मागतों त्या सवलती मुसलमानांना द्या व न दिल्या तर आम्ही पूर्वीप्रमाणें जातवार मतदारसंघच हवे असें म्हणूं. तसें झाल्यास सायमन कमिशनपुढें या जातवार संघाचीच चोहों बाजूंनीं शिफारस व मागणी होण्याचा रंग आहे. मुसलमान पुढाऱ्यांत दोन तट पडलेले दिसत असले तरी वरील अदमास खरा ठरल्यास बहिष्कार घालणारे पुढारी व बहिष्कार न घालतां कमिशनशीं सहकारिता करणारे मुसलमान पुढारी, यांची मागणी जवळजवळ एकच होणार. आणि बहिष्कार घातल्याचें श्रेय व न घातल्यानें मिळणारा फायदा मुसलमानांच्याच पदरांत पडेल. पाहावें अखेर काय होतें तें. मुसलमानांच्या मागण्या बहुमतानें परिषदेंत मंजूर झाल्यामुळें जिनाप्रभृति लोकांचें लक्ष स्वराज्यघटना-कमिटींतून जवळजवळ निघाल्यासारखेंच झालें आहे. असेंब्लीचें काम चालू असतां, या बैठकी सुरू असल्यामुळें कित्येक सभासदांना हजर राहणें सोयीचें नसतें. यामुळें कॉंग्रेसमधील पुढाऱ्यांच्या मताप्रमाणेंच बहुधा घटना होईल. बेझंटबाई मात्र कर्तव्यनिष्ठेनें दिल्लीसच मुक्काम देऊन बसलेल्या असून कमिटीला हजर राहून त्या आपलें काम करीत असतात. १८ वर्षें वयाच्या पुढें प्रत्येक मनुष्य मतदार असावा ही गोष्ट त्यांना पसंत नाहीं. इतर कित्येक सभासदांना नापसंत अशाहि कांहीं बाबी आहेतच. मिळून या कमिटीचा सगळा रिपोर्ट एकमतानें होईल असा रंग दिसत नाहीं.

* * *

अस्पृश्यवर्गाची मोठी परिषद दिल्लीस गेल्या आठवड्यांत भरली होती. या वर्गानें कमिशनशीं सहकारिता करण्याचें धोरण उघड स्वीकारलें आहे. त्यांचें म्हणणें असें कीं, आमचा पक्ष उचलून धरणारे पुढारी असहकारितावादी बनल्यामुळें आम्हाला आमचें म्हणणें कसेंहि करून कमिशनपुढें मांडलेंच पाहिजे. लोकवार्ता अशी कीं, सायमन कमिशनच्या मनांत जातवार संघ होतां होईतों पुढील व्यवस्थेंत ठेवूं नयेत. पण मुसलमामांनीं त्या प्रकारें व अस्पृश्य वगैरे लोकांनीं या प्रकारें स्वतंत्र मतदारसंघ मागितल्यामुळें, हिंदु तेवढेंच संयुक्त मतदारसंघ हवे म्हणणारे उरणार व प्रमुख हिंदु पुढाऱ्यांनीं तर कमिशनशीं

असहकारिता केलेली; म्हणून त्यांनाहि मतदारसंघाच्या या प्रश्नाचा थोडासा पेचच पडलेला आहे.

* * *

गेल्या आठवड्यांत मजूर पक्षाच्या प्रतिनिधींची म्हणजे ट्रेड यूनियन कॉंग्रेसच्या कार्यकारी मंडळाची सभा येथें भरली होती. तिला अनेक प्रांतांतील प्रतिनिधी आले होते. महाराष्ट्रांतून ठेंगडी, डांगे वगैरे लोक आले होते. या कमिटीपुढें महत्त्वाचे विषय असे कांहींच नव्हते. तथापि युरोपांत जिनीव्हा येथें लीग ऑफ नेशन्सला धरून मजूरसंघाची जी वार्षिक परिषद होते तिला प्रतिनिधी निवडण्यांत आले. पैकीं कॉंग्रेस पक्षाचे सभासद दिवाण चमनलाल व कोणी एखादा मुसलमान प्रतिनिधि सरकारकडून पाठविण्यांत येतील म्हणतात. खरगपूर येथें मजूरसंघामध्यें फूट झाली. तिचा प्रश्न या बैठकींत पुढें येऊन समाधानकारक रीतीनें निकालांत निघाला. मि. अँड्र्यूज या कमिटीच्या सभेला आले होते व त्यांच्या अध्यक्षतेखालीं ही सभा झाली. दिवाण चमनलाल हे कॉंग्रेस पक्षापैकीं एक आहेत. तथापि कॉंग्रेसच्या ठरावाच्या शिस्तींत सोईप्रमाणें कित्येकांच्या सर्व गोष्टी हव्या तशा बसत असल्यामुळें सरकारनें पाठविलेले प्रतिनिधी म्हणून जाण्याला त्यांना हरकत येणार नाहीं. शिवाय युरोपांत व विलायतेंत हिंदुस्थानसंबंधानें कॉंग्रेसच्यातर्फे चळवळ करण्याचें धोरण असहकारितेच्या पहिल्या युगांत निषिद्ध ठरलें होतें तें अलीकडे नेहरूप्रभृति मंडळी तिकडे जाऊन आल्यापासून शुद्ध व पवित्र असें ठरलें आहे. तथापि असहकारितावादी कॉंग्रेसच्या ठरावाला अनुसरून बोलण्यांत इतकी मर्यादा किंवा मुरड घालण्यांत येतेच कीं, परदेशांत चळवळ करावयाची, पण तिचा उद्देश हिंदुस्थानाला सहानुभूति मिळवावयाची असा नसला म्हणजे झालें! परदेशांत जाऊन चळवळ करावयाची पण हिंदुस्थानाकरितां सहानुभूति मिळवावयाची नाहीं याचा मेळ कॉंग्रेस पक्षच घालूं जाणे! पण कोणत्या शास्त्रकारानें व्याकरणाचें किंवा मीमांसेचें बंधन मानलें आहे? व असल्या गोष्टींनीं जो बांधला जाईल तो शास्त्रकार तरी कसला?

* * *

गेल्या बुधवारीं सर बेसिल यांनीं आपल्या कारकीर्दींतील शेवटचें बजेट असेंब्लीपुढें मांडलें. त्यांत जमाखर्चाची तोंडमिळवणी करून प्रांतिक सरकारची खंडणी माफ करण्यापलीकडे विशेष लक्षांत घेण्यासारखी कोणतीच

महत्त्वाची बाब नव्हती. जमाखर्चाची तोंडमिळवणी झाली तरी सर माल्कम हेले यांच्या कारकीर्दीपासून जे बखेडे झाले ते सगळे मोडले व आतां कांहीं तक्रारी राहिल्या नाहींत असें म्हणतां येत नाहीं. कित्येक वेळां शस्त्रक्रियेनंतर, जखमेचें तोंड पृष्ठभागावर भरून येतें. पण आंत जखमेचा ओलावा शिल्लक राहतो. अशीच हल्लींच्या फडणविशी कारभाराची स्थिति आहे असें म्हणतां येईल. पण कसेंहि असलें तरी ब्लॅकेटसाहेबांनीं माल्कम हेले यांचें धोरण चालू ठेवलें नाहीं. उलट त्याबद्दल नापसंती दर्शवून त्यांनीं केलेली घाण काढून टाकण्याचे बरेच प्रयत्न केले ही गोष्ट कांहीं खोटी नाहीं. आणि यांच्या या कर्तव्यापुरते त्यांना धन्यवाद देण्याला हरकत नाहीं. या गोष्टीमुळें ब्लॅकेट यांना आपली कारकीर्द संपून परत जातांना बरीच प्रौढी मिरवितां आली असती. परंतु हुंडणावळीच्या बाबतींत त्यांनीं हिंदुस्थानचा तोटा केला हें लोकांना नाराज करण्याचें कारण व आपल्या रिझर्व्ह बँकेची योजना लोकांनीं बुडविली हें ब्लॅकेटसाहेबांच्या नाखुषीचें कारण. मिळून उभयपक्षीं रंजिसपणा असल्याची जाणीव ब्लॅकेटसाहेबांच्या नीरस भाषणांत दिसून आली पण आपला कारभार सोडून जातांना, वादाचे प्रश्न निघण्याचें जितकें टळेल तितकें हरप्रयत्नांनीं टाळावें या दृष्टीनें पाहतां त्यांचें परवांचें साधें भाषण हें त्यांच्या मुत्सद्देगिरीचें एक लक्षणच समजावयास हरकत नाहीं.

## पत्र नं. ६

ता. ९-३-२८

गेल्या आठवड्यांत होळीची सुट्टी ४।५ दिवस असल्यामुळें असेंब्लीचें काम बुधवार व गुरुवार हे दोनच दिवस झालें. हे दोन दिवस अंदाजपत्रकाच्या सर्वसाधारण चर्चेला दिलेले होते. भाषणाला वेळेची मर्यादा असल्यामुळें १५-२० लोकांना चर्चेंत भाग घेतां आला. अर्थात् चर्चाहि संकीर्णच झाली. कांहीं भाषणें अंदाजपत्रकावरून दिसून येणाऱ्या सर्वसाधारण सांपत्तिक स्थितीसंबंधानें झालीं. कित्येकांनीं आपल्या आवडीचें एखादें खातें घेऊन त्यावर चर्चा केली. पण अशा चर्चेंत प्रांतीवरील कर, लष्करी खर्च, चलनी नाण्यासंबंधानें धोरण वगैरे विषय प्रमुख होते. खरी चुरशीची चर्चा अशी दुसरे दिवशीं झाली. कारण त्या दिवशीं लष्करी खर्चाचा विषय निघाला होता.

* * *

या दिवशीं हिंदुस्थानचे सेनापति बर्डवुडसाहेब यांनीं लष्करी खर्चाचें पृथक्करण करून होत असलेला खर्च वावगा कसा नाहीं हें दाखविण्याचा प्रयत्न केला. तसेंच स्कीन कमिटीनें केलेल्या शिफारशींवर हिंदुस्थान सरकार व विलायत सरकार यांनीं एकमतानें काय निर्णय ठरविला हेंहि जाहीर केलें. लष्करी खर्चासंबंधानें वर्गवारी करून त्यांनीं असें सांगितलें कीं, पुष्कळसा खर्च हिंदुस्थानांतल्या हिंदुस्थानांत मुरतो. याकरितां ह्याची तक्रार कोणी कां करावी ? ही रक्कम त्यांनीं ३२ कोटींपर्यंत आणून ठेवली. " हिंदी सैनिकांना मिळणारा पगार हा तर प्रत्यक्ष हिंदी लोकांनाच मिळतो. पण आम्हीं इकडे काढलेले यांत्रिक कारखाने, कुरण-गवताचे कारखाने, दूधदुभत्याचे कारखाने, दवाखाने, घोड्यांच्या पागा, शाळा इत्यादि अनेक बाबींवर होणाऱ्या खर्चाचा फायदा हिंदुस्थानांतील लोकांनाच मिळतो " असें त्यांनीं सांगितलें. खर्चाची उधळपट्टी होते व हिंदी का होईना पण भाडोत्री सैन्य इकडे ठेविलें जातें, त्याऐवजीं नागरिक सैन्याची संख्या अधिक वाढविली तर अधिक फायदा होईल या आक्षेपाला त्यांनीं कांहीं उत्तर दिलें नाहीं. उलट त्यांनीं एक फार अप्रयोजकपणाची गोष्ट केली ती अशी कीं, चिनांत पाठविलेल्या हिंदी सैनिकांनीं आपल्या घरीं पगाराचे व इतर बरेच पैसे पाठविले असेहि प्रतिष्ठितपणें सांगितलें !

* * *

या मुद्द्यावर पं. नेहरू यांनीं बरीच टीका केली व ते म्हणाले, " चिनी लोकांचें राष्ट्रीय स्वातंत्र्य हरण करण्याकरितां आमचें भाडोत्री सैन्य पाठवितां व त्यांच्याकडून घरीं पुष्कळ पैसे आले असें सांगतां यांत काय स्वारस्य ? इकडे आलेल्या पैशांत तिकडच्या 'लुटी'चेहि कदाचित् पैसे असतील. असल्या दूषित पैशाचें आमिष आम्हाला दाखवितां व त्याची सबब सांगतां ही फार लज्जास्पद गोष्ट आहे. ब्रिटिश साम्राज्याच्या वाढीकरतां म्हणजे आम्हाला एका अर्थानें दास्यांत अधिक डांबण्याकरितां, आमचे लोक परदेशीं पाठविणें व या गोष्टीचा मोठेपणा आम्हाला देणें हें सरकारला लाजिरवाणें व आम्हाला अपमानास्पद आहे ! " पंडितजींच्या तोंडून 'लूट' हा शब्द निघतांच सर बेसिल ब्लॅकेटसाहेबांपासून त्यांच्या कनिष्ठांतल्या कनिष्ठ बगलबच्चापर्यंत सर्वांनीं कावकाव केली व पंडितजींनीं आपले शब्द परत घ्यावे असें म्हणून चांगला दोन-तीन मिनिटें गोंधळ घातला. पण पंडितजींनीं त्याला

भीक न घालतां ठासून सांगितलें कीं, "मी बोललों ते शब्द पुन्हा शंभर वेळां बोलेन. तुमची भीति कसली? परदेशांत स्वारीवर पाठविलेलें सैन्य लूट करतें कीं नाहीं याच्या गोष्टी तुम्ही आम्हाला शिकवायला नकोत. जग कसें आहे? मनुष्यस्वभाव कसा आहे? याची माहिती सर्वांनाच असते. तुम्ही मुलखावेगळे निःस्पृहतेनें असे काय हात धुतले?" पंडितजींच्या या सडेतोड उत्तराला सरकारपक्षीय सभासद आंतल्या आंत जळफळत पण निरुत्तर होऊन राहिले. लष्करी खर्चाच्या मुद्द्यावर डॉ.मुंजे यांनीं आंकडेवार तुलना करून असें दाखविलें कीं एका हिंदी शिपायावर व अधिकाऱ्यावर जो खर्च होतो त्याच्या निदान पांचपट तरी खर्च गोऱ्या शिपायावर व अधिकाऱ्यावर होतो. अर्थात् हें गोरें सैन्य कमी करून त्याच्याऐवजीं काळयावर भागविलें तर खर्चांत पुष्कळच बचत होईल.

* * *

स्कीन कमिटीच्या रिपोर्टासंबंधानें सेनापति बर्डवुड यांनीं असें जाहीर केलें कीं, कमिटीनें सुचविल्याप्रमाणें आम्ही हिंदुस्थानांत लष्करी कॉलेज काढूं शकत नाहीं. पण विलायतेंतील लष्करी कॉलेजाला पाठविल्या जाणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या वाढवूं व त्यांना पैशाची थोडीबहुत मदत करूं. जेव्हां स्वराज्य देऊं तेव्हां त्याबरोबर लष्करहि तुमच्या स्वाधीन करूं. तूर्त सर्व गोष्टी सोई-सोईनेंच होतील. मॉंटेग्यूसाहेबांनीं १९१७ सालीं स्वराज्यविषयक जाहीरनामा काढला त्या वेळीं त्यांनीं हिंदी लोकांत बरीच आशा उत्पन्न केली. म्हणून आपणहि त्यांचें अनुकरण करावें अशा बुद्धीनें सरकारनें हा लष्करी स्वराज्याचा जाहीरनामा प्रसिद्ध केला कीं काय न कळे! पण मनांतील कपटाची जाणीव स्वतः सेनापतींना इतकी असावी कीं, हा जाहीरनामा काढतांना त्यांच्या स्वतःच्या चेहऱ्यावरहि कांहीं कोणास उल्हासी वृत्ति दिसली नाहीं! बॅ.जिना हे स्कीन कमिटीवर एक सभासद असल्यामुळें, त्यांनीं सेनापतीच्या भाषणाला थोडक्यांत मुद्देसूद उत्तर दिलें कीं, "स्कीन कमिटीनें नेमलेल्या पोट-कमिटीचा रिपोर्टहि प्रसिद्ध करण्याचें धैर्य तुम्हाला होत नाहीं, तेव्हां अखेर निर्णय काय करणार हें आम्हाला दिसतच होतें आणि असल्या जाहीर-नाम्यांनीं लोकांना झुलवूं अशी तुमची आशा असली तर ती व्यर्थ होय. लष्करी शिक्षण घेण्याला १०-५ विद्यार्थि अधिक पाठविले किंवा १०-५ अधिकाराच्या जागा अधिक दिल्या तरी त्यांत कांहींच अर्थ नाहीं. स्कीन कमिटीच्या

रिपोर्टाचें धोरण वेगळें व या तुमच्या जाहीरनाम्याचें वेगळें! हिंदुस्थानांत नागरिक सैन्य व नागरिक लष्करी अधिकारी बनवावे हाच स्कीन कमिटीच्या रिपोर्टाचा खरा आशय. पण इकडे लष्करी शिक्षणाचें कॉलेज काढीत नाहीं असें तुम्हीं ठरविलें याचा अर्थ तुम्हाला नागरिक सैन्यच बनवावयाचें नाहीं."

*   *   *

अखेर सर बेसिल ब्लॅकेट यांनीं उत्तरादाखल भाषण केलें. त्यांत अनेकांना अनेक परीनें चिमटे घेतले. ते म्हणाले, "मद्रास कॉंग्रेसचा ठराव, सायमन कमिशनच्या रागावर, असहाकारितेच्या स्वरूपाचा झाला. तो मनाला पटेना म्हणून असेंब्लीच्या बैठकीला तुम्ही लोक आलां! बैठकीला आलां तर काम करीनासे झालां! पण इतकें सगळें नापसंत म्हणून ठरावाचा अर्थ बदलून घेतला व माझ्या बजेटाच्या वेळीं व त्यावरील चर्चेला हजर राहिलां! हें कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांच्या चातुर्याचें दर्शक तर खरेंच. माझ्यावर तर ही मोठी मेहरबानीच झाली! चर्चेला हजर राहिलां तरी बजेटाला अनुकूल असा एकहि भलेपणाचा शब्द तुम्ही बोलूं नये अशी अट तुम्हाला घातली गेली असेल; तेव्हां तुम्ही माझ्या बजेटाला एका शब्दानें तरी चांगलें कसें म्हणणार? सर पुरुषोत्तमदास, जम्नादास, चेट्टी, बिर्ला वगैरे लोकांनीं माझ्या बजेटांतील दोष दाखविले, पण कांहीं तरी उगाच नांवें ठेवण्याला निमित्त काढावें असाच सर्वांनीं कट केलेला दिसतो. वास्तविक बजेटाच्या पद्धतींत किंवा आंकड्यांच्या रचनेंत आज तीन--चार वर्षांत कांहींच फरक झालेला नाहीं. हिंदुस्थानच्या खर्चासंबंधानें दाखविलेले माझे सर्व आंकडे बरोबर आहेत. अर्थात् शहाण्या माणसांनीं मुद्दाम वेड पांघरून टीकेचा खंडोबा करून उभारण्यांत कांहीं अर्थ नाहीं." अशा रीतीनें त्यांनीं टीकाकारांवरच उलट टीका केली आणि शेवटीं मोठ्या आढ्यतेनें असेंहि सांगितलें कीं, जमाखर्चाच्या बाबतींत योग्य रीतीनें टीका करून असेंब्लीचे सभासद आपल्या जबाबदारीची कांहीं जाणीव दाखवितील असें मला वाटलें होतें; पण ती माझी अपेक्षा ४–५ वर्षांतहि सफळ झाली नाहीं. एक गोष्ट मात्र त्यांनीं कांहींशी कबूल केली, ती अशी कीं, "खर्चापेक्षां जमा जास्ती झाली तरी माझ्या कारकीर्दींत मला कर फारसे कमी करतां आले नाहींत. तथापि प्रांतिक सरकारांना सुटीच्या

ज्या रकमा दिल्या त्या एकत्र केल्या असतां तितक्या कोटींचे कर मीं कमी केले असाच अर्थ होतो!"

*　　　*　　　*

ता. ५-६ रोजीं मुस्लीम लीगची सभा जिना यांच्या अध्यक्षतेखालीं भरली होती. तींत सर्वपक्षीय परिषदेनें जातवार मतदारसंघासंबंधानें जो ठराव केला त्याची चर्चा करण्यांत आली. आणि अखेर मुस्लीम लीगनें असें ठरविलें कीं, "हिंदुमहासभेनें सर्वपक्षीय परिषदेचा ठराव मान्य न करतां मतभेद दर्शविला हें तर झालेंच, पण स्वतः परिषदेनें केलेला ठरावहि कलकत्ता येथें भरलेल्या मुस्लीम लीग सभेच्या ठरावाला धरून नाहीं, त्याअर्थी आम्हालाहि तो मान्य नाहीं!" काल गुरुवारीं सायंकाळीं सर्वपक्षीय परिषदेची पुन्हा मोठी सभा झाली व तिच्यापुढें स्वराज्य-घटनेचा मसुदा ठेवण्यांत आला. प्रथम मुसलमान प्रतिनिधी काय म्हणतात असा प्रश्न सहजच निघाला. तेव्हां जिना यांनीं मुस्लीम लीगचा ठराव वाचून दाखविला व स्पष्ट सांगितलें कीं, "हा आमचा ठराव फिरणार नाहीं." शीख लोकांच्या सभेनें आपलाहि एक ठराव करून पाठविला! तोहि तिच्या प्रतिनिधींनीं परिषदेपुढें मांडला. शीख परिषदेचें म्हणणें असें कीं, "हिंदुस्थानांत मुळीं जातवार संख्येप्रमाणें कौन्सिल सभासदांची वांटणीच होऊं नये. व ही गोष्ट सर्व जातींनीं पत्करली तर आम्हीं पंजाबांत मूठभर म्हणून झांकून दडपून गेलों तरी आम्हाला त्याचें कांहीं वाईट वाटणार नाहीं. पण मुसलमानांच्या मागणीप्रमाणें जर लोकसंख्येच्या प्रमाणानें कौन्सिलांतील सभासदांची संख्या वाटून देण्याचें ठरलें तर मग आम्हाला पंजाबांत $\frac{1}{3}$ हिस्सा मिळावा, बाकी सर्व जातींनीं आपापलें रक्षण करावें व आम्हीं तेवढें कां करूं नये?" दिसण्यांत शिखांची $\frac{1}{3}$ मागणी विपरीत दिसेल, पण जातवारीचें तत्त्व अजिबात गाडून टाकण्याला शिखांची 'बिनशर्त' तयारी आहे ही गोष्ट त्यांच्यातर्फें लक्षांत ठेवली पाहिजे.

*　　　*　　　*

या विषयावर बेझंटबाईनीं मोठें विनोदी भाषण केलें. त्या म्हणाल्या, "तुमचें सगळ्यांचें ठीक आहे. पण माझी काय वाट होणार याचा मी विचार करीत आहे. मी युरोपियन मतदारसंघांत बसूं शकेन; पण त्या संघांतून निवडून येणारा प्रतिनिधि हा हिंदुस्थानच्या स्वराज्याचा शत्रु होणार. म्हणून त्या संघांत राहून मत द्यावें असें वाटत नाहीं. मद्रासच्या ख्रिस्ती मतदारसंघांत

बसावें तर मी हिंदी ख्रिस्ती नाहीं. धर्मांतर करून मुसलमान होण्याची माझी इच्छा नाहीं. आणि एखाद्या राजाशीं लग्न करून हिंदु होऊन येईन म्हणावें तर त्याला आतां माझें वय उरलें नाहीं! तात्पर्य, तुम्ही आपापल्यापुरतें पाहून आपल्या हक्कांची वांटणी करून मागतां तें सर्व ठीक आहे. पण माझ्यासारख्या अल्पसंख्याकांची व न भांडणाऱ्या लोकांची वाट काय?" जातवार मतदार-संघाच्या वांटणीवर त्यांच्या टीकेचा सर्व रोख होता. पण शेवटीं त्या निरुपायानें म्हणाल्या कीं, "मला कांहीं झालें तरी इंग्रज म्हणून या देशांत मतदार व्हावयाचें नाहीं व कोणाला निवडून द्यावयाचें नाहीं. तुमच्यावर मी रागावलें तरी हिंदी स्वराज्यविघातक अशी गोष्ट माझ्या हातून होणार नाहीं आणि अशी गोष्ट करण्यापेक्षां स्वराज्यघटना बनविण्याकरितां जातवार मतदारसंघ मागण्याचा तुमचा असमंजसपणाचा हट्ट तुम्हीं चालविला तर तोहि एक वेळ मी मान्य करीन. पण देव करो व ही तुमची बुद्धि बदलून संयुक्त मतदारसंघच मागण्याची बुद्धि तुम्हांला होवो." पण एकट्या बेझंटबाईच्या सदिच्छेनें काय होणार? हिंदु व शीख हे संयुक्त मतदारसंघ करण्याला कबूल आहेत. मग त्यांत पंजाबचें व पूर्वबंगालचें थोडेंसें अहित झालें तरी चालेल. पण मुसलमान मात्र कलकत्त्याच्या मुस्लीम लीगचा ठराव घेऊन बसले आहेत व त्यांना मोडून काढण्याची कॉंग्रेस पक्षाची छाती नाहीं, यामुळें स्वराज्याची घटना कशी पार पडते अशी सहजच चिंता उत्पन्न झाली आहे.

## पत्र नं. ७

ता. १६।३।२८

गेल्या शुक्रवारच्या सुटीनंतर शनिवारपासून गुरुवारपर्यंत सरकारी खर्चाच्या मागण्या व त्यांवरील खासगी सभासदांच्या उपसूचना यांची चर्चा सुरू झाली. मागण्यांची संख्या ९४ व चर्चेला दिवस पांच. यास्तव सर्व उपसूचना चर्चा होऊन निकालांत निघणें शक्य नसतें. म्हणून यंदा सर्व पक्षांच्या संमतीनें सर बेसिल ब्लॅकेट यांना अशी सूचना करण्यांत आली कीं, प्रत्येक पक्षानें एकेक निवडक उपसूचना द्यावी व त्या सर्व प्रथम चर्चेला घेऊन, त्यांचा निकाल लागल्यावर इतरांची चर्चा व्हावी. हेंच धोरण अखेर व्यवहार्य ठरलें. सर्व पक्षांनीं दिलेल्या उपसूचना खालीलप्रमाणें होत्या. (१) सायमन कमिशनचा खर्च (२) स्टेट-सेक्रेटरीच्या कचेरीचा

खर्च ( ३ ) सरकारी रेव्हेन्यू बोर्ड ( ४ ) वायव्य प्रांतांतील राजकीय सुधारणा ( ५ ) लष्करी खातें ( ६ ) एक्झिक्युटिव्ह खातें. कुस्तीच्या फडांत हे सहा गडी उभे करण्यांत आले व त्या सर्वांनीं कुस्ती जिंकली. वरील सूचनांपैकीं, स्टेट-सेक्रेटरी व रेव्हेन्यू बोर्ड यांवर म्हणण्यासारखा वादविवाद झाला नाहीं. फक्त स्टेट-सेक्रेटरींना पुष्कळांनीं मनास वाटलें तशा शिव्या देऊन घेतल्या. वायव्य प्रांतामध्यें न्यायकोर्ट वगैरेंची स्थापना करावी अशी एक व भरपूर राजकीय सुधारणा द्याव्या ही दुसरी, अशा दोन उपसूचना पुढें आल्या होत्या. या विषयावर मुसलमान सभासद, सरकार व हिंदु सभासद असा तिरंगी सामन्याचा प्रसंग होता. गतवर्षीं याच प्रसंगावर बरेंच रण माजून शिवीगाळ झाली होती. पण यंदा तो प्रसंग आला नाहीं. मुसलमानांना या सर्व सुधारणा एकदम अमलांत यावयास हव्यात. हिंदु सभासदांना न्यायखात्याची सुधारणा प्रथम व्हावयास हवी, आणि सर्व स्थिरस्थावर झाल्यावर मग इतर राजकीय सुधारणा कराव्या असें त्यांचें म्हणणें. कारण या प्रांतांत शेंकडा ९० वस्ती मुसलमानांची व शेंकडा १० हिंदूंची, अशी स्थिति असल्यामुळें, सुराज्यव्यवस्था अमलांत न येतां सुधारणा दिल्यास माकडाच्या हातीं कोलीत दिल्याप्रमाणें सुधारणांचा उपयोग हिंदूंचा अधिक छळ होण्याकडे होण्याची भीति! सरकारचें खरें धोरण असें कीं, मुसलमानांना दुखवूं नये, सुधारणा करतों करतों म्हणावें, पण सुधारणांची योजना केल्यानें रुपयांतील चार-दोन आण्यांची सत्ता जाईल तीहि हातून गमावूं नये.

* * *

पण सरकारतर्फे सर डेनिस ब्रे यांनीं भाषण केलें. त्यांत त्यांनीं सर्व दोष हिंदूंवर ढकलावा असा रोख ठेवला आणि तुमचें म्हणणें काय तें सांगा असें हिंदु पुढाऱ्यांना एक प्रकारें आव्हान केलें. तेव्हां लालाजी यांनीं जशास तसें या न्यायानें सर्व दोष सरकारवर टाकला. आणि असें उघड सांगितलें कीं, " हिंदु व मुसलमान आम्ही एकाच मताचे आहों. सुधारणा करावयाच्या कीं नाहीं हें तुमच्या हातीं; तेव्हां तुम्ही आपला निश्चय काय तो पक्का करा. तुम्हाला त्या करावयाच्या नसतील तर स्पष्ट नाहीं असें म्हणा, म्हणजे मग मुसलमानांना तुमच्या आश्वासनांची किंमत तरी कळून येईल. बरें, करावयाच्या असतील तर तसें स्पष्ट सांगा व मग आम्ही

हिंदुहि त्यांना संमति देतों कीं नाहीं ही आमची परीक्षा पहा," अशा रीतीनें कपटी युक्तिवादाचा चेंडू आला तसा परत गेला व प्रत्यक्ष मतें न मोजतां बलुचिस्थान, वझिरिस्थान वगैरे प्रांतांत सुधारणा कराव्या असा ठराव मंजूर झाला. सर्वपक्षीय परिषदेमध्यें या सुधारणा हा एक वादाचा व मतभेदाचा प्रश्न झाल्याचें प्रसिद्धच आहे. पण असेंब्लीमध्यें हिंदूंनीं सुधारणांना संमति देणें व वरील सभेंत संमति न देणें यांत बारीक श्लेष इतकाच होता कीं, सुधारणा द्यावयाच्या कीं नाहीं हें स्वतंत्र रीतीनें ठरवावें, मुसलमानांनीं संयुक्त मतदारसंघाला कबुली देण्याची ती किंमत म्हणून मागूं नये व देशाभिमानाला बाजारी सौद्याचें स्वरूप देऊं नये.

* * *

सायमन कमिशनच्या खर्चमंजुरीची उपसूचना पं. मोतिलाल नेहरू यांनीं मांडली. या विषयाची चर्चा पूर्वीं एकदां स्वतंत्र ठरावांच्या रूपानें झाल्यामुळें पुन्हा ती होऊं नये असें मत अध्यक्ष पटेल यांनीं प्रकट केलें. पण नाहीं नाहीं म्हणत आडवी तिडवी, इकडून तिकडून चर्चा झाली व उपसूचना सात अधिक मतांनीं मंजूर झाली. पूर्वीं बिनसलें तें पुढें कदाचित् साधून घेऊं असा सरकारचा विचार होता. आणि जर का कमिशनच्या खर्चाची मागणी चुकून मंजूर झाली असती तर 'कमिशन नामंजूर पण त्याचा खर्च मंजूर' असा विपरीत प्रकार झाला असता आणि त्याचीच सरकार डोळ्यांत तेल घालून वाट पाहत होतें. पण सर्व पक्षांच्या प्रयत्नांनीं गैरहजर असलेले सर्व सभासद तारा करकरून बोलावून आणण्यांत आल्यामुळें सरकारचा इलाज चालला नाहीं.

* * *

सायमन कमिशनच्या खर्चाच्याच जोडीनें 'लीग ऑफ नेशन्स' व युरोपांत भरणारी आंतरराष्ट्रीय मजूर परिषद यांच्या खर्चाचा प्रश्न निघाला होता. 'किरकोळ' या सर्वसाधारण सदराखालीं हे सर्व विषय येत होते. या दुसऱ्या विषयाच्या वादांत मुद्दा असा होता कीं, हिंदुस्थान हें जर स्वतंत्र राष्ट्र म्हणून राष्ट्रसंघांत खुर्ची अडवून बसतें तर हिंदुस्थानचा प्रतिनिधि तिकडे जावयाचा तो हिंदीच कां असूं नये, युरोपियन कां असावा ? या प्रश्नाला सरकारतर्फे कांहीं उत्तर देतां आलें नाहीं. या कामीं त्यांचे बरेच वाभाडे निघाले. रमण्यांत भिक्षुक दक्षिणेला गेला म्हणजे पोराबाळांना घेऊन जातो, तेथें दक्षिणेपुरता

त्यांचा हात पुढें करतो व बाहेर पडतांच त्यांच्या हातांतील दक्षिणा काढून आपल्या हातीं घेतो; असाच प्रकार राष्ट्रसंघाच्या बैठकींत हिंदुस्थानचा होत आहे. ब्रिटिश साम्राज्याला आपल्या बाजूचीं मतें अधिक पडावयाला पाहिजेत म्हणून राष्ट्रसंघांत हिंदुस्थानाला खुर्ची! पण त्या खुर्चीवर बसणारा युरोपिअन अमुक मत हिंदुस्थानचें म्हणून इकडच्या लोकांना विचारल्याशिवाय खुशाल निर्लज्जपणें दडपून देणार! हाच या विषयावरील खरा मुद्दा; आणि तो लजपतराय, जोशी, बिर्ला वगैरे सभासदांनीं आपल्या भाषणांत प्रमुखपणें मांडला. कारण हे तिघेहि युरोपांत भरणाऱ्या या दोनहि परिषदा पाहून आलेले आहेत.

* * *

एक्झिक्युटिव्ह कौन्सिलचा खर्च नामंजूर करण्याच्या प्रश्नावर वेळेचा अभाव म्हणून फारशी चर्चा झाली नाहीं व झाली तींहि व्हावी तशी झाली नाहीं. पण उपसूचनेवर सरकारचा पराभव झाला. या वेळीं बॅरिस्टर जिना व त्यांचे ४-२ अनुयायी तटस्थ राहिले, यामुळें थोडीबहुत भीति वाटत होती. परंतु त्यामुळें अखेर कांहीं बिघडलें नाहीं. पण लष्करी खर्चाच्या मागणीवरच काय तो खरा जोराचा व मुद्देसूद वादविवाद झाला. या एकच विषयानें जवळ जवळ पांचांतील दोन दिवस घेतले. शिवाय बजेटावरील सर्वसाधारण वादविवादांतहि मुख्य भर त्याच्यावरच पडला. सेनापति बर्डवुड यांनीं सँढर्स्ट कमिटीच्या रिपोर्टांचा विषय त्यांतच आणल्यामुळें त्या वादाला अधिक महत्त्व सहजच आलें होतें. नंतर बॅ. जिना यांनीं याच विषयावर स्वतंत्रपणें तहकुबीची सूचना आणली तेव्हांहि बराच वादविवाद झाला. अशा रीतीनें गेल्या सगळा आठवड्याभर लष्करी खर्चावरच इकडून तिकडून, या किंवा त्या रूपानें टीकेचा ध्वनि-प्रतिध्वनि एकसारखा दुमदुमत होता. यंदा या विषयाची जितकी बारीक छाननी झाली तितकी गेल्या २-३ वर्षांत झाली नव्हती. या वादांत लष्करी सेक्रेटरीखेरीज कोणीहि सरकारी सभासदांपैकीं भाषण केलें नाहीं.

* * *

या वादविवादांत स्वराज्य पक्षापैकीं चमनलाल, गोस्वामी, श्रीनिवास अय्यंगार, बेळवी वगैरेंचीं भाषणें झालीं. बेळवी यांनीं जातां जातां आपल्या भाषणांत सायमन कमिशनचा उल्लेख करून, सर जॉन सायमन यांच्या भाषणांतील एका भाषणाचा मोठा मुद्देसूद उल्लेख केला. हें भाषण सायमन यांनीं १९२२ सालीं आयरिश स्वराज्यघटनेच्या वेळीं केलें. त्या वेळीं

ती घटना आयरिश लोकांनीं आपली आपणच केली व पार्लमेंटनें ती फक्त मंजूर केली; या गोष्टीविषयीं आनंद व पसंती या भाषणांत त्यांनीं दर्शविली. हा विषय मध्येंच आणण्यांत बेळवी यांचा अर्थ हाच कीं, युरोपांत व स्वतः इंग्लंडांत लोकांची राष्ट्रीय भावना साम्राज्य सरकार ज्या मापानें मोजतें त्या मापानें तें हिंदी लोकांची भावना मोजण्यास तयार नसतें. लष्करी खात्यावर राष्ट्रीय पक्षापैकीं डॉ. मुंजे, कुंझरू, केळकर यांचींहि भाषणें झालीं. कुंझरू यांनीं लष्करांतील गोऱ्या अधिकाऱ्यांच्या संख्येवर टीका केली. डॉ. मुंजे यांनीं निरनिराळे आंकडे घेऊन गोऱ्या सैन्यावर होणारा खर्च व काळ्या सैन्यावर होणारा खर्च यांची तुलना केली; व लष्करी कुरणांची देखरेख करण्यालाहि ९४ बडे गोरे अधिकारी लागतात व त्यांतहि एखादा काळा खपत नाहीं असें सांगितलें, तेव्हां सभेंत बराच हशा पिकला! केळकर यांनीं सांगितलें कीं, " आजवर इटालियन मॅकेव्हिली याला कपटी मुत्सद्द्यांचा राजा असें म्हणण्यांत येत असे; पण ती त्याची पदवी आतां इंग्रजांना मिळाली आहे! त्यांनीं मॅकेव्हिलीवरहि ताण केली आहे; कारण तो प्रजास्वातंत्र्याचा द्रोही असला तरी प्रजेला निःशस्त्र करूं नये, तर उलट शस्त्रें देऊन त्यांचा विश्वास संपादावा असेंच त्यानें म्हटलें होतें." अशा रीतीनें पांच दिवस बजेटमंजुरीवरील वादविवाद झाला; व आनंदाची गोष्ट ही कीं, या सर्व अवधींत तीनहि पक्ष एकजुटीनें वागत होते. यामुळें पदोपदीं सरकारवर मात होत असे. एकदांहि खालीं पाहण्याचा प्रसंग आला नाहीं. पण फलश्रुतीच्या नांवानें पूज्य. कारण व्हाइसरॉयांनीं सगळे नामंजूर खर्च शिक्केबाजीनें मंजूर केले. असो; पूर्वींच्या दोन आठवड्यांत स्वराज्य पक्षाच्या चंचल धोरणानें जी खळबळ झाली होती ती यामुळें स्थिरस्थावर झाली. हेंच धोरण स्वराज्य पक्षानें प्रथमपासून ठेवलें असतें तर अधिकच चांगलें झालें असतें असें येथें लोक म्हणतात व स्वतः त्या पक्षांतील लोकांनाहि असेंच वाटतें.

* * *

सर्वपक्षीय परिषद संपली. स्वराज्यघटनाकमिटीचा रिपोर्ट प्रसिद्धहि झाला. त्यांत कांहीं कांहीं मुद्द्यांवर मतभेद झालाच आहे. पण या घटनेला खरें महत्त्व हिंदु-मुसलमानांचा तंटा तुटून उभयतांनीं संयुक्त मतदारसंघाच्या योजनेला संमति दिल्यानें यावयाचें होतें ती गोष्ट मात्र तडीस गेली नाहीं. अर्थात् त्या-

शिवाय घटना झाली तरी अथवा न झाली तरी महत्त्व तितकेंच असें कोणीहि म्हणणार. अखेरपर्यंत पं. नेहरू व श्रीनिवास अय्यंगार हे मुसलमानांशीं सामोपचार करतांना बरेच टिकून राहिले होते. पण मुसलमानांनीं जेव्हां असा हट्ट धरला कीं, ज्या प्रांतांत मुसलमानांची संख्या हिंदूंपेक्षां अधिक आहे तेथें देखील मुसलमानांकरितां जागा राखून ठेवाव्या. तेव्हां वरील दोघांनींहि हात टेकले व आपला पराभव कबूल केला! नेहरू हे मुसलमानांवर अयुक्तवादी म्हणून रागावले असेंहि म्हणतात. असो. अशा रीतीनें मुसलमानांशीं तडजोड करण्याच्या बाबतींत प्रत्येकानें आपापल्या परीनें पराकाष्ठा करून पाहिली. तेव्हां शेवटीं हिंदु सभेच्या प्रतिनिधींनीं प्रथमपासून स्पष्ट धोरण ठेवलें तेंच बरोबर होतें असें म्हणण्याची पाळी आली. सर्वपक्षीय परिषद फिरून मुंबईस मे महिन्यांत बोलावण्यांत येणार आहे. पण तेथेंहि मुसलमानांस सुविचार सुचेल असें वाटत नाहीं.

## पत्र नं. ८

ता. २३-३-२८

गेल्या शुक्रवारीं फायनॅन्स बिल पुढें मांडण्यांत आलें. गेलीं दोन वर्षें हें बिल फेटाळण्यांत आलें नाहीं. किंबहुना गतवर्षीं स्वराज्य पक्षानें फायनॅन्स बिलाच्या दिवशीं आपले सर्व लोक हजरहि ठेवले नाहींत व जे हजर होते त्यांपैकीं कांहींनीं बिलाविरुद्ध मत दिलें नाहीं. यंदा उलटा प्रकार झाला. ते हजर राहिले पण गेल्या दोन-तीन वर्षांप्रमाणें इतर पक्षांनीं हें बिल फेटाळून लावण्याचा हुकूम सोडला नाहीं. यंदा हें बिल नामंजूर करावें म्हणण्याचें कारण असें सांगण्यांत आलें कीं, बजेटावरील वादविवादांत जीं चार मोठीं कलमें सर्व पक्षांच्या संमतीनें नामंजूर करण्यांत आलीं तीं व्हाइसरॉयसाहेबांनीं आपल्या अधिकारांत पुनः प्रविष्ट केलीं. कसेंहि असो असेंब्लीच्या कामीं लहर कोणाहि एकाच पक्षाला येऊन चालत नाहीं. ती सर्वांनाच एकदम आली तर कांहीं कार्य साधतें. फायनॅन्स बिलावरील वादविवादांत स्वराज्यविषयक तक्रारी अनेक सभासदांनीं फिरून पुढें मांडल्या. आणि पं. मोतिलाल नेहरू यांच्याप्रमाणें पं. मदन मोहन मालवीय व लाला लजपतराय यांनींहि जोरदार भाषणें केलीं; तथापि वर सांगितल्या कारणानें वीस मतांचा फरक पडून फायनॅन्स बिल मंजूर झालें. कौन्सिलांतून लोकपक्षाचें बहुमत कागदावर दिसलें तरी,

सरकारी सभासद हे पगारी नोकर व नॉमिनेटेड सभासद हे पूर्ण ऋणानुबंधी असल्यामुळें तें बहुमत लोकपक्षाच्या पदरांत पडण्याला अवांतर गंडांतरें पुष्कळच असतात.

* * *

फायनॅन्स बिलाचें काम शुक्रवार, शनिवार व सोमवार हे तीन दिवस चाललें. त्यांत मिठाचा कर व टपालहशील कमी करण्यासंबंधानें आलेल्या सर्व सूचना नामंजूर झाल्या ! टपालखात्याचे दर कमी केले तर या खात्यांतील नोकरांची पगारवाढ वगैरे सुधारणांचें काम आमच्या हातून कसें होणार अशी तक्रार सरकारतर्फे करण्यांत आली. पण त्याला उत्तरहि असें देण्यांत आलें कीं, येथील टपालाचे दर युद्धाच्या वेळेपासून वाढले आहेत. ते तसेच असतां नोकर लोकांच्या बढतीचें काम मात्र मंद गतीनें चाललें आहे. अडीच तोळयां-वरचे दर घेतले असतां, विलायतेंतील दरापेक्षां ते इकडे अधिक आहेत. आणि या वाढाव्याचा पुष्कळसा फायदा सरकारी तारखात्याला व सरकारचा वसूल वाढविण्याला मात्र उपयोगी पडतो. या वादविवादांत प्रांतीवरील करासंबंधानें सर व्हिक्टर ससून, युरोपियन खाजगी सभासद व सर बेसिल ब्लॅकेट यांचा बराच चुरशीचा वाद झाला. गोऱ्या भाऊबंदांत भांडण झालेलें पाहण्याचा योग या प्रांतीवरील कराच्या कामींच तेवढा दिसून येतो.

* * *

मंगळवारीं खाजगी सभासदांचे ठराव चर्चेला निघाले. त्यांत खरा चुरशीचा वाद सांबर सरोवरावर मीठ उत्पन्न करण्याच्या कारखान्यासंबंधाचा होता. या कारखान्याच्या मुख्य इंजिनियरांनीं लाखों रुपयांची उलाढाल व अपव्यय केला व त्याचा गवगवा झाल्यावर सरकारी हिशेबतपासणीखात्यानें चौकशी केली. पण शेवटीं सर्वांवर झाकण घालण्यांत आलें व इंजिनियरसाहेब पेन्शनाचा आपला वांटा घेऊन सरकारी खर्चानें परत विलायतेस गेले, हा वादाचा मुख्य मुद्दा होता. मि. नियोगी हे पब्लिक अकौंट्स कमिटीचे सभासद असल्यामुळें त्यांनीं अशी तक्रार केली कीं, या कमिटीनें मागितलेली माहिती देखील सरकारनें पुरवली नाहीं, म्हणून या प्रकरणाची स्वतंत्र चौकशी झाली पाहिजे. किंबहुना मुंबईच्या डेव्हलपमेंट खात्याची जी स्थिति तीच सांबर सरोवरावरील मीठखात्याचीहि होती. आणि नियोगी यांचा ठराव मंजूर झाला असता तर त्याला निंदाव्यंजक ठरावाचेंच स्वरूप आलें

असतें. पण या दिवशीं एकहि स्वराज्य पक्षाचा सभासद हजर नव्हता. यामुळें नियोगी यांचा ठराव नामंजूर झाला! पुराणवस्तुरक्षक खात्यानें उकरून काढलेल्या व मिळविलेल्या वस्तू परदेशीं जाऊं देऊं नयेत अशाविषयीं सर्वोत्तमराव यांचा एक ठराव होता; पण सरकारी सेक्रेटरी बाजपेयी यांनीं योग्य खुलासा केल्यावर तो परत घेण्यांत आला. तसेंच मुखत्यारसिंग यांनीं शुगर-कमिटीच्या रिपोर्टाला धरून शुगर बोर्ड नेमण्याचा ठराव आणला होता, तोहि सरकारनें खुलासा केल्यामुळें, पण त्यांतल्या त्यांत लोकपक्षाचे सभासद असावेत तितके हजर नसल्यामुळें, परत घ्यावा लागला.

* * *

बुधवारीं पोलादी-लोखंडी कारखान्यांना मदत करण्याकरितां जकात बसविण्यासंबंधाचें एक बिल सिलेक्ट कमिटीकडून आलें तें मंजूर झालें. रेल्वेचे मालाचे डबे तयार करण्याच्या कारखान्यांना किती मदत द्यावी या संबंधाचा एक प्रश्न होता. त्यांत टॅरिफ बोर्डाच्या शिफारशीपलीकडे जाऊन युरोपिअन कारखानदारांच्या हिताकरितां अधिक मदत देण्याचें सर जॉर्ज रेनी यांनीं योजिलें होतें. पण सर पुरुषोत्तमदास, नियोगी वगैरेंच्या प्रयत्नानें ती गोष्ट टळली. पण या एका बाबतींत टॅरिफ बोर्डाची शिफारस आहे तशीच मंजूर केल्यामुळें, लोखंडी नट-बोल्ट करणाऱ्या देशी कारखान्यांना मदत करण्याविषयीं टॅरिफ बोर्डानें जी शिफारस केली होती ती अपुरी असतांहि सिलेक्ट कमिटीला मान्य करावी लागली. नट-बोल्ट तयार करणाऱ्या किर्लो-करासारख्या कारखानदारांनीं टॅरिफ बोर्डापुढें आपलें म्हणणें सयुक्तिकपणें मांडलें होतें. पण त्याला अनुसरून जितकी जकात बसवावयास खरोखर पाहिजे तितकी बसविण्यांत आली नाहीं. कारखानदारांचें या जकातीनें थोडेंसें काम होईल, पण व्हावें तसें भरपूर काम होणार नाहीं असें केळकर यांनीं सांगितलें.

या दिवशीं टेरिटोरिअल व ऑक्झिलिअरी सैन्यासंबंधाचें बिल चर्चेला निघालें. हें दोनहि प्रकारचें सैन्य थोडेंथोडें वाढविण्याचा सरकारचा हेतु दिसतो. परंतु ऑक्झिलिअरी हें सैन्य सरकारच्या भाऊबंदांचें किंवा जातभाईचें व टेरिटोरिअल सैन्य हें काळ्या लोकांचें. यामुळें या दोहोंत जो कांहीं फरक पूर्वींपासून ठेवण्यांत आलेला आहे तो तसाच कायम आहे. हल्लीं फरक

इतकाच झालेला आहे कीं, ऑक्झिलिअरी सैन्य, आणि टेरिटोरिअल सैन्यापैकीं युनिव्हर्सिटी व कॉलेजें यांच्या लोकांनीं बनविलेलें सैन्य, या दोघांना सारखे हक्क व अधिकार ठेवण्यांत आले. तथापि पगार, भत्ते, शिक्षण यासंबंधाचे नियम अद्यापि व्हावयाचे असल्यामुळें जुने भेद सर्वस्वीं नष्ट होतात कीं कांहीं शिल्लक राहतात हें पाहावयाचेंच आहे. डॉ. मुंजे यांच्या कांहीं उपसूचना या बिलावर होत्या. पैकीं सल्लागार नेमण्यासंबंधाची एक उपसूचना तेवढी सरकारनें मान्य केली व बाकीच्या नामंजूर झाल्या! डॉ. मुंजे हे लष्करी खात्याच्या प्रश्नांत विशेष लक्ष घालतात व भाषणेंहि करतात यावरून त्यांना लष्करी पदव्या मिळूं लागल्या आहेत. प्रथम एकानें त्यांना कॅप्टन म्हटलें, दुसऱ्यानें मेजर म्हटलें व तिसऱ्यानें कर्नल म्हटलें; असें होतां होतां परवां श्रीनिवास अय्यंगार यांनीं त्यांना जनरल ही पदवी देऊन टाकली व अध्यक्षांनीं विनोदानें तिचा उच्चार केला. मुंजे यांना आतां फील्डमार्शल होण्याचें तेवढें राहिलें आहे. असेंब्लीच्या पुढच्या बैठकींत कदाचित् ही शाब्दिक बहुमानपरंपरा पुरी होईल.

* * *

पण विनोदबुद्धि सोडून दिली तर, मुंजे यांचीं या कामीं स्पष्टोक्तीचीं भाषणें होतात व तीं सभेला पसंत असतात ही गोष्ट मात्र निःसंशय होय. या दिवशीं हिंदुस्थानचे सेनापति हे मुद्दाम हजर राहिले होते. त्यांनीं बिलाच्या चर्चेंत कांहीं भाग घेतला नाहीं. त्यांनीं नुसता आशीर्वाद दिला. पण त्यांच्या हजर राहण्याचें कारण असें कीं, जिना यांनीं पूर्वीं तहकुबीची सूचना आणली त्या दिवशीं सेनापतींनीं उत्तर देण्याला हजर राहावयास पाहिजे होतें. पण त्यांना हजर राहतां आलें नाहीं याबद्दल अध्यक्ष पटेल यांनीं भरसभेंत त्यांना दोष दिला. पण त्यांचीहि अडचण खरीच होती. त्यांना सूचना उशिरा मिळाल्यामुळें आधीं ठरलेला त्यांचा कार्यक्रम त्यांना बदलतां येईना. सेक्रेटरी मि. यंग यांनीं ही गोष्ट अध्यक्षांना आधींच कळविली असती तर त्यांनीं तसा निषेध केला नसता. कसेंहि असो, पटेलांचे उद्गार ऐकून ब्लॅकेटसाहेब रागावून उठून गेले. त्यानंतर चार-पांच दिवस पटेल यांच्यावर बहिष्कार घालण्याचा प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष प्रयत्न सुरू होता. परंतु सेनापतींनीं समजूतदारपणा दाखवून हजर राहून खुलासा केला. अशा रीतीनें उभयतांची दोस्ती झाली व त्याचें प्रत्यंतर त्याच दिवशीं पटेल

यांना एक पार्टी देण्यांत आली त्याच वेळेला दिसून आलें. कारण या पार्टीला स्वतः सेनापति व ब्लॅकेटसाहेब हे हजर राहिले होते. सर डार्सी लिंडसे यांनींहि असाच खुलासा केला कीं, स्वराज्य पक्षाचे लोक आमच्या पार्ट्यांना हजर राहिले नाहींत म्हणून आम्हींहि त्यांच्या पार्ट्यांना गेलों नाहीं. एरवीं अध्यक्ष पटेल यांच्यावर आमचा राग नव्हता.

* * *

गुरुवारीं खासगी सभासदांच्या बिलांचें काम झालें, त्यांत डॉ. गौर यांचीं बरीचशीं बिलें होतीं. त्यांपैकीं किरकोळ १-२ वादग्रस्त नव्हतीं तीं मंजूर झालीं व बाकीचीं अभिप्राय घेण्याकरितां बाहेर पाठविण्यांत आलीं. साराभाई हाजी यांचें समुद्रकिनाऱ्याच्या व्यापारी जहाजांसंबंधाचें एक महत्त्वाचें बिल व जोशी यांचें मजुरांच्या संपासंबंधाचें बिल अभिप्रायाकरितां बाहेर पाठविण्यांत आलें. केळकर यांचें विमा कंपन्यासंबंधाचें बिल प्रविष्ट करण्यांत आलें. या बिलांत इतकीच योजना आहे कीं, हिंदी विमा कंपन्या व परदेशी विमा कंपन्या यांच्या दरम्यान ज्या कांहीं बाबतींत कायद्याच्या कलमांनीं पंक्तिप्रपंच करण्यांत आला आहे तो निघून जावा. याच दिवशीं पार्लमेंटरी असोसिएशन-तर्फे कानडा प्रांताला पाठविण्यांत येणाऱ्या प्रतिनिधींची निवडणूक झाली. तींत चमनलाल, पं. मोतिलाल नेहरू, गोस्वामी व सर डार्सी लिंडसे इतके गृहस्थ निवडले गेले. या असोसिएशनच्या नांवावरूनच ती साम्राज्यांतील निरनिराळ्या कायदेमंडळांचा स्नेहसंबंध वाढविण्याकरितां स्थापली आहे हें दिसून येतें. पं. नेहरू गतवर्षीं बेल्जम व रशिया या देशांना जाऊन राज्य-क्रांतीची कल्पना घेऊन आले. यंदा ते कानडा वसाहतीला भेट देणार असून साम्राज्याच्या पार्लमेंटांचा स्नेहसंबंध घडवून आणणार आहेत ! सिमला येथील बैठकीला ते हजर राहणार नाहींत. पण परदेशांतील मतप्रसाराचें तरी काम होईल ! श्रीनिवास अय्यंगार हेहि पुढील महिन्यांत विलायतेस जात आहेत. तात्पर्य, सिमला येथील बैठकीला लोकपक्षाचे सभासद राहावे तितके हजर राहणार नाहींत व या गैरहजेरीचा सरकार फायदा घेईल अशी भीति वाटते.

---

## पत्र नं. ९

# असेंब्लीच्या कामाचा आढावा

( केसरी, ता. २ ऑक्टो. १९२८ )

( पूर्वार्ध )

यंदा सिमला येथील वरिष्ठ कायदेमंडळाची बैठक बरोबर तीन आठवडे चालू होती. तिजकरितां सरकारी अधिकाऱ्यांचा पगार, सरकारी खाजगी सभासदांचा प्रवासी व बैठा भत्ता मिळून दीड लाख रुपये खर्च झाला असेल; आणि अनेक प्रांतांतल्या लोकांना अपापले उद्योगधंदे महिनाभर सोडावे लागले असतील. पण या सर्वांचा मोबदला रयतेला काय मिळाला, असा प्रश्न कोणी केला तर त्याला 'शून्य' असेंच उत्तर द्यावें लागेल. आतां सरकार कांहीं अनिष्ट बिलें मंजूर करून घेण्याचा उपद्व्याप करूं पाहत होतें. तो प्रयत्न फसला हा फायदा म्हणून वाटेल तर कोणी म्हणावें. पण टळलेलें गंडांतर किंवा संकट हा कोणी फायदा मानीत नाहीं. 'तोटा होणार होता तो वांचला' असें म्हणून त्या टळलेल्या तोट्याची रक्कम कोणीहि हिशेबी वहींत जमेच्या खात्याला लिहीत नाहीं.

असेंब्लीच्या बैठकींतून वरीलप्रमाणें अकरणरूपी तरी फायदा झाला. पण बड्या कौन्सिलच्या दोन आठवड्याच्या बैठकींतून असाच भारी खर्च होऊन वरच्यासारखाहि कांहीं फायदा झाला नाहींच; उलट थोडासा प्रत्यक्ष तोटाच झाला. तो असा कीं, सायमनशीं सहकारितां करण्याकरितां या बड्या नालायकांनीं आपले प्रतिनिधी निवडून असेंब्लीचा एक प्रकारें तेजोभंग केला. या बड्या कौन्सिलाकडे मुख्य काम दोन प्रकारचें असतें. असेंब्लींत ज्या सरकारी बिलांना पराभव होऊन मृत्यु येईल तीं सजीव करावयाचीं किंवा ज्या खाजगी बिलांची तेथें प्राणप्रतिष्ठा होईल त्यांचा संहार करावयाचा. एक काम शुद्ध मारेकऱ्याचें आहे; आणि दुसरें संजीवनाचें असलें तरी शुक्राचार्यांच्या संजीवनाप्रमाणें राक्षसोपयोगी आहे. पण सिमला येथील बैठकींत एका सायमन कमिटीच्या बाबीशिवाय असेंब्लीला इजा किंवा अपशकुन करण्यासारखें कांहीं काम बड्या कौन्सिलाला मिळालें नाहीं. बिचारे कंटाळून गेले. असेंब्लीच्या गॅलरींत येऊन बसणें एवढीच त्यांना करमणूक होती.

असेंब्लीच्या या बैठकींत झालेल्या सरकारी कामाचा विचार प्रथम करूं. सरकारी अशीं पांचचार किरकोळ बिलें मंजूर झालीं, पण त्यांना विरोधहि नव्हता. खऱ्या महत्त्वाचीं अशीं तीन बिलेंच सरकारनें पुढें आणलीं होतीं पण तिघांचे तीन प्रकार झाले– १ बोल्शेव्हिक बिल संपाच्या तडजोडीचें बिल व ३ परराष्ट्रीय राजकारणावरील टीकेचें बिल. यांपैकीं पहिल्याची कड पोंचून तें फेटाळून लावण्यांत आलें. दुसरें सार्वजनिक अभिप्राय मिळविण्याकरितां बाहेर धाडण्यांत आलें. आणि तिसरें नुसतें प्रविष्ठ होऊन तसेंच थबकून राहिलें. आतां यांपैकीं तारतम्यभावानें पाहिलें तर नंबर दोनचें बिलच खरोखर अधिक महत्त्वाचें होतें. कारण मजूरवर्गाला बाधक अशाहि कांहीं गोष्टी जरी त्यांत होत्या तरी त्या वगळून बाकी बिल मंजूर झालें असतें तर हल्लीं चालू असलेले संप मिटविण्याला त्याचा कांहीं उपयोग झाला असता. पण सरळ करील पण तें सरकार कसलें ?

नं. १ चें म्हणजे बोल्शेव्हिक बिल हेंच काय तें सरकारच्या दृष्टीनें खऱ्या महत्त्वाचें बिल होतें. बाकीचें बैठकींतील काम हें सर्व त्याचें पूरण किंवा भरतीदाखल होतें. एक खून पाडण्याकरितां जशी वीस भागांची कादंबरी लिहावयाची, एक लग्न लावण्याकरितां पांच अंकी नाटक लिहावयाचें, किंवा एक विनोदी कोटी करण्याकरितां दहा वाक्यांची उतरंड रचावयाची, त्याप्रमाणें एक बोल्शेव्हिक बिल पास करून घेण्याकरितां सिमल्याच्या २४ दिवसांच्या सगळ्या बैठकीची उभारणी करण्यांत आली होती. कामाचे दिवस हीच गोष्ट ध्यानांत ठेवून ठरविण्यांत येत होते. सरकारी सभासदांच्या नेमणुका याच दृष्टीनें झाल्या होत्या. सरकारी काम लांबविणें किंवा आखडतें घेणें हें याच दृष्टीनें घडत होतें आणि अनुकूल सभासद हजर ठेवणें व प्रतिकूल पळवून लावणें ही कारवाई याच दृष्टीनें चालू होती. उलट लोकपक्षाच्या हातीं भाषणें करणें व मतें देणें एवढीच गोष्ट असल्यामुळें त्यांची व्यवस्था त्यांनींहि याच दृष्टीनें केली होती. तात्पर्य, उभयपक्षींहि सिमल्याच्या बैठकींतील गाण्यांत बोल्शेव्हिक बिल हा एकच वादी सूर लागला होता. या एकाच स्थायिभावांतून इतर विभाव व अनुभाव उत्पन्न होत होते किंवा या एकाच मुख्य रंगांत बाकीचे इतर छटांचे रंग कालविले जात होते, आरतूनपरतून आलें गेलें तरी याच बिलाचें दर्शन व्हावयाचें; पावलें उचलून उचलून टाकलीं तरी याच बिलावर पडून तीं अडखळावयाचीं;

असें सर्व बैठकभर सुरू होतें, आणि ता. ४ रोजीं लोकपक्षाला या बिलामुळें जी काळजी उत्पन्न झाली ती अखेर ता. २४ रोजीं बिल नामंजूर झालें तेव्हांच संपली. पण हेंहि म्हणणें थोडेंसें खरें नव्हे. कारण असेंब्लीच्या रागावर आपला सोटेशाही अधिकार गाजवून व्हाइसरॉयसाहेब हे हेंच बिल 'शिफारस केलेलें बिल' म्हणून फिरून असेंब्लीपुढें तिसरे दिवशीं मांडतील अशीहि एक शंका वाटत होती. पण दुसरे दिवशीं तिचा निकाल लागून आदले दिवसाचा विजय पूर्णपणें लोकपक्षाच्या पदरांत पडला तेव्हांच त्याला हायसें वाटलें.

या बिलाला एकंदरीनें रिझर्व्ह बँक बिलाइतकाच कसून विरोध लोकपक्षाकडून झाला व त्याचा शेवटहि त्या बिलाप्रमाणें कांहींसा अकल्पित रीतीनेंच झाला. या बिलांतील खरें इंगित काय, म्हणजे सरकारनें कोणत्या अंतस्थ हेतूनें हें बिल पुढें आणलें, लोकपक्षानेंहि जाणूनबुजून कांहीं कांहीं वेळां आडमार्गानेंहि जाऊन त्याच्यावर हल्ले कां केले हा विषय मोठा व स्वतंत्र असल्यामुळें त्याचें विवेचन या एका लेखांत करणें शक्य नाहीं. म्हणून तो भाग वगळून या बिलासंबंधीं इतर अंगोपांगांचीं थोडीशी माहिती देऊं. बिलाला अनुकूल असणारांमध्यें मुख्य चार वर्ग होते. (१) अधिकारी सभासद (२) सरकारनें नेमलेल्यापैकीं कांहीं सभासद (३) सर्व खासगी युरोपियन युरेजिअन सभासद व (४) बहुतेक सर्व मुसलमान वर्ग. लोकपक्षापैकींहि कांहीं, पण फारच थोडे सभासद याला अनुकूल होते; पण त्यांतील बहुतेकांनीं मतें न देतां तटस्थ राहून वा गैरहजर राहून आपलें इष्ट कार्य केलें.

तथापि कॉंग्रेस पक्ष, नॅशनॅलिस्ट पक्ष व स्वतंत्र पक्ष यांतील महत्त्वाचे असे सर्व सभासद या बिलाला प्रतिकूलच होते. या प्रसंगीं खरा दगा दिला तो मात्र एकाच गृहस्थांनीं; ते म्हणजे मद्रासचे एम्. के. आचार्य हे होत. हे प्रायः लोकपक्षाकडेच असत. पण गतवर्षीं कॉंग्रेस पक्षाचा राजीनामा दिल्यापासून त्यांनीं जें धोरण पत्करलें त्याचा या प्रसंगीं कळसच झाला! गतवर्षीं लोकपक्षावर एक निर्वाणीचा प्रसंग असतां हे वरच्या गॅलरींत बसून खालचा तमाशा पाहत होते, तर यंदा त्यांनीं बिलाच्या दुसऱ्या वाचनाच्या वेळीं सरकारच्या बाजूला मत देऊन आणि तिसऱ्या वाचनाच्या वेळीं लोकपक्षाकडे मत देतों असें आश्वासन देऊनहि आयत्या वेळीं पोबारा केला. आचार्य यांची मनःप्रकृति अशी कां बिघडली याचें खरें कारण आज न कळतां पुढें लवकरच उमेगल असा कांहीं तज्ज्ञांचा अभिप्राय आहे.

या अशा विपरीत कारणांमुळें तिसऱ्या वाचनाच्या वेळीं वास्तविक सरकारचाच जय व्हावयाचा परंतु तो अकल्पित कारणानें टळला. कारण सरकारच्या बाजूनें ६३ व लोकपक्षाच्या बाजूनें ६१ अशींच मतें पडावयाचीं. पण दैवाला सरकारला आपल्यापरी दगा द्यावयाचा होता म्हणून आयत्या वेळीं दोन युरोपियन सभासदांना गैरहजर राहण्याची बुद्धि झाली. पैकीं सर जेम्स सिंप्सन हे सभागृहाच्या इमारतींत असतांहि दारें लावून घेतल्यामुळें बाहेर अडकून पडले; आणि दुसरे मि. लॅंब हे हॉटेलांत गेले. त्यांना यावयाला किंचित् उशीर लागला. अशा रीतीनें मतांची संख्या उभयपक्षीं समसमान झाल्यामुळें अध्यक्षांच्या मतावरच निकाल अवलंबून राहिला. आणि त्यांनीं लोकपक्षाकडे आपले निर्णायक मत देऊन त्याच्या पदरांत जयाचें माप टाकलें. वास्तविक अध्यक्ष मि. पटेल यांनीं जें केलें तेंच सरळ व रीतसर होतें. त्यांच्या जागीं एखादा युरोपियन अध्यक्ष असतां तरीहि त्याला हीच गोष्ट करणें प्राप्त झालें असतें. म्हणून कर्तव्याच्या कर्तव्य बजावून शिवाय आपल्या मनाला प्रिय अशी गोष्ट साधण्याची संधि दैवानेंच अध्यक्ष पटेल यांना लाभवून दिली.

हीं मतें मोजण्याच्या वेळीं आशा व निराशा यांचा खेळ मोठ्या गमतीचा चालला होता. प्रथम लॉबींतून लोक सांगत आले, त्यांचा अंदाज असा कीं, एक-दोन मतांनीं लोकपक्षाचा पराभव होणार. पण दोनहि लॉबींतलीं मतें मोजण्याचे कागद सेक्रेटरीच्या टेबलाशीं आले ते लवकर अध्यक्षांच्या हातीं जाईनात. तेव्हां अधिकारी वर्गाच्या तोंडावरचा आशेचा तजेला जाऊन लोकपक्षीय सभासदांच्या तोंडावरील निराशेच्या सुरकुत्या मावळल्या. सेक्रेटरीच्या टेबलावर दोनहि कागद निरनिराळ्या लोकांच्या हातीं देऊन मतांची फेरमोजणी दोन-दोनदां सुरू झाली तेव्हां मतांची संख्या सारखी होणार अशी आशा लोकपक्षास उत्पन्न होऊन अधिकाऱ्यांच्या तोंडावरील मावळलेलें तेज यांच्या तोंडावर उगवलें आणि लोकपक्षाच्या तोंडावरची निराशेची छटा अधिकारी सभासदांच्या तोंडावर गेली. शर्यतीच्या मैदानांत धांवणारे घोडे जयस्तंभाच्या आसपास येतांच सट्टेबाज प्रेक्षकांच्या तोंडावर जे बदलणारे आशा-निराशेचे रंग क्षणोक्षणीं पालटतात, त्या वेळीं मनुष्यस्वभावाचा जो अपूर्व देखावा दिसतो तोच या प्रसंगीं असेंब्लीच्या सभागृहांत दिसत होता, असा अभिप्राय एका तज्ज्ञानें दिला तो खराच असला पाहिजे. शेवटीं मतांचे दोनहि

कागद अध्यक्षांचे हातीं गेले तेव्हां ते उभे राहिले, पण त्यांच्या तोंडून शब्द निघेना असें पाहिल्यावर त्या कागदांत काय आहे तें सर्वांना न सांगतां कळून चुकलें. अशा समतोल स्थितींत अध्यक्ष आपलें मत कोणीकडे देणार हें उभयपक्षांनाहि मनांतून ठाऊक असल्यामुळें प्रत्येकानें अखेर निर्णयाचा कयास अध्यक्षांच्या निकालाच्या आधींच करून टाकला. आणि लोकपक्षाच्या बाजूनें टाळ्या सुरू झाल्या. बिचाऱ्या अध्यक्षाला मात्र निःपक्षपातीपणामुळें गांभीर्याशिवाय कोणतीच भावना प्रकट करतां येत नव्हती. आणि खुनी मुकदम्यांत फांशीची शिक्षा फर्मावितांना न्यायाधीश जशी लांबलचक प्रस्तावना करतो तशी करून शेवटीं त्या मताचा दगड त्यांनीं सरकार पक्षाच्या डोक्यांत घातला. तेव्हां लोकपक्षाच्या बाजूला काहूर माजलें. कोणी टाळ्या पिटल्या, कोणी पुढच्या बाकावर आनंदानें हात आपटण्यास सुरुवात केली, कोणी मोठ्यानें हसूं लागले व कोणाला तर 'वंदे मातरम्'चीच आठवण झाली. आणि अशा दंगलींत त्या दिवसाच्या सभेचें काम आटोपलें.

विजय हा खरोखर आपल्या सामर्थ्यावर झालेला नसून प्रतिपक्षाच्या दोघा सभासदांच्या गाफीलपणामुळें झाला या गोष्टीची जाणीव कोणाला नव्हती असें नाहीं. पण विजय तो विजयच. मग तो आपल्या बळावर मिळाला काय किंवा दैवाच्या बळावर मिळाला काय दोनहि सारखींच. दैवानें दिलेला हात केवळ स्वाभिमानामुळें झिडकारण्याइतका मूर्ख या जगांत कोणीच असत नाहीं. शिवाय त्यांत अशीहि जाणीव होती कीं, सत्पक्ष आपला म्हणूनच तर दैवानें आयत्या वेळीं सरकारला दगा दिला. 'दैवमेवात्र पंचमम्' हें सूत्र लिहिणारानें कार्यसिद्धीच्या कारणांत 'दैव' या कारणाचा कायमचाच समावेश पूर्वीच करून ठेवला आहे. सरकारच्या हातीं सर्व सत्ता, अनुग्रह करून लोभी सभासदांना आपल्या हातीं आणण्याचीं सर्व साधनें त्यांना अनुकूल, लोकपक्षाच्या हातीं यांतलें आज कांहींच नाहीं यामुळें सरकारचा पक्ष डोळस व लोकपक्ष आंधळा ही गोष्ट उघड आहे. तेव्हां 'आंधळ्याच्या गाई देव राखतो' या म्हणीप्रमाणें न्यायबुद्धीनें दैवानें तो पक्ष उचलून धरिला तर त्यांत वावगें तें काय ? अशा रीतीनें युक्तिवाद करून आपल्या आनंदानें स्वारस्य कायम ठेवण्याइतकी सहृदयता लोकपक्षाच्या अंगीं सहजच दिसून आली.

असो. आतां इतर कामासंबंधानें थोडें पाहूं. सरकारचें दुसरें एक बिल नुसतें प्रविष्ट होऊन राहिलें. पण सर डेनिस ब्रे हे आजारी असल्यामुळें त्यांचें

पाऊल पुढें पडूं शकलें नाहीं. बोल्शेव्हिक बिलाचा रोख परदेशीय कम्युनिस्टांवर होता तर या दुसऱ्या बिलाचा रोख देशी वर्तमानपत्रकारांवर होता. यांतील मुख्य कलम एकच होतें तें असें कीं, ब्रिटिश सरकार व कोणतेंहि परराष्ट्रीय सरकार यांच्या दरम्यानच्या स्नेहभावाला बाध येण्यासारखे लेख कोणी लिहील किंवा बातमी प्रसिद्ध करील तर त्याला शिक्षा व्हावी. या कलमाप्रमाणें कोणत्याहि गोऱ्या पत्रकावर कधीं खटला व्हावयाचा नाहीं हें ठरलेलेंच आहे. येऊन जाऊन देशी वर्तमानपत्रकारांवर गदा यावयाची. बरें, परराष्ट्रीय राजकारण हें सरकारनें आपण होऊन पडद्यांतल्या बिबीसारखें करून ठेवलें आहे. तिचें दर्शन कोणास कधीं व्हावयाचें नाहीं. वरिष्ठ कायदेमंडळांतहि तिचें नांव कोणी घ्यावयाचें नाहीं किंवा स्वरूपवर्णन करावयाचें नाहीं असे कायमचे कडक नियम करून ठेवले आहेत.

पण या पडद्यांतल्या बिबीच्या गुप्त कृत्यांना हिंदुस्थानबाहेर वाचा फुटल्याशिवाय राहत नाहीं. विलायतेंतील पत्रें या विषयाची चर्चा नित्य करतात, इतकेंच नव्हे तर भोकराची बी चुकून वर उडाली असतां वानरें जशीं एकाहून एक वर उड्या मारण्याचा खेळ खेळतात, त्याप्रमाणें हीं पत्रें खोट्या बातम्या देऊन व कल्पनातरंग उठवून आपलें गिऱ्हाईक वाढविण्यांत तत्पर असतात. बरें, इंग्लंडबाहेरचीं वर्तमानपत्रेंहि त्यांचीं भावंडें. लोकसत्ताक राज्यांत तर या गोष्टीला अधिकच स्वातंत्र्य आणि परदेशी वर्तमानपत्रें परभाषेंत निघत असलीं तरी त्यांच्या मजकुरांचीं भाषांतरें हिंदुस्थानांत वाचावयास मिळतात. शिवाय मूळ जर्मन, फ्रेंच इ. भाषेंतील सर्व पुस्तकें व पत्रें वाचणारे लोक हिंदुस्थानांत आहेतच. अर्थात् उत्तर-प्रत्युत्तर, वादसंवाद, शंकासमाधान या दृष्टीनें परराष्ट्रीय मजकूर हिंदी पत्रांत प्रसिद्ध झाला व त्यामुळें आमचे परराष्ट्रीय स्नेहसंबंध बिघडतात असें सरकार म्हणूं लागलें तर जुलूमच झाला. पण हें बिल दिल्लीच्या बैठकीवर सोंपविण्यांत आलें असल्यामुळें यामुळें तूर्त तरी त्याचा वाद मिटला म्हणावयाचा.

## ( उत्तरार्ध )

**याशिवाय** जें इतर कांहीं काम सिमल्यास झालें त्या विषयीं थोडेंसें लिहितों. प्रथमतः निमसरकारी अशा स्वरूपाचें जें काम झालें तें घेऊं. यांत दोनतीन कलमें येतात. पहिलें असें कीं, असेंब्लीच्या सेक्रेटरीचें ऑफिस यापुढें

स्वतंत्र होणार असा रंग दिसतो. हें ऑफिस आणि सरकारी कायदेकानूचें ऑफिस हीं आजवर एकाच मुख्य अधिकाऱ्याच्या हातीं होतीं. यामुळें या खात्याच्या मुख्य सेक्रेटरीचाच अंमल दोनहि ऑफिसांवर चालत होता. १९२५ सालपर्यंत ही व्यवस्था ठीक होती. कारण असेंब्लीचा अध्यक्ष हा सरकारी नोकर होता. पण त्या वर्षापासून अध्यक्ष स्वतः असेंब्लीनेंच निवडावा असें ठरलें व त्याप्रमाणें ना. पटेल हे पहिले अध्यक्ष झाले. नंतर लवकरच हीं ऑफिसें स्वतंत्र व्हावीं असा प्रश्न पटेल यांनीं उपस्थित केला व गव्हर्नर जनरल यांनीं ही सुधारणा मान्य केली. परंतु या सुधारणेस अर्थात् अधिक खर्च लागणार होता, व त्याची तजवीज माजी फडणवीस सर बेसिल ब्लॅकेट हे करीनात. यामुळें ही सुधारणा अडकून पडली. शिवाय नवीन सुधारणेस स्टेट सेक्रेटरीची मंजुरी मिळविण्याच्या सबबीवर सरकारानें ती लांबणीवर टाकली.

पण सर बेसिल ब्लॅकेट हे गेल्यावर पटेल यांनीं हा प्रश्न यंदा नेटाला लावला. त्याचा परिणाम असा झाला कीं, व्हाइसरॉयसाहेबांना हा प्रश्न हातीं घ्यावा लागला. त्यांनीं असेंब्लींतील निरनिराळ्या पक्षांच्या पुढाऱ्यांना घरीं चर्चेला बोलावलें व तडजोडीच्या स्वरूपाचा एक ठराव सर्वानुमतें मंजूर करून घेतला व तो भरसभेपुढें मांडण्यांत आल्यावर असेंब्लीनेंहि मंजूर केला. या ठरावानें पटेल यांना हवी होती तशी व्यवस्था सर्वस्वीं सिद्ध झाली नाहीं. परंतु वरील ऑफिसें यापुढें स्वतंत्र होतील व येत्या अंदाजपत्रकांत त्यांच्या खर्चाची मागणी करण्यांत येईल. नवीन व्यवस्थेप्रमाणें असेंब्लीचा सेक्रेटरी व असिस्टंट सेक्रेटरी यांची नेमणूक, ते कायमचे व मोठ्या पगाराचे नोकर असल्यामुळें, यापुढेंहि सरकारच करील व त्यांची बहाली, बदली, बडतर्फी, सिव्हिल सर्व्हंटांप्रमाणें सरकारच करील; परंतु या दोन अधिकाऱ्यांच्या खालच्या दर्जाचे नोकर नेमणें व काढणें किंवा त्यांना दंड-शिक्षा करणें या गोष्टी करण्याचा अधिकार व्हाइसरॉय यांच्या सल्ल्यानें अध्यक्ष चालवूं शकतील. या सुधारणेमुळें पार्लमेंटच्या क्लार्कच्या ऑफिसाप्रमाणें असेंब्लीच्या सेक्रेटरीचें ऑफिस अध्यक्षाच्या द्वारें असेंब्लीच्या हातीं येईल. ही बरीच प्रगति होय.

दुसरें कलम अध्यक्षांच्या मानापमानाचें. ना. पटेल हे सरकारच्या तंत्रानें न वागतां आपलें काम स्वतंत्रपणें करतात व याचा उपयोग लोकपक्षाला फार

होतो अशी तक्रार अलीकडे अधिकारी वर्ग खासगी रीतीनें आपापसांत करीत असे आणि अँग्लो-इंडियन पत्रें हें या वर्गाचें मुख असल्यामुळें त्यांच्या द्वारें त्यांच्या नाखुषीचे व रागाचे फूत्कार बाहेर पडत. उलट अध्यक्षांना याचा प्रतिकार करण्यास मार्ग नव्हता. पण हीं पत्रें यामुळें शेफारून जाऊन त्यांनीं पटेल यांची उघड उघड बदनामी करण्यापर्यंत पाळी आणिली होती. अलीकडे पटेल यांनीं ब्रह्मदेश व हिंदुस्थानांतील प्रांतिक कायदेमंडळें यांना भेटी दिल्या व त्यांच्याशीं कामकाजाची चर्चा केली. या दौर्‍यांतून पटेल यांचा जाहीर सत्कार झाला व त्यांना अनेक ठिकाणीं मानपत्रेंहि देण्यांत आलीं. ही गोष्ट सहन न होऊन सरकारी खर्चानें पटेल हे आपला बडेजाव वाढवितात अशी उघड टीका या पत्रांनीं केली. तसेंच लॉबीमध्यें खासगी बोलतांना अधिकारी लोकांनीं अध्यक्षांच्या कामावर उघड टीका चालविली. ही गोष्ट पं. मोतिलाल नेहरू यांनीं असेंब्लीपुढें मांडून गवगवा केला; तेव्हां व्हॉइसरॉय हे मध्यें पडले व त्यांनीं होममेंबर मि. क्रेरर यांची कानउघाडणी करून त्यांजकडून असेंब्लीमध्यें अध्यक्षांची माफी मागविली, व अशा रीतीनें हें प्रकरण सामोपचारानें निकालांत काढलें. हा पटेल यांचा विजयच होय.

पण ज्या वर्तमानपत्रांनीं बदनामी केली त्यांना शासन कसें व्हावयाचें ? सुदैवानें हा अधिकार स्वतः अध्यक्षांच्या हातींच असल्यावर मग ते या कामीं दुसर्‍याच्या तोंडाकडे कशाला पाहतील ? खुद्द सरकारचीच माफी हातीं येई-पर्यंत पटेल गप्प बसले. आणि या मुदतींत या वर्तमानपत्रकारांनीं स्वतःच उमजून माफी मागावयाची, ती न मागितल्यामुळें पटेल यांनीं आपला अधिकार चालविला. असेंब्लीची सर्व इमारत अध्यक्षांच्या ताब्यांत असते; आणि सभासदांनीं कोठें बसावें हेंच काय पण प्रेक्षक म्हणून कोणाला येऊं द्यावें न द्यावें, त्यांनीं कोठें बसावें, कोणत्या वर्तमानपत्रकाराच्या बातमीदाराला येऊं द्यावें न द्यावें व त्यांनीं कोठें बसावें हा सर्व अधिकार अध्यक्षांना असतो. ज्या बातमीदारांनीं पटेल यांची बदनामी केली, ते इसम बर्ट व राईस या नांवाचे होते. त्यांतला एक मुंबईच्या टाइम्सचा बातमीदार होता. पटेल यांनीं या बातमीदारांना व त्यांच्या पत्रांना असें शासन केलें कीं, ता. २५ सप्टेंबरच्यापुढें त्यांनीं व त्यांच्या पत्रांनीं झाल्या अपराधाबद्दल अध्यक्षांची माफी मागून ती रीतसर प्रसिद्ध केल्याशिवाय त्यांना असेंब्लींत येण्याची परवानगी देऊं नये व त्यांना नेहमींप्रमाणें सरकारी कागदपत्र धाडूं नयेत. हा

हुकूम पुढच्या जानेवारीपासून म्हणजे दिल्ली येथील बैठकीपासूनच उघडपणें अमलांत आलेला दिसणार आहे. तरी आतां दरम्यान हीं कुटाळ पत्रें व त्यांचे आगलावे बातमीदार माफी मागून प्रायश्चित्त घेतात कीं नाहीं हें कळेलच.

सिमल्याच्या बैठकींत कांहीं कमिट्या नेमल्या गेल्या. पैकीं सरकारी व्यापारी खात्याला सल्ला देणारी एक कमिटी होय. अशा कमिटीला प्रत्यक्ष अधिकार कांहीं नसतात. परंतु कोणताहि अधिकार चालविण्यापूर्वीं खात्याच्या कामकाजाची माहिती असणें जरूर असतें. ती माहिती या कमिटींतील लोकांना निरनिराळ्या प्रसंगीं मिळूं शकते. इतका तरी उपयोग खचित आहे. याहून महत्त्वाची कमिटी नेमली गेली ती रेल्वेसंबंधीं. सुमारें तीन वर्षांमागें सरकारी रेल्वे खातें व फडणिशी खातें यांची फारकत करण्यांत आली. ती असेंब्लीच्या संमतीनेंच झाली होती, व तें करणें योग्यहि होतें. परंतु हा केवळ प्रथम प्रयोगच असल्यामुळें तो कितपत यशस्वी झाला हें पाहण्यासाठीं ही कमिटी नेमण्यांत आली आहे. तिच्या रिपोर्टावर पुष्कळशा महत्त्वाच्या गोष्टी अवलंबून आहेत. आजवर रेल्वेचें हिशेबी खातें व हिशेबतपानिशी खातें हीं एकत्र असत. अलीकडे कांहीं रेल्वेवर तीं वेगवेगळीं करण्यांत आलीं आहेत. हाहि प्रयोग असेंब्लीच्या संमतीनें झाला व यशस्वी ठरला म्हणून तो यापुढेंहि चालू ठेवावा असें एका ठरावानें ठरलें. रेल्वे क्लिअरन्सचीं ऑफिसें कशीं कोठें ठेवावीं व वांटावीं हा एक महत्त्वाचा प्रश्न आहे. पण त्याचा निकाल अद्यापि लागावयाचा आहे.

संमतिवयाच्या चौकशीची कमिटी पूर्वींच नेमली गेली असून तिचें कामहि सुरू आहे. ही कमिटी मूळ असेंब्लीमधील चर्चेतून निष्पन्न झाली असल्यानें तिजवर तिचे कांहीं सभासद नेमले जातील अशी अपेक्षा होती. पण सरकारनें या कामीं असेंब्लीवर बहिष्कार घातला. पुढें या कमिटीच्या खर्चाचा प्रश्न फायनॅन्स कमिटीपुढें आला. तेव्हां या रागावर तिनें तो खर्च नामंजूर केला. तेव्हां सरकारनें असेंब्लीचे कांहीं सभासद कमिटीवर नेमण्याचें कबूल केलें अशा रीतीनें नाक दाबल्यानें तोंड उघडलें. पण उघडलेल्या तोंडांतून अद्यापि कांहीं बाहेर आलेलें दिसत नाहीं. स्त्रीशिक्षणासंबंधानें मात्र एक कमिटी सरकारनें नेमण्याचें कबूल केलें आहे व ती नेमतांना पूर्वींची चूक पुनः होणार नाहीं असें वाटतें. शेवटीं एकाच कमिटीबद्दल सांगण्याचें राहिलें. ती सायमन-सहकार कमिटी. बड्या कौन्सिलानें प्रत्यक्ष सहकाराचा ठराव मंजूर केल्यामुळें

त्यांच्यांतून एक कमिटी 'निवडण्या'चा अधिकार सहजच प्राप्त झाला. पण असेंब्लीनें दिल्ली येथें सहकाराची सूचना फेटाळून लावली, व ती सूचना फिरून सिमल्याच्या बैठकींत आणण्याचें धैर्य सरकारला झालें नाहीं. तेव्हां असेंब्लीच्या कमिटीच्या ऐवजीं सरकारनेंच आपले मानसपुत्र उत्पन्न करावे अशी सूचना विलायतेहून सर जॉन सायमन यांनीं केली व ती मान्य करून सरकारनें असेंब्लीचे सहा सभासद या कामावर नेमले आहेत. हे सभासद कोणत्या मताचे असतील याची कल्पना कोणालाहि न सांगतां होईलच.

आतां खासगी कामाचा विचार करूं. नेहमींप्रमाणें या कामाला थोडेच दिवस मिळाले होते, व त्यांतहि म्हणण्यासारखें असें खासगी काम फारसें झालें नाहीं, महत्त्वाचा असा कोणताच ठराव मंजूर झाला नाहीं. पं. कुंझरू याचा हिंदी सैन्यासंबंधानें एक ठराव चर्चेला निघणार होता, पण तो वाद-ग्रस्त होणार व नेहरू कमिटीच्या रिपोर्टाच्या दृष्टीनें तो आज पुढें येणें इष्ट नाहीं असें पुढाऱ्यांचें मत पडलें. आणि अध्यक्षांनींहि त्या दिवशीं नेहमीं-पेक्षां लवकर काम आटोपल्यामुळें कुंझरू यांचा आग्रह असतांहि तो पुढें येऊं शकला नाहीं. खासगीं बिलें पुष्कळशीं प्रविष्ट झालीं, परंतु त्यांपैकीं एकहि दुसऱ्या वाचनापर्यंत गेलें नाहीं. नाहीं म्हणावयाला मि. साराभाई हाजी यांचें 'कोस्टल ट्रॅफिक रिझर्व्हेशन' बिल सिलेक्ट कमिटीकडे बहुमतानें पाठविण्यांत आलें. मि. हाजी यांच्या या बिलाचा उद्देश असा आहे कीं, हिंदु-स्थानच्या किनाऱ्यालगत चालणाऱ्या वाहतुकीचे व्यवहारांत फक्त हिंदी जहाजांनाच परवानगी असावी. या बिलाला सरकार व युरोपिअन व्यापारी यांच्याकडून कसून विरोध झाला. कारण त्यामुळें इंग्रज भांडवलवाल्या कंपन्यां-च्या तोंडांतला घास निघणार. पण सुदैवानें असेंब्लींत या बिलाला बहुमत मिळालें. बिलाला अजून पुढें पुष्कळच गंडांतरें आहेत. पण इतकी तरी मजल पोंचली हेंच पुष्कळ झालें.

याशिवाय पुढें न आलेल्या बिलांत गौर यांचीं कांहीं बिलें व हरविलास शारदा यांचें एक बिल हीं प्रमुख होत. हिंदु स्त्रियांच्या वारसाहक्काच्या सुधारणेसंबंधींहि असेंच एक बिल बड्या कौन्सिलांत मंजूर होऊन आलें होतें, पण त्यांतील कोणालाच थारा मिळाला नाहीं. शारदा यांच्या बिलाचा हेतु मुलांमुलींच्या लग्नाची प्राथमिक मर्यादा ठरविण्याचा आहे. प्रथम या बिलाला प्रागतिक मताच्या लोकांकडून आश्रय मिळाल्यामुळें तें सिलेक्ट-

कमिटीकडे गेलें, पण तिकडून ज्या स्वरूपांत तें परत आलें त्यामुळें आतां प्रागतिक मताचे लोकहि त्याला प्रतिकूल झाले आहेत. पूर्वीं मुसलमान वर्गानें त्याला पाठिंबा दिला होता. पण त्यानंतर अलीकडे त्या विरुद्ध 'फतवे' निघाल्यामुळें मुसलमान सभासदांचें मत फितविलें गेलें. या बिलांतील वयोमर्यादा सुशिक्षित वर्गाला फारशी जाचक नाहीं. पण त्यामुळें अशिक्षित वर्गांवर फारच जुलूम होणार आहे. त्यांतूनहि कायद्यानें ठरविलेल्या वयोमर्यादेच्या आंत लग्न केल्याबद्दल चुणूक म्हणून थोडासा दंड-बिंड ठेवला गेला असता तर गोष्ट वेगळी होती. पण या 'गुन्ह्याला' ऐनजिनसी तुरुंगवासाची शिक्षा ठेवली गेल्यामुळें तें बिल हातांत धरण्यालाहि आपात्र झालें आहे. सुधारणा खरी, पण ती कशी घडवून आणावी याविषयीं विवेक सुटला म्हणजे असेंच व्हावयाचें.

---

# बोरघाटांतील रिव्हर्सिंग स्टेशन

(केसरी १९२८)

पुण्याहून मुंबईस जाणाऱ्या आगगाडीच्या रस्त्यावर सह्याद्रींतील प्रसिद्ध बोरघाट येतो हें बहुतेकांस माहीतच आहे. या घाटामधील अनेक आश्चर्यांपैकीं रिव्हर्सिंग स्टेशन हें एक आश्चर्य होय. हें स्टेशन काढून टाकून तेवढ्यापुरता वेगळा रस्ता बांधण्याचें काम गेलीं थोडीं वर्षें चालू असून तें आतां बहुतेक पुरें झालें आहे. फक्त त्या रस्त्यानें आगगाड्यांची रहदारी सुरू व्हावयाची असून तिला प्रारंभ एप्रिल सन १९२९ मध्यें होईल असा अंदाज आहे. रिव्हर्सिंग स्टेशन कसें टाळतां आलें व त्याऐवजीं नवीन बांधलेल्या रस्त्याचें स्वरूप काय आहे याची माहिती पुष्कळांस व्हावी असें वाटत असेल यामुळें व ती शिल्पशास्त्रांतील हिंदी लोकांची प्रगति या दृष्टीनें महत्त्वाची असल्यामुळें देण्याचें योजिलें आहे; पण ती चांगली लक्षांत येण्यास बोरघाटांतील रस्त्याची वाचकांस नीट कल्पना असणें जरूर आहे, म्हणून प्रथम तीच माहिती देत आहों.

बोरघाटाची मर्यादा खंडाळा ते कर्जत इतकी आहे. मुंबईहून पुण्यास यावयास हाच काय तो मुख्य मार्ग. ब्रिटिश अमदानींत त्यांतून प्रथम गाडी-

रस्ता झाला व मागाहून आगगाडीचा रस्ता बांधण्यांत आला. त्यापूर्वी लमाण लोक बैल व रेडे यांजवर लादून कोंकणांतील माल घाटावर व घाटावरचा माल कोंकणांत नेत असत. अशा बिकट स्थळांतून गाडीरस्ता बांधणें कठीण व आगगाडीचा रस्ता बांधणें त्याहून कठीण. आगगाडीचा रस्ता बांधतांना कित्येक ठिकाणीं दऱ्या भरून काढाव्या लागतात, दोन टेकड्यांस जोडणारे पूल बांधावे लागतात व समोर डोंगराचा फार मोठा उंचवटा आडवा आल्यास तो सबंध चढून जाण्याऐवजीं त्याच्या पोटांतून बोगद्याचें विवर पाडून पलीकडे पोंचणें श्रेयस्कर असतें.

हे सर्व प्रकार बोरघाटांत पाहावयास सांपडतात. त्या सर्वांत रिव्हर्सिंग स्टेशन फार प्रेक्षणीय होय. रिव्हर्सिंग स्टेशन प्रेक्षणीय असलें तरी तें प्रेक्षणीय व्हावें यासाठीं त्याची योजना केलेली नाहीं. तें ठिकाणच असें चिंचोळें आहे कीं, अशा प्रकारची तोड त्याजवर काढल्यावांचून पुढचा मार्ग निघणार नव्हता. पुढें जावें म्हटलें तर समोर रुंद व खोल दरी येते व जागा अगदीं अरुंद असल्यानें गाडीला वळणहि मारतां येत नाहीं. यासाठीं गाडीस तेथें थांबवून व तिचें तोंड बदलून तिला डोंगराच्या चिंचोळया तोंडाच्या दुसऱ्या बाजूनें न्यावें लागतें. या रस्त्याची बांधणी १८६० सालीं सुरू झाली व ती १८६३ त संपली. म्हणजे गेलीं पासष्ट वर्षें रिव्हर्सिंग स्टेशनावरून गाड्यांची वाहतूक सुरू आहे व ती तशीच पुढेंहि सुरू राहिली असती. परंतु रिव्हर्सिंग स्टेशन ही सोय नसून अडचण आहे असें अलीकडे जाणवूं लागलें व तें एक मनोवेधक स्थळ असलें तरी त्याचा लोभ सोडणें भाग पडलें.

## बोरघाटाचें व्यापारी महत्त्व

बोरघाटाची जरूरी मुंबई व पुणें या दोन शहरांनाच केवळ आहे असें नाहीं; तर त्याच्या ताब्यांत दक्षिण-हिंदुस्थानापैकीं फार मोठ्या प्रदेशाचा व्यापार आहे. हा व्यापार गेलीं पासष्ट वर्षें एकसारखा वाढत आहे. सदर घाटांतून दररोज साठ गाड्या जातात येतात इतकें सांगितलें असतां त्यांतील व्यापाराची कोणासहि सहज अटकळ बांधतां येईल. तथापि गाड्यांची हीहि संख्या अपुरी पडते. ही उणीव दोन प्रकारांनीं भरून काढतां येण्यासारखी आहे. गाड्यांची संख्या वाढवून किंवा प्रत्येक गाडींतील डब्यांची संख्या वाढवून. गाड्यांची संख्या वाढविणें तूर्त अशक्य दिसतें. वाढली

तर डब्यांचीच संख्या वाढेल. सांप्रत मोठ्या मालगाडीस कमाल म्हणजे तीस-पस्तीस डबे असतात. याहून अधिक डबे वाढविण्यास दोन अडचणी उभ्या राहतात. पहिली अडचण ही कीं, कर्जतपासून खंडाळ्याकडे गाडी वर चढवितांना तिला खेंचण्यास दोन एंजिनें लागतात व या दोन एंजिनांना हल्लींहून अधिक लांबीची गाडी झेपणार नाहीं. आणि दुसरी अडचण अशी कीं, अधिक लांबीच्या गाडीस रिव्हर्सिंग स्टेशनावर उभें राहण्यास जागा नाहीं व ही जागा जास्ती वाढविण्यासहि डोंगराच्या त्या चिंचोळ्या सोंडेवर माया नाहीं. कारण त्या सोंडेवर तीनहि बाजूंस खोल व रुंद तोंडाच्या दऱ्या आहेत. यांपैकीं सोंडेच्या टोकासमोर असलेली दरी ही काय ती भरून काढावयाची किंवा तिजवर पूल टाकून दरीच्या पलीकडच्या बाजूस ती जोडावयाची. पण ही दरी आठशें फूट लांब व एकशेंतीस फूट रुंद असल्यामुळें हें काम अत्यंत अवघड व खर्चाचें म्हणून त्याचा विचार सोडून देणें भाग पडलें आणि त्याऐवजीं हल्लींच्या रस्त्यांत रिव्हर्सिंग स्टेशनापुरता बदल करून नवीन रस्ता आंखणेंच श्रेयस्कर ठरलें.

हा नवीन रस्ता जुन्या रस्त्याप्रमाणें लांब, रुंद व उंच अशा डोंगरांच्या रांगांमधून जातो. त्याची सुरुवात मुंबईहून पुण्यास यावयाच्या रस्त्यावर ७४ व ७५ या मैलांच्या दरम्यान होते व तो खंडाळा स्टेशनापाशीं पुनः जुन्या रस्त्याला येऊन मिळतो. रस्त्याच्या या दोन टोकांमधील उंची २८० फूट आहे. ही उंची रस्ता बांधून कशी भरून काढावयाची हा प्रश्न. जुन्या रस्त्यानें ही उंची दर १०० फुटांस २·८७ फूट या प्रमाणांत भरून काढली आहे व इतरत्र प्रमाण दर १०० फुटांस २·६४ फूट असें आहे. चढाव जास्ती खडा ठेवला तर रस्त्याची लांबी कमी होते व कमी ठेवला तर रस्त्याची लांबी वाढते. पण चढाव वाढविल्यानें गाडी खेंचणें प्रयासाचें होतें. या बाबतींत तीन योजना पुढें आल्या व त्यांपैकीं दर १०० फुटांस चढावाचें प्रमाण २·६४ फूट ही योजना पसंत करण्यांत आली. सदर योजनेनें नवीन रस्ता २·११ मैल लांबीचा ठरला. त्या रस्त्याचा चढाव संथ आहे व वळणेंहि सोपीं आहेत. त्यासाठीं ६३ लक्ष रुपये खर्च येईल असा अंदाज झाला. इतर दोन योजनांपेक्षां हा खर्च अधिक असला तरी तो ५-७ वर्षांत सहज भरून येणार असल्यानें हीच योजना मान्य करण्यांत आली.

या नवीन रस्त्यावर महत्त्वाचीं कामें तीन होत. एक मोठमोठ्या भरावाचें काम, दुसरें डोंगरांतील खोदकाम व तिसरें तीन बोगद्यांचें काम. बोरघाटांतील बहुतेक फत्तर ज्वालामुखीच्या रसाचा बनला असल्यामुळें कित्येक ठिकाणीं आडवा येणारा डोंगर खोदून काढण्यापेक्षां बोगदा पाडणेंच कमी खर्चाचें असा अनुभव आला. तथापि बोगद्याचें काम एकंदरींत धोक्याचें खरेंच. बोगदा पाडण्यापूर्वीं त्यांत सांपडऱ्या दगडांची रचना, त्यांचे गुणधर्म यांची माहिती आगाऊ करून घ्यावी लागते. दगड पक्का असेल तर त्याजपासून धोका कमी असतो. नवीन तीन बोगद्यांपैकीं शेवटचा म्हणजे मुंबईच्या बाजूचा बोगदा थोडासा कठीण दगडांतून व बाकीचा मऊ मुरुमांतून पोखरावा लागला. तो खोदतांना सर्व बाजू लांकडांनीं बांधून घेण्यांत आल्या. प्रथम सहा-सात फूट लांबी तयार करून घ्यावयाची, त्यामागून सिमेंटाची कमान बांधावयाची व मग पुढचें खोदकाम चालू करावयाचें अशा क्रमानें मऊ भागांतील बोगदा वाट काढीत असतो.

### मोठा बोगदा

वरील तीन बोगद्यांपैकीं खंडाळा स्टेशनाजवळचा बोगदा सर्वांत लांब म्हणजे ३१०० फूट आहे. बोगद्याची जागा निश्चित झाल्यावर तो दोनहि तोंडांनीं एकदम खोदला जातो. तसें करतांना या बोगद्याचीं दोन तोंडें कामास अपुरीं पडलीं. तेव्हां बोगद्यावरील डोंगराच्या माथ्यापासून आंतपर्यंत भोंक पाडून त्यांतून फोडलेले दगड वगैरे माल विद्युच्छक्तीनें चालणाऱ्या पाळण्याच्या साहाय्यानें काढून घेण्यांत येत असे. दुसरा बोगदा एक हजार फूट लांबीचा आहे व त्यांतील सर्व दगड पक्का आहे. तीनही बोगद्यांचा आकार सारखाच ठेवण्यांत आला असून त्यांतून जी. आय. पी. च्या दोन गाड्या एकाच वेळीं शेजार-शेजारच्या रुळांवरून जाऊं शकतात. बोगद्यांतील खोदकाम सुरुंगानें झालें. सुरुंगाकरितां घ्यावयाचीं भोंकें मजुरांनीं पहारांनीं पाडलेलीं नसून हवेनें फिरणाऱ्या यंत्रांकडून पाडण्यांत आलीं. सुरुंगास जेलिग्नाइट या जातीची दारू वापरलेली होती. कारण या दारूनें दगड कितीहि कठीण असला तरी तो फुटतो. तीन नव्या बोगद्यांची खोदाई ४० लक्ष घन फूट झाली व बाहेरील खोदकाम ५० लक्ष घनफुटांपर्यंत गेलें. सर्व रस्ता डोंगरांतून असल्यामुळें त्याच्या आजूबाजूस मोठमोठे कडे कोसळलेले आहेत. त्यांचा उपसर्ग रस्त्यास न व्हावा यासाठीं शंभर शंभर फूट रुंद असे ओटे

घालण्यांत आले आहेत. या नव्या रस्त्यावर दोन मोठे पूल आहेत. त्यांपैकीं एक ४५ फूट उंच असून त्यांतील बांधकाम एक लक्ष घनफूट आहे.

### दातार ब्रदर्स

हिंदुस्थानांत बोगद्याचीं कामें फार थोडीं आहेत व तीं कामें वरचेवर होणारींही नसतात. आजपर्यंत हीं सर्व कामें युरोपियन कंपन्यांनींच केलीं. यामुळें त्या बाबतींत येणाऱ्या अनुभवाचा फायदा युरोपियनांनाच मिळाला. नवीन शिल्पकलेंत हिंदी लोकांचा प्रवेश आतां कोठें होऊं लागला आहे. युरोपियन कंपन्यांप्रमाणें हिंदी कंपन्याहि आगगाड्यांचे रस्ते व मोठाले पूल यांसारखीं कामें हातीं घेत असून महाराष्ट्रांतील दातार ब्रदर्स व रानडे ब्रदर्स इत्यादिकांनीं या बाबतींत बरीच आघाडी मारली आहे. बोगद्यासारखें काम क्वचित् होणारें असल्यामुळें त्याचा अनुभव कोणाहि हिंदी कंपनीस नव्हता. तो अनुभव आपणास लाभावा व तसलेंहि काम हिंदी कंपन्यांना उत्तम प्रकारें शेवटास नेतां येतें हें सिद्ध करतां यावें या महत्त्वाकांक्षेनें पुण्यांतील दातार ब्रदर्स यांनीं बोरघाटांतील नव्या कामाच्या एकतृतीयांश भागाचा मक्ता घेतला व तें काम केवळ हिंदी इंजीनियरांच्या मदतीनेंच पार पाडलें ही गोष्ट त्यांस भूषणावह होय यांत शंका नाहीं. बाकीचा दोनतृतीयांश भाग टाटा कंपनीकडे होता. पण टाटा कंपनी ही खास स्वदेशी कंपनी नव्हे. तिचें सगळेंच भांडवल हिंदी आहे असें नाहीं व तिच्या कामावर देखरेख करणारे सगळे अधिकारी हिंदीच असतात असेंहि नाहीं. या दृष्टीनें दातार ब्रदर्स यांचें काम सर्वस्वीं शुद्ध स्वदेशी असल्या कारणानें त्याचें महत्त्व वाचकांच्या लक्षांत येऊन हिंदी लोकांस ज्या ज्या क्षेत्रांत संधि मिळेल त्या त्या प्रत्येक क्षेत्रांत ते युरोपियनांची बरोबरी करूं शकतात अशी त्यांची खात्री होईल.

---

## दिल्लीचीं बातमीपत्रें

### पत्र नं. १

ता. १-२-२९

दिल्लीची हवा यंदाहि नेहमींप्रमाणें हिमालय पर्वतावरून आलेली असली तरी, खुद्द असेंब्लीची हवा हिंदुकुश पर्वतावरून अफगाणिस्थानच्या मार्गानें आलेली आहे! सभासद लोकांना त्या हवेचा स्पर्श दिल्लीला येऊन

पोंचण्यापूर्वी आपापल्या घरींच झाला होता. म्हणून कांहींनीं घरांतून निघण्यापूर्वींच अफगाणिस्थानसंबंधींचे प्रश्न सरकारला विचारण्याकरितां पाठवून दिले होते. पण नाटक लांबल्यामुळें जसें तें कंटाळवाणें होतें तसें या अफगाणिस्थानाच्या प्रकरणाचें झालें आहे. दिल्लीस आल्यावर पाहतात तों या नव्या प्रकरणाची नवाई राहिली नाहीं व नवलाईहि राहिली नाहीं. अफगाणिस्थानच्या प्रकरणाशीं इंग्रजांच्या कारस्थानी धोरणाचा संबंध आहे हा संशय अजून कोणाच्याहि मनांतून पुरा गेलेला नाहीं. पण आधींच लोकांना अफगाणिस्थानची माहिती थोडी व ऐकीव. सरकारी मार्गानें येणाऱ्या बातमीवर कोणाचाहि विश्वास नाहीं. स्वतंत्र रीतीनें येणारी बातमी फारच थोडी व रोज अफगाणिस्थानचे नवीन नवीन घोटाळे दृष्टोत्पत्तीस येऊं लागल्यामुळें, आपण प्रश्न विचारतों त्याचें निशाण सरकारला बरोबर लागेल कीं, भलत्या दिशेला गोळी जाईल याची लोकांना खात्री वाटेनाशी झाली.

* * *

लोक कोणतें लक्ष्य डोळ्यांपुढें ठेवून निशाणबाजी करीत आहेत हें सरकारला पुरें माहीत असल्यामुळें त्यांनीं यांचा नेम चुकविण्याकरितां किंवा निष्फळ करण्याकरितां, मध्यें गेंड्याच्या कातड्याच्या जाड व भल्या मोठमोठ्या मिथ्या वादाच्या ढाली उभ्या करून ठेविल्या आहेत. यामुळें प्रश्न विचारले जातात, उत्तरें दिलीं जातात, पण गोळी कोठेंच लागत नाहीं व निशाण पडलेलें दिसत नाहीं. इतर शहरांप्रमाणें दिल्ली येथें हिंदु-मुसलमानांची मिळून मोठी सभा भरून, अमीर अमानउल्ला याला सहानुभूति प्रकट करण्यांत आली. पण चोर पकडणाऱ्या लोकांच्या घोळक्यांत स्वतः चोर शिरले म्हणजे जसा गोंधळ होतो, त्याप्रमाणें सरकार देखील अफगाणिस्थानबद्दल सरळ सहानुभूति प्रकट करीत असल्यामुळें, प्रश्नोत्तरांचा व टीकेचा खेळ अंधळ्या कोशिंबिरीसारखा झाला आहे. व्हाइसरॉयसाहेबांनीं केलेल्या पहिल्या दिवसाच्या भाषणांत नाटकांतील भरतवाक्याप्रमाणें, उदार मतप्रदर्शनाचे उद्गार होते. त्यांनीं म्हटलें कीं, अफगाणिस्थानांत एकी व शांतता नांदावी, इतकेंच आमचें पाहणें आहे व इच्छा आहे. अफगाणिस्थान आहे त्याप्रमाणेंच स्वतंत्र राहावा असे उद्गार मात्र त्यांच्या तोंडांतून निघाले नाहींत. पण सरकार म्हणणार आम्हीं तह करून बसलेलों आहों. तेव्हां अफगाणिस्थानचें स्वातंत्र्य आजहि आम्हांला कबूल आहे. त्या देशांतील यादवी व बंडाळी

संपून शेवटीं जो धनी गादीवर कायमचा बसेल त्याला अमीर म्हणून आम्ही ओळखूंच !

* * *

सोमवार ता. २८ हा असेंब्लीच्या कामाचा पहिला दिवस. या दिवशीं व्हाइसरॉयसाहेबांचें प्रास्ताविक भाषण झालें. पण यंदा नेहमींपेक्षांहि या आरंभाला साधें स्वरूप होतें. असेंब्ली व कौन्सिल ऑफ स्टेट या दोघांची मिळून बैठक नव्हती. या दोन सभांचे अध्यक्ष आपले केसाळ मुकुट घालून व्हाइसरॉयांच्या सिंहासनासमोर जय-विजयासारखे उलटीं तोंडें फिरवून बसतात तसें यंदा नव्हतें. अध्यक्ष पटेल यांनींच प्रथम येऊन खुर्चीवर बसून सभासदांची खडी ताजीम घेतली व मागाहून व्हाइसरॉयसाहेबांचा प्रवेश साध्या इतमामानें झाल्यावर ते उच्चासनावर पण आपली जागा सोडून उजव्या हाताला बसले. लॉर्ड आयर्विन आपलें भाषण इतकें सुबोध रीतीनें व सावकाश वाचतात कीं, तोंडी परीक्षेंत शुद्ध-लेखन घालण्याला परीक्षक म्हणून त्यांची नेमणूक केल्यास विद्यार्थि आनंदित होतील. वहिवाटीप्रमाणें एस्. आर. दास व लाला लजपतराय यांच्या मृत्यूबद्दल त्यांनीं दुःखोद्गार काढले, पण दुःखोद्गार काढतांना आपला व परका हा भेद दिसून आलाच ! लजपतराय यांच्यासंबंधानें सरकारला कधीं चांगला शब्द बोलायचा तर तो हाच प्रसंग होता. पण स्वतः बोलतांना लॉर्ड आयर्विन इतकेंच म्हणाले कीं, लाला लजपतराय ही एक माणसासारखी माणूस व्यक्ति होती. याचा अर्थ त्यांच्यामध्यें गुण असले तरी दोषहि होते. पण माणसासारखा माणूस हें वर्णन कोणाहि माणसाला लागू पडतें; आणि तें लाविल्यापासून वर्णित व्यक्ति ही मनुष्यकोटींतील होती, जनावरांपैकीं नव्हती इतकाच अर्थ निघूं शकतो. वैर आमरण राहिलें तरी मरणान्त असावें व मृत्यूचा उल्लेख करतांना तरी त्याबद्दल एखादा चांगला शब्द बोलावा ही सभ्यपणाची रीतहि व्हाइसरॉयसाहेबांनीं ध्यानांत ठेवली नाहीं; मग जेथें फुकाचा गोड शब्द खर्चीं घालण्याला इतका कृपणपणा, तेथें हिंदुस्थानला स्वराज्य देण्याच्या बाबतींत त्यांनीं कशा प्रकारची भाषा वापरली असेल तें सांगावयास नको. त्यांनीं जास्तींत जास्त म्हणून हें सांगितलें कीं, “ १९१७ सालीं स्टेट-सेक्रेटरी मॉंटेग्यु यांनीं जो जाहीरनामा प्रकट केला तो आजहि अमलांत आहे. आम्ही ह्याच्या मागें जाऊं इच्छीत नाहीं म्हणजे तो रद्द करीत नाहीं ! ”

राष्ट्रीय सभेच्या ठरावाला 'अल्टिमेटम्' म्हणजे 'निर्वाणीचा खलिता' असे शब्द लावतांना लॉर्ड आयर्विन यांनीं किंचित् प्रच्छन्न असा उपहासच केला.

* * *

नाहीं म्हणावयाला दोन गोष्टी त्यांनीं नव्या सांगितल्या—( १ ) शेतकी कमिशनच्या शिफारशींची सरकार कशा प्रकारें अंमलबजावणी करणार व ( २ ) मजूर-वर्गाच्या स्थितीसंबंधानें चौकशी करण्याकरितां व्हिटली यांच्या अध्यक्षतेखालीं 'रॉयल कमिशन' विलायत सरकार नेमणार, शेतकी कमिशन हें एका अर्थानें लॉर्ड आयर्विन यांचेंच अपत्य असल्यामुळें त्याला उजविण्या-साठीं निदान अंगडें-टोपडें तरी एखादें शिवावें लागणारच. ह्याकरितां हिंदु-स्थान सरकारनें कांहीं रक्कम प्रारंभीं खर्चावयास काढली असून कांहीं रक्कम वार्षिक खर्चण्याची तयारी केली आहे. पण ही वार्षिक रक्कम कृषिसंशोधनाच्या नांवाखालीं बहुधा खर्च पडणार व तींहि कांहीं युरोपिअन तज्ज्ञांच्या खिशांत जाणार हें उघड दिसतें. नाहीं म्हणावयाला इतर खात्यांप्रमाणें शेतकी खात्याकरितां म्हणून एक कार्यकारी कमिटी व एक सल्लागार कमिटी अशा नेमण्यांत येतील व त्यांत कायदेमंडळाचा थोडासा हात शिरकला तर शिरकेल. पण हें शुभ वर्तमान शेतकऱ्यांपर्यंत आधीं जाणारच नाहीं, गेलें तरी तें त्याला कळणार नाहीं व कळलें तरी या कृषिसंशोधनाचा प्रत्यक्ष फायदा फार दूरच आहे. इंग्रजी राज्यांत सगळ्या चांगल्या गोष्टी उगवण्याकरितां सरकारनें रुजत घातल्या आहेत. पण तीं सर्व आक्रोडांचीं झाडें. कितव्या पिढीला त्यांचीं फळें दिसतील किंवा खावयाला मिळतील हा नेहमींचा प्रश्नच असतो. व्हाइसरॉय यांच्या भाषणांतील आणखी एक नवा मुद्दा पूर्व-आफ्रिकेंतील हिंदी वसाहत-वाल्यांच्या स्थितीसंबंधाचा होता. तेथील सरकारच्या कार्यकारी मंडळांत हिंदु-स्थानांतील एखादा सिव्हिल सर्व्हंट कायमचा नेमला जावा अशी योजना सरकारच्या डोक्यांत घोटाळत आहे असें दिसतें व कदाचित् विलायत सरकारच्या मदतीनें ती सफल होईल. पण त्या योजनेनें हिंदी वसाहतवाल्यांचा प्रत्यक्ष किती फायदा होईल हें आज कोणी सांगावें ? लॉर्ड आयर्विन यांच्या भाषणानंतर या दिवशीं असेंब्लींत कांहीं विशेष काम झालें नाहीं.

* * *

मंगळवार तारीख २९ हा दिवस खासगी सभासदांच्या बिलाकरितां राखून ठेवण्यांत आला होता. या दिवसाचें मुख्य बिल म्हणजे रायसाहेब हरविलास

शारदा यांचें बालविवाहासंबंधाचें होय. शारदा यांनीं या बिलासंबंधानें आज तीन वर्षें खटपट चालविली आहे. पण त्याला चांगला मुहूर्त लाभलेला दिसत नाहीं. कारण लोकपक्षांतील कांहीं लोक त्याला उघडपणें प्रतिकूल आहेत व सरकारनें त्यासंबंधानें आपलें मत अजून निश्चित बनविलें नाहीं. सरकारची सबब ही कीं, लग्नाची किमान वयोमर्यादा ठरविण्यासारखा लोकांच्या चालीरीतींत हात घालणारें बिल मंजूर करण्यास संमति देऊन आपण विनाकारण लोकक्षोभ कां करावा? तथापि शारदा यांनीं व्हाइसरॉयसाहेबांची गांठ घेऊन व इतर अनेक प्रयत्न करून प्रस्तुत बिल सिलेक्ट कमिटीच्या खिंडींतून पार पाडून असेंब्लीपर्यंत आणलें. गेल्या सप्टेंबर महिन्यांत तें चर्चेला निघावयाचें, पण गर्दींत त्याची चर्चा होऊं नये, प्रशस्तपणें व्हावी म्हणून तें चालू बैठकीपर्यंत पुढें ढकलण्यांत आलें.

*    *    *

परंतु दरम्यान संमतिवयाची चौकशी करण्याकरितां सरकारनें कमिटी नेमली तिच्यावर असेंब्लीचें प्रतिनिधी आहेत. कमिटी अनेक प्रांतांत फिरली व अजूनहि तिचें काम सुरू आहे. म्हणून या कमिटीचा रिपोर्ट प्रसिद्ध होईपर्यंत या बिलाची चर्चा तहकूब व्हावी अशी सूचना आचार्य, केळकर व पं. ठाकुरदास भार्गव यांनीं दिली होती. पैकीं आचार्य यांची उपसूचना चर्चेला निघाली तेव्हां सरकारी सभासद ज्या बाजूला मतें देतील तसा निर्णय होईल हें उघड दिसून आलें. सरकारनें अखेरपर्यंत आपल्या मनाचा निश्चय केला नव्हता असें म्हणतात. पण खरी गोष्ट ही कीं, त्यांना या लांबणीच्या उपसूचनेचा फायदा घेऊन हें बिल पुढें ढकलावयाचें होतें. एका अर्थानें त्यांचा हेतु वाईट म्हणतां येत नाहीं. कारण संमतिवयाच्या चौकशींत लग्नाचें वय किती असावें हा प्रश्न प्रामुख्यानें पुढें आलेला आहे. त्यावर साक्षीपुरावा झालेला आहे. म्हणून आजच या बिलाचा निकाल होऊन गेला तर त्या कमिटीचें काम जवळ जवळ निष्फळ व्हावयाचें; किंवा लोकमत वेगळ्या प्रकारचें दिसून आलें तर हल्लींचें बिल मंजूर झालें तें झालें नसतें तर बरें असें म्हणण्याची पाळी यावयाची.

*    *    *

अशीं महत्त्वाचीं बिलें वरचेवर पुढें येऊन मंजूर होण्याचा संभव कमी. तथापि सरकारनें अखेर आचार्यांच्या उपसूचनेला अनुकूल मत दिल्यामुळें शारदांची

मूळची उपसूचना नामंजूर झाली. मात्र सरकारच्या या कृतीनें त्यांनीं राय-साहेब शारदा यांचा विश्वासघात केला असा आरोप उघड येण्यासारखा होता म्हणून दुसरे दिवशीं सरकारनें जाहीरपत्रक काढून प्रसिद्ध केलें कीं, पुढील सिमला येथील बैठकींत या बिलाच्या चर्चेला जितका वेळ लागेल तितका आपण देऊं. असेंब्लीच्या कामाचे दिवस वांटून देणें ही गोष्ट सर्वस्वीं सरकारच्या हातची असल्यामुळें हें वचन त्यांना पाळतां येईल. दरम्यान संमतिवय कमिटीचा रिपोर्ट प्रसिद्ध होईलच. साधारण लोकमत पाहतां प्रथम पक्ष अशा तऱ्हेचें बिल असेंब्लीनें मंजूर करूं नये असा दिसतो. पण तें जर मंजूर व्हावयाचें तर लग्नाची किमान मर्यादा १४ वर्षांची राहावी असा दुसरा पक्ष आहे. संमतिवय व लग्नाची वयोमर्यादा कायद्यानेंच ठरवावयाची तर ती दोहोंची एकच म्हणजे १४ पर्यंत असावी असें ओघानेंच प्राप्त होतें. याच्यांपलीकडे जाऊन १६–१८ वर्षांची मर्यादा असावी असें म्हणणारे लोक कांहीं आढळतात व कांहीं साक्षीदारांनीं तसें मत संमतिवय कमिटीपुढें प्रदर्शितहि केलें आहे ! पण या कमिटीपुढें कोणत्या वर्गांतील लोक, विशेषतः कोणत्या व्यक्ति, साक्षीला गेल्या हें पाहिलें म्हणजे १४ हून अधिक वर्षें या वयोमर्यादेला खऱ्या लोकमताचा आधार नाहीं हें उघड दिसून येतें.

* * *

शारदा यांची मूळ योजना अशी आहे कीं, ठरीव मर्यादेच्या आंत झालेला विवाह रद्द ठरवितां यावा. पण तें कलम सिलेक्ट कमिटीनें अजीबात काढून टाकलें व बालविवाहाला गुन्ह्याचें स्वरूप दिलें गेलें तर, खटले भरणें, न्याय-इनसाफ होणें, शिक्षा देणें वगैरे बाबतींत अनेक प्रकारचीं बंधनें सिलेक्ट कमिटीनें सुचविलीं आहेत. बालविवाह करणाऱ्या आईबापांना फटक्यांची शिक्षा द्यावी असें मुंबईचे एक शहाणे साक्षीदार बोलल्याचें प्रसिद्धच आहे. त्यांच्या हातांतील चाबूक जाऊन सिलेक्ट कमिटीनें अप्रत्यक्ष रीतीनें तो या फाजील शहाण्यांच्या पाठीवरच उडविला म्हणावयाचा ! असो. या दिवशीं दुसरें बिल मौ. महंमद याकूब यांचें निघालें. त्यांची योजना अशी कीं, एका सरकारी लॉ रिपोर्टांखेरीज बाकी कोणाहि लॉ रिपोर्टांचा उल्लेख किंवा वाचन न्याय कोर्टांपुढें होऊं नये. याचा अर्थ खासगी लॉ रिपोर्टांचीं सगळीं मासिक पुस्तकें बंद पडावीं व आळशी वकील व मिजासखोर न्यायाधीश यांचें काम हलकें व्हावें. पण ही गोष्ट कोणाहि समंजस मनुष्याला मान्य होण्यासारखी

नसल्यामुळें, हें बिल सिलेक्ट कमिटीकडे पाठविण्याच्या मौ. महंमद याकूब यांच्या सूचनेला स्वतः त्यांच्या हाताखेरीज दुसरा एकहि हात वर झाला नाहीं.

* * *

बुधवार ता. ३० या दिवशीं खासगी समासदांचे ठराव चर्चेला निघाले. पहिला ठराव कुमार रणंजयसिंग यांचा सिनेमा कमिटीसंबंधाचा होता. तो असा कीं, हिंदुस्थानांतील सिनेमा कमिस्या व चित्रपट तयार करणारे कारागीर यांच्या धंद्यांना उत्तेजन मिळावें म्हणून सिनेमा कमिटीनें केलेल्या शिफारशी सरकारनें अमलांत आणाव्या. पण या कमिटीवरील सहा सभासदांत तीन गोरे व तीन काळे होते. त्यांत बरोबर निमेनिम दुमत झालें व सरकारनें या गोऱ्या लोकांच्या मताचा पाठपुरावा केला. त्यांचें म्हणणें असें कीं, सिनेमाचा धंदा हिंदुस्थानांत हल्लींच फायद्याचा असल्यामुळें त्याला वेगळें उत्तेजन नको व हिंदुस्थानांत तयार होणारे चित्रपट कांहीं एका ठराविक प्रमाणानें सर्व सिनेमावाल्यांनीं दाखविलेच पाहिजेत अशी सक्ती झाली तर चित्रपट अधिक वाईट निघूं लागतील व हिंदी सिनेमावाल्यांचें नुकसान होईल. अर्थात् ही शुद्ध बतावणी होय. मूळ कमिटी नेमली तीं अमेरिकन चित्रपटांवर नियंत्रण पडून विलायती चित्रपटांचा फायदा करून देण्याच्या उद्देशानें. पण कमिटींतील हिंदी सभासदांनीं हा व्यूह ढासळविला. तेव्हां आमचें साधलें नाहीं, म्हणून तुमचेंहि साधूं देत नाहीं असा विचार सरकारनें केला. ठरावावरचीं मतें मोजतांना दोनहि बाजूंना सारखीं मतें पडलीं. फिरून अध्यक्ष पटेल यांच्यावर बिकट प्रसंग आला. पण अध्यक्ष पटेल निःपक्षपाती ! त्यांनीं सेफ्टी बिलाच्या वेळीं सिमल्यास सारखीं मतें पडलीं असतां, लोकपक्षाला उचलून धरलें म्हणून आपला तोल संभाळण्याकरितां त्यांनीं या वेळीं सरकारला उचलून धरलें.

* * *

या दिवशीं निघालेला दुसरा ठराव मात्र अत्यंत महत्त्वाचा होता तो असा कीं, १६ ते २० वर्षांच्या आंतील शाळा व कॉलेजमधील तरुणांना सक्तीचें शारीरिक शिक्षण, लष्करी कवाईत व रायफल प्रॅक्टिस शिकविण्याची व्यवस्था सरकारनें करावी. अनेक लोकांच्या नांवांखालीं तो ठराव निघाला होता तरी डॉक्टर मुंजे यांनाच तो पुढें मांडण्यास परवानगी मिळाली व त्यांनीं तो

मोजक्या शब्दांत पण खणखणीत रीतीनें पुढें मांडला. सरकारतर्फे बाजपेयी व आर्मी सेक्रेटरी मि. यंग यांचीं भाषणें झालीं. त्यांत नसत्या शेंकडों अडचणी पुढें आणल्या होत्या. लोकपक्षातर्फे अणे, जयकर यांचीं भाषणें फार चांगलीं झालीं. जयकर यांनीं तर सरकारास असें स्पष्ट बजावलें कीं, देशांतील तरुण पिढीनें जागृत होऊन पाऊल पुढें टाकलें आहे. तरुणांची ईर्षा, तरुणांचें तेज याचा फायदा राष्ट्रसेवेला व राष्ट्रसंरक्षणाला करून घेण्याची सरकारची इच्छा असेल तर ही एकच संधि आहे. ती त्यांनीं न साधली तर उद्यां त्यांचेंच नुकसान होईल. या ठरावावर आणखी बरींच भाषणें होण्याचा संभव म्हणून त्याची चर्चा तारीख १८ फेब्रुवारीपर्यंत पुढें टाकण्यांत आली.

असेंब्लीचे पुष्कळ सभासद अजून यावयाचे आहेत. जिकडे तिकडे बाकें अगदींच सुनीं नाहीं म्हटलीं तरी म्हातारपणाच्या मधून मधून पडलेल्या दातांच्या फवळीसारखीं दिसतात. स्वराज्य पक्षानें तर फारच उदासीनपणा दाखविला आहे. खासगी सभासदांनीं पुढें आणलेलें काम हें जणूं काय कामच नव्हे असा त्यांचा विचार दिसतो. या पक्षाची हल्लीं फारच वाताहत झालेली आहे. आचार्य व रंगा अय्यर हे उठून दुसऱ्या बाकावर जाऊन बसले. श्रीनिवास अय्यंगार, प्रकाशम् हे लोक येण्याचें चिन्ह दिसत नाहीं. मोतिलाल नेहरू क्वचित् तास अर्धा तास दिसतात व एकंदर स्वराज्य पक्षांत जवळजवळ अराजक निर्माण झालें असेंच म्हणतात. राष्ट्रीय पक्षानें लाला लजपतराय यांच्या जागीं पंडित मदन मोहन मालवीय यांना आपले पुढारी नेमलें असून बाकीच्या जागा पूर्वीसारख्याच भरल्या आहेत. स्वतंत्र पक्षाचे पुढारी जिना अजून मुंबईसच आहेत व सायमन कमिटीवर नेमलेले लोक ब्रह्मदेशांत आहेत. या सर्व कारणांनीं असेंब्लीचें काम झोंपाळू माणसाच्या भाषणासारखें किंवा स्प्रिंग ढिल्या झालेल्या फोनोग्राफसारखें र-र करीत कसें तरी चाललें आहे. येत्या सोमवारीं सेफ्टी बिल पुनः प्रविष्ट होणार त्यामुळें अधिक सभासदांची दुतर्फा जमवाजमव झाल्यास असेंब्लीच्या कामाला कांहीं रंग येईल.

## पत्र नं. २

ता. ८-२-२९

गेल्या आठ-दहा दिवसांत हवेचे पुष्कळ प्रकार दिल्लीस अनुभवाला आले. आम्ही प्रथम आलों तेव्हां हीच का दिल्लीची थंडी, असें म्हणून तिची थट्टा केली. पुढें दोन-तीन दिवस आभाळ इतकें भरून जाई व सकाळीं

धुकें इतकें दाट पडे कीं, चालतांना वर पाहून 'घुंगुटके पट खोलोजी' या चिजेचें पालुपद सहजच तोंडाला येई. नंतर दोन दिवस नुसती पण फार कडक थंडी पडली व पुढें दोन दिवस या थंडींत उत्तरेकडील झोंबणाऱ्या वाऱ्याची भर पडून मोठी दुःसह स्थिति झाली. रावळपिंडी व रोहटक येथपर्यंत बर्फाची वृष्टि झाली. खुद्द दिल्ली शहरांत उघड्या जागेवर ठेवलेल्या पाण्याचें कोठें कोठें बर्फ झालें; आणि गरीब-गुरीब व टांगेवाले वगैरे कांहीं लोक प्राणाला मुकले. पण आतां चोहोंकडील वर्तमानपत्रांतून या थंडीचें आलेलें वर्णन वाचलें म्हणजे दिल्लीस कांहीं विशेष झालें नाहीं असेंच म्हणणें अधिक बरें. दिल्लीची हवा हिमालयावरून येते असें मीं मागील पत्रीं म्हटलें पण सरकारी हवाखात्याच्या एका रिपोर्टांत असा खुलासा आढळला कीं, 'ही हवा म्हणजे पुढें धावणारी थंड हवा व तिची पाठ शिवणारी उष्ण हवा यांचा खेळ अटलांटिक महासागरावरून भूमध्य समुद्रांतून हिंदीमहासागराकडून हिंदुस्थानाकडे वळला. हिमालयावरून बर्फाच्या वृष्टीमुळें दिल्लीस फार थंडी पडली असें आम्ही समजतों. पण हिमालयावरच्या थंडीला अटलांटिक महासागरावरील हवा हें कारण ठरलें. आतां या अटलांटिक महासागरावरील हवेला मूळ कारण काय एवढेंच कोणी सांगावयाचें उरलें आहे. कोणत्याहि गोष्टींत कारणपरंपरेचा शोध मागें-मागें करीत गेलें असतां, शेवटीं अनवस्था किंवा शून्यसंशोधन हेंच हातीं लागणार !

* * *

या आठवड्यांतील असेंब्लीचें मुख्य काम म्हटलें म्हणजे चार दिवस होऊन संपलेली पब्लिक सेफ्टी बिलावरील चर्चा. पहिल्या दिवसाच्या रंगावरून एकदोन दिवसांतच ही चर्चा संपेल असें वाटलें होतें. पण अदमासाबाहेर लांबून ती चार दिवस चालली. शेवटीं लोकपक्षाचा ११ मतांनीं पराभव होऊन बिल सिलेक्ट कमिटीकडे पाठविण्याचें ठरलें ! या बिलावर स्वराज्य पक्षातर्फे पं. नेहरू, गयाप्रसादसिंग, नीळकंठदास, दिवाण चमनलाल, रंगास्वामी अय्यंगार यांचीं भाषणें झालीं. नॅशनॅलिस्ट पक्षातर्फें पं. मालवीय, केळकर, शेठ घनश्यामदास बिर्ला, मुनशी ईश्वर शरण व अणे यांचीं भाषणें झालीं. स्वतंत्र पक्षातर्फें फक्त सर पुरुषोत्तमदास ठाकुरदास यांचेंच भाषण झालें. मुसलमान पक्षातर्फें सर अबदुल कयूम व युरोपियन संघातर्फें सर डार्सी लिंडसे, सर व्हिक्टर ससून व गॅव्हिन जोन्स हे बोलले. सरकारतर्फें होम-

मेंबर क्रेरर, डेनिस ब्रे, कीन्स व कॉसग्रेव्ह यांचीं भाषणें झालीं. रंगा अय्यर व आचार्य, यांचींहि भाषणें झालीं. पण त्यांना आज जवळ जवळ कोणताच पक्ष नाहीं असें म्हणावें लागतें. इतक्या भाषणांना चार दिवस लागले, यावरून बहुतेक भाषणें लांबलचक झालीं हें दिसून येईल. त्यांत रंगा अय्यर यांचा नंबर सर्वांत पहिला लागला. त्यांनीं दोन तास दहा मिनिटें घेतलीं. पण या भाषणांत बिलावरील टीकेपेक्षां कोपरखळ्या व चिमटेच अधिक होते. त्यांनीं कॉंग्रेस, नेहरू कमिटीचा रिपोर्ट, असहकारिता, युवकसंघाची चळवळ वगैरे सर्व गोष्टींवर तोंडसुख घेतलें! व जिव्हेचा उपयोग किती वाईट रीतीनें करतां येतो याचा प्रत्यय असेंब्लीला आणून दिला. या गृहस्थांचें तारूं कोणीकडे कसें भटकत जाणार हें समजत नाहीं. सुकाणूं मोडलेल्या जहाजाची समुद्रांत जी स्थिति होते तीच कदाचित् यांची पुढील निवडणुकींत होईल असें म्हणतात.

* * *

सरकारचे नवे फडणवीस सर जॉर्ज शूस्टर यांचा या आठवड्यांत असेंब्लीला प्रथम परिचय झाला. हे जातीनें जर्मन ज्यू असून मोठे धनाढ्य आहेत. कीनियासंबंधानें नेमलेल्या हिल्टन यंग कमिशनचे ते सभासद होते व तिकडूनच ते इकडे आले आहेत. हे स्वभावानें शांत व सभ्यपणानें वागणारे दिसतात. असेंब्लींत झालेल्या प्रश्नांचीं उत्तरें त्यांनीं समर्पक व माहिती पुष्कळशी देण्याच्या उद्देशानें दिलीं. विशेषतः रिझर्व्ह बँक बिलासंबंधानें एका प्रश्नाला उत्तर देतांना त्यांनीं या बिलासंबंधानें आपलें धोरण प्रकट केलें तें लोकपक्षाला पसंत पडण्यासारखें होतें. रिझर्व्ह बँक बिल ते तूर्त पुढें आणीत नाहींत.

* * *

प्रथम हिंदुस्थानांतील बँका व पेढ्या यांच्यासंबंधानें ते विस्तृत चौकशी करणार आहेत, नंतर असेंब्लींतील निरनिराळ्या पक्षांच्या पुढाऱ्यांशीं खासगी चर्चा करणार आहेत व त्यानंतर रिझर्व्ह बँकेसंबंधानें आपलें धोरण निश्चित करणार आहेत. याचा अर्थ सुमारें दोन वर्षें तरी हें बिल पुनः पुढें येत नाहीं. याखेरीज सरकारी रीतीनें शेतकरी व शेतकीचा व्यापार यासंबंधानें तें प्रांतानिहाय चौकशी करणार आहेत असें इतर मार्गानें समजलें. इन्कम टॅक्स बिलावरील सिलेक्ट कमिटींत त्यांनीं सामोपचाराचें धोरण स्वीकारलें असें

त्यांतील लोक सांगतात व त्यांच्या या धोरणामुळें हें बिल एकदम पुढें न येतां, फिरून लोकमत अजमावण्याकरितां बाहेर पाठविण्याचें कमिटीला ठरवितां आलें. तात्पर्य, सर बेसिल ब्लॅकेट यांच्याइतके ते तडफदार किंवा वाक्पटु नसले तरी प्रथम कांहीं दिवस लोकांना माजी फडणविसांच्या धोरणाचा ते विसर पाडतील असा अंदाज वाटतो; परंतु प्रथम परिचयावरूनच कोणाविषयींहि निश्चित मत बनविणें हें अर्थातच शहाणपणाचें होणार नाहीं.

* * *

या आठवड्यांत दोन-तीन पोटनिवडणुकी झाल्या. बंगलोर येथील शास्त्रीय विद्यापीठावर षण्मुखम् चेट्टी यांना निवडण्यांत आलें. पब्लिक अकौंट्स कमिटी-वर एस्. सी. मित्र, नियोगी, कुमार गंगानंद सिंह, अबदुल मातीन चौधरी यांची निवडणूक झाली. तसेंच वसाहती व जमीनबाब यांच्यासंबंधानें कमिटीवर जितके लोक पाहिजे होते. जितकेच उमेदवार असल्यामुळें ती निवडणूक करावी लागली नाहीं.

* * *

साराभाई हाजी यांच्या व्यापारी जहाजांच्या बिलासंबंधाच्या सिलेक्ट कमिटीचें काम लवकरच सुरू होणार. या कमिटीवर सर जॉर्ज रेनी यांच्याशिवाय इतर कोणी सरकारी सभासद नाहीं. म्हणजे सरकारनें या कमिटीवर जवळ-जवळ बहिष्कार घातल्यासारखा केलेला आहे. यामुळें कमिटीचें काम लवकर संपेल. मात्र परस्परविरोधी असे रिपोर्ट निश्चितपणें होणार. तथापि खासगी बिलांना या बैठकींत थोडे दिवस दिलेले असल्याकारणानें, या बिलांच्या चर्चेला असेंब्लीच्या या बैठकींत संधि मिळेल कीं नाहीं याची थोडीशी शंका वाटते. वर्कमेन्स कॉम्पेन्सेशन (जोखमीच्या धंद्यांत दुखापत किंवा इजा झालेल्या किंवा मृत्यु पावलेल्या कामकऱ्यांच्या कुटुंबांना किंवा आश्रितांना नुकसान-भरपाई करण्यासंबंधींच्या) बिलावर सिलेक्ट कमिटी नेमण्यांत आली आहे. पण या बिलावर चोहोंकडून आलेले अभिप्राय प्रायः बिलाला अनुकूल असल्यामुळें तिचें काम फार वादग्रस्त होईल असा रंग दिसत नाहीं.

* * *

पहिल्या आठवड्यापेक्षां दुसऱ्या आठवड्यांत असेंब्लीच्या कामाला जी थोडी तेजी आली आहे ती सेफ्टी बिलासारख्या वादग्रस्त प्रश्नामुळें. तथापि अखेर सरकार पक्षाचाच जय होणार ही गोष्ट प्रथमपासून जवळ जवळ निश्चित

झाल्यासारखी दिसत होती. यामुळें विशेष ईर्षा दिसून आली नाहीं. बिलाच्या चर्चेमध्यें प्रश्नोत्तरें व खटके पुष्कळ उडाले; तथापि सिमल्यास या चर्चेला हल्लींपेक्षांहि अधिक तेज आलें होतें. गैरहजर असलेल्या सभासदांना बोलावून आणण्याचा बराच खटाटोप उभयपक्षाकडून झाला. यामुळें शेवटच्या दिवशीं सुमारें ११२ सभासद असेंब्लींत हजर होते. एकट्या स्वराज्य पक्षाचे १२ सभासद गैरहजर होते. हे सगळेच हजर राहतील असे नव्हते; तथापि स्वतंत्र पक्षाचे व मुसलमान सभासद यांनीं बराच गोता दिला. म्हणूनच उभयपक्षांतील मतांमध्यें इतकें अंतर पडलें एरवीं पडतेंना.

* * *

गेल्या आठवड्यांत दिल्ली येथील महाराष्ट्र स्नेहसंवर्धक समाजानें नव्या पंचांगाप्रमाणें दासनवमीचा एक दिवस उत्सव केला. त्यांत श्री. माधवरावजी अणे यांचें व्याख्यान झालें. स्वामी विवेकानंद यांच्या निधनतिथीची गांवांत एक सभा झाली. 'यंग वुइमेन्स ख्रिश्चन असोसिशन' या संस्थेचा उद्घाटन-समारंभहि लेडी आयर्विन यांच्या हस्तें झाला. दिल्ली येथील चित्रकलेचें एक प्रदर्शनहि उघडण्यांत आलें. तसेंच रेल्वे बोर्डानें आपल्या खात्यामार्फत एक नमुनेदार प्रदर्शन भरविलें आहे, त्याचा समारंभ उद्यां होईल. या प्रदर्शनांत लोकोपयोगी व मनोरंजक असा बराच भाग असल्यामुळें तें प्रदर्शन प्रत्यक्ष पहिल्यावर त्यासंबंधानें कांहीं महत्त्वाचें असल्यास लिहितां येईल.

## पत्र नं. ३

ता. १४-२-२९.

शुक्रवार ते रविवार तीन दिवसांची सुटी संपल्यावर सोमवारीं तीन सरकारी बिलांचें काम झालें. पहिलें बिल मुदतीच्या कायद्यांत दुरुस्ती करण्यासंबंधानें कौन्सिल ऑफ स्टेटकडून पास होऊन आलेलें होतें. यांत मुख्य तीन कलमें होतीं. एका कलमानें असें ठरविण्यांत आलें आहे कीं, धर्मसंस्था किंवा देवस्थानें यांचा 'मॅनेजर'हि 'ट्रस्टी' असेंच समजलें जाईल. याचा अर्थ त्याचेविरुद्ध मुदतीचा कायदा लागणार नाहीं. तसेंच या बिलानें असें ठरविलें आहे कीं, अशा ट्रस्टीनें कोणतीहि ट्रस्ट मिळकत कोणाला देऊन टाकली असतां, दावा करण्याच्या मुदतीचा प्रारंभ वादीला हा व्यवहार झाल्याचें कळल्यापासून तीन वर्षें; व नव्या ट्रस्टीला जुन्या ट्रस्टींनीं केलेला

व्यवहार रद्द करण्याची फिर्याद आणण्याकरितां नवीन ट्रस्टी कामावर रुजू झाल्यापासून १२ वर्षें असावी. या बिलाचा हेतु देवस्थानें व धर्मसंस्था यांची मिळकत अयोग्य रीतीनें विकली जाऊं नये व या मिळकतींत ज्यांचा हित-संबंध असेल त्यांना दावा करून योग्य तर ती मिळकत परत घेतां यावी असा आहे.

* * *

दुसरें सरकारी बिल पेटंट ॲक्टांत दुरुस्ती करण्यासंबंधाचें होतें व तें सिलेक्ट कमिटीकडे पाठविण्यांत आलें. त्याचप्रमाणें मजुरांचे संप व तंटे कमी करणें, थांबविणें, तोडणें, यासंबंधींचें तिसरें एक बिल होतें व तेंहि सिलेक्ट कमिटीकडे पाठविण्यांत आलें. मात्र या तिसऱ्या बिलावर विशेष चर्चा झाली. सरकारनें या बिलाच्या पहिल्या भागांत पंचायतपद्धतीनें मालक व मजूर यांच्यांतील तंटे तोडण्यासंबंधींची योजना केली आहे. परंतु पुढच्या कलमांतून मजुरांचा संप करण्याचा हक्क पुष्कळसा कमी करून नोटीस दिल्याशिवाय कांहीं कांहीं धंद्यांत किंवा कामगिरींत एकदम संप पुकारणें हा गुन्हा ठरविण्याचा प्रयत्न केला आहे. बिलाच्या या दुसऱ्या भागासंबंधानें असें म्हणतां येईल कीं, हें बिल पब्लिक सेफ्टी बिलाचेंच एक लहानसें, किंबहुना मोठेंहि भावंड शोभेल. पब्लिक सेफ्टी बिलानें फार तर चार आगंतुक कम्युनिस्ट लोकांना चौकशी न होतां हद्दपारी सोसावी लागेल. परंतु या दुसऱ्या भावंडाचा पराक्रम असा होणार कीं, सरकार ठरवील त्या धंद्यांत व कामगिरींत कांहीं ठराविक मुदतीची नोटीस दिल्याशिवाय काम सोडतां येणार नाहीं, सोडल्यास शिक्षा होईल व सहानुभूतीनें एका मजूर वर्गानें दुसऱ्या मजूरवर्गाकरितां संप करणें हाहि गुन्हा ठरेल! विलायतेंत १९२६ सालीं मोठा सार्वत्रिक संप झाला तो कायद्याच्या बळावर मोडला गेला. पण लगेच उरलासुरला पक्का बंदोबस्त करण्याकरितां पुढच्या वर्षी हल्लींच्या प्रधानमंडळानें वरील प्रकारच्या तजविजीचें बिल पार्लमेंटांत मंजूर करवून घेतलें तेव्हां मजूर पक्षानें त्याला कसून विरोध केला व पुढील निवडणुकींत मजूर पक्ष अधिकारारूढ झाला तर हें बिल रद्द होण्याचा संभव आहे. दरम्यानच्या या संधिकालांत हिंदुस्थान सरकार आपला हात साधून घेत आहे. परंतु सिलेक्ट कमिटींत नीर-क्षीरन्यायानें चांगला तेवढा भाग उरून वाईट तेवढा भाग बहुतकरून

काढून टाकण्यांत येईल; आणि तें न झालें तर असेंब्लीमध्यें या बिलाला फार कसून विरोध होईल. सदर बिलावर स्वराज्य पक्षापैकीं, चेट्टी व जम्नादास मेथा आणि नॅशनलिस्ट पक्षातर्फे पं. कुंझरू यांचीं चांगलीं भाषणें झालीं.

* * *

मंगळवार हा खासगी सभासदांच्या बिलांचा दिवस होता. पैकीं पहिलें बिल हिंदुधर्मशास्त्रांतील वारसाईचा क्रम हल्लीं आहे त्याहून कांहीं गोष्टींत वेगळा करण्यासंबंधींचें होतें. हें बिल गतवर्षी असेंब्लींत डॉ. गौर यांच्या प्रयत्नानें धांदलींत पास होऊन गेलें व त्यानंतर तें कौन्सिल ऑफ स्टेटकडून एक दोन दुरुस्त्या करून पास होऊन यंदा परत असेंब्लीकडे आलें. मिताक्षरेच्या धर्मशास्त्राप्रमाणें कांहीं दूरच्या गोत्रज सपिंडांकडे वारसा जातो तो मेलेल्या मूळ मालकाच्या जवळच्या नात्याच्या स्त्रियांकडे ओढून आणण्याचा या बिलाचा हेतु आहे. वारसा मृताच्या आजापर्यंत ( बापाच्या बापापर्यंत ) वर गेल्यानंतर तो हल्लीं कांहीं प्रांतांतून दूरच्या गोत्रज सपिंड पुरुषांकडे जातो. यामुळें घराण्यांत जन्मलेल्या स्त्रियांना वारसा मिळण्याचा संभव अगदींच उरत नाहीं ही गोष्ट या बिलानें बदलली आहे. या बिलावर पुराणमतवादी पक्ष व सुधारणावादी पक्ष या दृष्टीनें खूप दुमत होतें. युरोपियन, मुसलमान वगैरे लोक प्रायः या चर्चेपासून अलिप्त राहिले. सरकारनेंहि तटस्थपणाचें धोरण स्वीकारलें. पण निरनिराळ्या पक्षांच्या काय, पण एकाच पक्षाच्या हिंदु पुढाऱ्यांमध्येंहि मतभेद झाले. या वादांत मूळ बिलाच्या दृष्टीनें पं. नेहरू व जयकर हे एका बाजूला व पं. मालवीय, अणे, शेषा अय्यंगार हे दुसऱ्या बाजूला असे तट पडले होते! परंतु हें बिल तत्त्वतः गतवर्षी असेंब्लीकडून मंजूर झालें होतें व कौन्सिल ऑफ स्टेटकडूनहि तें मंजूर होऊन आलें होतें. यामुळें किरकोळ एखादी उपसूचना करण्याखेरीज बिलाची सुधारणा करण्याला किंवा तें बुडविण्याला वावच नव्हता. अर्थात् या वेळीं सरकारच्या बाजूचे लोकहि लोकपक्षांतील यादवी गंमतीनें पाहत होते! मंगळवारीं पुढें आलेलें खासगी दुसरें बिल नियोगी यांचें. या बिलाविषयींचा त्यांचा प्रयत्न आज तीन वर्षें सुरू आहे व यंदा तें सिलेक्ट कमिटीपर्यंत जाण्याची मजल पोंचली. या बिलाचा हेतु असा आहे कीं, पूर्वबंगाल व आसाम या प्रांतांत आगगाडीचे रस्ते कमी असल्यामुळें, मुख्य दळणवळण लहानमोठ्या आगबोटींनीं चालू असतें. पूर्वी सरकारनें स्वतःच्या आगबोटी ठेवून पाहिल्या. पण त्या पुढें युरोपियन कंपन्यांच्या हातीं

दिल्या. त्यामुळें त्यांना या वाहतुकीचा मक्ता मिळाल्यासारखें होऊन त्यांनीं वाहतुकीचे दर हवे तितके चढ ठेवले! एकाला एक दर, दुसऱ्याला दुसरा असा पक्षपात दाखवावा, उतारूंची गैरसोय दूर करूं नये असाहि प्रकार सुरू आहे. त्याविरुद्ध तिकडील लोकांनीं व सरकारी अधिकाऱ्यांनीं पुष्कळ गवगवा केला; पण या शिरजोर युरोपियन कंपन्या ऐकत नाहींत. म्हणून सरकारी कायदा करून, त्यांच्यावर सल्लागार मंडाळया लादाव्या अशी या बिलांत योजना सुचविली आहे. सरकारनें या बिलाला म्हणण्यासारखा विरोध केला नाहीं. तथापि बिल परत असेंब्लीकडे आल्यावर काय होतें तें पाहावयाचें आहे

* * *

असेंब्लीच्या चालू बैठकींत आतांपर्यंत दोन महत्त्वाचीं खासगी बिलें सिलेक्ट कमिटीपर्यंत गेलीं आहेत. परंतु भीति अशी वाटते कीं, तारीख २० फेब्रुवारी हा खासगी बिलांच्या कामाकरितां यापुढें एकच दिवस असल्यामुळें त्याचे आंत या सिलेक्ट कमिट्यांचें काम होऊन तीं बिलें असेंब्लीपुढें येणार नाहींत. आणि तसें न झालें म्हणजे सिमल्याच्या बैठकीपर्यंत तीं पुढें ढकललीं जातील, पण ती बैठक आधींच तीन आठवड्यांची; त्यांत खासगी बिलांना एखाददुसरा दिवसच मिळावयाचा व तो देखील हरविलास शारदा यांच्या बालविवाहाच्या बिलाकरितां आजच जवळ जवळ राखून ठेवल्यासारखा झाला आहे. त्यामुळें हीं दोनहि बिलें तेथें चर्चेला निघण्याचा संभव फारच कमी व चालू वर्षाअखेर कायदेमंडळाच्या निवडणुकी व्हावयाच्या म्हणजे खासगी सभासदांचीं बिलें काय किंवा ठराव काय, ते कोणत्याहि मजलीपर्यंत वर चढले असले तरी तेथूनच ढासळून पडावयाचे असा नियम असल्यामुळें या बिलांची इतिश्री झाली असेंच अनुभवास येईल. हीं दोन बिलें म्हणजे साराभाई नेमचंद हाजी यांनीं आणलेलें किनाऱ्यावरील व्यापारी जहाजांचें व दुसरें नियोगी यांचें. खासगी सभासदांचीं बिलें व ठराव यांचा अशा रीतीनें कोंडमारा होत असल्यामुळें, आणखी कांहीं दिवस मिळावे असे प्रयत्न असेंब्लींत आज तीन वर्षें सुरू आहेत. स्वराज्य पक्षानें पूर्वींपासूनच यासंबंधाच्या सूचना असेंब्लीकडे पाठविल्या आहेत. पण त्यांना आजवर मुहूर्तच नाहीं. सिमल्याच्या बैठकींत जवळ जवळ अखेरच्या दिवशीं मोठ्या प्रयत्नानें या सूचनांच्या चर्चेला "हरिःॐ" इतकें म्हणून नुसता प्रारंभ तेवढा झाला! पण यावरील खरी चर्चा एकदांची परवां बुधवारीं झाली. यांपैकीं एक सूचना

अशी होती कीं, "अध्यक्षांना खासगी सभासदांचें राहिलेलें काम पुरें करण्याकरितां, गव्हर्नर-जनरल यांनीं नेमून दिलेल्या दिवसांखेरीज इतर कोणत्याहि दिवशीं सरकारी कामानंतर राहिलें असलेलें खासगी सभासदांचें काम सुरू करण्यांत यावें—किंबहुना सरकारी कामाकरितां नेमलेल्या दिवशीं चार वाजण्याचे आंतच सरकारी काम पुरें झालें तर खासगी काम अध्यक्षांच्या परवानगीनें सुरू व्हावें.

* * *

या सूचनेला सरकारनें कसून विरोध केला. यावर अणे, दिवाण चमनलाल, रंगास्वामी अय्यंगार यांचीं चांगलीं मुद्देसूद भाषणें झालीं. परंतु हा प्रश्न मतें मोजूनच निकालांत काढावा लागला. खासगी कामाचा प्रश्न सर्वांनाच सारखा प्रिय व महत्त्वाचा असल्यामुळें युरोपियन सभासदांखेरीज बाकीच्या बहुतेक सभासदांनीं अनुकूल मत दिलें. म्हणून ही सूचना ५० विरुद्ध ४६ मतें पडून मंजूर झाली. असेंब्लीच्या कामकाजाच्या नियमामध्यें दुसरीहि एक महत्त्वाची दुरुस्ती सुचविण्यांत आली होती. ती अशी कीं, गव्हर्नर जनरल असेंब्लीचे सभासदांना उद्देशून भाषण करतात. तरी त्यांचें भाषणासंबंधीं असेंब्लीचें मत अध्यक्षांचे मार्फत त्यांना कळविण्यांत यावें, होममेंबर क्रेरर यांनीं या दुरुस्तीला हरकत घेतली. त्यांचें म्हणणें असें कीं, आपल्या भाषणावर अशी कायदेमंडळांत उघड टीका होऊं लागली तर गव्हर्नर जनरल यांचें भाषण पूर्वींसारखें विचारपरिप्लुत व मननीय न होतां नीरस होऊं लागेल. शिवाय भाषणांतील त्यांचे विचार हे खासगी स्वरूपाचे असतात. तेव्हां त्यांचें भाषण म्हणजे कांहीं सरकारी धोरण असा अर्थ नाहीं! या यांच्या कोटिक्रमाला दिवाण चमनलाल, रंगास्वामी अय्यंगार, सर पुरुषोत्तमदास, अणे यांनीं समर्पक उत्तरें दिलीं. तथापि कांहीं सभासद हजर न राहिल्यामुळें, युक्तिवाद निष्फळ ठरून, संख्याबलावर सरकारनें हा डाव जिंकला व दुरुस्तीची सूचना ४६ विरुद्ध ४२ मतें पडून नामंजूर झाली! तसेंच सरकारी अधिकारी अगर गव्हर्नर जनरल यांच्या सरकारी कामावरील टीका ही गव्हर्नर व गव्हर्नर जनरल यांच्या वर्तनावरील टीका समजण्यांत येऊं नये हीहि सूचना नामंजूर झाली. बाकी कांहीं किरकोळ दुरुस्त्या करण्यांत आल्या. असेंब्लीनें केलेली दुरुस्ती सरकारी गॅझेटांत प्रसिद्ध झाल्यावर अमलांत येईल. पण गव्हर्नर जनरल

यांना ही दुरुस्ती रद्द करण्याचा अधिकार असल्यामुळें गंडांतर पूर्णपणें टळलें असें म्हणतां येत नाहीं.

* * *

नरेंद्र-मंडळाची बैठक सोमवार ता. ११ रोजीं सुरू झाली आहे व उद्यांचा एक दिवस तिचें अधिवेशन आणखी चालेल. सुमारें ४० संस्थानांचे अधिपति बैठकीस हजर राहिले आहेत. महाराष्ट्रांतील भोर, सांगली व जमखंडी येथील संस्थानचे अधिपतीहि आले आहेत. कांहीं ठरावांवर त्यांनीं भाषणें चांगलीं केलीं. पहिलें दिवशीं नामदार व्हाइसरॉय यांचें सभासदांना उद्देशून भाषण झालें व त्यांनीं सर्वांना सुखानें व आनंदानें राहा व दीर्घायुषी व्हा असा आशीर्वाद दिला! पहिला ठराव वर्तमानपत्रांच्या बातमीदारांना व इतर लोकांना नरेंद्र-मंडळाची बैठक खुली ठेवण्यांत यावी असा पतियाळा-महाराजांनीं मांडला व तो मंजूर झाला. दुसरे दिवसापासून, वर्तमानपत्राच्या बातमीदारांना परवानगी देण्यांत आली. दुसरे दिवशीं पालनपूरच्या महाराजांनीं लीग ऑफ नेशन्सच्या बैठकीकरितां शिष्टमंडळाचे एक सभासद या नात्यानें आपण केलेल्या कामगिरीचा रिपोर्ट सादर केला. त्यांच्या या कामगिरीबद्दल आभारप्रदर्शनाचा ठराव पतियाळच्या महाराजांनीं मांडला व तोहि मंजूर करण्यांत आला.बुधवारीं एक महत्त्वाचा ठराव चर्चेला निघाला तो असा कीं, "देशी संस्थानिक ब्रिटिश प्रजाजनांच्या प्रगतीला आड येत नाहींत. उलट त्यांची सहानुभूतीच आहे. तथापि अलीकडे ब्रिटिश हिंदुस्थानांत साम्राज्यापासून फुटूं पाहणारा स्वातंत्र्यवादी पक्ष उत्पन्न झाला आहे. याकरितां वेळींच सावध होऊन सनदा व तहनामे यांच्या आधारावर साम्राज्य सरकारशीं जडलेले आमचे हितसंबंध कोणत्याहि रीतीनें तोडण्यांत येतां कामा नयेत व अशा स्वातंत्र्यवादी लोकांना कोणत्याहि तऱ्हेनें सहानुभूति ही सभा दाखवीत नाहीं; व पुढील राज्यघटनेंत ज्या कांहीं सुधारणा होतील त्याहि ब्रिटिश साम्राज्याशीं केलेले तहनामे व सनदा यांच्या आधारावर झाल्या पाहिजेत." हा ठरावहि पतियाळच्या महाराजांनीं मांडला. त्यांचें भाषण चांगलें झालें. भाषणांत साम्राज्यनिष्ठा व साम्राज्य सरकारचे वैभवाची ओतप्रोत स्तुति भरली होती. काश्मीरच्या महाराजांनीं अनुमोदन दिलें. त्यांचा एक मुद्दा असा होता कीं, आमच्या संस्थानावरच सरहद्दीचें संरक्षण करण्याची जबाबदारी फार मोठी आहे. याकरितां साम्राज्याशीं असलेला संबंध तोडणें शक्य नाहीं. या ठरावावरहि

सांगली, बिकानेर, अलवार व मड्डी येथील संस्थानांच्या अधिपतींचीं भाषणें झालीं. या सर्वांच्या भाषणांतील एक मुद्दा मात्र विशेष महत्त्वाचा होता व तो हा कीं, ब्रिटिश हिंदुस्थानांतील प्रजाजनांच्या राजकीय प्रगतीचे आड आम्ही येत नाहीं. व्हाइसरॉयसाहेबांनीं आपल्या वतीनें तहनामे व सनदा यांचे अधिकार राखण्याचें आश्वासन दिलें व ठराव मंजूर झाला.

## पत्र नं. ४

ता. २२-२-२९

ता. १५ शुक्रवार रोजीं डॉ. मुंजे यांचा विद्यार्थ्यांसंबंधाचा ठराव अर्धी चर्चा होऊन राहिला होता तो पुरा झाला. कर्नल क्रॉफर्ड यांनीं उपसूचना देऊन ठेविली होती ती चांगली होती. तीच मुंजे यांनीं स्वीकारली. यामुळें विशेष विरोध न होतां तिच्यासह मूळ ठराव पास झाला. कर्नल क्रॉफर्ड यांनीं या प्रसंगीं भाषण केलें तें अगदीं सरळ व उदारमतवादी होतें. आणि या भाषणांत त्यांनीं आपल्या शिपाईगिरीच्या प्रांजलपणाचा गुण दाखविला. शिक्षणमंत्री वाजपेयी यांनीं पहिल्या दिवशीं तक्रार केली होती. परंतु या दुसऱ्या दिवशीं थोडें वळण घेऊन ते जाग्यावर आले व “ या ठरावाचा अम्मल स्वतः मध्यवर्ती शिक्षणखात्याच्या क्षेत्रांत आपण करूं व प्रांतिक शिक्षणमंत्र्यांनाहि याविषयीं शिफारस करून लिहूं ” असें त्यांनीं सांगितलें. यामुळें या प्रश्नाला चांगलें चलन मिळेल अशी आशा वाटते. म्हणून याबद्दल सर्व तरुण पिढीनें डॉ. मुंजे यांचे आभार मानले पाहिजेत.

* * *

यानंतर लाला लजपतराय यांच्या निधनासंबंधींचा पं. द्वारकाप्रसाद मिश्र यांचा ठराव चर्चेला निघाला. मिश्र यांनीं आपलें म्हणणें सर्वस्वीं साधार मांडून आवेशयुक्त असें भाषण केलें. सरकारतर्फे विरोध करतांना होममेंबर क्रेरर यांची फार त्रेधा झाली. हकीकत खोटी मानावी तर खोटी म्हणवत नाहीं, खरी मानावी तर कां घडली याचा खुलासा करावा लागेल. म्हणून “ लाला लजपतराय व त्यांचे स्नेही वगैरे लोकांनीं जीं विधानें केलीं तीं प्रत्यक्ष घडलेली हकीकत असें न मानतां त्यांचा तसा ग्रह झाला खरा इतकेंच आपण म्हणण्याला तयार आहों ” असें त्यांनीं सांगितलें. याचा अर्थ संभावितपणा न सोडतां लोकाला खोटें म्हणावें ! पण या युक्तिवादाला

नेहरू, मालवीय, जयकर, जिना या सर्वांनीं इतक्या जोरानें व आवेशानें विरोध केला कीं, होममेंबर क्रेरर यांचा आधींच लहान असलेला चेहरा आणखी लहान झाला! लाला हंसराज हे स्वतः हा प्रकार घडला त्या ठिकाणीं हजर होते. इतकेंच नव्हे तर ज्या काठया लालजींच्या छातीवर पडल्या त्यांनीं लाला हंसराजांच्या बोटांतून रक्त काढलें. भर असेंब्लींत उभें राहून सुसंगत लिहून आणलेलें भाषण त्यांनीं गंभीरपणानें वाचून दाखविलें. त्याचा परिणाम सभेवर विशेष झाला.

* * *

कांटेरी तार कोणी ओलांडली नाहीं. लोक उभे होते तेथें ते कायदेशीर हक्कानें उभे होते व दंगा मुळींच होण्याचा संभव नव्हता. अशा स्थितींत पोलीस अधिकाऱ्यांनीं काठी कां चालविली याचें उत्तर होममेंबर यांना मुळींच देतां आलें नाहीं. पोलिसांना व्यवस्था ठेवण्याचे हुकूम असतील, पण वरील स्थितींत अशा प्रकारें काठ्या मारण्याचे हुकूम होते काय? या प्रश्नाला होम-मेंबर उत्तर काय देणार? या ठरावाला मुसलमान लोकांकडून किंवा इतर खासगी सभासदांकडून विरोध झाला नाहीं यावरूनच सरकारच्या गुन्हेगारी-संबंधानें सर्वस्वीं कशी खात्री होऊन चुकली होती हें नजरेस आलें. त्यांतूनहि मुनशी ईश्वर शरण यांनीं द्वारकाप्रसाद यांच्या शब्दांत योग्य दुरुस्ती करून, खासगी चौकशी करण्याकरितां कमिटी नेमावी अशी उपसूचना मांडली व ती कमिटी बहुमतानें मंजूर झाली. आतां सरकार या ठरावाचा अंमल करीत नाहीं हें तर दिसतच आहे. परंतु गुन्हेगार पोलीस अधिकाऱ्याला त्यांनीं शिक्षा केली तरी त्यांच्यामध्यें कांहीं माणुसकी उरली आहे असें म्हणतां येईल. या एकंदर प्रकारावरून सरकार किती जबाबदार आहे हें कळून येईल.

* * *

सोमवार तारीख १८ रोजीं फक्त फडाणिशी काम झालें. मूळ मंजूर झालेल्या अंदाजपत्रकाचें अतिक्रमण करून जो खर्च करण्यांत आला होता तो बहुतेक विशेष हरकत न घेतां मंजूर करण्यांत आला. फक्त त्यापैकीं सायमन कमि-शनच्या म्हणजे हर्टोग कमिटी व सेंट्रल कमिटी या सल्लागार व सहकारी कमिट्यांच्या खर्चासंबंधानें विरोध करण्यांत आला. पण त्यावरील वादविवाद विशेष रंगला नाहीं. आणि अखेर ती मागणी मंजूर झाली. लाला लजपतराय यांच्या ठरावाच्या वेळीं जितके खाजगी सभासद हजर होते तितके या वेळीं

राहिले नव्हते ! यावरूनच खासगी कामासंबंधानें हेळसांड कशी होते हें सहजच दिसून आलें. हाहि असेंब्लीला खरी जबाबदारी न दिल्याचा परिणाम होय. कारण ही मागणी नामंजूर झाली असती तर गव्हर्नर जनरल यांनीं आपला अधिकार चालवून तो खर्च केला असता. किंबहुना त्यांतील कांहीं होऊनहि गेला आहे. म्हणून ही बाब जल-ताडणासारखी व्यर्थ होती. हेंहि एक या हेळसांडीचें कारण असेल.

* * *

मंगळवार तारीख १९ रोजीं रेल्वेमेंबर सर जॉर्ज रेनी यांनीं रेल्वेखात्याचें अंदाजपत्रक पुढें मांडलें. त्यांत रेल्वे बोर्डावर 'हिंदी' या फक्त नांवाचा आणखी एक सभासद नेमून घ्यावयाचा या प्रश्नाखेरीज, इतर कोणत्याहि बाबीला रेल्वे फडणविसांनीं कांहींहि महत्त्व दिलें नव्हतें ! परंतु हा दिवस चर्चेचा नसल्याकारणानें, तो नुसता अभिश्रवणाचा समारंभ झाला. पण या बाबीला चालू आठवड्यांत पहिल्या दिवशीं जो विरोध व्हावयाचा तो होईल. रेल्वेवरील खर्चाच्या मागण्या बहुधा मामुलीच आहेत. नमूद करण्यासारखी एकच गोष्ट म्हणजे, कोळशाच्या वाहतुकीचे दर कमी करण्यांत आल्याचें सांगण्यांत आलें; आणि ती बाब असावी तशीच आहे. वादग्रस्त नाहीं.

* * *

बुधवार तारीख २० रोजीं खासगी बिलें चर्चेला निघालीं. पैकीं साराभाई नेमचंद हाजी यांनीं युरोपियन जहाजी कंपन्यांना आळा घालण्यासंबंधानें एक बिल आणलें होतें. किनाऱ्यावरील व्यापारासंबंधानें हिंदी जहाजी कंपन्यांना अधिक वाव मिळावा अशाविषयीं त्यानीं पूर्वींच एक बिल पुढें आणून तें सिलेक्ट कमिटीकडे पाठविलें आहे. त्या बिलाचीच ही पुरवणी किंवा त्याचेंच हें एक भावंड होय. अर्थात् पूर्वींच्या बिलाप्रमाणें याहि बिलाला सरकार व युरोपियन सभासद यांनीं कसून विरोध केला. या चर्चेत ब्रिटिश इंडिया व एशियाटिक स्टीम नॅव्हिगेशन कंपन्या उतारू लोक आपल्याकडे ओढण्याकरितां जीं हस्तपत्रकें व जाहिराती काढतात त्यांत आक्षेपार्ह मजकूर असतो हें दोरास्वामी अय्यंगार यांनीं कांहीं जाहिराती वाचून दाखवून सिद्ध केलें. अखेर सिलेक्ट कमिटीकडे पाठविण्याची सूचना बहुमतानें मंजूर झाली. या बिलाला कांहीं प्रमुख मुसलमान सभासदांनींहि संमति दिली. ती कशी मिळाली याविषयीं लोकांना आश्चर्य वाटलें. हाजी यांचें हें बिल सिलेक्ट

कमिटीकडे गेलें व तिचा रिपोर्ट येईल हेंहि खरें, परंतु हीं त्यांचीं दोन्ही बिलें यापुढें चालू बैठकींत निघण्याचा संभव नाहीं. यामुळें हीं दोन्ही बिलें सिलेक्ट कमिटीकडे जाऊन न जाऊन सारखींच होणार अशी भीति वाटते.

*        *        *

हिंदुस्थानांत बँका व पेढ्या यांची स्थिति कशी आहे व त्या वाढविण्याचे प्रयत्न कोणत्या दिशेनें करावेत हें ठरविण्याकरितां पूर्वचौकशीसाठीं एक कमिटी नेमण्याचा उपक्रम सुरू आहे. या कामीं सर जॉर्ज शूस्टर यांनीं खाजगी व्यापारी मंडळाच्या प्रतिनिधींशीं येथें दोनतीन दिवस चर्चा केली. त्याकरितां लाहोरचे लाला हरकिसनलाल, मुंबईचे मादन वगैरे गृहस्थ मुद्दाम येथें आले होते. नवीन स्थापन झालेल्या देशी व्यापारी मंडळाचे प्रतिनिधी सर पुरुषोत्तमदास ठाकुरदास व घनशामदास बिर्ला हेहि या चर्चेंत सामील होते. या चर्चेनंतर कांहीं तरी प्रत्यक्ष काम करण्यांत येईल अशी खात्री वाटते व मध्यवर्ती कमिटीचीं नांवें लवकरच प्रसिद्ध होतील. पण या कमिटीपेक्षांहि महत्त्वाचा भाग म्हणजे प्रांतानिहाय चौकशी करण्याकरितां कमिट्या नेमणें हा होय. त्यासंबंधानें प्रांतिक सरकारांचीं मतें मागविण्यांत येत आहेत. आणि या चौकशीकमिटींतून लोकमताचे प्रतिनिधी म्हणून बिनसरकारी व तज्ज्ञ गृहस्थ नेमले जावे व चौकशीला सर्वस्वीं सरकारी स्वरूप राहूं नये असे प्रयत्न होणार आहेत. हिंदुस्थानांतील निरनिराळ्या कॉलेजांत अर्थशास्त्राचें अध्ययन व अध्यापन करणारे जे प्रोफेसर लोक आहेत त्यांना पुढें येऊन लोकोपयोगी काम करण्याची ही संधि फार चांगली आली आहे असें वाटतें. तरी या प्रोफेसर मंडळींनीं कांहीं संघटित कार्य केल्यास त्यांच्यांतील वाकबगार लोकांना या महत्त्वाच्या चौकशींत भाग घेण्याला वाव आहे. “प्रोफेसरमंडळींना केवळ पुस्तकी ज्ञानाची माहिती असते, त्यांना व्यावहारिक ज्ञान नसतें;” असा एक ठराविक आक्षेप सरकारी फडणविशी खात्याचा नेहमीं असतो. परंतु तो आक्षेप खोटा असून, या प्रोफेसर मंडळींना व्यावहारिक ज्ञानहि असतें ही गोष्ट ते या चौकशीच्या प्रसंगीं सभासद म्हणून किंवा इतर रीतीनें पुढें येतील तर आपोआप सिद्ध होणारी आहे.

*        *        *

अशा रीतीनें दिल्ली येथें सरकारी कामकाज चालू असतां, त्याबरोबर इतरहि महत्त्वाचें काम सुरू आहे. कॉंग्रेस वर्किंग कमिटीच्या सभा या दोन

आठवड्यांत दिल्लीस झाल्या व तिचे ठराव आतां प्रसिद्धहि झाले आहेत. शिवाय असेंब्लीचे अध्यक्ष ना. पटेल यांनीं आपल्या घरीं चहापार्टी देऊन लॉर्ड आयर्विन व महात्मा गांधी यांची गांठ खासगी रीतीनें घालून दिली ! या चहापार्टीला एक दोन राजे, गव्हर्नर जनरल, महात्मा गांधी व यांच्या-बरोबर असेंब्लींतील पक्षांचे मुख्य पुढारीहि बोलाविले होते. त्यांत पं. नेहरू, पं. मदन मोहन मालवीय, सर डार्सी लिंडसे, बॅ. जिना व सर अबदुल कयूम यांच्या जागीं महंमद शहानवाज इतके पाहुणे होते. राजकारणांत स्पष्ट व निरनिराळीं किंवा विरुद्ध अशीं मतें असणारी ही पुढारी मंडळी एकत्र बोला-वली यावरूनच, या चहापार्टीच्या वेळीं महत्त्वाची अशी राजकारणी चर्चा कोणतीच होणें शक्य नव्हतें ही गोष्ट चाणाक्ष माणसाला तेव्हांच कळून येण्यासारखी आहे. परंतु गव्हर्नर जनरल व म. गांधी या दोघांचा स्वाभि-मान संभाळून, त्यांना एका प्रतिष्ठित तिऱ्हाइताच्या घरीं एका टेबलाशीं बसून भेटतां-बोलतां आलें इतकेंच या चहापार्टीचें महत्त्व मानतां येईल !

* * *

पण एवढ्यावरून किती तर्क-वितर्क सुरू झाले हें सांगतां पुरवत नाहीं. पटेल यांच्या घरचा नऊ चमचे चहा खर्ची पडला ! परंतु तो खर्च पडण्यापूर्वींच नुसत्या बातमीनें शेंकडों लोकांचे ओठ हलले व चहापार्टीनंतर आतां हजारों लोकांचे ओठ या विषयाच्या चर्चेनें हलूं लागले आहेत. नवग्रहींचा परिणाम जगावर फार मोठा होतो अशी ज्योतिषशास्त्रवेत्त्यांची समजूत असते. पण पटेलसाहेबांच्या घरीं निमंत्रणानें आलेली ही नवग्रही कांहीं एक परिणाम न करतां फुकट गेली असली पाहिजे असेंच अनुमान समंजस लोक काढतील व तेंच बरोबर आहे. कित्येकांच्या मतें यापुढें जें मोठें राउंड टेबल होणार याचीच ही छोटी आवृत्ति व रंगीत तालीम असावी ! या समजुतीला खरा असा एकच आधार आहे कीं, चहा घेण्याकरितां राउंड टेबल मांडलें होतें ! पण तेंहि सगळ्यांचें मिळून एक राउंड टेबल नव्हतें. एकेका निरनिराळ्या टेबलाभोंवतीं दोन-दोन, तीन-तीन लोक बसले होते, आणि ते आपापल्यांत बोलण्यामध्यें चूर होते. व्हाइसरॉय, म. गांधी व जिना हे तिघेच टेबलापाशीं बसावे अशी चतुरपणाची योजना करण्यांत आली होती. परंतु इंग्रजांचा स्वभाव ज्याला माहीत आहे, त्याला या प्रसंगीं हवापाण्याचा किंवा अवांतर

कित्येक गोष्टी किंवा इतर महत्त्वाच्या विषयांवर संभाषणें झालीं असतील हें खरें वाटणार नाहीं.

*  *  *

या चहापार्टीला हजर नसतां वर्तमानपत्रांच्या बातमीदारांनीं मात्र कल्पनातरंगांना खूप वाव दिला होता; पण ज्योतिषाच्या भविष्याप्रमाणें त्यांचीं विधानें इतकीं पोंचट होतीं कीं, कोणी त्यांतून कांहींहि अर्थ काढूं शकणार नाहीं. व्हाइसरॉयसाहेब कांहीं गोष्टी किंचित् हलक्या आवाजानें बोलले! त्या बोलतांना ते आजूबाजूला पाहत होते! महात्मा गांधींच्या तोंडावर सडेतोड व निःस्पृहपणें उत्तरें देण्याची छटा—झाक चमकत होती! हळू बोललेल्या शब्दांचा वचपा काढण्याकरितां मधून मधून हसण्याचाहि आवाज ऐकूं येत होता; परंतु सर्वांच्या चेहऱ्यांवर गंभीरपणाची छाया दिसत होती. संभाषणें महत्त्वाचीं झालीं, पण कोणीहि आपला स्वभाव सोडला नाहीं! शिष्टाचार व राजकारण यांचा सुंदर मिलाफ घडला. सर्व पाहुणे आस्थेनें जमले व खुषींत आनंदानें परत गेले! अशा तऱ्हेचीं वर्णनें करून वर्तमानपत्रांच्या कांहीं बातमीदारांनीं असा आव आणला कीं, चहाच्या टेबलावरील गोड पदार्थांवर ज्या माशा बसल्या होत्या, त्या माशा नसून आम्ही बातमीदारच त्यांचें रूप घेऊन तेथें वावरत होतों! एक पैशाची भांग घेतली असतां हवे तसे कल्पनातरंग उठवितां येतात असें लो. टिळकांनीं एकदां म्हटल्याचें प्रसिद्ध आहे. पण तेथें एक पैशाचीहि भांग खर्च पडली नाहीं, किंवा चहाचा एक चमचाहि बातमीदारांना मिळाला नाहीं. पण चहाच्या कल्पनेनें आपण जिभल्या चाटीत आहों असें कोणी म्हणतील म्हणून ओठ हलवितांना आपण गुप्त बातम्यांचा स्फोट करीत आहों असा आव या बातमीदारांनीं घातला!

*  *  *

या चहापार्टीला महत्त्व येण्याचें कारण इतकेंच कीं, दोन-तीन महत्त्वाचे प्रश्न लोकांच्या डोक्यांत घोळत आहेत. लॉर्ड आयर्विन हे येत्या जूनमध्यें विलायतेला जाणार म्हणतात. अर्थात् ते नव्या प्रधानमंडळाशीं चर्चा करण्याला जाणार असतील. इकडे राष्ट्रीय सभेनें स्वातंत्र्यमिश्रित स्वराज्याचा ठराव करून ठेविलेला असून, म. गांधींनीं निर्वाणीचा खलिता आगाऊच जाहीर करून ठेविलेला आहे त्याचें काय होणार हा दुसरा प्रश्न! व तिसरा प्रश्न असा कीं, सायमन कमिशन नेमण्यासंबंधीं प्रधानमंडळानें जी चूक केली ती

जॉइंट पार्लमेंटरी कमिटी नेमण्याच्या वेळीं सरकार दुरुस्त करणार कीं काय ? या तीन प्रश्नांचा एकमेकांशीं संबंध जोडून लोकांचे तर्कवितर्क सुरू आहेत; परंतु निश्चित असें कांहींच नाहीं. म्हणून तूर्त पटेल यांच्या चहापार्टीचा अर्थ इतकाच कीं, लोकपक्षाची कांहीं मोठीं माणसें सरकार पक्षाच्या कांहीं मोठ्या माणसांनिशीं पटेलसाहेबांसारख्या मोठ्या माणसाच्या घरीं जमलीं व त्यांनीं एकत्र बसून चहा घेतला. या चहाच्या पेल्यांत कल्पनातरंगांनीं वादळ उठविलें आहे !

* * *

गेल्या रविवारीं दिल्ली शहरांत मॉक पार्लमेंटची एक बैठक झाली. मॉक पार्लमेंट म्हणजे पार्लमेंटची थट्टा. हा प्रसंग गांवांतील एका नाटकगृहांत झाला. तिकिटें लागलीं असतांहि सभागृह भरून गेलें होतें. पार्लमेंटचे सभासद म्हणून गांवांत स्थानिक कामें करणारी चार मंडळी मुद्दाम एकत्र केली होती. त्यांच्याबरोबर असेंब्लीचे कांहीं सभासदहि या पार्लमेंटाचे सभासद म्हणून बसविले होते. नाटकांतील सीन ब्रिटिश पार्लमेंटचा होता. अध्यक्ष दिवाण चमनलाल हे होते. खेळांत गडी वाटून घ्यावे त्याप्रमाणें एका बाजूस प्रधान मंडळी व दुसऱ्या बाजूस विरोधी लोक अशी रचना केली होती. पोशाख बदलून सोंगें घेतलीं नव्हतीं. साध्या पोशाखानेंच बतावणी सुरू होती. बॅ. असफअल्ली यांनीं बाल्डविन साहेबांचा पार्ट केला. एक संन्यासी स्टेट सेक्रेटरी बनले होते. हसन निझामी यांनीं ओडवायर यांची भूमिका केली व ती फार चांगली वठली. नेहरू रिपोर्टाला विरोध करण्याचें काम त्यांच्याकडे होतें. आणि या कामीं ते खऱ्या मनानें जें बोलले तें बतावणीला उपयोगीं पडलें ! प्रो. इंद्र हे रॅम्से मॅकडोनल्ड बनले होते. पं. नीलकंठदास हे सोशॅलिस्ट पक्षाचे स्वतंत्र पुढारी व स्वतंत्रतावादी म्हणून बसले होते.

* * *

पण बजावणी करतांना आपण लंडन येथील पार्लमेंटमध्यें बसलों आहों हा भ्रम कोणालाहि मनाशीं पक्का धरून ठेवतां आला नाहीं. स्वप्नामध्यें कांहीं खऱ्या व कांहीं खोट्या गोष्टींची भेसळ होते, तशी यांच्या बतावणींत झाली. विलायतेंतील इंग्रज म्हणजे बोलतां बोलतां हळूच असेंब्लींतील हिंदी सभासद असल्याची ओळख बोलणारे न कळत पटवीत ! गोष्टींतील चोरीचा तपास करणारांमध्यें स्वतः चोरच सामील झाला व चोराचा मार्ग काढीत काढीत लोक

चालले असतां 'हा चोर येथपर्यंत आला असेल' असें म्हणून पुढें 'या भिंतीवरून अशी उडी त्यानें मारली असेल' असें म्हणण्या ऐवजीं, "मी अशी उडी मारली" असें बोलून गेला. असाच प्रकार या सभेंत झाला. सर्वांत मौज ही कीं, नेहरू रिपोर्ट मंजूर करण्याला लोकपक्षाचे सभासद पुरे पडेनात तेव्हां प्रेक्षकांचींहि मतें सामील करण्यांत आलीं. सभेच्या प्रारंभीं राजेसाहेबांचें भाषण व्हावयाचें होतें पण दिवाण चमतलाल हे क्रान्तिकारक असल्यामुळें 'साखरेचें खाणार त्याला देव देणार' या न्यायानें त्यांनीं प्रथमच उठून सांगितलें कीं राजेसाहेबांचें भाषण हा कार्यक्रम ठरला होता खरा, पण आज सकाळींच त्यांनीं राज्यपद सोडून राजीनामा दिल्यामुळें त्यांचें भाषण रहीत करण्यांत आलें आहे! अशा रीतीनें तोंडच्या एका शब्दानें राज्यक्रान्ति सुखानें पार पडली!

## पत्र नं. ५

ता. १-३-२९

गेल्या आठवड्यांत शुक्रवार व रविवार हे सुटीचे दोन दिवस सोडून, काल गुरुवार तारीख २८ पर्यंत असेंब्लीमध्यें एकच विषय म्हणजे रेल्वे खात्याच्या जमाखर्चाचा वादविवाद चालू होता. खर्चाच्या एकंदर १४ खात्यांत मिळून १०७३/४ कोटी रुपयांच्या खर्चाच्या मंजुरीचा सवाल असेंब्लीपुढें टाकण्यांत आला होता. आणि या सर्व बाबत मिळून निरनिराळ्या सभासदांनीं १०० काट सुचविले होते. त्यांत अर्थात् कांहींची पुनरुक्ति होतीच. तथापि पहिल्या मागणीवर दिलेल्या ५९ काटांपैकीं, चार दिवसांत मिळून जेमतेम २५ किंवा त्याहूनहि कमी मुद्दयांची चर्चा झाली. पण खरा वाद व विरोध असा पहिल्याच बाबींत म्हणजे रेलवे बोर्डाच्या खर्चमंजुरीवर झाला. या चर्चेनें एक सबंध दिवस खाल्ला. पण अखेर सरकारनें बहुमतानें ती मागणी जिंकली. किंबहुना यापुढें ज्या ज्या बाबीवर प्रत्यक्ष मतें मोजण्याची वेळ आली त्या सर्वांत लोकपक्षाचाच पराभव झाला.

* * *

यांपैकीं मतें मोजण्याचे कित्येक प्रसंग अध्यक्षांनीं मुद्दाम प्राप्त केले. त्यांत त्यांचा हेतु कदाचित् असा असावा कीं, लोकपक्षाचे सभासद या चर्चेंत आपल्या जागीं हजर राहत नाहींत म्हणून त्यांना लाजवावें. पण कोणी

लाज आणली तरी मानावयाची नाहीं असाच जवळ जवळ बेत केल्याप्रमाणें लोकपक्षाचे पुष्कळसे सभासद गैरहजर राहत. स्वराज्य पक्षाचे, किंबहुना असेंब्लींत एकंदर लोकपक्षाचे पुढारी पं. मोतिलाल नेहरू हे या सगळ्या दिवसांत फार तर १०-२० मिनिटें सभागृहांत हजर असतील. खुद्द पुढाऱ्यानेंच असें वर्तन केलें म्हणजे इतरांना नांव कोणी कसें ठेवावें ? उलट सरकारची शिस्त अशी कीं, या सगळ्या चर्चेंत स्वतःला एक शब्दहि बोलण्याचें कारण नसतां, होममेंबर क्रेरर हे चार दिवस आपल्या जागीं पहारेकऱ्याप्रमाणें बसून होते. कदाचित् पहारेकरीहि एखादे वेळीं थोडीशी डुलकी घेतो, नाहीं असें नाहीं; पण क्रेरर यांनीं डुलकी घेतली तरी ती बसल्या जागेवरूनच ! कित्येक वेळां असाहि प्रसंग आलेला दिसे कीं, सरकार पक्षाच्या लोकांनीं संगनमत करून दडी दिली असती तर योग्य गणभरती ( कोरम ) नाहीं म्हणून अध्यक्षांना सभा बरखास्त करावी लागली असती. एक-दोनदां गमतीनें कोणी तसा प्रश्न काढलाहि, परंतु अध्यक्ष सभासदांची मोजदाद करण्यांत वेळ घालवितात ती संधि घेऊन लॉबीमधील कांहीं लोक तेवढ्यांपुरतें येऊन बसून गणभरती करून पुनः बाहेर जात ! अशा रीतीनें ही चर्चा अगदी रेंगाळत चालली होती.

* * *

मुख्य भर व सर्वांचा एकोपा पहिल्या मागणीवर होता. ही मागणी रेल्वे-बोर्डाच्या पगाराची होती. आणि तींतहि नवीन नेमण्याच्या एका सभासदाचा जो पगार घालण्यांत आला होता त्यावर सर्वांची झोड पडली. रेल्वे बोर्डावर पूर्वीं ठरल्याप्रमाणें शब्दमात्रानें हिंदी सभासद दिला; पण त्यालाहि रेल्वेबोर्डाच्या बालेकिल्ल्यांत जागा दिली नाहीं. जुन्या जागा युरोपियन लोकांकरितां शिल्लक ठेवून, नवीन जागा निर्माण केली व लोकांना फसविण्याकरितां व भलेपणा दाखविण्याकरितां रेल्वे खात्यांतील मजुरांची स्थिति सुधारण्याचें काम त्यांच्या गळ्यांत घातलें. म्हणजे या एका आश्रिताची वर्णी लावण्यापलीकडे खरें कांहीं झालें नाहीं. आज हिंदी सभासद नेमला पण उद्यां त्याच्या जागेवर युरोपियन नेमणार नाहींत अशी खात्री कोठें आहे ? कारण याला कायदा नाहीं. ज्या त्या वेळेपुरती कांहीं एक सबब सांगून, मनचें तें करावें अशी सरकारची पद्धतच आहे ! हीं व अशीं इतर

कारणें विरोधकांनीं सांगितलीं, परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं. संख्या-बलावांचून सयुक्तिकता लंगडी पडते.

* * *

ही एक चुरशीची बाब संपल्यानंतर बाकीच्या चर्चेत विशेष कोणीच लक्ष घातलें नाहीं. पुढील तीन दिवसांत आणखी १०-५ मुद्द्यांची चर्चा झाली. पण मुद्दा मांडणारानें तयार करून आणलेली तक्रार मांडावी, एखाददुसऱ्यानें तिचें समर्थन करावें; शेवटीं सर जॉर्ज रेनी किंवा पार्सन्स यांनीं उठून, तोंडाला येईल तसें उत्तर देऊन मोकळें व्हावें, असा प्रकार चालला होता! आतां ही गोष्ट खरी कीं, खासगी सभासदानें विशेष प्रसंगानें पुस्तकें वाचून माहिती मिळवायची व सरकारी सभासदांचें तर तें रोजचेंच काम; यामुळें त्यांना विषयाला सोडून फारसें बोलावें लागत नव्हतें. पण ते हातचलाखी करीत हें मात्र उघड दिसे. खासगी सभासदांच्याजवळ माहिती असावयाची, ती रेल्वे-बोर्डानें प्रसिद्ध केलेल्या कागदपत्रांतील असावयाची. पण या कागदपत्रांत छापलेली नाहीं अशी माहिती अवचित सरकारला पुढें आणतां येई. कारण वादाच्या मुद्द्याची सूचना त्यांना आगाऊ असल्यानें त्यांना कोठल्या तरी अधिकाऱ्याचा, कोठल्या तरी एजंटाचा, तेवढ्यापुरता रिपोर्ट आणवतां येई, आणि या कागदांतील माहिती प्रथमच डोकें वर करून यावयाची; तथापि ती अनधिकृत म्हणण्याची सोय नाहीं व खोटी म्हणावी तर उलटा आधार जवळ नाहीं. यामुळें सर जॉर्ज रेनी किंवा पार्सन्स हे बोलतील तें प्रमाण अशी स्थिति होऊन बसली होती. तज्ज्ञ व अतज्ज्ञ यांच्या भांडणांत कोणत्याहि देशाच्या राज्यकारभारांत अशाच गोष्टी होत असतात. त्यांत व हिंदुस्थानांत फरक इतकाच कीं, खासगी पुढाऱ्यांनीं सरकारी खुर्चीवर बसून जबाबदारीनें बोलण्याचा प्रसंग केव्हांच येत नाहीं व सरकारी सभासदांनाहि विरोधकांची भूमिका घेऊन केव्हांहि वाक्पांडित्य करावें लागत नाहीं. अशी उलटापालट कधींहि होण्याचा संभवच नसल्यानें सर्व सरकारी काम एकतंत्री, एका दिशेनें, एका पद्धतीनें चालतें.

* * *

असो. यानंतर झालेल्या चर्चेंत कोण बोललें, काय बोललें, हें सांगणें जवळ जवळ कठीण आहे. कारण पावलांत घोटाळावें त्याप्रमाणें एका विषयांत दुसरा, दुसऱ्यांत तिसरा असे विषय निघत व तसें होणें स्वाभाविक होतें.

कारण टीकास्पद असा जो सगळा कारभार त्याच्या मुळाशीं कारण एकच म्हणजे स्वायत्त, बिनमुर्वतखोर व लोकांच्या दृष्टीनें कधींहि न पाहणारें कारभारी मंडळ! म्हणून पुढें आलेल्या मुद्दयांचा सभासदवार वांटणी न करतां टीकेचे बहुतेक मुद्दे एकत्र जमा धरून ते वाचकांच्या नजरेला यावेत अशा रीतीनें देण्यासारखे आहेत. पण ते पुनः केव्हां तरी देऊं.

* * *

अशा रीतीनें गेल्या चार दिवसांत सगळें वाग्युद्ध एकाच मुद्दयाच्या भोंवतीं-भोंवतीं सुरू होतें. पण पूर्वींच सांगितल्याप्रमाणें पहिल्या एका मागणीपलीकडे मजल गेली नाहीं. वॉशिंग्टन आयर्विनच्या एका गोष्टींत असें सांगितलें आहे कीं, एक मनुष्य टेकडीवरून उडी मारून जाण्याकरितां मागें अर्ध्या मैलाचा पल्ला घेऊन धांवत सुटला व या धांवण्याच्या जोरानें मिळणाऱ्या गतीनें, टेकडीपार उडी मारून जाण्याचें त्यानें ठरविलें! पण ही अर्ध्या मैलाची मजल धांवून जाण्यांतच त्याची सगळी शक्ति खर्च झाली व तो घामाघूम होऊन पाय टाकून शेवटीं टेकडीच्या पायथ्याशीं टेकडीकडे पाहत हुश्श करीत बसला. रेल्वेबोर्डावरील चर्चेंत खासगी सभासदांची कांहींशी अशीच गत झाली. आधींची तयारी सगळ्या १४ मागण्यांतील विषयांची चर्चा करण्याची व कांहीं काट यशस्वी करून सरकारला लाज आणण्याची. पण पहिली एक मागणीहि पुरी न झाल्यामुळें ठराविक मुदतीनंतर जेव्हां अध्यक्ष उभे राहून मागण्या व त्यांतील लाखांचें व कोटींचे खर्चाचे आंकडे मंजुरीला घालूं लागले तेव्हां आपण कोठें व सरकार कोठें याची जाणीव सभासदांना होऊन त्यांचे डोळे चक्क झाले! तात्पर्य, सत्ता नाहीं तोंपर्यंत चर्चा, टीका व वादविवाद याला जवळ जवळ खेळाचें किंवा विडंबनाचें स्वरूप येतें. पण आज अशी स्थिति आहे खरी.

* * *

गेल्या आठवड्यांत नामदार शास्त्री यांना एक गार्डन-पार्टी देण्यांत आली. तिच्या आमंत्रणपत्रिकेवर १०-५ प्रतिष्ठित लोकांच्या सह्या घालण्यांत आल्या होत्या. पार्टीला व्हाइसरॉयसाहेबांना निमंत्रण करण्यांत आलें होतें व त्याप्रमाणें ते आलेहि. पण हा सगळा प्रकार पटेलसाहेबांच्या घरीं जी चहा-पार्टी झाली तिचें उट्टें काढावयाचें अशा अर्थाचा नसला तरी तिची बरोबरी करून दाखविण्याच्या दृष्टीचा झाला. पण यांत खर्च एकानें केला, मेहनत

दुसऱ्यानें केली, मान तिसऱ्याला मिळाला व इतकें होऊनहि बतावणीला गालबोट लागलें तें लागलेंच. निमंत्रणपत्रिकेवर सह्या घालणारांमध्यें प्रथम डॉ. अनसारी व पं. मोतिलाल नेहरू यांचीं नांवें होतीं. पण कांहीं तरी गैरसमज होऊन नेहरू व अनसारी यांचीं नांवें चुकून घातलीं गेलीं असें जाहीर करण्यापर्यंत पाळी आली! या पार्टीला स्वराज्य पक्षाचे कांहीं लोक आले, कांहीं आले नाहींत, पण स्वतः नेहरू यांनीं पार्टीला येण्याचेंहि टाळलें! कारण त्यामुळें कॉंग्रेसची अप्रतिष्ठा होते असें त्यांना वाटलें. वास्तविक पटेल यांच्या घरीं पार्टी झाली ती परिस्थिति व दुसऱ्या गार्डन पार्टीची ही परिस्थिति कांहीं वेगळी नव्हती पण पटेलसाहेबांच्या घरीं व्हाइसरॉयांच्याबरोबर चहा घेण्याला नेहरूंची हरकत नव्हती पण दहा निरनिराळ्या प्रमुख गृहस्थांनीं कोणत्याहि एका पक्षाच्या नांवानें निमंत्रण न देतां, ५०० लोकांना बोलावून जी पार्टी दिली तींत व्हाइसरॉयसाहेब येणार एवढयानें पं. नेहरू यांचें सगळें गाठोडें बुडालें! या विधिनिषेधाच्या बाबतींत पं. नेहरू यांनीं आजवर इतका विसंगतपणा दाखविला आहे कीं, स्वतः स्वराज्य पक्षांतील लोकहि त्यांच्यावर नाराज झाले आहेत व त्यांच्यासंबंधानें 'दिवा काकरवाद्भीता रात्रौ तरति नर्मदा' असें म्हणून त्यांचा अधिक्षेप करण्याची वेळ आली आहे. पटेलसाहेबांच्या पार्टीपेक्षांहि ही पार्टी खरोखर राजकीय देखाव्याच्या दृष्टीनें अधिक अलिप्त होती. तथापि औचित्याची मर्यादा मी तोंडानें ठरवीन तीच खरी. तिच्यापलीकडे पाऊल पडलें कीं सगळीं शिवाशिवीची कालवाकालव झाली, असें आपलें मत जगावर लादण्याचे पंडितजींचे प्रयत्न हल्लीं चालू आहेत. ते म्हणतील व आचरणांत आणतील तो बहिष्कार तेवढा खरा! बाकी कोणी कसाहि पाळला तरी तो फुकट. पण यासंबंधानें अधिक चर्चा न करावी हेंच बरें.

* * *

हल्लीं जुन्या पंचांगाप्रमाणें दिल्ली शहरांतील मराठी मोहल्यांमध्यें महाराष्ट्र स्नेहसंवर्धक समाजातर्फे दासनवमीचा उत्सव सुरू आहे व कथा, कीर्तनें, व्याख्यानें चालू आहेत. या प्रसंगीं नागपूरचे हरिदास दादाशास्त्री कायरकर हे येथें आलेले असून त्यांचीं कीर्तनें लोकप्रिय झालीं आहेत. हिंदी भाषेच्या सरावामुळें त्यांना दक्षिणेंतील कथेची पद्धत इकडील हिंदी लोकांना पटवून

दाखवितां आली. त्यांतल्या त्यांत त्यांनीं झांशीची राणी लक्ष्मीबाई यांचें व्याख्यान बसविलें आहे तें ऐकून तर इकडील हिंदी मंडळींना विशेष आश्चर्य व कौतुक वाटलें.

## पत्र नं. ६

ता. ८-३-१९२९

सोमवार व मंगळवार तारीख ५-६ रोजीं बजेटवर चर्चा सर्वसाधारण झाली. स्वराज्य पक्षातर्फे जम्नादास मेथा, षण्मुखम् चेट्टी, शेषा अय्यंगार, जोगिया, गयाप्रसादसिंग, दोरास्वामी अय्यंगार, राष्ट्रीय पक्षातर्फे केळकर, बिर्ला, मुनशी ईश्वर शरण, पं. मालवीय, चौधरी मुख्तारसिंग; स्वतंत्र पक्षातर्फे सर पुरुषोत्तमदास ठाकुरदास; युरोपियन पक्षातर्फे कर्नल क्रॉफर्ड; स्वतंत्र मुसलमान पक्षांतर्फे शहानवाज, महमह राजन बक्ष यांचीं भाषणें झालीं. याशिवाय रे. चतर्जी, के. सी. रॉय, कर्नल गिडने वगैरेंचींहि भाषणें झालीं. बहुतेक सर्वांच्या भाषणांत सामोपचार होता व "हें तुमचें पहिलें बजेट असल्यामुळें तुम्हाला कोणत्याच बाबतींत विशेष जबाबदार धरतां येत नाहीं. पण अजून चार वर्षे जावयाचीं आहेत. त्यांत तुमचा आमचा मतभेद होण्याचा प्रसंग न आला तर बरा. पण आलाच तर त्याला अनुसरून आम्हालाहि वागावें लागेल व जेवढ्या चांगल्या गोष्टी म्हणजे देशहिताच्या गोष्टी तुम्ही कराल तेवढ्यांत तुम्हाला आमची सहकारिता लाभेल" असेंच जवळ जवळ सर्वांनीं सांगितलें.

* * *

या नव्या फडणविसाच्या या पहिल्या बजेटांत, नवीन अठरा कोटींचें कर्ज काढावयाचें तें हिंदुस्थानांतच काढावयाचें असें आश्वासन असल्यामुळें तात्पुरता मतभेद नाहीं. परंतु विलायतेंत यंदाहि कांहीं कर्ज काढावें लागेल असें त्यांनीं सांगितलें. त्याला अर्थात् कोणालाच संमति देतां आली नाहीं. प्रांतिक खंडण्यांच्या बोजापासून प्रांतिक सरकारांना कायमचें मुक्त केलें ही गोष्ट सर्वसंमतच आहे. परंतु या खंडण्यांची गुंतागुंत नाहींशी झाल्यावर काय करावयाचें हा प्रश्न सर्वांच्या उत्कंठतेचा होता; व त्या बाबतींत म्हणजे नवीन कर बसविणार कीं जुन्यांपैकीं कांहीं कमी करणार यासंबंधानें नवीन फडणविसांनीं जें धोरण दिग्दर्शित केलें तें मात्र सर्वांना संशयास्पद वाटलें. सर बेसिल ब्लॅकेट यांनीं

एक मधाचें बोट जातां जातां लावून ठेवलें होतें तें असें कीं, "प्रांतिक खंडण्यांच्या भानगडींतून आपण मोकळे होतांच कदाचित् कोणते कर कमी करतां येतील याचा आपण विचार करूं." पण नवीन फडणविसांनीं कर कमी न करण्याची गोष्ट न बोलतां "पुढील वर्षांत नवीन कर बसवावा लागला तर तो कोणता बसवावा याचा विचार आपण करूं," असें जें सांगितलें तें सहजच भीतिप्रद वाटण्यासारखें होतें. पुष्कळांचा समज असा आहे कीं, 'कर कमिटी' नांवाची जी कमिटी सर टॉड हंटर यांच्या अध्यक्षतेखालीं नेमली होती व ज्या कमिटीवर डॉ. परांजपे हे एक सभासद होते त्या कमिटीनें करवाढीसंबंधानें ज्या सूचना करून ठेविल्या आहेत त्या उगवून कशा घेतां येतील याचा विचार आतां सरकार हळूहळू करूं लागणार!

* * *

कारण खर्च कमी न होतां कदाचित् थोडासा वाढणारच. अफगाणिस्थानाशीं युद्धाचा प्रसंग आला तर बोलावयासच नको; व खर्चांत बचत करण्याची गोष्ट निश्चित अशी नवीन फडणवीस कांहींच बोलले नाहींत. यावरून असें वाटतें कीं, कदाचित् नवीन कर बसविण्याच्या बाबतींत नवे फडणवीस व असेंब्ली यांचें युद्ध पुढचे वर्षीं जुंपेल. एरवीं पुढील बारा महिन्यांत भानगडीचा असा प्रश्न दिसत नाहीं. कारण हुंडणावळीचें बिल पूर्वींच पास होऊन गेलें व रिझर्व्ह बँकेचा प्रश्न एकदोन वर्षें तरी पुढें येत नाहीं. दरम्यान हिंदुस्थानांत बँका व पेढ्या यांची स्थिति कशी काय आहे याची चौकशी होणार आहेच व ती सर्वांना हवीच आहे. यासंबंधानें मध्यवर्ती कमिटी लवकरच नेमण्यांत येईल आणि त्या कमिटीवर मुंबईचे मादन व सर ह्यू कोक व कलकत्त्याचे खैतान या तीन गृहस्थांचीं नांवें हल्लीं पुढें आलीं आहेत. बाकीचीं नांवें सुचविलीं जाऊन लवकरच ती कमिटी पुरी होईल. परंतु प्रांतानिहाय कमिट्या नेमल्या जाऊन त्यांचे रिपोर्ट हातीं आल्यानंतर या मध्यवर्ती कमिटीचें काम सुरू होणार. म्हणून त्या बाबतींत तूर्त कांहींच वाद नाहीं. एकंदरीनें 'मी नवीनच आलों आहें' असें फडणविसांनीं विनयपूर्वक म्हटल्यानें टीकेचा ताण ढिला झालाच होता व "पुढें येणाऱ्या अमुक अमुक प्रश्नांचा विचार करावयाचा तो असेंब्लींत निरनिराळ्या पक्षांच्या पुढाऱ्यांचा विचार घेऊन आपण करूं" असें सर जॉर्ज शूस्टर यांनीं दर्शविल्यामुळें तूर्त वाद असा कांहींच उरला नाहीं. असो. समारोपादाखल सर जॉर्ज शूस्टर यांनीं मंगळवारीं संध्याकाळीं

अखेरचें भाषण केलें. त्यांत नमूद करण्यासारखी गोष्ट कांहींच नव्हती. तथापि "कित्येक सभासदांनीं ज्या निरनिराळ्या सूचना केल्या त्यांचा मी अवश्य विचार करीन व हा विचार केला ही गोष्ट पुढील बजेट मांडतांना निदर्शनास येईल" असें त्यांनीं भासविलें.

* * *

बुधवार तारीख ६ रोजीं सरकारी बिलाचें काम निघालें. त्यांत टॅरिफ बोर्डाकडून आलेल्या सूचनांना कायद्याचें स्वरूप देण्याचें एक बिल होतें. पैकीं समुद्रांतील तारायंत्राची तार व हिंदुस्थानांत तयार होणाऱ्या छापखान्याचा टाइप यांचा परदेशी मालापासून बचाव होण्याकरितां कांहीं मदत करावी असा बिलाचा आशय होता; व बिल वादग्रस्त नसल्यामुळें थोड्याच वेळांत मंजूर झालें, हिंदुस्थानांत टाइप फाउंडरीचा धंदा नवीनच आहे. शिवाय हिंदुस्थानची गरज भागण्यासारखा बहुतेक सर्व प्रकारचा टाइप इकडे चांगला पाडतां येतो. असें असतां परदेशाहून येणारा टाइप, व इकडे टाइप तयार होण्याकरितां आणलेलें शिसें व ॲंटिमनी, यांच्यावर जी सापेक्ष बंदरी जकात होती ती अन्यायाची आहे अशी मागणी इकडील टाइप फाउंड्र्याच्या मालकांनीं पूर्वीपासूनच केली होती. तिचा अशा रीतीनें निकाल लागला ही गोष्ट बरी झाली. संरक्षणाकरितां म्हणून जबर जकात बसविली नाहीं. परंतु वर दर्शविल्याप्रमाणें जो अन्यायमूलक फरक होता तो टाइपावरील जकात वाढवून काढून टाकला.

* * *

दुसरें व तिसरें सजोड बिल ट्रॅन्सफर ऑफ प्रॉपर्टी ॲक्टाच्या दुरुस्तीसंबंधाचें होतें. पैकीं एका बिलांत हल्लीं अमलांत असलेल्या ट्रॅन्सफर ऑफ प्रॉपर्टी ॲक्टांत केलेल्या सर्वसाधारण सुधारणा नमूद केल्या असून दुसरें बिल पुरवणीदाखल आहे. त्यांत पहिल्या बिलाच्या योगानें निरनिराळ्या अनेक कायद्यांत ज्या दुरुस्त्या करणें प्राप्त झालें त्यांचा समावेश करण्यांत आला आहे. हीं बिलें तयार करण्याकरितां गतवर्षी एस्. आर. दास यांच्या अध्यक्षतेखालीं एक कमिटी नेमली होती. तींत मुंबईचे ॲ. मुल्ला, हल्लींचे लॉ-मेंबर सर बी. एल्. मितर, व अलाहाबादचे बॅ. सेन वगैरे मंडळी होती. त्यांनीं दुरुस्तीचें बहुतेक काम करून ठेवलेंच आहे. परंतु त्याला कायद्याचें स्वरूप देण्याकरितां सिलेक्ट कमिटी नेमण्यांत आली आहे. या कमिटीवर मौ. महंमद याकूब

जिना, शहा नवाज, निर्मळ चंदर, अमरनाथ दत्त, जोगिया, अणे व सर बी. एल्. मितर हे सभासद आहेत. या कमिटीकडून बिलाची तपासणी मे-जून महिन्यांत होऊन सप्टेंबरच्या बैठकींत हीं बिलें पुढें येतील असा अंदाज आहे. तिसरें बिल त्यावरील सिलेक्ट कमिटीनें मंजूर केलेलें व मजुरांच्या नुकसान भरपाईसंबंधाचें होतें. परंतु सर भूपेंद्रनाथ मितर हे आयत्या वेळीं गैरहजर असल्यामुळें वाट न पाहतां अध्यक्षांनीं सभा बरखास्त केली. अशा रीतीनें तास दीड तासांत बुधवारचें काम संपलें.

* * *

गुरुवार तारीख ७ रोजीं बजेटांतील मागण्यांवर मतें घेऊन त्या निकालांत काढण्याचें काम सुरू झालें. हें काम मधील सुट्या जाऊन तारीख १९ पर्यंत चालावयाचें आहे. सामान्य क्रमाप्रमाणें काम चालू झालें असतें तर प्रथम कस्टमखातें, नंतर इन्कमटॅक्स, मीठ या अनुक्रमानें मागण्या पुढें आल्या असत्या. परंतु गेलीं दोन-तीन वर्षें असा प्रघात पडलेला आहे कीं, सर्व पक्षांनीं मिळून कांहीं ठराविक विषय म्हणजे राजकीय दृष्ट्या त्यांतल्यात्यांत अधिक वादग्रस्त असतील ते-आपल्या इच्छेनुरूप काय ते निवडून घ्यावे व त्यावर चर्चा करून मतें मोजण्यापर्यंत मजल नेऊन जयापजय ठरवावा. कुस्त्यांच्या दंगलींत निरनिराळ्या आखाड्यांत अनेक पैलवान जमा झालेले असतात. पण त्या सर्वांच्या जोड्या लावून कुस्त्या करण्याला अर्थात् वेळ नसतो. म्हणून आपापल्या इच्छेप्रमाणें गडी पसंत करून फक्त दोनतीन कुस्त्या लढवाव्या व त्यावरून सामान्यतः कोणत्या आखाड्याचें बल किती हें ठरवावें अशी रीत आहे. तिचेंच अनुकरण असेंब्लीमध्यें करण्यांत येत असतें. हा क्रम न अनुसरला तर दोनचार मागण्यांपलीकडे पांच दिवसांत मजलच जावयाची नाहीं, इतके भरपूर काट निरनिराळ्या सभासदांनीं दिलेले असतात व यंदाची शेवटची म्हणून आलेली यादी पाहिली असतां, या काटांची संख्या ३२० वर गेली आहे यापैकीं २५–३० उपसूचनांची चर्चा झाली तीहि पुष्कळ झाली अशी स्थिति असते, म्हणून ही दुसरी पद्धति कांहीं तरी बरी असें म्हणावें लागतें. कारण जयापजय पाहावयाचा तर त्याला उभयपक्षाचे लोक जाग्यावर हजर राहिले पाहिजेत आणि या नव्या पद्धतीप्रमाणें आपापले काट ठरवून घेतले तरच तात्पुरत्या चुरशीमुळें

पुष्कळसें सभासद हजर राहण्याचा संभव. आणि कोणाला काय कोणती हौस भागवून घ्यावयाची ती भागवून घेण्याला वाव मिळतो. म्हणून ही पद्धति सर्वसंमत झाली आहे. त्याप्रमाणें यंदा चर्चेंत राष्ट्रीय पक्षानें हिंदुस्थानांतील मिठाची पैदास व मिठावरील कर हा विषय उचलला होता. स्वराज्य पक्षानें स्टेटसेक्रेटरी किंवा एक्झिक्युटिव्ह कौन्सिल ही बाब घेतली आहे. युरोपियन सभासदांनीं परदेशी भांडवलाचा प्रश्न घेतला आहे. बॅ. जिना यांनीं लष्करासंबंधींचा वाद उचलला आहे व मुसलमान पक्षानें पेशावर प्रांतांतील सुधारणांचा प्रश्न निवडला आहे. अशा रीतीनें या पांच विषयांच्या चर्चेंत जवळ जवळ चार दिवस जाण्याचा संभव असल्यामुळें तारीख १५ रोजीं उरलेल्या इतर विषयांना कांहीं थोडा वाव मिळाला तर कदाचित् मिळूं शकेल.

* * *

या ठरीव क्रमाप्रमाणें राष्ट्रीय पक्षाला आपला काट सुचविण्याची संधि प्रथम ता. ७ रोजीं देण्यांत आली. यासंबंधानें केळकर यांनीं पूर्वींच सूचना पाठविली असल्यामुळें त्यांनींच ती आपल्या पक्षातर्फे मांडावी असें ठरलें व त्यांनीं ती मांडली. सूचनेंतील विषय असा होता कीं, "हिंदुस्थानाला मिठाच्या पुरवठ्यासंबंधानें स्वाधीनता प्राप्त व्हावी; व ही स्वाधीनता मिळवून देण्यासंबंधानें सरकारनें योग्य तो इलाज व खर्च करावा." केळकरांच्या भाषणानंतर नियोगी, दोरायस्वामी अय्यंगार, सर पुरुषोत्तमदास ठाकुरदास, नीलकंठदास, यू. टोकजी, गया प्रसादसिंग इतक्यांचीं भाषणें झालीं व अखेर सर जॉर्ज रेनी व सर जॉर्ज शूस्टर यांचीं उत्तरादाखल भाषणें झाल्यावर मतें मोजण्यांत आलीं. तेव्हां केळकरांच्या या सूचनेला अनुकूल ६१ व प्रतिकूल ४३ इतकीं मतें पडून ती मंजूर झाली व सरकारचा पराभव झाला. हीं मतें देण्यांत लोकपक्षातर्फे कांहीं मुसलमान सभासदहि सामील झाले होते. याचा अर्थ हिंदुस्थानांतील मिठाची बाब ही तरी जातवारीच्या तडाख्यांतून अजून वांचलेली आहे असें म्हणतां येईल! आतां शुक्रवारपासून लागोपाठ सुटी असल्यामुळें असेंब्लीचें पुढील काम सोमवारपर्यंत बंद आहे.

## पत्र नं. ७

ता. १५-३-२९.

गेल्या आठवड्यांत शुक्रवार ते रविवार हे तीन दिवस सुटीचे गेले व सोमवारीं युरोपियन पक्षातर्फे सर व्हिक्टर ससून यांनीं सरकारच्या कर्जउभारणीच्या धोरणाची चर्चा करण्याचा ठराव काटाच्या रूपानें मांडला. ससून

यांच्या टीकेचा रोख असा कीं, सरकारनें हिंदुस्थानांत कर्ज उभारण्यापूर्वी विलायतेंत अगर इतर देशांत कर्ज उभारावें. त्या पैशाचा विनियोग खासगी रेल्वे कंपन्या विकत घेण्याकडे न करतां रेल्वे वाढविण्याकडे करावा, व हिंदुस्थानांत कर्जरूपानें उभारलेलें भांडवल देशी कारखान्यांच्या व उद्योगधंद्यांच्या वाढीला लावावें. देशी उद्योगधंद्यांची वाढ हिंदुस्थानांत कर्ज उभारून करावी या मुद्द्यावर असेंब्लींत दुमत असण्याचें कारणच नाहीं. तथापि सर व्हिक्टर ससून यांच्या मनांतील हेतु असा कीं, बंगाल-नागपूर रेल्वेसारखी खासगी रेल्वे १९३२ सालीं विकत घेण्याकरितां सरकारला भलें मोठें कर्ज काढावें लागेल व तें सगळेंच्या सगळें कर्ज सरकारनें विलायतेंत उभारण्याचें ठरविलें तरी तें उभारलें जाणार नाहीं, म्हणून सरकारनें बंगाल-नागपूर रेल्वे विकत घेण्याचे भानगडींत पडूं नये! व विलायतेंत कर्ज उभारून शेतकरी वर्गाच्या हिताच्या दृष्टीनें नवीन रेल्वे वाढविण्याकडे त्या पैशाचा विनियोग सरकारनें करावा! सर पुरुषोत्तमदास ठाकुरदास रंगास्वामी अय्यंगार, बेळवी, बी. दास वगैरे सभासदांनीं या सूचनेस विरोध केला. सर पुरुषोत्तमदास यांचें म्हणणें असें कीं, किफायतशीर कर्ज केव्हां व कोठें उभारावें हें फडणविसांनीं ठरवावें. परंतु बंगाल-नागपूर रेल्वे कंपनी सरकारनें आपल्या हातीं घेणें जरूरीचें आहे; व ती सरकारनें आपल्या हातीं घेतली तरच उतारूंच्या सुखसोयीकडे सरकारचें लक्ष जाण्याचा संभव आहे.

* * *

रंगास्वामी अय्यंगार म्हणाले, "गेल्या आठ वर्षांत १०८ कोटी रुपये कर्ज हिंदुस्थानांत उभारलें गेलें व यापुढेंहि सरकारला कर्ज लागलें तरी तें मिळण्यास अडचण पडणार नाहीं. हिंदुस्थानांत कर्ज मिळत असतांना परदेशांत तें उभारणें ही केवळ गुन्हेगारी होय. ना. बेळवी यांच्या भाषणाचा मथितार्थ असा कीं, सरकारनें परदेशांतहि कर्ज उभारावें. आमची हरकत नाहीं; पण त्याचा विनियोग देशी उद्योगधंद्यांच्या वाढीकडेच करावा; आणि जर परदेशी भांडवलवाल्यांचा हात आमच्या देशी कारखान्यांच्या व रेल्वे कंपन्यांच्या व्यवस्थेंत कायमचा शिरणार असेल तर अशा स्थितींत रेल्वे कंपन्यांची वाढ न झाली तरी चालेल. सर जॉर्ज शूस्टर यांनीं आपल्या गोड स्वभावाप्रमाणें मनांतील हेतु न सोडतां, हिंदुस्थानचें हित साधणें हाच खरा श्रेयस्कर मार्ग असून शक्य तोंवर शेतकरी वर्गाला नव्या कर्जांचा फायदा

कसा मिळेल याकडे सरकार लक्ष देईल असा बहाणा केला. तथापि परदेशी भांडवलानें रेल्वेची वाढ होऊं नये असें म्हणणें मात्र विघातक आहे. विशेषतः देशांतील बाजार व चलन स्थिर ठेवण्याची जबाबदारी सरकारवर असल्या कारणानें कर्ज कोठें उभारावें हें सरकारला परिस्थित्यनुरूप ठरवावें लागतें असा युक्तिवाद त्यांनीं केला ! सर व्हिक्टर ससून यांनीं आपल्या सूचनेवर मतें मागण्याचा हट्ट न धरतां ती परत घेतली, पण तिजवर मतें घेण्यांत आलीं असतीं तरी त्यांना त्यांच्या पक्षाशिवाय इतर कोणाचा पाठिंबा मिळाला नसता हें उघड दिसत होतें.

* * *

यानंतर दुसरा निंदाव्यंजक ठराव पं. मोतिलाल यांनीं मांडला. तो अशा स्वरूपाचा कीं, एक्झिक्युटिव्ह कौन्सिलच्या सभासदांना खर्चासाठीं फक्त एक रुपयाच देण्यांत यावा ! दरवर्षी राष्ट्रीय मागणीचा पुनरुच्चार अशाच प्रकारें एखाद्या निंदाव्यंजक ठरावाच्या रूपानें केला जातो व या मुद्द्यावर साधारणपणें जिना यांचा स्वतंत्र पक्ष, स्वराज्य पक्ष व राष्ट्रीय पक्ष या तिघांची एकजूट असतें. परंतु यंदा वारा विरुद्ध दिशेनें वाहतो कीं काय अशी भीति वाटूं लागली होती. राष्ट्रीय मागणीचा १९२४ सालापासूनचा इतिहास सांगतांना जातां जातां सर्व-पक्षीय परिषदेनें तयार केलेल्या नेहरू रिपोर्टाचा उल्लेख पं. नेहरू यांना करावा लागला, परंतु याचा परिणाम मात्र चांगला झाला नाहीं. पं. मोतिलाल नेहरू यांचें भाषण झाल्यानंतर होममेंबर क्रेरर यांनीं उत्तरादाखल भाषण केलें, व सायमन कमिशनचा रिपोर्ट बाहेर पडेपर्यंत हिंदुस्थान सरकारास कांहीं करतां येत नाहीं असें सांगितलें. महंमद शहा नवाज यांनीं दिल्लीस भरलेल्या मुसलमान परिषदेच्या ठरावाकडे बोट दाखविलें व नेहरू रिपोर्टास विरोध केला. मंगळवारीं प्रश्नोत्तरानंतर पुनः याच विषयाला सुरुवात झाली. मौलवी महंमद याकूब यांनीं पं. नेहरू यांच्या सूचनेला विरोध केला. जिना हे केवळ त्यांच्या नेहमींच्या थाटांत "तुमचा हा नेहरू रिपोर्ट आम्हांला मान्य नाहीं." एवढेंच बोलून राहिले नाहींत तर त्यांनीं पं. नेहरू यांना असा इशारा दिला कीं, तुमचें आमचें जमावयास पाहिजे असेल तर आमच्या मागण्यांकडे दुर्लक्ष करूं नका." परंतु त्यांतल्या त्यांत समाधानाची गोष्ट इतकीच कीं, जिना यांनीं १९२४ सालच्या राष्ट्रीय मागणीकडे सरकार दुर्लक्ष करीत आहे असें स्पष्ट

सांगितलें व याकरितांच असेंब्लीनें फक्त एक रुपया एक्झिक्युटिव्ह कौन्सिलकरितां मंजूर करावा असें त्यांनीं आपलें मत व्यक्त केलें.

*　　*　　*

कर्नल क्रॉफर्ड म्हणाले, "तुम्ही डोमीनियन स्टेटसचें सोंग पुढें करून साम्राज्यांतून फुटून निघून, पूर्ण स्वतंत्र होऊं पाहत आहां म्हणून तुमच्या या सूचनेला आम्ही विरोध करतों." या वाग्युद्धांत बॅ. मुकुंदराव जयकर यांचें भाषण मुद्देसूद झालें. त्यांनीं सैरावैरा उधळत चाललेल्या वादाचा लगाम खेंचून त्याला ताळ्यावर आणलें व असें बजावलें कीं, आजच्या वादविवादाचा मुख्य प्रश्न 'डोमीनियन स्टेटस कीं इंडिपेंडन्स' अगर 'नेहरू रिपोर्ट कीं दिल्लीचा ठराव' हा नसून जी राष्ट्रीय मागणी १९२४ पासून प्रतिवर्षी असेंब्ली मांडीत आहे त्या मागणीचा विचार सरकारनें कितपत केला हा आहे. श्री. माधराव अणे म्हणाले, "लीग ऑफ नेशन्सच्या बैठकीला हिंदुस्थानचे प्रतिनिधि म्हणून तुम्ही कांहीं लोक पाठवितां. ते त्या बैठकींत हिंदुस्थानच्या वतीनें भाग घेतात, मतें देतात, सर्व कांहीं होतें. इतकी हिंदुस्थान सरकारास जर मुखत्यारी आहे तर राष्ट्रीय मागणीच्या बाबतींत सरकारनें पार्लमेंटाकडे बोट दाखवावें याचा अर्थ काय?" शेवटीं पं. मोतिलाल नेहरू यांची उपसूचना ६३ विरुद्ध ५२ मतें पडून मंजूर झाली व सर जॉर्ज शूस्टर यांना एक रुपया एक्झिक्युटिव्ह कौन्सिलाला पाहिजे काय? असें अध्यक्ष पटेल यांनीं विचारलें तेव्हां त्यांना १ रुपया मंजूर करा असें म्हणण्याची जराशी लाज वाटली. परंतु मूळ मागणी ६६ हजारांची त्यांनीं केली होती व असेंब्लीनें एक रुपया द्यावा असें बहुमतानें ठरविलें. अर्थात् ती त्यांना परत घेतां येणें शक्य नव्हतें व त्यांनीं पुनः धीर करून १ रुपयाची मागणी केली व लोकपक्षानें ती टाळ्यांच्या गजरांत मंजूरहि केली!

*　　*　　*

बुधवारीं ईदच्या सणानिमित्त असेंब्लीला सुट्टी होती. गुरुवारीं जिना पक्ष आपला लष्करी काट सुचवील व लष्करी खात्यावर चर्चा सुरू होईल. असा सर्वांचा अंदाज होता. जिना यांच्या स्वतंत्र पक्षापैकीं महंमद इस्माइलखान यांनीं आपल्या नांवानें काटाची सूचना दिली होती. काटाच्या सूचनेला निंदाव्यंजक ठरावाचें स्वरूप असल्या कारणानें अर्थातच लष्करी खात्याला एक रुपया देण्यांत यावा अशा अर्थाचा काट सुचविण्यांत आला होता. तथापि दिवाण चमनलाल, रंगा

अय्यर यांनीं देखील एक रुपया देण्यांत यावा अशा वेगळया सूचना केल्या होत्या. तथापि खात्याच्या धोरणासंबंधानें निंदाव्यंजक ठराव आणण्याचा मान जिना यांच्या पक्षानें घ्यावा असें आपापसांत ठरविण्यांत आलें असल्यामुळें दिवाण चमनलाल यांनीं आपला काट सुचविला नाहीं. परंतु रंगा अय्यर हे पडले स्वतंत्र ! त्यांना कोणत्याच पक्षाचें बंधन नाहीं व त्यांचें अलीकडे कोणत्याच पक्षाशीं सरळ नाहीं. अर्थात् रंगा अय्यर यांनीं आपली सूचना मांडली व लष्करी धोरणावर टीकात्मक भाषण केलें. नेहमींप्रमाणें आर्मी सेक्रेटरी मि. यंग यांनीं उत्तरहि दिलें. परंतु जिना यांचा शब्द राखण्याकरितां या सूचनेला पाठिंबा देण्याकरितां लोकपक्षांपैकीं कोणी उभेंहि राहिलें नाहीं. अर्थात् रंगा अय्यर यांची सूचना नामंजूर झाली.

* * *

यानंतर महंमद इस्माइलखान यांनीं आपली सूचना मांडावी तर लष्करी खात्याच्या सामान्य धोरणावर चर्चा होऊन गेली व एवढा मोठा काट मंजूर होऊं नये असा निकाल असेंब्लीनें दिला. म्हणून इस्माइलखान यांनीं आपली सूचना मांडली नाहीं. पण त्यामुळें लष्करी धोरणावर सर्व लोकपक्षांची चर्चा होणार नाहीं असें दिसूं लागले. कारण काटांच्या सूचना १०० रुपयांच्या व कांहीं विवक्षित तक्रारींपुरत्या असतात व त्यांपैकीं एखादीच घेऊन तिला निंदाव्यंजक ठरावाचें स्वरूप द्यावें तर तें परान्न व तें देखील मधुकरीच्या स्वरूपाचें अर्थात् तें जिना यांच्या मानी व एकांडे शिलेदार वृत्तीला पटण्यासारखें नव्हतें. म्हणून वैयक्तिक काट कुणीच सुचवूं नयेत व सर्व मागणीच फेटाळून लावावी, व फेटाळून लावण्याचें श्रेय जिना यांच्या पदरांत घालण्याकरितां जिना यांनीं मुख्य भाषण करावें असें ठरविण्यांत आलें ! परंतु इतकी जमवाजमव झाली तरी युरोपियन पक्षांत समाविष्ट झालेले कर्नल गिडने यांनीं आपल्या जातभाईंच्या तक्रारींची दाद लावण्याकरितां सहा-सात काट सुचविले होते. कर्नल गिडने यांनीं आय. एम्. एस्., आय. डी. एस्. वगैरे लोकांच्या तक्रारी मांडल्या व आर्मी सेक्रेटरींनीं त्याला उत्तरेंहि दिलीं. शेवटीं त्यांच्या एका सूचनेवर मतें घेण्यांत आलीं व ती प्रचंड बहुमतानें मंजूरहि झाली. या खेपेस युरोपियन सभासदांनीं सरकारविरुद्ध लॉबींत जाऊन आपलें मत टाकलें ! गिडने यांना इतर पक्षांच्या शांततावृत्तीचा अर्थ कळला व लोकाग्रहाला बळी पडून त्यांनीं आपल्या इतर सूचना परतहि घेतल्या. ब्रह्मी लोकांचे

प्रतिनिधी म्हणून मि. जहांगीर मुन्शी या नांवाचे एक पार्शी गृहस्थ असेंब्लींत नवीन आले आहेत. त्यांनीं ब्रह्मी लोकांना पलटणींत घ्यावें व त्यांची पलटणं उभारावी या हेतूनें आपली सूचना मांडली. आर्मी सेक्रेटरी यंग यांनीं ब्रह्मी लोक लढवय्ये जातींत मोडत नाहींत असा खुलासा केल्यावर हीहि ५२ विरुद्ध ४६ मतें पडून मंजूर झाली.

*　　　*　　　*

यानंतर अध्यक्ष पटेल यांनीं कमी झालेले २५० रुपये वजा करून लष्करी खात्याला रु. ५२६८०० द्यावे अशी मागणी मांडली. लष्करी खात्याचा खर्च ५६ कोटी १० लक्ष असला तरी असेंब्लीच्या मतावर अवलंबून अशी खर्चाची मंजुरी फक्त ५ लाख २६ हजारांचीच आहे! ही मागणी मांडल्यावर जिना हे सर्वच्या सर्व मागणी फेटाळावी म्हणून विरोध करूं लागले. अर्थात् पूर्वी एकदां अशाच प्रकारची सूचना नामंजूर झाल्यामुळें मूळ मागणी फेटाळतां येते कीं नाहीं व आली तरी लष्करी धोरणावर टीका करतां येते कीं काय अशी पृच्छा रंगा अय्यर यांनीं केली. सरकारतर्फें कीन्स यांनीं रंगा अय्यर यांना उचलून धरलें. रंगास्वामी अय्यंगार व श्री निवास अय्यंगार यांनीं बिलाच्या तिसऱ्या वाचनाच्या वेळीं ज्याप्रमाणें दुरुस्त केलेलें बिल पूर्वी वादविवादांत घेतलेल्या मूळ आक्षेपांवरच फेटाळून लावण्याचा अधिकार असतो त्याप्रमाणें या प्रसंगीं देखील लष्करी धोरणावर तेच मुद्दे मांडून मूळ मागणी फेटाळून लावण्याचा अधिकार असेंब्लीला पोंचतो अशा अर्थाचें समर्थन केलें व अध्यक्ष पटेल यांनीं मधल्या सुटीचा फायदा घेऊन माजी अध्यक्ष सर फ्रेडरिक व्हाइट यांचाच दाखला देऊन जिना यांना सर्वसाधारणपणें सर्व मुद्द्यांवर टीका करतां येईल असा निकाल दिला. तथापि जिना यांचे एवढ्यानें समाधान न होऊन त्यांनीं फक्त दोनच पण ठणठणीत वाक्यांत मागणीला विरोध केला. नंतर पं. कुंझरू, दिवाण चमनलाल, डॉ. मुंजे यांचीं भाषणें झालीं; त्यांत डॉ. मुंजे यांचें भाषण फार चांगलें झालें.

*　　　*　　　*

गुरुवारीं लष्करी काटावर अनेक वक्त्यांचीं भाषणें व्हावयाचीं उरलीं असल्यामुळें शुक्रवारीं तोच वाद पुढें चालू झाला व त्याला रंगहि चांगला आला. सदर वादविवादांत कर्नल क्रॉफर्ड, के. सी. रॉय, मुनशी ईश्वर शरण, मियान अबदुल अझीझ, कर्नल गिडने यांनीं भाषणें केल्यावर सरकारतर्फें लष्करी सेक्रेटरी

मॅकवर्थ यंग यांनीं उत्तर दिलें. बहुतेक वक्त्यांनीं लष्करभरतीसंबंधानें विशिष्ट जातींच्या हक्कांचा व सरकारच्या संशयी वृत्तीचा उल्लेख केला होता. कर्नल क्रॉफर्ड यांनीं हिंदुस्थानास विमानापेक्षां पायदळ पलटणीची गरज अधिक असल्यामुळें विमानांच्या थोड्या उपयोगाच्या मानानें त्याजकरितां २२ लक्ष रुपयांचा नवा खर्च करण्यापेक्षां विमानांस बहुतेक अर्धचंद्र देऊन त्या रकमेची बचत केलेलीच बरी असें प्रतिपादलें. हिंदुस्थानांतील बुद्धिमान वर्गाला लष्करांत कमिशनें मिळत नाहींत अशी रॉय यांनीं तक्रार केली. यंग यांनीं उत्तर देतांना सांगितलें कीं, सक्तीचें लष्करी शिक्षण युनिव्हर्सिट्यांतून सुरू करण्याचा ठराव सरकारनें स्वीकारला त्यावरून सरकार हिंदी लोकांस लष्करी सवलती देण्यास तयार असल्याचें सिद्ध झालें आहे. टेरिटोरियल फोर्ससारख्या सवलती पूर्वींच दिल्या असतां सुशिक्षित वर्ग त्याचा उपयोग करीत नाहीं यांत सरकारचा काय दोष ? युनिव्हर्सिट्यांतील विद्यार्थि लष्करांत यावेत याविषयीं सरकार खटपट करीत असून सँढर्स्ट कॉलेजास पुरेसे तरुण मिळतील असें दिसून आलें कीं, सँढर्स्ट कॉलेज सरकारास हिंदुस्थानांत काढावेंच लागेल असा त्यांनीं अभिप्राय दिला. शेवटीं बॅ. जिना यांच्या सूचनेस ६१ अनुकूल व ४४ विरुद्ध मतें पडून ती पास झाली. त्यामागून सरहद्द प्रांतास सुधारणा कायदा लागू करण्याची सूचना मियान शहानवाझ यांनीं आणिली व तीहि ६७ अनुकूल व ३४ प्रतिकूल मतें पडून मंजूर करण्यांत आली. या वादाच्या वेळीं स्वराज्य पक्षाचे बहुतेक सर्व सभासद सभागृहांतून उठून गेले असल्यामुळें बहुतेक वक्त्यांना आपलीं भाषणें रिकाम्या बाकांपुढेंच करावीं लागलीं. अशा रीतीनें शुक्रवारचें असेंब्लीचें काम संपलें.

## पत्र नं. ८

ता. २१-३-२९

शुक्रवार ता. १९ रोजीं बजेटावरील मागण्या मंजूर-नामंजूर होण्याची मुदत संपावयाची होती व ती संपलीहि. पण अशा रीतीनें कीं, खऱ्या मागण्यांपैकीं एकीवरहि तपशीलवार चर्चा न होतां ! निरनिराळ्या पक्षांनीं मिळून पुढें आणलेल्या काटांच्या सूचनांपैकीं शेवटली मुसलमान पक्षाची शिल्लक उरली होती. ती अशी कीं, सरहद्दीच्या प्रांतांत सरकारनें इतर प्रांतांप्रमाणें सुधारणांची योजना करावी. या अर्थाच्या ठरावावर पूर्वी एकदोन वेळां असेंब्लीमध्यें मोठा

अनिष्ट वादविवाद झाला होता. पण सुदैवानें यंदा तसा प्रकार घडला नाहीं. भांडणाचें तोंड लागलें तें फक्त सूचना मांडणारे मियान महंमद शहानवाझ व सरकारतर्फे उत्तर देणारे सर डेनिस ब्रे यांच्यामध्यें लागलें. शहानवाझ यांनीं सरहद्दीच्या प्रांतांत सुधारणा चालू करण्याविषयीं नेहमींचींच कारणें सांगितलीं. पण हिंदु सभासदांकडून सूचनेला विरोध होईल ही सर डेनिस ब्रे यांची अपेक्षा फुकट गेल्यामुळें ते फार तळमळले! कारण मुसलमानांना नाखुष करण्याची जबाबदारी सरकारावर पडली! कसेंहि असो, खासगी सभासदांपैकीं कोणीहि या सूचनेला विरोध न केल्यामुळें ती प्रचंड बहुमतानें मंजूर झाली. लक्षांत ठेवण्याची गोष्ट ही कीं, हिंदु महासभेनें पेशावर प्रांताची ही मागणी आपल्या ठरावानें नाकबूल केली असतांहि असेंब्लींतील हिंदुमहासभेच्या पुढाऱ्यांनीं मुसलमानांच्या या मागणीला विरोध केला नाहीं. याचा उघड अर्थ असा कीं, असेंब्ली ही जातीजातींतील भांडणें उकरून काढण्याची जागा नसून सर्व जातींनीं मिळून सरकारशीं भांडण्याची जागा आहे. पण दुर्दैवानें मुसलमान सभासद मात्र ही गोष्ट विसरतात.

* * *

अशा रीतीनें बजेटांवरील कुस्त्यांच्या फडांत पांच प्रधान मल्लांच्या कुस्त्या झाल्या. पण त्यामुळें इतर गोष्टींना वेळ न उरल्यामुळें नियमाप्रमाणें दंगल बंद करण्यांत आली; आणि कोट्यवधि रुपयांच्या मागण्या एकेक मिनिटांत मंजूर होऊन गेल्या! वास्तविक चर्चा न होतां ज्या मागण्या अशा फसगतीनें मंजूर झाल्या त्यांत खरी साधकबाधक चर्चा करण्यासारखें पुष्कळच असतें. आणि काटांच्या ज्या शेंकडों सूचना दिल्या गेल्या होत्या त्याचें तरी कारण हेंच. एकाच विषयाची सूचना कित्येक वेळां अनेक सभासद स्वतंत्र रीतीनें देतात ही गोष्ट लक्षांत घेतली तर, पुष्कळ सूचना निव्वळ शिलकेंत राहतात व त्यांवर चर्चा झाली तर ती फार उपयोगी असते. किंबहुना सरकार जर कांहीं ऐकणारच असेल तर तें अशा विधायक चर्चेंत निघणाऱ्या कांहीं गोष्टीच ऐकतें व अमलांत आणतें. पण असेंब्लीपुढें अंदाज-पत्रक, जमाखर्चाच्या मागण्या व बिलें येत असलीं तरी खरा अधिकार असा असेंब्लीला कांहींच नाहीं. सर्व अधिकार सरकाराच्या हातीं!

* * *

शनिवार ता. १७ रोजीं रेल्वे खात्याच्या जादा मागण्या प्रायः वादविवाद न होतां मंजूर झाल्या. तसेंच कामकरी लोकांना कारखान्यांत काम करीत असतांना इजा झाल्यास नुकसानभरपाई देण्यासंबंधींचें बिल सिलेक्ट कमिटीकडून तपासून आलें होतें तेंहि सर बी. एन्. मित्र यांच्या सूचनेवरून मंजूर करण्यांत आलें. 'ट्रेड डिस्प्यूट्स' म्हणजे कारखानदार व मजूर यांमधील तंटे तोडण्यासंबंधानें सरकारनें पुढें आणलेलें बिल सिलेक्ट कमिटीकडे गेलें होतें त्याचा रिपोर्ट असेंब्लीपुढें ठेवण्यांत आला. सिलेक्ट कमिटींत या बिलावर मतभेद पुष्कळ झाल्या कारणानें रिपोर्टाला भिन्न-मतपत्रिकांच्या पुष्कळशा लंगोट्या जोडण्यांत आलेल्या आहेत. आणि यांतील प्रत्येक लंगोटीची एकेक मोठी वावडी होऊन बिलावरील चर्चेंत उडूं लागेल तेव्हां तिचा आवाज देशभर ऐकूं येईल. कारखानदार व मजूर यांचे तंटे पंचायतपद्धतीनें तोडण्यासंबंधींचा पहिला भाग सर्वसंमत होण्यासारखा आहे. पण मजुरांनीं नोटीस दिल्याशिवाय काम बंद ठेवणें वगैरे मजुरांच्या हक्कासंबंधानें दुसऱ्या भागांत जीं कलमें होतीं व कांहीं शिल्लक राहिलीं आहेत त्यांवरच वादाचा मुख्य भर पडेल.

* * *

ता. १८ सोमवार रोजीं फायनॅन्स बिलावरील चर्चा सुरू झाली व आज गुरुवार तारीख २१ पर्यंत ती चालूच आहे. चर्चेंतील पहिल्या भागानेंच सबंध तीन दिवस खाल्ले. हा पहिला भाग म्हणजे कीर्तनाचें नुसतें नमन होय. कारण सर जॉर्ज शूस्टर यांची सूचना इतकीच होती कीं, बिलावरील सर्वसाधारण चर्चा होऊन कलमवारीनें तें चर्चेला घ्यावें. पण सरकारला खर्चाकरितां लागणाऱ्या पैशापैकीं, सुमारें तीस कोटी रुपये वसूल करण्याचा अधिकार या बिलानें सरकारास मिळावयाचा असल्यामुळें हा प्रसंग असेंब्लीच्या सभासदांनीं फिरून राज्यपद्धतीवरील चर्चेकरितां उपयोगांत आणला. मूळ बजेट मांडल्याबरोबर पहिले दोन दिवस सर्वसाधारण चर्चेकरितां म्हणून देण्यांत आले होते, तेव्हांहि अशीच चर्चा झाली होती. तथापि चर्चा होण्याची अशी पुष्कळच शिल्लक उरते व ज्यांना अभ्यासी पद्धतीनें व मुद्देसूद रीतीनें चर्चा करावयाची असते अशा सर्वांना हवा तितका वेळ यापूर्वीच्या दोन प्रसंगांत मिळत नाहीं म्हणून तिसऱ्या प्रसंगाचा उपयोग करण्यांत येतो. विलायतेमध्येंहि सरकारी धोरणाचा वाद घालण्याचा प्रसंग हाच असतो. इतकेंच नव्हे तर या वादाला पुरण्याइतके भरपूर दिवस तेथें दिले जातात. अशा चर्चेची

गरज हिंदुस्थानांत तर अधिकच आहे. कारण विलायतेंत एक पक्ष प्रधानपदावरून निघून जाऊन दुसरा त्या ठिकाणीं येऊं शकतो, तशी गोष्ट हिंदुस्थानांत नाहीं. इकडे आम्हां लोकांचा अधिकार म्हटला म्हणजे निवळ चर्चा व टीका करण्याचा ! पण तिलाहि पुरेसा वेळ मिळाला नाहीं म्हणजे असंतोष माजतो व या असंतोषाचा परिणाम यंदा विशेष रीतीनें दिसून आला.

* * *

तारीख १८, १९ व २० अशी तीन दिवस चर्चा झाली तरी खरोखरच बोलण्यासारखे विषय पुष्कळ राहिले होते. कित्येक सभासद पांच-पांच, दहा-दहा वेळ जागेवरून उठले तरी त्यांना बोलण्याला मिळालें नव्हतें. तीन दिवसांच्या चर्चेनें लोक कंटाळले होते. तेव्हां तारीख २८ मार्च रोजीं असेंब्लीचें काम खलास व्हावें असा सर्वांचा संकेत असल्यामुळें व पब्लिक सेफ्टी बिल व ट्रेड डिस्प्यूट्स बिलहि याच बैठकींत संपवून घेण्याचा आग्रह असल्यामुळें, फायनॅन्स बिलावरील चर्चा केव्हां संपेल असें सरकारास झालें होतें. तथापि या उतावीळपणाचें चिन्ह त्यांनीं बाहेर कांहींच दाखविलें नाहीं. सर जॉर्ज शूस्टर हे तीनहि दिवस एकसारखे सभागृहांत बसून होते. त्यांनीं कोणाला हटकलें नाहीं, कोणाला अडविलें नाहीं. अशा रीतीनें साळसूदपणाच्या सोंगाची पूर्ण बतावणी त्यांनीं केली. तिसऱ्या दिवशीं अध्यक्ष पटेल व इतर कांहीं सभासद यांचें असें ठरलें असावें कीं, ही प्राथमिक चर्चा आज कांहीं झालें तरी संपवावयाची. मग त्याकरितां रात्रीं १२ वाजेपर्यंत बसावें लागलें तरी हरकत नाहीं. प्रथम ही गोष्ट कोणास फारशी खरी वाटली नव्हती. परंतु चाराचे पांच झाले, पांचाचे सहा झाले व अध्यक्षांनीं या गोष्टीचा उच्चार कांहीं प्रसंगीं स्वतःच केला तेव्हां आज कांहीं तरी विशेष होणार असें वाटूं लागलें. सुमारें ८ वाजतां राष्ट्रीय पक्षाचे सभासद चौधरी मुख्तारसिंग यांचें भाषण संपलें, तेव्हां वास्तविक कोणी तरी चर्चा थांबविण्याची सूचना पुढें आणावयास पाहिजे होती किंवा अध्यक्षांनीं तरी खाजगी रीतीनें कोणास तसें सुचवावयाचें होतें, परंतु तसें घडलें नाहीं. फिरून राष्ट्रीय पक्षाचे सभासद पं. ठाकुरदास भार्गव हे बोलावयास उभे राहिले व त्यांना बोलण्यास अध्यक्षांनीं परवानगीहि दिली. परंतु या वेळीं सभागृहांतील एका कंपूच्या मनांतील उतावळेपणाचा पूर अनावर होऊन त्यांनीं टेबलावर हात आपटून ठाकुरदास भार्गव यांना 'तुमचें भाषण आम्हाला ऐकवत नाहीं. आतां पुरें करा' असा इशारा

देण्यास सुरुवात केली. अध्यक्षांनीं त्यांना बोलण्याची परवानगी दिल्यावर हे शिष्ट त्यांना थांबविणार कोण ?

* * *

पण अध्यक्षांनीं या लोकांना इशारा देऊन टाळ्या वाजविण्याचें थांबवावयाचें होतें, तें न थांबवितां उलट पं. ठाकुरदास भार्गव यांनाच अध्यक्षांनीं असा उपदेश केला कीं, 'या टाळ्यांचा अर्थ तुमच्या लक्षांत आला असावा !' पण इतकेंच बोलून ते थांबले नाहींत. कारण ते आणखीहि असें म्हणाले कीं, 'तुम्हाला जसा बोलण्याचा अधिकार आहे तसाच तुमचें बोलणें ऐकून न घेण्याचा अधिकार या सभेला आहे !' पण ऐकून न घेण्याचा अधिकार सरकारजमा पक्षाचे हे शिष्ट, नियमानें तो त्यांना दिलेला नसतांनाहि हातीं घेऊन चालवीत होते. ही गोष्ट अध्यक्षांच्या लक्षांत राहिली नाहीं ! स्वराज्य पक्षानें अध्यक्षांच्या या चुकीचा फायदा घेतला. आपणाला आतां कोणाचें बोलणें अधिक ऐकून घ्यावयाचें नाहीं असें म्हणणाऱ्या शिष्टांना जर टाळ्या वाजवून तें बंद पाडण्याचा अधिकार येतो तर सरकारी फडणवीस बोलावयाला उभे राहिले असतां त्यांचेंहि बोलणें ऐकून न घ्यावेंसें वाटलें तर आपणालाहि तोच अधिकार अध्यक्षांच्या विचारसरणीनें प्राप्त होतो असें त्यांनीं आपल्या मनाशीं ठरविलें व ते त्या प्रसंगाची वाट पाहत होते.

* * *

ठाकुरदास भार्गव यांचें बोलणें चालूच होतें, संपलें नव्हतें. इतक्यांत सरकारजमा पक्षानें टाळ्या वाजविण्यास सुरुवात केली होती. यामुळें गोंधळ झाला. तो थांबवून वास्तविक त्यांना आपलें भाषण पुरें करण्याला संधि द्यावयाला पाहिजे होती ती न देतां अध्यक्षांनीं असेंब्लीला असा सवाल टाकला कीं, 'आतां झाली ती चर्चा पुरी झाली असें मानावें कीं नाहीं ?' वास्तविक अशी सूचना या वेळीं कोणी पुढें आणली नव्हती. अध्यक्ष पटेल यांनीं ती आपल्याच मनानें उपस्थित केली ! ही त्यांची दुसरी चूक होय. राष्ट्रीय पक्षाचे पुढारी पं. मालवीय यांनीं असा प्रश्न विचारला कीं, "कोणत्याहि सभासदाचें बोलणें सुरू असतां, मध्येंच चर्चा थांबविण्याची सूचना देतां-घेतां येतें कीं काय ?" त्यावर अध्यक्षांनीं उत्तर दिलें कीं, 'मला तसें करण्याचा अधिकार आहे !' यानंतर या सूचनेवर मतें घेण्यांत आलीं तेव्हां ती बहुमतानें मंजूरहि झाली. कारण मनांतून सर्वच लोक या चर्चेला निदान

या दिवसापुरते तरी फंटाळले होते. अशा रीतीनें ही चर्चा थांबल्यावर रीतीप्रमाणें सर जॉर्ज शूस्टर यांना आपलें सामारोपाचें म्हणजे उत्तराचें भाषण करण्याला अध्यक्षांनीं सांगितलें. पण तें सुरू होतांच स्वराज्य पक्षानें टेबलावर हात आपटून व टाळ्या वाजवून सर जॉर्ज शूस्टर यांचें भाषण थांबविण्यास सुरुवात केली. वड्याचें तेल वांग्यावर निघावें त्याप्रमाणें सरकार-जमा पक्षाच्या वर्तनाचें व अध्यक्षांच्या चुकीचें उट्टें सरकारी फडणविसांवर निघालें! त्यांनीं बोलण्याला प्रारंभ करावा व इकडे लोकांनीं टाळ्या वाजवून व टेबलावर हात मारून त्यांचें भाषण बंद पाडावें असा प्रकार सुरू झाला. निदान कमींत कमी सात-आठ वेळां तरी पटेल यांना उभें राहून शांतता प्रस्थापित करून सर जॉर्ज शूस्टर यांना सुरुवात करा असें सांगणें भाग पडलें. परंतु या त्यांच्या दबकावणीचा कांहींच उपयोग झाला नाहीं. इतकेंच नव्हे तर त्यांच्या नेहमींच्या उग्र पद्धतीनें ओरडून दरडावून 'असें करूं नका' म्हणून त्यांनीं जोरानें सांगितलें तरी त्याचा कांहीं एक उपयोग झाला नाहीं. 'तुम्ही हा माझ्यावर सूड उगवतां काय?' असें त्यांनीं विचारलें तेव्हां एकानें उत्तर दिलें 'होय.'

* * *

प्रांजलपणाचा आव आणून अध्यक्ष पटेल म्हणाले कीं, 'यंदा निवडणुकीचें शेवटचें वर्ष समजून, म्हणजे लोकप्रतिनिधींना आपण आपलें म्हणणें असेंब्ली-पुढें मांडलें असें दाखविण्याची पूर्ण संधि मिळावी हें लक्षांत ठेवून, मीं तीन दिवस वादविवाद चालू दिला. तरी आतां तो बंद व्हावा!' पण पटेल यांचें म्हणणें कोणास आवडण्यासारखें नव्हतें. सभासदांनीं वादविवाद चालविला तो निवडणुकीकडे पाहून लोभी व स्वार्थी दृष्टीनें चालविला असें म्हणावयाचें तर त्याच दृष्टीनें स्वतः पटेल यांचेंहि धरसोडीचें वर्तन, म्हणजे एक वेळ सरकारला व एक वेळ लोकपक्षाला खूष करण्याचें वर्तन, त्यांनीं चालविलें असें कोणी म्हटलें, तर तें बरोबर होईल काय? दुसरें असें कीं, त्यांनीं तीन दिवस वाद चालू दिला खरा; पण ज्यांना महत्त्वाचें पुष्कळसें बोलावयाचें होतें अशा लोकांकडे त्यांची दृष्टि फारशी गेली नाहीं! व जे लोक उठले असतां, कांहीं तरी बोलणार असें त्यांच्यासकट सर्वांना माहीत अशा लोकांकडे त्यांची दृष्टि जात असे! तसेंच भाषण चालू असतां मुख्य मुद्दे

असतील तेवढ्यांवरच बोलूं द्यावें, विषयांतर करूं देऊं नये असें धोरण त्यांनीं ठेविलें नाहीं. जणूं काय असें दिसत होतें कीं, वाद उगीच लांबणें ही गोष्ट त्यांना स्वतःला पसंत असावी. पण वाद लांबला म्हणावें तर तो उपयुक्त झाला नाहीं व न लांबला म्हणावें तर शेवटच्या दिवशीं स्वतःचा उतावीळ-पणाच त्यांनीं प्रकट केला; आणि इतकें करून वरती अनेक चुका केल्या! त्या अशा कीं, पुष्कळ आधीं वाद थांबविण्याची सूचना पुढें आली होती ती त्यांनीं घेतली नाहीं व जेव्हां वाद थांबविण्याची सूचना घेऊन ती मताला मांडली तेव्हां ती कोणी केली नव्हती!

* * *

उशीर झाला होता तर पं. ठाकुरदास भार्गव यांना उभे करावयाचें नव्हतें व उभे केलें तर पुरतें बोलूं द्यावयाचें होतें. बोलणें ऐकून न घेण्याच्या उद्देशानें सरकारजमा पक्षानें गडबड केली तेव्हां त्यांनीं ती थांबवावयाची होती. पण त्यांना उलट चिथावणी मिळेल असें भाषण त्यांनीं केलें व स्वराज्य पक्ष गड-बड करूं लागला तेव्हां त्याला मात्र ते विनाकारण गप्प बसवूं लागले. तात्पर्य अध्यक्षांच्या हातून एका चुकीमागून दुसरी, दुसरीमागून तिसरी अशी परंपरा घडल्यानें शेवटीं असा प्रसंग आला कीं, सभेचें काम सुरळीत चालणें शक्य नाहीं असें वाटूं लागलें. तेव्हां त्यांना पावणेनऊ वाजतां सभा बर-खास्त करावी लागली! सभा थांबविल्यानें मार्ग कसा निघणार हें कोणासच सांगतां येण्यासारखें नव्हतें; परंतु कालगतीनें सर्व थंड पडतात असा अध्य-क्षांचा समज असावा व तो मात्र दुसरे दिवशीं खरा ठरला. रात्रीं व सकाळीं अध्यक्ष व स्वराज्य पक्षाचे पुढारी पं. नेहरू यांची खासगी दिलसफाई बहुधा झाली असावी, म्हणून गुरुवारचें काम सुरू होतांना फिरून कांहीं तरी आदल्या दिवसाप्रमाणें प्रकार होईल असें जें लोकांस वाटत होतें तसें कांहीं एक न घडतां सर जॉर्ज शूस्टर यांना भाषण करण्याविषयीं अनुज्ञा मिळाली व त्यांनीं आपलें भाषण कडेपर्यंत बिनहरकत केलें. तात्पर्य, अखेर निष्पन्न कांहींच झालें नाहीं! परंतु जी गोष्ट चार-पांच वर्षांत पूर्वी झाली नव्हती ती यंदा होऊन मनोरंजक दाखले जुन्या कागदपत्रांतून हुडकून काढणाराला मदत होण्यासारखा कांहीं इतिहास घडला खरा!

* * *

कर्मधर्मसंयोगानें बुधवारीं असेंब्लीच्या सभेंत वरील प्रकार सुरू असतां इकडे बाहेर देशांत नोकरशाहीनें दडपशाहीचें जें सत्र सुरू केलें त्याची वदंता तारेच्या रूपानें येऊं लागली. रात्रीं १२ वाजेपर्यंत ठिकठिकाणच्या तारा येत होत्या व त्यावरून विद्यमान कायद्याच्या जाळ्यांत आपल्याला अप्रिय असलेलीं माणसें पकडण्याकरितां सरकारनें तें जाळें किती दूरवर एकदम फेकलें याची कल्पना आली. तारीख २० रोजीं पब्लिक सेफ्टी बिल चर्चेला निघेल असा अंदाज होता. पण फायनॅन्स बिलावरील वाद अपेक्षेबाहेर लांबल्यानें तें या दिवशीं चर्चेला निघालें नाहीं इतकेंच काय तें. पण तसें न निघतें तर इकडे या बिलाची चर्चा व इकडे धरपकड, झडत्या, खटले यांच्या धुमाकुळाच्या बातम्या असा संच किती चांगला जमला असता याची कल्पना कोणालाहि करतां येईल. नाटकांतलि सीनसीनरी दाखविण्याला जें कौशल्य लागतें तेंच असा प्रसंग घडवून आणण्याला लागतें. त्या दृष्टीनें सरकारतर्फे कल्पक डोक्याची वाण नाहीं व पब्लिक सेफ्टी बिलाची चर्चा व दडपशाहीचें सत्र यांची गांठ एका क्षणाला पडावयाची ती न पडली तरी तें बिल प्रत्यक्ष पुढें येण्याच्या आधीं धरपकड व झडत्या झाल्या ही गोष्ट फायद्याची झाली. राक्षस पडद्यांतून बाहेर येतांना राळ उडतच असते. पण ती उडत राहिली असतां, राक्षसाला प्रवेश करण्याला जरी थोडासा उशीर लागला तरी चालतो. कारण राळ उडत राहणें हाहि राक्षसप्रवेशासारखाच भीषण प्रसंग असतो.

* * *

असो. अशा प्रकारच्या बातम्या येत असतां, असेंब्लींत त्यांचा परामर्श घेतला न जाणें शक्यच नव्हतें; व त्याप्रमाणें थोड्या मुदतीची नोटीस देऊन गुरुवारीं सकाळीं प्रश्न विचारण्यांत आलें. त्यांना होम मेंबर क्रेरर यांनीं उत्तरें दिलीं तीं यापूर्वींच लोकांना वर्तमानपत्रांतून वाचावयास मिळालीं असतील म्हणून त्यासंबंधानें अधिक लिहीत नाहीं. पब्लिक सेफ्टी बिलाच्या चर्चेच्या वेळीं या गोष्टीचा उल्लेख होईल. केवळ याच गोष्टींची चर्चा व्हावी म्हणून पं. नेहरू यांनीं तहकुबीची सूचना गुरुवारीं सकाळीं दिली. आरंभीं सूचना आणणें कायदेशीर व योग्यायोग्य आहे कीं नाहीं यासंबंधानें चर्चा झाली. होम मेंबर क्रेरर व नवीन सरकारी कायदेपंडित सर बी. एल्. मितर यांनीं विरोध केला. कोर्टापुढें खटले चालणार हें निमित्त सांगण्यांत आलें, परंतु सरकारचें धोरण हा कांहीं कोर्टापुढें विषय नाहीं; तो लोकमतानें बरेंवाईट

म्हणण्याचा व स्वतंत्र विषय आहे असें सांगून अध्यक्षांनीं परवानगी दिली व पं. नेहरू यांची सूचना चार वाजतां विचारांत घ्यावी असें ठरविलें. तथापि व्हाइसरॉयसाहेबांनीं आपला अधिकार चालवून अध्यक्षांचा निकाल रद्द केला ! यामुळें तहकुबीची सूचना तहकूब झाली !

* * *

फायनॅन्स बिलावरील चर्चेला पुन्हा आज सुरुवात झाली व ही चर्चा आणखी दोन-तीन दिवस चालेल असा रंग आहे. आज सर जॉर्ज शूस्टर यांचें भाषण झाल्यानंतर त्यांची मूळ सूचना मताला घालण्यांत आली व ती मोठ्या बहुमतानें मंजूर झाली. या सूचनेसंबंधानें फक्त स्वराज्य पक्षानें विरुद्ध मतें देण्याचें ठरविलें होतें. राष्ट्रीय पक्षाची सभा होऊन तींत यासंबंधानें आपण तटस्थ राहावें, कोणत्याच बाजूला मत देऊं नये असें ठरलें होतें तथापि अगदीं आयत्या वेळीं एकदोन सभासदांनीं विरुद्ध मत देण्याची परवानगी पक्षाचे पुढारी पं. मदन मोहन मालवीय यांचेकडून मागून घेतली व ती त्यांना देण्यांत आली. यानंतर बिलाची चर्चा कलमवारीनें सुरू झाली.

## पत्र नं. ९

ता. २८-३-२९

चालू आठवड्यांत सोमवार व मंगळवार असे दोन दिवस असेंब्लीनें शिमग्याची सुटी घेतली. शनिवार ता. २३ रोजींहि असेंब्लीची बैठक झाली नाहीं. याशिवाय शुक्रवार ता. २९ रोजीं 'गुड फ्रायडे' म्हणून त्या दिवशींहि असेंब्ली बंदच राहणार व पुढें ईस्टरची सुटी लागली. मिळून या आठवड्यांत ता. २७ व २८ असे दोनच दिवस बैठक होणार व तेवढ्यांत फॉयनॅन्स बिलाचें तिसरें वाचन मंजूर झालें तरी कौन्सिल ऑफ स्टेटची मंजुरी मिळ-ण्यास अवधि राहत नाहीं. ३१ तारखेच्या आंत बिल पास झालें तरच सर-कारला त्याप्रमाणें ता. १ एप्रिलपासून कर वसूल करण्याचा अधिकार प्राप्त होईल. तसें न झाल्यास सरकारला कांहीं दिवसांपुरता वटहुकूम काढून हे कर वसूल करावे लागणार. असेंब्लीनें मिठावरील करामध्यें ४ आणे कमी केलें; पण त्यामुळें सरकारच्या जमेंत ६५ लाखांची तूट येणार. यासंबंधानें सरकार काय करणार, इत्यादि प्रश्नासंबंधीं चार दिवसांच्या सुटींत तर्कवितर्क व चर्चा हीं चालू होतीं. पब्लिक सेफ्टी बिल व ट्रेड डिस्प्यूटस बिल हीं याच बैठकींत पास

करून घेण्याचा सरकारचा निश्चय आहे. त्यासाठीं बैठक एक आठवडा लांबवली आहे व हिंदुस्थान सरकारचें सिमल्याचें गिर्यारोहण एक आठवड्यानें पुढें ढकललें आहे. उन्हाळ्याचा प्रारंभ झाल्याबरोबर सरकारी अधिकारी सिमल्यास जाण्यास उत्सुक झालेले असतात, पण त्यांची व इतर सभासदांची गैरसोय करूनहि हीं बिलें पास करून घेण्याचा सरकारचा इरादा आहे.

* * *

असो. ता. २७ रोजीं चार दिवसांच्या सुटीनंतर असेंब्लीच्या बैठकीस सुरुवात झाली. फायनॅन्स बिल ता. ३१ च्या आंत मंजूर झालें नाहीं तर कसें काय होणार हें कोडें तसेंच टाकून, सुटीमध्यें कित्येक बिनसरकारी सभासद दिल्ली सोडून गेल्यामुळें सभासदांची संख्या बेताचीच होती. मिठावरील करासंबंधानें काय होणार याबद्दल आपसांत चर्चा सुरू होतीच. त्यांतल्या त्यांत सायमन कमिशन दिल्लींत असतांनाच ही फायनॅन्स बिलाची अडचण उत्पन्न झाली हा योगायोगहि कित्येकांना विचारणीय वाटला. त्या दिवशीं जरूर तर रात्रभर बैठक भरवून फायनॅन्स बिलावरील चर्चा संपवावयाची असें अध्यक्ष पटेल यांनीं ठरविल्याची गुणगुण लागल्यामुळें त्याचीहि या चर्चेत भर पडली. फायनॅन्स बिलाची चर्चा सुरू होऊन प्रथम पोस्टाच्या दरासंबंधाच्या सूचना पुढें आल्या. अमरनाथ दत्त यांनीं पाकिटाचा दर अर्धा आणा करण्याबद्दल सूचना मांडली. सर भूपेंद्रनाथ मित्र यांनीं दर कमी केल्यास सुमारें दीड कोटीचें नुकसान होईल असें सांगितलें. अमरनाथ यांची सूचना मतमोजणी न करतांच नामंजूर झाली. यानंतर आचार्य यांनीं १पैशाचें पोस्टकार्ड करण्याची सूचना मांडली व फाजल रहिमतुल्ला यांनीं सॅंपल पॅकेट १ पैशांत पाठवितां यावें अशी सूचना केली. पण लोकपक्षाचें बहुमत सभासदांच्या गैरहजेरीमुळें शिल्लक राहिलें नव्हतें. यामुळें वादांत कोणाचें लक्ष नव्हतें व दोन्ही सूचना नामंजूर झाल्या. आचार्य यांची सूचना ३४ वि. ४७ मतांनीं नापास झाली. याप्रमाणें सरकारच्या बाजूचें बहुमत स्पष्ट दिसत असल्यामुळें पुढें प्राप्तीवरील करासंबंधाच्या लोकपक्षीय सूचनाहि मतें न मोजतांच भराभर नापास होत गेल्या.

* * *

याप्रमाणें फायनॅन्स बिलांतील सर्व कलमें संपल्यावर अध्यक्षांनीं बिल कलमवार मंजुरीसाठीं असेंब्लीपुढें मांडलें व सर्व कलमें मंजूर होऊन दुसरें वाचन

पूर्ण झालें. लगेच रीतीप्रमाणें शूस्टर यांना बिलाचें तिसरें वाचन करण्याबद्दल अध्यक्षांनीं सांगितलें. पण त्यांनीं तिसऱ्या वाचनाची सूचना करण्याचे अगोदर अध्यक्षांच्या खुर्चीजवळ जाऊन त्यांना व्हाइसरॉयांचा खलिता सादर केला. त्यांत मिठावरील कर पूर्वीप्रमाणें सवा रुपयाचा ठेवून फायनॅन्स बिल पास करावें असा व्हाइसरॉय यांनीं असेंब्लीला पाठविलेला संदेश होता व तो अध्यक्षांनीं वाचून दाखविला. व्हाइसरॉयांचा संदेश वाचण्याचे वेळीं सर्व सभासदांनीं उभे राहावयाचें असा असेंब्लीमध्यें फाजील दरबारी अदबीचा संप्रदाय पडलेला आहे. पण रयतेचें मीठ महाग करणारा व असेंब्लीस अपमानकारक असा हा संदेश असल्यामुळें श्री. केळकर व स्वराजिस्ट सभासद हे या वेळीं उभेच राहिले नाहींत. असो. यानंतर व्हाइसरॉयांनीं शिफारस केल्याप्रमाणें दुरुस्त केलेलें बिल, म्हणजे मिठावरील कर पूर्वीप्रमाणें सवा रुपया करून, शूस्टर यांनीं मांडावयाचें. पण तें होण्याच्या आधींच श्रीनिवास अय्यंगार यांनीं अशी हरकत घेतली कीं, नियमाप्रमाणें ही दुरुस्ती शूस्टर यांना असेंब्लीपुढें आतां मांडतांच येत नाहीं. अय्यंगारांचें म्हणणें असें कीं, असेंब्लीमध्यें मिठावरील कराचे चार आणे कमी करण्याची सूचना मंजूर होण्यापूर्वीं व्हाइसरॉयांची ही शिफारस यावयास पाहिजे होती. दुसऱ्या एखाद्या सामान्य बिलाचे बाबतींत अशी शिफारस चालली असती, पण फायनॅन्स बिलाचे बाबतींत ती चालणार नाहीं. रंगास्वामी अय्यंगार व पं. नेहरू यांनीं श्रीनिवास अय्यंगारांच्या हरकतीस दुजोरा दिला व क्रेरर आणि शूस्टर यांनीं व्हाइसरॉयांच्या शिफारशीप्रमाणें दुरुस्त बिल आणणें हें पूर्णपणें नियमांना धरून आहे असें प्रतिपादन केलें. नियमासंबंधींच्या प्रश्नाचें हें गंडांतर उत्पन्न झाल्यामुळें त्याच दिवशीं फायनॅन्स बिल संपवावयाचें हा संकेत ढासळला व नियमासंबंधीं उत्पन्न झालेल्या प्रश्नाचा विचार करून निर्णय देण्यासाठीं अध्यक्ष पटेल यांनीं त्या दिवसाची बैठक तहकूब ठेवली.

* * *

अय्यंगारांच्या कायदेशीर प्रश्नामुळें पटेल यांना मोठाच पेंच पडला असावा. कायद्याचा शब्दशः अर्थ घेतला तर अय्यंगारांचें म्हणणेंच बरोबर दिसत होतें, पण नियम ज्या हेतूनें करण्यांत आला त्याचा विचार केला असतां शूस्टर यांना व्हाइसरॉयांच्या शिफारशीप्रमाणें तिसऱ्या वाचनाच्या वेळीं दुरुस्ती करतां येते असें अध्यक्षांनीं ठरविलें. गुरुवारीं बैठकीचे आरंभीं हा निर्णय

त्यांनीं जाहीर केला. त्याप्रमाणें मिठावरील कर पूर्वीप्रमाणें दरमणीं सवा रुपया करण्याची सूचना शूस्टर यांनीं केली. या सूचनेस मुनशी, केळकर, जयकर व अय्यंगार यांनीं विरोध केला. व्हाइसरॉयांचा संदेश हा लोकप्रतिनिधींना अपमानकारक असल्यामुळेंच तो वाचला गेला त्या वेळीं आपण उभे राहण्याचें जाणूनबुजून नाकारलें असें केळकर यांनीं सांगितलें. मुनशी यांनीं असेंब्लीला एका अधिकाऱ्यानें "माकडाची सभा" असें संबोधल्याचें सांगितल्यामुळें बरीच खळबळ उडाली. कांहीं सरकारी अधिकाऱ्यांनीं 'नाहीं नाहीं' म्हणून ओरड केली व असे उद्गार कोणत्याहि अधिकाऱ्यानें काढले नाहींत असें क्रेरर यांनीं सांगितलें. पटेल यांनीं मुनशी यांना या अधिकाऱ्याचें नांवच विचारलें. तेव्हां तें असेंब्लींत प्रकट न करतां खासगी रीतीनें पटेल यांना कळविण्याचें मुनशी यांनीं आश्वासन दिलें.

* * *

असो. व्हाइसरॉयांच्या संदेशामुळें झालेल्या अपमानाचा खरा प्रतिवाद करावयाचा तर असेंब्लीनें ही दुरुस्ती फेटाळून लावावयाची होती. पण लोकपक्षीय सभासदांच्या गैरहजेरीमुळें शूस्टर यांची सूचना ४६ वि. ४१ मतांनीं मंजूर झाली! म्हणजे आपलाच निर्णय फिरवून व व्हाइसरॉयांचा अपमानास्पद हुकूम स्वीकारून असेंब्लीनें आपलीच नाचक्की करून घेतली, दुसरें काय? निदान ज्यांनीं पूर्वीं मिठावरील कर चार आण्यांनीं कमी करण्याच्या लोकपक्षीय सूचनेस पाठिंबा दिला होता त्यांनीं तरी शूस्टर यांच्या सूचनेस पाठिंबा द्यावयाचा नव्हता. पण अशा चार सभासदांनीं या सूचनेस या वेळीं पाठिंबा दिला. हे सभासद म्हणजे गझनवी, अनवर उल् अझीम, सय्यद हुसेन शहा व राजन बक्ष हे होत. असेंब्लीला 'माकडाची सभा' असें विशेषण लावण्याची बुद्धि एका अधिकाऱ्याला झाली ती वरील चौकडीसारख्या सभासदांकडे पाहूनच झाली असली पाहिजे! याप्रमाणें एका महत्त्वाच्या प्रश्नावर सरकारचा जय झाला व ५० विरुद्ध ३९ मतांनीं सर्व फायनॅन्स बिलाचें तिसरें वाचनहि मंजूर झालें. ३१ तारखेच्या आंत असेंब्लींत बिल मंजूर झालें. तरी ते कौन्सिल ऑफ स्टेटमध्यें मंजूर व्हावयास पाहिजे. यासाठीं परवां शनिवारीं कौन्सिल ऑफ स्टेटच्या बैठकींत हें बिल चर्चा न करतां चुटकीसरशीं पास करून घेण्याचा सरकारचा विचार आहे व कौन्सिल ऑफ स्टेटमध्यें सरकारचें हें काम सहजासहजीं होऊन जाईल हें निश्चित होय.

* * *

फायनॅन्स बिल मंजूर झाल्यानंतर ज्या पब्लिक सेफ्टी बिलाकरितां मुख्यतः बैठक लांबवण्यांत आली आहे तें बिल सर बी. एल्. मित्र यांनीं असेंब्लीपुढें विचारार्थ मांडलें. सरकारचें गृहमंत्री मि. क्रेरर यांनींच तें पुढें मांडावयाचें, पण ते आजारी असल्यामुळें हें काम लॉ-मेंबरकडे आलें. मित्र यांनीं सिलेक्ट कमिटींत झालेल्या दुरुस्त्या समजावून सांगितल्या. फक्त प्रचलित राज्यपद्धति नष्ट करण्याची चळवळ करण्यासाठीं इकडे येणाऱ्या ब्रिटिश कम्युनिस्टांविरुद्ध हें बिल असून त्याचे योगानें कॉंग्रेससारख्या न्याय्य राजकीय चळवळीस कोणताहि धोका नाहीं असें त्यांनीं आश्वासन दिलें. यावर अनत्याचारी कम्युनिस्टांविरुद्ध या बिलाची बजावणी होईल कीं काय अशी अय्यंगार यांनीं शंका प्रदर्शित केली. तेव्हां 'ते अनत्याचारी राहतील तोंपर्यंत हिंदुस्थानांत सुरक्षित नांदूं शकतील' असें मित्र यांनीं उत्तर दिलें. पण अत्याचार किंवा अत्याचारप्रवर्तक प्रयत्न केल्यावर त्याबद्दल नेहमींच्या कायद्यानें सरकारास बंदोबस्त करतां येण्याजोगा आहे. यामुळें या उत्तरानें बिलाची अनावश्यकताच सिद्ध होते हें मित्रांसारख्या सरकारी कायदेपंडिताच्या लक्षांत येऊं नये हें आश्चर्य होय.

यानंतर बॅ. जयकर यांनीं मीरतचा खटला दोन तऱ्हेनें सरकारच्या अंगावर उलटविला. ते म्हणाले, कम्युनिस्टांचा बंदोबस्त करण्यास सामान्य कायदा पुरेसा आहे हें मीरतच्या खटल्यावरून दिसून येतें; शिवाय बिलावर साधक-बाधक चर्चा करावयाची म्हटली तर कोर्टापुढें असलेल्या मीरतच्या खटल्यांतील गोष्टींची चर्चा करावी लागणार. अशी चर्चा होणें इष्ट नाहीं या सबबीवर सरकारनें धरपकडीसंबंधाची तहकुबीची सूचना तहकूब केली होती. मग याच मुद्द्यावर पब्लिक सेफ्टी बिलहि तहकूब करणें हेंहि तितकेंच इष्ट ठरतें. यासाठीं हें बिल तहकूब ठेवावें अशी जयकरांनीं मित्र यांना सूचना केली, पण त्यांनीं अर्थातच ती मानली नाहीं. पण बिल तहकूब करण्यासंबंधानें रीतसर सूचनाच मि. जोगिया यांनीं अध्यक्षांकडे पाठविली आहे. ती विचारार्थ निघेल त्या वेळीं या गोष्टीचा विचार होईल असें सांगून अध्यक्षांनीं बैठक मंगळवारपर्यंत तहकूब ठेवली. अर्थात् ईस्टरमध्यें ठिकठिकाणच्या परिषदांसाठीं जाणाऱ्या मंडळींना पुन्हा सुटीनंतर पब्लिक सेफ्टी बिलासाठीं परत दिल्लीस यावें लागणार.

## पत्र नं. १०

ता. ६-४-२९

ईस्टरच्या सुट्टीनंतर मंगळवार तारीख २ रोजीं असेंब्लीच्या कामाला पुन्हा सुरुवात झाली. चार दिवसांचीच लहानशी सुटी; पण तेवढ्यांत पुष्कळ सभासद कामानिमित्त आपापल्या गांवीं, किंवा प्रांतिक परिषदा, हिंदुमहासभा यांसारख्या सभांना जाऊन, व एकदोन दिवसांत हीं कामें उरकून परत आले. तथापि सभासदांची संख्या इतर रीतींनीं आधींच ओसरूं लागली होती; व तिचा परिणाम सुटीनंतरच्या बैठकींत दिसून आला. सरकार पक्ष व लोकपक्ष या दोहोंकडील मतें समसमान कमी झाल्यास परिणामीं कोणाचाच तोटा होत नाहीं. म्हणून पार्लमेंटच्या रीतीस अनुसरून असेंब्लींतील उभयपक्षांचे कित्येक सभासद सुटीच्या पूर्वींच एकमेकांचे हात धरून दिल्ली सोडून जाऊं लागले होते. कोणीहि गैरहजर राहावयाचे तर प्रतिपक्षाकडील एक भिड्डू आपल्या जोडीला घेऊन गैरहजर राहावें म्हणजे मतमोजणीच्या वेळीं कोणत्याहि पक्षाला कमीपणा येत नाहीं हें तत्त्व दिसण्यांस ठीक दिसतें. परंतु असेंब्लीसारख्या सभेच्या कामांत मताइतकीच वादविवादांतील भाषणांनाहि किंमत असते. या दृष्टीनें पाहतां, आपला भिडू घेऊन जरी कोणी गैरहजर राहिला तरीहि त्यानें आपल्या पक्षाचा तितक्यापुरता तोटाच केला असें ठरतें. त्यांतल्या त्यांत तुलनेनें पाहतां, अशा कृत्यानें होणारा लोकपक्षाचाच तोटा सरकार पक्षापेक्षां अधिक आहे. कारण सरकार पक्षाकडचे लोक वादविवादांत सहसा भाग घेत नाहींत. या दृष्टीनें पाहतां सर पुरुषोत्तमदास, घनश्यामदासजी बिर्ला, षण्मुखम् चेट्टी, दोरास्वामी अय्यंगार हीं माणसें आपल्याबरोबर सरकार पक्षाचें एकेक मत जरी घेऊन गेलीं असलीं तरी त्या योगानें लोकपक्षातर्फे होणाऱ्या वादविवादाचा जोर तितक्यापुरता कमी झाला असें अनुभवास आलें. शिवाय आस्थेवाईक मनुष्यानें अनास्थेवाईक मनुष्य भिड्डू म्हणून घेतल्यानें 'वाईटा'बरोबर 'चांगला' गेला असें होतें. सुटीनंतर झालेल्या अटीतटीच्या मतमोजणींत दोनहि पक्षांची मिळून संख्या १०० वर गेली नाहीं! यावरून सभासदांची संख्या किती घटली हें दिसून येईल.

* * *

मंगळवारीं कित्येक निवडणुकीच्या सूचना सरकारतर्फे मांडण्यांत आल्या. दिल्ली युनिव्हर्सिटीच्या मंडळावर स्वराज्य पक्षातर्फे कुमार गंगानंदसिंग, अमर-

नाथ दत्त, नीलकंठ दास व राष्ट्रीय पक्षातर्फे रायसाहेब हरबिलास सारदा हे निवडून आले. रोडकमिटीची सूचना नामंजूर झाली व एमिग्रेशन कमिटीची सूचना मंजूर झाली. परंतु तिजकरितां असणाऱ्या जागांइतकेहि उमेदवार उभे राहिले नाहींत. या दोन कमिट्यांसंबंधानें लोकपक्षाची तक्रार अशी आहे कीं, आधीं या कमिट्या म्हणजे केवळ सल्लागार मंडळ्या! त्यांतून पुष्कळसे सभासद निवडून द्यावे तेव्हां त्यांतले हवे ते उमेदवार ठरीव संस्थेच्या भरतीला सरकार आपल्या मनाप्रमाणें घेणार! म्हणजे या 'पॅनेल' पद्धतीमध्यें असेंब्लीनें निवडून दिलेल्या कांहीं लोकांवर सरकारला नापसंतीचा शेरा मारण्याला संधि राहते हा मोठाच दोष होय. आणि याच मुद्द्यावर आज दोनतीन वर्षें सारखा झगडा होत आहे. त्यामुळें कदाचित् पुढच्या वर्षापासून अशा कमिट्यांवर ज्या जागा असतील त्या भरण्यापुरते लोक असेंब्लीमध्यें स्वतः निवडून द्यावेत अशी दुरुस्ती नियमानेंच होण्याचा संभव दिसतो.

* * *

निवडणुकीच्या सूचना अशा रीतीनें निकालांत निघाल्यानंतर पब्लिक सेफ्टी बिलाच्या चर्चेला फिरून सुरुवात व्हावयाची; परंतु ती होण्यापूर्वी अकस्मात् कोठून तरी बॉंबगोळा पडावा त्याप्रमाणें अध्यक्ष पटेल यांनीं एक नवीनच अडचण सरकारच्या मार्गांत उभी केली ती अशी:– पब्लिक सेफ्टी बिलाचा उद्देश हिंदुस्थानांत रशियन कम्युनिस्ट लोकांच्या चळवळीला प्रतिबंध करावा हा आहे. आणि त्यांतील कलमें या उद्देशानेंच घडविलेलीं आहेत. हें बिल सिलेक्ट कमिटीकडे जाऊन एक महिन्यापूर्वीच परत आलें. परंतु त्यानंतर एक अकल्पित गोष्ट घडली ती ही कीं, सरकारनें 'कम्युनिझम'वर हल्ला चढविण्याकरितां ३१ लोकांना पकडून त्यांच्यावर खटला भरला. या ३१ आरोपींत निदान दोन म्हणजे स्प्रॅट व ब्रॅडले हे तरी असे आहेत कीं, ज्यांच्या उच्चाटनाकरितांच कांहीं अंशीं प्रस्तुत बिलाचा अवतार झालेला आहे असें म्हणतां येईल. होममेंबर क्रेरर यांनीं बिलाच्या पहिल्या वाचनाचे वेळींच या दोन गृहस्थांचा उल्लेख केला होता व बाकीच्यांचा जरी तेव्हां नामनिर्देश झाला नव्हता, आणि हल्लींचा खटलाहि मामुलीपद्धतीचा म्हणजे पीनल कोडान्वयेंच झाला असला तरी खटल्यांतील मुख्य विषय कम्युनिझम हाच आहे ही गोष्ट दृष्टीआड होत नाहीं.

* * *

अशा रीतीनें न्यायकोर्टापुढें चालणारा खटला व असेंब्लीपुढें चर्चेला निघणारें बिल हीं दोनहि परस्परानुबंधीच ठरतात. असेंब्लीच्या कामाच्या नियमांपैकीं एक नियम असा आहे कीं, जो विषय न्यायकोर्टापुढें अनिर्णीत अशा स्थितींत असेल त्याची चर्चा कायदे-कौन्सिलांत होऊं नये. किंबहुना याच मुद्द्यावर पं. नेहरू यांना तहकुबीची सूचना मांडण्याला व्हाइसरॉय-साहेबांनीं आपल्या अधिकारांत हरकत घेतली होती. अर्थात् अध्यक्ष पटेल यांना तीच अडचण उपस्थित झाली, म्हणून त्यांनीं प्रथमच उठून असें सांगितलें कीं, " अशा अशा कारणाकरितां या बिलाची चर्चा तूर्त होणें अनिष्ट आहे. या वादविवादांत या खटल्याचा संबंध, असा नाहीं तसा, पदोपदीं येणार व सभासदांना पदोपदीं प्रतिबंध करावा लागणार. याकरितां सरकारनें आपण होऊन एक खटला तरी परत घ्यावा किंवा बिल तरी परत घ्यावें. पण सरकार खटला परत घेत नाहीं हें त्यांतल्या त्यांत नक्की ठरल्यासारखें असल्या-मुळें त्यांनीं आपण होऊन बिलच परत घ्यावें किंवा निदान तहकूब ठेवावें म्हणजे सर्व विरोधाचाच परिहार आपोआप होईल." अशा रीतीनें सरकारनें तरी आपलें बिल परत घ्यावें किंवा अध्यक्षांनीं तरी आपला हुकूम चालवून बिलाचा वादविवाद बंद पाडावा असा दुस्तर विरोध उत्पन्न झाला व पहिल्या झटक्याला अध्यक्षांनीं या बिलाची चर्चा थांबवून पुढचें बिल म्हणजे ट्रेड डिस्प्यूट्स बिल चालू करण्यासंबंधानें सर बी. एन्. मित्र यांना आवाहन केलें. अध्यक्ष पटेल यांची सूचना व निश्चय पाहून सरकार-पक्ष सर्वस्वीं चकित झाला; व सर बी. एन्. मित्र हे आपलें बिल मांडण्याला उभे राहिले तेव्हां होममेंबर व दुसरे कित्येक एक्झिक्युटिव्ह कौन्सिलाचे सभासद लॉर्ड आयर्विन यांच्याशीं संगमन करण्याला निघून गेले आणि या प्रश्नाचा निकाल करण्याकरितां दररोज एक्झिक्युटिव्ह कौन्सिलच्या सभा होऊं लागल्या.

* * *

ट्रेड डिस्प्यूटस बिलाची चर्चा मंगळवारीं तीन वाजतां सुरू झाली. परंतु त्यालाहि प्रथमच हरताळ फांसण्याच्या दृष्टीनें दिवाण चमनलाल यांनीं अशी सूचना मांडली कीं, सिलेक्ट कमिटीकडून आलेल्या बिलाचा मसुदा फिरून लोकमत अजमावण्याकरितां बाहेर पाठविण्यांत यावा. याचा सरळ अर्थ इतकाच कीं आज तें चर्चेला घेऊं नये. दिवाण चमनलाल यांनीं मुख्यतः तीन कारणें सांगितलीं. एक असें कीं, सिलेक्ट कमिटींत मतभेद पुष्कळ झाला आहे.

दुसरें कारण कीं, पूर्वीं मतें आणविलीं त्यांत कामकरी-संघाकडून जितकीं मतें मागवावीं तितकीं मागविण्यांत आलीं नाहींत; व तिसरें कारण असें कीं, बिलाच्या स्वरूपांत पुष्कळ फरक झाल्यानें फिरून त्याबद्दल लोकमत समजणें जरूर आहे. या सूचनेवरील वादविवाद बुधवारीं ४ वाजेपर्यंत सुरू होता. त्यांत जोगिया, केळकर, अणे, जम्नादास मेथा, टाकुरदास भार्गव, अमरनाथ दत्त, श्रीनिवास अय्यंगार, नीळकंठदास वगैरेचीं चमनलालांना अनुकूल भाषणें झालीं; व फाझल इब्राहीम, कोक, कॉसग्रेव्ह, सर डार्सी लिंडसे, रंगा अय्यर यांचीं प्रतिकूल भाषणें झालीं. पण अखेर ६१ विरुद्ध ४१ इतकीं मतें पडून दिवाण चमनलाल यांची सूचना नामंजूर झाली व जवळ जवळ तींच मतें पुन्हा पडून बिल कलमवारीनें विचारांत घ्यावें असें ठरलें. कोणत्याच पक्षानें आपल्या सभासदांना हुकूम असा फर्माविला नसल्यामुळें व हुकूम नसल्यास गैरहजर राहण्याची कित्येकांची प्रवृत्तीच असल्यामुळें अशा रीतीनें निर्णय झाला.

*　　　*　　　*

गुरुवारीं सकाळीं प्रारंभीं होममेंबर क्रेरर यांनीं सरकारतर्फेचा खुलासा वाचून दाखविला. त्यांत सरकार काय वाटेल तें झालें तरी आपण होऊन पब्लिक सेफ्टी बिलाची चर्चा थांबविणार नाहीं, ती पुढें चालू ठेवणारच असा आपला निश्चय असल्याचें त्यांनीं सांगितलें. इतकेंच नव्हे तर " अध्यक्ष जो अधिकार आपणांला आहे असें म्हणतात तो त्यांना मुळींच नाहीं " असें आपलें निश्चयात्मक म्हणणें आहे असेंहि होममेंबर यांनीं बजाविलें ! " खटला व बिल यांचा अर्थाअर्थीं संबंध नाहीं. दोन्ही आम्ही बरोबर चालू ठेवणार. वादविवादांत दोघांचा परस्परसंबंध कोणी भाषणांत आणला तर तसें करण्याला अध्यक्षांना हरकत घेतां येईल आणि ती त्यांनीं खुशाल घ्यावी व बिलांतील वादभूमि निर्लेप ठेवावी, त्याला आमची हरकत नाहीं व त्याला आम्ही मदतच करूं " असेंहि सांगण्यांत आलें. तात्पर्य, " बिलाची चर्चा तुम्हाला थांबवितां येत नाहीं. ती थांबविली तर चूक कराल व त्या चुकीचे परिणाम तुम्हाला भोगावे लागतील ! " असेंच जवळ जवळ मि. क्रेरर यांनीं अध्यक्षांना बजाविलें ! क्रेरर यांच्या भाषणानंतर पं. नेहरू, सर डार्सी लिंडसें व मालवीयजी यांनीं सरकारच्या खुलाशाचा विचार करण्यास वेळ मिळावा असें सांगितलें. तेव्हां ती गोष्ट अध्यक्षांनीं मान्य केली व दरम्यान आपल्या

कैफियतीच्या लेखी प्रती सर्व पक्षांना देण्याचें क्रेरर यांनीं कबूल केलें. दुसरे दिवशीं म्हणजे शुक्रवारीं निरनिराळ्या पक्षांच्या पुढाऱ्यांनीं सरकारच्या खुलाशासंबंधानें आपलें मत प्रकट केलें. फक्त अध्यक्ष पटेल यांनीं आपला निकाल सांगण्याचें तहकूब ठेवलें आहे.

* * *

ईस्टरच्या सुटींत ठिकठिकाणीं प्रांतिक परिषदला भरल्या; परंतु देशाचें लक्ष मुख्यतः दोन परिषदांवरच विशेष होतें. पैकीं सुरत येथें भरलेली हिंदुमहासभा व दिल्ली येथें भरलेल्या दोन मुसलमानांच्या परिषदा. या मुसलमान परिषदेंत फिरून पूर्वींचीच चर्चा झाली. किंबहुना ती विकोपालाहि गेली व दोनहि परिषदा एकाच वेळीं दिल्लीस भरवून कांहीं एकवाक्यता होईल तर पाहावें असा जो कित्येकांचा प्रयत्न होता तो सिद्धीस गेला नाहीं. जिना पक्षाच्या मुसलमान लोकांच्या परिषदेंत जवळ जवळ मारामारीच झाली व पोलिसांची मदत मागण्यापर्यंत मजल गेली. मुसलमान लोकांच्या दुसऱ्या परिषदेंत तंटाबखेडा नव्हता. कारण त्यांत सगळे एकजात कट्टर मुसलमानच जमले होते! देखावा असा आहे कीं मुसलमानांना हवें तें दिलें तर नेहरू रिपोर्टाला आपण संमति द्यावी असा मुद्दा घेऊन बॅ. जिना हे आपल्या लोकांशीं भांडत आहेत. पण हें त्यांचें म्हणणें शफीप्रभृति मुसलमान मानीत नाहींत, व दुसरीकडे अबुल कलम अझाद वगैरे कॉंग्रेसपक्षीय मुसलमानहि मानीत नाहींत. यामुळें "पाहा हो, मी कसा दोन धार्मिक वरवंट्यांमध्यें केवळ राष्ट्रीयत्वाच्या कल्पनेकरितां चिरडला जात आहे." असा केविलवाणेपणानें करुणा भाकण्याचा भास बॅ. जिना हे उत्पन्न करीत होते! पण आपल्यांत म्हण आहे त्याप्रमाणें आपसांत भांडणें करून प्रवाशाच्या दशम्या धर्मशाळेंत विटाळणारे कांहीं प्राणी असतात हें लोकांना माहीतच आहे.

* * *

किंवा अमानुष प्राणी सोडून मनुष्याची उपमा द्यावयाची तर असें म्हणतां येईल कीं, गवळ्याच्या घरांत बापलेकांनीं भांडण करून गिऱ्हाइकाच्या दुधांत पाणी घालावें, त्याप्रमाणें मुसलमान जमातींतील हें भांडण आहे! म्हणून या भांडणानें कोणीहि चाणाक्ष हिंदु फसला जाणार नाहीं. "माझ्याकडे या म्हणजे मीं तुमचें भांडण तोडतों" असें म्हणून उभयपक्षांना नादीं लावून, भांडण तोडण्याचा आव घालून, त्यांतल्या त्यांत आवडत्या पक्षाचें कार्य करा-

वयाचें व आपली तुंबडी भरावयाची असे कांहीं चतुर मध्यस्थ प्रत्येक समाजांत असतात, त्यातलेच बॅ. जिना हे आहेत, ही गोष्ट अलीकडे दोन वर्षें लोकांना चांगलीच कळून चुकली आहे. म्हणून या हक्कदारीच्या भांडणांत केवळ राष्ट्रीय सभेला अनुसरणारे अबुल कलम अझाद यासारखे मुसलमान तरी एक पुरवले किंवा महंमद शफीसारखे कट्टर मुसलमान पुरवले असें म्हणण्याची पाळी आली आहे. बॅ. जिना यांचा हा कावा ओळखून गतवर्षी जबलपूर येथील हिंदु महासभेच्या अध्यक्षपदावरून केळकर यांनीं आपल्या भाषणांत तो उघड केला होता, व त्याच धोरणानें यंदा सुरत येथें भरलेल्या हिंदु महासभेनें, मध्यस्थांचा हा कावा ओळखून क्रियेला प्रतिक्रिया म्हणून, "नेहरू रिपोर्टाला मुसलमानांनीं मान्यता न दिली तर आम्ही दोन पावलें मागें जाऊं" असा ठराव केला. शफीप्रभृति मुसलमानांशीं आमचें न जुळलें तर तें पुरवलें पण मित्रत्वाचा आव घालून, हिंदु समाजाला स्थानच्युत करण्याचा जिना यांचा मतलबी प्रयत्न हिंदु समाजाला पुरवणार नाहीं. जिना यांना मुसलमानांनीं व हिंदूंनीं आपापल्या परीनें ओळखल्यामुळें ते यापुढें आजपर्यंतच्या मूर्धाभिषिक्त मध्यस्थाच्या मानाला मुकणारच. पण कदाचित् असेंब्लीलाहि मुकण्याचा संभव दिसतो. कारण पुढील निवडणुकींत मुंबई शहरांतील मुसलमानांच्यातर्फे सर इब्राहीम रहिमतुल्ला यांना असेंब्लींत निवडून आणावें आणि त्यांनाच पटेल यांच्या जागीं अध्यक्ष करावें असा कट चालू असल्याचें समजतें !

* * *

मीरत येथील खटल्यामुळें पब्लिक सेफ्टी बिल पुढें चालो अगर न चालो परंतु खटला हा चालणारच ! त्यांतील आरोपींचा बचाव करण्याचा प्रयत्न सुरू आहे. वास्तविक राष्ट्रीय सभेनें निर्वाणीचा खलिता पाठवून स्वातंत्र्याचें निशाण उभारण्याची दहशत घातली, शेतकरी व कामकरी लोकांच्यासंबंधानें ठरावांतून सहानुभूति व्यक्त करण्यांत आली, क्रान्तिकारक अशाहि परराष्ट्रीय मित्रांचे व संस्थांचे जे संदेश गेल्या राष्ट्रीय सभेला आले, त्यांचा जाहीर सत्कार करण्यांत आला व असेंब्लीमध्येंहि पब्लिक सेफ्टी बिलाविरुद्ध मोठें रण माजलें. या सर्व गोष्टी लक्षांत घेतां, राष्ट्रीय सभेच्या कार्यकारी मंडळानें दिल्ली येथील सभेमध्यें या खटल्यांत सांपडलेल्या तरुणांसंबंधानें विशेष प्रकारची सहानुभूति दाखवून पैशाची प्रत्यक्ष मदत करावयाला पाहिजे होती. परंतु नुसता सहानुभूतीचा ठरावहि करावा कीं न करावा या चर्चेला तिला दोन तास पुरले

नाहींत म्हणतात! यामुळें सर्वत्र नापसंती असल्याचें दिसून येतें. तथापि असेंब्ली बरखास्त होण्यापूर्वी या खटल्यासंबंधानें एक 'डिफेन्स कमिटी' स्थापन होईल असा रंग दिसतो. या कमिटीतर्फे डिफेन्स फंड सुरू करण्याकरितां एक अपील निघणार असून त्यावर निरनिराळ्या पुढाऱ्यांच्या कांहीं सह्या होत आहेत. वर्गणी जमविण्याकरितां व खर्च करण्याकरितां खजिनदार आणि डिफेन्सच्या कामीं वकील व बॅरिस्टर वगैरे देण्याकरितां एक कमिटी नेमण्यांत येईल असें वाटतें. या खटल्यांत निरनिराळ्या प्रांतांतील लोक सांपडले असल्यामुळें त्यांचे आप्तसंबंधी ठिकठिकाणांहून येऊन त्यांना भेटून जात आहेत. तथापि सर्वांचें लक्ष डिफेन्स कमिटीकडेच आहे. मुंबई येथून अटक करून आणलेले डांगेप्रभृति गृहस्थ व धुंडिराजपंत ठेंगडी यांच्याकरितां मिळून बचावाचा म्हणून कांहीं संघटित प्रयत्न होणार आहे. त्याकरितां कामकरीसंघाचे एक अधिकारी जोशी व श्री. डांगे यांच्या पत्नी या मीरत येथें जाऊन या मंडळींना भेटून येण्याकरितां दिल्लीस येऊन गेल्या व परत गेल्यावर गिरणीकामगार लोकांना इकडील हकीकत कळवून बचावाकरितां पुढील पगाराच्या दिवशीं वर्गणी जमविण्याची कांहीं खटपट मुद्दाम करण्यांत येणार आहे असें समजतें.

* * *

रेल्वे खात्याचें क्लिअरिंग हाउस म्हणजे परस्परहिशेबांच्या वजावाटीची कचेरी दिल्लीस नवी निघाल्यामुळें, येथें महाराष्ट्रीय समाज पूर्वींपेक्षां अधिक वाढला आहे. त्या योगानें महाराष्ट्रीय स्नेहसंवर्धक समाजाला बरीच पुष्टि मिळाली आहे आणि स्वतःची जागा व इमारत करून संस्थेला शक्य तर कायमपणा आणावा असा दक्षिणी मंडळींचा विचार आहे. ही गोष्ट घडो वा न घडो, परंतु या समाजाचा उपयोग महाराष्ट्रांतून व कर्नाटकांतून येणाऱ्या पाहुण्यांना पुष्कळच होतो. जुने कांहीं चालक येथून बदलून गेले तरी भाटे, आपटे, खरे, कठाळे वगैरे मंडळींनीं संस्थेचें कार्य नेटानें चालविलें आहे व त्यांतल्या त्यांत पोस्ट खात्यांतील वरिष्ठ अधिकारी रावसाहेब कुळकर्णी हे कलकत्त्याहून दिल्लीस बदलून आल्यामुळें त्यांचें वजन, लोकप्रियता व मेहनत यांचा संस्थेला पुष्कळच उपयोग होत आहे. रावसाहेब कुळकर्णी हे हल्लीं सरकारतर्फे आंतरराष्ट्रीय पोस्टल परिषदेकरितां विलायतेस गेले आहेत. ते लवकरच परत येतील, आणि ते आल्यावर संस्थेच्या कायमपणाचा उद्योग आणखी होईल.

## पत्र नं. ११

ता.१२-४-२९

गेल्या आठवड्यांत असेंब्लीच्या कामाला अवघीं दोन शेंडेफळें राहिलीं होतीं. एक ट्रेड डिस्प्यूट्स बिल व दुसरें पब्लिक सेफ्टी बिल. पैकीं एक बिल, गेल्या सोमवारपर्यंत चर्चेची लांबण लागून, कसेंबसें पार पडलें. या बिलाची चर्चा एकंदर ५ दिवस सुरू होती. वास्तविक इतकी लांबण लागण्याचें कारण नव्हतें व शेवटीं एकहि उपसूचना मंजूर न होतां तें सिलेक्ट कमिटीकडून जसें आलें तसेंच असेंब्लींतून शिरसलामत बाहेर पडलें! मुख्य वाद १५, १६ व १७ या तीन कलमांवरच झाला. मजुरांनीं नोटीस दिल्याशिवाय संप करावा कीं नाहीं? एका धंद्यांतील मजुरांनीं दुसऱ्या धंद्यांतील लोकांना मदत म्हणून संप करावा कीं नाहीं? हेच मुद्दे विशेष वादग्रस्त होते व सरकारनें ते जिंकले. सिलेक्ट कमिटींत एक प्रकारचा तह किंवा करार ठरला होता. म्हणून मजुरांतर्फे दिवाण चमनलाल यांनीं आणलेल्या उपसूचना जशा फुकट गेल्या तशा मालकांतर्फे फाझल इब्राहीम व कर्नल क्रॉफर्ड यांनीं आणलेल्या सूचनाहि फेटाळल्या गेल्या. गेल्या मंगळवारीं हें बिल स्टेट कौन्सिलकडे पाठविण्यांत आलें व तिकडून तें जसेंच्या तसें मंजूर झालें हें सांगावयास नकोच.

*　　　*　　　*

उरतां उरलें पब्लिक सेफ्टी बिल. याच्या जन्माला कोणती वेळ लागली होती कळत नाहीं! कारण त्याच्या पायगुणानें सर्वच पक्षांची खराबी झाली. आग्रही स्वभावाबद्दल सरकारची बेअब्रू वाढली. बिल महत्त्वाचें असतां त्यालाहि तोंड देण्याला खासगी सभासदांची भरपूर संख्या हजर राहत नाहीं असा त्यांचा दुर्लौकिक प्रकट झाला. आणि आधणाच्या पाण्यांत नसता हात घालून भाजल्यामुळें तो तोंडांत घालून बोटें चोखीत बसण्याची पाळी अध्यक्ष पटेल यांजवर आली. शिवाय या बिलाच्या निमित्तानें, असेंब्लींत बॉंब पडून एक नसतें नवेंच विघ्न उत्पन्न झालें ही गोष्ट निराळीच. सिमला येथें गेल्या सप्टेंबरांत हें बिल पुढें आलें तेव्हां त्यावर अखेरच्या मजलेवरील मतमोजणींत सारखीं मतें पडल्यानें व अध्यक्ष पटेल यांनीं आपलें मत विरुद्ध दिल्यानें बिल नामंजूर झालें. पण पुनः दिल्ली येथील चालू बैठकींत तें लवकरच सरकारनें पुढें आणलें व सिलेक्ट कमिटीकडूनहि ताबडतोब परत आलें. पण

त्याचा विचार करण्याचें काम सरकारनें दिरंगाईवर टाकलें. हेतु हा कीं, लोकपक्षाचे सभासद कमी होतील, सायमन कमिटीवरील सभासद येऊन आपलें बळ वाढेल, आणि मग स्पष्ट बहुमत करून अध्यक्ष पटेल व लोकपक्ष यांवर एकदम मात करूं. याप्रमाणें बिल तारीख २८ मार्च रोजीं पुढें आलें. पण दरम्यान बिलाला मीरत येथील कटाच्या खटल्याचें गंडांतर उत्पन्न झालें व त्यांतूनच पुढील सर्व गोंधळ निर्माण झाला.

*　　*　　*

तारीख २ एप्रिल रोजीं जयकर यांच्या भाषणामुळें या खटल्याच्या आधारावर या बिलाची चर्चा करतां येणार नाहीं अशी शंका अध्यक्षांनीं प्रदर्शित केली. तारीख ३ रोजीं होममेंबर यांनीं सांगितलें कीं, "सरकार बिल परत घेण्याला तयार नाहीं व चर्चा तहकूब करण्याचा अध्यक्षांना अधिकार नाहीं." त्यावर पटेल यांनीं पुढाऱ्यांचीं मतें विचारलीं. त्यांत ठरल्याप्रमाणें मतभेद झाला. तेव्हां आपला निर्णय सांगण्याकरितां वेळ मागून घेऊन हें बिल त्यांनीं बाजूला सारलें व ट्रेड डिस्प्यूट्स बिल पुढें ओढलें. त्याची चर्चा संपेपर्यंत जो वेळ मिळाला त्यांत उभयपक्षांनीं युद्धाकरितां कंबर कसली. अध्यक्ष पटेल हे प्रतिकूल निकाल देऊन बिलाची चर्चा हाणून पाडणार असा सरकारचा कयास असल्यामुळें तें घडून येतांच अध्यक्षांवर निंदाव्यंजक ठराव सरकार मांडणार अशी बोलवा सुरू झाली. उलट बाजूचे लोक म्हणूं लागले कीं, "आपला निर्णय देतांच पटेल यांनीं असेंब्ली दिल्लीपुरती एकदम बरखास्त केली तर सरकार काय करणार ?" पण अध्यक्षांना असा अधिकार आहे कीं नाहीं याविषयीं शंका येई. शिवाय ट्रेड डिस्प्यूट्स बिल एखादें कलम किंचित् बदलून परत असेंब्लीकडे आलें तर त्याचा निकाल करण्यापुरती बैठक लांबविलीच पाहिजे हें उघड होतें.

*　　*　　*

अशा स्थितींत ट्रेड डिस्प्यूटस् बिलावरील चर्चेनें निवळ कालहरण सुरू झालें व कोणास कांहींच करतां येईना. पटेल म्हणत, "मीं प्रतिकूल निकाल दिला तर सरकार कोणतें काम पुढें आणणार हें त्यांनीं आधीं सांगावें." त्यावर सरकार म्हणे कीं, "आधीं निर्णय द्या, मग काय असेल तें पाहूं." दरम्यान पटेल व व्हाइसरॉय यांची गांठ एकदां पडली. पण तींत तडजोड

कांहींच न निघतां, उलट प्रकरण विकोपालाच गेलें म्हणतात ! अशा रीतीनें या अटीतटीच्या सामन्याचा मुहूर्त म्हणून, ट्रेड डिस्प्यूट्स बिलाच्या निकालाची घटका पाण्यांत पडली होती. अखेर सोमवारीं दोनप्रहरीं बिलाचा निकाल होणार हें निश्चित असल्यामुळें हा सामना पाहण्याला प्रेक्षकांच्या व इतर गॅलरींतून बेसुमार गर्दी जमली होती; आणि १२-३० वाजतां पहिल्या बिलाचा निकाल जाहीर करून, लिहून आणलेल्या निर्णयाचे कागद हातांत घेऊन अध्यक्ष पटेल उभे राहिले, व 'आतां पब्लिक सेफ्टी बिलाचा निर्णय' इतकेच शब्द त्यांनीं उच्चारले, पण ते तेथेंच संपले ! त्याचा प्रकार असा.

* * *

सभागृहांत या दिवशीं सुमारें ५०० माणसें होतीं. त्यांपैकीं ४९९ चे मिळून ९९८ डोळे या क्षणीं पटेल यांचेकडे लागले होते, व त्या क्षणापुरते हे सर्व लोक आपलें अस्तित्वहि विसरून गेले असें म्हणण्याइतकी एकाग्रता झाली होती. पण ती एकदम अशा अकल्पित रीतीनें भंग पावली कीं, त्यामुळें नाटकांतील ट्रॅन्सफर सीनप्रमाणें जागच्या जागीं सभागृहाच्या ऐवजीं रणक्षेत्र निर्माण झालें ! व सर्वांच्या मनाला एक जबर धक्का बसला. याचें कारण असें कीं, ध्यानीं-मनीं नसतां 'सेफ्टी बिल' या शब्दांच्या उच्चाराबरोबर तोफेचा गोळा सुटल्यासारखा एक मोठा आवाज झाला. पुरुषभर उंचीची एक ज्वाळा निघाली व लोकांचे डोळे क्षणभर मिटले गेले. रात्रीच्या वेळेस फोटो काढावयाचा असतां फोटोग्राफर एका उंच काठीवर स्फोटक द्रव्य पेटवून विजेची चमक निर्माण करतो तेव्हां हा सर्व प्रकार आधीं पूर्ण माहीत असून लोक त्याकडे पाहत असतात, तरीदेखील तो प्रकाश एकदम चमकून गेला म्हणजे डोळ्याला अंधेरीच येते. मग आधीं कांहींच वार्ता किंवा अदमास नसतां, एकाग्र व शांततामय अशा सभागृहांत अध्यक्षांच्या तोंडून गंभीर शब्द बाहेर पडत असतां एकदम तोफेसारखा आवाज झाला तर डोळे कसे मिटले असतील व मन कसें आश्चर्यचकित झालें असेल याची कल्पना कोणीहि करावी. आवाज होतांच एकदम धुराचा लोळ उठला. त्यानें सभागृह भरून गेलें. शेजाऱ्याला शेजारी दिसेना. पण आवाज व धूर यांच्यामुळें बॉंबगोळा फेकला असावा अशीच कल्पना सर्वांना आली. पण तो कोणी कोठून फेकला किंवा जमिनींतूनच वर उडाला याची मात्र कल्पना होईना !

* * *

खालीं सभागृहांत व वर गॅलऱ्यांतून गलबल व धांवपळ सुरू झाली. प्रेक्षकांच्या गॅलरींतील स्त्रिया ओरडूं लागल्या. ज्याला जी वाट सांपडेल त्या वाटेनें तो बाहेर पडूं लागला. इतक्यांत धूर किंचित् बसला. यामुळें सभागृहांतील व गॅलरींतीलहि माणसें एकमेकांना दिसूं लागलीं. तेव्हां बॉंब फेकला तो कोणी तरी वरूनच फेकला या कल्पनेनें सभासदांची दृष्टि वर गेली तों अध्यक्षांच्या बरोबर समोर असलेल्या दक्षिणेकडील गॅलरींत दोन माणसें उभीं आहेत व त्यांतील एक मनुष्य दुसरा एक बॉंब हातांत घेऊन तो उंच करून जोरानें फेकांत आहे असें दिसलें. व तोहि एका निमिषांत खालीं येऊन पडून फुटला पण त्याचा धूर पहिल्याइतका झाला नाहीं. या मनुष्याला प्रतिबंध करण्याला कोणी पुढें सरसावला तर नाहींच पण खालून कोणी हां-हां म्हणण्याला देखील वेळ नव्हता. खालचे लोक वर हात करून, "तो पहा, तो पहा, त्याला पकडा" असें म्हणत असतां त्यानें हातांतील तांबड्या रंगाचीं छापील हस्तपत्रकें खालीं सभागृहांत फेकलीं व हातांत पिस्तूल घेऊन तें सरकारी सभासदांवर रोखून त्यानें दोनतीन आवाजहि काढले. त्यांतून गोळ्या बाहेर पडल्या असतील, पण त्या भलतीकडे लागल्या एवढें मात्र खचित; कारण हे गोळीं भरलेले बार नीट उडाले असते तर दोन चार मनुष्यें तरी सहज जखमी झाली असतीं किंवा मेलीं असतीं. इतकें होत आहे तों गॅलरींतील पोलीस शिपाई पुढें झाला; पण भीतभीतच सरसावला. तथापि त्याला भीतीचें कांहींच कारण उरलें नव्हतें. या गृहस्थानें पिस्तूल खिशांत घातलें, दुसऱ्या हातांतली साहेबी टोपी डोक्यावर घातली व पोलिसाच्या स्वाधीन होण्याकरितां तो स्वस्थ जागच्या जागीं उभा राहिला! त्यानें पाऊल किंवा मानहि हलविली नाहीं. यामुळें त्याला पकडण्याला कांहींच त्रास पडला नाहीं; व स्नेह्यानें स्नेह्याच्या कंबरेभोंवतीं हात घालून चालावें त्याप्रमाणें शिपाई व तो दोघेहि गॅलरींतून जिन्याकडे वळले. सर्व प्रकारापैकीं खालून प्रेक्षकांना प्रत्यक्ष दिसला तो वर वर्णिलेला हा इतकाच; पण तोच इतका अद्भुत होता कीं, माझ्याच इतरत्र लिहिलेल्या शब्दांनीं त्याविषयीं मला असें म्हणावेंसें वाटतें, कीं "भविष्यानें जर वर्तमानावरच आसन मांडलें, उपमान हेंच जर उपमेय होऊन बसलें, किंवा स्वतः यजमानच जर बारनिशी लिहूं लागले तर मग अद्भुत कल्पनेला थारा कोठें मिळणार?" मागील बातमीपत्रांत मी कल्पनेची म्हणून बॉंबची उपमा दिली तीच प्रत्यक्ष अनुभवाला यावी हें आश्चर्य नव्हे काय?

* * *

अशा रीतीनें सुमारें चार दोन मिनिटांत हा सगळा प्रकार ओसरल्यावर सभागृहांत उरलेले सभासद भानावर येऊन, आपण कोठें आहों व कोठें काय घडलें हें चोहोंकडे दृष्टि फिरवून पाहूं लागले. गॅलरींतील प्रेक्षक आधींच वाट फुटली तसे बहुतेक पळून गेले होते. झालेल्या प्रकारानें ते तर बिचारे घाबरलेच, पण वरती पोलीस कोणाला पकडील काय सांगावें ही भीति! यामुळें पळाले. त्यांपैकीं पुष्कळांना आपल्या टोप्या, छत्र्या काठ्या यांचीहि शुद्ध राहिली नाहीं खालच्या सभासदांचा घोळका आतां सरकारी बाकांकडे वळला व प्रथम कोठें काय झालें व नंतर कोणाला काय लागलें याची चौकशी सुरू झाली. पहिला व दुसरा बॉंब दोनहि एकाच रोखानें फेकण्यांत आलें होते. ते सरकारी बाकांच्या दुसऱ्या व तिसऱ्या ओळीच्या दरम्यान जवळ जवळ पडले. पैकीं एक लाकडी पायवाटेवर पडला. तेथें सुमारें फूट दोन फूट खोलीचा चौरस खड्डा पडला होता व दुसरा बॉंब प्रथम एका बाकाच्या टोंकावर व तेथून सभासदानें पाय ठेवण्याच्या फळीवर पडून त्याचीं शकलें उडालीं. दोनहि आघातांमुळें लाकडाचे लहानमोठे तुकडे चोहोंकडे जोरानें उडाले. तसेंच बैठकीच्या गाद्यांवरील मेणकापडाचे व कापसाचे पुंजके चोहोंकडे पसरले होते. बॉंबमध्यें बहुधा कसलेंहि ॲसिड नव्हतें असें वाटतें. त्यांत फक्त उखळी-बाराची दारूच असावी. कारण चोहोंकडे पांढऱ्या राखेसारखा पदार्थ बाकां-वरून पसरला होता. बॉंबगोळ्यांत खिळे किंवा बारीक लोखंडी छरे वगैरे नव्हते. ते असते तर सहज १०–२० माणसें जखमी झालीं असतीं. सकृद्दर्शनीं कोणीच मनुष्य जखमी झालेला दिसला नाहीं. यावरून वाटलें कीं, इजा करण्यापेक्षां भीति दाखविण्याचाच बॉंब फेकणाराचा उद्देश असावा. पण ही अटकळ मागाहून खोटी ठरली. कारण बॉंबमध्यें लोखंडाचे जाड तुकडे होतें पण आघाताच्या नियमाप्रमाणें ते जवळ न पडतां दूरवर उडाले ते मागाहून हळूहळू उमगूं लागले.

* * *

एकंदर सुमारें पांचसहा मनुष्यांना जखमा झाल्या. परंतु त्यांतील सर्वांत मोठी जखम पार्शी सरकारी सभासद सर बमनजी दलाल यांना मांडीवर झाली. पहिल्या झटक्यासरसे ते बेशुद्ध झाले. पण त्यांना धरून बाहेर नेल्या-वर व उपचार केल्यावर ते शुद्धीवर आले व लगेच त्यांना इस्पितळाकडे

पाठविण्यांत आलें. रेल्वे खात्याचे फायनॅन्स कमिशनर राव यांच्या नाकाला एका लाकडी तुकड्यानें ओझरती जखम झाली. बजेट ऑफिसर शंकरराव यांच्या पायांत एक लहानशी ढलपी घुसली. तसेंच सरकारी गॅलरींतील एका अधिकाऱ्याला व प्रेक्षकांपैकीं एका स्त्रीला लहानशी जखम झाली. आणखी एकदोघांना अशाच जखमा झाल्या असाव्या. कारण मोठ्या जिन्यावरून खालीं उतरल्यावर नोटीस रूमकडे जातांना रक्ताचे थेंब सांडत गेले होते असें आढळलें. खुद्द बॉंब फेकणाराच्या हातांतून रक्त निघालें होतें असें म्हणतात. पण तें खरें असल्यास कशानें हें समजत नाहीं. सर जॉर्ज शूस्टर यांच्या बाहींतून एखादा तुकडा दंडांत गेला असावा असें दिसलें. पण त्यांची ती लहानशी जखम दुसऱ्यांनीं दाखवून देईपर्यंत उमगली नव्हती. हा गोंधळ संपण्याचे सुमारास अध्यक्ष पटेल उठून आपल्या खोलींत गेले व अशा रीतीनें अध्यक्षांनीं तहकुबी जाहीर न करतां ही सभा बरखास्त झाली! फिरून सुमारें १५ मिनिटांनीं ते बाहेर आले आणि सभासद जागेवर बसतात न बसतात तोंच "गुरुवारपर्यंत सभा तहकूब ठेविली आहे" इतकेंच जाहीर करून ते फिरून आपल्या खोलींत गेले. या सुमारास सगळ्या सभागृहाला पोलिसांचा वेढा पडला. सभागृहाची आंतून बारकाईनें तपासणी सुरू झाली व बाहेरचे दरवाजे बंद करून घेऊन फक्त एका दरवाजानें नीट पाहून तपासून माणसें बाहेर सोडावीं असा हुकूम आला.

* * *

हें काम होईपर्यंत सुमारें एक तास लागला. तोंपर्यंत ठिकठिकाणीं सभासदांचे घोळके जमून, झाल्या प्रकाराची चर्चा होत होती. पण एका ठिकाणीं मात्र विशेष गर्दी होत होती. ती म्हटली म्हणजे असेंब्लींतील तार ऑफिसांत. सुमारें अर्ध्या तासांत दोन-तीनशें तारा लिहून त्या पाठविण्याकरितां देण्यांत आल्या. त्यांतल्या पुष्कळशा सभासदांनीं आपापल्या गांवीं खुशाली कळविण्याकरितां पाठविल्या होत्या. खुद्द सरकारची सुमारें १००० रुपयांची तार विलायतेस ताबडतोब रवाना झाली व बाकीच्यांपैकीं कांहीं तारा सेन्सॉर यांनीं पाहून पाठविण्याकरितां अटकावून धरण्यांत आल्या. रूटरच्या बातमीदारानें विलायतेस पाठविलेली तार तीन वाजण्यापूर्वीच तिकडे पोंचून, तेथील वर्तमानपत्रांतून ती प्रसिद्धहि झाली असावी, कारण ५ वाजण्याचे सुमारासच 'लंडन

ईव्हिनिंग स्टॅंडर्ड' पत्राला सविस्तर बातमी पाठविण्याविषयींची तार लंडनहून विष्णुपंत करंदीकर यांनीं केलेली केळकर यांना त्यांच्या बंगल्यावर सवापांच वाजण्याचे सुमारास पोंचली !

* * *

बॉंब फेकणाऱ्या दोघां इसमांना पोलिसांनीं धरून निरनिराळ्या दोन ठिकाणीं नेलें. तेथें त्यांच्या जबान्या घेण्यांत आल्या. त्यांत स्वतः त्यांनींच सांगितल्यावरून एकाचें नांव भगतसिंग व दुसऱ्याचें नांव बटुकेशर दत्त असल्याचें समजलें. पहिले गृहस्थ लाहोरकडील असून, २२ वर्षांपूर्वी लाला लजपतराय यांच्याबरोबर हद्दपार केलेले जे अजितसिंग यांचे ते पुतणे आहेत. दुसरे गृहस्थ बंगाली असून ते कानपुराहून येथें आले होते असें कळतें दोघांनींहि कबुली-जबाब दिला. पण "सविस्तर कैफियत न्यायकोर्टापुढें देऊं" असें सांगितलें. भगतसिंग हे कोठल्या तरी एका नॅशनल युनिव्हर्सिटीचे पदवीधर आहेत असें म्हणतात. यांच्या कबुलीजबाबांतून आणखी किती कोणत्या गुन्ह्यांची उगराणी होणार आहे तें न कळे. पण लजपतराय यांच्यावर हल्ला करण्यावरून सॉंडर्स यांचा जो खून झाला त्यांतील गुन्हेगार अद्यापि न सांपडल्यामुळें, न शोध लागलेल्या या गुन्ह्याचें कलमहि प्रस्तुतच्या गुन्ह्यांतूनच उगवून घेतलें गेल्यास त्यांत आश्चर्य नाहीं. सुतकांत सुतक फेडून घ्यावें त्याप्रमाणें या दोघांवर त्या खुनाचाहि आरोप कदाचित् ठेवला जाईल. असेंब्लींत मात्र प्रत्यक्ष खून पडले नाहींत इतकीच ईश्वराची खैर झाली. कारण शोधांतीं असें कळलें कीं, भगतसिंग याचेजवळ एकच नव्हे तर दोन पिस्तुलें होतीं. पहिल्या पिस्तुलांतील दोन गोळ्या उडल्या. पैकीं एक छताला व दुसरी सरकारी चष्म्यांतील खांबाला लागली. पण या दोन गोळ्या उडतांच पिस्तुलाचा घोडा घट्ट बसला त्यामुळें आणखी बार होईनात तेव्हां तें त्यानें टाकून दिलें व दुसरें काढून घेणार तोंच त्याला पकडण्यांत आलें. एकंदर सोळा काडतुसें त्याजजवळ होतीं. यावरून केवढा अनर्थ होण्याचा संभव होता याची कल्पना करतां येईल.

* * *

असो. ठरल्याप्रमाणें गुरुवारीं असेंब्लीची सभा झाली. पुष्कळ सभासद गांवीं गेल्यामुळें स्वराज्य पक्षाच्या बाकावर शुकशुकाट दिसत होता. प्रथम अध्यक्ष पटेल यांनीं सोमवारीं घडलेल्या प्रकारासंबंधानें खेद व निषेधदर्शक

ठराव मांडला व तो बिनबोलतां मंजूर झाला. त्यावर भाषणें अशीं कोणाचींच झाली नाहींत. नंतर त्यांनीं पब्लिक सेफ्टी बिलासंबंधानें आपला लेखी निकाल वाचून दाखविला. त्यांत आपलें पूर्वींचेंच म्हणणें प्रस्थापित करून उलट बाजूचे सर्व मुद्दे खोडून काढले होते. अशा रीतीनें या बिलाला या बैठकीपुरती तरी मूठमाती दिली. नंतर व्हाइसरॉयसाहेबांकडून आलेला संदेश वाचून दाखवून त्यांनीं सभा शुक्रवारपर्यंत तहकूब केली. या सर्व कामाला सुमारें अर्धा तासच लागला. या संदेशांत व्हाइसरॉसाहेबांनीं असें लिहिलें होतें कीं, "मी स्वतः उद्यां येऊन असेंब्लीच्या सभासदांना उद्देशून भाषण करणार आहे. तरी सर्वांनीं यावें." या संदेशामुळें पुनः कल्पनेला अवसर मिळाला व अनेक तर्क-वितर्क सुरू झाले.

* * *

शुक्रवारीं लॉर्ड आयर्विन यांनीं येऊन उभयकायदेमंडळांच्या सभासदांना उद्देशून भाषण केलें, त्यांत प्रथम सोमवारच्या अत्याचारावर धर्मोपदेशकाप्रमाणें ठराविक प्रवचन केलें. नंतर पब्लिक सेफ्टी बिलासंबंधीं अध्यक्षांच्या निकाला-विषयीं आपला मतभेद प्रकट करून लॉर्डसाहेबांनीं दोन गोष्टी जाहीर केल्या. पहिली अशी कीं, ज्या नियमाच्या अभावामुळें अध्यक्षांना असा निकाल देतां आला तो आम्ही बदलून घेणार व पब्लिक सेफ्टी बिलाऐवजीं ऑर्डिनन्स काढणार. असें घडणार ही बोलवा होतीच. असो. शेवटीं अध्यक्षांनीं लॉर्ड आयर्विन यांना पोंचवून परत आल्यावर असेंब्ली बिनमुदतीनें तहकूब केली असें जाहीर केलें.

* * *

अशा रीतीनें यंदाची दिल्लीची बैठक संपली. इतकी असमाधानकारक, लांबलेली, कंटाळवाणी बैठक पूर्वी झाली नव्हती. करावयाचें काम कमी, लोक-नियुक्त सभासदांचा तुडवडा व यशाची निराशा इत्यादि कारणांनीं बैठक केव्हां संपेल असें झालें होतें. पण ता. २८ मार्चपासून पटेल यांनीं पब्लिक सेफ्टी बिला-च्या पायांत खोडा घातल्यापासून एक प्रकारची नवी ईर्षा उत्पन्न झाली होती. अध्यक्ष व सरकार यांचे पेंचावर पेंच सुरू होते. 'आधीं बोलेल दोन खाईल, मग बोलेल तो तीन खाईल' अशी पैज पडल्यासारखी झाली होती. त्यामुळें ट्रेड डिस्प्यूट्स बिलाची चर्चा उभयपक्षांनीं लांबविली व ती संपल्यावर तरी काय होणार याविषयीं मनाला चिंतेचा फार ताण पडला. मुख्य चिंता पटेल

यांच्यावर सरकारपक्ष निंदाव्यंजक ठराव आणणार कीं काय याविषयीं होती. म्हणून बरेच लोक गांवीं जाण्याचे थांबले पण शेवटीं सोमवारपासून लोक जाऊं लागले. रोज नवें प्रस्थान ठेवावें व तें उचलून परत घ्यावें, सामान बांधावें व सोडावें, रेल्वेकडे जागा राखून ठेवण्याला सांगावें व लगेच उलट निरोप पाठवावा लागल्यानें फजीत होऊन मूर्ख ठरावें, आपल्या गांवीं कार्यक्रम ठरवावे व लगेच मोडावे आणि एकेका दिवसांत उलटसुलट तीन तीन तारा कराव्या असें होऊं लागलें. अखेर गुरुवारीं पटेल यांच्या निकालानें बिल आणि शुक्रवारीं व्हाइसरॉयसाहेबांच्या भाषणानें असेंब्लीची बैठक निकालांत निघून सभासदांना एकदांची मोकळीक मिळाली. दिल्लीस उन्हाळा मार्चअखेरपासूनच होऊं लागला होता. पण सुदैवानें गेले दहा दिवस आभाळ येऊन मधून मधून थोडा पाऊसहि पडला, यामुळें ऊष्मा थोडा कमी होता. वर आभाळ कुंद, तसेंच सभासदांचें मन कुंद, वर ढगांचा कडकडाट तसेंच असेंब्लीच्या कामांत खटके, आणि वर विजेची चमक तर असेंब्लींत बॉंबची ज्वाळा, अशा रीतीनें भौतिक व मानसिक वातावरणाची स्पर्धा सुरू होती!

---

# सिमल्याचीं बातमीपत्रें

## पत्र नं. १

ता. ६-९-१९२९

वरिष्ठ कायदे-मंडळाची बैठक म्हटली म्हणजे चमत्काराचें कांहीं तरी गोड घास खावयाला मिळणार अशी अपेक्षा करण्याची सवय लोकांना सहजच लागून राहिली आहे व ती दिल्लीच्या बैठकींत पूर्वीं एकदां पडलेल्या बॉंबनें पक्की करून ठेवली आहे. पण दरवेळीं खराखुरा बॉंब कसा पडणार? तेव्हां निदान वादाच्या स्फोटाची तरी अपेक्षा उरतेच. एप्रिल ते ऑगस्टच्या दरम्यान सरकारनें एक नवा नियम करून असेंब्लीच्या अध्यक्षाचे हातपाय बांधण्याचा प्रयत्न केला हें प्रसिद्धच आहे. नियम झाला तो झालाच! पण त्यावर स्वतः अध्यक्ष काय करणार किंवा असेंब्ली काय करणार याकडे लोकांचे डोळे लागून राहिले होते. कित्येकांना वाटत होतें कीं, पहिल्याच दिवशीं पटेल अध्यक्षपदाचा राजीनामा जाहीर करून आपलें तेज प्रकट करतील. कित्येकांना

वाटे कीं, सिमल्यास सभासद थोडे जमतात याचा फायदा घेऊन अध्यक्ष पटेल यांच्यावर सेफ्टी बिल अटकावून टाकल्याबद्दल निंदाव्यंजक ठराव आणावा व पास करून घ्यावा, म्हणजे अध्यक्षांना राजीनामा देणें मनांत नसलें तरी प्राप्तच होईल. दिल्लीस शेवटल्या दिवशीं लॉर्ड आयर्विन यांनीं केलेलें भाषण हें अध्यक्षांच्या रूलिंगवर निषेधपर होतें तेव्हां असा निंदाव्यंजक ठराव करणें हें सरकार पक्षांतील कुचेष्टेखोर लोकांना सहज शोभण्यासारखें होतें. पण त्यांना हें काय माहीत कीं, दरम्यान पटेल व लॉर्ड आयर्विन यांचा पत्रव्यवहार होऊन उभयपक्षीं दिलसफाईबरोबर दिलजमाईहि झाली होती. अर्थात् निंदाव्यंजक ठराव येणें शक्यच नव्हतें.

* * *

उरला असेंब्लींतील लोकपक्ष. त्याला स्टेटसेक्रेटरींच्या नव्या नियमाचा निषेध करणें प्राप्तच होतें व तशा अर्थाच्या कांहीं सूचना-उपसूचना सिमल्याच्या बैठकीच्या पहिल्या दिवसाकरितां दाखल होऊन तयार राहिल्या होत्या. पण त्याहि शेवटीं जागच्या जागींच राहिल्या. याचें कारण असें कीं, पहिल्या दिवशीं प्रारंभींच पटेल यांनीं लॉर्ड आयर्विन यांच्याशीं झालेला सर्व दुतर्फी पत्रव्यवहार वाचून दाखविला व लॉर्ड आयर्विन यांच्या खुलाशानें माझ्यापुरतें माझें समाधान झालें आहे असें वरती स्पष्ट बोलूनहि दाखविलें; इतकेंच नव्हे तर नव्या नियमाला अनुलक्षून स्टेटसेक्रेटरी व लॉर्ड आयर्विन यांचा तीव्र निषेध करण्याचे ठराव दाखल झाले असले तरी ते कोणी पुढें मांडूं नयेत असा जाहीर सल्ला दिला ! अर्थात् सभासदांनींहि तो मान्य केला.

* * *

पण हें सर्व घडवून आणतांना त्यांतल्या त्यांत छोटेंसें एक नाटक रंगविण्यास पटेल यांनीं सोडलें नाहीं. सरकारच्या निषेधाच्या ठरावाची भाषा चालू नियमांना सोडून होती हें उघड होतें. तेव्हां ठराव मांडण्याचा आग्रह धरून अध्यक्षांच्या उपदेशाला जुमानलें नसतें तर पटेल हे आपला अधिकार चालविण्याला समर्थ व तयार होते आणि हे ठराव मांडणें जसें अनिष्ट तसेंच ते नियमांच्या दृष्टीनें गैरशिस्त आहे असा स्पष्ट अभिप्राय त्यांनीं दर्शविला. पण नाटक असें केलें कीं, ठराव मांडणारांना विचारलें "ठराव गैरशिस्त नाहीं म्हणण्याला तुमचा आधार दाखवा." पण उलट होममेंबर क्रेरर यांनाहि सवाल टाकला कीं "ठराव गैरशिस्त आहे असें म्हणण्याला तुमचा तरी काय आधार आहे

तो दाखवा." व या प्रश्नांचीं उत्तरें देतांना पायाखालचे आधार गेल्यामुळें, एखादे वेळीं प्लॅटफॉर्मवरचे लोक जसे एकमेकांवर कोलमडून पडतात तशी स्थिति झाली ! नव्या नियमांत असें बंधन घातलें आहे कीं, स्पष्ट शब्दांचा अधिकार असल्याशिवाय अध्यक्षाला कांहीं करतां येत नाहीं ! पण जे निंदाव्यंजक ठराव पुढें आले त्यांनाच अनुलक्षून दिलेला अधिकार कसा मिळणार ? अर्थात् सरकारला अध्यक्षांच्या जुन्याच व संकीर्ण व आनुमानिक अधिकारांचा आधार दाखवावा लागला. तेव्हां पटेल त्यांना म्हणूं लागले कीं, "अशाच अधिकाराचा उपयोग सेफ्टी बिल अटकावण्याच्या वेळीं मीं केला त्याला तर तुम्हीं नांवें ठेवलीं व गिल्ला केला ! त्या अर्थीं तेव्हांचा तुमचा कांगावा हा जर सरळपणा म्हणावा तर आजचा हा सरळपणा कांगावा कां म्हणूं नये !" तात्पर्य, एकच मनुष्य कोणत्याहि गोष्टीचे उलटसुलट समर्थन आपल्याच तोंडानें करूं लागला म्हणजे जशी मौज होते व वावदूक खजील होतो तशी स्थिति सरकारची झाली. पण नाटक अजून पुढेंच होतें. म्हणून ठरल्याप्रमाणें एका बाजूला निंदाव्यंजक ठरावाचा फक्त उच्चार करवून पण त्यावर भाषण न करवून लगेच दुसऱ्या बाजूला 'तुम्ही अखेर काय म्हणतां ?' असें पटेल यांनीं विचारतांच सरकारी लॉ-मेंबरांनीं खुलासा लिहूनच आणला होता तो वाचला. त्याचें तात्पर्य असें कीं, असेंब्लीच्या कामकाजाचे नियम नवीन करणें झाल्यास आम्ही असेंब्लीचा सल्ला आधीं विचारूं, पण अखेर कोणता नियम करावा न करावा या निर्णयाचा अधिकार सरकाराकडेच राहील. या खुलाशानें सर्व प्रकरण संपलें. शेवटीं निष्कर्ष उरला तो असा, 'मीं दिल्लीस केलें तेंच योग्य व साधिकार,' हें आपलें म्हणणें पटेल यांनीं तडीला नेलें. नवा नियम करण्याचा हक्क सरकारनेंहि प्रतिपादिला व शेवटीं तो अधिकाराच्या जोरावर तडीला नेला. आणि नवा नियम करतांना आमची संमति अगोदर घ्यावी असें लोकपक्षाचें म्हणणें होतें तेंहि तडीला गेलें. या सर्व प्रकरणांत पटेल यांचा सावधपणा व चाणाक्षपणा जसा दिसून आला तसाच लॉर्ड आयर्विन यांचा संमंजसपणाहि दिसून आला ही गोष्ट नाकबूल करतां येत नाहीं.

* * *

चालू बैठकींत सरकारी बिलें बरींच आहेत, पण तीं वादग्रस्त अशीं फारशीं नाहींत. खरीं वादग्रस्त बिलें दोन (१) शारदा यांचें विवाहांतील वयोमर्यादेचें व (२) साराभाई हाजी यांचें किनाऱ्यावरील वाहतुकीसंबंधाचें.

पैकीं शारदा बिलच सगळी बैठक खाणार असें दिसतें. हाजी यांच्या बिलाला हात लावण्याला बहुधा अवसरच मिळणार नाहीं! कारण खासगी बिलांकरितां दिलेल्या चारपांच दिवसांपैकीं दोन दिवस शारदा बिलाच्या प्रास्तविक चर्चेतच निघून गेले व ती चर्चाहि अजून पुरी झाली नाहीं. आणि उपसूचना तर भाराभर आहेत. तेव्हां लागला तर एखादद्दुसरा अधिक दिवस या बिलाच्या चर्चेलाच सरकारला द्यावा लागेल. इतर खासगी बिलांचेंहि भेंडोळें येऊन पडलें आहे. पण तें जागच्या जागीं राहील! तात्पर्य, अशा रीतीनें यंदाची सिमल्याची बैठक व शारदा बिल यांचीच बहुधा सांगड पडेल व समव्याप्ति होईल. मात्र जो कांहीं रंग म्हणून भरावयाला पाहिजे तो भरण्याला या बिलांतच पुष्कळसा अवसर आहे.

* * *

या बिलाला विरोध करण्यांत पुढारीपण एम्. के. आचार्य यांच्याकडे आलेलें आहे. किंबहुना मद्रासकडील जितके हिंदु सभासद आहेत तितके सर्व प्रायः या बिलाला विरोधीच दिसतात. श्रीनिवास अय्यंगार यांनीं या बिलाला पूर्णपणें पाठिंबा दिलेला आहे, पण ते अजून हजर नाहींत. या कामाकरितां मद्रासेहून पुराणमतवादी लोकांचें शिष्टमंडळ आलेलें आहे व त्यानें आपलें काम करून चालविलें आहे. बंगालचेहि बरेच प्रतिनिधी बिलाला प्रतिकूल दिसतात. पैकीं कांहीं मनानें अनुकूल आहेत पण इतर कारणांमुळें त्यांना विरोध करावा लागत आहे. वादविवादाच्या पहिल्या दिवशीं विरोधी लोकांचीं व दुसऱ्या दिवशीं प्रायः अनुकूल असणाऱ्या लोकांचीं भाषणें झालीं. परंतु विरोधी अशींहि दोनतीन भाषणें झालीं, तीं पं. मदन मोहन मालवीय व ना. बेळवी यांचीं. जयकर यांनीं बिलाचें सरसकट समर्थन केलें. केळकर यांनीं मुख्यतः दुसऱ्या वाचनाला अनुकूल असें भाषण केलें, परंतु महत्त्वाच्या उपसूचनांचा निकाल लागल्यावर तिसऱ्या वाचनाचे वेळीं अखेर मत कोणत्या बाजूला द्यावयाचें याविषयीं आपला हक्क राखून ठेवला. खऱ्या अर्थानें विवाह होण्याचें मुलीचें वय चौदाच काय पण यापुढें जाणें इष्ट आहे असेंच विरोधकांनींहि प्रतिपादिलें. किंबहुना १२ वर्षांच्या आंत लग्नें होतात तीं थांबविण्याकरितां कायदा करणें आज अवश्य झालें आहे असें पं. मदन मोहन यांनींहि प्रतिपादिलें. तसेंच प्रत्येक विरोधकानें मी बालविवाहालाच प्रतिकूल आहें इतकेंच नव्हे तर रजोदर्शनानंतर विवाह करण्याचा आचार स्वतःच्या घरीं प्रत्यक्ष अमलांत आणला आहे

असेंहि कबूल केलें. वादाचा मुद्दा इतकाच राहिला कीं, केवळ कागदांतलें स्मृतिवचन म्हणून रजोदर्शनानंतरचा विवाह कित्येक लोक अशास्त्र मानीत असले तर त्यांना हा कायदा लागू करावा कीं नाहीं ? पण या गोष्टीचा निर्णय बिलाचा अखेर निकाल लागेल तेव्हांच होणारा असल्यामुळें आज त्याविषयीं कांहीं निश्चित अनुमान करतां येत नाहीं.

* * *

दिल्ली येथील बैठकींत बॉंब पडल्यामुळें प्रेक्षकांस हजर राहण्याची तिकिटें देण्यासंबंधानें विशेष सावधगिरी ठेवण्यांत येणार आहे व कांहीं नवीं बंधनेंहि आतांच घातलीं गेलीं आहेत. परंतु कायमचीं बंधनें काय असावीं याची चौकशी करण्याकरितां अध्यक्षांनीं एक कमिटी नेमली आहे. तिचा निर्णय होईल तेव्हां कळेल. परंतु कमिटी नेमण्यांत अध्यक्षांचा रोख असा आहे कीं, सभागृहांतील व्यवस्था ठेवण्याचा अधिकार अध्यक्षांचा आहे व तो पोलीस अधिकाऱ्यांच्या हातीं जातां कामा नये.

## पत्र नं. २

ता. १३।९।२९

चालू आठवड्यांतील चार दिवसांत सरकारी व खाजगी बिलांचें काम झालें. पैकीं कांहीं सरकारी बिलें अगदीं किरकोळ म्हणून ताबडतोब मंजूर झालीं. इतर चारदोन सिलेक्ट कमिटीकडे पाठविण्यांत आलीं आहेत, तीं परत आलीं म्हणजे त्यांच्याविषयीं लिहितां येईल. पण आतांपर्यंत निकालांत निघालेल्या महत्त्वाच्या बिलांपैकीं ट्रॅन्स्फर ऑफ प्रॉपर्टी म्हणजे मिळकतींची देवघेव करण्यासंबंधींचीं दोन आणि व्यापारी मालाच्या खरेदी-विक्रीसंबंधानें एक, अशीं तीन मुख्य होत. या बिलांची वाटाघाट सरकारांत आज दोनतीन वर्षें चालू असून इलाख्यांतील निरनिराळ्या तज्ज्ञ कायदेपंडितांच्या कमिट्या मसुदे पक्के करण्याकरितां नेमल्या होत्या. यामुळें त्यांत वादग्रस्त असें फारसें कांहीं राहिलें नव्हतें, व तीं मंजूर होण्याला फारशी अडचण पडली नाहीं.

* * *

श्री. अणे, बेळवी, शेषा अय्यंगार, मुल्ला, जयकर वगैरेनीं कांहीं उप-सूचना पाठविल्या होत्या. पैकीं मुल्ला व जयकर यांच्या सूचना मंजूर

झाल्या, इतर झाल्या नाहींत. अणे यांचीच एक सूचना एका तत्त्वासंबंधानें होती व तिला थोडेंसें पाठबळ असल्यामुळें तिजवर मतें मोजण्यापर्यंत पाळी आली, पण ती नामंजूर झाली. ती उपसूचना अशी– " देवघेवीच्या कायद्याच्या दुसऱ्या विभागांत १८८५ सालापासून एक कलम असें होतें कीं, त्यांत सांगितला तो सर्व साधारण कायदा खरा, पण त्या त्या विषयास अनुलक्षून असलेल्या हिंदु, मुसल्मानी व बौद्धधर्माच्या लोकांच्या धर्मशास्त्रांचें जे नियम असतील त्यांना या सर्वसाधारण कायद्यानें बाध येणार नाहीं. आज त्यानंतर ४५ वर्षांच्या अनुभवान्तीं या कायद्याचा व हिंदु धर्मशास्त्राचा विरोध कोठेंच आलेला आढळला नाहीं. पण मुसलमानी व बौद्ध धर्मशास्त्राची तशी गोष्ट नाहीं. म्हणून हिंदु धर्मशास्त्रापुरते सावधगिरीचे म्हणून घातलेले शब्द काढून टाकावे ! " यावर श्री. अणे यांचें म्हणणें असें कीं, " ते शब्द राहूं द्यावे. मुसलमानी व बौद्ध धर्मशास्त्रांच्या बचावाचे शब्द तेवढे ठेवून हिंदु धर्मशास्त्रापुरते शब्द काढल्यानें निष्कारण गैरसमजूत होते. शिवाय आहेत ते शब्द व्यर्थ असले तरी अडचण न करणारे आहेत. मग ते ठेवल्यानें काय बिघडतें ? पुण्यास हिंदु धर्मसंशोधन परिषद भरली होती. तींत नेमलेल्या कमिटीनेंहि शब्द ठेवावे असाच अभिप्राय दिला होता. पं. नेहरू यांनींहि अणे यांच्या उपसूचनेला संमति दिली होती पण ती बहुमतानें नापास झाली.

* * *

श्रीयुत बेळवी यांच्या उपसूचना गहाणावरील व्याजासंबंधींच्या होत्या. 'जेथें व्याजाचे दर करारानें ठरलेले नसतील तेथें कोर्टानें ६ टक्के व्याज आकारावें. या सूचनेला बंगालचे नियोगी व निर्मळचंद्र यांनीं दुजोरा दिला. परंतु ९ टक्के व्याज हें आतां सार्वत्रिक व सर्वसंमत झालें आहे, आणि सरकारी व्याजाचा दर व सावकारी व्याजाचा दर यांत विशेष फरक असला तरच गहाणाचा व्यवहार होऊं शकेल, एरवीं गहाणावर कोणी कर्ज देणार नाहीं. म्हणून ६ ऐवजीं ९ टक्के व्याजाचा दर असावा अशीच मूळ सूचना पास झाली. एवढ्या वादग्रस्त बाबी वगळल्या असतां नवीन कायदा विचारपूर्वक, सोयीचा असाच झालेला आहे. स्थावर मिळकतीच्या व्यवहाराचें खत रजिस्टर कचेरींत नोंदलें म्हणजे तीच पुढें व्यवहार करणाराला नोटीस आहे असें समजावें असा मुंबई इलाख्यांत प्रघात

आहे. तोच इतर कोठें नसेल तेथेंहि चालू करावा असें ठरविलें आहे. तथापि नोंदणीखात्याच्या पद्धतींत हल्लीं पुष्कळ दोष आहेत. नोंदणीची यादी असावी तशी नसते. सूचिपत्रें भरपूर नसतात. शोधणावळीचा खर्च जास्त पडतो. तरी या व इतर बाबींत प्रांतिक सरकारांनीं नवे नियम करावे असेंहि ठरविण्यांत आले. हल्लीं भाडेचिठ्या होतात त्या एकतर्फी होतात त्या यापुढें दुतर्फी व्हाव्या म्हणजे भाडेकरी व मालक या दोघांनीं एकमेकांना करार लिहून दिले व ते उभयतांवर सारखेच बंधनकारक आहेत असें व्यक्त होण्यासारखा भाडे-चिठ्ठीचा नमुना असावा असेंहि ठरलें आहे. तात्पर्य, देवघेवीच्या आणि खरेदीविक्रीच्या व्यवहारांत अधिक व्यवस्था व सोय व्हावी आणि व्यवहाराला निश्चितपणा यावा अशा तऱ्हेचाच हा नवा कायदा झालेला आहे.

* * *

सरकारी बिलांच्या जोडीला शारदा बिल या चारहि दिवसांत कार्यक्रम-पत्रिकेंत ठेवलें गेलें होतें. पण त्याला फक्त बुधवारींच काय ती सवड मिळाली. या दिवशीं उलट-सुलट आणखी बरींच भाषणें होऊन सुमारें ६॥ वाजतां बिल लांबणीवर टाकण्याची आचार्य यांची उपसूचना मताला घातली गेली व ती नापास झाली असें अध्यक्षांनीं जाहीर केलें. वास्तविक या उपसूचनेवर २॥ दिवस वादविवाद कडाक्याचा झाला व एकदां ही उपसूचनेची कोंडी फुटली म्हणजे बिल नको म्हणणारांचा डाव बहुधा सर्व फसला असा रंग असल्यामुळें अनुकूल व प्रतिकूल मतें प्रत्यक्ष मोजण्याची मागणी सहजच होणार असें वाटत होतें, व तसें झालें असतें तर बिलाचें खरे मित्र कोण व शत्रु कोण यांचीं नांवें कागदावर नोंदलीं गेलीं असतीं. परंतु आश्चर्य असें घडलें कीं, अशी मागणी कोणीच केली नाहीं. इतकेंच नव्हे तर असेंहि म्हणतात कीं, पं. मालवीय यांनींच स्वतः अशी मागणी करूं नका म्हणून खासगी रीतीनें कित्येक सभासदांना सांगितलें. बंगाल-मद्रासच्या विरोधकांमध्यें चारदोनच प्रमुख सभासद होते; आणि मुसलमानांनाहि बिल लांबणीवर टाकावें म्हणजे पास होऊं नये असें वाटत हात. परंतु 'मतांची दुतर्फी मोजणी करा' असें म्हणण्याचें धैर्य कोणीच दाखविलें नाहीं. याला विरोध झाला तो पुष्कळसा दिखाऊ होता असें आम्हांस वाटलें. पुढें कलमवारीनें बिल विचाराकरितां सायंकाळीं ७ वाजतां चालू करण्यांत आलें तेव्हां तर मि. आचार्य यांचीच पहिली उपसूचना पुढें निघाली ती अशी कीं, "मुलीच्या विवाहाची मर्यादा १४ वर्षें न ठेवतां

उलट १५ वर्षें ही ठेवावी." व निरनिराळ्या शास्त्रांच्या दृष्टीनें पाहिलें असतां १५ वर्षांची मुलगी हीच खरी उपवर असें आचार्य यांनीं साधार प्रतिपादन केलें! त्यामुळें त्यांचा तरी बिलाला विरोध खरा किती व वकिली बाण्याचा किती हें कळण्याची पंचाईत पडली. असो. अजून १२ व १३ या वयोमर्यादेच्या उपसूचना चर्चेला निघावयाच्या आहेत तेव्हां काय तो खरा निर्णय होईल. तूर्त इतकें खचित दिसतें कीं, बिलास विरोध करण्याची जबाबदारी घेण्याला कोणीहि तयार नाहीं. याचें खरें कारण असें कीं, लग्नाची वयोमर्यादा वाढावी यांतच समाजाचें खरें हित आहे. वाटेल तर प्रायश्चित्त घेऊन धर्मशास्त्राबद्दलची आदरबुद्धि प्रकट करावी; पण कायद्यानें वयोमर्यादा ठरवून ती सर्व जातींच्या लोकांवर अंमलांत आणली जावी याकडेच फार मोठ्या बहुमतानें पारडें झुकतें आहे यांत शंका नाहीं. यानंतर आतां शारदा बिलाची तारीख पुढील आठवड्यांतहि सरकारी बिलाबरोबरच पुन्हा चालू लागेल, म्हणजे तारीख २६ सप्टेंबरच्या आधीं हें बिल निकालांत निघणार नाहीं असा जो अंदाज पूर्वी वाटत होता तसा आतां तो वाटत नाहीं.

* * *

काल गुरुवारचा सर्व दिवस ना. क्रेरर यांनीं पुढें आणलेल्या क्रिमिनल प्रोसीजर कोडाच्या नव्या बिलाच्या म्हणजे हंगरस्ट्राइक बिलाच्या चर्चेनें घेतला. क्रेरर यांनीं आपल्या भाषणांत बिल वादग्रस्त आहे हें स्वतःच कबूल केलें आणि त्यांचें लहानसें भाषणहि अडखळत अडखळतच झालें. त्यांच्या भाषणानंतर दोन उपसूचना मांडण्यांत आल्या. पहिली रा. केळकर यांची अशी कीं, "सदर बिल सार्वजनिक अभिप्राय घेण्याकरितां रीतीप्रमाणें बाहेर पाठविण्यांत यावें. आज विचारांत घेतलें जाऊं नये." दुसरी उपसूचना के. सी. रॉय यांची अशी कीं, "हें बिल सिलेक्ट कमिटीकडे पाठविण्यांत यावें. अर्थात् पहिल्या उपसूचनेंत कालहरणद्वारा विरोध व दुसरींत समर्थन असाच गर्भितार्थ होता व दोनहि उपसूचनांवर मिळूनच वाद चालू होता. पहिल्या उपसूचनेवर अनुकूल भाषणें अबदुल हे व मि. जिना यांचीं झालीं. रॉय यांच्या सूचनेतर्फे शर्मा, अनवरुल अझीम, इमर्सन व सर डार्सी लिंडसे यांचीं झालीं. पैकीं इमर्सन हे पंजाब सरकारचे होम सेक्रेटरी असून त्यांनीं अन्नसत्याग्रहासंबंधानें व लाहोरच्या खटल्यांतील सरकारी धोरणासंबंधानें सुमारें तासभर वाक्पांडित्य केलें. त्याला लोकपक्षा-

करून मधून मधून विरोध चालू होता. बिलावर आणखी पुष्कळ भाषणें व्हावयाचीं असल्यामुळें त्याकरितां मुद्दाम उद्यां शनिवारीं असेंब्लीची बैठक भरविण्यांत येणार आहे. हें बिल खळबळ उडवून देणारें असल्यामुळें काल प्रेक्षकांना बहुतेक मज्जावच करण्यांत आला होता. गॅलऱ्या बहुतेक मोकळ्या होत्या व पोलीसबंदोबस्त इतका कडक होता कीं, अध्यक्षांच्या डगलेपट्टे-वाल्यांना तुझा पास दाखीव असें विचारण्यांत आलें म्हणतात! अनोळखी माणसांना झडत्या घेतल्याशिवाय आंत सोडण्यांत आलें नाहीं.

* * *

हल्लीं पूर्व आफ्रिकेंतील हिंदी लोकांतर्फे एक शिष्टमंडळ मुंबईवरून येथें आलें आहे व हिंदुस्थान सरकारशीं वाटाघाट करून नंतर तें विलायतेस जाईल. या शिष्टमंडळाबरोबर असेंब्लींतील १-२ प्रमुख सभासद विलायतेस जातील असें म्हणतात. हिंदुस्थान सरकार या शिष्टमंडळाला अद्यापि कांहीं आपल्या मताचा थांग लागूं देत नाहीं! शिष्टमंडळानें मात्र असेंब्लींतील निर-निराळ्या पुढाऱ्यांच्या भेटी घेऊन सरकारवर कांहीं तरी दडपण टाकतां येतें काय हें पाहण्याचा प्रयत्न चालविला आहे.

## पत्र नं. ३

ता. २०-९-२९

गेल्या आठवड्यांत शनिवारीं असेंब्लीची जादा बैठक भरविण्यांत आली होती, व त्यानंतर सोमवार ते गुरुवार मिळून पांच दिवस काम झालें. यापैकीं मंगळवारीं खासगी ठराव आणि बाकीच्या दिवसांत नांवाला सरकारी बिलांचें काम; पण बाकी सर्व शारदा बिलाचें काम झालें. खासगी बिलांना सरकार किती थोडे दिवस नेहमीं देतें, व या एका बिलाला सरकारनें किती दिवस दिले हें पाहिलें म्हणजे दोन गोष्टी कळून येतात. एक ही कीं, शारदा बिल मंजूर व्हावें याकरितां त्याला शक्य तितक्या सवलती देण्याला सरकार तयार झालें आहे; आणि दुसरी ही कीं, खासगी बिलांना हल्लीं मिळतात त्याहून पुष्कळ अधिक दिवस दिल्याशिवाय सभासदांच्या उपक्रमाचें असें कांहींच काम होणें शक्य नाहीं. कायदे-कौन्सिलें हीं जितकीं सरकारी कामाकरितां तितकींच खासगी कामाकरितां आहेत ही गोष्ट हळूहळू निदर्शनाला येऊं लागली आहे.

आणि पुढेंमागें, वर्षांतून त्यांच्या बैठकी अधिकच नव्हे तर अधिक लांबहि व्हाव्या याशिवाय दुसरा उपाय नाहीं, हें सरकारला कबूल करावें लागेल, व कायदेमंडळांत शिरणाऱ्या लोकांनाहि लक्षांत ठेवावें लागेल.

* * *

शनिवारचा सबंध दिवस क्रिमिनल प्रोसीजर बिलानें खाल्ला, व शेवटीं चारानंतर तहकुबींतील सूचनेची चर्चा दोन तास झाली. दोहोंतहि तुरुंगांतील कैद्यांची वागणूक व अन्नत्याग-सत्याग्रह हेच विषय होते. क्रिमिनल प्रोसीजर बिल विचारांत न घेतां तें सिलेक्ट कमिटीकडे पाठवावें कीं, लोकमत घेण्याकरितां बाहेर पाठवावें; या उपसूचनांच्या उंबऱ्यावरच तें अडखळून राहिलें होतें; व शनिवारच्या पूर्वींच एक्झिक्युटिव्ह कौन्सिलानें या दोहोंपैकीं दुसरी म्हणजे श्री. केळकर यांची उपसूचना स्वीकारावी असें ठरविल्याची गुणगुण बाहेर निघालीहि होती. पण तसें कांहीं न करतां सर्व शनिवारचा दिवस सरकारानें ही चर्चा चालू दिली. या दिवशीं बॅ. जिना यांचें उरलेलें भाषण, तसेंच पं. नेहरू, बॅ. जयकर, पं. मालवीय इत्यादि पुढाऱ्यांचीं भाषणें झालीं. सरकार जवळ जवळ मूग गिळून बसलें होतें, व त्या दिवशीं तरी तें उपसूचना मान्य करील असें वाटलें नव्हतें. तहकुबीच्या उपसूचनेवरील भाषणें मात्र बरींचशीं औपचारिक झालीं. कारण एक तर मुख्य विषयाची चर्चा आधींच होऊन गेली होती, व फक्त सरकारचा निषेध करण्याचा राहिला होता, पण जतींद्रनाथ दास यांच्या आधींच झालेल्या मृत्यूमुळें बोलणाराला बोलण्याचें कांहींच उरलें नव्हतें, आणि सरकारची अप्रतिष्ठा या मृत्यूमुळें जगजाहीर झाल्यामुळें सरकार पक्षाकडून समर्थनपर जोराचीं अशीं भाषणें होऊंच शकलीं नाहींत. सोमवारीं सकाळीं मात्र नक्की बातमी आली कीं, सरकार केळकरांची उपसूचना मान्य करणार; आणि सुरुवातीलाच तिचा प्रत्यय आला. कारण ना. क्रेरर यांनीं प्रथमच उठून सरकारी स्टेटमेंट सभेपुढें मांडण्याची परवानगी घेतली, आणि लोकपक्षाच्या प्रमुख पुढाऱ्यांच्या भाषणांची स्तुति करून तुरुंगांतील वागणुकीसंबंधानें आम्ही अनेक रीतींनीं लवकरच विचार करणार आहों असें आश्वासन देऊन बिल लोकमताकरितां बाहेर पाठविण्याची तयारी दाखविली. यामुळें उपसूचना रीतसर मांडून व ती सर्वमान्य होऊन या बिलाचा प्रश्न निकालांत निघाला.



* * *

यानंतर झालेलें सरकारी काम म्हणजे ट्रॅन्सफर ऑफ प्रॉपर्टीचीं दोन बिलें तिसरें वाचन होऊन निकालांत निघालीं. हें करतांना ॲ. मुल्ला यांनीं अनेक औपचारिक व आवश्यक सूचना सुचविल्या व त्या मंजूर करून घेतांना सभासदांपेक्षां अध्यक्षांनाच विधिमंत्र म्हणतां म्हणतां तोंडपाटिलकी अधिक करावी लागली ! त्यावर चर्चा अशी कांहींच झाली नाहीं. चार दिवसांत इन्कम-टॅक्स कमिट्यांच्या सिलेक्ट कमिट्यांचेंहि काम चाललें. पैकीं एका बिलावरील कमिटीचा रिपोर्ट सर्वानुमतें मंजूर होऊन आला तो दाखल करण्यांत आला, व तें बिल शेवटच्या आठवड्यांत मंजूरहि होऊन जाईल. या बिलांतील मुख्य विषय असा कीं, सरकार सोडलें असतांहि पेन्शनाऐवजीं आपल्या नोकरांना प्रॉव्हिडंट फंड देण्याची वहिवाट हल्लीं मोठमोठ्या कंपन्या व खासगी कचेऱ्या यांतूनहि पडूं लागली आहे. म्हणून पगाराच्या $\frac{1}{6}$ इतक्या रकमेपर्यंत प्रॉव्हिडंट फंड, इन्कम टॅक्सच्या आकारणीला माफ करावा, असा जो एक नियम आहे त्याला या बिलानें कायदेशीर स्वरूप दिलें जात आहे. आणि बिलांतील मुख्य तपशील म्हणजे कोणते प्रॉव्हिडंट फंड इन्कमटॅक्स कमिशनरानें मान्य करावे कोणते करूं नये व ही मान्यता मिळण्यास प्रॉ. फंडाच्या मालकानें कोणते नियम पाळावे, त्याचा व नोकराचा संबंध कसा असावा, हिशेब कसे ठेवावे इत्यादि होय. अर्थात् हें बिल सर्वांना मान्य होण्यासारखेंच आहे.

* * *

इन्कमटॅक्सचें दुसरें बिल मात्र वादग्रस्त असल्यामुळें त्याच्या सिलेक्ट कमिटीचें काम लांबलें आहे व तें बिल या बैठकींत निकालांत निघणार नाहीं असें वाटतें. या बिलांतील विषय असा कीं, पेढी, दुकान व कारखाना यांचा मालक एकच असतां नफ्याच्या रकमेंत अनेक भागीदार आहेत असें दाखविण्याकरितां आणि इन्कमटॅक्स टाळण्याकरितां अँड को. या नांवानें नामधारी कंपन्या उत्पन्न केल्या जातात असें सरकारचें म्हणणें आहे. पण हा आक्षेप खरा किती व खोटा किती हें ठरविणें सोपें नाहीं. दुसराहि एक मुद्दा असा आहे कीं, कोर्टांत ज्याप्रमाणें वकील हजर राहून पक्षकाराची बाजू मांडतात त्याप्रमाणें इन्कमटॅक्स कलेक्टरांपुढें तज्ज्ञ मुखत्यार नेमून हिशेब समजावून दिले जातात, तसें करण्याची परवानगी यापुढें ठेवावी कीं नाहीं !

अशा रीतीनें हें बिल वादग्रस्त ठरल्यामुळें फिरून तें लोकमत मिळविण्याकरितां बाहेर पाठविलें जाईल असें म्हणतात.

* * *

चालू आठवड्यांत शारदा बिलावर चर्चा सुरू होती. ती मुख्यतः उपसूचनांची. उपसूचनांची संख्या नांवाला सुमारें १०० पर्यंत गेली असली तरी महत्त्वाच्या व मुद्द्याला धरून अशा उपसूचना केवळ २५-३० च आहेत असा या चर्चेत अनुभव आला. बहुमत बहुधा असा कटच धरून बसलें आहे कीं, एकहि उपसूचना म्हणून मान्य करावयाची नाहीं! म्हणजे सिलेक्ट कमिटीकडून बिल जसें आलें तसेंच्या तसें मंजूर करावयाचें! अध्यक्ष पटेल यांनींहि बिलावरील प्रास्ताविक चर्चेच्या वेळचें संथपणाचें धोरण सोडून देऊन आपली कातरी थोडीशी बिनमुरवतखोरपणानें चालू केली. यामुळें उपसूचनेवर १-२ भाषणें झालीं न झालीं तोंच मताकरितां ती अध्यक्ष पुढें मांडीत व बहुमत संघटित होऊन राहिल्यामुळें ती अमान्य होऊन निकालांत निघे! परंतु प्रत्यक्ष मतें विभागूनहि मोजण्याचा अधिकार असल्यामुळें, त्यांतल्या त्यांत महत्त्वाच्या उपसूचना मांडणारांनीं तो अधिकार बजावण्यास कमी केलें नाहीं. अशा उपसूचनांपैकीं मुख्य म्हटल्या म्हणजे, कायद्यांत लग्नाची वयोमर्यादा किती असावी याविषयीं होत्या. पैकीं ११ व १२ या दोन वयासंबंधानें मतें विभागून मोजण्यांत आलीं व त्या दोनहि उपसूचना नामंजूर झाल्या! हें वय १३ असावें अशी उपसूचनाहि नामंजूर झाली! परंतु तिजवर मतें विभागून मोजलीं नाहींत. बिलांतील गुन्ह्यासंबंधानें पुरावा शिक्षा याहीसंबंधाच्या उपसूचना मतविभागणीनें नामंजूर झाल्या! अशा रीतीनें सर्व उपसूचनांची कत्तल होऊन, बिलांतील २ ते ११ हीं कलमें मंजूर होऊन आतां फक्त पहिल्या कलमावरील उपसूचना व बिलाचें तिसरें वाचन इतक्याच गोष्टी उरल्या आहेत. हें बिल कोणत्या जातींना लागावें व कोणत्या जातींना न लागावें याविषयींहि उपसूचना होत्या त्याहि नापास झाल्या. पण हा वाद, बिल मुसलमानांना लागूं नये या उपसूचनेवर जितका रंगला तितका दुसरा कशावरहि रंगला नाहीं. पण तो वाद मुख्यतः मुसलमानमुसलमानांतच झाला. एकहि हिंदु त्यावर बोलला नाहीं. मौ. महंमद याकूब व शेरवानी, मौ. शफी दाउदी व सिदिकी अशा मल्लांच्या जोड्या लागून ज्या कुस्त्या झाल्या त्या प्रेक्षणीय झाल्या. व्यक्तिशः उखाळ्यापाखाळ्या तर निघाल्याच! एकानें

दुसऱ्याला धर्मभ्रष्ट म्हणावें, दुसऱ्यानें त्याला “मोठे तुम्हीं धर्ममार्तंड आहां माहीत आहे!” म्हणावें, इतकेंच नव्हे तर, कुराणांतील वाक्यांची मीमांसाहि झाली, आणि मौलवींच्या फतव्यांचे पतंग व वावड्या उडविल्या गेल्या, व फाडल्या गेल्या.

* * *

पण या वादांतून एक गोष्ट सर्वानुमतें निष्पन्न झाली ती ही कीं, मुसलमानी धर्मांत विवाह हा संस्कार नसून फक्त खासगी करार आहे; आणि ऋतुकालापूर्वींच मुलीचें लग्न करावें असा निर्बंध नाहीं. हाच मुद्दा हिंदु सभासदांनीं वादाला काढला तेव्हां ऋतुकालानंतरचा विवाह सशास्त्र आहे कीं नाहीं याविषयीं दुतर्फा मतप्रतिपादन करण्यांत आलें. परंतु वाद बहुतेक सभ्यपणानें झाला. असो. येत्या सोमवारीं या बिलाचा अखेरचा निकाल बहुधा लागेल.

* * *

तारीख १७ रोजीं पूर्वींचा अपुरा राहिलेला कै. रंगस्वामी अय्यंगार यांचा ग्रामपंचायतींचा ठराव व लष्करी शिक्षणाच्या शाळांसंबंधानें बॅ. जयकर यांचा ठराव हे दोनहि मंजूर झाले. पहिला ठराव फसगतीनें मंजूर झाला पण दुसरा ठराव मात्र सार्वत्रिक विरोध असतां केवळ जयकरांच्या वक्तृत्वामुळेंच पास झाला. प्रभावी वक्ते या नात्यानें बॅ. जयकर यांनीं असेंब्लीमध्यें आतां कायमचें नांव मिळविलें आहे त्याचें हें एक प्रत्यंतरच होय. मूळ ठरावाचा मसुदा डॉ. मुंजे यांचा होता. परंतु त्यांत कांहीं दोष आढळल्यामुळें डॉ. मुंजे यांनीं स्वतः एक उपसूचना मांडली व ती मिलिटरी सेक्रेटरी यांनीं मान्य केली असती असें वाटलें. पण लष्करी शिक्षणाच्या बाबतींतील सरकारचा चुकारपणा हा मुद्दा पुढें येऊन त्याच्यावरच सर्व रण पडलें, व शेवटीं मतें विचारतांना सरकारपक्षातर्फे नकाराचा ब्र देखील कोणी काढला नाहीं.

* * *

या आठवड्यांत कौन्सिल ऑफ स्टेटची बैठक सुरू झाली. तींत मामुली काम झालें. महत्त्वाचे असे दोन ठराव येऊन नापास झाले! त्यांपैकीं एक डेहराडून येथें स्थापन करण्यांत येणाऱ्या नव्या मेडिकल इन्स्टिटयूटसंबंधाचा व दुसरा करन्सी खात्यांतील नोकरांच्या तक्रारींसंबंधाचा. डेहराडून इन्स्टिटयूट-

त्यासंबंधानें असेंब्लींत प्रश्नोत्तरें झालीं, पण सोडतींत ठरावाचें तिकीट निघालें नाहीं. ही इन्स्टिटयूट भारी खर्चाची असून तिचें चालकत्व विना कारण गोऱ्या लोकांचे हातीं राहून तेथील शोधसंशोधनाचा फायदा मेडिकल कॉलेजें असणाऱ्या शहरांना किंवा डॉक्टर लोकांचा भरणा असणाऱ्या शहरांना मिळणार नाहीं अशी तक्रार असून, देशांतील डॉक्टर लोकांच्या अनेक संघांनीं त्याविरुद्ध चळवळ सुरू केली आहे. यामुळें स्टेट कौन्सिलमध्यें हा ठराव नापास झाला तरी दिल्लीच्या बैठकींत पुनः तो असेंब्लींत निघेल असें वाटतें. करन्सी ऑफिसांतील नोकरांच्या पगारासंबंधीं पुढें आलेला ठराव अवघ्या ३ मतांनीं नापास झाला म्हणजे १९ विरुद्ध १६ मतें पडलीं. करन्सी असोसिएशनतर्फें रा. आचार्य हे खटपटीकरितां आले होते, म्हणून एवढें तरी काम झालें. अशी कांहीं खटपट केल्यास उपयोग होतो.

* * *

गेल्या आठवड्यांत सिमला येथें संगीत शास्त्री गणपतराव बर्वे व त्यांचा मुलगा मनोहर बर्वे हे येऊन त्यांनीं येथील 'गेइटी' थिएटरांत गायनवादनाचे प्रयोग केले ते इकडील लोकांना फार पसंत पडले. गेल्या ८-९ वर्षांत या संगीतप्रेमी व संगीतनिपुण पितापुत्रांनीं हिंदुस्थानांतील बहुतेक प्रांतांतून तसेंच सिलोन, ब्रह्मदेश, नेपाळ वगैरे लगतच्या भागांतूनहि हिंडून आपली कला लोकांना दाखविली आणि पैसे व कीर्ति मिळविली. मनोहर हा अजून अल्पवयीच आहे; तथापि गायन व वादन या दोहोंमध्यें त्यानें वाखाणण्यासारखें प्रावीण्य मिळविलें आहे. लोकांना माहीत असलेलीं सर्व प्रकारचीं वाद्यें तो उत्तम वाजवितोच; पण हिंदुस्थानांत माहीत नाहींत अशींहि वाद्यें त्यांनीं मिळविलीं आहेत. त्याबरोबरच रा. गणपतराव बर्वे यांनीं आपलें संगीतसंशोधन सुरू ठेविलें असून संगीतांतील श्रुतिप्रामाण्य सिद्ध करण्याकरितां त्यांनीं अनेक नकाशे तयार केले आहेत. इतकेंच नव्हे तर वनस्पती, जलचर प्राण्यांच्या कृती इत्यादि सृष्टींतून मूलभूत श्रुतिप्रामाण्य ईश्वरनिर्मित असून त्याविषयीं शास्त्रीय नियम कसे बांधतां येतात हेंहि सिद्ध करण्याचा त्यांचा प्रयत्न आहे. पं. विष्णु दिगंबर यांच्यासारखीच त्यांच्यामध्यें धडाडी व संघटना शक्ति दिसून येते, व हे महाराष्ट्रीय गुणी पितापुत्र सर्व हिंदुस्थानभर नांव मिळवून आले याचें भूषण सर्व महाराष्ट्रीय समाजाला वाटल्याशिवाय राहणार नाहीं.

## पत्र नं. ४

ता. २६-९-२९

गेल्या आठवड्यांत किरकोळ कामें झालीं तेवढीं देत आहें. सोमवारीं प्रॉव्हि-डंट फंडावर कांहीं प्रमाणांत इन्कम टॅक्स माफ करण्यासंबंधाचें सर जॉर्ज शूस्टर यांचें बिल सिलेक्ट कमिटीकडून आलें तसें पास झालें. कमिटीचा रिपोर्ट एकमतानें झाला होता व बिल उपयुक्त आहे. मंगळवारीं चार पांच ठराव येणार होते पण एका ठरावावरच बहुतेक सर्व वेळ गेल्यामुळें बाकीचे ठराव चर्चेला निघालेच नाहींत. निघाला तो जमशेटपूरच्या टिनप्लेट कारखान्याला सरकारनें संरक्षण व मदत देऊं नये अशा अर्थाचा पंडित नीलकंठदास यांचा ठराव होता व तो बहुमतानें मंजूर झाला. या कारखान्यांतलें देशी भांडवल फार थोडें आहे. शिवाय कारखानदार मजुरांना नीट रीतीनें वागवीत नाहींत. या दोन तक्रारी नीलकंठदास व इतर वक्ते यांच्या बोलण्यांत आल्या, व बरींच उलटसुलट भाषणें झालीं, पण ठराव अखेर मंजूर झाला.

* * *

मंगळवारीं इतर काम झाल्यावर ब्रह्मदेशाचे प्रतिनिधि मि. मुनशी यांनीं तिकडील अन्नसत्याग्रही राजकीय कैदी पुंगी उ विजय, यांच्या मृत्यूसंबंधानें तहकुबीची उपसूचना आणली. ती अध्यक्षांनीं मान्य केल्यामुळें तिजवर बरीच चर्चा झाली. या उपसूचनेचा हेतु जतींद्र दास यांच्यासंबंधीं पं. नेहरू यांनीं आणलेल्या उपसूचनेसारखाच होता. परंतु यापूर्वीच्या उपसूचनेच्या वेळीं पंजाब सरकारचे प्रतिनिधि इमर्सन यांना सभासद करून घेतल्यामुळें व इतर लोकांच्या हातीं पंजाब जेल-कमिटीच्या कारवाईचे कागद असल्यामुळें जितकी चर्चा झाली तितकी मुनशी यांच्या ठरावावर झाली नाहीं. मुख्य मुद्दा मुनशी यांनीं मांडला तो असा कीं, हा पोंगी (बुद्ध यति) महिन्यांतून दोन दिवस धर्मकार्य म्हणून पिवळ्या रंगाचीं म्हणजे संन्याशाचीं वस्त्रें वापरण्याची परवानगी मागत होता; पण तेवढीहि त्याला देण्यांत न आल्यामुळें त्यानें अन्नत्याग केला, व त्यांतच तो मरून गेला! जयकरांनीं अवांतर गोष्टी टाकून देऊन नेमका एवढाच मुद्दा जोरानें मांडला. तेव्हां होम-मेंबर यांना मूग गिळून बसावें लागलें, व निंदाव्यंजक ठराव बहुमतानें मंजूर झाला.

* * *

क्रिमिनल प्रोसीजर कोडाच्या बिलावरील चर्चेत होममेंबर क्रेरर यांनीं राजकीय कैद्यांच्या वागणुकीसंबंधानें अनेक गोष्टी करण्याचें कबूल केलें. त्यांत असेंब्लींतील निरनिराळ्या पक्षांच्या पुढाऱ्यांशीं खासगी चर्चा करण्याचें वचन दिलें होतें. त्याप्रमाणें गेल्या आठवड्यांत पुढाऱ्यांना बोलावण्यांत आलें होतें. त्याशिवाय सरकारतर्फे ग्रूस्टर, इमर्सन हेहि होते. एक दोन दिवस थोड-थोडी चर्चा होऊन अखेर निकाल बराचसा समाधानकारक लागला म्हणतात. या चर्चेतील मुख्य विषय गोऱ्या व काळ्या कैद्यांच्या वागणुकींतील विषमता काढून टाकण्यासंबंधींचा होता व नाहीं होय म्हणतां-म्हणतां तों काढून टाकण्यासारखी योजना तयार झाली म्हणतात. पण पांढऱ्यावर काळें होऊन बाहेर पडेल तेव्हां काय तें समजेल. क्रिमिनल प्रोसीजर बिलावरील चर्चेत इमर्सननें निर्लज्जपणानें असा युक्तिवाद केला होता कीं, " काळ्या-गोऱ्यांच्या वागणुकींतील हा फरक स्वाभाविकच आहे. कैदी गोरा झाला म्हणून त्याला काय मरूं द्यावयाचें ? शिवाय अशा कैद्यांची संख्या फार थोडी असतें म्हणून सरकारनें त्यांना सुखानें ठेवलें तरी फार खर्च येत नाहीं. पण काळ्या कैद्यांची संख्या फार मोठी म्हणून एकच नियम दोघांना लावले तर आणखी लाखों रुपये खर्च करावे लागतील आणि आपापल्या तुरुंगखात्यावर इतका पैसा खर्च करा असें आम्हांला प्रांतिक सरकारांना सांगण्याचा काय अधिकार ? " क्रेरर यांनीं करविलेल्या खासगी चर्चेत या निर्लज्जपणाच्या युक्तिवादाला मूठमाती मिळाली असावी. एकंदरींत क्रिमिनल प्रोसीजर बिलाचें नाक दाबलें गेल्यामुळें सवलतीचें तोंड उघडलें गेलें असें म्हणण्यास फारशी हरकत नाहीं.

*   *   *

बुधवारीं सप्लिमेंटरी ग्रँट्स म्हणजे खर्चाच्या जादा मागण्या कांहीं मंजूर झाल्या. त्यांत विशेष कांहीं नव्हतें. महत्त्वाचा सरकारी ठराव एकच होता. तो रोड कमिटीच्यासंबंधानें. जयकर यांच्या अध्यक्षतेखालीं नेमलेल्या रोड कमिटीच्या शिफारशीप्रमाणें पेट्रोलवर कर बसविला असून त्याचे पैसे जमा होऊं लागले आहेत. हें उत्पन्न दरसाल ५८–६० लक्ष रुपये होईल. त्याची व्यवस्था कशी करावी या संबंधानें प्रांतानिहाय अधिकारी बोलावून त्यांची परिषद भरून तींत चर्चा झाली त्याअन्वयें सर भूपेंद्रनाथ मित्र यांनीं कांहीं ठराव तयार करून ते असेंब्लीपुढें मांडले. हे पैसे एकत्र हिशेबी जमा धरून प्रांतानिहाय झालेल्या उत्पन्नाची रक्कम वांटून देण्याकरितां व त्यांतून प्रांतानिहाय होणाऱ्या नव्या

मोटारोपयोगी रस्त्यांचीं कामें मंजूर करण्याकरितां एक फायनॅन्स कमिटीसारखी कमिटी नेमली गेली. तिचे अधिकार काय असावे याविषयीं प्रांतिक सरकारांचें म्हणणें असें कीं, वरिष्ठ सरकारनें कायदा केला. परंतु उत्पन्न झालें तें प्रांतानिहायच्या लोकांनीं पेट्रोल टॅक्स सोसून मिळवून दिलें. तेव्हां रस्त्यांचीं कामें कोणतीं आधीं करावीं किंवा कोणतीं मग करावीं याची अखत्यारी आम्हांसच पाहिजे. रस्त्याच्या कामाखेरीज इतर कोणीकडे आम्ही पैशाचा उपयोग करतों कीं, काय इतकेंच रोड-फायनॅन्स कमिटीनें पाहावें. या ठरावावर जयकर व केळकर यांच्या उपसूचनाहि होत्या व थोडीबहुत चर्चा होऊन मूळ ठराव थोड्या फरकानें मंजूर झाला.

* * *

गुरुवारीं हाजी यांचें बिल वादग्रस्त व महत्त्वाचें म्हणून त्याकडे सर्वांचे डोळे लागले होते. बिलावरील सिलेक्ट कमिटीचा रिपोर्ट विचारांत न घेतां तें लांबणीवर टाकण्याची उपसूचना सर जॉर्ज रेनी यांनीं दिली होती. पण लॉर्ड आयर्विन आल्यावर खासगी परिषद भरवून या अवघड प्रश्नाचा विचार करण्याकरितां बिल लांबणीवर टाकावें असा सर जॉर्ज रेनी व बॅ. हाजी यांच्यांत पत्रव्यवहार झाला असल्यामुळें अध्यक्षांच्या सूचनेवरून बॅ. हाजी यांनीं बिल लांबणीवर टाकण्याचें कबूल केलें. इतकें काम झाल्यावर इतर खासगी बिलें प्रविष्ट करण्यांत आलीं. तीं करणारांचीं नांवें व बिलांचे विषय खालीं दिले आहेत. ( १ ) हरविलास सारदा–हिंदु-विधवांना नवऱ्याच्या मिळकतींत कांहीं ठराविक अंश मिळण्याबाबत; (२) मुक्तारसिंग–आर्यसमाजिस्ट लोकांतील विषम विवाह कायदेशीर ठरविण्याबाबत; ( ३ ) कुमारसिंह–गुरें-जनावरें यांच्या संरक्षणाबाबत; ( ४ ) बी. दास–इंपीरियल बँकेच्या कायद्यांत सुधारणा करण्याबाबत; ( ५ ) रा. मुकुंदराव जयकर–१ हिंदूंतील दत्तविधानासंबंधीं हल्लीं असलेलीं कांहीं बंधनें दूर करण्याबाबत, २ हिंदूंचें विद्यार्जित धन हें त्यांची खास मिळकत मानली जावी याबाबत ;( ६ ) गयाप्रसादसिंह–पिनल कोडांतून फाशीची शिक्षा काढून टाकण्याबाबत; ( ७ ) मिस्टर जोगिया–हिंदु स्त्रियांच्या वारसाईच्या हक्कांत कांहीं सुधारणा करण्याबाबत; ( ८ ) गझनवी–१९१३ च्या मुसलमानी वकफ मिळकतींच्या कायद्यांत सुधारणा करण्याबाबत; ( ९ ) पं. मालवीय–बनारस हिंदु–युनिव्हर्सिटीच्या कायद्यांत सुधारणा करण्याबाबत, ( १० ) मुकुंदराव जयकर–१८७२ च्या विशिष्ट विवाहाच्या कायद्यांत दुरुस्ती करण्याबाबत इ. इ. इ.

* * *

यानंतर पूर्व–आफ्रिकेंतील हिंदी लोकांच्या प्रश्नासंबंधानें तहकुबीची सूचना घेण्याचा आग्रह दिवाण चमनलाल यांनीं धरला. त्यावर अध्यक्षांनीं बरीच वाटाघाट केली. अखेरीस के. सी. रॉय यांच्या उपसूचनेवरच पूर्व-आफ्रिकेसंबंधीं वादविवाद व्हावा असें ठरून चमनलाल यांनीं तहकुबीची सूचना मागें घेतली. सर जॉर्ज शूस्टर यांनीं पूर्व-आफ्रिकेसंबंधाच्या जादा खर्चासाठीं मंजुरी मागितली. तिला विरोध करून के. सी. रॉय यांनीं पूर्व-आफ्रिकेंतील हिंदी लोकांच्या मागण्यांचा प्रश्न उपस्थित केला आणि त्यावर बराच कडाक्याचा वादविवाद झाला. ना. शास्त्री यांचा दौरा सर्वथैव निष्फळ झाला आणि संयुक्त मतदारसंघाची मागणी हिंदुस्थान सरकारनें केव्हांहि सोडतां कामा नये हे रॉय यांच्या भाषणांत मुख्य मुद्दे होते. सर पुरुषोत्तमदास ठाकुरदास, पं. मदनमोहन, दिवाण चमनलाल यांचीं रॉयच्या अनुकूल अशीं भाषणें झालीं. सरकारतर्फें सर जॉर्ज शूस्टर व सर फजली हुसेन यांचीं भाषणें होऊन रॉय यांनीं आपली उपसूचना परत घेतली, आणि शूस्टर यांनीं मागितलेली रक्कम मंजूर होऊन असेंब्लीची बैठक बिनमुदत तहकूब झाली.

---

# माझा सरहद्दीकडील दौरा

## (१९२९)

## [ १ ] प्रस्तावना

यंदा आम्ही लेजिस्लेटिव्ह असेंब्लीचे पुढील सभासद म्हणजे १ पं. मोतिलाल नेहरू, २ श्रीनिवास अय्यंगार, ३ इस्माइलखान, ४ डॉ. मुंजे, ५ न. चिं. केळकर, ६ हृदयनाथ कुंझरू, ७ ना. म. जोशी, ८ मि. आर्थर मूर, ९ सर अबदुल कयूम, १० किडवाई इ. सरकारी निमंत्रणावरून वायव्य सरहद्दीचा प्रांत पाहावयास गेलों होतों. आमच्या दौऱ्याची हकीकत 'असोसिएटेड प्रेस'च्या बातमीदारानें मधून मधून प्रसिद्ध केली ती वाचून, आम्ही परत आल्यावर, निरनिराळ्या लोकांनीं निरनिराळे प्रश्न आम्हांला केले. त्यावरून असें दिसून आलें कीं, या प्रांताची माहिती समजावून घेण्याची इच्छा जशी आम्हांला झाली तशीच इतरांनाहि ती झालेली आहे. याकरितां ती माहिती थोडक्यांत एकत्र करून वाचकवर्गाकरितां खालीं देत आहें. कोणतीहि गोष्ट प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहणें व तिची माहिती

कानांनीं ऐकणें यांत अर्थात् पुष्कळच अंतर असतें. तथापि प्रत्यक्ष परिचयाच्या अभावीं ऐकीव माहिती ही दुधाची तहान भागविणारें ताक तरी खरें!

## पूर्वपरंपरा

सरहद्दीवरील हा दौरा सरकारी निमंत्रणावरून निघाला व या दौऱ्यांत पाहुण्यांची व्यवस्था सरकारनें ठेवली या गोष्टीवरून कित्येक लोकांची भलतीच कांहीं कल्पना झालेली आढळली. परंतु या दौऱ्याचा जो वृत्तांत खालीं दिला आहे तो लक्षांत घेतला असतां, सरकारनें निमंत्रण देणें व दौऱ्याची व्यवस्था ठेवणें या गोष्टी अगदीं स्वाभाविक होत्या असेंच कोणासहि दिसून येईल. निमंत्रण सरकारी होतें यामुळें प्रवासखर्च सरकारी होता, व जेवणखाण्याच्या वेळचा मुक्काम प्रवासांत जेथें पडला तेथें जेवणखाण मिळण्याची व्यवस्था सरकारनें केली होती. यापलीकडे या दौऱ्यांतील लोकांकरितां सरकारनें विशेष कांहीं केलें नाहीं. कामानिमित्त बोलावलेल्या गृहस्थाला सामान्यपणें जो पाहुणचार दाखवावयाचा त्यापलीकडे या शिष्टाचारांत कांहीं एक अधिक नव्हतें, आणि म्हणून असेंब्लींतील सर्व पक्षांचे प्रतिनिधी या दौऱ्यांत सामील झाले होते.

वरिष्ठ कायदेकौन्सिलाची सुधारणा १९२० सालीं झाली, तेव्हांपासून एक प्रश्न कायदेमंडळापुढें वरचेवर येत असतो, तो वायव्यसरहद्दीकडील प्रांताला सुधारणा द्याव्या कीं न द्याव्या याविषयीं होय. कांहीं वर्षांपूर्वीं सर शिवस्वामी अय्यर यांनीं लष्करी खर्चाच्या दृष्टीनें या प्रांतांतील व्यवस्था स्वतः डोळ्यांनीं पाहण्याची इच्छा दर्शविल्यावरून त्यांना सरकारनें या प्रांतांत हिंडून येण्याची सोय अशीच करून दिली होती. १९२२ सालीं या सुधारणासंबंधानें प्रत्यक्ष एक कमिटी चौकशीकरितां नेमली गेली. तींत दि. ब. टी. रंगाचारिअर व कै. नामदार समर्थ हे सभासद असून, प्रांतांतील लोकांचें म्हणणें समजून घेण्याकरितां त्या कमिटीनें असाच एक दौरा काढला होता. यानंतर आणखी एकदां कायदेमंडळाच्या कांहीं सभासदांची एक पार्टी रेल्वेच्या दृष्टीनें हा प्रांत पाहून आली. त्याचीहि व्यवस्था सरकारनेंच ठेवली होती. हल्लींच्या असेंब्लींतील लोकांना दोन वर्षांपूर्वीं सरकारनें मुद्दाम असेंच निमंत्रण दिलें होतें, परंतु आयत्या वेळीं दौऱ्याची व्यवस्था करतां आली नाहीं म्हणून तो बेत तसाच राहिला. तेंच निमंत्रण पुन्हा यंदा देण्यांत आलें व स्वीकारण्यांत आलें, अशी ह्या दौऱ्याची पूर्वपीठिका आहे आणि पुढल्या वर्षीं किंवा त्याच्या पुढल्या वर्षीं

फिरून असाच एखादा दौरा इतर कांहीं सभासदांकरितां काढण्यांत येईल अशीहि माझी कल्पना आहे.

## वादाचे प्रश्न

सरहद्दीच्या प्रांतांतील व्यवस्था– विशेषतः लष्करी खात्याची व्यवस्था— हा कायदेमंडळांत नेहमींचा एक मोठा वादग्रस्त विषय होऊन राहिलेला असतो; व सरकारी अठरा कारखान्यांतील एक कारखाना या दृष्टीनें तेथें काय चालतें तें पाहणें हें या विषयाची चर्चा करण्याला उपयुक्त असतें. हल्लींचा दौरा निघण्यापूर्वीं सुमारें पंधराच दिवस असेंब्लीमध्यें या प्रांतांतील सुधारणांविषयीं बराच वाद झाला होता. आणि असल्या वादांत केव्हांहि पाहावें तेव्हां अशा कांहीं अपरिचित गोष्टी कानावर येत असतात कीं, प्रत्यक्ष वस्तुस्थिति पाहिल्याशिवाय त्याची कल्पना कोणालाहि येणें शक्य नाहीं. वायव्य सरहद्दीच्या प्रांताची ठेवण, तेथील लोकसमाज, तेथील सरकारी राज्यकारभाराची रीत यांचा नमुना हिंदुस्थानांत इतर कोठेंच पाहावयास सांपडणार नाहीं. म्हणून त्या नमुन्याची खरी कल्पना येण्याला तो प्रत्यक्षच पाहिला पाहिजे. वास्तविक वायव्य सरहद्द ही गोष्ट जुनीच आहे. फक्त सरहद्दीचा प्रांत ही गोष्ट नवी म्हणजे १९०१ सालापासून अस्तित्वांत आलेली आहे. पण 'प्रांत' हें नांव दिल्यानें हा मुलूख व त्यांतील कारभार इतर प्रांतांसारखा असेल अशी जी कल्पना होते ती मात्र खरी नाहीं. या प्रांतांतील बराचसा भाग १९०१ सालपूर्वीं पंजाबांत मोडत होता, आणि तेथील कारभार तेव्हां मामुली प्रांतिक कारभारासारखा चाले. पण १९०१ सालीं लॉर्ड कर्झन यांनीं हा प्रांत वेगळा करून कमिशनरी अमलाखालीं दिला. यामुळें त्यांतील कारभाराच्या स्वरूपांत गुंतागुंत झाली.

## सरहद्दीचा बाऊ

पण ज्या सरहद्दीच्या कारणामुळें हा प्रांत वेगळा बनविण्यांत आला त्या सरहद्दीविषयीं प्रथम दोन शब्द लिहितों. हिंदुस्थानचा राज्यकारभार हा शब्द उच्चारला कीं प्रथम सरकारी लष्कर व त्यावरील प्रचंड खर्च ही गोष्ट लक्षांत येते. आणि हें लष्कर व हा खर्च ह्यांचा किंचित् खोल विचार करूं लागतांच सरकारी कागदपत्रांतून सरहद्दीचा 'बाऊ' डोळ्यांपुढें उभा करण्यांत येतो. आणि असें झालें म्हणजे निःसंदेह युक्तिवाद आपोआप थांबतो. आपल्या जुन्या पद्धतीच्या घरांतून एखादें अंधारें अंबार, भुयार अगर बळद असतें. लहान मुलांना भीति

दाखवावयाची झाली असतां त्या बळदाचा उपयोग हटकून करण्यांत येतो; व त्या बळदाची भीतिहि लहान मुलांच्या मनानें इतकी घेतलेली असते कीं, त्यांना प्रत्यक्ष उचलून बळदापाशीं न नेतां त्याच्या नुसत्या नांवाचा उच्चार केला तरी मुलांना भिवविण्याचें कार्य होतें. हिंदुस्थान सरकारचे मुत्सुद्दी व लष्करी अंमलदार या वायव्य सरहद्दीचा उपयोग या जुन्या घरांतील अंधाऱ्या बळदासारखाच करीत असतात. सरहद्दीचें नांव घेतलें म्हणजे सरकारला शंभर खून माफ! आणि 'खून' याचा अर्थ वाटेल ती अरेरावी, जुलमी व्यवस्था, वाटेल तो खर्च असा केवळ लाक्षणिक नव्हे, तर खून हा शब्द वाच्यार्थानेंहि लावतां येईल. कारण सरहद्दीवर एखादें कांहीं कुसपट निघालें कीं, त्याचा फायदा घेऊन हिंदी फौज सरहद्दीवरील स्वतंत्र लोकांच्या मुलखांत धिंगाणा घालते, व या धिंगाण्यांत किती तरी निर्दोषी लोक प्राणांला मुकत असतील याची कल्पना सुज्ञ मनुष्याला सहज करतां येते. आज कमींत कमीं ६० वर्षें वायव्य सरहद्दीचें नांव घेऊन सरकारनें राजकारण व लष्करी खर्च झुलविला आहे. सरहद्दीवरील बाऊ सरहद्दींत राहणारा नसून त्यांच्या पलीकडे राहणारा आहे आणि तो 'बाऊ' म्हणजे अफगाणिस्थान व रशिया हा होय. आतां रशिया व अफगाणिस्थान यांच्या स्वाऱ्यांची भीति खरी मानली तरी त्या स्वाऱ्या परतविण्याचा सरकारी योजनेंतील जो एक मार्ग तोच अर्थात् प्रजेला संमत होण्यासारखा नाहीं. तथापि या सरहद्दीला सरकार जें महत्त्व देतें तें कांहीं अंशीं सकारण आहे ही गोष्टदेखील दुसरे पक्षीं कोणासहि प्रांजलपणें कबूल करावी लागेल. कारण हिंदुस्थानवर आजपर्यंत ज्या स्वाऱ्या झाल्या त्या फक्त या एका दिशेनेंच झाल्या. हिंदुस्थानला तीन दिशांनीं समुद्राचा वेढा आहे आणि हिंदुस्थान परतंत्र होण्यापूर्वी हिंदुस्थानावर ज्या स्वाऱ्या शेवटीं शेवटीं झाल्या त्या जलमार्गानीं झाल्या पण इंग्रज सरकारचें राज्य हिंदुस्थानांत स्थापित झाल्यापासून, त्यांच्या आरमारी सामर्थ्यामुळें, जलमार्गानें कोणी शत्रु स्वारी करील अशी भीति बाळगण्याचें कारण उरलें नाहीं. महायुद्धांत एका 'एमडेन' नामक लढाऊ जहाजानें काय गोंधळ केला हें विदितच आहे. परंतु एखादा दरोडा, चांचे लोकांचा हल्ला, किंवा छापा अशाच स्वरूपाचा 'एमडेन'चा पराक्रम होता. ती कांहीं शत्रूची स्वारी नव्हे. परंतु आज आरमारी सामर्थ्यांत इंग्लंड जरी कोणाला हार जाण्यासारखें नसलें तरी, इतर लष्करी सामर्थ्याची गोष्ट तशी नाहीं हेंहि महायुद्धांत दिसून आलें. ज्या रशियाची इंग्रजांना भीति त्यानें आजवर सरहद्द

ओलांडली व प्रत्यक्ष स्वारी केली असें घडलेलें नाहीं. पण अफगाणच्या अमीरानें अवघ्या नऊ वर्षांपूर्वी, म्हणजे १९१९ सालीं, हिंदुस्थानावर स्वारी केली ही गोष्ट फारशी लोकप्रसिद्ध नसली तरी अगदीं खरी आहे. शिवाय जुना इतिहास पहिला तरी, तुर्क, मोगल, इराणी राजे व त्यांच्यापूर्वी ग्रीक राजा अलेक्झांडर हे सर्व या वायव्य सरहद्दीच्या घाटांतूनच आपलें सैन्य घेऊन हिंदुस्थानांत उतरले ही गोष्ट कांहीं खोटी नाहीं. उलटपक्षीं या सरहद्दीकडील मुलुखाशीं हिंदुस्थानचा संबंधहि तसाच निकडीचा होता. कारण अफगाणिस्थान हा पूर्वी मोगल बादशहाचा एक प्रांत असून, पुढें शीख राजे झाले तेव्हां तो प्रांत त्यांनीं आपल्या अंमलाखालीं ठेवला होता. दिसण्यांत फरक इतकाच कीं, पूर्वी या सरहद्दीकडची भीति होती तरी ती दुतर्फी म्हणजे दोहोंकडील राजांना सारखीच होती, व आजच्या घटकेला इंग्रजांचें राज्य सरहद्दीपलीकडे नसल्यानें ती भीति फक्त एकतर्फी म्हणजे इंग्रजांपुरतीच राहिलेली आहे. कोणी असें सांगतात कीं कांहीं वर्षांपूर्वी मध्य-आशिया खंडांत हिंदुस्थानांतील साम्राज्यासारखें व त्याच्याच जोडीला दुसरें एखादें बादशाही साम्राज्य स्थापावें असा इंग्रज सरकारचा विचार होता. आणि तसें घडतें तर या सरहद्दीच्या उत्तरेकडून दक्षिणेकडे 'अतिक्रमण' होण्याऐवजीं दक्षिणेकडून उत्तरेकडेच तें झालें असतें. पण रशियांतील राज्यक्रांति, तुर्कस्थानचा पुनर्जन्म व जर्मनीची महत्त्वाकांक्षा यांमुळें, हिंदुस्थानच्या बरोबरीचें मध्य आशिया खंडांत दुसरें बादशाही साम्राज्य स्थापण्याचे इंग्रजांचे मनोरथ पुरे ढासळले; व यामुळें सरहद्दीच्या नांवानें कांगावा करण्याचें काम तूर्त इंग्रजांकडेच आलें आहे ! हिंदुस्थानवर यदाकदाचित् होणाऱ्या स्वारीला प्रतिबंध करावयाचा तो लष्करी दृष्ट्या खरोखर कोठें नीट करितां येईल, सरहद्दीचा बचाव करणें तो कोठें करावा, या प्रश्नांवर कांहीं दिवसांपूर्वी खुद्द इंग्रज लष्करी अधिकाऱ्यांमध्येंच दुमत होतें. एक मत असें कीं, सिंधु नदी हीच पूर्वीप्रमाणें हल्लींहि हिंदुस्थानची खरी सरहद्द समजली जावी. या नदीवरच पूर्वी हिंदुस्थानांतील राजांनीं परकीयांशीं लढाया मारल्या. हिंदी लष्करी व्यवस्थेंतील शेवटचें ठाणें सिंधु नदीवर अटक येथें असे असें मानण्याची जुनी परंपराच होती. म्हणून आजहि सिंधु नदी हीच सरहद्द मानावी व तिच्या पलीकडे २५०-३०० मैल जाऊन नसत्या भानगडींत पडणें योग्य नव्हे असें मत कित्येक इंग्रजी लष्करी अधिकाऱ्यांनींच लिहून ठेवलेलें आढळतें. परंतु इंग्रजी राज्यांत पुढें पाऊल टाकू

म्हणाऱ्या उपद्व्यापी मुत्सद्द्यांचाच जय व बोलबाला नेहमीं आढळतो. त्याप्रमाणें सिंधु नदी ही सरहद्द मानण्याचें मत बाजूला पडून ती सरहद्द अफगाणिस्थानच्या सरहद्दीला नेऊन भिडविण्याचें धोरण अखेर: प्रभावी झालें. आतां तें यशस्वी होणार कीं नाहीं तें काळानेंच ठरेल. स्वयंपाकाची परीक्षा भोजनानें व्हावयाची. पण तूर्त तरी अतिक्रमणाच्या किंवा निदान आक्रमणाच्या धोरणानें आम्ही हिंदुस्थान निर्भय केलें असें इंग्रज सरकार म्हणत आहे खरें!

## [ २ ] प्रवासवृत्त

असो. सरहद्दीसंबंधानें राजकारणी विषयाचा उल्लेख करण्यापूर्वीं थोडेंसें प्रवासवृत्त देतों. सरहद्दीच्या प्रांतांतील आमचा हा दौरा सुमारें एक आठवडा चालू होता. त्याचा खरा प्रारंभ ता. ३० मार्च रोजीं एन्. डब्ल्यू. आर. वरील सिंधु नदीच्या कांठालगत असलेल्या दर्याखान स्टेशनापासून झाला. आदल्या दिवशीं आम्ही पंजाबच्या सुपीक प्रदेशांतून प्रवास करीत होतों. विशेषतः कॅंबेलपूरचा देखावा झोंपेंतहि आमच्या डोळ्यांपुढें होता. हें शहर अगदीं नवें कोरें, स्वच्छ, टुमदार व रेखीव इमारतींचें असून त्याच्या आसपास शोभाहि चांगली आहे. परंतु दुसरे दिवशीं सकाळीं उठून पाहतों तों आम्ही सिंधु नदीकांठच्या एका वाळवंटांतून प्रवास करीत होतों. या रेताड मुलखांत शपथेलाहि झाडझुडूप दृष्टीस पडत नाहीं. आगगाडीच्या रुळांना भराव घालावा लागत नाहीं व घालून उपयोगाचाहि नाहीं. कारण जोराच्या वाऱ्यानें वाळूचे ढीग आज येथें उद्यां तेथें असे जमतात व क्वचित् सडकहि बदलावी लागते. सरहद्दीच्या रूक्षपणाचा मासला येथें प्रथम पाहावयास सांपडला. पण सरहद्दीची दुसरीहि एक खूण दृष्टीस पडूं लागली, ती लूटमारीच्या भीतीची. कारण ह्या बाजूचीं रेल्वेचीं स्टेशनें किल्ल्यासारखीं बांधलेलीं आढळलीं. सगळ्या स्टेशनला चौफेर भिंत! जाण्यायेण्यास फक्त एकच मोकळें द्वार. सर्व इमारतींचें रक्षण करण्याला एका बाजूस उंच चढविलेला बुरूज व त्यांतून खालीं पाहून बंदुकी रोखून गोळ्या झाडण्याकरितां ठेवलेलीं गवाक्षें. दरवडेखोरांची चाहूल बुरुजावर लागतांच इमारतींचें दार बंद करून राहावयाचें. आंतील मनुष्य आंत व बाहेरचा बाहेर असें व्हावयाचें आणि उतारू, स्टेशनचे अधिकारी या सर्वांनीं मिळून बुरुजावरून व इमारतींतून बाहेरच्या लोकांचा हल्ला परतवून पोलीस मदत येईपर्यंत आपलें रक्षण करावयाचें. ही योजना कोणीहि न सांगतां स्टेशन इमारतीच्या नुसत्या आकारावरूनच कोणाच्याहि लक्षांत येते. दर्याखान

येथें सरकारी मोटारी तयारच होत्या. त्यांत बसून आम्ही १४ मैल प्रवास करून डेरा इस्माइलखान येथें गेलों. वाटेंत सिंधु नदीचे दोनतीन फाटे उतरावे लागले; पण आम्ही गेलों त्या दिवशीं नदीला पूर नसल्यामुळें नावांच्या तरत्या पुलावरून मोटारी नेतां आल्या. दोनच दिवस आधीं जातों तर हे पूल उपयोगी न पडतां आम्हांला वाफेच्या बोटींत मोटारी घालून १०–१५ मिनिटांऐवजीं ३-४ तासांचा प्रवास करावा लागला असता. सिंधुनदीला पावसाळ्यांत पूर केव्हांच येत नाहीं. येतो तो उन्हाळ्यांतच येतो. याचें कारण असें कीं, या बाजूला पाऊस वर्षांतून १०-५ इंचच पडतो व नदीचें पात्र (प्रत्यक्ष प्रवाह नव्हे) दोनतीन मैल रुंद असल्याकारणानें पावसाचें पाणी कोठेंच्या कोठेंच निघून जातें. पण मूळ उगमाचा ठिकाणा व वाटेंत बर्फ वितळून त्याच्या पाण्याच्या लोंढ्याची भरती होते त्या वेळीं पूर येतो. आणि केव्हां केव्हां तो इतका मोठा येतो कीं सबंध २-३ मैल पात्राचा एकच प्रवाह बनतो. सिंधु नदीच्या पाण्याला वेग बराच असतो, आणि पूर आला म्हणजे नदीवरील वाहतुकींत धोका उत्पन्न होतो. पूर नसेल तेव्हां नावेला नाव भिडवून जोडून घेऊन पूल तयार करतात त्यावर मोठमोठीं आडवीं लाकडें टाकून वर जाड तक्ते पसरून देतात. त्यावरून घोड्यांच्या टापासारखा खाडखाड आवाज करीत मोटारी जात येत असतात. पूर नसेल तेव्हां नदीच्या पात्रांतच लोक अनेक प्रकारची शेती करितात. मात्र हे लोक नदीच्या विश्वासघाताला मनानें सदैव तयार असतात. अवाचित् पाणी आलें म्हणजे शेती व शेताबरोबर जुजबी घरदार सगळेंच्या सगळें वाहून जातें. तथापि उत्तरेस अटकेच्या सुमारास पुराची वर्दी प्रथम लागते व तेथून त्याच्या वाहतुकीला कोठें १२ तास तर कोठें २४ तास इतका अवधि लागत असल्यामुळें शक्य तेथवर खेड्यापाड्यांना तारेनें आगाऊ बातमी देण्याची व्यवस्था करतात. त्यामुळें सहसा फारशी हानि होत नाहीं. सिंधु नदीला मळलेल्या वाटांचें मोठें वावडें दिसतें. कारण प्रतिवर्षी ती आपला मार्ग नवा नवा आंखून घेत असते. यामुळें आज हजारों वर्षांत मिळून तिनें शेंकडों मैल रुंदीच्या पट्ट्यांवर लोळण घेऊन बहुतेक मुलूख वालुकामय करून टाकला आहे. पण त्यामुळें हा प्रदेश अधिक सुपीकहि झाला आहे. असो.

आपल्या इतिहास-पुराण-प्रसिद्ध महानद्यांचें प्रथमदर्शन मोठें कुतूहलकारक असतें. या नद्यांचीं जुनीं वर्णनें वाचून ज्या कल्पना मनांत भरलेल्या असतात त्या त्यांच्या स्वरूपदर्शनानें केव्हां केव्हां निष्फळ ठरतात. परंतु पवित्रपणा व

ऐतिहासिक महत्त्व यांच्या कल्पना दृढच असतात. सुमारें २३ वर्षांपूर्वी दारा-गंज येथील एका घरांतील माडीवर चढून मीं गंगा नदीचें प्रथमदर्शन घेतलें. पण पाहतों तों चौफेर वाळवंट व दूरच्या दूर पसरलेला प्रवाह यामुळें वाल्मीकिकृत गंगास्तोत्रावरून गंगा नदीविषयीं जी माझी कल्पना झालेली होती ती कोणीकडच्या कोणीकडेसच गेली. 'एतत्तालतमालसालसरल' इत्यादि गंगा-कांठच्या वनश्रीचें वर्णन कोणीकडे व ज्यांत गवताची एक काडीहि उगव-लेली नाहीं असें रूक्ष वाळवंट कोणीकडे ? पण मग विचार करूं लागतांच माझी चूक मला कळून आली. कारण गंगास्तोत्र रचणारानें तिच्या उगमा-जवळचे पर्वत व वनश्री पाहून हें वर्णन केलें. माझ्यासारखा आगगाडीनें प्रवास करून प्रयागजवळील मैदानी गंगेचें केलेलें तें वर्णन नाहीं. ही माझी समजूत पुढें मी हरिद्वारला गेलों तेव्हां अधिक पटली. कारण तेथून पलीकडे डेहराडूनलगत हिमालयाच्या टेकड्यांना व वनश्रीला सुरुवात होते. सिंधु नदी-च्या कांठच्या 'वनश्री'चें वर्णन मीं पूर्वी कधीं वाचलें नव्हतें. किंबहुना सिंध प्रांतांतील सिंधूचें रूक्ष वर्णन परिचित असल्यामुळें सिंधु नदीच्या प्रथम दर्शनानें माझी फारशी निराशा झाली असें म्हणवत नाहीं. तथापि गंगा, सिंधु अशा नद्यांविषयीं त्या पाहण्यापूर्वी ज्या कांहीं कल्पना असतात त्या प्रत्यक्ष दर्शनप्रसंगीं अनुभवाला येत नाहींत इतकी गोष्ट खरी. पूर्वी गोल्डन ट्रेझरींत वर्डस्वर्थ कवीची एक कविता वाचलेली स्मरते. एका कवितेंत त्यानें 'यारो' नदी पाहण्यापूर्वी मनानें तिचें कौतुकास्पद वर्णन केलें आहे. पण ती प्रत्यक्ष पाहिल्यावर तो लिहितो, "Is this Yarrow, this the stream of which my memory has cherished such a fond dream ?" पण गंगा व सिंधु यांना अनुकूल अशीहि एक गोष्ट सांगितली पाहिजे. या नद्या पाहणाराच्या मनांत त्यांच्या विस्ताराची मूळ कल्पना फारच संकुचित असते व प्रत्यक्ष दर्शन झाल्यावर आपलें मन किती क्षुद्र असेंच त्याला वाटूं लागतें. डेरा इस्माइलखानजवळ सिंधूचें पात्र ऐन उन्हाळ्यांत पूर आला म्हणजे ११ पासून १३ मैल रुंद होतें असें सांगतात ! म्हणजे दर्याखान स्टेशनपासून डेरा इस्माइलखान स्टेशनपर्यंत जवळ जवळ सर्व पाणीच असतें. ज्यांना समुद्र पाहण्याचा प्रसंग नाहीं अशा या प्रांतांतील लोकांकरितां ईश्वरानें ही सोयच केली म्हणावयाची. असो. आम्ही दिल्लीहून थेट पेशावरला गेलों असतों म्हणजे वाटेंत अटकेजवळ सिंधु नदी

उतरलों असतों. पण त्याच्या अलीकडे कँबेलपूर येथें गाडी बदलल्यामुळें इतिहासप्रसिद्ध अटकेचा किल्ला व तेथें थोडी संकोच पावणारी सिंधु नदी पाहावयास सांपडली नाहीं. मात्र परत येतांना रात्रींच्या वेळीं अटकेच्या पुलावरून आम्ही परत आलों. अटकेजवळ सिंधु नदी दृष्टीस पडावी या इच्छेचें कारण मराठ्यांच्या इतिहासाचें ज्ञान हें सांगावयास नकोच.

डेराइस्माइलखान येथें आमच्या पार्टीपैकीं मांसाहारी व शाकाहारी लोक यांची वेगवेगळ्या ठिकाणीं उतरण्याची सोय केली होती. त्याप्रमाणें मी शहरांतील रा. ब. रुचिराम यांच्या घरीं उरलों होतों. इतर लोक कोणी सर्किट हाउसमध्यें, कोणी मुशाफरखान्यांत उतरले होते. परराष्ट्रीय खात्याचे अधिकारी मेजर गेजफर्ड यांनीं येथें आमची रजा घेतली व मेजर पार्सन्स व कर्नल ब्रूस यांच्या स्वाधीन आम्हा लोकांना केलें. पण आम्ही जितके सरकारचे पाहुणे तितकेच लोकांचेहि होतो. यामुळें सरकारनें जशी आमची व्यवस्था ठेवली तशी–किंबहुना त्याहीपेक्षां जास्त–गांवच्या लोकांनीं ठेवली. शहरच्या अलीकडे एक मैल-दीड मैलपर्यंत लोकांचे थवेच्या थवे सत्काराला आले होते. दुतर्फा निशाणें लावलीं होतीं. हिंदु-मुसलमान स्वयंसेवक सिद्ध होते आणि सरहद्दीच्या प्रांतांतील जुलुमाविरुद्ध तक्रारींचीं छापील हस्तपत्रकें फुलांबरोबर आमच्या मोटारींत येऊन पडत होतीं. संध्याकाळीं रायबहादुर रुचिराम यांनीं आपल्या घरीं विजेची रोषनाई केली होती. संध्याकाळीं शहराबाहेर मैदानांत ७–८ हजार लोकांची जाहीर सभा भरली होती. कमिशनर व लष्करी अमलानें या प्रांतांतील लोकांवर नेहमीं मोठी कदर असते. यामुळें राजकारणाची चळवळ फारच कमी. पण खुद्द असेंब्लीचे लोकनियुक्त सभासद दौऱ्यावर आल्यामुळें येथील लोकांना एक वेळ तरी रान मोकळें झालें व उजळ माथ्यानें त्यांनीं चळवळीची हौस एक दिवसभर फेडून घेतली! डेराइस्मालखान येथें मुसलमानांपेक्षां हिंदु लोकांचीच वसति अधिक आहे. या प्रांतांतील हें एक मोठें शहर व सरकारी सर्व खातीं येथें चालतात. तथापि सरहद्दीच्या खऱ्या स्वरूपाची खूण या छापील हस्तपत्रकांत जशी मिळाली तशी दुसऱ्या बाजूनें, शहराभोंवतीं घातलेल्या तटबंदीच्या भिंतीनें व त्यापलीकडील कांटेरी तारांच्या कुंपणानेंहि मिळाली. इकडील भागांत शांततेंत दिवस काढणाऱ्या लोकांना तिकडची कल्पना येणें कठीण. समजा, पुणें शहराच्याभोंवतीं तटबंदी व बुरूज आहेत

व त्याच्या पलीकडे कांटेरी तारांचीं कुंपणें असून रात्रीं ७-८ वाजल्यापासून नाकेबंदी होते. वेशीचे दरवाजे लावले जातात व आंत बाहेर येणारा-जाणारा माणूस पारखूनच सोडला जातो, अशी वाचकांनीं कल्पना केल्यास सरहद्दीच्या प्रांतांतील परिस्थितीचें स्वरूप लक्षांत येईल.

तारीख ३१ मार्च रोजीं सकाळीं आम्ही पुढें निघालों: ते टांक नांवाच्या ठाण्यावरून प्रथम जांडोला येथें गेलों. टांकपर्यंतचा मुलूख सपाट मैदानावर असून ओसाड आहे. टांक हें एक जुन्या नबाबाचें गांव होतें. हल्लीं तेथील नबाबी नांवाची उरली आहे. या गांवापर्यंत ट्रॅम रेल्वेचा रस्ताहि आहे पण तेथून पुढें सर्व पहाडी मुलूख लागतो. जांडोला हें लष्करी ठाणें दोन घाटांमधील सपाट जागेंत वसलेलें आहे. येथील भुइकोट किल्ला पाहण्यासारखा आहे. किंबहुना इकडील सर्व किल्ले भुइकोटासारखे म्हणजे मातीच्या तटबंदीचे आढळतात. डोंगरावर बांधलेल्याहि तटांना, बुरुजांना दगड लावलेले असत नाहींत व चुना सहसा वापरण्यांत येत नाहीं. मातीनेंच सर्व काम भागतें. 'जांडोला' किल्ला कांहीं थोड्या वर्षांपूर्वींच लढवावा लागला होता. तिसऱ्या प्रहराचा उपाहार झाल्यानंतर आम्ही एक उंच घाट चढून रझमक येथें पोंहोचलों. रझमक हें ठाणें सुमारें ७–८ हजार फूट उंचीचें पण एका मोठ्या मैदानांत वसलेलें आहे. येथें सुमारें १०,००० सैन्य ठेवण्याची व्यवस्था असून, हिंदुस्थानांतील हें दुसऱ्या नंबरचें लष्करी ठाणें समजलें जातें. तेथून पेशावरपर्यंतच्या मुलखाची सर्व जबाबदारी या ठाण्यांतील फौजेवर आहे असें म्हणतात. ऐथें एक मोठें स्टेशन हॉस्पिटल असून, कांहीं हिंदी I. M. S. लष्करी डॉक्टर आम्हांला भेटले त्यांत डॉ० दाणी हे एक होते. रझमक येथील हवा या वेळीं इतकी थंड होती कीं, आम्हांला दिल्ली-सिमल्याची आठवण झाली. आणि आमच्या पाहुणचारांत पहिलें कलम शेगड्या पेटवून ठेवण्याचें होतें असें दिसलें. रझमक येथें वरची व खालची अशा दोन छावण्या होत्या. येथून वझिरिस्थानांतील अफगाणिस्थानच्या सरहद्दीचे बर्फाच्छादित पर्वत दिसतात. जवळच्या डोंगरांच्या मैदानावरहि अजून कोठें कोठें बर्फाचा अवशेष दिसत होता. हवापाणी व मार्‍याची जागा या सर्वांच्या दृष्टीनें येथें लष्करी ठाणें मांडण्यांत आलें आहे. तेथें चौफेर किल्ला नसला तरी चौफेर कांटेरी तारांचें कुंपण होतें, आणि आम्ही संध्याकाळीं फिरावयास बाहेर पडलों तेव्हां ६–६॥ वाजण्याचे आंत आम्हीं परत आलें पाहिजे अशी ताकीद आम्हांला झाली.

रझमक येथें रात्र काढून ता. १ एप्रिलच्या सकाळची न्याहरी झाल्यावर घाट उतरूं लागलों ते दोनप्रहरीं मिरनशहा येथील लष्करी ठाण्याला पोंचलों. रझमक व मिरनशहा येथील घाट फारच निरुंद व पल्लेदार आहेत. मिरनशहाच्या अलीकडे मात्र मैदानी व शेतकीचा मुलूख लागतो. मिरनशहा येथेंहि लहानसा भुईकोट किल्ला आहे आणि हें ठाणें रझमकच्या आधीं बरींच वर्षें वसविलेलें असल्यामुळें तेथें इमारती व बागबगीचे लहान प्रमाणावर पण व्यवस्थित आढळले. मिरनशहा या ठाण्यावरहि १९१९ सालांत हल्ले झाले होते. आम्ही गेलों त्याच दिवशीं रझमक येथील जनरलसाहेबांनीं मिरनशहाच्या मैदानांत दोन दिवसांची खोटी लढाई संपविली होती व चहूं बाजूंला विखुरलेलीं सैन्यें एका मोठ्या मैदानांत जनरलसाहेबांच्या निशाणापाशीं येऊन मिळत होतीं असें आढळलें. सैन्याचा पाठपुरावा करणारीं विमानेंहि वर घिरट्या घालीत होतीं. हा शेवटचा कार्यक्रम पाहण्याकरितां आम्ही मैदानांत गेलों होतों, आणि परत बंगल्यांत आल्यावर जनरलसाहेबांनीं या खोट्या लढाईची हकिकत समजून सांगितली व सरहद्दीच्या प्रांतांतील राज्यव्यवस्थेसंबंधानें आपले विचार प्रकट केले.

दोन प्रहरीं उपाहार घेतल्यावर आम्ही संध्याकाळीं बन्नू येथें पोंचलों. येथेंहि शाकाहारी व मांसाहारी यांची उतरण्याची व्यवस्था वेगवेगळी केली होती. येथेंहि डेराइस्माइलखानप्रमाणें हिंदूंची वसति पुष्कळ आहे. गांवाच्या तोंडीं एका मैलांवर लोकांनीं—हिंदु-मुसलमान दोन्ही जातींच्या लोकांनीं—मिरवणुकीची मोठी तयारी केली होती. चहा वगैरे घेतल्यावर दौऱ्यांतील मंडळी, स्थानिक नागरिकांनीं मानपत्राचा समारंभ सनातनी हायस्कूलच्या इमारतींत ठरविला होता तेथें गेली. हिंदु समाजाचें मानपत्र! तेव्हां पं. नेहरू हजर राहतात कीं नाहीं अशी शंका वाटली, पण ते हजर राहिले. मानपत्रांत हिंदु लोकांनीं या प्रांताला वेगळा ठेवून राजकीय सुधारणा देऊं नयेत, त्यापासून हिंदु लोकांचें नुकसान आहे, असें स्पष्ट लिहिलें होतें; आणि त्याला उत्तर देतांना पंडितजींनीं स्वतःपुरतें असें सांगितलें कीं, राष्ट्रीय सभेचा ठराव मला मान्य असल्याकारणानें माझा व तुमचा या बाबतींत मतभेद आहे. तथापि व्हावयाच्या त्या सर्व गोष्टी विचारानेंच होतील. हिंदु समाजाला उचलून जाणून बुजून मुसलमान समाजाच्या स्वाधीन करूं अशी गोष्ट होणार नाहीं. याहि गांवाला तटबंदी असून सरहद्दीच्या पठाणांचे दरोडे पडतात

म्हणून तारांचें कुंपण घातलेलें आढळलें; व सभेहून परत जातांना वेशीचें दार रात्रीं आठ वाजतां परवानगी घेऊन उघडावें लागलें. गांवाच्याभोंवतीं सडकेवर टेहळणीचा फिरता पहारा असतो व चक्कर सडकेला विजेचे दिवे होते. त्यांचीं तोंडें शहराकडे न करितां उलट्या दिशेला केलीं होतीं! महायुद्धांत कित्येक ठिकाणीं वस्तीच्या भागावर अंधेर मुद्दाम घातला जात असे त्याची आठवण येथें झाली. दुसरे दिवशीं सकाळीं आम्हीं कोहाट येथें गेलों. बन्नूप्रमाणें कोहाट हेंहि जिल्ह्याचें गांव आहे. येथेंहि एक भुईकोट किल्ला आहे, पण तो पाहण्यास आम्ही गेलों नाहीं. कोहाटला बंदोबस्त इतर कोणत्याहि शहराइतका आहे; पण कांहीं थोड्या वर्षांमागें बाहेरच्या पठाणांनीं येऊन एलिससाहेबांच्या बंगल्यावर हल्ला करून त्यांच्या बायकोचा खून केला व मुलीला पळवून नेलें, आणि मोठी खंडणी वसूल केल्यावर तिला परत स्वाधीन केलें. तेव्हां या गोष्टीमुळें खुद्द कोहाटचाच काय पण अनेक ठिकाणचा बंदोबस्त सरकारला वाढवावा लागला. एलिससाहेबांचा बंगला भरवस्तींत असतां हा असला प्रकार करणाऱ्या पठाणांचें धाडस किती याची कल्पना सहज करतां आली. पण त्यांच्या धाडसाला कारण तसेंच घडलें होतें म्हणतात. कोहाटनजीकच्या पठाणांच्या मुलखांतील कांहीं लोकांनीं बंदुका चोरल्याच्या आरोपावरून इंग्रजी फौज जाऊन तिनें हत्यारें शोधण्याच्या निमित्तानें बराच गोंधळ घातला व कांहीं बायकांची अब्रू घेतली म्हणून त्या रागावर बदल्यास बदला घेण्याच्या ईर्षेनें पठाणांनीं मिस् एलिस हिला पळवून नेलें. तिच्या शोधाकरितां सरकारनें पन्नास हजार रुपयांचें बक्षीस लावल्याचें सांगतात व किती खंडणी दिली याचा आंकडा गुप्तच आहे. तथापि आफ्रिडी जातीचे अधिकारी मध्यस्थीला घालून तह झाला तेव्हांच मुलगी हातीं लागली.

दोन प्रहरीं उपाहारानंतर निघून पेशावरला संध्याकाळीं पोंचलों. वाटेंतील घाट बराच मोठा व बिकट होता. घाट उतरून गेल्याबरोबर व गांव लागलें तेथें पठाण लोकांचा बंदुका तयार करण्याचा कारखाना पाहावयास सांपडला. ही हद्द पठाणी मुलखाची असल्यानें, गांवावरून इंग्रजी सडक गेली आहे तरी या बंदुकीच्या कारखान्याला सरकार कांहीं उपसर्ग लावूं शकत नाहीं. कारखाना कांहीं फारसा मोठा नव्हता. एखाद्या मोठ्या लोहाराच्या दुकानाएवढा दिसला. पण पठाण लोकांच्या कामापुरत्या पल्लेदार बंदुकीच्या नळ्या व इतर बंदुकीचे भाग कसे करतात हें पाहावयास सांपडलें. संध्याकाळीं पेशावरच्या

हद्दीवर पुन्हा मोठ्या मिरवणुकीची तयारी होती. ती संपल्यावर तेथील मुख्य हॉटेलमध्यें पाहुण्यांची रवानगी झाली. परंतु पेशावरच्या काँग्रेस कमिटीचे सेक्रेटरी व अध्यक्ष यांनीं येऊन आमच्यापैकीं दोवांतिघांची व्यवस्था शहरचे एक प्रमुख नागरिक मेहरचंद खन्ना यांजकडे केली होती तिकडे मी गेलों.

ता. ३ रोजीं सकाळीं पाहुणेमंडळींना विमानी फौजेच्या तळावर येण्याकरितां निमंत्रण होतें. त्याप्रमाणें आम्ही आठ वाजता तेथें गेलों. हें मैदान अगदीं गांवानजीक आहे. चार छोटीं विमानें पाहुणेमंडळींना फिरवून आणण्याकरतां आधींच बाहेर काढण्यांत आलीं होतीं व या फौजेचे स्थानिक मुख्य अधिकारी येतांच त्यांनीं मंडळींना फिरवून आणण्याचा हुकूम दिला. विमानें युद्धांत उपयोगांत येणारीं होतीं. मात्र बॉंब गोळे वरून फेकण्याची त्यांत सोय नव्हती. जुन्या रथाप्रमाणें एक सारथी व एक रथी असे दोनच बसण्याची त्यांत सोय होती. प्रत्येक पाहुण्याला थंडीकारितां ओव्हरकोट, इंजिनच्या आवाजाचा त्रास होऊं नये म्हणून कानपट्टी, सूर्यप्रकाशाची बाधा होऊं नये म्हणून चष्मा हीं साधनें चढविण्यांत आलीं. विमानें सुमारें २५०० फूट उंचीला चढलीं असावीं. वेग सुमारें ७५ मैलांचा होता. सगळ्या पेशावर शहराभोंवतीं प्रदक्षिणा घालून लष्करी दृष्टया चतुःसीमेस कोठें कोणती महत्त्वाची गोष्ट आहे तें दाखविण्यांत आलें. नंतर दहा वाजतां खायबर घाट पाहण्याला आम्ही निघालों. घाटांत नवी रेलगाडी झाली आहे. परंतु मोटारीनें गेल्यास अधिक जलद जातां येऊन हवें तेथें ठिकठिकाणीं उतरतां येतें व अधिक पहावयास सांपडतें. याकरितां मोटारीनें जाण्याचीच व्यवस्था केली होती. पेशावरपासून प्रथम चार कोसांवर जामरूडचा भुईकोट किल्ला लागतो. हा किल्ला पठाणी मुलखाच्या नाक्यावर आहे. शीख रियासतींतील सुप्रसिद्ध गव्हर्नर व योद्धा हरिसिंग नलवा हा काबूलचा मुख्य अधिकारी असतां त्यानें हा किल्ला बांधला. अखेर हा किल्ला लढवितांना हरिसिंगच पठाणांकडून मारला गेला व त्याची समाधि म्हणून एक लहानशी इमारत किल्ल्याला लागून बाहेर बांधलेली आढळते. यापुढें घाट लागतो व सुमारें निम्मा घाट उतरून गेलें म्हणजे अली मस्जिद हें ठिकाण लागतें. तेथें खरोखरीची एक मशीद आहे, पण तिच्या कीर्तीच्या मानानें अगदींच लहान म्हणजे खरोखर एखाद्या खेडयांतील मशिदीसारखी आहे. मात्र आसपासच्या उंच काळ्या डोंगराच्या दरींत ही पांढरीसफेत इमारत एकदम डोळ्यांत भरते. यापुढें ओळीनें दोन

किल्ले लागतात. पैकीं एक जुना व एक नवा शागाई नांवाचा आहे. जुना किल्ला लुंडीकोटल या नांवाच्या एका लवणांत असून त्याच्या आसपास येवढें मैदान आहे कीं, क्षणभर असें वाटतें कीं, आपण खैबर घाटासारख्या बिकट जागेंत नसून एखाद्या सामान्य उंचसखल मुलखांत आहों. प्रथम जामरूड किल्ल्यासमोर व नंतर या लुंडीकोटल किल्ल्यासमोर आमचें स्वागत करण्याकरितां आफ्रिडी पठाणांचे पुढारी आले होते व आपल्या देशाच्या चालीप्रमाणें खरोखरीच दोन बकरे भेट आमच्यापुढें त्यांनीं हजर केले. पण राजे लोक ज्याप्रमाणें नजराण्याला हस्तस्पर्श करून तो परत देतात, किंवा निरिच्छ साधु लोक कोणी कांहीं वस्तु अर्पण केल्यास तीच उलट प्रसाद म्हणून देणाराच्या पदरांत टाकतात त्याप्रमाणें आम्हीं त्या बकऱ्यांच्या लोकरीवरून हात फिरवून ते परत स्वाधीन केले. आमच्यांपैकीं दोघातिघांनाच या बकऱ्यांना दीर्घायुष्य चिंतण्याचा अधिकार व इच्छा होती. पण पाहुण्यांना नजर करण्याकरितां काढलेले बकरे बहुधा अल्पायुषीच असणार व आमच्या हातून येणारें गडांतर चुकलें तरी त्यांना दुसरा दिवस उजाडण्याचा संभव नसावा असें मनांत वाटून बिचाऱ्यांचीं कींव आली. लुंडीकोटल येथून पुढें पुन्हा लहानसा घाट चढून आम्ही लुंडीखाना येथें गेलों. हीच अफगाणिस्थान व ब्रिटिश हिंदुस्थान यांच्या दरम्यानची खरी सरहद्द होय; व ही ओळखण्याच्या अनेक खुणा तेथें आहेत. स्वाभाविक खूण म्हटली म्हणजे खायबर घाटमाथ्यावरून या बाजूला जसें पेशावरचें मैदान दिसतें त्याचप्रमाणें दुसऱ्या बाजूला अमीराच्या मुलखांतील मोठें मैदान दिसतें. या ठिकाणीं डोंगराची रांग नागमोडीनें पसरली आहे. तीच स्वाभाविक सरहद्द होय. परंतु या सरहद्दीवरहि एका बाजूस चुन्याच्या पट्ट्यासारखी ओढलेली खूण व दुसऱ्या बाजूस दगडाचे गडगे रचून सरहद्दीची रेषा शक्य तितकी निश्चित केली आहे. आणि मध्यंतरीं सपाटीवर दोहोंकडच्या टेकड्यांतील निरुंद जागेवर लोखंडी तारेचें कुंपण उभें केलें असून त्यांत फक्त एक फाकट, रेल्वे फाकटासारखें उभें केलें आहे. या फाकटाला लागून पलीकडे एक काबुली शिपाई खांद्यावर बंदूक टाकून नेहमीं उभा असतो व तारेला लागून अलीकडे एक इंग्रज सरकारचा शिपाई असाच बंदूक घेऊन उभा असतो. हे दोघे आपापल्या बाजूची सरहद्द राखणारे शिपाई इतके एकमेकांजवळ असतात कीं एकानें काडी पेटविली असतां दुसऱ्याला त्यावर विडी पेटवून घेतां येईल. पण दुर्दैवानें अशा

रीतीचा व्यक्तिमित्रभाव प्रकट करण्यासहि शिस्तीमुळें त्यांना परवानगी नसावी असें वाटतें. काबुली पहारेवाल्याच्या पलीकडे एका बकाली झोपडींत परवाने तपासून घेणारा कारकून बसला होता, आणि ब्रिटिश शिपायाच्या अलीकडे थोड्याशा उंचवटयावर इंग्रज सरकारच्या परवान्याचें हपीस आहे. अशा रीतीनें दुतर्फी परवाने देण्याघेण्याचा व तपासण्याचा कारभार चालतो. सरहद्दीच्या तारेला लागून एक मोठा नोटीस बोर्ड उभा केलेला आहे. त्यावर परवान्याशिवाय रहदारी बंद असल्याचा हुकूम लिहिला आहे. अर्थात् परवान्याशिवाय हद्दीपलीकडे पाऊलहि टाकतां येत नाहीं. टाकतांच कैद व्हावें लागेल. हा अनुभव सहसा न येणारा असल्यामुळें आमच्यापैकीं कित्येकांनीं सरहद्दीच्या तारेवर पाठपोट घासून घेतले! कित्येकांनीं या तारेच्या कुंपणाजवळच्या वस्तु आठवणीकरतां म्हणून उचलून घेतल्या. पाहुणेमंडळीबरोबर कांहीं पठाण लोक या शेवटच्या मुक्कामांत आले होते त्यांनीं व भेटीला आलेल्या इतर पठाणांनीं आपापल्या बंदुका घेऊन उघड्या डोंगरावर निशाण मारण्याची करामत दाखविली. एकदां गोळी सुरू झाली त्याबरोबर पांच–पन्नास काडतुसें खलास झालीं. कोणाचा नेम लागला, कोणाचा चुकला. पण गोळीबाराच्या आवाजानें क्षणभर दरी दुमदुमून गेली. ती इतकी कीं, खेळाचें कौतुक बाजूला राहून या गोळीबाराचा अर्थ कदाचित् भलताच समजून चौफेर टेकड्यांवर क्षितिजावर पठाण उमटतील आणि गोळीबार सुरू होईल कीं काय, अशी भीति एकानें प्रकट केली व ती ध्यानांत येतांच गोळीबार थांबविण्यांत आला. नंतर ब्रिटिश हद्दींतील पासपोर्टकचेरींत सर्व मंडळी बसून उपाहार झाला. या उपाहारांत सांगण्यासारखी गोष्ट म्हटली म्हणजे पाहुण्यांकरितां आणलेल्या मक्याच्या पिठाच्या रोट्या. एकेक रोटी लहानशा परातीयेवढी मोठी व सुमारें पाव इंच जाड होती आणि आफ्रिडी जवान एका न्याहारीला येवढी एक रोटी खातो असें सांगण्यांत आलें तें ऐकून आश्चर्य वाटलें. या ठिकाणीं खायबर घाटांतील कांहीं हिंदु रहिवासीहि आमच्या भेटीला आले होते. अशाहि मुलखांत हिंदु व मुसलमान एकत्र आनंदानें राहतात असें दाखविण्याकरितां मुद्दाम ही योजना केली असावी. कसेंहि असो. शेंकडों वर्षें एकत्र राहणारे हिंदु-मुसलमान, कितीही भांडखोर असले तरी, वर्षांतून एखाददुसरा आठवडा भांडत असतील. बाकी ५०–५१ आठवडे स्नेहबुद्धीनें राहत असतील ही गोष्ट कांहीं खोटी नाहीं. पण परवां 'रंगीला रसूल' नामक पुस्तकानें जी धर्मवेडाची लाट उठली ती

या दूरच्या दरींतील मुलखापर्यंत पोंचलेली असून तेव्हां गांवांतून हद्दपार केलेलीं हिंदु कुटुंबें अजूनहि कांहीं ठिकाणीं परत जाऊं शकलीं नाहींत ही मुद्द्याची गोष्ट आमच्याबरोबर आलेले पेशावर कॉं. कमिटीचे चिटणीस अमीरचंद बंबोल यांनींच आम्हांस सांगितली. खायबरमधील हे हिंदु कोणी दोनशें कोणी चारशें वर्षांचे रहिवासी होते पण पलीकडे शेंदीडशें मैलांवर खुद्द काबुलांतहि हिंदु रहिवासी आहेत, ही गोष्ट लक्षांत आल्यावर येथील हिंदु रहिवाशांचें आश्चर्य वाटलें नाहीं.

खायबर घाटाकडून आम्ही संध्याकाळीं ३-३॥ वाजतां परत आलों. येतांना वाटेंत पेशावरनजीक एक कोसावर इस्लामिया कॉलेज म्हणून नव्या पद्धतीची शिक्षणसंस्था आहे ती पाहिली. सुटीमुळें विद्यार्थी व वर्ग नव्हते. परंतु इमारती, खेळण्याच्या विस्तीर्ण जागा, वसतिगृहें वगैरे पाहून आनंद वाटला. पण सुधारलेल्या पठाण लोकांचें वर्णन कांहीं इंग्रजांनींच स्वतः लिहिलें आहे तें लक्षांत असल्यामुळें या शिक्षणसंस्थेच्या इमारतींत नांदणारी देवता सुष्ट कीं दुष्ट म्हणावी याचा क्षणभर संशयच आला. असो. सायंकाळीं शहराबाहेर रायबहादुर करमचंद यांनीं आपल्या गिरणीच्या बागेंत पाहुण्यांना थाटाची चहापार्टी दिली व तेथूनच पुढें जवळच्या शाहीबागेंतील जाहीर सभेला आम्ही गेलों. ही सभा मुसलमान पुढाऱ्यांनीं भरविलेली असून तींत आम्हा लोकांना जें मानपत्र दिलें त्यांत सरहद्दीच्या प्रांतांत सुधारणा एकदम सुरू कराव्या अशी मागणी केली होती. अर्थात् बन्नू येथील हिंदु समाजानें सुधारणा देऊं नयेत ही जी मागणी केली होती तिला हें नेमकें प्रत्युत्तर होतें. मानपत्र वाचणारे गृहस्थ हिंदु म्हणून सुधारणेच्या विरुद्ध पण कॉंग्रेस कमिटीचे चिटणीस म्हणून सुधारणांना अनुकूल होते. मुसलमानपुरस्कृत जाहीरसभेंत हिंदूनें मानपत्र वाचलें व त्यांत सुधारणांची मागणी केली होती या तीन गोष्टींचा मेळ घालून देण्यांत आला होता. आणि बन्नू येथें पं. नेहरू यांनीं जसें मानपत्रवाल्यांशीं आपला मतभेद आहे हें सांगितलें तसें पेशावर येथील सभेनें मानपत्रवाले व आपण एकाच मताचे आहों असें सांगितलें. पण हें मतप्रदर्शन अर्थात् व्यक्ती-पुरतें होतें. कारण आम्हा दहा पाहुण्यांत या विषयावर तीन मतें होतीं. पंडितजी हे कॉंग्रेसचे एक जुने अध्यक्ष व असेंब्लींतील पुढारी या दृष्टीनें त्यांनीं एकट्यांनींच बोलावें असा साधारण संकेत ठरविला होता, त्यामुळें तेहि सर्वांना सांभाळूनच बोलत. आमच्या दौऱ्यांतील ही तिसरी जाहीर

सभा होय. पैकीं डेराइस्माइलखान व पेशावर या दोन ठिकाणच्या सभांना हजारों लोक आले होते, व कमिशनरी अमलाच्या या मुलुखांत तोंडाचा चिकटा निघून जाण्यासारखे खरखरीत उद्गार काढण्याची ही संधि दाबून-दडपून गेलेल्या लोकांना पर्वणीसारखी वाटली असल्यास नवल नाहीं. असो. रात्रीं चीफ कमिशनर यांजकडे भोजनसमारंभ झाल्यावर या दिवसाचा कार्यक्रम संपला.

दुसरे दिवशीं सकाळीं आम्ही मलकांडचा किल्ला पाहण्यास निघालों. प्रथम रावळपिंडीच्या वाटेनें २५ मैल गेल्यावर नवशिराची लष्करी छावणी लागते व तेथेंच काबूल व स्वात नद्या नांवांच्या पुलावरून ओलांडून पलीकडे जावें लागतें. नवशिराहून उत्तरेस दर्गाई टेकड्यांपर्यंत आगगाडी असून त्या रस्त्याला समांतर सडक आहे. वाटेवर होतीमर्दान हें गांव लागतें. येथील नबाबावर एक चमत्कारिक खटला या प्रांताच्या अधिकाऱ्यांनीं आकसानें भरला, तो एखाद्या हायकोर्टांत चालावा म्हणून तो मुंबईस चालला; आणि आरोपी नबाब यास ज्यूरीनें दोषमुक्त केलें ही गोष्ट इकडील अनेक वाचकांना माहीत झालेली आहे. मर्दानच्या पुढें उजव्या बाजूला दर्गाईच्या टेकड्या दिसतात. येथें अनेक वेळां पठाणी फौजेशीं हिंदी फौजेला लढावें लागलें आहे. मलकांडच्या अलीकडे एक मोठा घाट लागतो. तो चढून गेल्यावर एक सपाटी व त्यांतच पुन्हा एक लहानशी टेकडी लागते. या टेकडीवर मलकांडचा किल्ला बांधलेला असून खालीं मैदानांत छावणी आहे. हा किल्लाहि १९१९ सालीं लढविण्यांत आला होता. येथून पलीकडे पुन्हा लहानसा घाट ओलांडून गेल्यावर स्वात नदीचें विस्तीर्ण खोरें लागतें. त्यानंतर दीर व चित्रळ याकडे जाणारे रस्ते दिसतात. स्वात खोऱ्यांतील हा प्रदेश अतिशय रमणीय आहे; आणि चहूंकडे हिरवीगार झाडी पसरलेली आहे. याच नदीला बांध घातलेला असून त्यांतून पाट काढून पुढें तो एका मोठ्या लांबलचक बोगद्यांतून पलीकडच्या खोऱ्यांत पेशावरच्या बाजूला धबधबा करून खालीं सोडलेला आहे. या काल्व्यावर मैदानांतील हजारों एकरांची शेती व बागाइती होते. चित्रळ हें येथून पुन्हा १००-१२५ मैल लांब असल्यामुळें आमच्या कार्यक्रमांत तें घेण्यांत आलें नाहीं. म्हणून मलकांड किल्ल्यावर दोनप्रहरीं उपाहार करून आम्ही सायंकाळीं पेशावरला परत आलों. नंतर थोडा वेळ उरला होता त्यांत शहरांत हिंडलों. कांहींनीं शीख लोकांचा जुना किल्ला पाहून घेतला.

कांहींनीं शहरांतील शीख लोकांचें जुन्या कचेरीचें ठिकाण पाहिलें. हीच हरिसिंग नवला यांची सुप्रसिद्ध कचेरी. तिला हल्लीं धर्मशाळेचें स्वरूप आलेलें आहे. नंतर आम्हीं शहराबाहेरील पंचतीर्थ पाहिलें. हें पंचतीर्थ म्हणजे उत्तम पाण्याचे अनेक झरे हौदांत बांधून घेतलेले आहेत. हीं तीर्थें पाहून गांवांत परत गेल्यावर तेथील ब्राह्मणसभेनें मला व डॉ. मुंजे यांना संस्कृत भाषेंत मानपत्र दिलें. पेशावरसारख्या सरहद्दीच्या शहरांत मुसलमानांच्या चौफेर वेढ्यांत मानपत्र देण्याइतकें संस्कृत जागृत राहिलेलें पाहून आम्हाला फारच विस्मय वाटला व आनंद झाला. शिवाय हें संस्कृत त्या एका दिवसापुरतें नसून, ब्राह्मणसभेच्या विद्यमानें तेथें संस्कृत पाठशाळाहि सुरू आहे असें आम्हांला सांगण्यांत आलें.

त्याच रात्रीं ११ वाजतां आम्ही दौरा संपवून परत निघण्याकरितां आगगाडींत बसलों ते दुसरे दिवशीं ( ता. ५ ) सकाळीं ताक्षिला तेथें उतरलों. येथें या दिवशीं एक पुराणवस्तूंचें मोठें प्रदर्शन व वस्तुसंग्रह उघडण्याचा समारंभ व्हावयाचा होता म्हणून या खात्याचे कौन्सिलर सर महमद हबिबुल्ला व सेक्रेटरी वाजपेई हे आदल्या दिवशींच तेथें येऊन राहिले होते. सकाळची न्याहारी सर जॉन मार्शल यांच्याकडे होतांच आम्ही मोटारींतून तक्षिला पाहण्यास निघालों. चार मैलांपलीकडे टेकडीवर एक बौद्ध भिक्षूचा विहार पुराणवस्तुसंशोधन खात्यानें नवीन उकरून काढलेला आहे तो पाहिला. नंतर खालीं दुसऱ्या बाजूस इराणी अग्निपूजक लोकांचें एक जुनें देवालय उकरून काढलेलें आहे तेंहि पाहिलें. नंतर पदार्थसंग्रहालय पाहिलें. समारंभ दोन प्रहरीं होणार होता, परंतु मला व डॉ. मुंजे यांना त्या आधीं जबलपूरला जाण्याकरितां १२ वाजतां आगगाडींत बसणें जरूर म्हणून आम्ही वस्तुसंग्रह आधीं पाहून घेतला. त्याचा प्रवेशसमारंभ केवळ औपचारिक स्वरूपाचा होता. पण तो एक विधि असल्यामुळें मुख्य दाराला कुलूप घालण्यांत आलेलें होतें. तथापि दुसऱ्या बाजूनें समारंभाचें काम सुरू असल्यामुळें वस्तुसंग्रहालय एका अर्थानें उघडेंच होतें म्हणून तें पाहण्यांत औचित्याचा भंग न होतां आमचें काम सहजच साधलें. वस्तुसंग्रहांत ठेवलेल्या दोन तीन हजार वर्षांपूर्वीच्या वस्तू पाहून इतकें सहज म्हणतां येईल कीं त्या जुन्या काळीं आजची यंत्रविद्या तेवढी कमी होती. परंतु बुद्धिमत्ता, कल्पकता व विशेषतः हस्तकौशल्य या बाबतींत आजच्या कलेच्या मानानें त्या काळींहि कांहीं कमीपणा नसावा ही गोष्ट हस्तकौशल्याच्या वस्तू-

प्रमाणें इमारतींच्या रचनेवरूनहि सहज स्पष्ट होते. काळ जसजसा होत जातो तसतशा फक्त कांहीं गोष्टीच तेवढ्या बदलतात, पुष्कळ गोष्टी समान असतात आणि त्यांत कोणत्याहि श्रेढीनें वाढ होत नसते. तक्षिला गांवाचा अवशेष आसपास टेकड्यांवरून बराच पसरलेला आहे. आणि लॉर्ड कर्झन यांनीं काढलेल्या या नव्या खात्यांतील परोपकारी व सुसंस्कृत ज्ञानापेक्षां मानवी उंदीरघुशींचें काम कित्येक वर्षं चाललें तरी संपणार नाहीं. तक्षिला येथील प्रचंड विद्यापीठ म्हणजे एक मध्यवर्ती फार मोठी अशी इमारत नसावी तर ऑक्स्फर्ड व केंब्रिज येथील युनिव्हर्सिटीच्या कॉलेजाप्रमाणें तें विद्यापीठ अनेक विहारांतून व उपविहारांतून बऱ्याच मोठ्या प्रदेशावर पसरलेलें असावें. असो. तक्षिलेचें दर्शन घेऊन आम्ही दोन प्रहरीं परत निघालों तें रात्रीं सुमारें ९ वाजतां अटक जवळ सिंधु नदी ओलांडून परत आपल्या मुलखांत आलों.

## [ ३ ] उपसंहार

कोणताहि नवा मुलूख प्रथम पाहणें कौतुकास्पद असतें त्याप्रमाणें वायव्य सरहद्दीचा प्रांत पाहण्याची हौस आम्हांलाहि होती आणि ती प्रस्तुतच्या दौऱ्यानें पूर्ण झाली. वास्तविक एकंदर वायव्य सरहद्द सुमारें १००० मैल लांब भरते. पश्चिमेस कराचीनजीक येऊन भिडणाऱ्या बलुचिस्थानच्या टोकापासून पूर्वेस चित्रळच्या पलीकडे सुमारें १५० मैलपर्यंत ही सरहद्द पसरली आहे. या १००० मैल सरहद्दीचें रक्षण पुष्कळशा डोंगरपर्वतांनीं आपणच केलेलें आहे. पण जे घाट मधून मधून सांपडलेले वहिवाटलेले आहेत त्यांचें रक्षण करणें म्हणजेच सरहद्दीचें रक्षण करणें. हिंदुस्थानवर उत्तरेकडून पूर्वी स्वाऱ्या झाल्या त्या तीन बाजूंनीं झाल्या. एक बलुचिस्थानकडून म्हणजे बोलन घाटांतून, दुसरी सुलेमान पर्वतांतून म्हणजे खैबर घाटांतून, व तिसरी चित्रळ व काश्मीर यांच्या बाजूनें स्वात नदीच्या खोऱ्यांतून. पहिली मुसलमानांची स्वारी बलुचिस्थानकडून झाली. पुढें महंमद गझनी, महंमद घोरी, नादीरशहा व अहमदशहा अबदल्ली हे खैबर घाटांतून आले; आणि ग्रीक राजा अलेक्झांडर हा वरील स्वात नदीच्या खोऱ्यानें आला अशी समजूत आहे. या तीनहि मार्गांचें रक्षण इंग्रजांनीं आतां आपल्याकडून केलें आहे. बलुचिस्थान प्रांत ताब्यांत घेऊन क्वेटा येथें मोठें लष्करी ठाणें ठेवण्यांत आलें आहे. सगळ्या खैबर घाटाचें आक्रमण करून अफगाणिस्थानच्या सरहद्दीला ब्रिटिश सरहद्द नेऊन भिडविली आहे. चित्रळच्या बाजूला ब्रिटिश फौज व काश्मिरी फौज यांच्या

योगानें नाकेबंदी करण्यांत आली आहे. पण या तिन्ही ठिकाणचा बंदोबस्त खरोखर कितपत यशस्वी झाला आहे हें प्रत्यक्ष स्वारीच होईल तेव्हां कळेल! एक वेळ रशिया अफगाणिस्थानांतील हिरातच्या रोखानें पेंचदेपर्यंत चालून आला होता म्हणजे हल्लींच्या सरहद्दीपलीकडे ४०० मैलांपर्यंत आला होता. पण १९१९ सालीं काबूलच्या अमिरानें इंग्रज सरकारशीं युद्ध पुकारलें तेव्हां तर तो बन्नूच्या उत्तरेस व कोहाटच्या पश्चिमेस थळ नामक लष्करी ठाणें आहे तेथपर्यंत आला होता व त्यानें हें ठाणें घेतलें होतेंहि म्हणतात! हें ठाणें युसफ खेल नामक पठाणी मुलखाच्या हद्दीवर असून, कोहाटपासून तेथपर्यंत आगगाडीचा रस्ताहि केलेला आहे. याच युद्धांत बहुतेक पठाणी जाती इंग्रजांविरुद्ध उठल्या होत्या व जांडोला, रझमक, मिरनशहा, बन्नू, कोहाट, पेशावर, खैबर, मलकांड वगैरे पठाणी सरहद्दीच्या ठाण्यांवर युद्धाचे प्रसंग त्या वेळीं घडून आले होते. यावरून पाहतां केवळ घाटांचेंहि संरक्षण व्हावें तसें होतेंच असें दिसून येत नाहीं. किंबहुना या सर्व घाटांचें संरक्षण पूर्णपणें करणें शक्य नसावें असेंच वाटतें. कारण चोराला जशा अनेक वाटा तशाच परकी शत्रूला. पण सरहद्दसंरक्षणाचा हा प्रयोग जसा वायव्येकडे झाला तसाच तो ईशान्य दिशेला करण्याकरितां, तिकडेहि असाच एखादा वेगळा प्रांत बनविण्याची योजना सरकारच्या मनांत आहे असें म्हणतात.

तें कसेंहि असो. आज सरहद्दीच्या संरक्षणाकरितां कोट्यवधि रुपयांचा खर्च होत आहे ही गोष्ट खरी. या खर्चाला असेंब्लीच्या वादविवादांत सरकारी पक्षाच्या एका गृहस्थानें विम्याच्या हप्त्याच्या रकमेची उपमा दिली. पण " विम्याचा हप्ता भरण्याकरितां कोणाचें सर्व उत्पन्न खर्ची पडून दिवाळखोरीचा प्रसंग आला व वरती विम्याची रक्कमहि बुडाली तर तो विमा घेऊन काय करावयाचा ? " हें जसें एक उत्तर, तसें दुसरेंहि एक उत्तर असें आहे कीं, " विमा हा अपमृत्यूच्या दुष्परिणामाकरितां उतरावयाचा. पण इंग्रज सरकार आमच्या राष्ट्राचा विमा उतरणार म्हणजे हिंदुस्थानच्या पारतंत्र्याचा विमा उतरणार, म्हणजे हिंदुस्थानच्या पारतंत्र्याला मृत्यु येऊं नये म्हणजे स्वातंत्र्य मिळूं नये याकरितां उतरणार! " पण या मुद्द्यावर वाद थोडक्यांत न संपणारा असल्यामुळें तो वाद मी येथें घालीत बसत नाहीं. पुस्तकांतून वाचण्यापेक्षां प्रत्यक्ष पाहिल्यानें सरहद्दीची विशेष कल्पना येणार होती म्हणून आम्ही या दौऱ्यावर निघालों व तो आमचा हेतु

सफल झाला येवढी गोष्ट खरी. तसेंच सरहद्दीच्या वेगळ्या प्रांतांतील लोकांना नव्या सुधारणा द्याव्या कीं नाहीं हाहि एक वादाचा मोठा प्रश्न असून आधींच लांबलेल्या या लेखांत त्या वादामध्यें मी शिरूं इच्छीत नाहीं. त्याचें विवेचन स्वतंत्र कोठें तरी करीन. म्हणून या नवीन पाहिलेल्या मुलुखासंबंधानें इतर रीतीनें दोन शब्द लिहून हा लेख पुरा करतों.

आम्हीं सरहद्दीच्या मुलुखांतून सुमारें चारपांचशें मैलांचा प्रवास केला. या टापूंत सुलेमान पर्वताच्या पायथ्याच्या टेकड्याच बहुधा आहेत. मुख्य पर्वताचीं शिखरें बारमास बर्फाच्छादित असतात व त्याचा नमुना आम्हाला एकदोन ठिकाणीं पाहावयास सापडला; या भागांत सर्वांत उंच ठिकाण १४००० फूट आहे. त्याला तक्त-इ-सुलेमान म्हणतात. सुलेमान म्हणजे सॉलोमन. ज्यू लोकांचा हा राजा. पूर्वीं इकडे येऊन त्यानें हिंदुस्थानांतील एका कुमारिकेशीं विवाह केला. आपल्या गालिचाच्या विमानांत बसून तो तिच्यासह परत स्वदेशीं जात असतांना, ह्या हिंदी कन्यकेला आपल्या मुलुखाचें शेवटचें दर्शन घ्यावेंसें वाटलें, म्हणून तिच्या विनंतीवरून सॉलोमन यानें आपलें गालिचाचें विमान या ठिकाणीं डोंगरमाथ्यावर थांबविलें. पण मग तेथून तें हालेचना अशी दंतकथा आहे. तिचा बोध इतकाच कीं, अफगाणिस्थानच्या व त्याच्याहि पलीकडील मुलुखांतील लोकांची येरझार या आसपासच्या पर्वतावरून हिंदुस्थानांत पूर्वीं होत असे. आमच्या दौऱ्याच्या मुलुखांत सिंधु, जंडोला, टोची, खुरम्, काबूल, व स्वात इतक्या नद्यांचा प्रवाह व खोरीं पाहावयास सांपडलीं. या सर्वांत स्वात नदीचें खोरें फार प्रेक्षणीय आहे. या मुलुखांतील लोकांना पठाण हें जरी नांव सर्वसामान्य आहे तरी त्यांच्यामध्यें पुष्कळ जाती आहेत. खालीं डेराइस्माइलखानच्या बाजूला माशूद, वर वझिरी, त्याच्याहि वर आफ्रिडी, त्याच्याहि पलीकडे मोहमंड असे या लोकांचें मुख्य वर्गीकरण असून या प्रत्येक वर्गांत पोटभेद आहेत व त्यांना स्थलपरत्वें नांवें मिळालीं आहेत. उदाहरणार्थ, शेराणी, पाविंडा, उस्तराण खैरूखेल, झाकाखेल, बहादुरखेल, युसफझाई वगैरे. अफगाणिस्थान तर पठाणमयच आहे म्हणा, पण या सरहद्दीच्या मुलखाअलीकडेहि पंजाबच्या पश्चिमेकडच्या व उत्तरेकडच्या जिल्ह्यांतूनहि पठाण लोकांची बरीच वस्ती आहे. यामुळें नकाशा काढतांना रंग कसाहि दिला किंवा सरहद्दीच्या रेघा कशाहि मारलेल्या आढळल्या तरी, खालपासून वरपर्यंत एकच धर्म, एकच जात व

एकाच भावनेचे लोक एकाला एक लागून पसरलेले आहेत. यामुळें रस्त्याच्या एका टोकाच्या इमारतीला आग लागली असतां वाऱ्यानें ती जशी दुसऱ्या टोकापर्यंत सहज पसरते, त्याप्रमाणें धर्मवेडानें थोडी कोठें चलबिचल झाली असतां, ती या पठाणी मुलखांत दक्षिणोत्तर व पूर्वपश्चिम अशा हजारों मैलांच्या प्रांतावर हां-हां म्हणतां पसरते. जसा कांहीं रानांतील वणवाच म्हणाना! घाटांची नाकेबंदी करण्याचा उद्योग इंग्रजांनीं आरंभिला तो पठाण लोकांना आवडत नाहीं, पण तो त्यांच्या हातून थांबविला जाऊं शकत नाहीं. तथापि त्यामुळें त्यांचें कांहीं अडलेलेंहि नाहीं. शिवाय मनांतून ते या नाकेबंदीला हसतात. कारण चोरानें घरांत येऊन मग दरवाजा लावून घेण्याचा हास्यास्पद खटाटोप करावा तसा इंग्रजांचा हा प्रयत्न त्यांना वाटतो. अफगाणिस्थान, पठाणिस्थान ( हें नांव चालू नाहीं पण ते मुद्दाम या सरहद्दीच्या मुलखाला मी देत आहें ) व पंजाब या तिन्ही मुलखांतील पठाणांचा अनिरुद्ध संचारहि इंग्रजांना थांबवितां येत नाहीं. किंबहुना कलकत्ता, मुंबई येथपर्यंत पठाण लोकांचा प्रवेश व सुळसुळाट कसा झाला आहे, त्यांच्यापासून लोकांना उपद्रव कसा होतो व सरकारला तो कसा थांबवितां येत नाहीं, या गोष्टींची माहिती वाचकांना आहेच.

तथापि इंग्रजांनीं या बाबतींत आशा सोडलेली नाहीं. सिंधु नदी व काबूलची सरहद्द यांमधील लांब चिंचोळ्या टापूंतील पठाणांना आज नाहीं उद्यां, पण केव्हां तरी आपण आपले प्रजाजन बनवूं अशी इंग्रजांना उमेद आहे. तिला अनुसरून त्यांचें रोज एकेक पाऊल पुढें पडत आहे. डेराइस्माइलखान, बन्नू, कोहाट, पेशावर, मलकांड, हजारा येथपर्यंत बरेंच स्थिरस्थावर झालेलें असून या जिल्ह्यांना Settled म्हणजे सुस्थित जिल्हे असें म्हणतात. याचे पश्चिमोत्तर भागांना Unsettled असुस्थित असें म्हणतात. पण असुस्थितपणा म्हणजे स्वातंत्र्य असा अर्थांश घेतला असतां, तोच शब्द चांगल्या अर्थीहि समजतां येईल. आणि खरोखरच या लहानशा टापूचें दर्शन म्हणजे एखाद्या जिवंत स्वतंत्र राष्ट्राचें दर्शन होय! काबूलच्या अमिराला यांना आपल्या राज्यांत समाविष्ट करतां आलें नाहीं व इंग्रजांच्या हातूनहि ती गोष्ट अद्यापि घडली नाहीं. यामुळें या पठाणिस्थानांत राजा कोणीच नसून राज्य आहे, संपन्नता नसून स्वातंत्र्य आहे, अधिकार नसून कदर आहे अशी स्थिति पाहावयास सांपडते. हे पठाण लोक हजारों वर्षांपूर्वीं होते तसेच अजूनहि आहेत. त्यांची

ज्ञात किंवा जमात हेच त्यांचें राज्य किंवा राष्ट्र. पूर्वपरंपरा हाच त्यांचा कायदा. जिरगा किंवा पंचायत हेंच त्यांचें न्यायकोर्ट. हातांतील बंदूक हेंच त्यांचे पोलीस आणि जमाती. जमातींत असेल त्याप्रमाणें स्नेहसंबंध किंवा वैर हेंच त्यांचें आंतरराष्ट्रीय राजकारण. आम्ही या बाजूला फिरत होतों त्या चार पांच दिवसांत असें आढळून आलें कीं, सुस्थित जिल्ह्याच्या हद्दीच्या बाहेर पाऊल टाकलें कीं, जो म्हणून पठाण भेटेल तो हटकून सशस्त्र असावयाचा. आपण जशी हातांत काठी घेतो तशी त्याची बंदूक. याचा अर्थ तें आत्मसंरक्षणाचें जसें साधन तशीच ती चैनीची किंवा मिजासखोरीचीहि खूण समजावी. १६-१८ वर्षांच्या मुलाच्या हातांतहि बंदूक. या चार दिवसांत चालत्या-बोलत्या माणसांच्या खांद्यांवर जितक्या बंदुका आम्हीं पाहिल्या तितक्या साऱ्या जन्मांत मिळून आम्हांला पाहावयास सांपडल्या नाहींत. यांत अतिशयोक्तीचें एक अक्षरहि नाहीं. मोलमजुरी करण्याला आलेल्या पठाणाच्या हातींहि क्वचित् बंदुका आढळल्या. याचें कारण त्यांचा शिकारीपेशा अद्यापि ज्यारी आहे. मोलधंदा करून घरीं जातांना सहज एखादा पक्षी किंवा ससा आढळला तर दुसऱ्या दिवसाच्या न्याहारीला तितकीच मदत. ज्याची स्वतःची बंदूक नाहीं त्याचें लग्नहि नाहीं. याचें कारण असें कीं, लग्न करावयाचें तर बायकोची अब्रू संभाळण्याची जबाबदारी आली व ती स्वतःची बंदूक असल्याशिवाय पार पडणें शक्य नाहीं. या पठाणिस्थानांतील दूरच्या भागांत राहो परंतु सुस्थित जिल्ह्यांच्या दरम्यान प्रविष्ट होणाऱ्या भागांतहि इंग्रजांचा अंमल नाहीं यामुळें हत्यारांचा कायदाच नाहीं. या मुलखापासून इतका उपद्रव होतो तरी त्यांना हत्यारांचा कायदा कां लावीत नाहीं ? असा प्रश्न आम्हांला सहज सुचला, पण तो विचारणें हें अधमपणाचेंच वाटेल म्हणून कोणी विचारला नाहीं. आम्ही इकडे हत्यारें द्या म्हणतों आणि या स्वतंत्र लोकांची आहेत तीं काय म्हणून काढून घ्यावयाचीं ? हत्यारांचा कायदा राहोच पण इंग्रजी अंमलांतील समन्स किंवा हुकूमनामाहि तिकडे लागत नाहीं. इकडला गुन्हेगार पाऊल टाकून पठाणिस्थानांत गेला म्हणजे तो सुरक्षित झाला ! मग गुन्ह्याचा विशेष प्रकार पाहून अगर न्यायबुद्धि प्रकट होऊन शेजारच्या मुलुखांतील पठाणांनीं गुन्हेगार धरून स्वाधीन केला तर गोष्ट निराळी ! या लोकांना इतक्या बंदुका मिळतात कशा हा प्रश्न सहजच सुचतो. पण त्याचें एक उत्तर पूर्वी खैबर घाटांतील बंदुकीच्या कारखान्याच्या वर्णनानें मीं

दिलेंच आहे. पण बंदुकीचा खरा पुरवठा वरून अफगाणिस्थानांतून व खालून इराणच्या आखातांतून होतो. आणि हा पुरवठा बंद करण्याचा घाट इंग्रजांनीं कांहीं वर्षांपूर्वीं घातला, त्यामुळें पठाणिस्थानांत बंड झालें म्हणतात. अशा लोकांना गुन्हेगारीचा विधिनिषेध फारसा नसावा यांत आश्चर्य नाहीं. शेती किंवा स्थिर उत्पन्न फारच कमी. यामुळें ऋतुमानाप्रमाणें स्थलांतर करून किंवा लूटमार करून यांची उपजीविका चालते. या मुलखांत एक राजा नसल्यानें इंग्रजांना पठाणांच्या प्रत्येक जातीशीं वेगवेगळा तह करावा लागलेला आहे. पण पठाणिस्थानचें हें स्वातंत्र्य पांचपंचवीस वर्षांनंतर टिकेल असें मात्र वाटत नाहीं!

इंग्रजी राज्यांत सुधारणा म्हणजे स्वातंत्र्याचा नाश म्हणजे अधोगति हें समीकरण पुष्कळ ठिकाणीं अनुभवाला येतें तसें हें पठाणिस्थानांतहि येऊं लागलें आहे. पठाण लोक स्वातंत्र्याचा उपयोग ज्या मार्गांनीं करीत त्यांतील कित्येक आक्षेपार्ह व निंद्य होत यांत शंका नाहीं. पण तें स्वातंत्र्य जाऊन त्यांची सुधारणा होऊं लागल्यानें जी स्थिति निर्माण होत आहे तीहि कांहीं चांगलीशी नाहीं. पठाण लोकांच्या मिळकतीचे अपवादास्पद मार्ग बंद केल्यामुळें त्यांचा चरितार्थ चालण्यासारखें कांहीं साधन त्यांना देणें हें इंग्रजाचें कामच आहे व सरहद्दीच्या मुलखांतून बांधलेले कालवे, रस्ते, पूल इमारती इत्यादींच्या कामांवर मजूर म्हणून किंवा कंत्राटदार म्हणून किंवा रस्त्याची रखवाली करणारे खासेदार म्हणून, किंवा अंतःशांतता ठेवणारे पोलीस म्हणून, किंवा पठाण लोकांच्या टोळीचे नाईक, मुकादम म्हणून त्यांना जिकडून जितके अधिक पैसे देतां येतील तितके देऊन त्यांना वश करण्याचे प्रयत्न इंग्रजांचे एकसारखे सुरू आहेत. आणि हे पैसे देण्यांत इतका सढळ हात असतो कीं, त्याला लांचलुचपत हें नांवहि शोभेल. पण कांहीं अधिकारी ही गोष्ट प्रांजलपणें कबूल करीत असले तरी कांहीं ती कबूल न करतां इतर रीतीनें त्याचें समर्थन करूं पाहतात असें आम्हांला आढळलें. पठाणिस्थानांत एक राजा तर नाहींच पण निरनिराळ्या जातींचें वंशपरंपरागत हाडवैरच असतें. यामुळें जातीजातींत नेहमीं युद्ध माजतें व अंतःकलहांत परक्याची मदत घेण्याचा मोह कोणालाहि सहज पडतो. तसेंच पठाणांचेंहि होत आहे.

तें कसेंहि असो. शांततेच्या मार्गाला लागून सुधारलेल्या पठाणांचें जें वर्णन ब्रिटिश अधिकाऱ्यांनीं केलें आहे तें वाचलें म्हणजे स्वातंत्र्यच्या स्वातंत्र्य

जाऊन वरती या लोकांची अधोगति होत आहे हें पाहून मात्र वाईट वाटल्याशिवाय राहत नाहीं. एक अधिकारी लिहितो—

"The Pathan of the settled districts has undergone a modification, natural consequence of the greater degree of civilisation and still further mixture of descent. He is inclined in youth to substitute for the rifle, cartridge, bullet and dagger, of which British people deprive him, a gaudy waist-coat, embroidered shoes, gambling and other expensive luxuries, while later in life he is excessively prone to litigation.

उलटपक्षीं स्वातंत्र्याचा कांहीं अंशीं दुरुपयोग करणाऱ्या रानटी पठाणांचें त्यांनींच दिलेलें हें वर्णन पहा.

"This man (Pathan), may be a swash-buckling braggart, he may be cruel, treacherous, fanatical; he may have other vices, but he bends to none save to him who can uphold his right to be obeyed. To set against his vices, the Pathan is brave, sober, religious according to his lights, and on the whole clean living. He has a ready sense of humour and great traditions of hospitality. He is a lover of sport and athletic out-door games, and when his self-respect and esteem have been won, he is capable of great devotion. Such is the elemental Pathan."

असो. पठाणिस्थानांतील पठाणांचें पुढें काय व्हावयाचें हा प्रश्न भवितव्यतेवर सोंपवून अखेरचे दोन शब्द लिहितों. अफगाणिस्तान हा मुलूख आम्हांला परका वाटण्यासारखी आज स्थिति आहे यांत शंका नाहीं. या मुलखांतील लोकांच्या धर्मांतरामुळें व गतकालीन इतिहासामुळें तशी गोष्ट होऊन राहिली आहे. तथापि इतर दृष्टीनें पाहतां, हा मुलूखहि आम्हांला आमचा आहे असें वाटविणारीं कांहीं कारणें आहेत, ज्या वाटेनें ज्या मुलुखांत पठाण वगैरे लोक आले त्याच वाटेनें, त्याच मुलखांत आर्यांचे पूर्वज येऊन त्यांनीं वस्ति केली व धर्मांतर केलेल्या ज्या पठाणांत आपले जातभाई जुने आर्यवंशोत्पन्न किती तरी असतील याची सूक्ष्म कल्पना केल्यास मौज वाटते.

किंबहुना भारतकालीन योद्धयांचीं व वीरांचीं वर्णनें वाचलीं म्हणजे त्याची आठवण करून देण्याला मध्य व दक्षिण प्रांतांतील हिंदु मनुष्यापेक्षां, ह्या उत्तरेकडील मुलुखांतील पंजाबी व पठाण हेच अधिक उपयोगीं पडतील. या मुलुखांतील जुनीं देवळें मुसलमानांनीं जमीनदोस्त केलीं आहेत. तथापि या मुलुखांत हिंदु व बौद्ध धर्माच्या आठवणी करून देणाऱ्या खुणा अगणित आहेत. पेशावरांतील गोरखत्रि नांवाची वास्तु जी पूर्वी मुसलमानांच्या व त्यानंतर शीखांच्या ताब्यांत होती तें हिंदु लोकांच्या यात्रेचें पवित्र स्थान होतें असें १६ व्या शतकांत बाबर यानें स्वतः लिहून ठेवलें आहे. या मुलुखाला गांधार देश ही संज्ञा होती. पुष्कलावतीसारखीं नगरें येथें होतीं. पोरस राजाची राजधानी याच मुलुखांत होती. बुद्धधर्मीयांनीं बांधलेले स्तूप खैबर घाटांत प्रत्यक्षच दिसले, तक्त-इ-बोही म्हणून मर्दानजवळ एक डोंगरी ठिकाण आहे तेथें तर बुद्धाच्या प्रतिमेचें पेवच होतें असें म्हणतात. शहाबाजघडी हें जें ठिकाण होतिमर्दानजवळ आहे तेथें अशोकाचे शिलालेख आढळतात व तक्षशिलेसंबंधानें वर उल्लेख करण्यांत आलेलाच आहे. संस्कृत वाङ्मयाचा पूर्वापार इतिहास लक्षांत आणणाऱ्याला, कल्पनादृष्टीनें कदाचित् असें पाहतां येईल कीं, आपल्या वैदिक वाङ्मयापैकीं अमुक एक प्रकारचें वाङ्मय या प्रांतांत निर्माण झालें! तात्पर्य, इतिहासाला आपण जुना म्हणतों, पण इतिहासापेक्षांहि जुन्या अशा आमच्या आठवणी या सरहद्दीच्या प्रांताशीं संलग्न आहेत. या दृष्टीनें सरहद्दीच्या प्रांतांतील आमचा हा दौरा म्हणजे एका दृष्टीनें, आर्यसंस्कृतीच्या जुन्या क्षेत्राकडे काढलेली यात्राच होती असें कां न म्हणावें?

---

# पूर्व-बंगालची सफर

(लेखांक १ ला)

केसरी, १९२९

बंगाल प्रांत हा जितका इतर प्रांतांहून वेगळा तितकाच पूर्व-बंगाल हा पश्चिम-बंगालपासून वेगळा आहे. बंगाल सोडला असतां इतर प्रांतांत जमिनीचा प्रदेश उंच-नीच असतो; डोंगर, टेकडया यांची समृद्धि असते; पण बंगाल प्रांत हा उत्तर-भाग वगळल्यास एखादा विस्तीर्ण हिरवा गालिचा

पसरावा त्याप्रमाणें शेंकडों मैल एकसारखा सपाट पसरलेला आहे. या भागांत डोंगर तर राहोच, पण लहानसान टेकडीहि दिसत नाहीं. फार तर काय, पण दुरून नजर फेकली असतां कपाळावर उमटणाऱ्या टेंगळाएवढाहि खडक अगर दगड दृष्टिपथांत येत नाहीं. जमीन सुपीक व पाणी विपुल, यामुळें बारमास निरनिराळ्या प्रकारचीं शेतें व बागाइती सुरू असतात. यामुळें युरोप खंडाप्रमाणें बहुतेक ऋतूंत इकडे जमीन हिरवळलेली दिसते. हिमालया-लगतच्या बंगाल प्रांतांत अर्थातच मोठमोठीं अरण्यें, डोंगर, उंच वृक्ष यांची समृद्धि आहे. पण तो भाग सोडून दिला असतां मोठाल्या शहरांतील अजब-खाने, पदार्थसंग्रहालयें, प्राणि-संग्रहालयें यांतून तयार केलेल्या कृत्रिम वनश्री-प्रमाणें बंगाल्यांतील वनें अल्पप्रमाण दिसतात. ताड-माड असले तरी विरळ व वट वृक्षासारखीं प्रचंड झाडें क्वचित्. गवताचीं कुरणें, केळीच्या बागा व फळझाडें यांनींच इकडचे बगीचे भरलेले असतात.

पश्चिम-बंगाल्यांतून गंगा दूरवर वाहते; पण तिचे फाटे समुद्रापलीकडे १०० कोसांवर फारसे फुटलेले नसून एकच मोठा प्रवाह वाहतो. याशिवाय एक दोन मोठ्या नद्या आहेत. पण त्यांचें एकेरीच पात्र. पूर्व-बंगाल हा प्रांत, त्यांतील अनेक मोठ्या नद्या व त्यांचें विस्तीर्ण फाटे यामुळें अगदीं, वेगळा बनलेला आहे. तो असा कीं, त्यांतून वाहतुकीचे मार्ग जितके जमिनीवरून तितकेच नद्यांतून आहेत. सबंध बंगाल्यांतील मिळून जलमार्गांची लांबी वीस हजार मैल आहे. त्यांतला फार मोठा हिस्सा पूर्व-बंगालच्या वांटणीला येतो. गंगा नदीचे दोन मोठे फाटे पश्चिम-बंगाल्यांत फुटतात. त्यांतील एकाला हुगळी नदी हें नांव मिळालें असून दुसऱ्या प्रवाहाला पद्मा नदी हें नांव मिळालें आहे. हिलाच पूर्व-बंगालच्या मध्यभागीं ब्रह्मपुत्रा नदी मिळालेली आहे. गंगेचे अनेक फाटे असल्यामुळें प्रत्येकजण आपल्या गांवचा फाटा हीच मुख्य गंगा असें म्हणत असतो. जेथें गंगेचा संबंधहि नाहीं तेथें जर आपल्या नदीला 'गंगाजी' असें नांव लोक देतात. तर प्रत्यक्ष गंगा नदीच्या फाट्यासंबंधानें आपली नदी तीच खरी गंगा असें म्हणण्याची अहमहमिका सुरू झाल्यास नवल नाहीं !

पूर्व-बंगाल्यांतहि लोकांनीं एका नदीला जमना हें नांव देऊन व या गंगा-यमुनेच्या संगमाला त्रिवेणी हें नांव देऊन, अलाहाबादेच्या त्रिवेणीला प्रति-स्पर्धी महातीर्थ उत्पन्न केलें आहे ! अलाहाबादेच्या गंगेला 'युक्तवेणी' गंगा

म्हणतात. तर पूर्व-बंगाल्यांतील गंगेला 'मुक्तवेणी' गंगा म्हणतात. युक्तवेणी म्हणजे पेड पिळून बांधलेले केस व मुक्तवेणी म्हणजे पेड सोडून पसरलेले केस. पश्चिम बंगाल्यांतील गंगा व पूर्व-बंगाल्यांतील गंगा यांचें स्वरूप पाहिलें म्हणजे हें वर्णन कोणीहि यथार्थच म्हणेल. पहिल्या वेणींत गंगा व यमुना हे दोनच पेड व्यक्त आहेत; पण केशसौंदर्याविषयीं अभिलाषी असलेली एखादी स्त्री भरदार वेणी असली तरी ती कमी समजून त्यांत जशी गंगावनाची भर घालते, त्याप्रमाणें आधींच विस्तृत असलेल्या गंगेला प्रचंड शोण नदी व त्यानंतर ब्रह्मपुत्रा ही येऊन मिळाल्यावर मग ही वेणी मुक्त होऊन बंगाल-भूमीच्या पाठभर पसरल्यास काय नवल ? या पद्मा नदीलाच गंगा नदीचा मुख्य प्रवाह असें म्हणण्याची रीत प्रांतिक अभिमानामुळें पडली आहे. पण हुगळी नदीची रुंदी व पद्मा नदीची रुंदी यांची तुलना केली असतां हुगळी हा निवळ फाटा व पद्मा नदी हाच गंगेचा मुख्य प्रवाह म्हणणें सकारण आहे असें कोणासहि वाटतें. तिला ब्रह्मपुत्रा मिळाल्यावर तर तिचा प्रवाह इतका रुंद व निरनिराळ्या उपप्रवाहांनीं विस्तारलेला आहे कीं, कोठें कोठें तिला आखात व उपसमुद्र यांचें स्वरूप प्राप्त झालेलें आहे. एकंदर बंगाल्यांत तळीं व डबकीं हीं इतकीं पसरलेलीं आहेत कीं, कोठें कोठें जमीन अधिक कीं पाणी अधिक असा भ्रम पडतो. पण पूर्व-बंगाल्यांत नद्यांमधून प्रवास करणाराला, वस्तुतः समुद्रापासून शेंकडों मैल दूर असतांहि आपण समुद्रकांठावरच आहों असा भास होतो.

आम्ही कलकत्त्याहून रविवार ता. २५ रोजीं रात्रीं निघालों ते सकाळीं आगगाडीनें पूर्व-बंगाल रेल्वेच्या गोलंदो घाट या स्टेशनावर येऊन पोंचलों. कोलंबोला जातांना मद्रास इलाख्याच्या किनाऱ्यावर शेवटीं आगगाडी व आगबोट यांची जशी सांधमोड झालेली दिसते, किंवा मुंबईच्या बॅलार्ड पीअर-वर जसा या सांधमोडीचा अनुभव येतो, तसाच या बंदरी स्टेशनावरूनहि येतो. म्हणजे आगगाडींतून उतरावें व एकदम लहानसा लकडी पूल ओलांडून जाऊन नावेंत बसावें. पूर्व-बंगाल रेल्वेच्या किती तरी स्टेशनांचीं नांवें अशींच 'घाट' या संज्ञेचीं आहेत. पण घाट म्हणजे फक्त जमिनीवरील वाहनांतून उतरून पाण्यांतील वाहनांत बसण्याची जागा. घाट या संज्ञेनें आपल्या देशी मुलखांतील लोकांना जी कल्पना येते ती कल्पना इकडील घाटाची नाहीं. म्हणजे घाट दगडांनीं बांधलेला किंवा चिरेबंदी पायऱ्यांचा असा कोठेंच

आढळणार नाहीं. याचें कारण आधीं दगडच नाहींत. मुलूख रेताड किंवा वाळवंटी किंवा मऊ मळई जमिनीचा. त्यांतून इकडील नद्यांचीं पात्रें अति अस्थिर व चंचळ. आज ज्या ठिकाणीं पाणी असेल तेथें पुढच्या वर्षीं कदाचित् जमीन कोरडी पडेल. यामुळें पाया किंवा धर घेऊन मातीच्या भरावाचेंहि वर बनवितां येत नाहीं. एक पाऊल जमिनीवर व दुसरें नदीच्या मुख्य पात्रांत अशी स्थिति सर्वत्र किनारी घरंदाजांचीहि आढळते.

गोलंदो घाटाच्या स्टेशनावर साधा प्लॅटफॉर्महि नाहीं. उतारू लोकांना सर्व सामानसुमान घेऊन, डब्यांतून पायऱ्यांचे दोन मजले उतरून खालीं यावें लागतें. पायाखालीं जसा जास्त प्लॅटफॉर्म नाहीं. तसें डोक्यावर कांहीं आच्छादनहि नाहीं. यामुळें पावसाळ्यांत उतारू लोकांचे हाल किती होत असतील याची कल्पना येईल. पण या भूरचनाविशेषामुळें पूर्व-बंगाल्यांतील लोकांची राहणी, त्यांच्या सवयी या तशाच बनलेल्या आहेत. म्हणजे कांसवा-प्रमाणें जलचर व स्थलचर असें वर्णन त्यांचें सहजच यथार्थ करतां येईल. पण याहून आणखी तिसरें एक वर्णन म्हणजे पक्ष्यांचें, 'तेंहि त्यांना लागू पडेल. कारण त्यांच्या शरिराएवढ्या लहानसान होड्या व त्यांवर उभारलेली वावभर शिडें हीं पाहिलीं असतां, आतां पाण्यावर तरंगणारे हे प्राणी क्षणांत हवेंत वर उडून जातील कीं काय असा दुरून पाहणाराला भ्रम पडतो. पाण्यावर तरंगत राहून वाटेल तेव्हां उडून जाणारे पक्षी समुद्राकिनाऱ्यावर दिसतात तसेंच पूर्व-बंगाल्यांतील नद्यांच्या कांठीं राहणारे हे बंगाली शेतकरी व खलाशी होत.

गोलंदो घाटावर उतरून सामानसुमान घेऊन आम्ही एका आग-बोटींत येऊन बसलों. या आगबोटी कोंकणी बंदरी आगबोटीएवढ्याच आहेत पण त्यांची बांधणी व त्यांतील सोई निदान पहिल्या वर्गांतील उतारू-पुरत्या कांहीं अंशीं विलायती सफरी करणाऱ्या बोटींसारख्या आहेत. म्हणजे केबिनच्या खोल्या सोईच्या, सुखाच्या व रंगरोगण लावलेल्या असून आंत प्रशस्त बाकें असतात व त्यांवर गादी व एकदोन उशा असतात. मोकळ्या डेकवर स्वच्छता असून बसण्याला सुखासनें ठेवलेलीं असतात व मध्यभागीं जेवणाखाणाकरितां एक लांबट दालन चांगलें सजविलें असतें. तेथें जेवणखाण मिळतें. मात्र तें सर्व मत्स्याहारी व मांसाहारी, शाकाहारी मिळत नाहीं! कारण बंगाल्यांत शाकाहारी तो पापी! लहानपणीं एका गवळ्याच्या गाण्यांत

ब्राह्मणाचें विनोदी वर्णन केलेलें ऐकलें होतें तें असें कीं, " हातात फांसा, डोई-वर मासा, बोडक्या बामण पळतोय् कसा रे पळतोय् कसा ! " हें वर्णन म्हणजे आम्हा दाक्षिणात्य ब्राह्मणांची थट्टा, पण बंगाली ब्राह्मणांचें अगदीं अक्षरशः बरोबर वर्णन आहे. फरक इतकाच कीं, त्याच्या डोक्यावर मासा नसला तर क्वचित् हातांत कालीला नैवेद्य दाखवून सोवळ्या पंचांत बांधून आणलेलें, रक्ताचें थेंब ठिबकणारें बकऱ्याचें मुंडकें असेल !

असो. पण शहरांतील माणसाची तहानभूक विसरून जाण्यासारखा देखावा बोटीच्या मोकळ्या डेकवरून दिसण्यासारखा दोहों बाजूंस असतो. नदी एवढी मोठी कीं, एखादे ठिकाणीं क्षितिजाची रेघ व नदीचा किनारा हीं एकच होतात. मात्र याच्या उलट कित्येक ठिकाणीं आगबोट बंदरें घेतांना इतकी किनाऱ्याजवळ जाते कीं, तेथें उगवणाऱ्या नारळाच्या झाडावर वानरासारखी उडी मारून बोटींतल्या उतारूला सहज जातां येईल. नदीच्या कडेकडेनें मुख्य पात्रांतून माती वाहून येऊन व सांचून मोठमोठीं बेटें बनलेलीं आहेत व कधीं कधीं तर प्रवाहापलीकडे बेट, त्याच्या पलीकडे फिरून नदीप्रवाह असे देखावे पुष्कळ ठिकाणीं दिसतात. यामुळें या बेटापलीकडील प्रवाहांतून तरंगणाऱ्या होड्या व नावा अलीकडून पाहिल्या म्हणजे त्या शिडें लावून जमिनीवरूनच चालतात कीं काय असाहि भास होतो. नदीचें पाणी मन प्रसन्न करण्यासारखें दिसत नाहीं. प्रथम कित्येक मैलांपर्यंत हें पाणी अगदीं गढूळ अंबिलीसारखें होतें. नंतर पुढें तें किंचित् निवळलें व काशी अलाहाबाद येथील नदीच्या पाण्यासारखा त्याचा रंग दिसूं लागला तेव्हां किंचित् बरें वाटलें.

नदीच्या दोनहि किनाऱ्यांवर वसति एकसारखी पसरलेली दिसते. याचें कारण देशावरच्याप्रमाणें शेतकऱ्याची राहणी गांवांत व शेती शेतांत असा प्रकार तेथें नाहीं तर शेतकरी आपल्या शेतांत बारामासच राहतो. ज्या तागाच्या लागवडीकरितां बंगाल प्रांत प्रसिद्ध आहे त्याचे मळे इकडे दुतर्फा लागून राहिले आहेत. हें पीक फारसें उंच नसतें. त्याची उंची पुरुष दीड पुरुष म्हणजे फार झाली. त्याला पानें किंवा फांद्या यांचा विस्तार फारसा नसतो. झाड बोरूसारखें एकदांडी सरळ वाढतें; व त्याच्या अंगाला धरून एकेरी, दुहेरी पानांचें वेष्टन असतें. हें तागाचें पीक कापल्यावर तें कित्येक दिवस पाण्यांत कुजेपर्यंत बुडवून ठेवावें लागतें व कुजलें म्हणजे मग काढून

सोलून त्याचे भारे बांधण्यांत येतात व हें सर्व शेतकाम नदीच्या कांठींच करावें लागत असल्यामुळें शेतकरी किनारा सोडून आंत राहूं शकत नाहीं. इकडच्या शेतकऱ्याचें दुसरें पीक म्हणजे भातशेती. कोंकणांतील खाजणी शेतीप्रमाणें ही शेती पाणथळींत करतात व पाणी गोडें असल्यामुळें भात चांगलें पिकतेंहि. या भातशेतीला धोका म्हटला म्हणजे तो फक्त पूर येण्याचा; व गंगेला असे पूर मधून मधून येतातहि. पण ते जसे लवकर येतात तसे ते लवकर ओसरतातहि. शिवाय पूर आला म्हणजे पाण्याची उंची फार वाढते असें नाहीं. कारण आपल्या इकडील नद्यांप्रमाणें या इकडच्या नद्यांचीं पात्रें डोंगर व खडक यांनीं बंदिस्त झालेलीं नसतात. म्हणून पूर आला तरी पाणी फार दूरवर पसरतें, पण उथळच राहतें. यामुळें या पुरांना शेतकरी लोक फारशी भीक घालीत नाहींत. किंबहुना त्यांचीं घरें इतकीं पाण्यालगत बांधलेलीं असतात कीं, केव्हां होडी हें जसें त्यांचें घर; तसें घरहि कित्येक वेळां होडी बनते. मात्र ती नांगरलेली होडी इतकें म्हटलें असतां चालेल. कारण घराची रचनाच अशी असते कीं, खालीं उभे डांब उभारावयाचे व सुमारें दोन फूट उंचीवर आडवे वासे चौफेर बांधावयाचे; आणि वर व बाजूला चटईचें आच्छादन करावयाचें. असल्या घरांत हे लोक राहतात. यामुळें नदीला पूर येऊन पाणी पसरलें म्हणजे तें या घरांखालून खुशाल वाहतें. आणि या वाहत्या पाण्यावर हे लोक आपला सर्व चरितार्थ चालवितात. असल्या घरांवर लोखंडी पत्रा सहसा आढळत नाहीं व जेथें तो आढळतो तेथें सहजच असें समजावें कीं, तेथें आपल्याला गंगामाई त्रास देणार नाहीं इतका त्यांचा तिच्यावर सामान्यतः विश्वास असतो. पण प्रेमळ आईचा हात जसा एखादे वेळीं मुलाच्या अंगावर रागानें बसतो त्याप्रमाणें या विश्वासाचा गैरविश्वास होऊन शेतकऱ्याला तरंगावें लागतें व कित्येक ठिकाणीं अशा झोपड्या दिसल्याहि, कीं आंतील घर वाहून गेलें व उभे डांब व पत्रे एवढेच शिल्लक राहिले. पण ही सगळी परिस्थिति गिळून व पचनीं पाडून शेतकरी नदीच्या कांठांवर नांदत असतो.

इकडे प्रायः आधीं उन्हाळी हवा म्हणून अंगांत कांहीं नको व त्यांतूनहि उठल्याबसल्या पाण्यांत व्यवहार म्हणून अंगावर कांहीं नको अशी स्थिति असल्यानें शेतकऱ्याचें नागवें दारिद्र्य आयतेंच गरजेनें झांकून जातें; पण त्यांचें अंग मात्र झांकलें जात नाहीं ! रोज पाण्यांतील मासे धरून खाणाऱ्या

या बंगाली शेतकऱ्यांनीं जवळ जवळ स्वतः माशाचीच राहणी पत्करलेली आहे! घरें म्हणजे हीं खोपटीं व हीं पांचचार झालीं कीं, त्या ठिकाणचा तो गांव संपला. यामुळें आपल्या राहणीला पाहून इतर कोणी हसेल किंवा इतर कोणाला पाहून आपण लाजावें अशी स्थितीच येथें नाहीं. स्त्री हो वा पुरुष हो, जितके व्यवहार या झोंपडींतल्या तराफ्यावर बसून होतात तितकेच खालीं पाण्यांत होतात. कारण बहिर्दिशा, दंतधावन, स्नान हींच शीं काय पण भुकेकरितां मासे धरणें व धंदा म्हणून तागा-भाताची शेती करणें हीं कामेंहि बहुधा पाण्यांतच चालतात. यामुळें पाण्यांतल्यापेक्षां पाण्याबाहेरच कमी वेळ जातो असें म्हणतां येईल. झोंपड्यांच्या जागा आंखून देण्याला सिटी सर्व्हे ऑफिसराचें काम नाहीं. गंगामाईच्या उदार प्रवाहांत कोणी कितीहि जागा घराला आंखून घेतली तरी कोणी विचारता नाहीं. मौज ही कीं, या कित्येक पाणझोंपड्यांनीं कोंकणांतील अंगणाप्रमाणें आपल्याभोंवतीं अंगणहि राखून ठेवलेलें असतें. झोंपडीच्या बाहेरच्या बाजूला ओळीनें डांब उभे करून त्याला अंगणाचा आकार दिलेला असतो व या बांबूच्या पिंजऱ्यांतून बाहेर पडण्याला एक फाकट ठेवलेलें असतें अशा रीतीनें घरांत राहणें. अंगणांत वावरणें व रस्त्यावर येणें हे सर्व व्यवहार एका पाण्यांतल्या पाण्यांत होतात असें म्हणण्यास हरकत नाहीं!

सांठवणाकरितां भांडेंकुंडें, अगर कणगी-मुढे यांचें कारण नाहीं. कारण तागाच्या पिकाची सर्व मशागत पाण्यांत व तो सोलून झाला कीं, त्यानें कलकत्त्याचा रस्ता धरलाच. तसेंच भात पिकेपर्यंत मात्र शेतांत, पिकलें कीं जमीनदाराच्या घराची वाट चालूं लागलेंच! भूक भागण्याला मासे हवेत. ते ताजेच्या ताजे केव्हांहि मिळवतां येतातच. येऊनजाऊन असेल तेथें एखादें नारळाचें झाड किंवा केळीचें झाड एवढींच काय ती त्यांची स्थायिक मिळकत व उत्पन्न. आपल्या इकडचा शेतकरी म्हटला म्हणजे त्याच्या घरीं चार-पांच जनावरें असावयाचींच; पण इकडचा हा शेतकरी श्रीमंत असला तर एका ऐवजीं तीन होडगीं ठेवील व त्याहून श्रीमंत झाला तर खंडी दोन खंडी माल मावेल एवढी एखादी नाव ठेवील! या छोट्या होड्या-नावांचें वर्णन करणेंच कठीण. चार फुटक्या सांधलेल्या फळ्या, चार बांबू, फळी लावलेलें एखाद-दुसरें वल्हें, सुकाणूं नाहीं व असलीच तर एखाद दुसरी चटई! आपल्या इकडचा गांवढळ शेतकरी एखादे वेळीं रंगीबेरंगी कपडा घालून चैन

किंवा मिजास करतो. तशी इकडच्या जलचर शेतकऱ्यांची मिजास म्हटली म्हणजे निरनिराळ्या दोन-तीन रंगांच्या फटकुरांचें शीड. थोडा अनुकूल वारा सुटला व शीड वाऱ्यानें भरल्यामुळें वल्हें हलविण्याचे श्रम वांचले कीं त्याला राजासारखें सौख्यपदस्थ वाटतें. मात्र वाऱ्याचा पूर्ण फायदा मिळावा म्हणून वेळीं कंबरेचें फटकूर सोडूनहि तो शीड म्हणून लावील!

## डाका व बंगालची फाळणी

सुमारें ६ तासांचा जलप्रवास करून आम्ही नारायणगंज येथें येऊन पोंचलों. हें नदींतलें बंदर पोर्ट सय्यद किंवा सुवेझ येथील बंदरांहूनहि मोठें असावें असा भास झाला. धरमतरच्या खाडीच्या नस्ताजवळ मुंबईच्या बंदरांत जसा देखावा दिसतो तसाच याहि बंदरांत दिसला. फरक इतकाच कीं, तो खुद्द समुद्राचा भाग म्हणून तेथें खूप मोठमोठीं जहाजें असतात. हें किती केलें तरी नदीचें पात्र म्हणून त्या मानानें लहान जहाजें दिसलीं. पण धूर काढणाऱ्या चिमण्या मोजल्या तर हें बंदर मुंबई बंदराला हार जाणार नाहीं असें क्षणभर वाटलें. येथील व्यापारहि तसाच मोठा आहे व कलकत्त्याबाहेर नारायणगंज येथें युरोपियन लोकांची जितकी वसति आहे तितकी दुसऱ्या कोणत्याहि शहरीं नसेल. त्यांतल्या त्यांत स्कॉच व्यापारी पुष्कळ. यामुळें सेंट अँड्रयूज डिनर म्हणून जी स्कॉच लोकांची वार्षिक मेजवानी होते ती येथेंच फार मोठी होते असें म्हणतात. स्कॉच व्यापाऱ्यांचा एवढा समुदाय असण्याचें कारण येथील तागाचा व्यापार. येथून डंडी येथील तागाच्या कारखान्यांना कोट्यवधि रुपयांचा ताग कच्चा माल म्हणून जातो. सुमारें पांच कोटी रुपयांचा तागाचा व्यापार याच एका शहरांतून होतो म्हणतात. पण बंदराच्या मानानें आगगाडीचें वैभव येथें कांहींच दिसलें नाहीं. पूर्व-बंगालची रेल्वे दरिद्री रेल्वेंत गणली जाते व तिचा प्लॅटफॉर्म, डबे वगैरे पाहिले असतां पहिल्या पहिल्या दिवसांतील रेल्वेची आठवण होते!

नारायणगंज ते डाका हा सुमारें ४०-४५ मिनिटांचा प्रवास आहे. पण अंतर फक्त ११ मैल आहे. खुद्द डाक्याचें स्टेशन पाहिलें तरी तेंहि सामान्यच आहे. येथें होऊं घातलेली राजधानी झाली असती तर कदाचित् इतर गोष्टींप्रमाणें या स्टेशनालाहि महत्त्व आलें असतें. डाका हें गांव पूर्व-बंगाल्याची राजधानी होय. या प्रांतांत एकंदरीनें मुसलमानांची संख्या ६८ टक्के असली तरी खुद्द डाका शहरांत हिंदूंचीच वसति अधिक आहे. शहराचे जुना

व नवा असे दोन भाग असून एका भागांत जुनी व दुसऱ्या भागांत नवी वसति असे दोन वेगळे गट झाल्यासारखे दिसतात. जुनी वसति डाक्क्या-पासून डोलाईगंजपर्यंत म्हणजे सुमारें मैल दोन मैल लांब पसरलेली आहे. ही सर्व वसति प्रायः नदीच्या कांठानेंच आहे. या नदीला बुढ्ढी गंगा म्हणजे जुनी गंगा असें म्हणतात. याचें कारण हेंच कीं, तिचा हा फाटा हीच मुख्य गंगा असें दिसावें. जुन्या भागाच्या बाजूला मुसलमान लोकांची वसति आहे. जुने मुसलमान नबाब व त्यांचे आश्रित यांचे जुने वाडे व वाड्या हीं जवळ जवळ असल्यामुळें तो मुसलमान मोहल्ला बनलेला आहे. मुख्य बंदराच्या बाजूला हिंदु वसतीचा भाग असून, त्याच्या पलीकडे सर्व सरकारी कचेऱ्या व त्यापलीकडे पूर्वीं होऊं घातलेल्या राजधानीमुळें बांधलेल्या अनेक मोठमोठ्या इमारती व त्यापलीकडे खूप विस्तृत अशीं गवती मैदानें, अशी शहराची रचना आहे.

### तोडलेलीं बोटें

सर्वच जुन्या बंदरांची रीत अशी कीं, तेथील रस्ते अरुंद पण इमारती मोठ्या. आपल्या इकडे सुरत, राजापूर, चौल वगैरे बंदरांजवळ हा प्रकार दृष्टीस पडतो. तसाच डाक्का येथेंहि कांहीं भागांत दिसतो. जुन्या व्यापारी श्रीमंतीची खूण म्हणून कित्येक लक्षाधीशांच्या जुन्या इमारतींचे अवशेष दृष्टीस पडतात. डाक्क्याची मलमल जेथें तयार होऊन एक कोटी रुपयांची परदेशीं जात होती तेथें धंदेवाईक व्यापारी, कारखान्यांचे उरलेले अवशेष ते हे म्हणून अजूनहि दाखवितात. कुशल कारागिरांचीं तोडलेलीं बोटें मात्र कोठें दिसत नाहींत! कदाचित् बंदरांत वावरणाऱ्या इंग्रजी व्यापारां-च्या बोटीच्या रूपानें प्रचंड व विकृत स्वरूप धारण करून तीं पुन-र्जन्म घेऊन राहात असावीं! खुद्द डाक्का ही कोणा हिंदु राजाची राजधानी होती कीं नाहीं सांगतां येत नाहीं. कदाचित् ती नसावी. कारण जवळच पांच-सहा कोसांवर विक्रमपूर हें प्रसिद्ध राजधानीचें जुनें शहर असल्यामुळें व त्या वेळीं व्यापारी बंदराचें महत्त्व फार नसल्यामुळें डाक्का शहर हें प्रत्यक्ष राजधानी नसेल. विद्येच्या दृष्टीनें विक्रमपूरला बंगालची काशी म्हणतात व राजकीय वैभवाच्या दृष्टीनें त्याला विजयनगरची उपमा शोभेल. बुद्धिमत्तेच्या दृष्टीनें जशी पुणें किंवा रत्नागिरी यांची ख्याति किंवा मद्रास इलाख्यांत ज्याप्रमाणें कुंभकोणम् शहरांची ख्याति आहे; त्याप्रमाणें बंगाल्यांत विक्रमपूरची ख्याति

आहे. हल्लींच्या काळांतहि एका विक्रमपुराइतके विद्वान् पुरुष दुसऱ्या कोणत्याहि शहरानें कलकत्त्याला पुरवले नाहींत असें म्हणतात.

इकडे स्वाऱ्या करणाऱ्या मुसलमान पठाणांनीं विक्रमपूरची राजधानी बुडविली व तिचे जागीं डाक्का शहर मूळ वसविलें म्हणतात. अकबराच्या वेळीं राजा मानसिंग हा बंगालचा सुभेदार नसला तरी तो सेनापति कांहीं वेळ होता. त्यानेंच मोगल बादशहाकरितां इकडील पठाण राजांचा पराभव करून डाक्का शहर हस्तगत केलें व येथील ढाकेश्वरीचें मूळ देऊळ त्यानेंच बांधलें अशी दंतकथा आहे. पण हिंदूंचा पाय इकडे फार दिवस टिकला नाहीं व मोगलांच्या आज्ञेंत वागणारे नबाबहि राहिले नाहींत. डाक्का, मुर्शिदाबाद वगैरे ठिकाणचे नबाब कांहीं दिवस स्वतंत्र होते. पुढें १७५७ मध्यें प्लासीची लढाई झाली. १७६५ त क्लाइव्हनें बादशहापासून दिवाणगिरी मिळविली. तेव्हांपासून नबाब परतंत्र झाले व अजूनहि ते तसेच परतंत्र आहेत. कारण येथील प्रसिद्ध नबाब सलीमउल्लाखान यांचें २०-२२ लाखांचें राज्य ही केवळ जमीनदारी बनली असून तिला इतकें कर्ज व तिची इतकी अव्यवस्था झाली आहे कीं, कर्जफेड करण्याकरितां सरकारनें ती आपल्या ताब्यांत ठेवून तिचा कारभार एका सिव्हिल सर्व्हंटाच्या हातीं दिलेला आहे. या नबाब-वंशापैकीं एक अलीमउल्लाखान यांनीं केळकर व मुंजे यांना आपल्या घरीं बोलाविलें. त्या वेळीं त्यांनीं आपल्या तोंडानें आपल्या जुन्या घराण्याची वाताहत कशी झाली हें सांगितलें. ती हकीकत ऐकून त्यांनाहि सहजच वाईट वाटलें. तेव्हां समदुःखाच्या गोष्टी बोलून म्हणजे आपल्या इकडील महाराष्ट्रांतील जुन्या घराण्यांच्या वाताहतीच्या हकीकत सांगून त्यांचें दुःख थोडें हलकें करावें लागलें.

## फाळणीचें एक कारण

डाक्का प्रांत म्हणजे पूर्व-बंगाल हा तोडून स्वतंत्र करण्याचीं सरकारचीं कारणें काय होतीं हीं लोकांना माहीत झालेलीं आहेत. पण बंगालच्या फाळणीच्या विरुद्ध असलेल्या कारणांपैकीं एक कारण अलीकडे पूर्वीपेक्षां अधिक ठळकपणें लोकांच्या लक्षांत येऊं लागलें आहे. फाळणीच्या चळवळीच्या काळीं डाक्का येथील नबाब सलीमउल्लाखान व त्यांच्यासारखें इंग्रजांचे हस्तक यांनीं फाळणीविरुद्ध झालेल्या चळवळीला जो विरोध केला, तो सरकारच्या प्रेमाखातर एवढीच गोष्ट त्या वेळीं निदर्शनाला आली. पण सरकारच्या चिथावणीप्रमाणें मुसलमानांच्या अराष्ट्रीय चळवळींची चिथावणीहि त्यामागें होती हें तेव्हां

कोणाच्या लक्षांत आलें नाहीं, कारण मुसलमानांच्या सवत्या सुभ्याच्या मागणीचा जन्म १९०६ सालापूर्वी झाला नव्हता व फाळणीविरुद्ध चळवळ त्यापूर्वी कमींत कमी एक वर्ष सुरू झाली होती. पण गेल्या २३ वर्षांत या मागणीनें जो धुमाकूळ घातला आहे त्याचें नातें, एका अवजड प्रांताचे दोन सुटसुटीत प्रांत करण्याच्या सरकारच्या बहाण्याशीं किती जवळचें होतें हें आतां अधिक प्रकट होऊं लागलें आहे. प्रांत जितका अधिक लहान करावा तितकी राज्यव्यवस्था अधिक सोपी हें खरें. पण मुसलमानांची बहुसंख्या ज्यांत शेंकडा ६०-७० इतकी भरली आहे अशा प्रांताची वेगळी वांटणी करतां आल्यास सरकारच्या सोयीबरोबर बलुचिस्थान, पेशावर व पंजाब या प्रांतांच्या जोडीला आणखी एक मोठा मुसलमान प्रांत आयताच भरीला पडला असता. कारण हिंदुस्थानांत मुसलमानांची बहुसंख्या असलेले आजचे प्रांत कमी करूं नयेत व शक्य तर नवे बनवावेत हें मुसलमानांचें आजचें धोरण व पुढचें ध्येय आहे!

## मुसलमानांचें प्राबल्य

ज्या द्वारांतून मुसलमान मूळ हिंदुस्थानांत आले तेथून महाराष्ट्राचें जितकें अंतर त्याहून पूर्व-बंगालचें अंतर खाचित कमी नाहीं. पण पूर्व-बंगाल्यांत हिंदु जितके पुष्कळ व जितके त्वरित बाटविले गेले तितके ते दिल्लीच्या दक्षिणेकडील मुलुखांत बाटविले गेले नाहींत. याचें कारण राजपुतान्यांतील रजपूत, मध्यदेशांतील जाट व त्या खालच्या प्रदेशांतील मराठे या तिघांनीं मुसलमानांच्या स्वाऱ्यांना किती विरोध केला हें प्रसिद्ध आहे. पण दिल्लीच्या पूर्वेकडे मुसलमानांच्या ज्या स्वाऱ्या झाल्या त्यांना थेट बंगाल्याच्या उपसागरापर्यंत कोणी कधीं अडथळा केलाच नाहीं! यामुळें बंगाल्यांत पठाण व गंगा-यमुनांच्या दुआबांत रोहिले यांचीं राज्यें मोठमोठालीं बनलीं. दक्षिणेंतील बहामनी राज्यें मुसलमानांचीं होतीं. परंतु त्यांना अखेर मोडण्याबुडविण्याच्या कामीं मराठ्यांना मदत तरी करतां आली. पण पूर्वभागांत तेंहि घडलें नाहीं न शिवाजीमहाराजांसारखा कोणी स्वतंत्र राजाहि झाला नाहीं! आगींतून निघून फोफाट्यांत पडावें त्याप्रमाणें हिंदु लोक मुसलमानांच्या हातून निघाले ते एकदम थेट इंग्रजांच्या हातीं पडले! वाईट एवढेंच वाटतें कीं, इकडील हिंदूंना आपलीं राज्यें राखतां आलींच नाहींत, पण धर्महि राखतां आला नाहीं, व यांचें प्रत्यंतर म्हणजे या अगदीं दूरच्या

बंगाल प्रांतांत मुसलमानांची एवढी मोठी संख्या व त्याहून दुःखाची गोष्ट ही कीं, हिंदूंतून निघून मुसलमान बनलेले हेच हिंदु, हिंदुधर्माच्या जिवावर आज उठले आहेत !

बंगालची फाळणी नको नको म्हणत असतां झाली, व ती वज्रलेप म्हणून द्वाही फिरली ! असें असतां, राष्ट्रीय चळवळीच्या वज्राघातानेंच ती उलथून पडली. नाहीं तर पूर्व-बंगाल्याची स्थिति आज काय झाली असती याचीच कल्पना करावी. पण शेण जमिनीवर पडलें असतां माती घेतल्याशिवाय उठत नाहीं त्याप्रमाणें या नियोजित फाळणीचा अवशेष पूर्व-बंगाल्यांत हल्लीं दृढमूल होऊन राहिला आहे व त्याचें उदाहरण म्हणजे डाक्का येथील युनिव्हर्सिटी. कलकत्ता युनिव्हर्सिटीचें प्रख्यात व्हाइसचॅन्सेलर सर आशुतोष मुकर्जी यांनीं डाक्का युनिव्हर्सिटीचे वर्णन एकदां विनोदानें 'मक्का' युनिव्हर्सिटी असें जें केलें त्यांत किती तरी स्वारस्य सांठविलें आहे !

---

# दिल्लीचीं बातमीपत्रें

## पत्र नं. १

ता. २१-१-३०

यंदा असेंब्लीच्या बैठकीला फारच उदासपणा आला आहे. इतका पूर्वीं केव्हांहि आला नव्हता. हिंवाळ्यांत सूर्यग्रहण यावें, आणि तेंहि संध्याकाळच्या सुमारास ! असें झालें असता काय स्थिति होते याची कल्पना करावी म्हणजे कळून येईल. हिंवाळा म्हणून दिवस आधींच लहान. तास दोन-तास दिवस उरला असला तरी ऊन नाहींसेंच वाटूं लागतें. अशांत पुनः सूर्यग्रहण असलें म्हणजे तिसरा प्रहर हीच संध्याकाळ होय. असेंब्लीची स्थिति तशीच झाली आहे. राष्ट्रीय सभेनें कौन्सिलबहिष्कार पुकारला. यामुळें एकंदरीनें थोडेसे लोक निघून गेले तरी उरलेल्यांच्या मनांना रुखरुख वाटल्याशिवाय राहत नाहीं. राष्ट्रीय सभेची आज्ञा न मानतां कौन्सिलांत राहणें हें कर्तव्य म्हणून केलें तरी, अशा स्थितींतहि मतभेद व्हावा, आणि आपणांबरोबर काम करीत असणारे कांहीं लोक निघून जावे, या गोष्टीचें थोडेंबहुत वाईट वाटल्याशिवाय राहत नाहीं. मग तो दोष राष्ट्रीय सभेचा असो किंवा आमचा असो.

* * *

बहिष्कारामुळें कॉंग्रेस पक्षाचे सुमारें २०-२२ लोक गैरहजर राहणार. आणि त्यांच्या जागीं निवडणूक होऊन दुसरे नवे आले तरी ते आणखी ६-७ आठवडे तरी येऊं शकत नाहींत. त्यांतूनहि व्हिटले कमिशनवर नेमलेल्या लोकांना गैरहजर राहावें लागणार; आणि आधींच उल्हास त्यांत फाल्गुन मास या न्यायानें असेंब्लीला आले तरी येण्याची टाळाटाळ बराच वेळ करणारे कांहीं लोक असतातच. तात्पर्य, यंदा असेंब्लींतील पुष्कळ बाकें मोकळीं पडणार; आणि जुलैअखेर असेंब्ली खलास होणार या गोष्टीची भर त्यांतच पडली आहे. अशा रीतीनें वर म्हटल्याप्रमाणें, असेंब्लीला हिंवाळ्यांत संध्याकाळीं सूर्यग्रहण लागल्याचा भास सहजच होतो. कॉंग्रेसपैकीं कांहीं लोक ता. १८ च्या सभेची वाट पाहत होते. ता. २५ रोजीं व्हाइसरॉयसाहेबांचें भाषण होणार आहे. तोच मुहूर्त कित्येकांना येण्याला बरा वाटतो. या अनेक कारणांमुळें गेल्या दोन दिवसांत असेंब्लींत शुकशुकाट झाल्यासारखा वाटला. कामच विशेष महत्त्वाचें नव्हतें ही गोष्ट वेगळी. असतें तर या शुकशुकाटाचें विशेषच वाईट वाटलें असतें.

* * *

असेंब्लींतील कॉंग्रेस पक्षाला गतवर्षीपासूनच उतरती कळा लागली होती केव्हां आचार्य, केव्हां रंगास्वामी, केव्हां रंगा अय्यर वगैरे कांहीं लोकांनीं पं. नेहरू यांच्यावर रागावून तो पक्ष आधींच सोडला होता. कांहीं मुसलमान सभासदांनींहि निराळ्या कारणाकरितां तेंच धोरण स्वीकारलें होतें. शिस्तीच्या दृष्टीनें कॉंग्रेस पक्ष खिळखिळा झाला होता ही गोष्ट स्वतः पं. मोतिलाल नेहरू यांनीं नुकतीच जाहीरपणें कबूल केली आहे. तात्पर्य, आजच्या घटकेला तरी त्या पक्षापैकीं असेंब्लींत १-२ गृहस्थच शिल्लक राहिलेले दिसतात. पैकीं अमरनाथ दत्त यांची निवडणूक कॉंग्रेसच्या 'तिकिटा'वर झाली असतांनाहि आपणाला कॉंग्रेसच्या आज्ञेपेक्षां मतदारांची आज्ञा अधिक प्रमाण म्हणून त्यांनीं राजीनामा दिलेला नाहीं. अशा रीतीनें हा सगळा पक्ष खलास झाल्यामुळें, नॅशनॅलिस्ट पक्षाला त्यांच्या जागा देण्यांत आल्या आहेत अर्थात् पंडित मदन मोहन मालवीय हे पं. मोतिलाल नेहरू यांच्या जागीं लोकपक्षाचे प्रमुख म्हणून काम करूं लागले. पण पूर्वींहि, नॅशनॅलिस्ट पक्षाला त्याची संख्या १८।१९ म्हणून दुसऱ्या मानाची जागा मिळाली होती तरी सरकारला विरोध करण्याचें काम

त्याजकडून करून होतच होतें. तें आतां सरकारचे कायदेशीर प्रतिपक्षी म्हणून करणार इतकेंच काय तें.

* * *

या विरोधी पक्षाचा मान नॅशनॅलिस्ट पक्षाकडे न जातां दुसऱ्या एका पक्षाकडे कदाचित् जाईल अशी प्रथम बोलवा होती. त्याचा एक प्रकार असा कीं, सर्व मुसलमान सभासद मिळून एक गट व्हावा. त्याचें पुढारीपण बॅ. जिना यांजकडे द्यावें, आणि असें झालें असतां जगाच्या दृष्टीनें मुसलमान पक्षाला सहजच विशेष राजकीय महत्त्व प्राप्त होईल. पण ती अटकळ खरी ठरली नाहीं. आपल्या धर्महिताकरितां सगळे मुसलमान एक होतात असें असलें तरी राजकारणांत सर्व मुसलमान एक नाहींत, हें यावरून उघड झालें. तसेंच बॅ. जिना यांना मुसलमान सभासदांचा पाठिंबा नाहीं ही गोष्ट त्याचबरोबर जाहीर झाली. दुसरी एक बोलवा अशी होती कीं, जिना व पुरुषोत्तमदास यांचा जो हल्लीं स्वतंत्र पक्ष आहे त्यांत कांहीं मुसलमान आधींच आहेत. त्याच पक्षांत सर्व मुसलमान सभासद येऊन मिळतील व त्यांत एखाद दुसरा हिंदु असल्यामुळें ते मुसलमान पक्षाचें नांव न घेतां 'संयुक्त स्वतंत्र पक्ष' असें नांव घेतील. पण तीहि अटकळ खरी ठरली नाहीं. कॉंग्रेसमधून बहुतेक मुसलमान निघून बाहेर पडले एवढी गोष्ट मात्र खरी. त्याला निमित्त शारदा बिल किंवा तसलेंच दुसरें कांहीं असो; पण राउंड टेबल कॉन्फरन्सला अनुकूलता हेंच फुटीचें खरें कारण आंतून आहे असें म्हणतात.

* * *

तारीख १८ रोजीं असेंब्लीच्या सभासदांची सभा बोलावण्यांत आली होती. त्याप्रमाणें ती झालीहि. सभेला सुमारें २२-२४ सभासद हजर होते. आणि मूळ हेतूप्रमाणें सभेचा ठराव झाला. रा. केळकरांनीं मांडलेल्या या ठरावांत मुख्य तीन कलमें होतीं. (१) कायदेमंडळावर कॉंग्रेसनें घातलेला बहिष्कार हा देशाला अहितकारक आहे. (२) जे लोक कॉंग्रेसच्या 'तिकिटा'वर निवडून आले नाहींत अशा कांहीं थोड्या लोकांनीं इतरांचें पाहून राजीनामे द्यावे असें वाटत असल्यानें त्यांनीं राजीनामे देऊं नयेत. (३) कॉंग्रेसच्या 'तिकिटा'वर निवडून आलेल्या लोकांनींहि निदान चालू बैठकीचें काम मार्चअखेर संपेपर्यंत राजीनामे देऊं नयेत. याला गयाप्रसादसिंह यांनीं आणखी एक चौथें कलम जोडलें. तें असें कीं, जे लोक बहिष्कार

नापसंत म्हणून राजीनामे दिले असतांहि फिरून निवडणुकीस उभे राहतील त्यांना सर्वांनीं मदत करावी; किंबहुना त्यांच्या विरुद्ध उभे राहून कोणीहि त्यांना विरोध न केला तर तें अधिक बरें. कलम ३ व ४ हीं बहुमतासें पास झालीं. विरोध करणाऱ्या पांचचार सभासदांमध्यें एकदोनच काय ते हिंदु, बाकीचे मुसलमान होते. पण त्यांनींहि पहिल्या दोन कलमांना विरोध केला नाहीं.

* * *

कलम तीनमध्यें जी विशेष प्रकारची सूचना होती. तिचें कारण असें कीं, राष्ट्रीय सभेचा ठराव झाल्यानंतरहि कांहीं लोकांनीं राजीनामे दिले नाहींत इतकेंच नव्हे तर कायदेमंडळाचें काम प्रत्यक्ष केलें. उदाहरणार्थ, जम्नादास मेथा यांनीं तारीख ३ जानेवारी रोजीं व्हाइसरॉयसाहेबांनीं भरविलेल्या 'शिपिंग कॉन्फरन्स'मध्यें भाग घेतला! व गयाप्रसाद सिंह नीलकंठदास वगैरे कांहींनीं तर फायनॅन्स कमिटीमध्यें ता. १६ पर्यंत काम केलें! अर्थात् कॉंग्रेसच्या ठरावानंतर जसें हें काम कोणास करतां आलें, त्याचप्रमाणें चालू बैठकीच्या अखेरपर्यंत त्यांनीं जागा सोडल्या नसत्या तर हव्या होत्या. कारण त्यांच्या राजिनाम्यामुळें त्यांच्या मतदारसंघाचे प्रतिनिधी असेंब्लींत हजर नाहींत असा पुष्कळ काळ जाणार! आणि मतदारांना कौन्सिलबहिष्कार मान्य नसला तर जागा अशा रिकाम्या राहणें हें मतदारांना एक प्रकारचा अन्याय केल्यासारखेंच आहे. ता. १८ च्या सभेंतील या ठरावानें कॉंग्रेसच्या तिकिटावर निवडून आलेल्या सभासदांनीं राजीनामा देण्याचें फारसें थांबविलें नाहीं, तरी फेरनिवडणुकीला उभे राहून निवडून यावें अशाविषयीं तर अनेकांना स्फूर्ति उत्पन्न झाली यांत शंका नाहीं. ज्यांनीं त्यांनीं आपली इमानदारी संभाळावी हें ठीकच आहे. पण राष्ट्रीय सभेशीं खरोखर मतभेद झाला तर, उगीच लोकमताला भिऊन किंवा कॉंग्रेसचा नसता बडेजाव संभाळण्याकरितां म्हणून कोणी राजीनामे द्यावे व मतदारांचें नुकसान करावें ही गोष्ट देखील कांहीं चांगली नाहीं हें कोणीहि कबूल करील.

* * *

असेंब्लीचे अध्यक्ष ना. पटेल हे काय करतात याजकडे पुष्कळांचे डोळे सहजच लागून राहिले आहेत. याचें कारण ते राष्ट्रीय सभेचे अभिमानी

अशी पुष्कळांची समजूत होती व ती यथार्थ होती. पण राष्ट्रीय सभेविषयीं मनांतून इतर रीतीनें आदर असला तरी तिच्या चुकीला चूक म्हणूं नये हें गैर आहे, किंबहुना हा जुलूम होय असें म्हणणारांपैकींच पटेल हे एक आहेत. शिवाय कांहीं लोकांची समजूत होती त्याप्रमाणें पटेल हे गुजराथेंतून निवडून आले ते राष्ट्रीय सभेच्या तिकिटावर निवडून आलेले नाहींत. पुष्कळांना ही गोष्ट माहीत नाहीं कीं, कॉंग्रेसमधील बहिष्कारवाल्यांनीं विशेषतः पं. नेहरू यांनीं पटेल यांच्या निवडणुकीच्या वेळीं त्यांना बराच विरोध केला. त्यांच्याविरुद्ध उभें करण्याकरितां प्रतिपक्षीहिं पाहिला ! पण पटेल-बंधूंच्या वजनापुढें त्यांचें कांहीं चाललें नाहीं. कौन्सिलबहिष्कार हा पटेल यांच्यावर बंधनकारक नसला तरी, त्यांना मनांतून डळमळ वाटण्याला दुसरें एक कारण होतें तें असें कीं, आज इतके दिवस त्यांनीं अध्यक्षपदावर बसून एका अर्थानें रीतसर काम केलें तरी, दुसऱ्या एका अर्थानें सरकारला लोकमताचा विरोध बराच जाणवला. पण ते दिवस गेले. असेंब्लींतील मुख्य दोन लोकपक्षांचें त्यांना पाठबळ होतें म्हणून निभावलें ही गोष्टहि कांहीं खोटी नाहीं. या पक्षांत डळमळ असती तर पटेल यांच्यावर निंदा-व्यंजक ठराव पूर्वींच आला असता. मग आतां लोकपक्ष कमजोर झाला असें पाहून सरकार तें उट्टें काढून घेणार नाहीं कशावरून? पटेल यांच्या मनां-तील ही भीति पुष्कळशी खरी आहे, आणि याचें प्रत्यंतर कालच आलें. त्याचा प्रकार असा.

* * *

असेंब्लींत बॉंब पडला तेव्हां प्रेक्षक आंत सोडण्याची व्यवस्था अधिक चांगली कशी करावी हें ठरविण्याकरितां अध्यक्ष पटेल यांनीं एक कमिटी नेमली. तिच्यांतील बहुमतानें असें ठरलें कीं, सभागृहाच्या बाहेर पोलिसांनीं बंदोबस्त ठेवावा व खुद्द सभागृहांतील बंदोबस्त अध्यक्षांच्या हुकमानें व्हावा. विला-यतेंतील पार्लमेंटचा दाखला काढून पाहिला. त्यांतहि आढळलें कीं, सभा-गृहांतील बंदोबस्त 'स्पीकर'च्याच हुकमानें चालतो व तेथें पोलिसांना प्रवेश नसतो. इतक्याहि उपर साध्या पोशाखाचे दोन पोलीस गॅलरींत ठेवण्याला परवानगी द्यावी. परंतु कुरापत काढण्याच्या हेतूनें होममेंबर यांनीं आग्रह धरला कीं, सभागृहांत बंदोबस्त ठेवण्याची जबाबदारी पोलीसखात्यावर

असल्यामुळें डगलेवाले पोलीसहि सभागृहांत येऊं दिले पाहिजेत. या म्हणण्याला अध्यक्षांनीं नेमलेल्या कमिटींत बहुमत पडलें नाहीं. असें असतां परवां रविवारीं रात्रीं ९ वाजल्यानंतर दिल्लीच्या कमिशनरसाहेबांनीं अध्यक्ष पटेल यांना खलिता पाठविला कीं, " नेहमींप्रमाणें आमचे डगलेवाले पोलीस सभागृहांत उद्यां येतील." आणि या खलित्याला व्हाइसरॉयसाहेब बाहेर फिरतीवर आहेत असें पाहून तारेनें त्यांची संमति आणवून ठेविली होती ! हा खलिता आपल्या अधिकाराचा उपमर्द करणारा आहे असें अध्यक्षांना दिसून आलें. म्हणून त्यांनीं सोमवारीं सकाळीं कामाला प्रारंभ होण्यापूर्वीच त्या खलित्याला आपलें उत्तर वाचून दाखविलें. त्यांत आपल्या अधिकाराचें समर्थन करून, व नेहमींप्रमाणें डगलेवाले पोलीस हजर आहेत असें पाहून अध्यक्ष पटेल यांनीं गॅलरींतील सर्व लोकांना बाहेर घालवून देण्याचा हुकूम केला ! या हुकुमासंबंधानें आपणाला कांहीं सांगावयाचें आहे असें होममेंबर क्रेरर यांनीं उठून सांगण्याचा दोनतीनदां प्रयत्न केला; परंतु अध्यक्षांनीं त्यांचें बोलणें ऐकून न घेतां त्यांना खालीं बसविलें !

* * *

सुमारें पांच मिनिटांत सगळ्या गॅलऱ्या रिकाम्या झाल्या, व नंतर कामाला सुरुवात झाली. हा अकल्पित प्रकार इतका खटकेबाज झाला कीं, पब्लिक सेफ्टी बिलाच्या निकालाच्या दिवसाची लोकांना फिरून आठवण झाली. यापुढेंहि या प्रश्नाचा निकाल लागेपर्यंत प्रेक्षकांना तिकिटेंच देऊं नयेत असा हुकूम अध्यक्षांनीं फर्माविला. यांत प्रेक्षकांचा गुन्हा काय असा प्रश्न येतो. पण गॅलरींत प्रेक्षक येणार म्हणून डगलेवाले पोलीस येणार, अशी सांगड सरकारनें घातली म्हणून पोलीस हजर राहण्याचें कारणच अध्यक्षांनीं काढून टाकलें असा त्याचा अर्थ आहे. पण असें किती दिवस चालणार ? याचा कांहीं तरी निकाल लागलाच पाहिजे. आणि ह्याचे प्रकार दोन. ( १ ) व्हाइसरॉयसाहेबांनीं मध्यें पडून हा तंटा सामोपचारानें मिटवावा. किंवा ( २ ) सरकारनें आपला अधिकार चालवून पटेलांचा अधिकार अमान्य करावा. पैकीं पहिली गोष्ट झाली तर ठीकच आहे पण ही दुसरी गोष्ट झाली असतां, पटेल यांना आपल्या अध्यक्षपदाचा राजीनामा देणेंच प्राप्त. अर्थात् त्यांचें समर्थन करणाऱ्या लोकपक्षाला आपला तीव्र निषेध प्रकट करण्यासारखें कांहीं तरी करावें लागेल. परंतु आज हे तर्क आहेत. ता. २३ रोजीं व्हाइस-

रॉय दिल्लीला परत येणार व ता. २५ रोजीं असेंब्लींत भाषण करणार असें ठरलें असल्यामुळें, या दोन दिवसांत कांहीं तरी खलबत होईल असा पुष्कळांचा तर्क आहे. पण तसें न झालें व व्हाइसरॉयसाहेबांना मोकळ्या गॅलरीपुढें व मोकळ्या सभागृहांत भाषण करण्याचा प्रसंग आला तर, मग चालू बैठकीचा निकालच लागला असें समजण्यास हरकत नाहीं. काय होतें तें पाहावें.

## पत्र नं. २

ता. २८-१-३०

चालू आठवड्यांत एकच मुख्य विषय लोकांच्या तोंडीं आहे. तो हा कीं, अध्यक्ष पटेल हे काय करणार? राजीनामा देणार, कीं अपमान गिळून खुर्चीवर राहणार, कीं सरकारवर आणखी एकदां मात करणार, कीं कांहीं तरी समेट होईल असें तडजोडीचें धोरण स्वीकारणार? मागील पत्र लिहिलें त्या वेळीं व्हाइसरॉय दिल्लीला आले नव्हते. इतर कित्येक पक्षांचे पुढारीहि आले नव्हते. फक्त अध्यक्ष पटेल व होममेंबर क्रेरर हे युद्धाकरितां आपापले खंदक खणून त्यांत उतरून बसले होते. पटेल यांचें म्हणणें "असेंब्लीच्या इमारतीवर माझा अधिकार." क्रेरर यांचें म्हणणें "तो अधिकार तुमचा नाहीं, आणि तुम्ही डगलेवाल्या पोलिसांना आंत येऊं देत नाहीं, असें म्हणण्यांत कायद्याचें अतिक्रमण केलें आहे." खंदकांत उतरलेल्या या योद्ध्यांचे एकमेकांवर प्रत्यक्ष गोळीबार मात्र चालू नव्हते. कारण या गोळ्या असेंब्लीच्या गॅलरींत दिसावयाच्या. पण गॅलरी मोकळी नाहीं म्हणून पोलीस नाहीं व आंत पोलीस नाहीं म्हणून झगडा नाहीं.

* * *

पण व्हाइसरॉय दिल्लीस आल्यापासून या प्रश्नाचा निकाल लावण्याची कारवाई जोरानें सुरू झाली आहे. ता. २५ पर्यंत, म्हणजे आपलें भाषण होऊन जाईपर्यंत, व्हाइसरॉयांनीं कांहींच केलें नाहीं. ता. २६ रोजीं पटेल यांनीं त्यांना बोलावून घेतलें. त्या भेटींत पटेल यांनीं व्हाइसरॉयांना अथपासून इतिपर्यंत कागदपत्रावरून सर्व हकीकत एक तासभर समजावून दिली व असें सांगितलें कीं, "ता. १४ पर्यंत सर्व गोष्टी सुरळीत चालल्या होत्या. क्रेरर व आपण यांच्यामध्यें कांहीं मतभेद उरला नव्हता. पण त्यापुढें स्थिर झालेल्या या ताजव्याला आंतून कोणी तरी धक्का दिला खास. म्हणून

ता. १८ पासून क्रेरर यांनीं कमिशनर टॉम्सन यांचा आश्रय करून उलट खाल्ली! व माझा उपमर्द करणारा हुकूम ता. १९ रोजीं रात्रीं एकाएकी मला फर्माविला. म्हणून मलाहि माझ्या अधिकाराचा प्रभाव दाखवावा लागला. या कामीं तुम्ही बाहेर असतां त्यांनीं तुमची संमति घेतली, पण आतां तुम्ही समक्ष आलां आहां तर या प्रश्नाचा उलगडा करा."

* * *

पण व्हाइसरॉयांचा हात क्रेरर यांनीं आधींच तारेनें बांधला असल्यामुळें त्यांना हो-नाहीं कांहींच म्हणतां येईना. म्हणून "मी कांहीं वेळ घेऊन या गोष्टीचा विचार करतों" इतकेंच बोलून त्यांनीं कानांवर हात ठेवले म्हणतात. पण रंग असा दिसतो कीं, या प्रसंगीं व्हाइसरॉय हे क्रेरर यांनाच बहुधा उचलून धरतील. कारण एक तर आपला शब्द गेला आणि दुसरें असें कीं, एक्झिक्युटिव्ह कौन्सिलनें जाहीर पत्रक काढून त्यांत पटेल यांचें वर्तन बेकायदेशीर आहे असें स्पष्ट विधान खिळा ठोकून केलें. त्यांना कायदेपंडितांचाहि सल्ला असा मिळाला म्हणतात कीं, पटेल यांचें वर्तन बेकायदेशीर झालें व सर्वांत महत्त्वाची गोष्ट ही कीं, आतां पुष्कळसे लोक उठून गेल्यामुळें, असेंब्ली दुर्बळ झाली आहे! एवंच, प्रस्तुतचा विरोधयोग पटेल यांना अशुभ दिसतो. आणि पटेल यांचाहि झोंक हा बार एकदां उडवून टाकावा असाच दिसतो.

* * *

ता. २५ रोजीं व्हाइसरॉय यांनीं केलेल्या भाषणावरील लोकमत आतां प्रसिद्ध झालें आहे. नॅशनॅलिस्ट पक्षांत बरीच भवति-न-भवति होऊन शेवटीं त्याच्यावर असमाधानकारक असाच शेरा मारण्यांत आला. असेंब्लींतील इतर पक्षांनीं मात्र व्हाइसरॉयांची पाठ थोपटली. पण सर्वांनाच असें वाटलें कीं, ता. ३१ ऑक्टोबरच्या भाषणांत जें धोरण होतें तें या भाषणाच्या वेळीं राहिलें नाहीं. मग कदाचित् वरून आलेल्या हुकुमाचा अगर इशाऱ्याचा तो परिणाम असेल. स्वातंत्र्याच्या चळवळींसंबंधानें बोलतांना, कायदेभंगाची चळवळ देखील त्यांनीं बेकायदेशीर म्हणून भरडून टाकली! राउंड टेबल कॉन्फरन्स खास भरविणार इतकी एकच गोष्ट त्यांच्या भाषणांत निश्चित होती. पण त्याचीहि रूपरेषा त्यांना पूर्वीपेक्षां अधिक मांडतां आली नाहीं. कोणी म्हणतात, "कॉन्फरन्स येत्या मे महिन्यामध्यें बोलावणार." कोणी म्हणतात, "पुढल्या वर्षाच्या मे महिन्यापर्यंतहि ती पुढें

ढकलली जाईल. कारण नव्या निवडणुकी येत्या ऑक्टोबरमध्यें होतील. त्यानंतर विलायतेला जावयाचें तर थंडीची मोठी गैरसोय. त्यानंतर लगेच नव्या असेंब्लीची पहिली बैठक होणार." अशा रीतीनें टाइमटेबल एप्रिल-पर्यंत आंखलें गेलें, असें होतें.

* * *

काँग्रेसनें राउंड टेबल कॉन्फरन्स फेटाळली तेव्हां आतां लिबरल पक्षाचे पुढारी सर तेजबहादुर सप्रू यांनीं पुढें होऊन सर्व-पक्षीय परिषद बोलावण्याचा उपक्रम सुरू केला आहे. त्यांनीं शेंकडों लोकांना या बाबतींत पत्रें पाठविलीं व कांहींचीं अनुकूल उत्तरेंहि त्यांना गेलीं आहेत. पण काँग्रेस पक्ष यांतून निघून गेल्यामुळें या परिषदेचा पाय अर्थात् लंगडा झाला आहे. लाहोर येथें मुख्य ठरावाला अशी परिषद बोलवण्याबद्दल कांहीं उपसूचना करण्यांत आल्या होत्या. त्यांचा आधार घेऊन, राष्ट्रीय पक्षांतील लोकांना असें म्हणण्यांत येतें कीं, "तुम्ही ही परिषद बोलावण्यांत सामील कां होत नाहीं?" पण त्याला पहिलें उत्तर असें कीं, "परिषद बोलवावी असें मत मालवीय, केळकर यांनीं काँग्रेसपुढें मांडलें तें मुख्यतः काँग्रेसला उद्देशून होतें. लिबरल पक्षाला उद्देशून नव्हतें." शिवाय परिषदेंत लिबरल पक्षाचा मुख्य हेतु हिंदु-मुसलमानांतील राजकीय मतभेद काढून टाकण्याचा आहे, डोमीनियन स्टेटस-संबंधीं विशेष विचार करण्याचा नाहीं. पूर्वीच्या परिषदेंत संस्थानिकांचे प्रतिनिधी नव्हते. आतां तेहि येणार! अशा रीतीनें नेहरू रिपोर्टांतील किमान मागण्यांपैकीं कांहींचा संक्षेप करण्यांत येईल ही राजकारणाच्या दृष्टीनें एक उणीव; व मुसलमानांच्या मागण्या मान्य करण्याविषयीं हिंदूंना बेसुमार भीड घालण्यांत येईल ही दुसरी उणीव. मिळून परिषद भरविण्याला पूर्वीपेक्षां कमी अनुकूल मत प्रकट होत आहे. कारण व्हाइसरॉयांच्या भाषणानेंहि यावर थोडेंसें विरजण पडलें आहे.

* * *

पं. नेहरू हे असें म्हणणाऱ्यांपैकीं होते कीं, "मुसलमानांच्या समाधानाकरितां हिंदूंनीं त्यांच्या कांहीं कांहीं गोष्टी कबूल कराव्या!" पण त्यांची अखेर खात्री झाली कीं, अमुक एका मर्यादेपलीकडे मुसलमानांच्या मागण्या मान्य करा असें म्हणणें हें हिंदूंना अन्यायाचें तर आहेच, पण राष्ट्राच्या दृष्टीनेंहि तें हिताचें नाहीं! अशा रीतीनें नेहरू हे हिंदूंना भीड किती घालतील याची

कमाल मर्यादा कळून चुकली होती. परंतु या कामीं लिबरल पक्षाची भूक नवी ताजी दिसते. म्हणजे नेहरू रिपोर्टपलीकडेहि बरेंच जाऊन मुसलमानांच्या मागण्या मान्य कराव्या अशी हिंदूंना भीड घालण्याचा त्यांचा विचार दिसतो. निदान लिबरल पक्षानें या मागण्यांच्या तपशिलांत जाऊन, आपलें स्पष्ट मत आजवर सविस्तर कोठें प्रकट केलेलें नाहीं! म्हणून हिंदु सभेला सहजच वाटतें कीं, सर्वपक्षीय परिषदेला म्हणून जावें व राजकारणाचा विचार व डोमिनियन स्टेटस मागण्याची तत्परता बाजूस राहून सगळी झोड उठावयाची किंवा रण माजवायचें तें हिंदु-मुसलमानांच्या प्रश्नावर! आणि या प्रश्नावर तर हिंदु सभा व मध्यवर्ती मुसलमान पक्ष किंबहुना बॅ. जिना यांनीं आप-आपलें म्हणणें इतकें स्पष्ट केलें आहे कीं, त्यांत इकडे तिकडे करण्याला फारसा वाव नाहीं! अर्थात् परिषदेंत जाऊन सर्वांचीं बोलणीं खाऊन, सर्वांची भीड मोडून, नांवें ठेवून घेऊन परत यावें, त्यापेक्षां 'परिषदेंत येत नाहीं, तुम्हालाच काय सुचवावयाचें तें सुचवा' असें हिंदु सभेच्या पुढाऱ्यांना वाटणें स्वाभाविक आहे. म्हणून पुष्कळांचें म्हणणें असें कीं, डॉ. सप्रू व लिबरल पक्ष यांना जर या परिषदेच्या कामीं पुढाकार घेण्याची इच्छा असेल तर त्यांनीं हिंदु-मुसलमानांचे प्रश्नासंबंधानें यापुढें मुग्ध बसून चालणार नाहीं. त्यांना सयुक्तिक कोण व अयुक्तिक कोण व किती हें खुलासेवार बोललेंच पाहिजे. नुसती आम्ही मध्यस्थी करतों किंवा दोघांची समजूत घालतों असें बोलून भागणार नाहीं.

* * *

राउंड टेबल कॉन्फरन्ससंबंधीं विचार करण्याकरितां हिंदु सभेच्या ऑल-इंडिया कमिटीची बैठक तारीख १८ व १९ या दोन दिवशीं डॉ. मुंजे यांच्या अध्यक्षतेखालीं झाली. तींत दोन गोष्टी मुख्य ठरल्या. राउंड टेबल कॉन्फ-रन्सला मुसलमानांचे पुढारी गेले तर हिंदु सभेनेंहि आपले प्रतिनिधी पाठवावे. कारण ब्रिटिश प्रधानमंडळापुढें दोनहि बाजू खुलासेवार मांडल्या गेल्या पाहिजेत. एकट्या मुसलमानांची बाजू मांडली गेली तर हिंदु सभा हट्टी व अविवेकी आहे अशा गैरसमजाची भर अज्ञानांत पडावयाची. हिंदु सभेनें आपले प्रतिनिधी पाठविल्यास या दोनहि गोष्टी टळतील. या सभेंत दुसरी गोष्ट ठरली ती अशी कीं, हल्लीं होणाऱ्या पोट निवडणुकींत हिंदु सभेनें प्रत्यक्ष आपले उमेदवार म्हणून कोणी उभे न केले तरी, इतर उमेदवारांना मदत

देतांना किंवा विरोध करतांना, ते उमेदवार हिंदु सभेचें हित पाहतील कीं नाहीं याचा पक्का विचार करून त्याप्रमाणें मदत करावी किंवा विरोध करावा. निवडणुकींत काँग्रेसनें अंग काढून घेतल्यामुळेंच ही जरूरी कांहीं अंशीं भासूं लागली आहे. तथापि हिंदु महासभेनें राष्ट्रीय दृष्ट्या ही खबरदारी घेतली आहे कीं, ज्यांना मदत करावयाची ते उमेदवार स्वराज्याच्या मागणीला अनुकूल असलेच पाहिजेत. अशा रीतीनें सभेनें राजकारण व जातिहित यांचा मेळ घातला आहे.

* * *

बॅ. जिना हे असेंब्लीला आल्यानंतर सर्व मुसलमानांची मिळून एक पार्टी कदाचित् बनवतील व ते त्याचे अध्यक्ष होतील किंवा हल्लींच्या स्वतंत्र पक्षांतच सर्व मुसलमान सभासदांचा समावेश करून घेतील अशी बोलवा असल्याचें मागील पत्रीं लिहिलें होतें. परंतु ती गोष्ट घडत नाहीं असें आतां निश्चित म्हणतां येईल; कारण जिना यांनीं असें स्पष्ट सांगितलें म्हणतात कीं, "मुसलमानांची म्हणून वेगळी पार्टी करणार असाल तर मी तींत सामील होत नाहीं व उलट मुसलमान म्हणतात कीं, "अशी पार्टी तुम्ही न कराल तर आम्ही तुम्हाला पुढारी करीत नाहीं." एवढेंच नव्हे तर जिना यांनीं नॅशनॅलिस्ट पक्षाचे सेक्रेटरी रा. अणे यांच्याजवळ गोष्ट काढली म्हणतात कीं, आमचा स्वतंत्र पक्ष व तुमचा नॅशनॅलिस्ट पक्ष या दोघांचा मिळून एक पक्ष करण्याला देखील आमची हरकत नाहीं. या गोष्टीला नॅशनॅलिस्ट पक्ष तयार आहे. परंतु स्वतंत्र पक्षांतील कांहीं लोकांच्या आग्रहामुळें ही गोष्ट देखील घडणार नाहीं. कॉंग्रेस पक्ष निघून गेल्यामुळें असा संयुक्त पक्ष बनवितां आला असतां तर एका अर्थी तें चांगलेंच झालें असतें, पण तसा योग दिसत नाहीं एवढें खरें. पण अशी गोष्ट न घडण्याला आणखीहि एक कारण असें आहे कीं, अध्यक्ष पटेल यांनीं उत्पन्न केलेल्या निकराच्या प्रश्नाचा निकाल जोंपर्यंत लागला नाहीं तोंपर्यंत सगळ्याच गोष्टी डळमळीत आहेत. म्हणजे समजा कीं, अध्यक्ष यांनीं आपल्या जागेचा राजीनामा दिला तर कदाचित् नॅशनॅलिस्ट पक्षाचे सभासद, त्यांनीं राजीनामेच न दिले तरी अध्यक्ष पटेल यांच्याबरोबर निघून जातील. आणि तसें झालें म्हणजे असेंब्लींत युरोपियन व मुसलमान एवढे दोनच पक्ष उरणार ! आणि मग सर्व कामकाज झपाट्यानें निकालांत

निघून ता. २२ मार्च रोजीं असेंब्ली खलास व्हावयाची ती मार्चच्या पहिल्या आठवड्यांतच कां न होईल!

## पत्र नं. ३

ता. ३०-१-१९३०

प्रेसिडेंट पटेल यांच्यासंबंधीं रोज खलबतें सुरू आहेत. मि. मूर हे अध्यक्षांवर प्रत्यक्ष निंदाव्यंजक ठराव न आणतां तशा अर्थाचा पण प्रेक्षकांना गॅलऱ्या खुल्या कराव्या, त्या न करण्यानें बाहेरच्या जनतेला अन्याय होतो, अशा अर्थाचा ठराव मांडण्याची सूचना ता. २१ रोजींच पुढें आणणार होते. पण तसें करूं नये असा इशारा त्यांना सरकार पक्षाकडून मिळाला, म्हणून त्यांनीं आपली सूचना त्या दिवशीं मागें घेतली. वरील सरकारी इशाऱ्याचें कारण असें कीं, व्हाइसरॉय दिल्लीला आले नव्हते व त्यांच्या संमतीशिवाय वरील ठरावाला सरकारी सभासदांना संमति देतां येत नव्हती. पण फिरून तारीख २८ रोजीं सभा सुरू होतांच 'मला या विषयावर एक सूचना करावयाची आहे, परवानगी द्याल का?' असें त्यांनीं विचारलें. त्याला अध्यक्षांनीं उत्तर दिलें कीं, 'रीतसर नोटीस द्या म्हणजे मग पाहूं.' यामुळें याहि वेळीं मि. मूर यांना कांहीं करतां आलें नाहीं. मि. मूर हे 'स्टेट्समन' पत्राचे संपादक आहेत इतकें सांगितलें म्हणजे त्यांचा उद्देश कळून येईल. सरकार पक्षाकडून अद्यापि मदतीचें आश्वासन मिळालेलें नाहीं किंवा खासगी युरोपियन सभासदांनींहि पार्टीतर्फे त्यांना आश्वासन दिलेलें नाहीं.

* * *

व्हाइसरॉयसाहेबांनीं जिना, झुल्फिकर अल्लीखान, सर डार्सी लिंडसे व जयकर यांच्या गांठी या कामीं यापूर्वींच घेतल्या आहेत. पण आतां स्वतः क्रेरर यांच्याकडूनहि या लोकांच्या भेटी घेण्याची इच्छा प्रदर्शित करण्यांत आली आहे. दुसरे पक्षीं अध्यक्ष पटेल यांनीं चार दिवसांपूर्वीं जिना, पुरुषोत्तमदास, केळकर व अणे यांना आपल्या घरीं बोलावून दोन तास चर्चा केली. त्यानंतर फिरून ता. २९ रोजीं आपल्या ऑफिसांत वरील गृहस्थांना व त्यांच्याचबरोबर झुल्फिकर अल्लीखान व डार्सी लिंडसे यांना बोलावून चर्चा केली. तींत उभयपक्षांचा अपमान न होतां, कांहीं तरी मधला मार्ग काढावा असें ठरून एक मसुदाहि तयार करण्यांत आला व त्याचा विचार पटेल हल्लीं

करीत आहेत. 'गॅलरींत संरक्षणाकरितां अध्यक्ष व पोलीस-अधिकारी यांच्या विचारें कांहीं जवान ठेवावे, पण त्यांना तेथल्यापुरता हुकूम करण्याचा अधिकार अध्यक्षांना असावा. शिवाय प्रत्यक्ष पोलीस-युनिफॉर्मशिवाय दुसरा एखादा कांहीं खुणेचा डगला त्याचे अंगावर असावा. आणि ही व्यवस्था तात्पुरती समजावी व गॅलऱ्या खुल्या कराव्या आणि मग वॉच अँड वॉर्ड कमिटीच्या सूचना अमलांत आणण्याची योग्य ती कारवाई करावी अशा अर्थाचा तो मसुदा आहे; आणि पटेल यांनीं तो मान्य केला तर व सरकारनेंहि मान्य केला तर सगळाच प्रश्न सुटला. भांडण खरें आजचें आहे. उद्यांच्या कायमच्या व्यवस्थेचें नाहीं. त्यावर एकमत होण्यासारखें आहे, पण आज अडचण आहे ती दोनहि पक्षांच्या मानापमानाची.

* * *

गेल्या आठवड्यांत रा. केळकर व अणे हे मीरत येथील तुरुंगांत जाऊन, तेथील रा. ठेंगडी, डांगे-प्रभृति मंडळींना भेटून आले. डॉ. मुंजे यांना रोटरी क्लबापुढें व्याख्यानाचें निमंत्रण आल्यामुळें ते जाऊं शकले नाहींत. पं. ठाकुरदास भार्गव हेहि गेले होते. जेलच्या कचेरींत सुमारें दीड तास संभाषण झालें. बहुतेक लोकांची प्रकृति चांगली आहे व तुरुंगांतील वागणुकीसंबंधानें तूर्त तरी कांहीं तक्रारी नाहींत. पण आतां सेशनपुढें जो खटला चालणार त्याच्या डिफेन्सची तजवीज कशी होणार याची मात्र चिंता वाटते. रा. देवकीप्रसाद सिंह व अन्सारी यांनीं आतांपर्यंत खटला स्वार्थत्यागपूर्वक चालविला; पण सेशनमधील खटला आणखी ६ महिने चालणार त्याचें काय? कारण दिल्ली येथील मध्यवर्ती डिफेन्स कमिटीजवळ आतां फक्त एक दोन हजार रुपयेच शिल्लक आहेत. मुंबईच्या गिरणी-कामगार मंडळींकडून व इतर एक-दोन ठिकाणांहून मिळून पैसे येण्याची अपेक्षा आहे. त्याप्रमाणें ते आले तरी त्याच्या दुप्पट-तिप्पट पैसे हल्लींचा खर्च चालू ठेवण्यासच लागतील. मग कोणी मोठ्या दर्जाचा बॅरिस्टर सहा महिने पोसणार कसा किंवा तो सहा महिने फुकट काम करील अशी अपेक्षा तरी कशी करावी! कमिटीतर्फे श्री. श्रीनिवास अय्यंगार यांना तार करण्यांत आली आहे व ते आले तर खर्च पडणार नाहीं. पण ते येतीलसें वाटत नाहीं. बॅ. जयकर यांनीं मधून मधून जाण्याचें कबूल केलें आहे. पण त्यांचा मुक्काम येथें अध्यक्षांच्या भानगडीमुळें मार्चअखेर तरी होतो कशावरून? तथापि तूर्त

डिफेन्स कमिटी मोडूं नये; फेब्रुवारी अखेरपर्यंत कसें तरी निभवावें व पुन्हा एकदां वर्गणीकरितां जाहीर विनंति करावी असें ठरवण्यांत आलें आहे.

* * *

लिबरल फेडरेशनचे अध्यक्ष सर तेजबहादुर सप्रू हे काल-परवां दोन दिवस येथें आले होते. त्यांनीं आलटूनपालटून मुसलमान पुढाऱ्यांच्या व हिंदु पुढाऱ्यांच्या भेटी घेतल्या. मुसलमानांतर्फे मौ. शफी दाउदी, जिना, महंमहअल्ली, मौ. महमद याकूब यांनीं चर्चा केली. पण त्यावरून आगाखानी कंपूचा या लोकांत कांहीं थोडा समावेश होता असें म्हणतां येईल. पण ते तरी कोणी सांगावें ? कारण मुसलमानसंघाची त्रिमूर्ति तीन तोंडांनीं तीन आवाज काढीत असते. म्हणून वरील प्रतिनिधींत दोन तोंडें एक झालीं असें मानलें तरी तिसरें तोंड काय म्हणेल कोणास ठाऊक ?

* * *

डॉ. सप्रू यांनीं मुंजे, केळकर, अणे व जयकर यांची एकत्र गांठ रा. जयकर यांच्या खोलींत घेतली. सुमारें दोन तास चर्चा झाली. मुसलमानांचें म्हणणें थोडथोडें त्यांनीं सांगितलें. तें सर्व तसेंच टिकलें तर दुतर्फी चर्चेला कांहीं थोडी जागा व आशा आहे असें म्हणतां येईल. या चौघांनींहि डॉ. सप्रू यांना असें सांगितलें कीं, हिंदु पुढारी एकीच्या मार्गांत आडवे येत आहेत ! पण हा निव्वळ गैरसमज किंवा वृथा आरोप आहे. जेथें पं. नेहरू-सारख्यांनीं मुसलमानांचें समाधान करण्यांत हात टेकले तेथें आमच्या-सारख्यांचा काय पाड ? सुदैवानें हिंदु सभेला दोनतीन तोंडें नाहींत. ती प्रायः एकाच तोंडानें बोलते व पं. मदन मोहन मालवीय यांच्यासारखे हिंदु सभेचे आद्य पुढारी तर डॉ. मुंजे यांच्यापेक्षांहि मुसलमानांना थोडे अधिक झुकतें पारडें करावयास तयार आहेत. खरी अडचण पंजाब प्रांतांतील हिंदु व शीख व पेशावर प्रांतांतील हिंदु यांचीच आहे. पण ती अडचण आहे, आणि आडकाठी नव्हे; व ती अडचणहि तेथील मुसलमानांच्या आग्रहामुळेंच आहे. बंगाल्यांतहि अडचण तशीच आहे. पण बंगाली पुढारी हिंदु सभेच्या दृष्टीनें पाहत नाहींत, स्वतःच्या समाजाकडे दुर्लक्ष करतात हें बॅ. दास यांच्या पूर्वीच्या उदाहरणावरून दिसून आलेंच आहे.

* * *

डॉ. सप्रू यांच्या पत्रांना केळकर, जयकर, अणे व मुंजे यांची जवळ जवळ एकाच अर्थाचीं उत्तरें गेलीं होतीं. त्यांचा मतलब इतकाच होता कीं, सर्व-पक्षीय परिषद बोलावण्याची खटपट तुम्ही करतां ती आम्हालाहि पसंत आहे; परंतु ती सायमन कमिशनचा रिपोर्ट प्रसिद्ध झाल्यावर बोलावली असतां अधिक फायदा होईल. शिवाय हिंदु-मुसलमान यांनीं आपापलें म्हणणें पूर्वींच अनेक वेळां प्रसिद्ध केलें आहे. पण लिबरल पक्षानें या प्रश्नाचा अद्यापि खोल विचार केलेला दिसत नाहीं. तरी त्यांनीं आतां यांत लक्ष घालून आपलेंहि नक्की काय म्हणणें आहे हें विचारपूर्वक स्पष्ट जाहीरपणें मांडावें, म्हणजे स्वतः मध्यस्थी करणारांचीं मतें तरी काय आहेत हें कळून येईल. मग त्यांच्या मध्यस्थीचा झाला तर अधिक उपयोग होईल ही गोष्ट डॉ. सप्रू यांनीं जरी आपल्या सर्व पक्षांतर्फे मान्य केली नाहीं तरी खासगी चर्चेंत त्यांचीं मतें थोडथोडीं कळलीं. पण दुर्दैवानें मुसलमान मागतील तें सर्व द्या असें मोघम म्हणणारे त्या पक्षांत अनेकजण असल्यामुळें सर्व भीड आपल्यावरच पडेल, असें हिंदूंना वाटतें व त्या भीतीचें प्रथम निराकरण झालें पाहिजे.

* * *

तारीख ४ फेब्रुवारी रोजीं जी. आय. पी. रेल्वेवर कमींत कमी एक दिवसाचा व कदाचित् दोन–आठवड्यांचा संप होणार असें ठरल्याचें प्रसिद्ध झालें आहे. या बाबतींत मध्यस्थी करावी अशा अर्थाच्या तारा रा. अणे व रा. केळकर यांना आल्यावरून त्यांनीं काल रोजीं रेल्वे-सभासदांची मुलाखत घेतली व असेंहि ठरलें कीं, रेल्वे यूनियनचे प्रतिनिधी दिल्लीला बोलावून घेऊन त्यांचा अदमास अंदाज घेऊन मग फिरून ता. १ फेब्रुवारी रोजीं रेल्वे बोर्डाची दुसरी मुलाखत घ्यावी व रेल्वेचे अधिकारी कोणत्या मागण्या कबूल करण्याला तयार आहेत हें किमान पक्षीं विचारून नंतर काय तो सल्ला मध्यस्थांनीं द्यावा. यूनियनचे प्रतिनिधी उद्यां सकाळीं येथें येऊन चर्चा होईल व त्या धोरणानें रेल्वे बोर्डाशीं चर्चा करून संप थांबवावा अशी खटपट करण्यांत येईल; मग प्रत्यक्ष काय घडतें तें पाहावें. तूर्त रेल्वे बोर्डाचा असा निर्धार दिसतो कीं, मुख्यतः कायद्याच्याच मुद्द्यावर रेल्वे यूनियनच्या लोकांना नडवावें. पण यूनियनच्या लोकांनींहि कायद्याचा सल्ला घेतला असल्यामुळें व या दृष्टीनें संपाचें परिणाम भोगण्याची तयारी मनानें केली

असल्यामुळें या मुद्द्यावरच तुटलें तर संप होईल; पण कांहीं कांहीं तक्रारी तरी दूर करण्याचें आश्वासन मिळालें तर कदाचित् संप टळेल.

## पत्र नं. ४

ता. १८-२-३०

गेल्या पंधरवड्यांत असेंब्लीमध्यें प्रत्यक्ष काम असें थोडें झालें व झालें त्याची हकीकत तारीखवार केसरींत आलीच आहे. काम इतकें थोडें कीं, कांहीं दिवशीं तें एका तासांतच संपलें. फक्त खासगी बिलें व ठराव यांच्या दिवशीं मात्र बैठक चार पांच वाजेपर्यंत चालली. नेहमीं कौन्सिल ऑफ स्टेटमध्यें कामासंबंधानें जो संक्षेप दिसून येतो तसा कांहीं अंशीं हल्लीं असेंब्लींत आला आहे. प्रश्नांची संख्या पूर्वीहून कमी. कोणी बिचाऱ्यांनीं प्रश्न पाठविले असले तर त्यांपैकीं कांहीं राजीनामा देऊन घरीं बसलेले! यामुळें नेहमींप्रमाणें सबंध तासभर प्रश्नोत्तरांची चर्चा अशी फार थोडे दिवस झाली. खासगी बिलें व ठराव यांच्यावरील वाद मात्र नेहमींप्रमाणें दुतर्फी भरदार झाला. डॉ. मुंजे यांचा ठराव उपसूचनेंत गुंडाळला गेला तरी लष्करी शिक्षणाच्या प्रश्नाकडे लोकांचें लक्ष वेधण्याचें काम त्यानें केलें. बॅ. जयकर यांच्या विद्याधनाच्या बिलाला तत्त्वतः हरकत कोणी घेतली नाहीं. परंतु लग्नासंबंधींच्या बिलाला चहूंकडून कसून विरोध झाला. पण हें बिल स्वतः जयकरांचें म्हणण्यापेक्षां डॉ. गौर यांच्या बिलाची घोरपड त्यांच्या गळयांत पडली होती असें म्हणण्यास हरकत नाहीं.

* * *

या सर्व अवधींत पूर्वीच्या पंधरवड्याप्रमाणेंच काम चालू होतें, तरी सभासदांचें मन बरेचसें ठिकाणावर नव्हतें. अध्यक्षांच्या वादाचा निकाल काय होणार या संशयाच्या धुक्यांत सर्वांचीं मनें वावरत होतीं. असें समजा कीं, करकरीत संध्याकाळीं अर्धवट अंधाऱ्या खोलींत आळसामुळें दिवा न लावतां स्नेही मंडळी गप्पा मारीत बसतात, तशांतला प्रकार झाला होता. अनिश्चितपणाच्या अंधारामुळें कोणाचें तोंड कोणास दिसत नव्हतें. कोण आला, कोण उठून गेला, याची क्षिति कोणी करीत नव्हता व शेवटीं तर सभासदांना असें वाटूं लागलें कीं, या वादाचा काय सोक्षमोक्ष होणार तो होऊन स्वच्छ

प्रकाश तरी पडावा किंवा येथून उठून तरी जावें. पण काम चालू असतां हातचें टाकून जाववत नाहीं म्हणूनच मुक्काम! अध्यक्ष पटेल हे मात्र खमंग खरे. कारण आज जवळ जवळ एक महिनाभर असेंब्लीच्या गॅलऱ्या त्यांनीं मोकळ्या ठेवल्या आहेत. मध्यंतरीं मि. मूर व आचार्य यांनीं उचल खाल्ली होती. पण एकाला त्यांच्या युरोपियन स्नेह्यांनीं व दुसऱ्याला हिंदी स्नेह्यांनीं थोपटून चुचकारून धरलें. हेतु हा कीं, परस्पर काय व्हावयाचें तें होवो, पण एखाद्या तिऱ्हाईत व्यक्तीनें, चांगली होणारी गोष्ट अकाली तोंड फोडून उगीच बिघडवावी कां? समेटाच्या चर्चेंत निरनिराळ्या पक्षांच्या पुढाऱ्यांनीं पटेल यांच्या बंगल्यावर, जयकरांच्या बंगल्यावर, जिनांच्या बंगल्यावर, पंडित मदन मोहन यांच्या बंगल्यावर, केररसाहेबांच्या बंगल्यावर व गव्हर्मेंट हाउसमध्यें व्हाइसरॉयसाहेबांच्या बैठकीच्या जागीं किती वेळ खर्चला असेल, किती मसुदे उलटे-पालटे केले असतील, लिहिले-फाडले असतील हें सांगणें कठीण.

* * *

व्हाइसरॉयसाहेब व व्यक्तिशः एकेक पुढारी किंवा पुढाऱ्यांचा मेळा यांचीं खलबतें दोन दोन काय पण तीन तीन तासहि कित्येक वेळां चाललीं व एक्झिक्युटिव्ह कौन्सिलच्या तीन-चार बैठकींत मिळून सुमारें १२-१४ तास तरी या विषयाची चर्चा झाली असेल. पण अजूनहि या कटकटीच्या प्रसूति-वेदना थांबत नाहींत, मग मुलगा का मुलगी हें कोण कसें सांगणार? स्वतः पटेल हे तर बाहणा करण्यांत इतके निष्णात आहेत कीं, त्यांना एकामागून एक भेटून आलेले दोघे गृहस्थ बरोबर एकमेकांच्या उलट बातमी सांगतात व अनुमानें काढतात! या सर्व वाटाघाटींत व्हाइसरॉयसाहेब यांनीं दाखविलेला धीमेपणा हा मात्र वाखाणण्यासारखा आहे. दोन टोकांवर उभे राहिलेले पटेल व आपले एक्झिक्युटिव्ह कौन्सिलर या दोघांचेंहि समाधान करीत व सांभाळून घेत घेत ते कांहीं तरी मध्यम मार्ग निघेल तर पाहत होते. कारण एका बाजूला जरी सरकार पक्षाचें बहुमत ठाम असल्यानें ते निंदाव्यंजक ठराव पास करून घेऊन, पटेल यांची बेअब्रू करूं शकतील, तरी दुसऱ्या बाजूला अध्यक्षालाहि असा अधिकार आहे कीं, त्याचें डोकें फिरलें तर असेंब्लीला "या क्षणापासून कायमची तहकुबी दिवस न ठरवितां दिली (Adjourned sine-die)" असें म्हणून

स्वतः उठून जाऊन त्यांना असेंब्लीला कुलूप घालतां येईल. मग काय व्हावयाचें तें होवो. पण दोनहि गोष्टी विपरीत व अनिष्ट म्हणून त्या न होऊं देण्याकरितां सर्वांचे कसून प्रयत्न चालले आहेत. शेवटीं कंटाळून फिरून मि. मूर व आचार्य यांनीं आज वर डोकें काढलेंच आहे. तरी पण आतां चारदोन दिवसांत समेट जाहीर होईल अशींच पुष्कळशीं चिन्हें दिसतात.

* * *

गेल्या आठवड्यांत जी. आय. पी. रेल्वेवरील संपासंबंधानें येथें बरीच खटपट झाली. रा. केळकर व अणे यांनीं सर जॉर्ज रेनी यांची तीनदां मुलाखत घेतली. परंतु तींतून विशेष कांहीं निष्पन्न होईना म्हणून शेवटीं तहकुबीची सूचनाहि आणली, पण तीहि फुकट गेली! ही सूचना लांबणीवर टाकल्यास कदाचित् अधिक सभासद मिळाले असते असें वाटतें. परंतु संपवाल्यांच्या पुढाऱ्यांना येथील परिस्थितीची जाणीव नसल्यामुळें त्यांच्याकडून एकसारखा तारांवर तारांचा मारा सुरू होता व हें काम लांबणीवर टाकल्यास त्यांचा निष्कारण गैरसमज झाला असता म्हणून केळकर व अणे यांनीं आपल्या हातीं होतें तेवढें तरी करून घेतलें. तहकुबीची सूचना फुकट गेली तरी रेल्वे बजेटावरील वादविवादांत सर्व मुद्दे पुढें आणतां येण्यासारखे आहेत व ते आणलेहि जातील. परंतु संप करणारे व तो मोडूं पाहणारे यांची एक प्रकारें शर्यत लागून राहिल्यामुळें शेवटीं ज्याचा जोर होईल तोच जिंकील असें म्हणण्याची पाळी आली आहे. रेल्वेवरील यूनियन्समध्यें आपापसांत मेळ नाहीं या गोष्टीची मदत सरकारला या प्रसंगीं बरीच झाली आहे. गेल्या डिसेंबर महिन्यांत नागपूर येथें यूनियनवाल्यांची जी सभा झाली तींत फाटाफूट झाली नसती तर संपवाल्यांना अधिक बळ तरी मिळालें असतें किंवा संप तरी झाला नसता. पण कांहीं यूनियनवाले एकदम कम्युनिस्ट मताचे ठराव करण्याला प्रवृत्त झाले, या गोष्टीमुळें तेथें फूट झाली व त्या फुटीचा फायदा सरकार आतां भरपूर घेत आहे. सरकारचें हें कृत्य कोणत्याहि प्रकारें समर्थनीय नाहीं. कारण नागपूरच्या सभेंत कांहींहि ठराव केले किंवा तिच्यांत फूट झाली म्हणून संपवाल्यांचीं वास्तविक गाऱ्हाणीं आहेत तीं शिल्लक आहेत. तीं कशीं व किती दूर करावीं इतकेंच सरकारनें पाहावयास पाहिजे होतें.

* * *

गेल्या आठवड्यांत येथें फेडरेटेड चेंबर्स ऑफ कॉमर्स या संघाची सभा तीन दिवस झाली. ती असेंब्लीच्या दिवाणखान्यांतच भरली होती, आणि व्हाइसरॉय व कार्यकारी मंडळाचे प्रमुख सरकारी सभासद यांनीं लोकमताला विरोधी अशी दुसरी बाजू घेऊन व्यापारी विषयासंबंधानें सरकारी धोरण सभेंत मांडलें. यामुळें या सभेलाहि एक प्रकारें छोट्या असेंब्लीचेंच स्वरूप आलें होतें. सभेंतील लोकांनीं आपलें म्हणणें निर्भीडपणें व जोरदार रीतीनें मांडलें. आणि अध्यक्ष शेठ घनश्यामदास बिर्ला यांचें पहिलें व शेवटचें भाषण झालें, त्यांत सरकारवरील टीकेंत त्यांनीं कांहीं बाकी ठेवली नव्हती. या सभेचें सर्व काम पाहणाराला असें दिसून आलें कीं, सरकारसंबंधानें व्यापारी वर्ग आजवर जो स्नेहभाव दाखवीत होता तो आतां उरला नसून, स्वराज्याच्या चळवळींत लोकांतच ते आतां पुरे येऊन पडले आहेत आणि दुसरे पक्षीं देशी व्यापार हा एकंदर राजकारणांतील एक महत्त्वाचा भाग आहे हें सर्व लोकांच्या प्रत्ययाला चांगलें येत चाललें आहे. राजकारणाच्या दृष्टीनें हा एक मोठा फायदाच म्हटला पाहिजे. कारण राजकीय चळवळ करणारे म्हणजे ते निर्धन व बिनबुडाचे असा बाहणा करून सरकार चालत असे. तसें त्यांना आतां करतां येणें शक्य नाहीं. शिवाय हिंदुस्थानशीं चालणाऱ्या व्यापाऱ्यांत साम्राज्याचे पंचप्राण गुंतून राहिल्यामुळें हिंदी धानिक व्यापाऱ्यांचा असंतोष ही एक ध्यानांत घेण्यासारखी शक्ति आहे याची जाणीव सरकारला झाल्याशिवाय राहणार नाहीं.

* * *

राउंड टेबल कॉन्फरन्सची पूर्वतयारी म्हणून दिल्लीस एक खासगी परिषद होण्याचें घाटत आहे हें प्रसिद्ध झालेंच आहे व या खाजगी कॉन्फरन्सच्या पूर्वींहि उभयपक्षीं चारदोन माणसें बसून जातिविषयक, धर्मविषयक मतभेदांच्या व हक्कांच्याविषयीं कांहीं तडजोड व्हावी असाहि प्रयत्न चालू आहे. हिंदु व मुसलमान यांच्यातर्फे दोन्ही बाजूंच्या अगदीं एका टोकाला जाऊन काय म्हणणें आहे हें वेळोवेळीं प्रसिद्ध झालेंच आहे. दरम्यान बॅ. जिना यांचे म्हणून १४ मुद्दे निघाले तेहि प्रसिद्ध आहेत. हिंदु महासभेनें आपलें एकांतिक मत बाजूला ठेवून नेहरू रिपोर्टाला मान्यता दिल्यामुळें मध्यम हिंदु पक्षाचें स्वतंत्र म्हणणें असें वेगळें कांहीं उरलेलें नाहीं. म्हणून निकाल करण्याच्या निश्चयानें दोनहि बाजू ठाण मांडून दोन दिवस बसल्या तर देवघेवीच्या रूपानें कांहीं तरी निकाल सहज लागेल. परंतु हे दोनहि पक्ष म्हणतात,

" आम्ही बोलावयाचें तें बोलून चुकलोंच आहों. आतां आमची समजूत घालून तोंडमिळवणी करून तोड काढण्याचें श्रेय घेण्याची ज्या मध्यस्थांची इच्छा आहे, असें ते मोठा गवगवा करून प्रसिद्ध करतात, त्यांनींच आपल्या सूचना निश्चित करून पुढें मांडाव्या.

* * *

मध्यस्थीचा हा उपक्रम करण्यांत ज्या नेमस्तादि पक्षांनीं मोठा गवगवा करून पुढारीपण घेतलें आहे त्यांच्यावरच ही निश्चित मत-प्रदर्शनाची जबाबदारी मुख्यतः येऊन पडते. परंतु उभयपक्षांना नुसतीं नांवें ठेवण्यापलीकडे त्यांच्याकडून या बाबतींत कांहीं एक झालेलें नाहीं. आणि अदमास तरी असा आहे कीं, जर हे लोक स्वतःच्या मनाचें संशोधन करून हिंदूंनीं काय धरावें, काय सोडावें व मुसलमानांनीं काय धरावें काय सोडावें याविषयीं स्वतःचा निश्चय करून मत प्रकट करतील तर त्यांतून हिंदु पक्षाच्याच पुष्कळशा मुद्द्यांचें बहुधा समर्थन निघेल. याचीं दोन-तीन उदाहरणें देतों. मतदारसंघ जातवार असावे, कीं संयुक्त असावे ? जागा राखून ठेवणें झाल्या तरी कोणत्याहि प्रांतांतील बहुसंख्याक समाजाकरितांहि त्या राखून ठेवाव्या कीं काय ? अल्पसंख्य मुसलमानांना जें जितकें संरक्षण कांहीं प्रांतांत दिलें जाईल तें तितकें इतर प्रांतांतील म्हणजे उदाहरणार्थ पंजाब व बंगाल्यांतील हिंदूनाहि देणें योग्य आहे कीं नाहीं ? सरकारी नोकऱ्यांतून जातवार प्रमाणानें व लायकी-नालायकी न पाहतां सर्वांकरितां जागा राखून ठेवल्या पाहिजेतच कीं काय ? तसेंच नव्या राज्यघटनेंत सगळे अंतिम अधिकार प्रांतिक सरकारांना देऊन खलास करावे किंवा मध्यवर्ती सरकारकडे निर्वाणीचा उपाय म्हणून ते राखून ठेवावे ? या सर्व प्रश्नांचीं मध्यस्थ नेमस्तांचीं उत्तरें बहुधा हिंदूंच्या उत्तरासारखींच येतील असें वाटतें. पण हे मध्यस्थ बोलतील तर ना ? हे न बोलतां 'हिन्दु पुढारीच राष्ट्राच्या एकीच्या मार्गांत येतात' एवढें मोघम निष्कारण दूषण दिल्यानेंच आपलें सर्व कर्तव्य संपतें असें त्यांना वाटत असावें ! पण 'हा सूर्य हा जयद्रथ' अशी स्थिति आली म्हणजे मग हें मौनव्रत चालणार नाहीं, हें मध्यस्थांनीं पक्कें लक्षांत ठेवावें.

* * *

सायमन कमिशनबरोबर काम करणाऱ्या सेंट्रल इंडियन कमिटीचे सभासद परत आले आहेत. त्यांपैकीं सर शंकरन् नायर, डॉ. गौर इत्यादिकांचीं

मतें जीं बाहेर कळून येतात त्यावरून असें दिसतें कीं, ज्या जातवार मतसंघा-बद्दल एवढें रण माजत आहे त्याचा पुरस्कार सायमन कमिशनकडून केला जाणार नाहीं व ज्याच्याकरितां हिंदूंकडून मोठी किंमत मागितली जात आहे ते मिश्र मतदारसंघ आपोआपहि मिळूं शकतील. म्हणून समेटाच्या फाजील भरीला पडून एकंदर राज्यघटनेला अनुचित असे वेडेवांकडे करार हिंदूंनीं मुसलमानांशीं करण्याचें कारण नाहीं असें या दोघांचें म्हणणें आहे म्हणतात. शिवाय सिंध व पेशावर प्रांत यांच्यासंबंधीं जो लढा पूर्वी होता तो आतां राहिला नाहीं. कारण सिंधच्या हिंदु लोकांनीं आपला प्रश्न आपसांत समजुतीनें संपवून घेतला असून त्यांनीं हिंदु सभेंतून आपलें अंग काढून घेतल्या-सारखें झालें आहे. तेव्हां मागील खेपेस जो एक मुद्दा मोठा वादग्रस्त होऊन राहिला तो आतां राहणार नाहीं. पेशावर प्रांतांतहि मुसलमानांची संख्या ९/१० असल्यामुळें त्यांना प्रांतिक स्वराज्य द्यावें कीं नाहीं, याबद्दलहि हिंदूंनीं आतां भांडण्याचें फारसें कारण नाहीं. कारण त्या प्रांताचें भवितव्य हिंदु किंवा मुसलमान यांनीं कांहींहि व्हावें असें म्हटलें तरी सरकार त्याची व्यवस्था कोणाचेंहि न ऐकतांच करणार असें दिसतें. अशा रीतीनें पुष्कळशा वादग्रस्त प्रश्नांचा निकाल लागण्यासारखा असल्यामुळें हिंदु सभावालेहि सहविचार करून निश्चयात्मक तोड काढण्यास अधिक तयार आहेत. म्हणून आतां फक्त नेमस्त व मध्यस्थ यांनाच काय तो आपल्या मताचा निश्चय करण्याचा उरला आहे व ही जबाबदारी त्यांनीं पार पाडली म्हणजे समेट सिद्धच आहे.

* * *

किरकोळ गोष्टींत दोन गोष्टींचा उल्लेख करून हें पत्र पुरें करतों. पैकीं एक अशी कीं, दिल्लींतील महाराष्ट्र समाजानें दर वर्षाप्रमाणें यंदाहि रामदास नवमी-चा उत्सव आतांपासून चालविला असून, त्यांत केळकर, खापर्डे वगैरे लोकांचीं भाषणें झालीं. या समाजानें आपली उपयुक्तता हल्लीं बरीच वाढविली असून बाहेरगांवांहून येणाऱ्या प्रवाशांची व्यवस्था अधिक सुखसोयीची केली आहे. मात्र या प्रवाशांकडून मोबदल्यादाखल जितकी मदत समाजाला मिळा-वयास पाहिजे तितकी अद्यापि मिळत नाहीं. ती मिळत गेल्यास समाजाचें कार्य अधिक वाढेल व आणखीहि व्यवस्थित होईल. दुसरी गोष्ट येथील सुप्रसिद्ध दानशूर कंत्राटदार लाला दिवाणचंद यांचा मृत्यु ही होय. यांनीं गेल्या

१५ वर्षांत केवळ स्वावलंबनानें भाग्योदय केला, आणि सर्व प्रकारच्या सार्वजनिक कार्यांना त्यांचा मोठा आश्रय असे. ते नुकतेच अकस्मात वारले व त्यांच्या १४व्या दिवशीं त्यांच्या धाकट्या बायकोनें छातींत गोळी मारून घेऊन आत्महत्या करण्याचा प्रयत्न केला, अशा रीतीनें या कुटुंबाची वाताहत झाली! दिवाणचंद यांनीं मृत्युपत्र करून व ट्रस्ट करून लाखों रुपये सार्वजनिक कामाकरितां काढून ठेवले होते. पण येथेंहि हिंदु समाजाचें दुर्दैव आड आलें. कारण कायद्यांत झालेल्या नव्या दुरुस्तीप्रमाणें मृत्युपत्रावर दोन साक्षी घालाव्या लागतात; पण त्यांनीं एकच घालविली होती. यामुळें मृत्युपत्र रद्द ठरत आहे व ही मोठी धर्मादायाची देणगी फुकट जाणार आहे! आपल्या लोकांत मृत्युपत्र व्यवस्थित करण्याची सवय लोकांना अजून लागली नाहीं व अशा महत्त्वाच्या बाबतींत कायद्याचें अज्ञानहि अजून आडवें येतें. तरी ज्या त्या समाजानें हें ज्ञान लोकांत पसरविण्याचें काम केलें पाहिजे आणि रिकामा वेळ असणाऱ्या तरुण वकिलांनीं या गोष्टींत पुढाकार घेतला पाहिजे.

## पत्र नं. ५

ता. ८-३-३०

गेल्या आठवड्यांत रेल्वे खात्याचें सुमारें १०५ कोटींचें बजेट मंजूर झालें व त्यानंतर हिंदुस्थान सरकारचे फडणवीस सर जॉर्ज शूस्टर यांनीं आपलें १३५ कोटींचें बजेट गेल्या शुक्रवारीं असेंब्लीपुढें सादर केलें. या बजेटाची सर्वसाधारण चर्चा मंगळवार व बुधवार दोन दिवस झाली. आजपासून पुढें पांच दिवस कांहीं विवक्षित मागण्या पुढें येतील व त्यावर चर्चाहि होईल, पण जो निकाल रेल्वे-बजेटाचा झाला तोच या बजेटाचा होणार हें निश्चित आहे. रेल्वे खात्याच्या बजेटाला सुमारें १७५ काटांच्या उपसूचना देण्यांत आल्या होत्या, परंतु त्या कागदावरच राहिल्या. पैकीं ७० उपसूचना रेल्वे बोर्डाच्या मागणीकरितांच होत्या. हेतु हा कीं, रेल्वे खात्याचा सर्व कारभार हें रेल्वे बोर्डच पाहतें; म्हणून रेल्वे बोर्डाच्या मागणीलाच काट देऊन रेल्वे बोर्डानें रेल्वेचा कारभार कसा करावा यासंबंधानें लोकपक्षानें आपले विचार मांडावे. या दृष्टीनें थोडीशी चर्चा झाली ती महत्त्वाची झाली. पण या रेल्वे बोर्डाच्या १२ लक्षांच्या मागणीपैकीं एक रुपया देखील असेंब्लीला तोडतां आला नाहीं! आणि या एकाच मागणीच्या चर्चेनें पांच दिवस खाल्ले.

यावरून १०५ कोटींच्या बजेटाची चर्चा करावयाची झाली तर किती दिवस असेंब्लीचें काम चालेल याची कल्पना करतां येईल. पण दिवसांना मर्यादा आहे म्हणूनच बरें!

* * *

रेल्वे खात्याचें बजेट अलग करण्यांत येऊन आज ६ वर्षें झालीं. ही विभागणी झाली त्या वेळीं ३ वर्षांनंतर स्वतंत्र कमिटी नेमून पाहणी करण्यांत यावी असें ठरविण्यांत आलें होतें. गतवर्षी असेंब्लीच्या आग्रहावरून सरकारनें कमिटी नेमली आहे; पण या कमिटीच्या कामाला मुहूर्त लाभत नाहीं असें दिसतें. गेल्या महिन्यांत सरकारनें या कमिटीची एकहि सभा बोलाविली नाहीं! गेल्या जुलै महिन्यांत मुंबईस एक सभा बोलाविली होती; त्या वेळीं कमिटीचें काम तास अर्धा तासांतच संपलें. कारण खासगी सभासदांना या प्रश्नाचा विचार करण्याकरितां हिंदुस्थान सरकारनें सायमन कमिशनपुढें आपलें मत म्हणून काय सांगितलें याची माहिती पाहिजे होती. सरकारी सभासदांना ती तेथें देतां येईना. ती माहिती गेल्या आठ महिन्यांत त्यांनीं दिली नाहीं, यामुळें कमिटी नेमून कांहीं उपयोग झाला नाहीं आणि आतां लवकरच सुधारणा कमिटीचा रिपोर्ट प्रसिद्ध होणार असल्यामुळें, ती कमिटी संपुष्टांत निघाल्यासारखीच आहे! रेल्वे खात्याचें बजेट वेगळें करूंच नये अशी तक्रार नाहीं. तक्रार आहे ती एवढीच कीं, फायनॅन्स डिपार्टमेंटची करडी नजर रेल्वे खात्याच्या खर्चावर असावी. सर्व सत्ता रेल्वे बोर्डाचे हातीं; नांवाला मात्र रेल्वेचें खातें कॉमर्स मेंबरच्या हातीं; असा नामधारी कारभार राहूं नये. १०५ कोटींचा कारभार एका स्वतंत्र सभासदाचे हातीं असावा. हल्लींच्या व्यवस्थेंत कॉमर्स मेंबरवर व्यापारविषयक धोरणांत रेल्वे बोर्डाचें वजन पडतें. यामुळें साहजिकच पक्षपाती धोरण स्वीकारलें जातें. पण ही सुधारणा कार्यकारी मंडळ जबाबदार झालें नाहीं तोंपर्यंत होणारी नाहीं व तसें झालेलें नाहीं तोंपर्यंत अशी सुधारणा होऊन न होऊन जनतेचा फायदा सारखाच! फार तर दगडापेक्षां वीट मऊ इतकेंच म्हणतां येईल.

* * *

सर जॉर्ज शूस्टर यांचें सध्यांचें हें दुसरें बजेट होय. पण या खेपेस गतवर्षीचें बजेट बरेंच चांगलें होतें असें म्हणण्याची पाळी आली आहे. ह्या बजेटांत ५॥ कोटींची तूट आली असून ती भरून काढण्याकरितां त्यांनीं

नवीन कर लादण्याचें ठरविलें आहे. बजेटांत तूट येण्याची कारणमीमांसा त्यांनीं अशी केली कीं, महायुद्धाचे परिणाम सर्व राष्ट्रांनाच सोसावे लागले, तसेच ते हिंदुस्थानाला सोसावे लागणार. त्यांत कांहींच वावगें नाहीं ! पण फरक इतकाच कीं, महायुद्धानें इतर राष्ट्रांवर केलेली आर्थिक जखम जवळ जवळ भरून येत आहे तर हिंदी राष्ट्राची जखम चिघळत चालली आहे. महायुद्ध संपून आज १० वर्षांनीं हा अक्काबाईचा फेरा हिंदुस्थानकडे कसा वळला याचा खुलासा मात्र त्यांना करतां आला नाहीं ! सर बेसिल ब्लॅकेट यांनीं यापुढें बजेटांत तूट न येतां शिल्लक राहील व हिंदी राष्ट्राची पत इतर राष्ट्रांमध्यें वाढत जाईल असें भविष्य वर्तविलें होतें ! पण सर जॉर्ज शूस्टर यांचे हातीं फडणविशी खात्याचे लगाम पडतांच त्यांना जमाखर्चाची तोंड-मिळवणी करण्याकरितां जादा कराचा बोजा रयतेवर टाकावा लागला. यावरून एक अनुमान असें निघतें कीं, ब्लॅकेटसाहेबांच्या कारवाईचे परिणाम शूस्टरसाहेबांना भोगावे लागत आहेत.

* * *

ब्लॅकेट व शूस्टर यांचेमध्यें फडणवीस या नात्यानें फरक दिसतो तो इतकाच कीं, यांची हिशेबाचा खुलासा करण्याची पद्धति त्यांचेपेक्षां बरीच चांगली आहे. आंकड्यांचें गौडबंगाल न करतां सोप्या भाषेंत सर्वांना साधारणपणें समजेल अशा तऱ्हेनें स्पष्टीकरण करण्याचा प्रयत्न हे करतात. त्यांच्या भाषणावरून चालू खर्च कमी अगर देणें कमी दाखविण्याकडे त्यांची प्रवृत्ति नाहीं असें दिसतें. पण त्यांच्या अंदाजपत्रकांत व प्रत्यक्ष अनुभवांत बराच फरक पडतो हेंहि गेल्या वर्षाच्या हिशेबावरून दिसून आलें आहे. शूस्टर स्वभावानें शांत आहेत. राग आला असला तरी चेहऱ्यावर तो दाखवायाचे नाहींत. भाषण करतांना देखील इतके सावकाश व मृदु बोलतात कीं, त्यांच्या पोटांत एक व ओठांत एक असें कांहीं आहे असा कोणाला संशयहि येणार नाहीं ! पण 'गोगलगाय आणि पोटांत पाय' ही म्हण यांना तंतोतंत लागू पडते. जमाखर्चांतील तूट भरून काढण्याकरितां त्यांनीं जे उपाय योजले आहेत त्यावरून यांच्या पोटांत परकी व्यापाऱ्यांचें हित साधावयाचें आहे हें स्पष्ट दिसून येईल. केरोसीन तेलावरील एक्साइज ड्यूटी त्यांनीं अर्ध्या आण्यानें वाढविली व आयात जकात पाव आण्यानें कमी केली तरी गिऱ्हाइकांच्या डोक्यावर अर्धा आणा अगर पाऊण आणा वाढणार हें उघड

आहे! कारण टॅरिफ बोर्डाच्या चौकशीनें आतां उघडकीस आलें आहे कीं, बर्मा ऑइल कंपनी व इतर साथीदार कंपन्या यांचा परदेशी व्यापाऱ्यांशीं करारच झालेला असतो. इतकेंच नव्हे तर या कंपन्या रॉकेल तेलाच्या डब्याचे दर आपापसांत ठरवूनच ते बाजारांत विकीत असतात. साखरेच्या धंद्याची हीच तऱ्हा. साखरेच्या कारखान्यांपैकीं शेंकडा ८० कारखाने परदेशी कारखानदारांच्या हातीं आहेत, आणि नव्या आयात जकातीच्या वाढीचा फायदा सर्वस्वीं त्यांनाच मिळणार. हीच गोष्ट खाणींतून चांदी काढणारांची. सर जॉर्ज शूस्टर यांनीं चांदीवरील आयात जकात वाढविली याचा स्पष्ट अर्थ असाच कीं, परदेशांतून हिंदुस्थानांतील लोक संग्रहीं ठेवण्याकरितां म्हणून चांदी आणूं लागले तर दर औंसामागें म्हणजे १॥ रुपयांतून चार आणे सरकार लुबाडून घेणार. आणि हें सर्व कशाकरितां तर संग्रहीं असलेल्या चांदीची किंमत उतरूं नये म्हणून! पण हिंदुस्थानांत चांदीचा भाव चढता राहिला तरी उपजीविकेला आवश्यक अगर जरूरीचे असे पदार्थ परदेशांतून विकत घेण्याची पाळी येईल त्या वेळीं त्या चांदीला तीच किंमत येणार नाहीं त्याला कोण जबाबदार?

* * *

पण या अप्रत्यक्ष उपायांचा अवलंब करून आर्थिक दृष्ट्या हिंदी जनतेचें जें रक्तशोषण करतां येईल तेवढ्यानेंच त्यांची तृप्ति होत नाहीं असें दिसतें. कापडाच्या गिरणीवाल्यांच्या हकाटीची कींव येऊन त्यांनीं त्यांना संरक्षण द्यावें अशा अर्थाचें एक बिल आणलें आहे व ते आणतांना ब्रिटिश कारखानदारांचे मालावर ही जकात लादूं नये अशी पळवाट त्यांनीं राखून ठेवली आहे. आणि ही सवलत ब्रिटिश कारखानदारांना द्यावयाची कीं नाहीं हें असेंब्लीनें ठरवावें असा बहाणा केला आहे. पण कायदेमंडळाचे सर्व सभासद लोकनियुक्त नाहींत हें ते विसरले असें दिसतें. या संरक्षणाचे आमिषाला सर पुरुषोत्तमदास, मोदी प्रभृति भांडवलवाल्या पक्षाचे प्रतिनिधी बळी पडतील अशीं चिन्हें दिसत आहेत. त्यांचें म्हणणें असें कीं, 'इंपीरियल प्रेफरन्सचें' तत्त्व कबूल करूं नये हें खरें. पण देशी गिरणीवाल्यांना संरक्षणाची जरूरी तूर्त आहे व हें संरक्षण मिळण्याकरितां म्हणून हें बिल मंजूर करणें जरूर आहे. दोन दिवस बजेटावर सर्वसाधारण चर्चा झाली व त्या चर्चेंत २२ जणांनीं भाग घेतला, पण या बिलाविरुद्ध खणखणीत मत असें केळकर, बिर्ला, बी.

दास व मालवीय यांनींच दिलें. सर पुरुषोत्तमदास हे या प्रश्नावर असे बोललेच नाहींत. त्यांच्या भाषणाचा सर्व रोख हुंडणावळीवर व चलनपद्धतीवर होता. मुंबईच्या गिरणीवाल्यांचे प्रतिनिधी मि. मोदी यांनीं अजून आपलें मत स्पष्टपणें असेंब्लीपुढें मांडलेंच नाहीं. जम्नादास मेथा यांच्या जागीं आलेले छोटे सर कावसजी जहांगीर यांनीं बिलावर अनुकूल-प्रतिकूल असें कांहींच मत व्यक्त केलें नाहीं! पण इंपीरियल प्रेफरन्सचें तत्त्व सध्यांच्या हिंदुस्थानच्या राजकीय हक्काच्या दृष्टीनें घातुक आहे असेंच मत त्यांनीं दिलें. पण बिलाविरुद्ध तें मत देणार नाहींत असें स्पष्ट दिसत आहे. षण्मुखम् चेट्टी यांचीहि हीच गोष्ट. पं. कुंझरू यांनींहि या बिलासंबंधानें गुळमुळीतच भाषण केलें. त्यांना हें बिल फेटाळून लावलें तर भावी राजकीय हक्कांच्या लाभाच्या दृष्टीनें कांहीं अपघात होईल असें वाटतें!

* * *

मंगळवार व बुधवार या दोन दिवशीं बजेटावर जी चर्चा झाली तींत शेठ बिर्ला यांचें भाषण मुद्देसूद व उत्कृष्ट झालें. १८ पेन्सांचा हुंडणावळीचा भाव ठरविल्यानंतर हिंदी जनतेची ग्राहकशक्ति, उपजीविकेचे पदार्थ घेण्यांत ६ पौंडांनीं कमी झाली आहे व महायुद्धापूर्वी दरमाणशीं जेथें १६ वार कापड खपत होतें तेथें चौदाहि वार खपत नाहीं हें त्यांनीं आंकडयांवरून सिद्ध करून दिलें व हिंदुस्थानची आर्थिक दृष्टया प्रगति होत नसून आर्थिक परिस्थिति खालावतच आहे हें सिद्ध केलें. केळकरांनीं सर जॉर्ज शूस्टर यांना वाघाची उपमा दिली व वाघ हा पाय न वाजवितां आपल्या पंजानें हिंदी जनतेचे लचके तोडूं लागला आहे असें सांगितलें. पण बहुतेकांच्या भाषणांचा रोख हुंडणावळीचें धोरण व लष्करी खर्च यांवरच होता. जयकरांनीं इंग्लंडांत हिंदी लोकांच्या पैशावर पोसल्या जाणाऱ्या हितशत्रूंचीं तोंडें बंद करा असा सल्ला दिला. शुक्रवारीं राष्ट्रीय पक्षातर्फें केळकरांनीं कार्यकारी मंडळाच्या ९१ हजार रुपयांपैकीं एकच रुपया देण्यांत यावा अशी सूचना आणली व त्यावरच सर्व दिवसभर चर्चा झाली. जिनांचा स्वतंत्र पक्ष, नवीन स्वराज्य पक्ष व राष्ट्रीय पक्षांतील सभासद यांनीं केळकरांच्या सूचनेला अनुकूल मतें दिलीं. पण सेंट्रल मुस्लीम पार्टी व युरोपियन सभासद यांनीं सरकारच्या बाजूनें आपलीं मतें नोंदलीं; व अखेर ३९ विरुद्ध ५० मतांनीं सूचना नामंजूर झाली.

या सूचनेचा हेतु कार्यकारी मंडळ कायदेमंडळाला जबाबदार नाहीं हें व्यक्त करण्याचा होता.

*  *  *

शनिवारीं शूस्टर यांनीं लष्करी खात्याच्या रकमेची मागणी केल्यावर अबदुल मतीन चौधरी यांनीं तिच्यांतील एक रुपयाच मंजूर करावा अशी सूचना आणली आणि जर सरकारनें लष्करी खात्यांत हिंदी लोकांना मज्जाव केला व स्कीन कमिटीच्या रिपोर्टाकडे दुर्लक्ष केलें तर देशांतील तरुण यूनियन जॅकला मानण्याऐवजीं स्वातंत्र्य-ध्वजाला वंदन करूं लागतील असें त्यांनीं बजावलें? मुंजे यांनीं हिंदी शिपायांच्या पांचपट खर्च ब्रिटिश शिपायांचा असतो व सध्यां हिंदी सैनिक दीड लाखांवर व गोरे सत्तर हजार आहेत, हें लष्कर जास्त आहे असें सांगितलें. अब्दुल कायूम यांनीं सध्यांचें लष्कर व त्यांतील ब्रिटिशांचें प्रमाण अत्यावश्यक आहे आणि ज्ञाति-निष्ठेच्या सद्यःकालांत हिंदी सँढर्स्ट मुळींच उघडूं नये व शक्य तर सर्व सैन्य ब्रिटिशच असावें असें मत झोकून दिलें! अणे यांनीं सरकारी धोरणावर टीका केली. उलट गजनाफरअल्ली यांनीं ब्रिटिश सैनिक आहेत तितके जरूरच आहेत असें सांगितलें! क्रॉफर्ड म्हणाले, सध्यां कायदेभंगाच्या व क्रांतीच्या आरोळ्या उठत असतां ब्रिटिश शिपायांची फार जरूरी आहे. डोमीनियन आर्मीसाठीं चांगली सामुग्री गोळा करणें हेंच देशाला हिताचें आहे असें त्यांनीं सांगितलें. लष्करी खर्च शक्य तितका कमी करण्यांत येत आहे असें यंग यांनीं सांगितलें. जिना यांनीं कमांडर-इन्-चीफच्या कौन्सिल ऑफ स्टेटमधील भाषणाचा समाचार घेतला. नंतर सूचना ४९ वि. ४४ मतांनीं मंजूर झाली! आणि पुनः ती एक रुपयाची रक्कम मतास घातली तेव्हां तेवढी देखील नामंजूर झाली!!!

*  *  *

पण ही बजेटावरील चर्चा आणखी चार-पांच दिवस चालेल व त्यानंतर कापडावरील संरक्षक जकातीचें बिल पुढें येईल. पण सरकारी बिलें कशीं आणतात यासंबंधीं परवां एक अनुभव आला त्यावरून सरकारी कायदे-पंडित किती झोंपीं गेलेले असतात हें दिसून येईल. १८७२ च्या स्पेशल मॅरेज ॲक्टान्वयें २१ वर्षांच्या आंत विवाह करावयाचा झाल्यास पालकाची पर-वानगी घेण्यांत यावी अशा अर्थाच्या दुरुस्तीचें एक बिल होतें पण सरकारी

कायदेपंडितांना हें माहीत नाहीं कीं, १८ वर्षें पुरीं झालीं कीं, मनुष्य सज्ञान होतो असा कायदा १८७५ मध्येंच करण्यांत आला आणि हें बिल पुढें आल्यानंतर डॉ. गौर व बॅ. जयकर यांनीं कायदेपंडितांना जागे केलें त्या वेळीं ते जागे झाले व बिल परत घ्यावें असें सरकारनें ठरविलें. आणि कमाल ही कीं, हें बिल कौन्सिल ऑफ स्टेटमधून पास होऊन आलें होतें ! बिल मताला घालून हातच्या बहुमताच्या जोरावर सरकार तें मंजूरहि करूं शकलें असतें. पण नवीन कायदा करतांना मूळ कायद्याशीं हा नवीन कायदा सयुक्तिक आहे कीं नाहीं हें पाहण्याची खबरदारी देखील सरकारी अधिकारी घेत नाहींत ! सरकारचे कायदेपंडित सर ब्रजेंद्र मित्र यांनीं तर "मीं या बिलाचा विचारहि केला नाहीं" अशी स्पष्ट कबुली दिली !

---

# दिल्ली येथील नरेंद्र-मंडळाची बैठक

## ( १९३० )

चालू सालची नरेंद्र-मंडळाची बैठक ता. २५-२-३० रोजीं सुरू होऊन ता. १ मार्च रोजीं खलास झाली. या बैठकीचा गोषा गेल्या वर्षापासून दूर सारला गेल्यानें प्रत्यक्ष बैठकींत काय कामकाज होतें व ते कशा प्रकारें चालतें हें पाहण्याची संधि इतरांस मिळूं लागली आहे. अधिवेशनाचे दिवस पांच पण पांचहि दिवसांचें मिळून काम पाहिलें तर तें एकाच दिवसाच्या चारपांच तासांच्या बैठकींत संपण्याजोगें. परंतु हें अधिवेशन पडलें नरेंद्रांचें; तेव्हां त्यांच्याच छंदाप्रमाणें काम संपविण्याचा उपक्रम व्हाइसरॉयांनीं करावा हें ठीकच आहे. अधिवेशनास सुरुवात होण्याचे आधीं जमलेल्या नरेंद्रांची व्हाइसरॉयसाहेबांबरोबर चॅन्सेलरकडून ओळख करून देण्यांत येते. या ओळखसमारंभाचा प्रकार थोडासा विचित्रच खरा. व्हाइसरॉयसाहेब येण्याचें आधीं दहापांच मिनिटें या सर्व नरेंद्रांना अधिवेशनाच्या दिवाणखान्याच्या बाहेर नेऊन उभें करण्यांत येतें व त्या ठिकाणीं त्यांची ओळख देण्यांत येते. एकीकडे आमचा संबंध थेट बादशहांशीं असें प्रतिपादन करून ती गोष्ट सिद्ध करून घेण्यासाठीं प्रजेच्या लाखों रुपयांचा चुराडा करावा; पण दुसरीकडे व्हाइसरॉयांशीं हस्तांदोलन करण्यास मिळावें म्हणून मान-अपमान सर्व गुंडाळून

ठेवून संस्थानी नोकर ज्याप्रमाणें संस्थानिकांच्या मेहेरनजरेची आशाळभूतपणें वाट पाहतो त्याप्रमाणें संस्थानिकांनींहि वागण्यास तयार व्हावें हा देखावा जितका विस्मयकारक तितकाच खेदकारक होय.

* * *

नरेंद्रमंडळांत जे ठराव पास करण्यांत आले ते संस्थानिकांच्या नेहमींच्या पद्धतीला अनुसरूनच आहेत. सर्व ठरावांत महत्त्वाचे ठराव म्हटले म्हणजे बटलर कमिटीच्या रिपोर्टाबद्दलचेच होत. हा रिपोर्ट संस्थानिकांना पुष्कळ बाबतींत मान्य नाहीं. संस्थानिकांचे वर सार्वभौम सत्ता बादशहाची आणि पर्यायानें ब्रिटिश पार्लमेंटाचीच राहावयाची. संस्थानांत भयंकर जुलूम अगर अन्याय होऊं लागला तर संस्थानिकांचे कारभारांत हात घालण्याचा अधिकार पार्लमेंटाला आहे. संस्थानिकांबरोबर केलेले तहनामे ज्याप्रमाणें त्यांचे हक्क ठरविण्याचे वेळीं लक्षांत घेतले पाहिजेत, त्याप्रमाणें फार वर्षांपासून चालत आलेली वहिवाट (Usage) व राज्यकारभाराची रूढ झालेली पद्धति (Political Practice) ही लक्षांत घेणें भाग आहे. आणि एकंदर साम्राज्याच्या हिताच्या दृष्टीनें कोणतीहि गोष्ट करण्याला संस्थानिकांना भाग पाडण्याचा अधिकार साम्राज्य सरकारास आहे. अशीं जीं तत्त्वें बटलर कमिटीनें आपल्या रिपोर्टांत नमूद केलीं आहेत तीं संस्थानिकांना मान्य नाहींत. आणि या गोष्टीचा गुळमुळीतपणें कां होईना इन्कार करणारे ठराव नरेंद्र-मंडळाचे बैठकींत पास करण्यांत आले.

* * *

पण एकाहि नरेंद्राच्या डोक्यांत अशी कल्पना आली नाहीं कीं, अक्षम्य जुलूम अगर अन्याय कोणाहि संस्थानिकानें आपल्या संस्थानांत चालू आहे आहे असें म्हणण्यास जागाच राहूं देऊं नये, आणि सभाबंदी, भाषणाची व वर्तमानपत्रांची मुस्कटदाबी, न्यायखात्यांतील गोंधळ व प्रजेच्या पैशाची उधळपट्टी इत्यादि गोष्टींचा अगदीं नायनाट करून प्रजेला संतुष्ट करण्याचा प्रयत्न करावा अशाबद्दल ठराव करून तो ठराव अमलांत आणण्याचें बंधन स्वतःस घालून घ्यावें! पण असें होईल तर ते संस्थानिक कसले! पतिआळा, बिकानेर, जामनगर, काश्मीर व अलवार येथील महाराजांपैकीं कोणी तरी ठराव मांडावा कोणी तरी दुजोरा द्यावा आणि एकमेकांतच आलटून पालटून चटावरील श्राद्धाप्रमाणें भाषणें करून ठराव पास करून टाकावेत असा

प्रकार चाललेला पाहिला म्हणजे हसावें कीं, काय करावें हेंच समजत नाहीं. यंदाच्या अधिवेशनास चाळीस-पन्नास नरेंद्र हजर होते. आणि फोटोंत आपलें तोंड पुढच्या रांगेंत दिसावें म्हणून कांहीं संस्थानिकांमध्यें अहमहमिकाहि दिसत होती. पण साक्षात् काम चालल्या वेळीं मात्र आपल्या सुखासनावर बसून कोणी डुलकी घेत आहेत, तर कोणी कुत्र्यामांजरांच्या प्रदर्शनाचे चिंतनांत काळ घालवीत आहेत असा देखावा दिसत होता. नाहीं म्हणावयास ठराव मतास घातल्यानंतर खडबडून तंद्रींतून जागे होऊन हात वर करण्याचे श्रम मात्र ते करीत होते! व हात उचलण्याचा प्रसंग निघून गेल्यानंतरहि जागे होऊन हात वर उचलीत होते!

* * *

पण या प्रत्यक्ष अधिवेशनांतील कामापेक्षां अधिवेशन सुरू होण्यापूर्वीं चार-पांच दिवस संस्थानिकांच्या ज्या खासगी बैठकी झाल्या त्याच विशेष महत्त्वाच्या होत्या. या बैठकी अगदीं गुप्त स्वरूपाच्या असल्यानें तेथील कामाची तपशीलवार माहिती अर्थातच मिळणें शक्य नाहीं. पण असें समजतें कीं, या बैठकींत ब्रिटिश प्रजेवर आणि संस्थानी प्रजेवर बरेंच तोंडसुख घेण्यांत आलें. ब्रिटिश मुलखांतलीं वर्तमानपत्रें आणि तेथील चळवळये लोक संस्थानिकांच्या जिवावर उठले आहेत आणि एकजात संस्थानी कारभाराची निंदा करावी एवढेंच त्यांचें ब्रीद आहे. अशी द्वेषाची भूमिका कल्पून त्यावर उपाययोजना काय करावी याबद्दल चर्चा करण्यांत आली. संस्थानिकांचें संरक्षण करणारा कायदा जो पास करण्यांत आला आहे तो आतां अपुरा पडत असून याबद्दल संस्थानिकांच्या इच्छेस अनुसरून दुसरा एखादा कायदा ब्रिटिश सरकारनें पास करावा अशी विनंति करण्याचें ठरलें असें म्हणतात! अडचणीच्या प्रसंगीं ब्रिटिश सरकारची आठवण होते म्हणावयाची! याशिवाय हातांतील गोष्ट म्हणून कांहीं निवडक पत्रांना संस्थानांत मज्जाव करण्यांत यावा अशीहि शिफारस करण्यांत आली. या बाबतींत एकमतानें ठराव पास होईना. संस्थानी प्रश्नांचा विचार करणारीं पत्रें म्हणून एक यादी तयार करण्यांत आली आहे. त्यांत मुंबई इलाख्यांतील कांहीं पत्रें आहेत त्यांपैकीं कांहीं पत्रांना संस्थानचे हद्दींत येण्याला बंदी करण्यांत यावी अशी शिफारस करण्यांत आली. रियासत, ताजीद, तेज, सौराष्ट्र वगैरे पत्रांनीं हा मान पटकावला. या एकंदर पत्रांच्या लिखाणाला 'गटर प्रेस' अशी संज्ञा नरेंद्रांनीं दिली आहे! अशा रीतीनें

कोंबडें झाकून सूर्योदय बंद पाडतां येतो कीं काय हें पाहण्याच्या प्रयत्नास संस्थानिक लागले आहेत. बडोद्याचे श्रीमंत सयाजीराव महाराज पहिले दोन दिवस खासगी बैठकीला थोडा वेळ हजर राहिले होते. त्यांनीं चर्चेत कांहींच भाग घेतला नाहीं. इतकेंच नव्हे तर 'गटर प्रेस'ची चर्चा चालू असतां ते निषेध दाखविण्यासाठीं सभेंतून उठूनहि गेले अशीहि बातमी आहे. श्रीमंत सयाजीराव यांनीं नरेंद्र-मंडळाच्या सभासदत्वाचाच राजीनामा दिला आहे अशीहि एक गोष्ट येथील स्थानिक पत्रांत प्रसिद्ध झाली आहे.

* * *

लाखों रुपयांचा वार्षिक खर्च चालवून इंग्लंडमध्यें संस्थानी प्रजेविरुद्ध खटपट करण्यासाठीं संस्थानिकांनीं एक ऑफिस उघडलें असून त्या कामावर कर्नल हस्कर व प्रो. रशब्रुक वुइल्यम्स यांची नेमणूक केल्याचें प्रसिद्धच आहे. ही चळवळ आणखी दोन वर्षे अशीच चालू ठेवण्यांत येऊन त्याबद्दल आणखी सोळा लक्ष रुपये खर्च करण्याचें ठरविलें असल्याची बातमी बाहेर आली आहे. हा १६ लाखांचा खर्च उघड रीतीनें मंजूर झाला, पण पडद्यांतून आणखी कित्येक लाख खर्च होणार अशीहि शंका येते. ही विलायतेंतील चळवळ मुख्यतः ब्रिटिश हिंदुस्थानांतील व संस्थानांतील लोकांनीं संस्थानांविरुद्ध जी मोहीम इकडे सुरू केली आहे ती मारून टाकण्यासाठीं होय. या प्रश्नाची वाटाघाट चालू असतां भावनगरचे ॲडमिनिस्ट्रेटर सर प्रभाशंकर पट्टणी यांनीं मात्र संस्थानिकांचे चांगलेच कान उपटले असें म्हणतात. इंग्लंडांतील आपली चळवळ कोणत्याहि प्रकारें यशस्वी होत नाहीं इतकेंच नव्हे, तर उलट अपायकारक आहे असा अनुभव आला असल्यानें संस्थानिकांनीं आतां त्या दिशेनें प्रयत्न चालू ठेवूं नयेत असें त्यांनीं स्पष्टपणें सांगितलें.

* * *

प्रजेचा संतोष हीच खरी संस्थानांची बळकटी असून आपल्या संस्थानांतील राज्यकारभार लोकतंत्रानुवर्ती केला म्हणजे प्रजेची चळवळ आपोआपच बंद पडेल असा सुविचार सर पट्टणी यांनीं सभेपुढें मांडला पण हा विचार नरेंद्रांना कसा रुचावा ? संस्थानिकांची चंदी खाणाऱ्या कर्नल हस्कर व प्रो. रशब्रुक यांनीं इंग्लंडांतील चळवळ फार जरूरीची आहे असें प्रतिपादन केलें आणि सर पट्टणी यांची सूचना अमान्य होऊन चळवळ चालू ठेवण्याचा ठराव पास झाला !

हा सर्व प्रकार पुष्कळ संस्थानिकांना देखील मान्य नाहीं असें म्हणतात. पण नरेंद्र-मंडळाचे फेरोजशहा मेथा, बिकानेरचे महाराज, यांच्याविरुद्ध तोंड उघडण्याची बिचाऱ्यांची छातीच नाहीं? अखिल भारतीय संस्थानी परिषदेबद्दलहि संस्थानिकांच्या खासगी बैठकींत विचार झाला. ही परिषद भरविणारे लोक संस्थानी प्रजेचे प्रतिनिधी नाहींत सबब अशा परिषदा विचारांत देखील घेण्याचें कारण नाहीं असा ठराव पास करण्यांत आला. ब्रिटिश हिंदुस्थानांतील चळवळ्ये लोक आपला स्वार्थ साधावा म्हणून आपण संस्थानी प्रजेचे प्रतिनिधी म्हणून पुढें येतात; आणि आपली प्रतिष्ठा वाढविण्यासाठीं संस्थानिकांवर व त्यांच्या राज्यकारभारावर तुटून पडतात असा समारोप करण्यांत येऊन संस्थानी प्रजापरिषदेकडे पाहण्याचीच जरूरी नाहीं असें ठरलें!

* * *

अशा रीतीनें नरेंद्रांनीं गेला पंधरवडा दिल्लीस घालविला. चाळीसपन्नास संस्थानिक जमले होते खरे, पण मौज ही कीं, बिकानेर, पतिआळा, अलवार, व जामनगर येथील चार संस्थानिकांनीं कांहींहि ठरवावें आणि बाकीच्यांनीं माना हालवाव्या असा प्रकार दिसून येतो. आमच्या सदर्न मराठा संस्थानिकांना मंडळांत मुळीं स्थानच नाहीं. त्यांना सर्वांना मंडळाचे मेंबर होण्याचा हक्क नाहीं. जे एक-दोन प्रतिनिधी निवडून गेलेले असतात त्यांना कोणाचाच पाठिंबा नाहीं. यासाठीं कांहीं गोष्टींना प्रतिकार करण्याची त्यांची इच्छा असली तरी ती फलद्रूप होण्यास मार्ग नाहीं. आणखी एक मौजेची गोष्ट सांगून हें पत्र पुरें करतों. नरेंद्र-मंडळाच्या अधिवेशनाच्या अगदीं पहिल्याच दिवशीं पतिआळा संस्थानिकाचा जुलूम उघड करणारा रिपोर्ट दिल्लीस प्रसिद्ध केल्याचें जाहीर करण्यांत येऊन त्यासंबंधीं मोठमोठालीं तांबड्या शाईत छापलेलीं पत्रकें येथें सर्व संस्थानिकांकडे मुद्दाम पोस्टानें पाठविण्यांत आलीं. संस्थानिक परिषदेला निघाले तेव्हां अशाच प्रकारचीं हस्तपत्रकें त्यांच्या मोटारगाड्यांत फेकण्यांत आलीं आणि सर्वांत गमतीची गोष्ट ही कीं, खुद्द अधिवेशन चालू असतां इंडिया गव्हर्मेंटचे पोलिटिकल सेक्रेटरी सर वाटसन यांचे नांवें पोस्टांतून एक लखोटा आला. सर्व नरेंद्रांचे समोर त्यांनीं तो लखोटा तेथेंच फोडला, आणि पाहतात तों काय! पतिआळाचीं कृष्णकृत्यें जाहीर करणारें तेंच तांबडें लालभडक पत्रक बाहेर पडलें! पतिआळाचे महाराज जवळच बसले होते. तें पत्रक त्या सभेंत आलेलें पाहून त्यांना काय वाटलें असेल याचा विचार वाचकांनींच करावा!

# असेंब्लींतील भाषणें

## लँड ॲक्विझिशन ॲक्टाची दुरुस्ती

(१९२५)

[श्री. न. चिं. केळकर यांनीं लँड ॲक्विझिशन ॲक्ट दुरुस्त करण्या-संबंधाचें बिल आणण्याची जी नोटीस दिली होती त्याबद्दलची साधारण माहिती खालीं दिली आहे.]

हल्लींचा लँड ॲक्विझिशन ॲक्ट हा पूर्वींचा म्हणजे सन १८७० सालचा कायदा दुरुस्त केलेला सन १८९४ चा कायदा होय. त्यानंतर १९२३ सालीं त्यांत थोडी दुरुस्ती झाली आहे, परंतु ती फारशी महत्त्वाची नाहीं.

हल्लीं जमिनीच्या किंमती ठरविण्याच्या बाबतींत बहुतेक सर्व काम कले-क्टर अगर लँड ॲक्विझिशन ऑफिसर करतात व हे सरकारी नोकर असल्या-मुळें होतां होईल तों हे लोक जमिनीच्या किंमती कमीच आकारतात असा लोकांचा त्यांच्यावर आरोप असतो व तो सर्वथैव खोटाच असतो असें म्हणतां येत नाहीं. त्यांच्या ठरावावर डिस्ट्रिक्ट कोर्टाकडे अर्ज करण्याचा वगैरे इलाज जरी कायद्यांत आहे तरी कलेक्टरनें ठरविलेली किंमतच बहुतेक कायमची ठरते. कारण एक तर वरिष्ठ कोर्टाचीं साधारण प्रवृत्ति कनिष्ठ कोर्टाचे ठरावांत फेरबदल करण्याची नसते व शिवाय डिस्ट्रिक्ट जज्जांना किंमती ठरविण्याकरितां जरूर असलेल्या स्थानिक परिस्थितीची माहिती नसते. दुसरें, रयतेस डिस्ट्रिक्ट कोर्टांत दाद मागण्यास जाणें फार त्रासदायक व खर्चाचें पडतें. याकरितां होतां होईल तों कोर्टांत जाण्याचा प्रसंग येऊं नये म्हणून व जमिनीच्या किंमती योग्य रीतीनें ठरविल्या जाव्या म्हणून नवीन बिलांत अशी योजना केली आहे कीं, कलेक्टर व रयत यांच्या दरम्यान जमिनीच्या किंमतीचे बाबतींत वांधा पडल्यास ज्याची जमीन घ्यावयाची ठरलें असेल अशा इसमास जमिनीची किंमत लवादपद्धतीनें ऊर्फ पंचांमार्फत ठरवून घेण्याचा अधिकार असावा. वर लिहिल्याप्रमाणें किंमतीबद्दल आपसांत एकमत

होत नसेल त्या ठिकाणीं सदर बाब पांच पंचांच्या बोर्डाकडे निर्णयादाखल सोंपविण्यांत यावी. त्या पांच पंचांपैकीं दोन पंच ज्याची जमीन घेण्याचें ठरलें असेल त्यानें नेमून द्यावेत. दोन पंच कलेक्टर ( सरकार ) अगर ज्या कंपनीकरितां वगैरे जमीन घ्यावयाची असेल त्यांनीं नेमावेत व ह्या चौघांनीं मिळून एक सरपंच नेमावा. याप्रमाणें या पांच पंचांच्या बोर्डानें निकाल एकमतानें दिला तर तो निकाल उभयपक्षकारांस अखेरचा बंधनकारक समजला जावा. साधारणतः पंचांमध्यें होतां होईल तोंपावेतों एकमतानेंच निर्णय देण्याची इच्छा असते, ही गोष्ट लक्षांत घेतली असतां बहुधा सदर पंचबोर्डाचे निकाल अखेरचे समजण्यास हरकत नाहीं. याच्या योगानें कोर्टांतील फिर्यादीचा वगैरे खर्च वांचून आपणच निवडून दिलेल्या पंचांमार्फत निकाल मिळावयाचा असल्यामुळें लोकांस जमिनीच्या किंमतीसंबंधानेंहि तक्रार करण्यास जागा राहणार नाहीं. दिसण्यास ही सुधारणा अगर हें पंचायती निवाड्याचें तत्त्व जरी नवीन दिसतें तरी हें तत्त्व म्हणजे वाद उत्पन्न झाला असतां पंचांच्या मदतीनें त्याचा निकाल करण्याचें तत्त्व, सन १८७० च्या कायद्यांत होतें. मात्र तें पुढें सन १८९४ चे कायद्यांतून काढून टाकण्यांत आलें. विलायतेंत रूढ असलेल्या दिवाणी कामांतलें पंचांच्या मदतीनें न्यायदान करण्याचें तत्त्वहि इकडे हिंदुस्थानांत रूढ होणें जरूर आहे व त्यासहि थोडें चालन ह्या सुधारणेनें मिळण्यासारखें आहे.

दुसरा विशेष महत्त्वाचा फरक म्हणजे हल्लीं सरकारला सरकारी कामाकरितां अगर एखाद्या कंपनीकरितां जमीन या कायद्याप्रमाणें मिळवावयाची असल्यास सरकारनें दसर जमीन सार्वजनिक कार्याकरितां ( पब्लिक पर्पज ) मिळविणें जरूर आहे असें गॅझेटांत नुसतें प्रसिद्ध केलें म्हणजे भागतें. सरकारचें काम बाजूस ठेवलें तरी एखाद्या कंपनीनें हातीं घेतलेलें कार्य हें सार्वजनिक हिताचें आहे किंवा नाहीं व त्याकरितां किती लोकांची किती गैरसोय करणें सार्वजनिक हिताच्या दृष्टीनें जरूर आहे हें ठरविण्यांत लोकांच्या हातांत, वर्तमानपत्रांतून लेख लिहून अगर सभांच्याद्वारें, आपलें मत व्यक्त करण्यापलीकडे हल्लीं कायदेशीर असें साधन कांहीं एक नाहीं. नवीन बिलांत एखादी जमीन सार्वजनिक हिताच्या दृष्टीनें कायद्याच्या आधारें जबरदस्तीनें संपादन करणें जरूर आहे किंवा नाहीं हें ठरविण्याचा अधिकार कायदेकौन्सिलांकडे दिलेला आहे. अर्थात् ह्या प्रश्नाची लोक-

प्रतिनिधींना पूर्ण छाननी करतां येईल व एकदां लोकांच्या प्रतिनिधींनीं कायद्याच्या आधारें जमीन संपादन करणें जरूर आहे असें ठरविलें म्हणजे त्या बाबतीपुरता तरी वाद लोकांच्या दृष्टीनें निकालांत निघेल व हल्लीं देशापुढें असलेले मुळशी पेटा-प्रकरणासारखे प्रसंग उत्पन्न होण्याचें बहुतेक टळेल.

वर नमूद केलेल्या दोन विशेष महत्त्वाच्या फरकांखेरीज इतर अनेक महत्त्वाचे फरकहि ह्या नवीन बिलांत सुचविले आहेत. उदाहरणार्थ, जमीन सक्तीनें संपादन करण्याच्या कायद्याप्रमाणें जमीन मिळवावयाचीच तर ती निदान हिंदी रयतेच्या हिताकरितां असावी, यास्तव ज्या कंपनीकरितां जमीन घ्यावयाची असेल त्या कंपनीचें भांडवल रुपयांच्या स्वरूपांत असावें, म्हणजे परदेशी कंपनीनें परदेशांत बसून इकडे व्यापारधंदा करून निवळ फायदा परदेशांतील लोकांकरितां परदेशांत घेऊन जावा, ही आपत्ति टळेल. दुसरा नियम असा कीं, सदर कंपनींतील भागीदारांपैकीं बहुसंख्याक भागीदार हिंदी असावेत. हल्लींच्या कायद्याप्रमाणें गरीब व अडाणी वर्गांतील लोकांवर अशी एक आपत्ति ओढवते कीं, त्यांचीं घरें अगर शेतें ह्या कायद्याप्रमाणें घेतलीं गेलीं. म्हणजे त्यांचा मोबदला त्यांना पुरेसा मिळत नाहीं. दुसरें, ज्या वेळीं हे पैसे हातांत येतात त्याच वेळीं दुसरीकडे घर अगर शेत त्यांच्याकरितां विकत का होईना पण हटकून मिळूं शकतेंच असा भरंवसा नसतो व हातांत आलेले पैसे अडाणी लोकांकडून ताबडतोब जमीन अगर घर घेण्यांत गुंतविले न जाऊन ती रक्कम तशीच त्यांच्या हातांत राहते; आणि कांहीं दिवसांनीं ती सर्व रक्कम अगर त्यापैकीं बराचसा भाग खर्च केला जातो व संधि येईल त्या वेळेस घर अगर जमीन विकत घेण्याकरितां पैसे हातांत नसल्यामुळें घरापरी घर अगर शेतापरी शेत जाऊन त्यांच्या नशिबीं मोलमजुरी येते. ही आपत्ति टाळण्याकरितां नवीन बिलांत अशी सुधारणा सुचविली आहे कीं, जर सक्तीनें घेतल्या जाणाऱ्या घराच्या मोबदल्यांत पैशाच्या ऐवजीं घर घ्यावयाचें असेल तर त्याप्रमाणें नव्या घराचा प्रत्यक्ष कबजा घराच्या मालकास दिल्याखेरीज त्याच्या राहत्या घराचा कबजा घेऊं नये. त्याचप्रमाणें ज्या वेळीं तीस अगर त्यापेक्षां जास्त लोकांचीं राहतीं घरें ह्या कायद्याप्रमाणें सक्तीनें घ्यावयाचीं असतील त्या वेळीं सोइस्कर अशी दुसऱ्या घरांची व्यवस्था त्यांच्याकरितां करण्यांत यावी.

जमिनीच्या किंमती ठरवितांना हल्लींच्या कायद्याप्रमाणें ज्या गोष्टींचा विचार करावा लागतो त्यापेक्षां नवीन होणाऱ्या कायद्यांत ज्या आणखी जास्त बाबींचा विचार केला जावा अशी योजना सुचविली आहे त्या बाबी अशा—

१ कांहीं सयुक्तिक ठराविक जमीन जास्त उपयुक्त कामाकडे लावली जाण्याचा व त्यापासून फायदा होण्याचा संभव असेल तर त्या फायद्याचा विचार करण्यांत यावा.

२ एकंदर आजूबाजूची परिस्थिति म्हणजे ज्यामुळें घेतल्या जाणाऱ्या जमिनीचा तिच्या स्वतःपुरता अगर आजूबाजूच्या जमिनीबरोबर एखाद्या फायदेशीर कार्याकडे उपयोग केला जाण्याचा संभव आहे अशी परिस्थिति असल्यास तिचा विचार जरूर व्हावा.

३ सक्तीनें घेतल्या जाणाऱ्या मिळकतीवरच एखाद्या धंद्याचा फायदा अगर गिऱ्हाइकी अवलंबून असेल तर तशा परिस्थितीचा विचार करणें.

४ सक्तीनें जमीन घेतल्यामुळें दुसरी सोइस्कर जमीन मिळेपावेतों धंदा बंद पडल्याकारणानें होणारें नुकसान इ. इ. इ.

हल्लीं पुष्कळ वेळां असा प्रकार घडतो कीं, एखाद्या कार्याकरितां सक्तीनें जमीन घेतली जाते व नंतर ज्या कार्याकरितां जमीन घेतली गेली तें कार्य पूर्णपणें अगर अंशतः अयशस्वी ठरल्याकारणानें अगर दुसऱ्या कांहीं कारणांमुळें घेतलेल्या सर्व जमिनीची जरूरी लागत नाहीं, त्या वेळीं जमिनीपैकीं कांहीं भाग विकण्याचा अगर खंडानें देण्याचा प्रसंग येतो. त्या वेळीं कंपनीनें वगैरे अगर सरकारनें दिलेल्या मूळ किंमतीपेक्षां किती तरी अधिक किंमतीस सरद जमीन विकली जाते व तीहि मूळ मालकास विकण्याची हल्लींच्या कायद्याप्रमाणें सक्ती नसल्यामुळें वाटेल त्या इसमास ती विकतात. या योगानें जो अन्याय होतो तो दूर करण्याकरितां नवीन कायद्यांत अशी दुरुस्ती सुचविली आहे कीं, अशा रीतीनें जमीन विकण्याचा वगैरे प्रसंग आला तर ज्या किंमतीला ती मूळ सक्तीनें मिळविली असेल त्या किंमतींत ज्याचेकडून ती घेतली असेल त्यास अगर त्याच्या वारसास वगैरे विकण्यांत यावी व तसें शक्य नसल्यास मगच अन्य तऱ्हेनें तिची व्यवस्था व्हावी. त्याप्रमाणें हल्लीं एखाद्या वेळीं असें घडतें कीं, एखाद्याचे मालकीच्या जमिनीपैकीं थोडासा

भागच सक्तीनें घेतला जातो, परंतु त्यामुळें सदर मालकाची बाकीची राहिलेली जमीन त्यास निरुपयोगी होते. अशा वेळीं निरुपयोगी होणारी ही सर्व जमीन, त्या जमिनीच्या मालकाची इच्छा असल्यास घेतली पाहिजे असा निर्बंध नवीन कायद्यांत ठेविला आहे. अशा तऱ्हेच्या जमिनी मालकांस निरुपयोगी ठरून त्यांचा मोबदला कांहीं एक न मिळतां त्या तशाच फुकट सोडून द्याव्या लागल्याचीं पुष्कळशीं उदाहरणें मुळशी पेट्यांत ह्या कायद्याप्रमाणें घडलेलीं आढळतील.

हल्लीं एखादी जमीन एखाद्या सार्वजनिक कार्याकरितां लागण्याचा संभव आहे असें सरकारास वाटलें म्हणजे त्याबद्दल जाहिरात नुसती सरकारी गॅझेटांत कलम ४ प्रमाणें प्रसिद्ध केली म्हणजे भागतें. ती गोष्ट त्या जमिनीच्या मालकास अगर कबजेदारास कळविण्याची जबाबदारी सरकारावर नसल्यामुळें पुष्कळ वेळां अडाणी लोकांस त्यांची जमीन घेण्याबद्दलचा विचार सरकारांत सुरू आहे या गोष्टीची अगदीं अखेरपर्यंत दाद नसते. त्याकरितां नवीन बिलांत असें सुचविलें आहे कीं, एखादी जमीन सार्वजनिक कार्याकरितां लागण्याचा संभव आहे असें सरकारास वाटेल त्या वेळीं सरकारी गॅझेटाबरोबरच सदरची जाहिरात त्या जिल्ह्यांतील दोन देशी वर्तमानपत्रांत छापावी व शिवाय जमिनीच्या मालकास व कबजेदारास नोटिशीनें कळविण्यांत यावें. तसेंच हल्लीं पुष्कळ वेळां असें घडतें कीं, जमीन ह्या कायद्याप्रमाणें घेण्याची ठरली व ती तशी घेतली गेली आणि जमिनीच्या मालकाचा प्रत्यक्ष कबजा गेला तरी त्यास मोबदल्याची रक्कम मिळत नाहीं. याकरितां बिलांत असा फरक सुचविला आहे कीं, मोबदल्याची रक्कम ठरून ती मालकास प्रत्यक्ष मिळेपर्यंत अगर मालकाकरितां म्हणून सदर रक्कम डिस्ट्रिक्ट कोर्टांत अगर इम्पीरियल बँकेंत डिपॉझिट म्हणून ठेवण्यांत आल्याखेरीज जमिनीचा कबजा मालकाकडून काढून घेऊं नये. त्याचप्रमाणें सार्वजनिक उपयोगाकरितां म्हणून जमीन घ्यावयाची असेल त्या वेळीं किती मुदतींत ती जमीन संपादन करण्याचें मूळ काम संपेल व त्याचप्रमाणें ज्या कामाकरितां जमीन घ्यावयाची तें काम किती मुदतींत पुरें होईल तेंहि प्रसिद्ध करण्यांत यावें.

---

# बजेटावरील भाषण

[ ले. असेंब्लींत हिंदुस्थान सरकारच्या वार्षिक बजेटाची चर्चा चालल्या-वेळीं न. चिं. केळकर यांनीं पुढील आशयाचें भाषण केलें.]

अंदाजपत्रकाचे बाबतींत कांहीं वर्षांपूर्वी जो गोंधळ माजला होता तो जरी सर्वस्वीं दूर झाला नसला तरी बजेटपद्धति बरीच सुधारली याविषयीं प्रत्येकास आपापल्या परीनें आनंदच वाटेल. रेल्वेचें बजेट वेगळें काढलें आणि पोस्ट व तार या खात्यांचा हिशेबहि व्यापारी पद्धतीनें होऊं लागला हें ठीक झालें. चेंबर्लेन कमिशननें सुचविल्याप्रमाणें जमाखर्चाचें वर्ष ता. १ एप्रिलपासून न धरतां ता. १ जानेवारीपासून धरल्यास अंदाजपत्रकाचा पाया हल्लींसारखा डळमळीत न राहतां पक्का होईल असें लॉर्ड मेस्टन यांनींच आपलें मत दिलें आहे. पोस्ट खात्याच्या जमाखर्चाची रचना रेल्वे खात्याप्रमाणेंच व्यापारी पद्धतीवर बसविली गेली असून तें खातें आंतबट्ट्याचें नसून फायदेशीर ठरत आहे ही आनंदाची गोष्ट आहे. त्याचप्रमाणें मिठाचा करहि वाढविला नाहीं हें सुदैवच समजावयाचें. मिठावरील कर आणखी कमी झाला व मिठागारांचीहि वाढ करून सरकारची मक्तेदार पद्धति मोडली तरच हल्लीं हिंदी लोकांना जें मीठ अपुरें मिळतें आणि जनावरांना मुळींच मिळत नाहीं ती आपत्ति दूर होईल. अफूचा वसूल दिवसेंदिवस घटत जाणार आणि तो अगदींच घटत गेला तरी हिंदुस्थान सरकारच्या बजेटाला तो धक्का जाणवणारहि नाहीं ही स्थिति अभिनंदनीय आहे. अफूसारखीं व्यसनें नाहींशीं व्हावीं हें इष्ट आहेच; पण परदेशांतल्या लोकांना अफूच्या व्यसनापासून मुक्त करण्याची काळजी वाहण्यापूर्वी देशांतली दारूबाजी नष्ट करण्याचा सरकारनें प्रयत्न केल्यास तें अधिक इष्ट होईल. तथापि राष्ट्रसंघाच्या इच्छेस अनुसरून जगांतलें अफूचें दुर्व्यसन घालविण्यास हिंदी राष्ट्रहि मनोभावें मदत करील.

चालू सालच्या बजेटांत ४ कोटींची शिल्लक राहिल्यानें फडणविसांना या शिलकेचें काय करावें हें कोडें पडलें आहे! वास्तविक शिल्लक ८ कोटींची आहे पण त्यांतल्या चार कोटींची योजना फडणविसांनीं कर्जफेडीकडे केली आहे. ही येवढी रक्कम त्या खात्याकडे खर्ची टाकावी का नाहीं हा प्रश्नच आहे व असेंब्लींत यासंबंधानें उपसूचना येतीलच. हिंदुस्थानची पत कायम राहण्याला कर्जफेडीकडे दरसाल ठराविक रक्कम सुपूर्त केली पाहिजे असें

सर बेसिल म्हणतात पण हिंदुस्थानची पत इतकी डळमळीत खचित नाहीं आणि शिवाय हिंदुस्थानच्या कर्जफेडीला ग्रेट ब्रिटनच्या जामिनकीचा मोठा आधार आहे हेंहि हिंदुस्थानच्या धनकोंना माहीत नाहीं असें नाहीं. मध्यंतरीं कांहीं कालपर्यंत हिंदुस्थानला जबर व्याजानें कर्ज काढावें लागलें हें खरें, पण तो हिंदुस्थान सरकारच्या आचरटपणाचा व उधळेपणाचा परिणाम होय. महायुद्ध संपतांच बेसुमार खर्चाचीं नवीं कामें हातीं घेऊन पडेल तें व्याज देऊन, कर्ज काढण्याची घिसाडघाई हिंदुस्थान सरकारानें केली नसती तर त्यास असा कटु अनुभव आला नसता; तथापि एकंदरींत हिंदुस्थानची पत शाबूत आहे असेंच आपल्या प्रत्ययास येईल.

हिंदुस्थान सरकारनें कोणत्याहि कामाकरितां कर्ज काढलें तरी त्या सर्व रकमेस समष्टिरूपानें हिंदुस्थान सरकारच जबाबदार आहे. तथापि हिशेब चोख राखण्याकरितां प्रत्येक कामाच्या कर्जाचा हिशेब वेगळा ठेवावा ही फडणविसांची सूचना योग्य आहे. आणि यापुढें रेल्वे खात्याचें कर्ज, प्रांतिक सरकारांनीं काढलेलें कर्ज, म्युनिसिपालिट्यांनीं उभारलेलें कर्ज यांचा वेगवेगळा हिशेब ठेवण्यांत येईल. येत्या बजेटांत सिव्हिल सर्व्हिसच्या वाढत्या खर्चाचा आंकडा समाविष्ट केला गेला आहे. ली कमिशनच्या सूचनांसंबंधीं असेंब्लीनें जो निषेधपर ठराव केला तो लक्षांत घेतां या वाढत्या खर्चाला असेंब्लीकडून तात्त्विक हरकत घेण्यांत येईल. सिव्हिल सर्व्हिसच्या पगारावर मत देण्याचा असेंब्लीला अधिकार नसल्यानें तो नामंजूर करतां येत नाहीं त्यास उपाय नाहीं.

सालअखेर राहणाऱ्या शिलकेची खैरात करतांना फडणविसांनीं समदृष्टि राखली नाहीं हें गैर आहे. तिकडे मुंबई सरकारास जमाखर्चाची तोंड-मिळवणी करण्याकरितां नवा कर लादावा लागतो; आणि इकडे फडणविसांना आपल्या शिलकेचें काय करावें असें कोडें पडतें; आणि तरी पण मुंबई सरकारची खंडणी कमी करण्यांत येत नाहीं. हिंदी कापसाच्या गिरण्यांवरील स्थानिक जकात उठविण्याचें नाकारण्यांत सर बेसिल यांचा मुंबईकरांवरचा राग अगदीं स्पष्ट व्यक्त होतो. एक्साइज ड्यूटी उठवावी असा असेंब्लीनें गतवर्षींच स्पष्ट ठराव केला आहे. गिरणीवाल्यांच्या मॅनेजिंग डायरेक्टरांचें कमिशन, एजन्सीसंबंधाचे करार, भागीदार व मजूर यांच्याशीं होणारें त्यांचें वर्तन इत्यादि कारणांमुळें आमचा गिरणीवाल्यांशीं उभा दावा आहे, तरी पण

या जकातीच्या मुळाशीं जें अन्यायाचें तत्त्व आहे त्याचा बीमोड करण्याकरितां आम्ही ही जकात उठविण्याचा आग्रह धरतों.

हुंडणावळीचा दर निश्चित करण्याविषयीं आम्हीं कमिटीची मागणी केली असतां फडणविसांनीं ती नाकारली. आम्हीं मागणी केली कीं ती नाकारावयाची असा शिरस्ताच पडून गेला आहे. ही कमिटी नेमण्यांत येईल आणि ब्लॅकेटसाहेब विलायतेहून परत येतांना या कमिटीची योजना खिशांत घेऊनच येतील. परंतु आम्ही मागूं त्या वेळीं नकार द्यावयाचा असा सरकारचा 'कर न कर वसा' आहे! हुंडणावळीची यक्षिणीची कांडी फिरवून हेले-साहेबांनीं विलायतेवर परत हुंड्या करून जें कोट्यवधि रुपयांचें नुकसान केलें त्याविषयीं सर बेसिल हे मुख्यता स्वीकारीत आहेत, किंवा फार तर समजुतींत चुकी झाली असें म्हणत आहेत. परंतु रोम शहर जळत असतांना नीरो बादशहा आनंदानें सारंगी वाजवीत होता तशा प्रकारानें आम्ही आमचे क्रोडों रुपये उधळले जात असतां स्वस्थ चित्तानें पाहत बसावें असें सर बेसिल यांस वाटत असल्यास ती सर्वस्वीं चूक आहे. इंग्लंडच्या फायद्यासाठीं आमच्या हिताचा बळी देण्यांत येतो; याला मि. मोअरटन फ्रीवेन आणि मेजर ग्रोगन यांची साक्ष देतां येईल. मोअरटन फ्रीवेन म्हणतात, हिंदुस्थान सरकारनें परतहुंड्या विकल्या नसत्या तर इंग्लंडला आपली पत राखणें फारच जड गेलें असतें. मेजर ग्रोगन यांची स्पष्टोक्ति अधिक समर्पक आहे. तें म्हणतात, हिंदुस्थानच्या फडणविसाच्या या विचित्र कृतीचें कोडें उलगडावयाचें झाल्यास पुढीलप्रमाणें अनुमानें करावीं लागतात--१ हिंदु-स्थान सरकारच्या मागील चुकांना सफेती देण्याचा हा कट असावा. २ हिंदु-स्थानच्या मालावर १०० टक्के ड्यूटीचा नवा बोजा लादून मँचेस्टर व डंडी येथील व्यापाऱ्यांची धन करण्याचा हा डाव असावा. ३ हिंदुस्थानांतल्या ऋणकोंना ब्रिटिश बँकिंग संघाच्या जबड्यांत लोटण्याचा हा प्रयत्न असावा. ४ चांदीचा भाव उतरूं न देण्यांत ज्यांचा फायदा आहे अशा एखाद्या संस्थेच्या वशिल्यानें हा विपरीत प्रकार घडला असावा. किंवा ५ हिंदुस्थानांतल्या अधिकाऱ्यांचा तो निवळ मठ्ठपणा असावा. अशा रीतीनें इंग्लिश लेखकांनीं ज्या कृतीला अक्षम्य ठरविलें तिची सारवासारव करणें सर बेसिल ब्लॅकेट यांच्याहि शक्तीच्या बाहेरचें आहे. यास्तव हुंडणावळीच्या प्रश्नाची तड पोंच-विण्याकरितां तज्ज्ञांची कमिटी नेमणें जरूर आहे.

---

# मद्यपानप्रतिबंधाचा ठराव

[ बुधवार ता. २-९-२५ रोजीं असेंब्लीमध्यें मद्यपानप्रतिबंधाचा ठराव हाजी वाजीद्दीन यांनीं आणला. त्यावरील आपली उपसूचना मांडतांना श्री. न. चिं. केळकर यांनीं खालील आशयाचें भाषण केलें. ]

अध्यक्षमहाराज, मुख्य ठराव व त्यावरील इतरांच्या उपसूचना व माझी उपसूचना यांत थोडथोडा फरक आहे. मूळ ठरवांत एक गोष्ट गृहीत धरली आहे कीं, दारूबंदीचा कायदा आजचे आजच करतां येईल व त्यानें कार्य होईल. दुर्दैवानें ही गोष्ट आजच्या आज घडणारी नाहीं. कायदेशीर प्रतिबंधाचें तत्त्व सरकारनें उघडपणें मान्य केलें तरी आज पुरें; शिवाय औषधोपचाराकरितां मादक पदार्थ लागतात त्यांची तजवीज मूळ ठरावांत नाहीं. उपसूचक डॉ. दत्त यांची उपसूचना जवळ जवळ माझ्यासारखीच आहे. पण त्यांतील किरकोळ तपशिलाच्या बाबींवर रण माजून मुख्य मुद्दा हातचा गमावेल म्हणून माझ्या उपसूचनेला मी थोडें स्थूल स्वरूप दिलें आहे. कर्नल क्रॉफर्ड यांची उपसूचना मात्र मला पसंत नाहीं व ती नियमबाह्य ठरली नसती तरी आपण सर्वांनीं नामंजूरच केली असती. कारण तिच्या योगानें कायदेशीर प्रतिबंधाच्या मूळ तत्त्वालाच हरताळ फासला जातो. ती उपसूचना म्हणजे मूर्तिमंत निराशाच होय. कर्नल क्रॉफर्ड यांना असें वाटत असावें कीं, सगळ्या हिंदुस्थानांत कोणताहि वर्ग मद्यपान-प्रतिबंधाला खरा अनुकूल नाहीं व भविष्यकाळीं कधींहि येथें कायदा दारूला प्रतिबंध घालणार नाहीं. दारूवर सरकारनें कडक नियंत्रण घातलें आहे असें भासविणारी उपसूचना आणून सरकारला या कामीं सर्टिफिकेट देऊन आहे तें नियंत्रण पुढेंहि चालू राहावें म्हणजे त्यांत सर्व कांहीं आलें, असा मायावीपणा केला आहे. पण अशानें कोण फसतो ?

माझ्या उपसूचनेंत मीं इतकी खबरदारी घेतली आहे कीं, ती सरकारासहि खरोखर नको म्हणतां येऊं नये. पूर्ण कायदेशीर दारूबंदीला मीं मोजकी मुदत घातली नाहीं. औषधी मद्याची सोय ठेवली आहे. आजच कायदा करावा असेंहि म्हटलेलें नाहीं. प्रांतिक सरकारच्या अधिकारावर अतिक्रमण सुचविलें नाहीं. दोनच निर्भेळ मुद्दे मीं मांडले आहेत ( १ ) दारूबंदीचें तत्त्व

सरकारला मान्य आहे कीं नाहीं व (२) ही बंदी पूर्ण होईपर्यंत कोणत्याहि मोहल्यांतील लोकांना तेथें दारूचें दुकान नको असें म्हणण्याचा अधिकार सरकार देणार कीं नाहीं ? माझ्या उपसूचनेंत अशा रीतीनें शुद्ध मध्यम मार्गाचा अवलंब केला असल्यामुळें आपण ती मंजूर कराल अशी मला आशा आहे. व्यक्तिस्वातंत्र्य हें कर्नल क्रॉफर्ड यांच्याइतकेंच मलाहि मान्य आहे. पण दारूचें दुकान हवें म्हणण्याचें स्वातंत्र्य जसें तुम्ही देणार तसेंच नको म्हणणें हेंहि स्वातंत्र्यच आहे व तें तुम्ही देणार कीं नाहीं ? हवें म्हणणारा जसा आपल्या होकाराचे परिणाम सोसण्यास तयार असतो तसें नको म्हणणाराहि तयार असल्यावर मग तुमचें काय गेलें ? स्वातंत्र्य या शब्दांत होकाराइतका नकारहि समाविष्ट होतो. दारूचें दुकान हवें म्हणणाराचें मात्र धैर्य आणि नको म्हणणाराचें नाहीं कीं काय ? पण हवें म्हणणाराचाहि हक्क मानण्यास मी तयार आहे. ज्याच्या बाजूचें मत अधिक होईल तसें घडेल. हिंदी समाज झाला तरी त्यांत मद्यपानप्रतिबंधाला नांवें ठेवणारे, त्याला जुलूम म्हणणारे, नीतिधर्माचें स्तोम माजविणाऱ्या झब्बू लोकांचा रिकामटेकडा उपद्व्याप असें म्हणणारे लोक आहेत ही गोष्ट मी विसरत नाहीं.

ज्यांच्या हांडामांसांत मद्यपानप्रतिबंध खिळलेला आहे त्यांचें व्यक्तिस्वातंत्र्य एकदम सर्वस्वीं हिरावून घेण्यास तयार मी नाहीं; तर इकडील इंग्रजांचा दारू पिण्याचा हक्क तूर्त तरी मी कसा नाकबूल करीन ? मूठभर लोकांखेरीज इकडचे सगळे इंग्रज दारू पिणारे आहेत ही गोष्ट मला माहीत आहे. त्यांची परंपराच मद्यपात्रांत आज शेंकडों वर्षें जणूं काय भिजतच पडलेली आहे ! मद्यपान हा त्यांना पूर्वजांचा प्रसाद व पुढील वंशजांना देण्याचा आशीर्वाद असें वाटतें. बायबल, बाटली व बेयोनेट या दैवी त्रिमूर्तीचे ते नित्य उपासक आहेत. घरीं पाहुण्यापुढें ठेवलेला दारूचा पेला चुकून अर्धवट भरला गेला तर त्याला पाहुण्याचा अपमान झाला असें दुःख होतें. आणि सगळाच पेला मोकळा पडला तर आपल्या पाहुणचाराची बेअब्रू झाली असें त्याला वाटतें. मद्यपाननिषेधाचें कोणतेंहि सूत्रवाक्य हें वाममार्गी चेटकिणीच्या कूटमंत्राप्रमाणें त्याला भीतिप्रद वाटतें.

मेजवानींत राजाचा जयजयकार करावयाचा असतां कोणी कोरडा किंवा पाण्यानें भरलेला पेला तोंडाला लावला तर त्याला तो राजाचा अपमान व दुःसह राजद्रोह वाटतो. शराबी पर्शियन कवि उमर खय्याम याचा तो पट्टशिष्य आहे. त्याची संस्कृति, शास्त्रज्ञान, तत्त्वज्ञान हीं दारूच्या तारेनें गुंफलेलीं

किंवा निदान अलंकृत केलेली आढळतात. त्यांचा धर्मग्रंथ पाहावा तर त्यांत मद्यपाननिषेधापेक्षां मद्याची शिफारसच आढळेल. येशु ख्रिस्ताच्या शेवटच्या मेजवानींत मदिरा हजर होती. नैमित्तिक जलप्रलयांत लहानशा नावेंत नोहा यानें जी सामुग्री बांचवून भरून घेतली त्यांत मद्य होतें. ख्रिस्ती स्तोत्रपाठ व बायबलांतील संतवचनें यांतहि मद्याचा भाग लागतो. अशा स्थितींत पुसिफूट जॉन्सनसारखा कोणी वेडा पीर मद्यप्रतिबंधाचा उपदेश करण्यास त्यांच्यांतच निघाला तरी त्याला ते थारा कसा देतील? ख्रिस्ती मनु मोझेस यानें घालून दिलेल्या दहा-कलमी नियमावलींत जें नाहीं तें सैतानी वचन असेंच ते म्हणणार!

तात्पर्य, असल्या सुखमय स्वर्गलोकांत जो नांदतो त्याला कायद्याच्या नीरस हातानें ओढून निर्मद्याच्या मृत्युलोकांत आजच खेचून आणण्याचें धाडस मी कसें करीन? तूर्त त्याला आपल्या रंगांत राहूं देण्यास माझी तयारी आहे; पण त्यालाच उलट माझें असें विचारणें आहे कीं, बाबा, तुझ्या गांवच्या आवारांत दारूचें दुकान राहूं देण्याची तुझी तळमळ जशी मी मान्य करतों, तशी माझ्या मोहल्यांत तरी दारूच्या दुकानाचें दर्शन नको, ही माझी तळमळ तूं कां मान्य करीत नाहींस? स्वातंत्र्य ही दुधारी तलवार आहे. तिची एक धार तुला मात्र बाधूं नये, आणि दुसरी मात्र आम्हांला कां बाधावी? कर्नल क्रॉफर्ड यांनीं मद्यपानप्रतिबंधाचा अर्थ नेमस्त मद्यपान असा केला आहे! पण खऱ्या मद्यपाननिषेधशास्त्रास हा अर्थ मान्य नाहीं. नेमस्तपणाची कल्पना बुद्धिग्राह्य नाहीं असें नाहीं. पण मोहाला केव्हांहि बगल देऊनच जावें. त्याच्याशीं खडें युद्ध देऊं नये, आणि घाण काढून टाकीत बसण्यापेक्षां ती आधीं होऊं न दिलेली बरी, या तत्त्वावरच सर्व मद्यपाननिषेधक मंडळ्या वागतात. सोजीर हा सामान्यतः दारूबाज असतो. पण जेव्हां तो अशा एखाद्या मंडळीचा सभासद होतो तेव्हां कडकडीत बहिष्काराचीच शपथ घेतो. दर वेळीं पेल्यांत पडेल तितकेंच माझें नेमस्तपणाचें माप असें तोहि म्हणत नाहीं हें सिन्हिलियन लोकांनीं लक्षांत ठेवावें.

अमेरिकेंत मद्यपानप्रतिबंधाची चळवळ सुरू झाली ती नीतिधर्माचें नसतें स्तोम माजविणारांनीं सुरू केलेली नाहीं. तर ज्यांची पूर्वपरंपरा, ज्यांचा स्वतःचा अनुभव मद्यपानाचा होता त्यांनींच सामाजिक व सांपत्तिक दृष्ट्या होणारें नुकसान लक्षांत घेऊनच ती सुरू केली. अमेरिकेंत प्रतिबंधाचा कायदा नवीनच सुरू

असल्यामुळें तो कोणी कोणी केव्हां केव्हां मांडला असें ऐकूं येतें. पण अमेरिका फसली असें म्हणून हसण्याचें कारण नाहीं. पराचा कावळा होतच असतो. निदान तिजविषयीं सहानुभूति पाहिजे, छिद्रान्वेषी टीका नको. हिंदुस्थानांत केव्हांहि दारू नव्हती किंवा नाहीं असें मी म्हणत नाहीं. पण विलायतेंत मद्यपान हा नियम तर हिंदुस्थानांत तो अपवाद, असा त्या दोहोंचा संबंध आहे. यांत कांहींच अर्थ नाहीं काय? पूर्ण बंदी पुढें केव्हांहि होवो किंवा न होवो, पण आज तरी निदान मूठभर व्यक्तींनीं, त्यांना दारू हवी म्हणून, बाकी सर्व समाजावर जुल्म कां करावा? या अल्पसंख्याकांची सोय आधींच झालेली आहे. पण जे खरोखर बहुसंख्याक त्यांनाच आपल्या बचावाचें कायदेशीर साधन नाहीं, असा उलट जुल्म झालेला आहे. हें साधन तरी त्यांना द्या असें मी म्हणतों व तें साधन तरी कोणाच्या हातीं ठेवा म्हणतों? तर तुम्हीं सरकारांनीं ज्या लोकांना मतदार बनवून जबाबदारीच्या पायावर खडें केलें त्यांच्याच हातीं!

जे मतदार प्रांताचें राज्य चालवितात, जे स्थानिक स्वराज्यसंस्था व कौन्सिलें यांचे सभासद निवडून देतात व सोंपीव खात्याचे मंत्री ज्यांचा आधार सांगून अधिकार गाजवितात, आणि ज्यांना उद्यां किंवा मिळेल तेव्हां स्वराज्य मिळणार, त्यांना आपल्या अमुक एका आवारांत दारूचें दुकान नको असें म्हणण्याचा अधिकार नसावा ही कोण दुर्दशा! ज्यांना एका मोठ्या कार्याकरितां मतदार असें मानतां त्यांच्यावर हें लहानसें कार्य कां सोंपवीत नाहीं? सुदैवानें कर्नल क्रॉफर्ड समजतात त्यापेक्षां मद्यपाननिषेधाकडे सरकार हळूहळू अधिक झुकूं लागलें आहे. परवांच सोलापुरास मुंबईचे गव्हर्नरसाहेब काय बोलले? कायदेशीर दारूबंदीचें तत्त्व भविष्यकालीन का होईना पण त्यांनीं मान्य केलें; ही मान्यता हिंदुस्थान सरकार उचलून धरणार कीं खालीं पडूं देणार? दारूचें उत्पन्न बुडण्याची भीति जो तो दाखवितो. पण प्रांताचा सर्व अधिकार लोकांच्या हातीं देऊन तुम्हीं बाजूला व्हा, म्हणजे लोक तुटलेलें उत्पन्न भरून काढण्याची हवी ती तजवीज करतील, किंवा खर्च कमी करतां आला तर करतील, किंवा हें कांहींच न घडलें तर, आम्ही हरलों असें म्हणून सरकारी खर्चाकरितां दारूचें दसर चालू ठेवतील! पण पैशाची ही सबब खोटी आहे. इंग्लंडांतील लोकल गव्हर्मेंट बोर्डाचा मुख्य अधिकारी डॉक्टर सर आर्थर न्यूजहोल्म याचा अभिप्राय नुकताच प्रसिद्ध झाला

आहे. तो म्हणतो कीं, "लोकांची निम्मी दारू जरी तुटली तरी सगळ्या गरिबांना चांगलीं घरें बांधून देतां येण्याइतका पैसा त्यांच्याकडूनच काढतां येईल आणि अमेरिकेप्रमाणें पुरी दारूबंदी करतां येईल तर मग मुळीं पंचाईतच उरणार नाहीं. पण सुधारणेचा हात जर कशानें लुला पडत असेल तर तो केवळ मद्यपानानें." आणि जी गोष्ट विलायतेची तीच हिंदुस्थानची.

शेवटीं, कर्नल क्रॉफर्ड व त्यांच्या मताचे इतर लोक यांना मी ताकीदवजा इशारा देतों, तो त्यांनीं लक्षांत ठेवावा. आमची स्वराज्याच्या चळवळीची गतीच खुंटली तर त्यांना दाही दिशा मोकळ्याच आहेत. पण जर आहे ही प्रगति टिकली तर पुढेंमागें मद्यपानाला कायद्यानें प्रतिबंध होईल हें त्यांनीं समजून राहावें. लोकल ऑप्शन आम्हीं मागतों ही केवळ पहिली पायरी होय. तिच्या योगानें फार तर काय होईल? इतकेंच कीं, दारू पिणारा व न पिणारा दोघांचेंहि व्यक्तिस्वातंत्र्य कायम राहून पिणाराची व्यवस्था होईल, पण न पिणाराला उपसर्ग न लागेल अशा प्रकारची होईल. या व्यवस्थेनें वाऱ्यावर सूप ओतलें असतां फोलकटें एका बाजूस व धान्याचे दाणे एका बाजूला अशी वांटणी होते. पण पुढें प्रतिबंधाची चळवळ खरी सुरू झाली म्हणजे दारू पिणाऱ्या इंग्रजांनाहि थारा मिळणार नाहीं. लोकल ऑप्शन हें मंद वाऱ्याच्या झुळकेसारखें आहे. पण प्रतिबंध हा मोठमोठ्या क्षेत्रमर्यादेवर घालावा लागतो. म्हणून तेव्हांची चळवळ ही झंझावातासारखी होईल; आणि अशा वादळांत झाडांच्या कोरड्या म्हणजे वाढत्या रानाबरोबर 'ओलीं पानें किंवा वृक्षच्या वृक्षहि उन्मळून पडतात' हें त्यांनीं ध्यानांत ठेवावें.

---

# संमति वयाचें बिल

( सप्टेंबर १९२५ )

[ असेंब्लीच्या गेल्या बैठकींत डॉ. गौर यांचे संमति वयाचें बिल सिलेक्ट कमिटीकडून सुधारून आलें. सदर बिलास पुष्टि देतांना श्री. न. चिं. केळकर यांनीं भाषण केलें तें पुढीलप्रमाणें.]

मी स्वतः अविचारी सुधारक नाहीं किंवा हट्टी पुराणप्रियहि नाहीं. माझें या बाबतींत नेहमीं धोरण असें असतें कीं, समाजाच्या पुढें एक पाऊल असावें परंतु समाजाकडे मात्र दुर्लक्ष करूं नये. सिलेक्ट कमिटीकडून

सुधारून आलेल्या या बिलास मी याच दृष्टीनें संमति देत आहे. संभोगाचे बाबतींत विवाहित मुलींची वयोमर्यादा १३ असावी व ज्यांचें लग्न झालें नाहीं अशा मुलींची वयोमर्यादा १४ असावी ही गोष्ट मला पसंत आहे. विवाहित मुलींपेक्षा अविवाहित मुलींच्या रक्षणाची गरज अधिक आहे. अविवाहित मुलींचें वय यापेक्षां १४, १५ अगर १६ असें ठेवलें असतें तर तेंहि मला पसंत पडलें असतें. परंतु वयाचा हा नियम विवाहित मुलींस गैरलागू होय, म्हणून १३ वें वर्ष ठरलें. अशा रीतीनें सुवर्णमध्य छेदला गेला असेंच म्हटलें पाहिजे. हें बिल एकट्या हिंदूंसच नव्हे तर सर्व समाजांस लागू आहे. या बिलानें हिंदु आदिकरून समाजांच्या धार्मिक बाबतींत हात घालण्यांत येतो खरा. तरी देखील तो मी पत्करतों याचें कारण असें कीं, ही गोष्ट लोकमताच्या प्रगतीस धरूनच होत आहे. लोकमताची गेल्या कांहीं वर्षांत त्या मानानें तयारी झाली आहे.

हिंदु समाजांत लग्नें फारच अल्प वयांत करण्याची चाल आहे आणि स्त्री ऋतुस्नात झाली कीं तिचा पतीशीं समागम घडला पाहिजे अशी शास्त्राज्ञा आहे. प्राचीन काळीं हिंदुस्थानांत प्रौढविवाहाची चाल होती. पुराणांवरून ही गोष्ट सिद्ध होते. स्वयंवर व चतुर्थीकरण हे त्यासंबंधीं पुरावे होत. लग्न झाल्यापासून चौथ्या दिवशीं पतिपत्नींचा समागम घडणें याला चतुर्थीकरण म्हणतात. हा प्रकार जर चौथ्या दिवशीं घडत असेल तर मुलगी लग्नापूर्वीच ऋतुस्नात झाली असली पाहिजे ही गोष्ट आपोआपच सिद्ध होते. ही चाल सर्वच जातींत नसली तरी कांहीं जातींत खास आहे. इंग्लंडांत विवाहाचीं किमान वयोमर्यादा १२ आणि १४ असते. याचा अर्थ असा कीं, मुलीचें लग्न १२ व्या वर्षापूर्वीं किंवा मुलाचें लग्न १४ व्या वर्षापूर्वीं झालें तर तें बेकायदेशीर होय. हिंदुस्थानांत मात्र अशी स्थिति नाहीं. मुलांमुलींचे लग्न इकडे पाळण्यांत सुद्धां होऊं शकतें, यामुळें मोठी बिकट स्थिति प्राप्त होते. थंड देशापेक्षां हिंदुस्थानसारख्या उष्ण देशांत रजोदर्शन लवकर होतें. विवाहाची वयोमर्यादा आणि रजोदर्शनाची वयोमर्यादा यांमधील अंतर लक्षांत घेतलें तर त्यावर तोड काय काढावी हा प्रश्न सहजच उपस्थित होतो. एक तोड म्हणजे कायद्याचा आश्रय करणें; आणि दुसरी, सामाजिक सुधारणा घडवून आणणें ही होय.

सामाजिक चळवळीनें लोकमत या बाजूस आम्ही वळवीतच आहों. परंतु सद्बुद्धीच्या कित्येक उतावळ्या लोकांस ही सुधारणा कायद्यानें घडवून आणणेंहि इष्ट वाटतें. भूतदयेच्या दृष्टीनें कायद्याचा आश्रय करावा अगर कसें असाहि प्रश्न येथें सुचतो आणि जर आश्रय करावा तर १८९१ सालीं संमति बिलाविरुद्ध एवढी ओरड कां झाली असें कोणीहि विचारील. त्यावर माझें म्हणणें असें कीं, ती ओरड राजकीय स्वरूपाची होती. त्या वेळच्या कौन्सिलांस हल्लींसारखें प्रातिनिधिक स्वरूप नव्हतें. मी त्या वेळीं कॉलेजांत विद्यार्थी होतो. मीहि त्या बिलास तेव्हां विरुद्ध होतों. याचें कारण मी सामाजिक सुधारणेच्या विरुद्ध होतों हें नसून त्या वेळचें कायदे-कौन्सिल प्रातिनिधिक नव्हतें म्हणून होय. त्या वेळच्या कौन्सिलांतील सर्व सभासद सरकारनें नेमलेले होते. आमच्या चालीरीतींची माहिती नसणारे पुष्कळ युरोपियन गृहस्थ कौन्सिलाचे सभासद होते. तीनचार सभासद हिंदु होते, पण तेहि सरकारनियुक्त होते. अशा स्थितींत सदर बिलास त्या वेळीं जो विरोध झाला तो अगदीं योग्य होता. त्या वेळचें कौन्सिल सरकारी होतें पण हल्लींची असेंब्ली कशी आहे? या प्रश्नास माझें खडखडीत उत्तर असें कीं, असेंब्ली प्रातिनिधिक आहे. ही असेंब्ली सध्यांहूनहि अधिक प्रातिनिधिक व्हावी असें मी इच्छितों. माझ्याहूनहि अधिक लोकमतनिदर्शक प्रतिनिधी असेंब्लींत आले तर मी आपली जागा त्यांच्या स्वाधीन करीन.

सध्यांची असेंब्ली प्रातिनिधिक नाहीं असें कांहीं सभासद म्हणतात. हे सभासद लोकांचे प्रतिनिधी आहेत व लोकांनीं त्यांस निवडून दिलें आहे; या दृष्टीनें ही असेंब्ली प्रातिनिधिक नाहीं असें त्यांस म्हणण्याचा अखत्यार नाहीं, आणि ज्या अर्थी ते लोकांचे प्रतिनिधी आहेत त्या अर्थी या सामाजिक प्रश्नासंबंधानें त्यांचें कर्तव्य कोणतें? माझ्या मतें त्यांनीं या प्रश्नापासून अलिप्त न राहतां त्याची चर्चा करून आपलें मत विचारपूर्वक दिलें पाहिजे. ज्या गोष्टीचा समाजस्थितीवर परिणाम होतो ती गोष्ट सहजच न्यायमंदिराच्या कक्षेंत येते; आणि जी गोष्ट न्यायमंदिराच्या कक्षेंत सांपडते ती कायदेमंडळाच्या कक्षेंतहि आलीच पाहिजे; आणि म्हणूनच या बिलाचा विचार करणें आपलें कर्तव्य होय. हिंदु लॉ मुख्यतः धार्मिक स्वरूपाचा

असला तरी त्याचा सामाजिक परिणाम घडून येतो. आणि यासाठीं त्याचें कोड बनविलें असें कित्येकांचें म्हणणें आहे. निवळ धार्मिक बाबतींत मी सरकारास हात घालूं देणार नाहीं. परंतु ज्या गोष्टींचें स्वरूप संमिश्र आहे त्यांचा विचार कायदेमंडळानें केला पाहिजे. मी आपलें मत तारतम्यानें दिलें आहे तसेंच इतरांनींहि द्यावें असा माझा आग्रह आहे.

म्हैसूर व बडोदें या संस्थानांत लग्नाची किमान वयोमर्यादा कायद्यानें ठरविली आहे. बडोद्याच्या कायदेमंडळानें असा कायदा केला आहे. वयोमर्यादा किती असावी हा आज वादाचा विषय नाहीं. विषय तत्त्वाचा आहे. बडोद्यास सदर कायद्यापुढें जर तुम्ही मान वांकवितां तर तसला कायदा इकडे कां पास करूं नये? तेथील कारभार एकतंत्री असेल; तथापि त्यांनीं केलेला कायदा वाजवी असेल तर आपण, एका दृष्टीनें स्वतंत्र अशा लोकांनीं तसला कायदा पास कां करूं नये?

गृहमंत्री सिलेक्ट कमिटीनें शिफारस केलेल्या वयोमर्यादेसच चिकटून राहिले आणि त्यांनीं सदर मर्यादा पुढें खेचण्याचा डॉ. गौर यांचा प्रयत्न चालू दिला नाहीं याबद्दल मला आनंद वाटतो. कायद्यानें वयोमर्यादा ठरवून घेण्यास अस्पृश्य व ब्राह्मणेतर हे हरकत घेतील अशी माझी समजूत होती. पण साताऱ्च्या प्रांतिक सामाजिक परिषदेंत ती खोटी ठरली. सदर परिषदेंत वयाची किमान मर्यादा कायम करण्याचा ठराव मीं मांडला. तो पास झाला अगर न झाला तरी त्याची मला पर्वा नव्हती. पण आश्चर्य हें कीं, अस्पृश्य व ब्राम्हणेतर यांनींच सभेंत उठून माझ्या ठरावास पुष्टि दिली. रंगलाल जाजोदिया नामक माझे एक मारवाडी मित्र आहेत. मारवाडी लोक पुराणप्रिय अशी सामान्य समजूत आहे. पण जाजोदिया यांनीं अशा प्रकारचें बिल असेंब्लींत यावें याबद्दल आपखुषीनें खटपट केली आहे. समाजाची प्रगति होत आहे या विधानास आणखी वेगळें प्रमाण तें कोणतें हवें?

श्री. आचार्य यांनीं आपल्या भाषणांत अशी शंका काढली आहे कीं, सामाजिक प्रश्नावर मत देण्याचें अधिकारपत्र मतदारांनीं आम्हांस दिलेलें नाहीं. श्री. आचार्य यांच्या जाहीरनाम्यांत काय होतें हें मला माहीत नाहीं. पण माझ्या जाहीरनाम्यांत काय होतें हें मला माहीत आहे. माझ्या जाहीरनाम्यांतून सामाजिक प्रश्न वगळलेले नाहींत. आचार्यांच्याहि

जाहीरनाम्यांतून ते वगळले नसावे. ते बोलत नाहींत त्या अर्थीं त्यांस माझें विधान कबूल आहे असें दिसतें. तथापि ज्यांच्या जाहीरनाम्यांत अस्ति अगर नास्ति पक्षीं कांहींच नसेल त्यांनीं विरुद्ध मतच द्यावें असें तर त्यापासून निष्पन्न होत नाहीं ना? कित्येक प्रश्न अनाहूत उद्भवतात; अशा वेळीं मतदारांचें मत विचारण्यास आपण जावयाचें काय? तसा महत्त्वाचा प्रश्न निघालाच तर गोष्ट आलाहिदा आहे. माझा आग्रह एवढाच कीं, सर्वांनीं या विषयाचा समजुतीनें विचार करावा. एखाद्या प्रसंगीं एकाद्या प्रतिनिधीनें एखाद्या विषयासंबंधीं एखादें अभिवचन आगाऊ दिलें असलें तरी तेवढ्यावरून त्याचे मतदार त्यास सभागृहाबाहेर हाकून देत नाहींत. सध्यांच्या प्रश्नासंबंधीं आपल्या मतदारांस कोणीहि कसलेंहि अभिवचन देऊन ठेवलेलें नाहीं.

प्रसिद्ध आंग्ल वक्ता व तत्त्ववेत्ता एडमंड बर्क यानें ब्रिस्टल येथील आपल्या मतदारांस लिहिलेलें पत्र प्रस्तुत मुद्दयास लागू पडेल. सदर पत्रांत तो लिहितो—

'प्रतिनिधीनें आपल्या मतदारांशीं पत्रव्यवहारानें व इतर प्रकारांनीं निकट संबंध ठेवावा ही गोष्ट सदर प्रतिनिधीस मोठी सुखाची व वैभवकारक होय यांत शंका नाहीं. मतदारांच्या इच्छेस त्यानें मान दिला पाहिजे, त्यांच्या मतांचा आदर केला पाहिजे, व त्यांच्या कार्याकडे पूर्ण लक्ष लावलें पाहिजे. त्यांजकरितां स्वतःच्या सुखावर, समाधानावर पाणी सोडून त्यांचे हितास अग्रस्थान दिलें पाहिजे. मात्र त्यानें आपलें शुद्ध मत, परिपक्व विचार, सुसंस्कृत मन यांजवर तुम्हाकरितां किंवा जगांतील कोणाहि माणसाकरितां तिलांजलि सोडतां कामा नये.'

आपण फक्त तपशिलाचाच विचार करीत आहों. वय १२ चें १३ पर्यंत वाढवीत आहों. कायदा पूर्वींच झाला असून त्यांत एवढाच फरक करावयाचा आहे. मूळचा कायदाच जर वाईट असेल तर प्रस्तुत बिलास विरोध करणारांनीं तो कायदा रद्द करण्याचा प्रयत्न कां केला नाहीं? राजकीय जुलमी कायदे रद्द करण्याचा प्रयत्न जसा सभासदांकडून झाला तसा हा प्रयत्न कां झाला नाहीं? तसा प्रयत्न ज्या अर्थीं झालेला नाहीं त्या अर्थीं एवढा वयाचा फरक करण्यास कोणी हरकत घेऊं नये.

# कोर्टाच्या बेअदबीचें बिल

## ( १९२५ )

बिलाच्या प्रस्तावनेंत बिलाचे जे उद्देश व हेतु दिले आहेत ते दिशाभूल करणारे आहेत. सरकारच्या मनांतून या बिलानें जी गोष्ट साधावयाची आहे ती प्रस्तावनेंत सांगावयास पाहिजे होती, पण ती सांगितलेली नाहीं. प्रस्तावनेंत असें म्हटलें आहे कीं, 'ज्या अर्थीं कनिष्ठ कोर्टाची बेअदबी झाल्यास त्याबद्दल शिक्षा करण्याचे बाबतींत हायकोर्टाच्या अधिकाराविषयीं शंका प्रदर्शित करण्यांत आली आहे व ज्या अर्थीं हे संशय दूर करणें आणि कनिष्ठ कोर्टाच्या बेअदबीचे बाबतींत हायकोर्ट व इतर वरिष्ठ कोर्टें यांच्या अधिकारांची व्याख्या करणें व मर्यादा ठरविणें जरूर आहे, त्याअर्थीं पुढीलप्रमाणें कायदा करावा लागत आहे.'

कोर्टाच्या बेअदबीच्या बाबतींत मतांचा विरोध काढून टाकण्याची इच्छा प्रस्तावनेच्या प्रारंभीं दाखविलेली आहे. परंतु प्रत्यक्ष बिल वाचूं लागलें म्हणजे याहिपेक्षां अधिक खोल हेतु हें बिल आणण्यांत सरकारचा असला पाहिजे असें आढळून येतें. त्यांतील बराच आक्षेपार्ह भाग सहजासहजीं आलेला दिसतो. कनिष्ठ कोर्टाचे बाबतींत बेअदबी झाल्यास त्याबद्दल हायकोर्टानें चालवावयाच्या अधिकारासंबंधानें कायद्यांत खरोखरच संशयास्पद स्थळें असल्यामुळें तीं दूर करण्यापुरतेंच हें बिल असतें तर त्यास कोणीहि हरकत घेतली नसती; परंतु आजच्या स्थितींत हायकोर्टाचा अधिकार संशयित आहे असें मुळींच नाहीं. या बाबतींत हायकोर्टास पूर्ण अधिकार आहे. एका हायकोर्टाच्या निकालासंबंधानें दुसऱ्या हायकोर्टाचें मत कांहींहि पडलें तरी प्रत्येक हायकोर्टास आपल्या इच्छेप्रमाणें वागण्याची सत्ता भरपूर आहे. कनिष्ठ कोर्टाच्या बाबतींतील बेअदबीचा विचार एखादें हायकोर्ट करीत असेल तर दुसरें करीत नसेल एवढाच फरक. पण त्याकरितां या बिलाची गरज मुळींच उद्भवत नाहीं.

### बिलाची व्याप्ति

दोन हायकोर्टाच्या भिन्न मतांची एकवाक्यता करणें हें एकच कार्य या बिलाचें असतें तर त्यास माझी मुळींच हरकत नसती. बिल तीन गोष्टी करीत आहे. पहिली गोष्ट म्हणजे कोर्टाची बेअदबी या शब्दाची व्याख्या; दुसरी

गोष्ट म्हणजे कनिष्ठ कोर्टाचें कृत्रिम रीतीनें व अन्यायानें संरक्षण करण्याचा प्रयत्न, आणि तिसरी ही कीं, जो अपवाद म्हणून होता त्याचा नियम बनविणें. श्री. रंगास्वामी अय्यंगार यांनीं कोर्टाची बेअदबी आतां इंग्लंडांत रद्द झाल्यासारखी आहे असें म्हटलें होतें, त्यांत मि. अॅशवर्थ यांनीं किंचित् दोष काढला आहे. माझ्याहि मतानें इंग्लंडांत ही गोष्ट रद्द समजली गेली आहे असें नाहीं. अशा प्रकारचे खटले अजूनहि तिकडे होतात. रंगास्वामी यांच्या म्हणण्याचा आशय इतकाच कीं, असले खटले इंग्लंडांत विरळा होतात. तिकडील कोर्टें मोकळेपणानें, किंबहुना राग येईल अशी, टीका कोणी केली तरी तिकडे लक्ष देत नाहींत. हायकोर्टांतील मतभेदांचें निमित्त करून हायकोर्टाचा अधिकार वाढविण्याचा हा प्रयत्न आहे. वरिष्ठ व कनिष्ठ कोर्टापुढें चालू असलेल्या खटल्याचे कामांत अडथळा आणणारी टीका करून कोणी बेअदबी करील तर तिचा बंदोबस्त करण्याचा अधिकार कोर्टास आजहि आहे. या दृष्टीनें प्रस्तुत कायद्यांत कोठें उणीव राहिली असल्यास ती काढून टाकण्यापुरतें हें बिल असतें तर माझी हरकत नव्हती.

कोर्टापुढील एखाद्या खटल्याचा निकाल झाल्यानंतर कोर्टाच्या संरक्षणाची जी तजवीज या बिलानें करण्यांत येत आहे तिला आमची खरी हरकत आहे! खटल्याच्या निकालानंतर कित्येक टीकाकार कोर्टावर गैरशिस्त टीका करीत असतील असें कोणी म्हणेल व तें कदाचित् खरेंहि असेल. पण अशा प्रकारच्या मत्सरयुक्त टीकाकारांचा बंदोबस्त करण्याची तजवीज सध्यांच्या दिवाणी व फौजदारी कायद्यांत आहेहि. एखाद्या दिवाणी अधिकाऱ्याची अशा रीतीनें कोणी बेअब्रू केल्यास त्यानें खुशाल दिवाणी व फौजदारी कोर्टांत फिर्याद करून दाद मागावी. त्या अधिकाऱ्यांस आपले अधिकार काय आहेत हें माहीत आहे, त्याचा ते उपयोग करितातहि. आपण सभोंवार दृष्टि फेंकली तर दिवाणी व इतर अधिकाऱ्यांकडून वर्तमानपत्रांवर खटले करण्यास उत्तेजन देण्याचा सरकारनें जोराचा प्रयत्न चालविला असल्याचें आढळून येतें. अशा अधिकाऱ्यांस सरकार पैशाची व कायदेशीर सल्ल्याची मदतहि करीत आहे. अशा स्थितींत सध्यांचें बिल आणून त्यांचें फाजील संरक्षण करण्याचें कारण काय हेंच मला समजत नाहीं. फाजील संरक्षण जर द्याल तर त्या योगानें वर्तमानपत्रें व पुढारी कोर्टावर जी विशेष प्रसंगीं योग्य व जरूर ती टीका करतात तिलाहि बंदी होईल. बेअदबीची व्याख्याहि फार व्यापक केली आहे.

सदर व्याख्येंतील शब्दयोजना अशी आहे. 'एखाद्या दिवाणी अधिकाऱ्याची बेअदबी व्हावी अशा उद्देशानें जर कोणी कांहीं शब्द वापरील किंवा कृति करील अगर त्याच्या कृतीचा व शब्दांचा संभवनीय परिणाम तसा असेल तर ती बेअदबी होते.'

परंतु अशा अपमानाचें किंवा टवाळीचें कारण टीकाकारापेक्षां टीकेचा विषय झालेला अधिकारीच असूं शकेल. मुंबई हायकोर्टानें तर बदनामीचा ( डिफेमेशनचा ) कायदा आणि कोर्टाच्या बेअदबीचा कायदा एका खटल्यांत सारखाच गणला. हल्लींच्या कायद्यांत दिवाणी अधिकाऱ्यांस आणखी एक फायदा मिळतो. खासगी खटल्यांत प्रतिवादीस जो फायदा ( प्रिव्हिलेज ) मिळतो तोहि कोर्टाच्या बेअदबीच्या खटल्यांत प्रतिवादीस मिळत नाहीं. न्यायाधीश माणसेंच होत. टीकाकारहि माणसेंच आहेत. टीकाकारांनीं जशी स्वतःची जबाबदारी विसरूं नये तशी न्यायाधिशांनींहि स्वतःची जबाबदारी विसरूं नये; व जर न्यायाधीश स्वतःची जबाबदारी विसरतात तर टीकाकार एखादे वेळीं स्वतःची जबाबदारी विसरले तर त्यांचीहि उपेक्षा केली पाहिजे. छापखाना हें राज्यव्यवस्थेचें चौथें अंग आहे. न्यायाधीश हें राज्याचें जर एक अंग आहे तर छापखाना हें दुसरें अंग होय. यासाठीं या दोनहि अंगांचे अधिकार सारखे असावेत. म्हणून कोर्टाच्या निकालावर वर्तमानपत्रकर्ते टीका करतात त्याबद्दल सरकारनें पत्रकर्त्यांस इतकें धारेवर धरूं नये.

## अनुभव काय सांगतो ?

दिवाणी अधिकाऱ्यांनीं खटल्याचा निकाल सांगितल्यानंतर त्यांची बदनामी केल्यासंबंधाच्या १।२ उदाहरणांचा उल्लेख करतों. हीं उदाहरणें इंग्लंडांतील आहेत, हिंदुस्थानांतील नाहींत. त्यांवरून इंग्लंडांतील न्यायाधीशहि आपली जबाबदारी विसरतात असें दिसून येतें. जस्टिस मॅकॉर्डींचेंच उदाहरण घ्या. जस्टिस मॅकॉर्डींनीं दिलेल्या निकालावर टीका करतांना डेली हेरल्डमध्यें मि. मॅसिंगहॅम म्हणतात कीं, मि. मॅकॉर्डी यांनीं हिंदुस्थानचे स्टेटसेक्रेटरी यांस जो दोष दिला आहे त्यास पुराव्याचा आधार बिलकूल नाहीं. इंग्लंडमधील न्यायाधीश जशी आपली जबाबदारी विसरतात तसेंच हिंदुस्थानांतील न्यायाधीश आपली जबाबदारी विसरत नसतील काय ? मि. बर्नार्ड हूटन डेली हेरल्डमध्यें लिहितात, 'मि. मॅकॉर्डी यांनीं जें मत दिलें तें हिंदुस्थानांतील व इंग्लंडमधील ब्रिटिश राज्यकर्त्यांचें सर्वसामान्य मत असून तें न्याय दृष्ट्या कवडीमोल

होय.' वेस्टमिन्स्टर गॅझेटमध्यें मि. एच्. जी. वेल्स लिहितात, 'डायरच्या बाबतींत मॅकॉर्डी यांनीं दिलेलें मत न्यायपद्धतीस सोडून आहे; आणि अशा प्रकारचे उद्गार ही कोर्टाची बेकायदेशीर बंडखोरी होय.' इतकी टीका झाली तरी इंग्लंडचें हायकोर्ट कोर्टाची इभ्रत राखण्यास सज्ज झालें नाहीं व त्यानें वरील टीकाकारास कोर्टाच्या बदनामीबद्दल जाबहि विचारला नाहीं. यासाठीं माझें म्हणणें असें कीं, कोर्टानें निकाल दिल्यावर त्याच्या इभ्रतीची दोरी फाजील ताणतां कामा नये.

येथील पुष्कळ सभासदांस न्यायाधिशांच्या वर्तणुकीचा अनुभव असेल. जणूं काय कायदा त्यांनीं मानण्याकरितां नाहींच असें ते वागतात. ते स्वतःस राजाचा अवतार समजून राजाच्या हातून चूक घडत नाहीं तशी ती आपल्याहि हातून घडत नाहीं असें ते समजतात! ते आपल्या अधिकाराचा तीन प्रकारें दुरुपयोग करतात. ते पक्षकारांस, कोर्टांतील अमलदारांस, किंबहुना वकिलासहि शिव्या देतात, ते स्वतःच आपल्या निवाड्यांत बेअदबी किंवा उपहास यांचें कुसपट काढून ठेवतात. आणि मग टीकाकारांनीं उलट उपहास केला कीं चिडतात. न्यायाधीश स्वतः न्यायासनावर बसून निवाडा देतांना न्यायाधिशास न साजेलसें वर्तन करतात. हायकोर्ट जज्ज मि. बीमन काय म्हणतात पाहाः–'लॉर्ड डार्लिंग यासारख्या थट्टेखोरास जज्ज नेमल्यापासून इंग्लिश कोर्टाच्या अधःपतनास सुरुवात झाली ही अपकीर्ति बरीचशी गैरवाजवी आहे यांत शंका नाहीं. लॉर्ड डार्लिंग याजवर टीकेचा भडिमार उडाला असला तरी डार्लिंगसाहेब फार चांगले न्यायाधीश होते, पण थट्टेखोरीबद्दल त्यांजविषयीं जो एकदां ग्रह झाला तो शेवटपर्यंत टिकला. याच सुमारास लोणकढ्या बातम्या देण्याची वर्तमानपत्रकर्त्यांची प्रवृत्ति बरीच वाढली व ती डार्लिंग यांस पुष्कळ भोंवली. हलकट पत्रांतून डार्लिंगसाहेबांचें ज्या प्रकारें नांव झालें तेंच लोकांच्या लक्षांत राहिलें. यामुळें न्यायाधीश यापेक्षां थट्टेखोर म्हणूनच त्यांचा लौकिक झाला. कोणाहि न्यायाधिशानें सदैव थट्टा करून भागत नाहीं. कारण त्याचा विनोदी संग्रह केव्हां तरी संपतोच.'

वरील टीका मुंबई हायकोर्टांतील एका नामांकित न्यायाधिशानें लंडन हायकोर्टांतील एका नामांकित न्यायाधिशावर केली आहे. या उदाहरणावरूनहि न्यायाधीश आपली जबाबदारी विसरतात हेंच सिद्ध होतें. त्यांना न्यायाधीश

या नात्यानें कसें वागावें हें समजत नाहीं. ते आपल्या अधिकाराचा फारच दुरुपयोग करतात. यासाठीं वर्तमानपत्रें हें जें राजसत्तेचें चौथें अंग त्यासहि आपली जबाबदारी कधीं कधीं विसरण्यास सवलत ठेवली पाहिजे. न्यायाधीश खटल्याचा निकाल सांगून मोकळे झाले म्हणजे सदर निकालावर बरीवाईट टीका करणें पत्रकर्त्यांवर सोंपविलें जावें. कोर्टाच्या बेअदबीबद्दल द्यावयाच्या शिक्षेस निश्चितपणा आणणें हा जो या बिलांतील एक भाग आहे तोच काय तो बरा आहे. कारण एकदां हायकोर्टानें कोर्टाच्या बेअदबीबद्दल खटला करण्याचें ठरविलें म्हणजे त्या बाबतींत किती शिक्षा करावयाची यास मर्यादा नाहीं हा प्रस्तुतच्या कायद्यांतील मोठाच दोष होय.

---

# हिंदी बँकांची सद्यःस्थिति

[ सिमला येथें असेंब्लीच्या बैठकींत श्री. साराभाई हाजी यांचा ठराव चर्चेकरितां फिरून निघाला. सदर ठरावांत हिंदुस्थानांतील बँकांची सांप्रत स्थिति कशी आहे याची तपासणी करून बँका कशा वाढवाव्या व त्यांना भांडवल कोठून व कसें पुरवावें याची चौकशी करण्याकरितां कमिटी नेमावी असा मजकूर होता. या ठरावास पुष्टि देतांना श्री. न. चिं. केळकर यांनीं पुढील आशयाचें भाषण केलें.]

प्रस्तुत विषयाचें महत्त्व सरकारास पटलें असून करन्सी कमिशननें केलेल्या सूचना या विषयास अनुकूलच आहेत. कमिशनचा रिपोर्ट प्रसिद्ध झाल्यापासून रिझर्व्ह बँक स्थापन करण्याचा विचार चालू आहे. परंतु रिझर्व्ह बँकेच्या स्थापनेनें खेड्यापाड्यांतून राहणाऱ्या लोकांस आपल्या ठेवी ठेवण्यास सोईचें होणार आहे असें नाहीं. शेतकी कमिशनचाहि या दृष्टीनें उपयोग होईल असें वाटत नाहीं. रिझर्व्ह बँक बिलासंबंधानें बहुसंख्याकांचा जो रिपोर्ट आहे त्यांत सदर बँकेच्या डायरेक्टरांत प्रांतिक को-ऑपरेटिव्ह बँकेचा एक प्रतिनिधि असावा अशी शिफारस आहे. तथापि तेवढ्यानें काम भागेल असें वाटत नाहीं. येथील लोकांनीं काढलेल्या बँका व जॉइंट स्टॉक बँका यांचे प्रतिनिधी रिझर्व्ह बँकेवर घेण्याची व्यवस्था नाहीं. यामुळें रिझर्व्ह बँकेकडून अशा बँकांचें संरक्षण होईलच असें म्हणवत नाहीं. इंपीरिअल बँकेच्या शाखा

सर्वत्र पसरलेल्या आहेत, परंतु खेड्यांतून राहणाऱ्या लोकांना आपल्या लहान लहान रकमा ठेवण्यास या शाखा उपयोगी पडणार नाहींत. इंपीरिअल बँकें-तून विवक्षित वर्गाची गरज भागते. या वर्गास हलक्या व्याजानें सदर बँकें-तून रकमा कर्जाऊ मिळतात. इंपीरिअल बँकेकडून फार तर पांच टक्के इसमांस रकमा कर्जाऊ मिळत असतील, पण बाकीच्या ९५ टक्के इसमांची वाट काय? चालू रकमेवर व लहान ठेवींवर व्याज देण्याचें इंपीरिअल बँक नाकारते. सारांश, लहान ठेवीवाल्यांस व ज्यांचेपाशीं बँकेंत ठेवण्यास ( सेव्हिंग ) रक्कम थोडी आहे अशांस इंपीरिअल बँक निरुपयोगी आहे. इंपीरिअल बँकेच्या लहान शाखा तोट्यांत चालल्या आहेत. या बँकेवर देखरेख करण्यास जे अंमलदार नेमले आहेत त्यांना पगार भारी देण्यांत येतो. इतर बँकांस हा खर्च कमी येतो. बँकर्स इन्स्टिटयूटसंबंधीं बोलतांना सर पुरुषोत्तमदास ठाकुर-दास यांनीं काढलेले उद्‌गार विचार करण्यासारखे आहेत. ते म्हणतात— ‘बँकेच्या धंद्यांत मोठ्या जागा मिळवूं इच्छिणारे आमचे हिंदी तरुण बँकर्स इन्स्टिटयूटच्या परीक्षेस बसतात. त्यांच्या अभ्यासक्रमांत इंग्लिश बँकिंग, त्या-संबंधीं कायदा व व्यवहार इत्यादि विषय आहेत. परंतु रोजच्या व्यवहारांत बँकिंगसंबंधीं हिंदी कायदा, व्यवहार, हुंड्या इत्यादिकांचेंहि त्यांस ज्ञान पाहिजे.’ ‘इंडियन इन्स्टिटयूट ऑफ कॉमर्स’ इकडे निघाल्यास ती अभ्यासक्रमांतील ही उणीव भरून काढील. अशा प्रकारची संस्था निघाल्यानें बँकेच्या व्यवहाराचें ज्ञान सर्व जनतेंत फैलावेल. नवीन बिलाप्रमाणें रिझर्व्ह बँक स्थापन झाली असें गृहीत धरलें तरी तिच्याहून लहान लहान देशी बँका व हुंडीचीं दुकानें यांचें काय होणार हा प्रश्नच आहे. त्यांचे व्यवहार बंद पडणार अशी भीति वाटते. हुंडीवाले नष्ट झाले व त्यांच्या जागीं देशी बँका आल्या तरी समाधान मानण्यास जागा आहे. तशी कांहीं तोड फडणिसांनीं काढावी अशी त्यांस विनंति आहे.

बँकेचा धंदा हिंदुस्थानांत फार मागसला आहे. रिझर्व्ह बँक काढण्यांत हिंदुस्थान सरकारनें अमेरिकेचें उदाहरण डोळ्यांसमोर ठेवलें आहे, म्हणून हिंदुस्थान व अमेरिका या दोन देशांतील बँकांसंबंधाचे आंकडे देऊन हिंदु-स्थान किती मागसलेला आहे हें दाखवितों. हिंदुस्थानांत सात हजार खेड्यांस एक बँक पडते. एकंदर शहरें २३०० आहेत. त्यांपैकीं २६७ शहरांत बँकांच्या कचेऱ्या ६७० आहेत. ६७० कचेऱ्यांपैकीं १७७ कचेऱ्या ११ शहरांत आहेत.

९६ कचेऱ्या लहान शहरांत आहेत व बाकीच्या एका शहरांत एक याप्रमाणें आहेत. अमेरिकेची वस्ती ११ कोटि असून बँकेच्या कचेऱ्या पस्तीस हजार आहेत. इंग्लंडांत ५६३० वस्तीस एक बँक पडते. हिंदुस्थानांत पांच लाख वस्तीस एक बँक आहे. यासाठीं हिंदुस्थानांत अधिक बँका स्थापन होतील अशा सोयी केल्या पाहिजेत. सर बेसिल ब्लॅकेट म्हणतात त्याप्रमाणें इंपीरिअल बँकेस सवलती दिल्यास बाकीच्या लहान थोर बँका संपुष्टांत आल्यावांचून राहणार नाहींत. सर ब्लॅकेट यांच्या लक्षांत ही गोष्ट आली आहे काय ?

---

# जमीन-संपादन ॲक्टाची दुरुस्ती

[ हल्लींचा जो सक्तीनें जमीन संपादन करण्याचा ( लँड ॲक्विझिशन ) ॲक्ट आहे त्याची दुरुस्ती करणारें बिल न. चिं. केळकर यांनीं वरिष्ठ कायदे मंडळापुढें मांडलें. ता. १ फेब्रुवारी रोजीं हें दुरुस्तीचें बिल असेंब्लीपुढें मांडतांना केळकर यांनीं जें भाषण केलें त्याचा गोषवारा.]

**इ. स. १८९४ च्या** लँड ॲक्विझिशन ॲक्टांत मी जी दुरुस्ती सुचवीत आहें ती विधायक स्वरूपाची आहे. सरकारला कित्येक वेळां कायद्याच्या बळावर जमीन संपादन करावी लागते हें मी मान्य करतों. तथापि यासंबंधाचा आजचा जो कायदा आहे त्यांत आरंभापासून अखेरपर्यंत अनेक दोष असल्यामुळें ते काढून टाकण्यासाठीं हें बिल आणलें आहे. कित्येक वेळां सरकार जरूरीवांचून उगाच जमीन बळकावतें. उदाहरणार्थ, अंबरनाथ डेव्हलपमेंट स्कीम पाहा. तेथें घेतलेली बरीच जमीन आतां गिऱ्हाइकांची अपेक्षा करीत पडून आहे असें कळतें! टाटा कंपनीसाठीं सह्याद्रीच्या लगतची जमीन घेण्याचीहि लाट अशीच उसळली होती. आणि तिच्या प्रतिकारार्थ योग्य वेळीं जोराची चळवळ झाली नसती तर आजमितीला सह्याद्रीचा बहुतेक सर्व उतरणीचा भाग टाटा कंपनीच्या ताब्यांत जाऊन त्याचें काय करावें याचा कंपनीलाच विचार पडला असता. रेल्वे कंपन्यां-साठींहि अशीच आगाऊ जमीन घेऊन मागाहून ती जमीन फुकट पडून

राहिल्याचीं उदाहरणें आहेत. यास्तव केव्हांहि सरकारनें सक्तीनें जमीन घेण्याचें मनांत आणल्यास ती जमीन कोणत्या कामाला पाहिजे, किती पाहिजे, वगैरेसंबंधीं सरकारनें सांप्रतच्यापेक्षां सविस्तर माहिती प्रसिद्ध करावी अशी दुरुस्ती मी या बिलानें सुचवीत आहें. अशी माहिती प्रसिद्ध झाल्यानंतर ज्या कार्यासाठीं जमीन घेण्यांत येणार आहे तें काम सार्वजनिक स्वरूपाचें आहे का नाहीं हें ठरविण्याचा अधिकार नोकरशाहीकडे न ठेवतां कायदेमंडळाकडे देण्यांत यावा अशी माझी सूचना आहे. कायदेमंडळांत त्या उद्देशाचा विचार होऊन तो सार्वजनिक स्वरूपाचा ठरला तरच कायद्याच्या बळावर जमीन घेतां यावी.

जी जमीन सरकार सक्तीनें ताब्यांत घेणार त्या जमिनीच्या मालकास मोबदला किती द्यावयाचा हें ठरविण्याची हल्लींच्या कायद्यांतली पद्धति सदोष आहे. सरकारी अधिकाऱ्यांनीं आपल्या लहरीप्रमाणें किंमत ठरवावी आणि मालकास डिस्ट्रिक्ट कोर्टाची पायरी चढण्यास भाग पाडावें हा अन्याय होय. कित्येक वेळां हा वाद प्रिव्ही कौन्सिलपर्यंतहि जाऊन पोंचतो. सरकारला कांहीं खर्चाची पर्वा नसते. पण बिचारा मालक कोर्टाचा खर्च करतां करतां हातटेकीला येतो. ही आपत्ति व हा जुलूम टाळण्याकरितां मी या बिलांत 'लवादा'चा मार्ग सुचाविला आहे. मालकाच्या वतीचा एक पंच, सरकारतर्फेचा एक पंच आणि उभयतांनीं निवडलेला सरपंच यांनीं मोबदला देण्याची रक्कम ठरवावी. या योगानें कोर्टाकडे जाण्याची दगदग वांचेल. मालकांचें समाधान होईल आणि लवादाचा निकाल हा आपसांतील तडजोडीचा निकाल असल्यानें अपील वगैरे करण्याचा त्रास व खर्च वांचेल. पूर्वींच्या १८७० सालच्या लँड ॲक्विझिशन ॲक्टांत ही लवादाची पद्धति होती. परंतु कोणा शहाण्यानें ती काढून टाकण्याचा सल्ला दिला कळत नाहीं. पण तिचें पुनरुज्जीवन केलें पाहिजे. शहरांतून म्युनिसिपालिट्यांना जमीन संपादन करावयाची झाल्यास अद्यापि लवादाचा मार्ग पत्करावा लागतो; मग शहराबाहेरील जमिनीलाहि तोच नियम कां लागू करूं नये?

माझ्या बिलांतील तिसरी दुरुस्ती मोबदल्याच्या स्वरूपाबद्दलची आहे. सर्वच बाबतींत केवळ पैशाच्या रूपानें मोबदला दिला म्हणजे काम भागतें

असा प्रकार नाहीं. उदाहरणार्थ, जेथें राहतीं घरें सक्तीनें घेण्यांत येतील तेथें दुसरीकडे घरेंच मिळण्याची तजवीज झाली पाहिजे. शिवाय नुकसान-भरपाईचा अंदाज करतांना कोणकोणत्या गोष्टी लक्षांत घ्याव्या याविषयींहि कांहीं नियम घालून देणें श्रेयस्कर आहे. जेवढी जमीन सरकारनें कबजांत घेतली तेवढ्या जमिनीची बाजारभावानें किंमत केल्यानें नुकसानीची पूर्ण भरपाई होऊं शकत नाहीं. कित्येक वेळां महत्त्वाचा भाग गेल्यामुळें शिल्लक राहिलेला भाग निरुपयोगी होतो. अशा वेळीं सबंध भाग तरी ताब्यांत घ्यावा किंवा निरुपयोगी होऊन राहिलेल्या भागाच्या किंमतीचाहि विचार मोबदला देतांना करावा हेंच न्यायाचें ठरेल.

चौथी दुरुस्ती नफेबाजीला आळा घालण्यासंबंधाची आहे. सांप्रतच्या कायद्याचा गैरवाजवी फायदा घेऊन कित्येक वेळां कित्येक संस्था कबजांत घेतलेल्या जमिनीची विक्री करून अवास्तव नफा मिळवितात; आणि त्यांतून आपल्या उधळपट्टीच्या योजनेचा खर्च भागवूं पाहतात. यामुळें स्वाभाविकपणेंच जरूरीपेक्षां अधिक जमीन संपादण्याकडे प्रत्येकाचा ओढा असतो व मालकांचें निष्कारण नुकसान होतें. कित्येक वेळां ज्या कार्या-साठीं जमीन घेतली तें कार्य कांहीं कारणानें थंडावतें व ती जमीन फुकट पडून राहते. केव्हां केव्हां मूळ योजनेचा मागाहून संकोच केल्यामुळें कबजांत घेतलेल्या जमिनीपैकीं कांहीं भाग शिल्लक राहतो. अशा वेळीं सरकारला जर ती सर्व जमीन किंवा शिल्लक राहिलेला भाग विकावयाचा असेल तर त्याजवर मूळ मालकाचा अग्रहक्क असावा हें समुचित होय. यास्तव अशा सर्व प्रसंगीं सरकारनें मूळ मालकाला ती जमीन घेण्याला प्रथम सवड दिली पाहिजे आणि त्याला ती नको असेल तरच ती दुसऱ्या कोणालाहि विकण्यांत यावी.

अशा प्रकारें हल्लींच्या कायद्यांत जे दोष मला दिसले ते काढून टाकून जमिनीच्या मालकावर होणारा अन्याय व जुलूम दूर करण्याच्या बुद्धीनें मीं या विधायक सूचना केल्या आहेत व त्यांना आपण पाठिंबा द्याल अशी मला आशा आहे.

---

# स्वराज्यपात्रता व हिंदुस्थान

(१९२७)

[ हिंदुस्थान सरकारच्या कार्यकारी कौन्सिलास द्यावयाच्या साठ हजार रुपयांच्या ग्रँटमध्यें काट सुचवितांना श्री. न. चिं. केळकर यांनीं पुढील आशयाचें भाषण केलें. ]

मीं कार्यकारी कौन्सिलास द्यावयाचा पैसा पुष्कळच कमी करावा असें सुचविलें आहे. त्याचीं कारणें वेगळीं आहेत. हिंदुस्थानास राजकीय सत्ता द्यावयाची तेव्हां सरकार ती गणितशास्त्राची कसोटी लावून शक्य तितकी कमी देते. तीच कसोटी मीं कार्यकारी कौन्सिलास पैसा पुरविण्याच्या बाबतींत लावली आहे. मीं सुचविलेला छेद वास्तविक कार्यकारी कौन्सिलास लागू नाहीं. कार्यकारी कौन्सिलच्या कचेरीस लागू आहे. परंतु या छेदाचा चिमटा कार्यकारी कौन्सिलास बसावा, कार्यकारी कौन्सिलाच्या कचेरीस बसू नये अशी माझी इच्छा आहे. कारण कार्यकारी कौन्सिलास हा चिमटा बसल्यानें तो विलायत सरकारास पोंचतो. ज्यास आम्हांस पकडतां येतें असें काय तें कार्यकारी कौन्सिलच आहे. कार्यकारी कौन्सिल विलायत सरकारशीं कधीं कधीं भांडतें हें आम्हांस माहीत आहे. हिंदुस्थानची गंगाजळी हिंदुस्थानांत ठेवावी असा आग्रह पूर्वीं हिंदुस्थान सरकारनें धरला होता. लॉर्ड कर्झनसारख्या सुलतानी व्हाइसरॉयानें असा आग्रह धरला होता, पण त्यासहि वरील बाबतींत विलायत सरकारानें जुमानिलें नाहीं. असा विरोध हिंदुस्थान सरकार कधीं स्वतःच्या फायद्यासाठीं तर कधीं हिंदुस्थानच्या हितासाठीं करीत असतें. पण हिंदुस्थानच्या हिताचें संरक्षण हिंदुस्थान सरकारकडून नेहमीं व्हावयास तें सरकार राष्ट्रीय बनलें पाहिजे. हा राष्ट्रीयपणा व्हाइसरॉयाच्या कार्यकारी कौन्सिलांतील सर्व सभासद हिंदी नेमल्यानेंहि उत्पन्न होणार नाहीं. हा राष्ट्रीयपणा कार्यकारी कौन्सिल कायदेमंडळास जबाबदार झाल्यानेंच उत्पन्न होणार आहे.

## संकटकाळचा फायदा

ब्रिटिश सरकार महायुद्धाच्या संकटांत सांपडलें म्हणून व त्या संकटकाळीं हिंदुस्थाननें इंग्लंडास मदत केली म्हणून हिंदुस्थानास सांप्रतचे हक्क देण्यांत आले. पण आतां तें संकट टळलें आहे व त्या वेळच्या हिंदुस्थाननें केलेल्या

मदतीचाहि ब्रिटिश सरकारास विसर पडला आहे. अशा स्थितींत पुढील हक्क संपादण्याकरितां आम्हांस झगडलेंच पाहिजे. आतां राज्यकारभाराची जबाबदारी म्हणजे काय याचा उलगडा करणें जरूर आहे. जबाबदारीचा विषय निघाला कीं आमचें सरकार चाळवण्या दाखवतें. पंचांत कांहीं दिवसांपूर्वीं मीं चित्र पाहिलें त्यांत सात मोठीं मुलें वर्तुळाकार उभीं राहून एकमेकांकडे बोटें दाखवीत होतीं. ब्रिटिश मंत्रिमंडळाचें स्वरूप या प्रकारचें आहे. तोच न्याय येथील सरकारासहि लागू. फलाण्या इसमास हिंदुस्थानांत यावयास पासपोर्ट कां मिळाला नाहीं, म्हणून आम्ही हिंदुस्थान सरकारास विचारतों. हिंदुस्थान सरकार आम्हांस उत्तर देतें कीं, विलायत सरकार आडवें आलें. पार्लमेंटांत यासंबंधीं प्रश्न विचारल्यास हें काम हिंदुस्थान सरकारचें आहे म्हणून सांगण्यांत येतें. विलायत सरकारकडून हिंदुस्थान सरकारकडे वळलें कीं, हिंदुस्थान सरकार मुंबई सरकारचें नांव घेतें. अशा ह्या त्रिस्थळींत आम्हीं पकडावें कोणास? आमचा हात आमच्यासमोरील कार्यकारी कौन्सिलापर्यंत पोंचतो म्हणून आम्ही कार्यकारी कौन्सिलास पकडतों.

खरी सत्ता सात कुलुपांत आहे. पहिलें कुलूप प्रांतिक सरकारचें. तें फोडून आंत जावें तों हिंदुस्थान सरकार लागतें. त्यापलीकडे व्हाइसरॉय. हा कायदे-मंडळालाहि विशेषप्रसंगीं धाब्यावर बसवितो. असेंब्लीनें एखादी बरी गोष्ट केली तर ती बिघडविण्यास कौन्सिल ऑफ स्टेट बसलेलेंच आहे. त्यापलीकडे स्टेट सेक्रेटरी व त्याचें कौन्सिल व त्याच्यापलीकडे ब्रिटिश मंत्रिमंडळ अशी ही रचना आहे. आत्मा हा जसा सप्तकोशांनीं व्याप्त आहे तशी ही स्थिति आहे.

## स्वराज्याचे हक्क

स्वराज्याचे हक्क कानडा व इतर वसाहती आणि हिंदुस्थान यांस देण्यांत आले आहेत. पण त्यांतील फरक ध्यानांत घेण्यासारखा आहे. सुधारणा कायद्याच्या उपोद्घातांत असें स्पष्ट म्हटलें आहे कीं, अंतिमसत्तेचें गाठोडें विलायत सरकारपाशीं आहे, व ती सत्ता देण्यास हिंदुस्थान पात्र झालें आहे कीं नाहीं याची परीक्षा दरदहा वर्षांनीं घेतली जावयाची आहे. पण तीच दक्षिण आफ्रिकेस दिलेली सनद पाहा. तिच्या उपोद्घातांत म्हटलें आहे कीं, येथील स्वराज्याचें स्वरूप विवक्षित असावें असें सर्वानुमतें ठरलें असल्यामुळें त्या इच्छेस आम्ही कायद्याचें स्वरूप देत आहों. आफ्रिकेस

स्वराज्य दक्षिण आफ्रिकेच्या इच्छेनुरूप देण्यांत येतें. आणि आम्हांजवळ मात्र पात्रतेचा दाखला मागण्यांत येतो याचें आश्चर्य वाटतें. बरें, आम्ही तसे अडाणी असतों तर गोष्ट वेगळी. आम्हीं राज्यें चालविलीं व तीं सुधारलेलीं होतीं हें पाश्चात्यांसहि कबूल आहे. इतकेंच नव्हे तर आपलें राज्य स्थापतांना ब्रिटिश सरकारनें आमच्याच जुन्या राज्यपद्धतीचा उपयोग केला. असें असतां आमच्यापाशीं लायकीचा दाखला कां मागण्यांत यावा? एखादा पेन्शनर पेन्शन मागावयास गेला असतां त्याजपाशीं ऑडिटरानें त्याच्या जसा हयातीचा दाखला मागावा त्यांतलाच हा प्रकार आहे.

सारांश, लायकीचा दाखला आम्हापाशीं मागणें हा शुद्ध लपंडाव होय. आम्ही आपली पात्रता सत्तेवांचून कशी सिद्ध करावयाची? सरकार जगास सांगतें कीं, आम्ही हिंदी लोकांस लेजिस्लेटिव्ह असेंब्ली दिली आहे, व तिच्यांत लोकांचें बहुमत आहे. पण लोकनियुक्त बहुमत म्हणजे काय? आम्ही लोकांनीं निवडलेली शंभर माणसें येथें बसतों आणि फक्त बोलतों. पण त्या बोलण्यापासून निष्पत्ति काय? आम्हांवर खरी जबाबदारी न टाकली तर आमचा येथें बसण्याचा मुळींच उपयोग नाहीं. ही जबाबदारी कोणती? उदाहरणार्थ, आम्ही कांहीं बाबतींत निर्णय दिला तो सरकारास चुकीचा वाटला तर तो बरोबर आहे असें दाखवून देण्यास सरकारनें आम्हाला हटकलें पाहिजे. जबाबदारी ती हीच. आम्ही बरोबर आहोंत हें आमच्या हातीं सत्ता असल्यावांचून आम्हांस कसें दाखवितां येणार? उलटपक्षीं सरकारनें एखादें कृत्य केलें व तें चुकलें असल्याबद्दल आम्ही सरकारच्या पदरांत माप बांधलें तरी त्याचा उपयोग काय? आम्ही येथें बसून ओरडलों कीं तुम्ही जागेचा राजीनामा द्या म्हणून, तर तें ऐकतो कोण? हे अधिकारी तशीच सत्ता भोगीत राहणार. यासाठीं कार्यकारी कौन्सिल कायदेमंडळास जबाबदार राहणेंच जरूर आहे.

सरकारनें हिंदी लोकांवर आतांपर्यंत जी जी जबाबदारी टाकली तिला आपण पात्र आहों असें त्यांनीं दाखविलें आहे. सरकारी नोकरींतलि वरिष्ठ जागा हिंदी लोकांस पूर्वी मिळत नव्हत्या. त्या मिळूं लागल्यापासून हिंदी लोकांनीं तीं कामें उत्तम प्रकारें बजावलीं आहेत.

लॉर्ड मोर्ले यांच्या वेळेपासून कार्यकारी मंत्र्याची जागा हिंदी लोकांस देण्यास प्रारंभ झाला. तेव्हांपासून आतापर्यंतच्या काळांत नेमलेल्या अधि-

कार्‍यांपैकीं एक तरी हिंदी गृहस्थ नालायक ठरला आहे काय ? लॉर्ड सिंहासारखे कांहीं गृहस्थ असे आढळले कीं, त्यांस सरकारनें जी जागा द्यावी ती त्यांच्या योग्यतेच्या मानानें हलक्या प्रतीचीच ठरावी. मला तर असा अभिमान वाटतो कीं, सरकारनें वरिष्ठ जागा हिंदी लोकांस द्यावयास काढाव्या व हिंदी लोकांनीं त्या आपल्या योग्यतेहून कमी प्रतीच्या म्हणून लाथाडाव्या. आमच्यांत कांहीं लोक देशसेवेकरितां अधिकाराच्या जागा पत्करणारे निघावेत व कांहीं लोक अशा जागांहून आपणास श्रेष्ठ समजणारे निघावेत. दादाभाई नौरोजी, रानडे, गोखले हीं माणसें अशीं होतीं कीं, त्यांनीं हिंदुस्थानसरकारच्या अगर प्रांतिक सरकारच्या फडणविसाचीं कामें उत्तम प्रकारें केलीं असतीं.

### स्वराज्याची पात्रता

वसाहती स्वराज्यास पात्र झाल्या म्हणून त्यांना स्वराज्य देण्यांत आलें व हिंदुस्थान स्वराज्यास पात्र नाहीं म्हणून त्यास स्वराज्य देण्यांत येत नाहीं असें म्हणतात. त्यावरहि माझें उत्तर आहे. स्वराज्याची पात्रता ठरविण्याची शिक्षणप्रसार ही जर कसोटी असेल तर त्या कसोटीस इंग्लंड व वसाहती या मुळींच टिकल्या नाहींत. १८४५ मध्यें इंग्लंडांतील सहा मुलांपैकीं एका मुलास धड वाचतां येत होतें. तरी पण त्यावेळीं इंग्लंड पूर्ण स्वराज्य उपभोगीत होतें. लॉर्ड डरहॅम यानें कानडाबद्दल असें म्हटलें आहे कीं, तेथील रहिवाशांत शिक्षणाच्या नांवानें पूज्य होतें म्हटलें तरी चालेल. तरी कानडा स्वराज्यास पात्रच ठरला. इंग्लिश लोक हिंदुस्थानांत जातिभेद आहे म्हणून आम्हांस नांवें ठेवतात पण मेकॉलेनें आपल्या इंग्लंडच्या इतिहासांत दोनशें वर्षांपूर्वींची स्थिति वर्णितांना म्हटलें आहे कीं, तेथील लोकसंख्या खानेसुमारीच्या वेळीं धार्मिक व राजकीय पंथांवरूनच मोजली जात असे. सन १८७७ त इंग्लंडमध्यें भिन्न भिन्न धर्मपंथ दर्शविणारीं १२२ चर्चेस् होतीं. उत्तर अमेरिकेंतील वसाहतींतहि अशीच स्थिति होती. तेथें वासाहती–वसाहतींमधून विस्तव जात नव्हता. कानड्यासंबंधीं बुरिनॉट म्हणतो, 'येथें फ्रेंच व इंग्लिश या दोन राजभाषा आहेत. क्यूबेकेच्या कायदेमंडळांत फ्रेंच भाषेनें इंग्रजी भाषेस अर्धचंद्र दिला आहे.' द.आफ्रिकेंतहि सरकारी दप्तर दोन भाषांत आहे. युनायटेड स्टेटस्‌विषयीं लेकी म्हणतो, 'न्यूयॉर्क इंग्लिशांच्या हातीं पडण्यापूर्वीं वीस वर्षें सदर शहरांत त्याच्या आजूबाजूस १८ भाषा बोलल्या जात होत्या.'

हिंदुस्थानची स्थिति याहून वाईट आहे असें नाहीं. इकडील मतदारांपैकीं फार मोठा वर्ग गेल्या निवडणुकींत मतें द्यावयास आला, यावरून हिंदी लोक अडाणी नाहींत हें कोणाच्याहि लक्षांत येईल. जबाबदारी म्हणजे कोणत्याहि बऱ्यावाईट कृत्याचा परिणाम सोसण्याची तयारी. येथील सरकार बेजबाबदार असल्यामुळें त्याच्या कृत्याचे परिणाम हिंदी रयतेवांचून दुसऱ्या कोणास भोगावे लागतात ? सरकार रयतेवर कर बसवितें, रयत कर भरते. हिशेबांत सरकार गोंधळ करितें आणि गरीब रयतेस त्याचे परिणाम भोगावे लागतात. सरकारच्या मतानें जबाबदारी म्हणजे सत्ता. याचा विनोदानें असा अर्थ करतां येईल कीं, जेव्हां मला जेवावयाचें असतें तेव्हां जेवणाची जबाबदारी मजवर आहे असें मीं म्हणावें, या दृष्टीनें सरकार बेजबाबादार आहे असेंच सिद्ध होतें. सारांश, जेव्हां आम्ही गेलेलें राज्य परत जिंकून घेऊं तेव्हां आमची स्वराज्याची पात्रता सिद्ध व्हावयाची. हिंदी लोक आत्मसंरक्षणास असमर्थ आहेत असें सांगण्यांत येतें. परंतु इंग्लंड हिंदुस्थानच्या फायद्याकरितां हिंदुस्थानचें रक्षण करीत आहे हें म्हणणें खोटें आहे. हिंदुस्थान हातचें गेलें कीं साम्राज्य हातचें जाईल या भीतीनें इंग्लंड हिंदुस्थानचें रक्षण करीत आहे. कोणींहि कृतज्ञ असणें योग्य आहे. मनुष्य कृतज्ञ असतोहि; पण ग्रटन म्हणतो, कोणाहि मनुष्यानें स्वाभिमानास गुंडाळून ठेवून कृतज्ञ राहावयाचें कारण नाहीं. कोणाहि स्त्रीनें आपल्या पातिव्रत्याचा भंग होऊं देऊन कृतज्ञ राहाण्याचें कारण नाहीं आणि कोणाहि राष्ट्रानें आपल्या राजकीय स्वातंत्र्याचा होम करून कृतज्ञ राहण्याचें कारण नाहीं.

---

# हुंडणावळ व सुवर्णचलन

[ तारीख १२ मार्च १९२७ रोजीं दिल्ली येथील असेंब्लीच्या बैठकींत श्री. न. चिं. केळकर ह्यांनीं सोन्याच्या नाण्यासंबंधानें आपली उपसूचना मांडतांना, करन्सी बिलावर जें विस्तृत भाषण केलें त्याचा थोडक्यांत सारांश खालीं दिला आहे. ]

**हुंडणावळीच्या** बिलावर सुवर्णचलनाची उपसूचना मांडून उगीच कांहीं तरी वेळ खावा अशी माझी इच्छा नाहीं. हुंडणावळीच्या दराचा निकाल झाला. आतां तो वाद वाढवून काय उपयोग ? पण हुंडणावळीचा दर आणि

सोन्याचें नाणें ह्यांचा अवश्य संबंध आहे. तो तोडून तुटत नाहीं. असें असतां गेले दोन दिवस सोन्याच्या नाण्यासंबंधानें कोणी अवाक्षरहि काढलें नाहीं. म्हणून या उपसूचनेच्या द्वारें तो विषय मीं सभेपुढें मुद्दाम मांडण्याचें योजिलें आहे. करन्सी कमिशनच्या रिपोर्टानें हुंडणावळीचा भाव १८ पेन्स ठरविला पण इतरहि अनेक घोंटाळे करण्याचें योजिलें. चलनी नोटांच्या मोबदला रुपये मिळण्याचा 'हक्क' काढून घेणें, चालू सोन्याचें नाणें ( सॉव्हरिन ) आहे तेंहि काढून टाकणें, आणि सोन्याचें नाणें पुन्हा केव्हां चालू होईल ही आशा निर्मूल म्हणून काढणें अशा प्रकारचे उपद्व्याप कमिशननें केले आहेत.

सर बेसिल ब्लॅकेटः—कमिशनच्या रिपोर्टानें कांहींहि केलें असलें तरी बिलांत ह्या गोष्टी कोठें आहेत ? ह्यापुढें गोल्ड स्टँडर्ड बिल येणार आहे तेव्हां ह्या गोष्टी केळकरांनीं वाटल्या तर पुढें आणाव्यात. हिंदुस्थानांत सोन्याचें नाणें चालू व्हावें कीं न व्हावें हें पुढच्या बिलाचे वेळीं ठरेल. मग आज तो प्रश्न पुढें आणून पुढच्या निर्णयासंबंधानें पूर्वग्रहदोष उत्पन्न कां करावा ?

केळकरः—पुढच्या बिलाची गोष्ट मलाहि माहीत आहे; पण त्यावर विश्वास कसा ठेवावा ? आमचे फडणवीस त्या वेळीं टोपी कशी फिरवतील त्याचा नेम कोणी सांगावा ? चालू बिलाचीच गोष्ट घ्या ना, कमिशनच्या रिपोर्टांत सरकारनें सोनें विकत घेण्याप्रमाणें सोनें विकण्याचेंहि बंधन आपणां-वर घ्यावें असा अभिप्राय दिला आहे. पण बिल पाहावें तों त्यांत सोनें विकण्याची जबाबदारी मात्र हळूच अंगाबाहेर लोटलेली; म्हणून पुढच्या बिलाचे वेळीं तरी सुवर्णचलनाचा प्रश्न निघेल किंवा हे निघूं देतील असा ह्याचा विश्वास कोणी धरावा ?

सर बेसिल ब्लॅकेटः—तें बिल तुमच्याच पुढें आहे. त्यांत पाहा ना ?

केळकरः—पण सोनें विकण्याच्या बंधनाविषयीं मी रिपोर्टांत आणि बिलांत फरक दाखविले त्याला उत्तर कां द्या ना ? कमिशननें दोन बंधनें सुचविलीं. तुम्हीं एकच पत्करलें; तें कां ?

सर बेसिल ब्लॅकेटः—केवळ तात्पुरतें.

केळकरः—तात्पुरतें तरी तें असें कां असावें ? पुढच्या बिलाचे वेळीं जर सगळाच प्रश्न निघावयाचा होता तर यापुरतीच एव्हांच घाई कां केली ? तीन बिलांचें हें संयुक्त बिल असें म्हणतां; मग त्यांतील एकच आज कां काढलें ?

हुंडणावळीचा भाव आणखी चार महिने तसाच कागदावर राहता. व्यवहार चालवयाचा तो चाललाच होता. पण खरी गोष्ट अशी कीं, रिपोर्टानें जें दिलें तेंहि आमच्या पदरांत न टाकण्याची फडणविसांची इच्छा दिसते. लोकांना फार आशा होती कीं, रुपयाची किंमत सोन्यांत ठरली जाणार. तेव्हां सोन्याचें नाणेंहि हळूहळू सुरू होणार ! पण बिलानें रिपोर्टापेक्षां अधिक निराशा केली. बिचारा सॉव्हरिन कायदेशीर होता तोहि काढून टाकण्याला ते सरसावले. जसें काय हिंदी लोकांना सोन्याच्या नाण्याचें दर्शनच घडूं नये ! जुन्या कायद्यानें सॉव्हरिनची किंमत जर १० रुपये होती तर आतां ठरणाऱ्या नव्या दरानेंच बिलांत त्याची किंमत १३ रु. ५ आ. ४ पै अशी जाहीर केली असती तर काय गेलें होतें ? पण फडणवीससाहेबांना सोन्याच्या नाण्याचा निःपात करण्याची घाई सुटली. म्हणून मींहि पण सांपडलेली पहिली संधि साधून ह्या प्रश्नासंबंधानें लोकांचें म्हणणें असेंब्लीपुढें मांडणार.

माझ्या उपसूचनेंत सोन्याची मोहोर चालू करावी अशी सूचना आहे ती सर्वस्वीं सयुक्तिकच आहे. हिंदी लोकांना सोन्याच्या नाण्यांची ओळख हजारों वर्षांची आहे. सुवर्णचलनाचा मनानें विचार आणि हातानें व्यवहार करण्याची त्यांना संवय आहे. बरें, मोहोर पाडून द्यावयाची म्हणतों ती तरी लोक आपलेंच सोनें टांकसाळींत नेऊन देतील त्याची. नाणें पाडण्याचा खर्च वास्तविक कोणीच संभावित सरकार घेत नाहीं. पण मी म्हणतों वाटेल तर तोहि घ्या. कारण तो खर्च सरकारावर टाकला तर लगेच हे उपसूचनेला कायद्याची हरकत आणतील ! मला वास्तविक मोहोर आणि सॉव्हरिन दोन्हीं नाणीं एकाच वेळीं हवीं असें नाहीं. पण सॉव्हरिन मागितला तर विलायत-सरकारची हरकत ! म्हणून म्हटलें ती हरकत टाळावी आणि वेगळी मोहोरच मागावी. कारण ती पाडण्याला कांहीं विलायससरकारची परवानगी नको. आपलीच टांकसाळ आणि आपलेंच नाणें. मात्र मोहोर ही सॉव्हरिनच्या तोडीची असावी, ही अशी सूचना मी करीत आहें, ह्याचें कारण ती मोहोर अशीच आहे तशीच आहे अशी अडचण कोणी काढूं नये. नांवाचें हिंदी नाणें पण सगळ्या परीनें तुमच्याच विलायती सॉव्हरिनशीं तोलून पारखून घ्या मग तर हरकत नाहीं ? बरें, टांकसाळींत मोहोर पाडण्याची सोय नाहीं म्हणावें तर, १९१८ सालीं सरकारनें प्रथम ऑर्डिनन्स काढून आणि मग कायदा करून मुंबईच्या टांकसाळींत सॉव्हरिन पाडण्यास सुरुवात केली होती. १९१८

सालीं सुमारें ३६ लक्ष सोन्याचीं नाणीं मुंबई टांकसाळींत पाडलीं. पण युद्ध संपतांच सरकारनें गाशा गुंडाळला. मग आम्ही म्हणतों कीं, गोल्ड स्टँडर्ड सुरू करणार तर, लोकांच्या सोयीकरितां तुम्हीं मोहोर कां पाडून देऊं नये? इमारत, कारागीर, ठसे, यंत्रें सगळें कांहीं तयारच आहे. पण मौज अशी कीं, एवढी टांकसाळ आज चालत असून रुपया हें नाणें फार झालें म्हणून तें पाडण्याचें तर बंदच आहे, आणि सोन्याचें नाणें पाडण्याचा हुकूम नाहीं. मिळून नांवाची टांकसाळ आहे, खर्च भरपूर आहे, आणि त्यांत नाणें पाडतात काय तर निकलच्या चवल्या पावल्या! फार तर कधीं पदकें बिल्ले पाडण्याचें सरकारी किंवा खाजगी काम करतात! टांकसाळीचा हाच का उपयोग?

लोकांनीं आपलें सोनें दिलें आणि त्याची मोहोर पाडून मागितली तर त्यांत तुमचें काय गेलें? उद्यां गोल्ड स्टँटर्ड सुरू करावयाचें म्हणून तुम्हांला सोन्याचा सांठा भरपूर करावयाला पाहिजे हें मला कबूल आहे. पण आमचेंच सोनें आणि आमचीच मोहोर! यांत आम्हीं तुमचें सोनें काय खर्चलें? आमच्या सोन्यावर आमच्या खर्चानें सरकारी छाप पाडून द्या एवढेंच मागतों. आणि तुम्ही असें कीं, तेंहि देत नाहीं म्हणतां. हा हिंदुस्थानापुरता सोन्याच्या नाण्याचा द्वेष नव्हे तर काय? लोकांना मोहोर पाडून मिळाली तर तुम्ही म्हणतां तें, लोकांनीं पुरून दडवून ठेवलेलें सोनें बाहेर निघण्याला मदत होणार नाहीं काय? हिंदी लोकांना सोन्याचें नाणें वापरण्याचीं संवय नाहीं म्हणतां, पण हातचें सोन्याचें नाणें काढूनच घेतल्यावर मग संवय राहणार कशी? आणि संवय व्हावी असें वाटत असेल तर मी म्हणतों त्याप्रमाणें नाणें पाडून द्या. सोन्याच्या चिपा किंवा अनगड लहानसहान तुकडे हातीं कसे खेळवावे? त्याचा व्यवहार कसा करावा? तेंच नाणें म्हटलें म्हणजे त्याचा कोठेंहि जाहीर प्रवेश आणि सगळीकडे सर्रास उपयोग. कोणाला त्याची शिफारस करीत बसावें लागत नाहीं. नाण्यांत भरपूर ऐवज आणि तो किती हेंहि जगजाहीर. हातीं सोन्याचें नाणें खेळलें तर, नोटा आणि रुपये हातीं खेळण्याइतकेंच किंबहुना अधिकहि बँकांचे व्यवहार करण्याची संवय त्यांना लागेल. ती कमी होणार नाहीं. मुख्यतः अडीअडचणीच्या वेळीं बाजारांत चळवळ झाली, दंगेधोपे, युद्धें ह्यांनीं बाजाराला धक्का बसला, तर हातीं सोन्याचें नाणें ही मोठीं सुखाची, सोईची आणि लोकांच्या विश्वासाची गोष्ट असते.

मीं म्हणतों बाकी सर्व राहिलें. पण मोहोर पाडून दिल्यानें एका आक्षेपाला तरी उत्तर मिळण्यासारखें आहे. कारण कांहीं लोक असेंच म्हणणारे भेटतात कीं, "अहो, हिंदी लोकांना मूळ सोन्याचें नाणें नकोच असतां त्यांच्यावर तें उगीच कां लादतां?" मीं म्हणतों, होय; मोहोर पाडून द्या आणि मग हा तरी एकदां निर्णय होईल कीं लोकांना सोन्याचें नाणें हवें कीं नको! नुसता काल्पनिक आक्षेप कां घेतां! हातांत सोन्याचें नाणें असल्याशिवाय सुवर्णमापनपद्धतीवर, म्हणजे एका रुपयांत अमुक इतकें ग्रेन सोनेंहि ह्या सरकारी सिद्धान्तावर लोकांचा विश्वास कसा बसावा? हातांत नाणें असल्याशिवायहि अगदीं तज्ज्ञ जाणते मुरब्बी तत्त्वज्ञानी असतील त्यांचा विश्वास कदाचित् बसूं शकेल. सामान्य माणसाचा, निदान सरकारच्या विश्वासभंगानें वेळोवेळीं हात भाजलेल्या लोकांचा, विश्वास कसा बसावा?

बरें, सोन्याचें नाणें चालू करून आज रुप्याचें नाणें बंद करा असें आम्ही म्हणत नाहीं. कारण तसें करण्यानें कदाचित् जो तो आपलें रुप्याचें नाणें सरकारच्या अंगावर आणून टाकील आणि सोन्याचें नाणें मागूं लागेल, आणि सगळ्या देशानें असें केलें तर हवें तितकें सोनें पदरीं नसल्यानें सरकारला अडचण होईल ही गोष्ट मलाहि समजते. आणि म्हणूनच मी जरी मोहोर पाडून मागतों तरी रुप्याचें नाणें एकदम चलनांतून काढून टाका असें म्हणत नाहीं. पण दोन्हीं नाणीं बाजारांत बरोबरीनें चालायला हरकत कोणती? सोन्यारुप्याचें लग्न लावून तुम्ही देणार. मग सोन्यारुप्याचीं नाणीं बाजारांत जोडीनें खेळत राहिलीं तर त्यांचा परस्पर संबंध दृढच होईल. आणि लोकांनाहि तें डोळ्यांनीं दिसेल व पटेल. सरकारी चलनपद्धतीवर लोकांचा विश्वास बसावा असें सरकारला वाटत असेल तर मी म्हणतों हीच गोष्ट सरकारच्या फायद्याची आहे.

केवळ मोहोरेविषयीं येथवर मीं सांगितलें. आतां सुवर्णचलनाविषयीं सर्वसामान्य कारणें सांगतों. ह्या विषयावर माझ्यासारख्या अतज्ज्ञ माणसांनीं जपून बोललें पाहिजे हें खरें. कारण फडणवीससाहेबांचें ज्ञान किती तरी अगाध! त्यांच्यापुढें कोण बोलेल? पण तज्ज्ञ माणसापुढें बोलावयाचें झालें तरी, आपलें मत सांगूं नये असें कांहीं शास्त्र नाहीं. आणि तज्ज्ञ तज्ज्ञ म्हणजे तरी काय? शेराला सवाशेर हा न्याय जगाचा चालूच आहे. प्रोफेसर कीन्स ह्यांनीं नाहीं नाहीं तें बोलून विलायतसरकारचे फडणवीस चर्चिल आणि त्यांचे मुरब्बी

तज्ज्ञ सल्लागार ह्यांची खरडपट्टी काढली हें मीं जेव्हां परवां नुकतेंच वाचलें, तेव्हां मलाहि धीर आला कीं फडणवीस झाले म्हणून काय झालें ? आपण मनाला योग्य वाटेल तें बोलावें. बरें तज्ज्ञ झाले म्हणून ते चूक करीत नाहींत असें थोडेंच आहे ? मुंबई बॅंकेच्या कामीं तज्ज्ञ लोकांनीं इतके घोटाळे केले आणि लोकांनीं त्यांना इतक्या शिव्या दिल्या कीं, लाज असती तर या तज्ज्ञांनीं गळ्यांत दगड बांधून ह्या बॅंकेंतच जीव दिला असता. पण तज्ज्ञ झाले म्हणून ते ज्ञानानें जुलूमजबरदस्ती करूं पाहतात ! आणि त्यांतूनहि सरकारी अधिकारी तज्ज्ञ असला म्हणजे कांहीं बोलावयासच नको. पण तज्ज्ञांना सारासार विचार सांगणें हेंच त्यांच्या डोळ्यांत अंजन घालण्यासारखें आहे. सामान्य लोकांनाच हा सारासारविचार फार चांगला असतो. आणि सामान्य लोकांचा प्रतिनिधि म्हणून तेच विचार आज फडणवीससाहेबांना मी सांगणार आहें.

सुदैवानें कित्येक तज्ज्ञ लोक आपल्या हातून चूक होईल असें म्हणण्याइतके नम्र असतात, आणि म्हणूनच ते लोकांची सल्लामसलत घेतात. पण आमच्या फडणवीससाहेबांनीं करन्सी कमिशन नेमून सल्लामसलतीचा फक्त बहाणा केला. त्यांनीं ही गोष्ट नम्रताबुद्धीनें केली असें मात्र नाहीं. रस्त्यांत एखादा धडधाकट मनुष्य खाकेंत कुबड्या घेऊन चाललेला मला दिसला म्हणजे, मी असाच तर्क करतों कीं ह्या कुबड्या त्याला चालण्याकरितां नको आहेत, तर कोणाच्या तरी डोक्यांत हाणण्याकरितां कांठ्या पाहिजे असतील म्हणून त्या खाकेंत घेऊन चाललेला आहे ! पण कमिशनचे सभासद पाहिले म्हणजे, फडणवीससाहेबांच्या ह्या काठ्या कच्चा बोरूसारख्या आहेत, त्यांचा मार आम्हांला बसणें शक्य नाहीं, उलट आम्हींच त्या मोडून टाकूं शकूं असें मला वाटतें.

बरें. सुदैवानें सुवर्णचलनपद्धति आणि हुंडणावळ हे विषय झाले तरी केवळ तज्ज्ञ माणसाचेच आहेत असें नाहीं. फडणवीससाहेबांनीं ही गोष्ट कबूल केली आहे कीं, चलनपद्धति हा पुष्कळसा भावनेचाच प्रश्न आहे. अर्थात् फडणविसांची भावना आणि आमची भावना ह्या वेगळ्या प्रकारच्या आहेत आणि आमच्या भावनेप्रमाणेंच चलनपद्धति हवी असें मी मागतों, ह्यांत विलायती प्रोफेसर किंवा पेढीवाले यांच्या भावनेची सबब आम्हांला सांगून मी कसें ऐकणार ? हिंदी लोकांना सुवर्णचलन हवें असेल तर तें त्यांना दिलें पाहिजे, व

देणें योग्यच आहे असेंच आजवर सर्व म्हणत आले. आणि सुदैवानें फडणवीससाहेबांनीं कमिशन नेमून घेतलें त्यांत आमचेंच आयतें काम झालें. कारण कमिशनपुढें आलेले म्हणून छापलेले किंवा न छापलेलेहि सर्व पुरावे लक्षांत घेऊन मीं असें गणित केलें आहे कीं, एकंदर साक्षीदारांपैकीं ९३ साक्षीदार सोन्याचें नाणें हवें म्हणणारे निघतात आणि फक्त ८ ( आठ ) नको म्हणणारे निघतात.

रिपोर्ट बाहेर पडल्यावरहि फडणवीससाहेबांकडे निरनिराळ्या ठिकाणांहून पत्रें आणि अभिप्राय आले. ते त्यांनीं खाजगी पत्रव्यवहार समजून फेकून दिले असेंहि एक पिलूं बाहेर निघालेलें आहे. तो पुरावा जमेस धरला तर माझेंच म्हणणें आणखी खरें ठरतें. असो. चलनपद्धति हा भावनेचा विषय होय. ही गोष्ट ह्याच पुराव्यानें अशी ठरते कीं, ९३ तील सुमारें ९० साक्षीदार हिंदी आणि ८ पैकीं दोन साक्षीदार गोरे युरोपियन. ह्यांमध्यें इकडे तिकडे मला एखाद-दुसरा अपवाद आढळला नाहीं असें नाहीं; पण ह्या अपवादानें मीं घातलेला नियमच खरा ठरतो. हिंदी साक्षीदार म्हटला म्हणजे त्यानें सोन्याचें नाणें चालूं करा असें म्हणावें, आणि गोरा युरोपियन म्हटला म्हणजे त्यानें नको असें म्हणावें, हा नुसता योगायोग खचित नव्हे. ह्यांत मोठें मर्म आहे. आणि तें मर्म परस्परहितसंबंधाच्या विरोधाचें. हिंदी मनुष्य हिंदुस्थानला सोन्याचें नाणें मागतो आणि गोरा युरोपिअन नको म्हणतो ह्यांतच एका अर्थानें माझा न्याय झाला.

बरें. ह्या ९० हिंदी साक्षीदारांत, शास्त्रज्ञ, प्रोफेसर, शिक्षक, व्यापारी, दलाल, तात्पर्य, सर्व प्रकारचे व्यवहार करणारे चतुर, चाणाक्ष, जाणते लोक आहेत. अर्थशास्त्राचा हिंदी प्रोफेसर म्हटला, कीं तो म्हणे पढतमूर्ख. पण मीं जे दुसरे इतके लोक सांगितले त्यांचा तर पुस्तकी अभ्यास नाहीं ना ? पैचें नफानुकसान पाहणारे व्यवहारचतुर असे हे लोक आहेत. सोन्याचें नाणें चालू झाल्याकारणानें जर खरोखरच हिंदुस्थानचा तोटा असता तर हे लोक तें कां मागते ? देशाचें नुकसान व्हावें म्हणून ? बरें, कमिशनच्या रिपोर्टालाच असें काय सोनें लागलें आहे ? तो रिपोर्ट प्रसिद्धच होतांच, लंडनच्या रॉयल सोसायटी ऑफ आर्ट्सपुढें सर चार्लस ॲडीस, विलायतचे पहिल्या प्रतीचे एक पेढीवाले,

ह्यांनीं असें म्हटलें आहे कीं, " ह्या रिपोर्टांत मला नुसती तात्त्विक पुस्तकी बडबड दिसते. मला ह्यांत व्यवहारचातुर्य कांहींच दिसत नाहीं!"

तात्पर्य, आधार दाखवूनच निर्णय करावयाचा तर, फडणवीससाहेबांनीं माझ्याशीं आधारांचें युद्ध करावें किंवा आमच्या हिंदी पद्धतीप्रमाणें मजबरोबर खेळावयाला बसावें. म्हणजे त्यांनीं एक आधार दाखवावा मीं दुसरा आधार दाखवावा, असें करीत करीत शेवटीं जो राहील तो जिंकील. तसें ते करतील तर मी तयार आहें. फडणवीससाहेब प्रो०कीन्सचा आधार दाखवतील तर मी त्यांना त्यांच्या तोडीचे प्रोफेसर ग्रेगरी व कॅनन ह्यांचे आधार दाखवीन. हेहि बडे प्रोफेसर आहेत आणि त्यांनीं असा स्पष्ट अभिप्राय दिला आहे कीं, हिंदी लोकांची भावना सुवर्णचलनाविषयीं आहे म्हणून तें त्यांना दिलेंच पाहिजे. उलट प्रो०कॅनन ह्यांनीं तर असें समर्थन केलें आहे कीं, फडणावीसांचे मुख्य आक्षेपच त्यामुळें ढासळले जातात. हे आक्षेप असे कीं, हिंदुस्थानांत आज सुवर्णचलन सुरू करावयाचें तर त्याला सोन्याचा फारच सांठा लागेल, तो आमच्याजवळ नाहीं इत्यादि. पण प्रोफेसर कॅनन म्हणतात कीं, " जर पश्चिमदेशांतील लोक आतां सोन्याचें नाणें टाकून देऊं लागले आहेत, आणि कागदी चलन व बाजारी पत ह्यांवरच सर्व व्यवहार भागवूं लागले आहेत, तर त्यांना सोनें कमीच लागणार! अर्थात् हिंदुस्थानसारख्या पौर्वात्य देशांत जर दिवसेंदिवस अधिक सोन्याचा उपयोग केला तर, पश्चिमदेशांतील लोकांचा सोन्याचा रोग आयता थोडा हटेल. कारण बेसुमार सोनें सांठविल्यामुळें, ह्या पाश्चात्य देशांतून अस्वस्थता, बंडें व लढाया होत आहेत. हिंदुस्थाननें सोनें अधिक घेतल्यामुळें त्यांचेंच काम होईल, आणि पश्चिमदेशांतील लोकांचे हें श्रीमंती दुःख थोडें तरी हलकें होईल." देशांत सोन्याचा सांठा बेसुमार होणें ही एका दृष्टीनें खरोखर आपत्तीच होय. युद्ध चालू असतां स्वीडन व नॉर्वे ह्या दोन देशांनीं आपल्या किनाऱ्याला बाहेरच्या सोन्याचा स्पर्शहि होऊं नये अशी खबरदारी घेतली होती म्हणतात. अमेरिकेचेंहि घर युद्धामुळें सोन्यानें भरलें आहे. कसेंहि असो. सोन्याची वांटणी होऊन त्यांचें व आमचें काम झालें तर त्यांत वावगें तें काय?

असो; हुंडणावळीच्या दराचें युद्ध संपलें. आतां तोंड फिरलें असून पिछाडीच्या बाजूला लहानशी चकमक झडविण्याचें काम माझी उपसूचना करीत आहे. आणि तिचा हेतु सुवर्णचलन वांचविण्याचा आहे. सर पुरुषोत्तमदास ठाकुरदास

ह्यांना गेले दोन दिवस विश्रांति मिळाल्यानें आतां ते माझ्या मदतीला येतील अशी मला आशा आहे. हुंडणावळीच्या दरांत आमचा पराभव झाला तथापि एखाद्या तत्त्ववेत्त्याप्रमाणें मी त्याचें दुःख विसरूं शकतों. कारण माझें मन मला सांगतें कीं, फडणवीससाहेब तोंडानें किती बोलले व कायदे किती केले तरी हुंडणावळीचा भाव स्थिर म्हणून कधीं राहूंच शकत नाहीं. खेचरासारखी ती हट्टी जात आहे. वेळोवेळीं आपण मनानें उभा राहील तेथेंच राहील दुसरीकडे जावयाचा नाहीं. हुंडणावळीचा खरा स्वाभाविक दर म्हटला म्हणजे जो आज एक आणि उद्यां एक असा अनिश्चित असतो तोच. हें दिसण्याला चमत्कारिक पण सर्वस्वीं खरें आहे. सोन्याची व रुप्याची किंमत नित्य बदलते. ह्यामुळें, त्या दोहोंचा संबंध ठरविणारें समीकरणहि बदलणारच. अर्थात् अनिश्चित किंवा चलबिचलीचा हाच त्या बाबतींत स्वाभाविक दर.

युद्धांत पाश्चिमात्य राष्ट्रांनीं हुंडणावळीचा दर ठरविण्याचे काय वाटेल ते प्रयत्न केले म्हणजे हास्यास्पद गोष्टी केल्या आणि जुलूमहि केले; परंतु त्यांतला एकहि उपाय टिकाऊ ठरला नाहीं. सरकार तरी दर टिकवणार म्हणजे एरवीं काय करणार? सरकारची विलायतेंत स्वतःची एक पेढी, हिंदुस्थानांत एक पेढी. सरकार हव्या तशा तिकडून इकडे, इकडून तिकडे सरकारी हुंड्या लिहिणार. बाजारनिरख ढळला असें वाटलें तर नाणें सैल सोडणार किंवा कडकला तर नाण्याची नाकेबंदी करणार. मिळून काय? केव्हांहि कृत्रिम उपायावरच अवलंबून राहणार!! सत्ता असली म्हणजे सर्व कांहीं शोभतें किंवा संपादून जातें, त्यांतलीच ही गोष्ट आहे. ह्या सत्तेच्या बळावर हवा तो चढउतार सरकारला करतां येतो. इंग्रजी लहान मुलांच्या गोष्टींच्या पुस्तकांत एका जादूच्या 'मश्रूम'चें वर्णन केलें आहे. त्याची मौज अशी कीं, उजव्या बाजूचा तुकडा मोडून खाल्ला कीं, माणसाचा आकार हनवटी पायाला भिडण्याइतका लहान होतो; आणि डाव्या हाताचा तुकडा तोडून खाल्ला कीं, आकार इतका उंच होतो कीं, डोकें आभाळाला जाऊन लागतें! पण हुंडणावळीचा खरा मेळ पाडावयाचा तर ह्याला एकच रीत. देशांतील नाणें आणि सर्व देशांना सामायिक अशी किंमत मोजण्याचें माप म्हणजे सोनें ह्यांच्या परस्पर-किंमतीचा मेळ पडावा. तो सोन्याच्या नाण्याशिवाय कसा पडणार? असो, दरांत चलबिचल झाली असतां सरकारच्या हातीं जें साधन आहे त्याचा उल्लेख केला आहे.

राहतां राहिले लोक. पण त्यांचे हातीं स्वतःचें असें साधन काय आहे ? आणि मी म्हणतों कीं, सगळ्या जगांत जर सोन्यानें मोजमाप होणार, तर हिंदुस्थानांत सोन्याचें नाणें चालू असलें तरच ह्या चलबिचलीवर लोकांचे हातीं असा कांहीं स्वावलंबी इलाज राहील. १९१३ च्या कमिशनपुढें, सर मॉंटेग्यु वेब, सर भूपेंद्रनाथ मित्र वगैरे लोकांनीं, सोन्याच्या नाण्याचा मुख्य उपयोग म्हणून हाच उपाय सांगितला होता. सोन्याचें नाणें हातीं राहिल्यानें चणचणीच्या किंवा घालमेलीच्या वेळीं, हुंडणावळीच्या बाबतींत, सरकारवर लोकांना फारसें अवलंबून राहावें लागत नाहीं. हातांत सोन्याचें नाणें खेळल्यानें, अंगावर मूठभर मांस वाढतें असें नाहीं, तर प्रजा स्वावलंबी होते, हाच खरा उपयोग! आणि सुवर्णचलनासंबंधानें हिंदी लोकांची म्हणून जी भावना सांगितली ती ह्याचमुळें, म्हणजे स्वावलंबी होण्याच्या इच्छेमुळें. पण फडणविसांची भावना पहावी, तर ती अशी कीं, हिंदुस्थाननें सोन्याच्या नाण्यांपासून जितकें दूर राहावें तितकें बरें !

**सर बेसिल ब्लॅकेटः—** पण मी असें कोठें म्हणतों हें कागदोपत्रीं काढून दाखवा.

**केळकरः—** ह्या बिलाच्या कागदपत्रांतच तें दिसून येतें. कमिशननें शिफारस केली कीं, लोकांना सोनें विकण्याचें बंधन सरकारनें आपल्यावर घ्यावें व बिलांत तें तुम्ही काढून टाकतां. तुम्हाला शंका आली असेल कीं सोनें हातीं आहे, आतां नाणें द्या असें म्हणून लोक पाय पुढें टाकतील पण तसें घडेलच असें नाहीं. मी तुमच्याच साक्षींतील कांहीं उतारे काढून दाखवितों. त्यावरून सोन्याचें नाणें हवें तितकें हातीं आल्यास तें पुरून न ठेवतां व्याजीं किंवा कारखानदारीकडे लावण्याची इच्छा लोकांना होईल असें तुम्हींच म्हटलें आहे. पण उलट असेंहि म्हटलें आहे कीं, "पोरांना जशा खेळाच्या वस्तु आवडतात तसेंच हिंदी लोकांना सोन्याचें नाणें आवडतें ! पण मी म्हणतों कीं, हिंदी लोकांना प्रौढ माणसें तुम्ही म्हणतां तेव्हां त्यांच्या विचारांना आणि मतांना किंमत द्यावी ती तुम्ही देत नाहीं. बरें, त्यांना मुलें म्हणतां तर म्हणाना; पण मग मुलांप्रमाणें त्यांचे हट्ट तरी पुरवा. पण प्रौढ माणसांच्या विचाराला दाखवावा तो हिंदी लोकांच्या मताला तुम्हीं मान देत नाहीं; आणि मुलांशीं वागतांना जो प्रेमळपणा व जें ममत्व

असावें तेंहि तुमच्याजवळ नाहीं. मग आमच्याशीं तुम्ही वागणार कसें तें तरी सांगा.

**सर बेसिल ब्लॅकेटः**-- माझ्या साक्षींतील शब्दांचा हा विपर्यास आहे. पण मी त्याचें उत्तर पुढें देईन.

**केळकरः**—हिंदी लोक राहिले; पण गबे, नॉरमन, वुइलिस, हॅमिल्टन, ग्रॅन्थॅम, डेनिंग, क्रिश हे युरोपियन साक्षीदारहि हिंदी लोकांच्या ज्या भावनेला प्राधान्य देतात ती भावना फडणविसांनीं कां मानूं नये? बरें, ह्या भावनेलाहि सबळ कारण आहे! आणि तें असें कीं, हल्लींच्या चलनी नोटा आणि रुप्याचीं नाणीं ह्यांवरील त्यांचा विश्वास अगदीं उडाला आहे. बिचारी कागदी नोट आढ्यता तरी मिरवीत नाहीं. ती म्हणते "मी काय बोलून चालून कागदच. माझ्यावर विश्वास ठेवा म्हणून म्हटलें तरी कोण ठेवणार?" पण रुप्याचा रुपया असला तरी तो किती किंमतीचा? त्यावर तरी विश्वास कोणी ठेवावा? प्रोफेसर रॉबर्टसन् यांच्या एका पुस्तकांत चलनी नोटांचे कागद आणि त्यांचा निंदक ह्यांचा एक झगडा दिला आहे. त्यांत ह्या कागदी चलनानें हिंदी रुपयांची पूजा अशा शेलक्या शब्दांनीं बांधली आहे कीं, ती वाचून हसूं येतें. तुम्ही कायद्यानें चलनी नोटा आणि चांदीचे रुपये हिंदुस्थानांत पायावर खडे केले खरे, पण परदेशांत त्यांना कोण विचारतो? म्हणून नोटा व रुपये दिले असतां सरकारनें आपणास ठराविक दरानें का होईना पण सोनें द्यावें अशी लोक स्वाभाविकच मागणी करतात. नोटा-रुपये दिले असतां सोनें देऊं असा सरकारनें जाहीरनामा काढला म्हणून जो तो उठून सोनें मागेल असें थोडेंच आहे! कारण सोन्याप्रमाणें रुप्याच्या नाण्यांचा आणि चलनी नोटांचाहि लोकांना उपयोग आहे. पण एकाचा दुसऱ्याशीं हटकून मोबदला होईल अशी कायदेशीर व्यवस्था पाहिजे. रुपयाचें रूपांतर आपणाला वाटेल तेव्हां सोन्यांत हटकून हुकमी करतां येतें अशी खात्री मनाची असणें हाच निश्चयाचा मूळ पाया!

होतां होईतों प्रत्यक्ष सोन्याचें नाणें न वापरतां नोटा, चेक, हुंड्या ह्यांनीं होईल तितका व्यवहार करावा हें इकडील लोकांनाहि समजतें. पण ही गोष्ट कालांतरानें पटणारी आहे. एकदम पटणारी नाहीं आणि ती पटेपर्यंत सोन्याचें नाणें चालूं करा एवढेंच आम्ही म्हणतों. पावलें टाकून चालावयाला शिकण्याप्रमाणेंच हें आहे; त्यांतून गेल्याशिवाय हें कसें येईल? तुम्ही

विलायतच्या लोकांचें उदाहरण सांगतां. त्यांचा तर बँक अॅक्ट १९२५ सालींच पास झाला कीं नाहीं ? मग अवघ्या दोन वर्षांपूर्वी इंग्लंडांत सोन्याचें नाणें कायदेशीर म्हणून चालू होतें तर तें आज हिंदुस्थानांत असावें असें म्हणण्यांत काय चूक ?

कांहीं लोक असें म्हणणारे आढळतात कीं, हिंदी लोकांना सोन्याची कांहीं बेसुमारच आवड आहे; पण हें खोटें. कोणी म्हणतात हिंदी लोक औषध म्हणून सोनेंच खातात ! वर्ख खात असतील, पण इंग्लंडांत दांतांच्या कवळ्या बांधण्याला अधिक सोनें लागतें; आणि दन्तवैद्य हे तिकडे सोन्याचें ठरीव गिऱ्हाईकच झालें आहे. जगांत तरी काय दिसतें ? अजून सोन्याचाच अम्मल सर्वत्र आहे. सगळे व्यवहारी लोक त्यालाच अधिक मान देतात आणि तो तरी कां ? तर सोन्यामध्यें आज सत्ता नांदते म्हणून. युद्धापूर्वीच्या तुमच्या देशाचीच आठवण करा. पण आतां शांतता प्रस्थापित झाल्यावर त्याचें नवें सोंग कायम टिकेल कशावरून ? सोन्याला बहिष्कृत मानणें हा आजहि प्रचलित विचार म्हणून दिसतो, पण ती केवळ तात्पुरती लहर न ठरेल कशावरून ? मला तरी असें दिसतें कीं, अमेरिका, इंग्लंड वगैरेंचा डाव असा असावा कीं, जगांतील सगळें सोनें अमेरिका, इंग्लंड वगैरे देशांतील तीन चार बँकांत सांठवून सगळ्या जगाला त्याच्या जोरावर आपल्या पायांशीं फुटबॉलप्रमाणें पराधीन करून खेळवावयाचें. हिंदुस्थानला हक्काचें सोनें मिळत असतां असें त्यानें पराधीन कां राहावें ? इंग्लंडांत, अमेरिकेंत सोन्याचा सर्व संचय झाला म्हणजे, हिंदुस्थानच्या पायाला आणखी एक नव्या सांखळ-दंडाचा वेढा पडलासें होईल. हा सांखळदंड शब्दशः सोन्याचा खरा पण तो सांखळदंडच !

आम्हांला असें सांगण्यांत येतें कीं, इंग्लंडांत १९२५ च्या कायद्यानें, सोन्याच्या नाण्याचा व्यवहार करण्याला फक्त लंडन बँकेलाच परवानगी दिली असून सोनें असें व्यवहारांतून काढून टाकलें आहे. पण मींहि कित्येक अर्थ-शास्त्रज्ञांचीं मतें वाचलीं आहेत.. त्यांवरून पाहतां युरोपमधील हा सोन्यावरचा बहिष्कार लवकरच निघून जाईल आणि बाजारनिरखांत अदलाबदल करण्या-ऐवजीं, कांहीं ठराविक दरानें– वाटलें तर एखाद्या नव्या दरानें— सोन्याची देवघेव सुरू होईल. कोणी वाजवीपेक्षां अधिक सोनें संग्रहीं ठेवणें अनिष्ट आहे असें प्रो० कीन्स ह्यांचेंहि मत आहे. मि० मेकीना यांच्या मतें, अमेरिकेंत

जरूरीपेक्षां जास्त सोनें असल्यामुळें तें लवकरच बाहेर पडेल. मग तें हिंदुस्थानाला नाणें चालू करायला कां मिळूं नये? पण आमच्या फडणविसांची योजना' अशी कीं, आम्ही केव्हांहि इतर राष्ट्रांच्या मागेंच राहिलें पाहिजे, आणि लोकांकडून मूर्ख म्हणवून घेतलें पाहिजे.

सगळेंच जग जेव्हां सोन्याला तुच्छ मानूं लागेल तेव्हां आम्हीहि त्यांच्या रांगेंत जाऊन बसूं. जगाबरोबर आमचीहि बुद्धि कां पालटणार नाहीं? डायोजिनीअसप्रमाणें पुढें एखाद्या काळीं सोन्याला आम्हीहि कचरा मानूं. जुन्या ग्रीक राज्यांत लायकरगसनें असा कायदा केला होता कीं, घरीं सोनें कोण ठेवतो ह्याचा पोलिसांकडून तपास करवून जो सांपडेल त्याला शिक्षा करावी. न जाणो पुढें-मागें आमची ही दिल्लींतील असेंब्लीदेखील सोन्याविरुद्ध असा एखादा कायदा करणार नाहीं असें कोणीं म्हणावें? पण तो दिवस येईल तो दूर आहे. अर्थात् १९२५ च्या पूर्वी खुद्द इंग्लंड ज्या तऱ्हेनें सोन्याच्या नाण्यांचा व्यवहार करीत होतें तसाच आम्हांला करण्याची इच्छा असली तर कां करूं देऊं नये? युद्धापूर्वीं इंग्लंडजवळ ८३ कोटि सॉव्हरिनचें नाणें होतें. म्हणजे इंग्लंडांत दर डोईला १८ सॉव्हरिन नाणीं हें प्रमाण पडतें. सन १९१५ पर्यंत दरसाल इंग्लंड २॥-३ कोटि सॉव्हरिन नवे पाडी. युद्धापूर्वीं दोनच वर्षें सर्वांत जास्ती म्हणजे ३॥ कोटि सॉव्हरिन विलायतच्या टांकसाळींत पाडले गेले. १९१५ सालीं सगळ्या जगांत नाण्याकरितां जितकें सोनें खर्च झालें त्यापैकीं ७५ टक्के इंग्लंड आणि अमेरिका ह्यांच्या वांट्याचें होतें. सोन्यावर बहिष्कार टाकून व्यवहार भागविणारीं अशीं हीं राष्ट्रें मानावयाचीं तर त्यांना इतकें नाणें पाडण्याची काय गरज होती? हिंदुस्थानांतील लोकच तेवढें सोन्याचें नाणें जपून दडवून ठेवतात असें नाहीं. युद्धापूर्वीं ७॥ कोटि सॉव्हरिन इंग्लंडांत खासगी लोकांच्या हातीं खेळत होते. मग ह्यांतील पुष्कळसे सॉव्हरिन खाजगी लोकांनीं आपल्या संग्रहीं जपून ठेवले असतील ह्यांत काय संशय? आणि जादूगार किंवा गारुडी जसा लोकांच्या नाकांकानांतून, पायांतून रुपये काढतो, त्याप्रमाणें युद्धाच्या प्रसंगानें किती तरी सॉव्हरिन इंग्रज लोकांच्या खासगी सांठ्यांतून बाहेर पडलेले दिसले! प्रसिद्ध पेढीवाला बेंजामिन व्हाईट म्हणतो, " अगदीं फॅशनेबल म्हटल्या जाणाऱ्या आमच्या लोकांनासुद्धां सॉव्हरिन जपून दडपून ठेवण्याची सवय असतेच ती जात

नाहीं.'' म्हणून मीं म्हणतों कीं, उगीच हिंदी लोकांच्या सोनेंनाणें पुरून ठेवण्याच्या सवयीवर कोणी तोंडसुख घेऊं नये.

करन्सी कमिशननें हा दोष हिंदी लोकांना दिला; आणि आमच्या हिंदी सभासदांनींहि खुशाल त्यावर सह्या केल्या. सर माणेकजी दादाभाई हे त्यांतील एक होत. १९१२ सालीं ह्याच आपल्या कौन्सिलांत, कै. सर विठ्ठलदास ठाकरसी ह्यांनीं सोन्याचें नाणें प्रचलित करण्याचा ठराव आणला, तेव्हां ह्याच दादाभाईनीं त्यांना पाठबळ दिलें. आणि ह्याच मुद्दयावर ते असेंहि म्हणाले कीं, "हिंदी लोक सोनेंनाणें दडवून ठेवतात ह्या म्हणण्यांत अतिशयोक्ति आहे. निदान त्यांना ती सवय पूर्वी असली तरी, हल्लीं ती बदलेली आहे." आतां मौज ही पाहा कीं, ह्यानंतर लवकरच युद्ध सुरू झालें; आणि युद्धानंतर सोन्याच्या नाण्यावर बहिष्कार पडला. अर्थात् तेव्हां जें सोन्याचें नाणें दृष्टीला पडतहि नव्हतें त्याचा संग्रह-सांठा कोण कसा करणार? हेच दादाभाई माणेकजी रिपोर्टांत म्हणतात कीं, अलीकडे हिंदी लोक सोन्याचें नाणें उगीच दडवून संग्रहीं ठेवतात. दादाभाईनीं तेव्हां सोन्याचें नाणें सुरू करण्याचा सल्ला दिला, आणि आतां सल्ला देतात कीं तें सुरू करूं नये; आणि असल्या लोकांच्या फुसक्या अभिप्रायावर जोर देऊन आमचे फडणवीस आम्हांला मोडून काढणार; ही त्या रिपोर्टाची किंमत! मि. गिलन वगैरे कित्येक लोकांनीं १९१२ सालीं हिंदी लोकांवरचा हा आरोप काढून टाकला आहे. प्रो० कीन्सहि म्हणतात कीं, सोन्याचें नाणें हातीं मिळालें असतां हिंदी लोकांची संग्रहाची सवय असलेली निघून जाईल. सर सॅम्युएल मॉंटेग, सर जेम्स बेगबी इत्यादि किती तरी इंग्रजांचे अभिप्राय असेच आहेत. सर जेम्स बेगबी हे मुंबई बँकेचे गव्हर्नर होते. १९१३ सालच्या करन्सी कमिशनचे ते सभासद होते. त्यांनीं भिन्नमतपत्रिकेंत असें स्वच्छ लिहून ठेवलें आहे कीं, हिंदुस्थानांत सोन्याचें नाणें बेलाशक चालू करावें.

जुना इतिहास सांगत बसत नाहीं. पण १८९३ सालापासून एकसारखी ह्याच विचाराची परंपरा सुरू आहे. ह्या सालीं चांदीचे घोंटाळे झाल्यानें, अनेक योजना सरकारपुढें असतां त्यांनीं सुवर्णमापन आणि सुवर्णचलन हेंच आपलें धोरण म्हणून निश्चित केलें. तेव्हांपासून हिंदुस्थानांत सरकारचे प्रत्येक फडणवीस ह्याच धोरणाचें समर्थन करीत आले आहेत. १९२२ सालीं, कै. सर विठ्ठलदास ठाकरसी यांनीं फिरून सोन्याच्या नाण्यांचा ठराव ह्याच कौन्सिलांत

मांडला तेव्हां सर माल्कम् हेले ह्यांनीं उघड सांगितलें कीं, “ हिंदुस्थानांत हवी म्हणाल त्या क्षणीं सोन्याची टांकसाळ आम्ही चालू करूं अशी मी जाहीर रीतीनें हमी देतों.” पण हल्लींच्या कमिशनपुढें जो पुरावा आला त्यावरून पाहतां आतां सोन्याची टांकसाळ चालू करा असें हिंदी लोकांनीं म्हणण्याचें आणखी तें काय राहिलें? १०४ साक्षीदारांपैकीं ९८ साक्षीदार सोन्याचें नाणें ताबडतोब चालू करा म्हणतात, आणि फक्त ६ विरुद्ध मत देतात ह्यावरून अनुमान उघडच होत नाहीं काय? शिवाय मीं वर युरोपियन लोकांचे अभिप्राय दिले आहेत. हिंदी लोकांचे नांवांचा मीं उच्चारच केला नाहीं. हिंदुस्थान सरकारहि आजपर्यंत नाहीं म्हणालें नाहीं. खुद्द सर बेझिल ब्लॅकेट आणि करन्सी कंट्रोलर मि. डेनिंग ह्यांनीं स्वतःच करन्सी कमिशनपुढें सगळ्या हिशेबासह सोन्याच्या नाण्यांची योजना मांडली; आणि त्यांत लिहिलेले शब्द खरे करा एवढेंच मी ब्लॅकेटसाहेबांना म्हणतों.

पूर्वीं सरकारच्या मताविरुद्ध कोणी असला तर, फक्त स्टेट सेक्रेटरी; आणि स्टेट सेक्रेटरी जेव्हां अनुकूल होता तेव्हां वरिष्ठ ब्रिटिश सरकार एवढेंच प्रतिकूल होतें. इकडे टांकसाळ सुरू करण्याचें ठरलें तेव्हां त्यांनीं नसतें विघ्न उत्पन्न केलें, आणि आपल्या अधिकाराचा दुरुपयोग केला. आज हवें तितकें सोनें मिळण्याला पंचाईत पडण्यासारखी दिसते परंतु ही अडचण कशी तरी काढतां येईल असेंहि ब्लॅकेटसाहेबांनींच आपल्या योजनेंत लिहिलें आहे. खर्च किती लागेल ह्याचाहि हिशेब आणि तरतूद त्यांनीं केली आहे. तेव्हां आतां ज्या एका गोष्टीनें हिंदुस्थानच्या चलनपद्धतींचा कायमचा समाधानकारक निकाल लागण्यासारखा, तिचाच एकदम अंमल कां करीत नाहीं? उगीच इकडे तिकडे भलत्याच ठिकाणीं तुंबड्या कां लावीत बसलां? हुंडणावळ बिघडेल, चलनपद्धतींत घोंटाळा होईल, तेव्हां लोकांचे स्वतःचे हातीं कांहीं साधन राहावें एवढ्याचकरितां आम्ही सोन्याचें नाणें मागतों.

तात्पर्य, हिंदी लोकमत, फडणविसांचे विरुद्ध आहे. हिंदी प्रोफेसर व तज्ज्ञ त्यांचे विरुद्ध आहेत. त्यांची योजना त्यांचे विरुद्ध साक्ष देते. पण कमिशनपुढें पुरावा देतांना त्यांनीं आपल्या योजनेइतकाहि भलेपणा ठेवला नाहीं. त्या पुराव्यांत जितका भलेपणा आहे तितका ब्लॅकेटसाहेबांच्या पहिल्या बिलांत उरला नाहीं. पहिल्या बिलांत आहे तितका दुसऱ्या बिलांत उरला नाहीं. आणि दुसऱ्या बिलांत भलेपणा उरला आहे तितका खुद्द त्यांच्यांत आज

दिसत नाहीं. अशी त्यांच्या भलेपणाची उतरती भांजणी आहे. कारण गोल्ड स्टँटर्ड आणि सोन्याचें नाणें ह्या योजनेवरून खालीं येत येत आतां फक्त शिल्लक उरली इंग्लंडवर हुंडी आणि तीहि कमींत कमी १०६५ तोळे सोन्याचे पैसे भरा म्हणजे त्या ऐवजाच्या हुंड्या विलायतेवर किंवा परदेशावर देतों इतक्यापर्यंत मजल येऊन ठेपली आहे. तात्पर्य, सोनें म्हणून हिंदी लोकांच्या हाताला लागावयाला नको एवढाच काय तो मतलब! पण अशा रीतीनें, कमिशनच्या शिफारसी बाजूला ठेवण्यासहि जर ब्लॅकेटसाहेबांना अधिकार पोंहोंचतो तर त्या बाजूला ठेवून सोन्याचें नाणें चालू करा असें म्हणण्याचा-हि अधिकार आम्हांला कां पोंहोंचूं नये? त्यांचें अतिक्रमण तर आमचेंहि अतिक्रमणच! फरक एवढाच कीं त्यांचें अतिक्रमण प्रतिगामी स्वरूपाचें आणि आमचें प्रगतीच्या स्वरूपाचें. म्हणून असेंब्लीनें ती गोष्ट करावी असें मी म्हणतों. आपण जर ह्या गोष्टींचा सूक्ष्म विचार कराल तर माझ्या बोलण्याचा आपणाला कंटाळा येणार नाहीं. माझा युक्तिवाद वाटेल त्यांनीं खोडून काढावा मला कबूल आहे. माझी चूक दाखवून द्यावी मला कबूल आहे. पण एकंदरीनें पाहतां, माझा युक्तिवाद जर साधार आणि समर्पक असला तर ह्या सभेनें मी म्हणतों असें आपलेंहि मत द्यावें.

---

## पब्लिक सेफ्टी बिल

[न. चिं. केळकर यांनीं ता. २४ सप्टेंबर १९२८ रोजीं लेजिस्लेटिव्ह असेंब्ली-मध्यें पब्लिक सेफ्टी बिलावर जें भाषण केलें त्याचा सारांश खालीं दिला आहे.]

या बिलाच्या प्राथमिक चर्चेच्या वेळीं मला हजर रहातां आलें नाहीं. तथापि अखेरीला तरी मी बिलाविरुद्ध मत देण्याला येथें राहूं शकलों या-बद्दल मला फार समाधान वाटतें. हें बिल निदान सिलेक्ट कमिटींतून तरी बरेंचसें दुरुस्त होऊन बाहेर येईल असें वाटलें होतें. पण दुर्दैवानें तसें झालें नाहीं आणि बिलाचा घातकपणा बहुतेक जसाचा तसाच कायम राहिला आहे. या बिलाविरुद्ध माझें भांडण दोन प्रकारचें आहे. एक सरकारशीं व दुसरें या बिलाशीं. या बिलामुळें सरकारच्या हातीं अप्रतिहत व निरंकुश सत्ता जाणार व गुन्हेगार ठरणारा मनुष्य चौकशीवांचून शिक्षा भोगणार. फौजदारी कायद्याप्रमाणें आरोपीला शिक्षा व्हावयाची तर प्रथम त्याच्यावर नोटीस

निघून त्याला आपलें म्हणणें पुढें मांडण्याची संधि मिळाली पाहिजे. पण या बिलांत पाहावें तों सर्वच विचित्र. कारण, पहिल्या प्रथमच हुकूम सुटावयाचा तो गव्हर्नर जनरलच्या नांवानें. आरोपीनें सुटण्याची आशा मनांत ठेवण्याला मध्यें कोणती पायरीच नाहीं. या नाटकाचा पहिला व शेवटचा अंक दोनहि एकच. तो झाला म्हणजे एकदम खेळ खलास. चौकशी तर राहोच. पण सर्व पुरावाहि गुलदस्तांत राहावयाचा; आणि आरोपी किंवा त्याचा वकील यांना आपला बचाव करण्याची संधीहि मिळावयाची नाहीं. गुन्ह्याचें कार्य-क्षेत्र व मर्यादाहि निश्चितपणें सांगितलेली नाहीं. त्यांत हवें तें यावें व हवा तो मनुष्य फासांत अडकवावा अशी स्थिति आहे!

कोणत्याहि देशाच्या कायद्यामध्यें हेतु, मतें किंवा विशिष्ट मनोवृत्ति हीं गुन्ह्याच्या सदराखालीं येतात असें मानलेलें नाहीं. माणसाचीं मतें किंवा हेतु वाटेल ते असोत. त्या मतानुसार त्याच्या हेतूंचें प्रत्यक्ष क्रियेमध्यें रूपांतर होईपर्यंत तो कायद्याच्या क्षेत्रांत उतरतच नाहीं. मोर्ले यांनीं आपल्या 'कॉम्प्रो-माइझ' या पुस्तकांत असें स्वच्छ म्हटलें आहे कीं, "बादशहांशीं राजनिष्ठेची शपथ घेऊन पार्लमेंटाच्या सभागृहांत बसणाऱ्या सभासदालाहि तात्त्विक रीतीनें राजसत्तेविरुद्ध आपले विचार असल्यास ते बोलून दाखविण्याला कोणताहि प्रत्यवाय नाहीं. त्यानें वाटल्यास खुशाल असें म्हणावें कीं, "इंग्लंडच्या कॉन्स्टिटयूशनमधून राजा नष्ट व्हावा व राजमुकुट मोडण्यासाठीं तो टांकसाळींत घालण्यांत यावा." असें म्हणणें बेकायदेशीर ठरून राजद्रोहा-खालीं मुळींच येत नाहीं. कारण हें नुसतें मत आहे व नुसत्या मताबद्दल कायद्यानें कोणाला काय म्हणून शिक्षा करावयाची? राजसत्तेविरुद्ध तो शस्त्र हातांत घेईल तर तो अलबत गुन्हेगार ठरेल. पण तोंपर्यंत कायद्याच्या सुरीला त्याला स्पर्शहि करतां येणार नाहीं.

या बिलाचे बाबतींत माझें सरकारशीं भांडण असें कीं, सरकारला आपल्या हातीं अधिक सत्ता मिळविण्याचा खरोखर नसता हव्यास उत्पन्न झाला आहे. संरक्षणाच्या नांवाखालीं कायद्याचें एक एक चिलखत सरकार आपल्या अंगावर चढवूं पाहत आहे. पण एका पौराणिक गोष्टींत सांगितल्याप्रमाणें सर्व अंगभर चिलखत चढवून अखेर एका वेड्या शिलेदारानें संरक्षणासाठीं आपल्या डोळ्यावरहि चिलखताचें अस्तर चढविलें, तशी हास्यास्पद स्थितीच या बाबतींत सरकारची होणार! डॉन क्विक्झोटची गोष्ट आपणास माहीत

आहेच. गरगर फिरणारी निर्जीव पवनचक्कीहि त्याला लढाईस आलेल्या प्रतिस्पर्ध्यासारखी वाटली व तिच्याशीं झुंज करून त्यानें आपले हातपाय मोडून घेतले. पौराणिक युगांतला तो वेडापीर व हें बिल आणणारें सरकार हीं सारख्याच दर्जाचीं नाहींत असें कोण म्हणेल? खुळ्या भ्रमिष्ट कल्पनांच्या नादीं लागून तुम्ही वाटेल ते कायदे पास करून घ्या. पण त्यांचा अखेर काडीचाहि उपयोग होणार नाहीं हें मी सरकारला बजावून सांगतों.

'कम्युनिझम'च्या रोगाची सरकारला इतकी भीति वाटत असेल तर त्यांनीं गंभीरपणानें विचार करून त्याची निदानमीमांसा केली पाहिजे. नुसत्या वरपांगी उपचारांनीं काय होणार? पिनल कोड अस्तित्वांत असतांना सरकारला हा नवा कायदा कां पाहिजे, याचें उत्तर अद्यापि कोणीहि दिलेलें नाहीं. 'रेग्युलेशन्स'च्या कायद्याप्रमाणें सरकारला अनिष्ट वाटणाऱ्या माणसाला वाटेल तितके दिवस डांबून ठेवतां येतें. शिवाय 'फॉरीनर्स ॲक्ट' सरकारच्या मदतीला आहेच. इतकी सगळी जय्यत तयारी असतांना या नव्या कायद्याची वास्तविक जरूरी काय? पिनल कोडाखालीं वाटेल त्या गुन्ह्याबद्दल माणसावर खटला भरून त्याला तुरुंगांत पाठवितां येतें; पण सरकारचें म्हणणें कीं, आम्हांला पिनल कोड कां नको तर या गुन्हेगारांना हिंदुस्थानच्या तुरुंगांत ठेवण्याला जागा नाहीं म्हणून! हिंदी तुरुंग अपुरे पडण्याला हे चळवळ्ये कम्युनिस्ट आहेत तरी किती? ते खरोखर मूठभर देखील नाहींत. आणि त्यांना म्हणे हिंदी तुरुंगांत ठेवण्याला जागा पुरत नाहीं, पण हा सर्व मानभावीपणा खेळ आहे. मी एक पाऊल पुढें जाऊन इतकेंहि म्हणतों कीं, हिंदी तुरुंगांत अद्यापि वाटेल तेवढी प्रशस्त जागा आहे. आणि कम्युनिस्ट लोकांचीच काय, पण सरकारी बाकांवर बसलेल्या कांहीं सभासदांच्यावर आम्हांला कायदेशीर रीतीनें खटला भरण्याचा अधिकार मिळेल तर त्यांचीही रवानगी त्याच तुरुंगांत करण्याइतके हिंदुस्थानचे तुरुंग मोठे आहेत!

हिंदुस्थानांत आपल्या मताचा प्रचार करण्याला जे 'कम्युनिस्ट' लोक येतात, ते चांगले शिकलेले, तज्ज्ञ व आनुभविक असेच येतात. इंग्लंडमधून जर हीं माणसें इकडे येतात तर त्यांचा वास्तविक प्रथम तेथेंच बंदोबस्त कां होऊं नये? पार्लमेंटची ही जबाबदारी हिंदी कायदेमंडळांनीं कां घ्यावी व पार्लमेंटनें तरी या लोकांच्या बंदोबस्ताचें काम हिंदी कायदेमंडळावर कां ढकलावें? पण सरकारला या बाबतींत पाहुण्याचे हातून परस्पर साप मारून

आपला कावा साधावयाचा आहे. साप मेला तर काम भागलें व पाहुणा मेला तर स्वतःला वाईटपणा न येतां परस्पर पीडा टळली ! पण सरकारचें हें शहाणपण कोणाच्या लक्षांत येणार नाहीं असें नाहीं.

या बिलाच्या कार्यक्षेत्रांत तीन प्रकारच्या गोष्टी येतात. ( १ ) सोव्हिएट सरकार. ( २ ) कम्युनिस्टांचीं मतें. ( ३ ) कम्युनिझमचा प्रचार करणारे चळवळये लोक. पहिले म्हणजे सोव्हिएट लोक. पण त्यांच्याशीं आमच्या सरकारचें युद्ध सुरू नाहीं. इतकेंच नव्हे तर त्यांच्याशीं शांततेचे स्नेहसंबंध असून व्यापाराचीं सर्व दळणवळणें त्यांच्याशीं चालू आहेत. कम्युनिझमच्या तात्त्विक मतासंबंधींहि हरकत घेण्याचें कारण नाहीं. कारण तें नुसतें एक मत किंवा फार झालें तर एक पंथ आहे. कोठलेंहि एखादें नवें मत निघालें कीं, त्याची थोडीबहुत चळवळ होतेच. पण त्यांत एवढें भिण्यासारखें काय ? राजकारण किंवा अर्थशास्त्र यांत अनेक नवीन मतें उदयाला आलीं, पण त्यामुळें जशी सृष्टीमध्यें कांहीं उलथापालथ झाली नाहीं, त्याचप्रमाणें कम्युनिझमच्या प्रचारानेंहि होणार नाहीं. फ्रेंच राज्यक्रांतिमध्यें तर स्वातंत्र्य, समता व विश्वबंधुत्व यांचें पीक पिकलें होतें. पण चळवळीची शक्ति संपून गेल्यानंतर घातपाताचें वातावरण नाहींसें झालें व त्या चळवळींतलें चांगलें तेवढें शिल्लक राहिलें. यामुळें फ्रान्समध्येंच काय, पण इतर देशांतहि लोकशाही प्रस्थापित झालेली आपण पाहतों. कम्युनिझमला इतकें भिण्याचें कारण नाहीं. सोशियालिझम व कम्युनिझम यांत फारसें अंतर नाहीं. इंग्लंडमध्यें सोशॅलिस्ट व कम्युनिस्ट इतके सरमिसळ झाले आहेत कीं, कम्युनिस्ट हा प्रयत्नानें हुडकूनच काढावा लागेल ! इंग्लंडला कम्युनिस्ट चालतात. पण सरकारचा बहाणा असा कीं त्यांना कम्युनिस्ट चालत नाहीत. तो इकडे आला तर, जणुं कांहीं आकाश कोसळून पडेल. पण श्री. अणे यांनीं म्हटल्याप्रमाणें, याची चिंता बाळगण्याचें कारण नाहीं. हा फक्त कालावधीचा प्रश्न होय. सरकारनें कांहींहि केलें तरी कम्युनिझमच्या चांगल्या तत्त्वाचा पुढेंमागें जय झाल्याखेरीज राहणार नाहीं.

जमीनदारांच्या हक्कांना कम्युनिझमनें धोका येईल, असा सरकारचा आक्षेप आहे. पण युरोपमध्यें व इतर देशांत तें कार्य भांडवलशाहीनें आधींच केलें आहे असें टॉनी यानें आपल्या पुस्तकांत सिद्ध केलें आहे. मोठे उद्योगधंदे सरकारच्या हातीं जावेत व राष्ट्रीय बनावेत, असेंहि कम्युनिस्टांचें मत आहे. पण त्यांत ऐवढें भिण्यासारखें काय आहे ? खासगी कंपन्यांच्या हातून

रेल्वे काढून घेऊन सरकारनें आपल्या ताब्यांत घेतल्या हेंच त्याला उत्तर आहे. रेल्वेच्या बाबतींत जें तुम्हीं केलें तेंच इतर उद्योगधंद्यांसंबंधानेंहि कम्युनिस्ट करा म्हणतात. वेगळें कांहीं म्हणत नाहींत. धर्म व राजशासनसंस्था या वेगळया असाव्यात असें कम्युनिस्टांचें मत आहे. पण धर्म व राजकारण हीं वेगळीं असावीं हें मत आतां इंग्लंडमध्यें मान्य झालेलें आहे, आणि चर्चचा व राजकारणाचा तेथें कांहीं संबंध राहिला नाहीं. हेंचसें काय, पण इतर सर्व मुद्दे सरकारनें केवळ ढोंगीपणानें पुढें मांडले आहेत. 'तुम्हाला संरक्षण देतों' असें सांगून हें बिल त्यांना पास करून घ्यावयाचें आहे. आम्ही जर या बाबतींत संरक्षण मागितलेंच नाहीं तर आमच्यावर तें लादण्याची तुम्हाला एवढी उत्सुकता कां ?

कम्युनिझमचें तत्त्व तरी असें आजच काय नव्यानें उदयाला आलें आहे ? कम्युनिझमच्या कल्पना फार पुरातन आहेत. प्लेटोचें रिपब्लिक, थॉमस मूरची युटोपिया, या ग्रंथांतूनहि त्यांचा निर्देश सांपडतो. इतक्या प्राचीन काळापासून बऱ्यावाईट लोकमताचे सर्व अनुभव या तत्त्वानें घेतले आहेत. आणि आज तागायत स्थिति अशी आहे कीं, कम्युनिझमच्या शुद्ध तत्त्वाबद्दल कोणाचा फारसा वाद राहिला नाहीं. कम्युनिस्ट लोकांसंबंधानें पूर्वी लोकांच्या विनाकरण राक्षसी कल्पना झाल्या होत्या. पण आतां दिशा निवळूं लागल्या आहेत. रशियन कम्युनिस्टांचें तर असें वर्णन सांपडतें कीं, त्यांच्यांत शिस्त, स्वाभिमान, आत्मसंयमन व स्वार्थत्याग हीं प्रमुखपणें दिसून येतात. लेनिनबद्दल तर मीं असें वाचलें आहे कीं, त्याचा दरमहा खर्च फक्त २२ पौंडांतच भागत असे. ही त्यांची वृत्ति पाहिली म्हणजे धार्मिक लोकांत जी एक स्वत्वनिवृत्ति आढळून येते, तशीच ती या लोकांतहि आहे असें कबूल करणें भाग पडतें. कम्युनिस्ट लोकांना धर्मबुद्धि नाहीं असें म्हणणें म्हणजे शुद्ध थोतांड आहे. समाजसेवा हा ते आपला धर्मच मानतात. आणि या धर्माचा त्यांच्यांत इतका जाज्वल्य अभिमान आढळतो कीं, ख्रिस्ती चर्चचे अनुयायी म्हणविणारे लोक खात्रीनें त्यांच्या पाठीमागें पडतील ! सर्व जगभर युद्धाचा धुमाकूळ यांना घालावयाचा आहे अशी कम्युनिस्टांची बदनामी करण्यांत येते. पण रशियावरच्या एका इंग्रजी ग्रंथाच्या आधारानें मी असें स्पष्ट म्हणतों कीं, रशियांतल्या सोव्हिएट लोकांना शांततेची जितकी इच्छा आहे तितकी दुसऱ्या कोणालाहि नसेल. हें युद्ध इतर राष्ट्रांनींच जबरदस्तीनें सोव्हिएट लोकांच्यावर लादलेलें

आहे. सर्व जगांतील पैसा व भांडवल यांवर कम्युनिस्टांचा रोख आहे असेंहि सांगण्यांत येतें, पण हा केवळ विपर्यास होय. कम्युनिस्टांचा रोख भांडवलावर नसून भांडवलशाहीवर आहे! व आधुनिक जगांतील भांडवलशाही ही अत्यंत अधार्मिक, अधोगतीला नेणारी व पापमय आहे असें प्रो. कीन्स यानेंच म्हटलें आहे. जगांत सर्व गोष्टी करण्याला पैसा लागतो, हें काय कम्युनिस्टांना कळत नाहीं? असें समजणें म्हणजे त्यांना मूर्खांतच काढण्यापैकीं आहे; पण लेनिन वगैरे त्यांचे शत्रू समजतात, इतके कांहीं मूर्ख नव्हत.

पण या सर्वांपेक्षांहि माझा मुख्य मुद्दा असा कीं, हें बिल हिंदु लोकांच्या आतिथ्यधर्माच्या कल्पनेच्या सर्वस्वीं विरुद्ध आहे. उदारबुद्धीनें प्रेरित होऊन हिंदुस्थानांतल्या लोकांना कांहीं नव्या व व्यापक कल्पना शिकवाव्या अशा सद्धेतूनें जे लोक इकडे येतात त्यांना आम्ही आमच्या देशांत काय म्हणून मज्जाव करावयाचा? नव्या गोष्टी जर कोणी शिकवीत असेल तर त्या आम्ही कां शिकूं नयेत? अशा लोकांचें आदरातिथ्य करणें हा प्रत्येक राष्ट्राचा हक्क आहे. खुद्द इंग्लंडमध्यें १९ व्या शतकांत अशी स्थिति होती कीं, वाटेल त्या देशचे चळवळ्ये लोक आश्रयाकरितां इंग्लंडांत जाऊन राहत व हें आश्रयदान इंग्लंडनें त्यांना कधीं नाकारिलें नाहीं. मॅझिनी, गॅरीबाल्डी, कार्ल मार्क्स, प्रिन्स क्रोपॉट्किन या सगळ्या बंडखोर लोकांना इंग्लंडनें उदार आश्रय दिला व त्यांचें आतिथ्य केलें. इंग्लंड राजसत्तावादी असतांनाहि समाजसत्तेचा व लोकसत्तेचा पुरस्कार करणाऱ्या या बंडखोर लोकांविरुद्ध त्यांनीं आपल्या घराचे दरवाजे कधींहि लावून घेतले नाहींत.

ही खुद्द इंग्लंड देशाची स्थिति. मग हिंदुस्थान देश हा अतिथिधर्माचें माहेरघर आहे. इंग्लंडमध्यें जी गोष्ट घडली नाहीं ती येथें आमच्या हातून परस्पर करूं इच्छितां काय? इंग्लंडमध्यें कम्युनिस्टांचे पुढारी सकलातवाला हे पार्लमेंटचे मेंबर राहूं शकतात. पण आमच्या सरकारला हिंदुस्थानांत कम्युनिस्ट औषधालाहि नको. संरक्षणाच्या नांवाखालीं हें बिल आमच्यावर लादण्यांत येत आहे. पण या लोकांपासून आम्हाला संरक्षण द्या अशी सरकारला कोणी कधीं मागणी केली होती? तुमचें संरक्षण हवें कोणाला? हिंदुस्थानांत वाटेल त्यानें यावें व वाटेल तीं आपलीं मतें सांगावीं. आम्हालाहि स्वतःची स्वतंत्रबुद्धि आहे. आम्ही वाटेल तें ऐकूं, वाटेल तें घेऊं व वाटेल तें सोडून देऊं. आमच्या हिता-हिताचा विचार करण्याचा चोंबडेपणा करण्याचें सरकारला कारण काय? सगळ्या

राष्ट्राच्या बुद्धीचे प्रतिनिधी येथें बसले आहेत, त्यांना आपल्या हिताहिताची येवढी साधी गोष्ट कळत नाहीं कीं काय ? पण सरकारचें खरें इंगित वेगळेंच आहे. साम्राज्य-वादित्वावर कुऱ्हाड पडते म्हणून कम्युनिझमची सरकारला नाकबंदी करावयाची आहे ! पण सरकारचीं हीं आंतडीं बाहेर काढून लोकपक्ष त्याच्यावर घाव घातल्यावांचून कधींहि राहणार नाहीं. केवळ एका अर्थानेंच आम्ही बादशहांशीं राजनिष्ठ आहोंत असें म्हणत असलों तरी, सरकारच्या साम्राज्यवादित्वाला आतां कोणीहि भर देणार नाहीं. साम्राज्याचे तुकडे होऊन साम्राज्य नष्ट व्हावें असेंच कोणीहि हिंदी सभासद आपलें मत देईल. साम्राज्यांतल्या इतर घटकांप्रमाणें हिंदुस्थानचा दर्जा स्वतंत्र व्हावा अशी आज हिंदुस्थानची मागणी असतांना सरकारच्या म्हणण्याला कोण मान तुकवणार ? सारांश, कोणत्याहि दृष्टीनें पाहिलें तरी हें बिल हाणून पाडणेंच आपलें कर्तव्य आहे.

---

## पब्लिक सेफ्टी बिल

## ( १९२९ )

या बिलावर मीं सिमल्यास भाषण केलेंच आहे; म्हणून आज फक्त वेगळे नवे मुद्दे तेवढेच मांडणार आहे. हें बिल पुढें आणलें यांत सरकारचा आग्रही स्वभाव व चढाईचें धोरण दिसून येतें. बिलावर सिमला येथें एकदां निर्णय दिल्यावर पुनः तेंच बिल सरकारनें पुढें कां आणावें ? बरें, आणलें तर आणलें पण त्यांत परदेशाहून येणारा पैसा कारण न दाखवितां मन मानेल तसा जप्त करावा असें एक कलम आणखी नवें घुसडलें. यांत उलट चढाईचें धोरण दिसत नाहीं काय ?

सिमल्याच्या बैठकीनंतर पुढें आजवर अशा कोणत्या नव्या गोष्टी घडल्या म्हणून हें बिल पुढें आणलें ? येऊन जाऊन सबब काय तर, मुंबई शहरांतील अस्वस्थतेची व दंग्याधोप्याची सांगितली; पण मि. केरर यांनीं मुंबई शहरांतील गुन्ह्यांची जी एक प्रकारची रोजनिशी वाचून दाखविली तशी एरवीं केव्हांहि वाचून दाखवितां येईल; कारण कोणत्याहि दिवसाचें वर्तमानपत्र हातीं घेतलें कीं, त्यांत गुन्ह्यांची बातमी अवश्य सांपडेल. मुंबई शहरांतील वातावरण आज क्षुब्ध आहे ही गोष्ट खरी. पण तें लवकरच निवळेल असा रंग

दिसतो. निदान सरकारनें या गोष्टीला जेव्हां प्रथम उपाय करावायला पाहिजे होता तेव्हां तो केला नाहीं ही चूक आहे. आग पेटत चाललेली दिसत असतां गप्प बसावयाचें, व मग भडका उडाल्यावर धावाधाव करीत सुटावयाचें !

हल्लींचे गव्हर्नर मुंबईस दाखल होतांच एक शिष्टमंडळ त्यांच्या भेटीला गेलें. त्याला उत्तर देतांना गव्हर्नर म्हणाले, " आज इतके महिने संप चालू असतां इतके थोडे दंगेधोपे झाले हेंच आश्चर्य होय." पण या आश्चर्यापेक्षां गव्हर्नरसाहेबांनीं काढलेल्या उद्गाराचेंच आश्चर्य मला अधिक वाटतें. साहेब उपरोधिक किंवा लावून बोलले म्हणावें तर ती रीत नाहीं. संप सात-आठ महिने चालू असतां, दंगे इतके कमी झाले, यावरून अलीकडे होणाऱ्या दंग्यांचें कारण संप नव्हे किंवा रशियन हेरांची कारवाई नव्हे हेंच सिद्ध होत नाहीं काय ? बरें, सरकार व पोलीस यांची शक्ति इतकी मोठी आहे कीं, आजवर त्यांनीं मुंबई शहरांतील याहून फार मोठे दंगे थांबविले आहेत. पोलिसांनीं मनावर घेतलें तर शेंकडो पठाणांना एका रात्रींत कैद करून त्यांचीं हत्यारें काढून घेण्याचा पराक्रम करून त्यांना दाखवितां येईल. तात्पर्य, वेळींच सरकार व पोलीस मनावर घेतील तर सर्व कांहीं होईल. पण याहून वेगळ्या कारणांनींहि संपासंबंधीं होणाऱ्या दंग्याधोप्यांवर अनुकूल परिणाम होणार आहे व होत आहे.

## लोकांना दंगे नकोत

केव्हांहि लोकसमाज हा अशा दंग्याधोप्यांच्या विरुद्ध असतो म्हणूनच दंगे इतके कमी होतात. गिरणी-कामगार घेतले तरी परळ, दादर, भायखळा या बाजूचे लहानसान व्यापारी व दुकानदार यांचें मतहि शांततेला उपकारक आहे. संपामुळें कामकऱ्यांची मजुरी बुडालीच, पण या लहानसान दुकादारांचेंहि फार नुकसान झालें. त्यांच्या जुन्या सगळ्या बाक्या बुडाल्या. चालू दुकानदारी बंद झाली व घाऊक व्यापाऱ्यांचें घेणें बुडाल्यामुळें किरकोळ व्यापाऱ्यांची पत नाहींशी होण्याचा रंग आला आहे. हे दुकानदार व मजूर यांचा रोजचा व जिव्हाळ्याचा संबंध असल्यामुळें हे दुकानदारहि मजुरांना दंग्यापासून परावृत्त करीत आहेत. याहून मोठ्या दृष्टीनें पाहिलें तरी, गिरणीवाले व कामगार यांच्यांत मजुरांकडून करून घेण्याच्या कामासंबंधानें तडजोड बहुतेक

पुरी होत आल्याचें दिसतें. तसेंच कामगारांच्या मजुरीचा जो दर गिरणीवाल्यांनीं तोडला त्यांतील थोडीशी तूट काढून टाकून बरीचशी फॉसेट कमिटीनें ठेविली तरी कामगार संमति देण्याला तयार झाले म्हणतात याचें कारण हेंच कीं, सामोपचारच मजूरवर्गालादेखील हितकारक वाटत असला पाहिजे.

आज जगांतील मोठमोठीं राष्ट्रें राष्ट्रसंघाच्या पंचायतीनें आपले तंटे तोडून घेण्याला तयार होत आहेत व आपखुषीनें सैन्य व आरमार कमी करूं म्हणत आहेत याचें तरी कारण काय? सामोपचारबुद्धीच. वास्तविक राष्ट्रांचे हितसंबंध, त्यांच्या महत्त्वाकांक्षा केवढया जबरदस्त! कोणाला राष्ट्ररक्षण करावयाचें तर कोणाला साम्राज्य वाढवून, संभाळून सगळया जगांतील पैसा घरांत घालावयाचा आहे! असें असतांहि त्यांना जर सामोपचार पटतो तर भांडण विकोपाला नेल्यानें ज्याची रोज उपासमार होऊन वरती जीवहि जाण्याची भीति तो कामगार सामोपचाराला विरोधी कां होईल? आतां इतके दिवस तंटा चालू राहिल्यामुळें व्यक्तिद्वेष पुष्कळसा उत्पन्न झाला. तो कांहीं काळ धुमसत राहणारच. त्यामुळें खून, मारामाऱ्या क्वचित होणारच. पण एरवीं तरी मुंबईच्या रस्त्यानें जाणाऱ्या कोणा नागरिकावर मवाली लोक केव्हां कसा हल्ला करतील याचा तरी नेम कोठें आहे? किंवा मुंबई शहराच्या आसपास उपनगरांत व एकेकट्या घरांतून राहणाऱ्या लोकांना तरी आपण सुरक्षित आहों असें कोठें वाटतें? सांगण्याचें तात्पर्य इतकेंच कीं, मुंबई शहरांतील या नैमित्तिक दंग्याधोप्याकडे खऱ्या मार्मिक दृष्टीनें पाहिलें पाहिजे; निदान त्यांचा व रशियन हेरांचा किंवा बोल्शेव्हिकांचा संबंध लावणें चुकीचें होईल.

या बिलाचा विचार करतां, पहिलीच गोष्ट ही दिसते कीं, ज्यांना तें लागू करावयाचें अशा व्यक्ति अगणित किंवा गुप्त नाहींत. त्या डोळयांपुढें दिसत आहेत. त्यांचीं नांवें उघड घेतलीं जात आहेत. हे लोक मुठीच्या भरतीइतके नाहींत, किंवा दोहो हातांच्या बोटांवर मोजण्याइतकेहि पुष्कळ नाहींत. येऊन जाऊन एकदां ब्रॅडलेचें नांव ऐकावयाचें व एकदां स्प्रॅट याचें नांव ऐकावयाचें! व या नांवांचा या क्रमानें कंटाळा आला तर नांवांची उलटापालट करून पुनः तींच नांवें घ्यावयाचीं! या दोन नांवांनीं सरकारला एवढी भीति वाटावी हें आश्चर्य नव्हे काय? फार थोड्या लोकांना हें बिल लागू होणारह

त्या बिलांतील कलमांवरूनच दिसतें. तें हिंदी ब्रिटिश प्रजाजनांना लागत नाहीं, हिंदी संस्थानी प्रजेला लागत नाहीं, परराष्ट्रीय प्रजाजनांना लागत नाहीं तर येऊनजाऊन ब्रिटिश आगंतुकांना लागतें. या आगंतुकांपैकींहि जे इकडे पुष्कळ दिवस येऊन राहिले आहेत, किंवा उद्योगधंद्याकरितां ठराविक मुदतीनें येऊन कामधंदा करून परत जातात, त्यांना हें बिल लागत नाहीं. इतकें सगळे लोक त्यांतून सुटल्यावर तें किती थोड्या लोकांकरितां आणण्यांत येत आहे हें उघड दिसतें. मग असल्या प्रचंड बिलाचा एवढा उपद्व्याप कां? इंग्रजींत एक म्हण अशी आहे कीं, "माशी चिरडण्याला इंद्राचें वज्र नको." या प्रसंगाला उचित म्हणून मी स्वतः एक नवी उपमा बनवून देतों. कैकाड-णीच्या डोक्यांतून उवा विंचरून काढावयाच्या तर त्याला हॅरो ट्रॅक्टर म्हणजे वाफेनें चालणारा लोखंडी फळाचा कुळव घालण्याचें कारण नाहीं.

स्प्रॅट व ब्रॅडले यांच्यांपैकीं स्प्रॅटवर मुंबई हायकोर्टांत खटला झाला होता. व पूर्वींचे मुंबई हायकोर्टाचे कायदेपंडित व हल्लींचे हायकोर्ट जज्ज फॉसेट यांनीं व ज्यूरीनें स्प्रॅट यांना दोषमुक्त करून सोडून दिलें. याचें कारण खटल्यांत सरकारला पुरावा देतां आला नाहीं; मग येऊन-जाऊन एका ब्रॅडलेकरितांच हें बिल मानावयाचें कीं काय? इतर नांवें सरकारजवळ असतील तर त्यांनीं तीं सांगावीं लोक खरींखोटीं ओळखतील. बरें, हिंदी कम्युनिस्ट चळवळ्यांकरितां हें बिल नाहीं हें त्या बिलावरूनच दिसतें. तात्पर्य, सरकारच्या उघड व लहानशा शिकारी कारितां म्हणावें, तर हें बिल प्रमाणाबाहेर मोठें आहे, व सरकारची शिकार याहून फार मोठी, पण मनांतून फार गुप्त असेल तर तिला हें बिल प्रमाणाबाहेर फार लहान आहे. म्हणून कोणत्याहि दृष्टीनें पाहिलें तरी तें निरुपयोगी ठरतें.

मग प्रश्न असा कीं, या शिकारीला योग्य असें खरें हत्यार कोणतें? मी सरकारला दोन तोडी सुचवितों. एक अशी कीं, या बिलाच्या नादीं न लागतां आपला स्वतंत्र अधिकार चालवून, गव्हर्नर जनरल यांनीं ऑर्डिनन्स काढावा. तो स्वतःप्रमाण असतो व सहा महिने अबाधित चालतो. या सहा महिन्यांत सरकारच्या नजरेंत व मनांत असणारे कित्येक गोरे कम्युनिस्ट किंवा रशियन हेर किंवा आगलाव्ये जितके असतील तितके सगळे पकडून गोळा करावेत व त्यांना जहाजांत घालून हद्दपार करावें म्हणजे काम झालें. पण मग प्रश्न असा कीं, हद्दपार केलेले हे किंवा इतर लोक फिरून हिंदुस्थानांत येणार नाहींत

कशावरून ? त्याला माझें उत्तर असें कीं, पासपोर्टाशिवाय इंग्लंडच्या किनाऱ्यावर मनुष्य जहाजांत बसूं शकत नाहीं ना ? तेव्हां पासपोर्टाचे नियम अधिक कडक किंवा संघटित करावेत, म्हणजे असला कोणी अनिष्ट इंग्रज मनुष्य इकडे येऊंच शकणार नाहीं. हॉर्निमनसाहेबाला केवळ या पासपोर्टाच्या नियमांनीं हिंदुस्थानांत येण्याचा प्रतिबंध झालाच कीं नाहीं ? आणि हे नियम सरकारला हवे तसे असते तर हॉर्निमन हे सिलोनहून मद्रास इलाख्यांत येत असतांना त्यांना प्रतिबंध करतां आला असता. तात्पर्य, बिलाला विरोध करणारे जे आम्ही लोक त्यांना हे दंगेधोपे आवडतात असें नाहीं किंवा बोल्शेव्हिझम मनांतून प्रिय असेंहि नाहीं. आमची तक्रार कीं, नसती जबाबदारी सरकार आमच्यावर टाकतें व सहकारिता मागतें.

## भांडवलवालेहि विरुद्ध

रशियन हेरांकडून झालें तरी पहिलें नुकसान हिंदी भांडवलवाल्यांचेंच होणार आहे. असें असतां तेहि एकजात बिलाला विरोध करतात याचा अर्थ सरकारनें समजूं नये काय ? दंगे मुंबई शहरांत आणि बिल लावणार तें सगळ्या हिंदुस्थानाला ! शिवाय तत्त्वाचा मुद्दा असा कीं, चौकशी केल्याशिवाय, पुरावा दिल्याशिवाय तोंड बांधून, डोळे झांकून मनुष्याला गुन्हेगार ठरवावयाचा आणि त्याला हद्दपारीची शिक्षा द्यावयाची, याला ही असेंब्ली संमति केव्हांहि देणार नाहीं. पूर्वीं हायकोर्ट जज्ज ज्या कामाला लावावयाचे होते तेथें सेशन जज्जाची योजना करण्यांत येणार आहे ! न जाणो, कदाचित् हायकोर्टानें न्यायदानांत सरकारसाठीं असलें घाणेरडें कृत्य करण्याचें साफ नाकारलें असेल. तसें असेल तर तें योग्यच झालें कारण एरवीं या बिलानें हायकोर्टावर पडणारी जबाबदारी किती तरी थोडी आहे. टेकडीवर खडा ठेवल्यानें तिला मोठेंसें ओझें होत नाहीं ! आज मुंबई हायकोर्टांत जुनें काम किती तुंबलें आहे तें पाहा. मुंबई हायकोर्टाचे हल्लींचे सर न्यायाधीश कामांत इतकी दिरंगाई करतात व किरकोळ कामांत नसतें लक्ष घालतात कीं, त्यामुळें कामाचा उरक न होऊन, शिलकी कामाचे ढीग सांचले आहेत. त्यांत असल्या बिलानें उत्पन्न होणारें काम कितीसें ?

दुसरा मुद्दा असा कीं, या बिलानें जे गुन्हे म्हणून सांगितले आहेत, त्यांतले कांहीं पिनल कोडाप्रमाणें गुन्हे ठरणारे आहेत. मग त्यांना नवा कायदा कां ? तर येऊनजाऊन कोर्टांतील चौकशी वांचविण्याकरितां ! दुसरे पक्षीं ज्या

कांहीं कृत्यांना गुन्ह्याचें स्वरूप देण्यांत येणार आहे त्यांना तें स्वरूप देणें योग्य नाहीं. कम्युनिस्ट तत्त्वांचा प्रसार करणें व मिळकतीसंबंधानें हल्लीं असलेल्या पद्धतींत फेरफार करावा असें म्हणणें हाच गुन्हा बिलानें ठरविला आहे. पण केवळ कोणताहि सिद्धांत किंवा मत अगर उपपत्ति किंवा तोंडी उपाययोजना ही कोणत्याहि देशांत गुन्हा होऊं शकत नाहीं. परदेशाहून येणारा पैसा जप्त करण्याचें कलम बिलांत आहे. पण हिंदुस्थानांतील देशी किंवा परदेशी पेढीवाले आपल्या कारभारांत सरकारी हात अशा रीतीनें घालूं देण्याला कबूल होतील असें वाटत नाहीं. त्यांचेहि कांहीं हक्क आहेत व त्यांचे हक्कांवर हें बिल घाला घालूं पाहत आहे. शिवाय या बिलांतील अरेरावीला आम्हीं आज ती केवळ ब्रिटिश लोकांना बाधक होईल म्हणून परस्पर खुशाल मान्यता दिली तर त्यांत धोका असा कीं, या अरेरावीचे परिणाम आणखीहि होतील. असल्या तत्त्वाला ब्रिटिश आगंतुकांकरितां आम्हीं संमति दिली तर उद्यां सरकार देशी चळवळ्या लोकांविरुद्ध असलेंच बिल आणणार नाहीं किंवा १८१८ च्या रेग्यु-लेशनांचा उपयोग त्यांविरुद्ध करणार नाहीं याचा काय नियम? किंबहुना ती गोष्ट हटकून होईल. होममेंबर म्हणाले कीं, असली गोष्ट करण्याचा आमचा विचार नाहीं. पण त्याबरोबर त्यांनीं 'तूर्त' हा साभिप्राय शब्द घातला तोहि लक्षांत ठेंवला पाहिजे. 'तूर्त' या शब्दाचा अर्थ हवा तितका आंखडतां येतो!

याहून अधिक व्यापक दृष्टीनें या बिलाकडे मी पाहत आहें. बोल्शेव्हिझम हिंदुस्थानांतील लोकांना प्रिय नाहीं हें मीं सांगितलें आहे. आणि त्याचें उदाहरण म्हणून हें सांगतों कीं, हिंदुस्थानांतील एकंदर सुजाण लोकांनीं ज्या नेहरू रिपोर्टाला संमति दिली आहे त्यांत खासगी मिळकतीच्या संस्थेला सरकारला कधींहि बाध आणतां येणार नाहीं अशी खातरजमा केली आहे व जामिनकी दिली आहे. हें जर खरें तर रशियन सोव्हिएटचीं तत्त्वें हिंदी लोकांना मान्य आहेत किंवा होतील हें तरी कसें म्हणावें? तात्पर्य, तात्त्विक मतें व सिद्धान्त यांची सरकार गळचेपी करूं पाहत आहे. पण अशी गळचेपी करणें न्याय्य नाहीं. जॉन मोर्ले यांनीं आपल्या एका पुस्तकांत म्हटलें आहे कीं, आज इंग्लंडांत राजा असला तरी, हें राजपद घटनेंतून काढून टाकावें व राजाचा मुकुट वितळून मोडून सोनें करावें व तिजोरींत भरावें असें जरी कोणी उघड म्हटलें तरी तो गुन्हा होत नाहीं. याचें

कारण हेंच कीं, अशा बाबतींत नुसत्या शब्दांनीं कोणाचीं हाडें मोडत नाहींत किंवा घातपात होत नाहींत; आणि प्रत्यक्ष घातपात होणें एवढाच फक्त गुन्हा मानला जातो.

हिंदुस्थानांत बोल्शेव्हिझमचा प्रसार सरकार बंद करूं पाहतें. पण खुद्द आपल्या इंग्लंडांत तरी ती गोष्ट त्यांनीं केली आहे काय? असलें वाङ्मय विलायतेंत खंडोगणतीनें वांटलें जातें. त्याचा एक लहानसा अंश फार तर हिंदुस्थानांत येत असेल. या बाबतींत खुद्द इंग्लंडांत काय कायदा आहे हें तरी होममेंबर यांनीं सांगावें. विलायतेंतील मजूर पक्ष घेतला तरी त्यांतील एका उपपक्षांत बोल्शेव्हिझमच्या मतप्रसार करणारे व त्याला मान्यता देणारे लोक आहेत त्यांचें कोणी काय केलें? आपल्या शरीराचा हा कुजका-सडका भाग म्हणून मजूर पक्षानें तो कापून टाकला आहे काय? फार काय पण सकलातवाल्यांसारखे पार्लमेंटांतील सभासद या मताचा प्रसार उघडपणें करीत नाहींत काय? व पार्लमेंटांत कांहींहि बोलणें हा कायदेशीर गुन्हा नाहीं एवढ्या-वरच ते थांबले नाहींत तर पार्लमेंटच्या बाहेरदेखील या मताचा प्रसार ते करतात; त्यांचें सरकारनें किंवा पार्लमेंटनें काय केलें आहे?

### मतप्रसारास मज्जाव नसावा

याचा खरा अर्थ हाच कीं, विलायतेंत कोणत्याहि मतप्रसाराला मज्जाव नाहीं. फक्त घातपाताच्या उपदेशाला आहे. कोणताहि विषय घेतला तरी त्यांत दोन बाजूला व दोनहि टोकांना जाणारीं मतें असणारच व ह्यांतील गुणदोष व ग्राह्याग्राह्यता सुजाण लोकांना आपोआपच कळते. म्हणून सर्व तऱ्हेच्या मतांना व सिद्धान्तांना विलायतेंतील कायदा समताबुद्धीनें वागवितो. ज्याला सोशॅलिस्ट हें नांव आहे अशा मताचा प्रसार विलायतेंत आज ५० वर्षें सुरू आहे; आणि थरावर थर रचले जाऊन या मतांची इमारत सुदृढ अशा पाया-वर तयार होत आहे. 'सोशल डेमॉक्रॅटिक पार्टी' हें नांव जिला देतात तिची ही इमारत होय, आणि तीहि अजून पुरी झाली असें कोणी मानीत नाहीं. या इमारतीकरितां आज हिंदुस्थानांत नुसता पाया खोदला जात आहे आणि तो भरण्याचें साहित्य हळूहळू जुळविलें जात आहे. भांडवलवाल्यांचा जर सर्वत्र अनिरुद्ध संचार आहे, तर मग समाजसत्तेच्या सिद्धांतांना हिंदुस्थानांतच बहिष्कार कां? विलायतेंतदेखील या नव्या मताची इतकी प्रगति झाली

असतांहि प्रत्यक्ष त्यापासून घातपात किंवा राज्यक्रांति झालेली नाहीं किंवा होण्याची भीति वाटत नाहीं.

होममेंबर यांनीं गुन्ह्यांची यादी वाचून दाखविली. तसली यादी एरवीं रोज आपण वाचतोंच. याचा अर्थ गुन्हेगारीचे कांहीं अंश मनुष्यस्वभावांतच असतात. पण ती गुन्हेगारी वेगळी व सुसंघटित राज्यक्रांति वेगळी. विलायतेंत संप हा व्यक्तिशः कायदेशीर मानला जातो अर्थात् हें प्रमाण वाढवून सगळ्या उद्योगधंद्यांत जर संप एकदम झाला तर त्याचा परिणाम जवळ जवळ राज्यक्रांतीसारखाच होईल; पण त्यालाहि स्वाभाविक मर्यादा आहेत. १९१९ चा मोठा संप विलायतेंत कसा निष्फळ ठरला हें मीं स्वतः डोळ्यांनीं पाहिलें आहे. त्यानंतर १९२६ सालीं त्याहून मोठा संप करण्याचा विचार मजूर पक्षानें केला व तो पूर्ण सिद्धीस जाता तर खचित राज्यक्रांतीच होती. पण स्वतः मजूर पक्षांतील सुजाण लोकांना ती गोष्ट पटली नाहीं. शिवाय सर जॉन सायमन यांनीं या भांडणांत न्यायकोर्टाचा निकाल, एक नमुन्याचा खटला ( टेस्ट केस ) करवून पाहण्याचा सल्ला दिला व कोर्टानें प्रतिकूल निकाल दिला त्याबरोबर या प्रचंड संपाची इमारत सगळीच्या सगळी ढासळली.

सामुदायिक संपामुळें होणारी राज्यक्रांति कल्पनेला दिसत असली तरी ती प्रत्यक्ष अनुभवाला येऊं शकणारी नसते. हयूबर्ट ब्लँड, बर्नार्ड शॉ यांसारख्या समाजशास्त्रवेत्त्यांनीं जीं मतें प्रकट केलीं आहेत व अनुभव दिले आहेत त्यांवरून पाहतां, विलायतेंत असल्या मतामुळें राज्यक्रांति होईल असें कोणी म्हणत नाहीं. पुष्कळ वर्षांपूर्वी जॉन बर्न्ससारखे पुढारी नवीन मतें बोलूं लागले तेव्हां घातपाताच्या व राज्यक्रांतीच्या भीतीनें विलायतेंतील पोलीस आपल्या सावलीलाहि भिऊं लागले होते! पण त्याबरोबर ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं, जॉन बर्न्स हा कांहीं फ्रेंच राज्यक्रांतीसारखी राज्यक्रांति घडवून आणीत नव्हता! व घातपाताच्या व दंडेलीच्या गोष्टी कोणी बोललेच तर एकट्या मजूर पक्षांतलेच जहाल लोक बोलत होते असें नाहीं तर जमीनदार, अमीर-उमराव असले लोकहि उघडपणें दंडेलीच्या गोष्टी बोलत होते. पण दंडेलीचें बोलणें म्हणजे कांहीं प्रत्यक्ष दंडेली नव्हे. जी गोष्ट विलायतेंत घडली व घडत आहे, तीच हिंदुस्थानलाहि लागू आहे.

होममेंबर यानीं नव्या तरुण-संघाच्या चळवळीवर हल्ला केला पण ही तरुण-संघाची चळवळ सर्व देशांत झालेली आहे. तरुण लोक हे किंचित् स्थूल विचार करणारे व बोलतांना किंचित् जहालपणानें बोलणारे असतात. पण तेवढ्यावरून ते घातपात करण्याला सिद्ध असतात असें कोणी म्हणत नाहीं. तरुणसंघाच्या चळवळीची भीति न मानतां उलट परवां मुंजे, जयकर यांनीं म्हटल्याप्रमाणें सरकारनें त्यांना शारीरिक शिक्षण देऊन, कवाईत शिकवून हत्यारांची ओळख करून देऊन त्यांस तेजस्वी बनविलें पाहिजे. त्यांत सरकाराचाच फायदा आहे. असल्या खोट्या भीतीनें तरुणांच्या चळवळीची पछेहाट कोणत्याहि सरकारनें केलेली नाहीं. ही चळवळ कायदेशीर आहे. ती आतां पुढें आली आहे, टिकणारी आहे व भविष्यकाळीं फलप्रद होणारी आहे. तिचा देशांत रुतलेला पाय काढून टाकण्याचा कोणालाहि अधिकार नाहीं व ती जा म्हणून जाणारीहि नाहीं. कारण एका तरुण पिढीमागें दुसरी तरुण पिढी पायावर पाय ठेवून पुढें येणारी आहे. तरुणसंघाच्या चळवळींत मतस्वातंत्र्य ही गोष्ट प्रमुख दिसते, पण ती राजकारणाप्रमाणें सामाजिक सुधारणा व धर्मसंस्कार यांच्या बाबतींत दिसून येते. कारण कायदा व धर्मशास्त्र यांचें प्रामाण्य किती मानावें याची योग्य मर्यादा प्रत्येक पिढींतील लोक ओळखीत व ठरवीत असतात.

बर्नार्ड शॉ यांनीं आपला म्हणून अनुभव देतांना म्हटलें आहे कीं, "मी तरुण होतों, तेव्हां आमच्या पिढीला वाटत होतें कीं, आम्ही राज्यक्रांति करूं. मला कोणी विचारलें कीं, तुमच्या मताप्रमाणें गोष्टी घडल्या तर ही क्रांति किती दिवसांत कराल? मी उत्तर दिलें १५ दिवसांत! १८८९ सालीं देशांत राज्यक्रांति होऊन १७८९ च्या फ्रेंच राज्यक्रांतीचा शतसांवत्सरिक उत्सव प्रत्यक्ष होणार अशी कल्पना कांहीं लोकांप्रमाणें मला होती, व मी तर त्यांतल्या त्यांत नेमस्त मताचा तरुण म्हणून प्रसिद्ध होतों." याचें तात्पर्य इतकेंच कीं राज्यक्रांति ही गोष्ट सोपी नाहीं; आणि बोलतांना हें तरुणांच्या लक्षांत नसलें तरी अनुभवानें त्यांना तें आपोआप समजतें. हा बोध आपण हिंदुस्थानसंबंधानेंहि लक्षांत ठेवून तरुणसंघाच्या चळवळीला सहानुभूतीनेंच वागविलें पाहिजे.

शेवटीं एकच मुद्दा सांगावयाचा तो असा कीं, सरकारतर्फे मि. कॉसग्रेव्ह आम्हाला म्हणाले कीं, 'या बिलाला विरोध करणारे तुम्ही लोक बेजबाबदार आहां.' पण मी म्हणतों, बोलूनचालून सर्व सत्ता जबाबदारीच्या नांवाखालीं

तुम्हीं लोकांनीं आपल्या हातीं राखून ठेवली आहे. तिचा अंशहि तुम्ही आम्हांला देत नाहीं. हा तुमचा मक्ता नाहींसा होईल व राष्ट्राचा कारभार चालविण्याचें काम तुम्ही आमच्या हातीं प्रत्यक्ष द्याल तेव्हां तुमच्यासारखे आम्ही आपलें कार्यकारी प्रधानमंडळ बनवूं शकूं. तुम्हांला तुमच्या पदावरून ओढून आम्हांला त्या पदावर आरूढ होण्याची संधि मिळेल, तेव्हां आम्ही आपली जबाबदारी ओळखूंच ओळखूं. आमच्या असेंब्लीला जोंपर्यंत तुम्ही अशा बेजबाबदार स्थितींत ठेवणार तोंपर्यंत आम्हीहि बेजबाबदार राहणारच ! आम्ही आज लोकांना जबाबदार आहों, तुम्हांला नाहीं."

---

# हिंदुस्थानांतील मिठाचा पुरवठा

(१९२९)

"मीठ या सदराखालीं केलेल्या मागणींमध्यें १०० रुपये कमी करावेत अशी माझा सूचना आहे. मिठाच्या पुरवठ्याचे बाबतींत हिंदुस्थानाला स्वयंपूर्ण करण्याबद्दलचा प्रश्न उपस्थित करण्यासाठीं मीं ही सूचना आणली आहे. मिठाच्या पुरवठ्याचे बाबतींत हिंदुस्थानास स्वावलंबी करतां येणें शक्य आहे काय एवढ्याच गोष्टीचा मी विचार करणार आहें. मिठाच्या पुरवठ्याचा विचार करतांना मिठावरील कराचाहि विचार करावा लागेल. कारण हिंदुस्थाननें मिठाचे बाबतींत स्वावलंबी व्हावयाचें तर मिठाचें उत्पन्न अधिक होणार व खपहि वाढणार ही गोष्ट ओघानेंच येते. आणि त्या योगें मिठावरील कराची एकंदर रक्कम वाढेल. त्याचप्रमाणें हिंदुस्थानांत बाहेरून येणाऱ्या मिठावर आयात जकात बसवण्याचा प्रश्न येईल व त्या योगेंहि उत्पन्न वाढेल. या दृष्टीनें या दोनहि गोष्टींचा विचार करणें प्रस्तुत ठरेल.

### कर किती असावा ?

मिठाच्या करासंबंधानें दोन प्रकारचीं मतें आहेत. एक मत असें कीं, हा कर अजीबात रद्द करावा. दुसरीकडे मिठावरील कर अडीच रुपयेपर्यंत नेण्यास व त्याचें समर्थन करण्यास सरकारची तयारी आहे. माझें मत या दोन्ही टोकांच्यामध्यें आहे. दरमणीं आठ आणे याप्रमाणें कर ठेवल्यास तो वावगा होणार नाहीं. मीठ ही अगदीं गरिबांतल्या गरिबाची जीवनावश्यक

वस्तु आहे व कांहीं धंद्यांत व शेतीच्या कामांतहि मिठाचा उपयोग होतो. यासाठीं मिठावर कर बसवूं नये असें कर-कमिटीचें म्हणणें आहे. उलट सर जोशिया स्टँप असें म्हणतात कीं, मिठावरील कर कमी केल्यानें गरिबांच्या उत्पन्नांत विशेषशी भर पडणार नाहीं, यासाठीं मिठावरील कर कायम ठेवावा. माझें म्हणणें असें कीं, मिठावर कर असावा, पण तो इतका कमी असावा कीं, त्याचा बोजा रयतेस जड वाटूं नये. पण या कराचें उत्पन्न ज्या गरीब लोकांकडून तें वसूल केलें जातें त्यांच्याकरितां तें खर्च करावें.

आतां मिठाचे बाबतींत हिंदुस्थान स्वावलंबी व स्वयंपूर्ण करावयाचें म्हटलें तर पुढील प्रश्न उत्पन्न होतात--(१) हिंदुस्थानांच्या सर्व प्रकारच्या गरजा भागविण्यापुरतें मीठ आज हिंदुस्थानास मिळतें काय? (२) यापैकीं कांहीं भाग परदेशांतून कां यावा? (३) बाहेरून येणारें हें मीठ बंद करणें अशक्य व अन्याय्य होईल काय? (४) हें मीठ बंद करावयाचें योग्य साधन कोणतें? (५) हें मीठ बंद केलें तर हिंदुस्थानांत उत्पन्न करतां येईल काय? व तें कोणत्या मार्गानें? आणि (६) शेवटचा प्रश्न असा कीं, सरकारनें आजपर्यंत या बाबतींत योग्य उपाययोजना केली आहे काय?

## दर माणशीं किती मीठ लागतें ?

हे प्रश्न आतां एकामागून एक विचारार्थ घेतों. हिंदुस्थानांतील तुरुंगांत देखील दरमाणशीं दरसाल १४ ते १५ पौंड मीठ देण्यांत यावें ही गोष्ट सरकारनें देखील मान्य केली आहे. प्रांतोप्रांतीं मिठाचें दरमाणशीं प्रमाण वेगवेगळें आहे. बंगाल, मद्रास, बिहार व ओरिसा या भागांतील लोक भात खाणारे असल्यामुळें दरमाणशीं मिठाचें प्रमाण १७॥ पौंडांपर्यंत जातें. आसाममध्यें तें १४ पौंड आहे. बाकीच्या प्रांतांत हें प्रमाण ११ आहे. कारण ते प्रांत सर्वस्वीं तांदुळांवर उपजीविका करणारे नाहींत. हे सर्व आंकडे एकत्र केले तर दर-साल दरमाणशीं कमींत कमी १५ पौंड मीठ जरूर आहे असें दिसून येईल. त्यांतच धंदे व शेती यांना लागणारें मीठ धरावयाचें झाल्यास दरमाणशीं १६ पौंड असें प्रमाण धरणें योग्य ठरेल. या हिशेबानें तीस कोटी लोकांना ६ कोटी मण मीठ दरसाल पाहिजे. हल्लीं हिंदुस्थानांत फक्त पांच कोटी अठ्ठावीस लक्ष मण मीठ खपतें. म्हणजे सुमारें ७२ लक्ष मण मीठ कमी पडतें. शिवाय बाहेरून १६५ लक्ष मण मीठ हिंदुस्थानांत येतें तेंहि बंद करून हिंदुस्थान

मिठाचे बाबतींत स्वयंपूर्ण करावयाचें तर हिंदुस्थानांत आजच्यापेक्षां दरसाल २३७ लक्ष मण मीठ अधिक उत्पन्न केलें पाहिजे.

हिंदुस्थानाकरितां दरमाणशीं १६ पौंड मीठ पाहिजे असा अंदाज मीं धरला आहे. इतर देशांशीं तुलना करतां हा अंदाज फार नाहीं असें दिसून येईल. इतर देशांचें दरमाणशीं दरसाल मिठाच्या खपाचें प्रमाण पुढीलप्रमाणें आहे.—इंग्लंड ४० पौंड, पोर्तुगाल ३५ पौंड, इटाली २० पौंड, फ्रान्स १८, रशिया १८, बेल्जम १६$\frac{1}{2}$, ऑस्ट्रेलिया १६, स्पेन १२, प्रशिया १४, ब्रिटिश हिंदुस्थान १० ते १२ पौंड, हॉलंड ११$\frac{1}{2}$, स्वीडननॉर्वे ९$\frac{1}{2}$, स्वित्झर्लंड ८$\frac{1}{2}$. यांपैकीं कांहीं देश उद्योगधंद्याचे दृष्टीनें पुढारलेले आहेत. यामुळें त्या कामासाठीं त्यांना बरेंचसें मीठ लागत असावें. हिंदुस्थान हा शेतकीचा देश आहे; आणि शेतकीसाठीं जीं जनावरें लागतात त्यांनाहि मीठ लागतें. खतासाठीं व वैद्यकीय कामासाठींहि मिठाची जरूरी लागते. या गोष्टी लक्षांत घेतां हिंदुस्थानास दरमाणशीं १६ पौंड इतकें मीठ पाहिजे. अर्थात् आजचा मिठाचा एकंदर पुरवठा जरूरीपेक्षां कमी आहे असें दिसून येईल.

### परदेशी मीठ कशाला ?

यानंतरचा प्रश्न असा कीं, यापैकीं कांहीं मीठ तरी आपल्याला परदेशांतून आणण्याची जरूरी तरी कां पडावी ? मिठाच्या पैदासीसाठीं आवश्यक लागणाऱ्या गोष्टी हिंदुस्थानांत मुबलक नाहींत काय ? हिंदुस्थानचा समुद्रकिनारा विस्तृत आहे. त्याचप्रमाणें समुद्राचें पाण्याची वाफ होण्यास लागणारा उन्हाळाहि हिंदुस्थानांत आहे. मजुरीचे दर कमी आहेत व मजूर मुबलक मिळण्यासारखे आहेत आणि मीठ तयार करण्याची माहिती वंशपरंपरेनें असणारे लोकहि पुष्कळ आहेत. हिंदुस्थानांत पूर्वीं बाहेरचें मीठ येत नव्हतें व हिंदुस्थान आपल्या गरजा भागवीत होतें. आतां शिक्षणानें व तज्ज्ञांच्या सल्ल्यानें जुन्या मीठ उत्पन्न करण्याच्या पद्धतींत नवीन सुधारणाहि होऊं शकतील. ज्याप्रमाणें शेतकऱ्यांना शास्त्रीय व नव्या पद्धतीनें शेती करण्यास शिकवावेंसें सरकारला वाटतें, त्याप्रमाणेंच सरकारनें मनांत आणल्यास मीठ तयार करणारांना नवीन पद्धतींची माहिती करून देतां येईल. शिवाय या धंद्याला भांडवल असें फारसें लागत नाहीं व जें लागतें तें हिंदुस्थानांत मिळेल. मग हिंदुस्थाननें परदेशांतून मीठ कां आणावें ? परदेशी मीठ मुख्यतः बंगाल व ब्रह्मदेश या प्रांतांत येतें. चांगल्या प्रकारचें मीठ या

देशांत तयार करतां येणें शक्य आहे हें सरकारनेंच कबूल केलेलें आहे. असेंब्लीमध्यें १९२५ सालीं सरकारतर्फे मि. लॉइड यांनीं म्हटलें होतें कीं, "बंगालमध्यें उपयोगांत येणाऱ्या दर्जाचें मीठ मद्रासमध्यें तयार करतां येणें शक्य आहे. अडचण आहे ती फक्त वाहतुकीच्या दराची आहे." सरकारनें मनांत आणलें तर बंगालला लागणारें मीठ हिंदुस्थानांतच तयार करतां येईल.

परदेशांतून येणारें बहुतेक म्हणजे ५ लाख टन मीठ बंगाल्यांत खपतें. याची किंमत १७४ लक्ष भरते. यापैकीं सुमारें अडीच लक्ष टन मीठ इंग्लंडांतून येतें. बाकीचें इतर देशांतून येतें. हिंदुस्थानांत या प्रकारचें मीठ तयार होत नाहीं म्हणून इतका पैसा परदेशीं जातो.

चांगल्या तऱ्हेचें मीठ तयार करण्याच्या बाबतींत मी माझा अनुभव सांगतों. कांहीं दिवसांपूर्वीं मीठ तयार करण्याच्या एका जागीं मी गेलों असतां मीठ तयार झालेलें पाहिलें. त्यांतलें वरचें मीठ चांगलें पांढरें होतें, पण तें काढणाऱ्या इसमानें खोल खणून खालची थोडीशी मातीहि त्यांत मिसळून तें काळें केलें. असें करण्याचें कारण त्यास विचारलें असतां त्यानें असें सांगितलें कीं, "लोक वेडे आहेत. मीठ काळें असलें म्हणजे तें अधिक खारट असतें अशी त्यांची समजूत आहे. आम्ही नुसतें वरचें चांगलें मीठ काढलें तर तें कमी खारट असें मानण्यांत येतें." मुंबईस तयार होणारें मीठ काळें असतें, पण तें पांढरें करतां येईल असें मला वाटतें.

## सरकारनें मुद्दाम चटक लावली

मग प्रश्न असा येतो कीं, बंगाल व ब्रह्मदेश यांत बाहेरचें इतकें मीठ कां यावें? सरकार सांगतें कीं, तेथील लोकांना एका विशिष्ट प्रकारचें मीठ आवडतें याला आम्ही काय करावें? पण ही त्यांची आवड स्वाभाविक होती, का कृत्रिम रीतीनें ती उत्पन्न करण्यांत आली हा प्रश्न विचारणीय आहे. मिठाच्या धंद्याच्या इतिहासांत बरींच स्थित्यंतरें झालीं आहेत. एके काळीं मीठ तयार करण्याचा मक्ता सर्वस्वीं सरकारकडे होता पण पुढें सरकारनें तो सोडला. म्हणजे सरकारला लहर लागेल त्या-प्रमाणें या धंद्याच्या बाबतींत सरकारनें वर्तन केलें आहे. ब्रिटिश धंद्याच्या हितासाठीं मुद्दाम ब्रह्मदेश व बंगाल यांच्यावर पांढरें स्वच्छ मीठ लादण्यांत आलें. ५० वर्षेंपर्यंत त्यांना अपरिहार्यतेनें हेंच मीठ घेण्यास लावून मग

सरकार म्हणतें कीं, "या लोकांना या मिठाची आवडच आहे. मग त्याला तुम्ही बंदी कशी करूं शकाल?" पण या बाबतींत सरकार आपलें कर्तव्य करीत नाहीं. सरकारचें पहिलें कर्तव्य हेंच कीं, बंगाली लोकांच्या चवीला न जुमानतां परदेशी मिठाची आयात बंद करणें व दुसरें कर्तव्य हें कीं, बंगाल व ब्रह्मदेश यांस लागणारें शुद्ध मीठ तयार व्हावें म्हणून येथील मीठ तयार करण्याची पद्धत सुधारणें.

परदेशी मीठ बंद करण्यासाठीं परदेशी मिठावर जकात बसवावयास पाहिजे. अशी जकात बसल्यावर परदेशी मीठ महाग होईल व बंगाली लोकांना आपली चटक सोडावी लागेल. ईस्ट इंडिया कंपनीनें पूर्वी अशी जकात बसविली होती. मुंबईत तयार होणाऱ्या मिठावर दरमणीं १२ आणे जकात तर परदेशाहून येणाऱ्या मिठावर त्या वेळीं दरमणीं पांच-सहा रुपये जकात होती. पण पुढें 'फ्री ट्रेड'च्या नांवावर ती कमी करण्यांत आली. या 'फ्री ट्रेड'च्या तत्त्वानेंच हिंदुस्थानांतील धंदे बुडविले. या गोष्टीचा परदेशी व्यापाऱ्यांनीं फायदा घेतला. ब्रिटिश व्यापाऱ्यांचीं स्वतःचीं मुबलक जहाजें असल्यामुळें त्यांना थोडक्या खर्चांत हिंदुस्थानांत मीठ पाठवितां आलें. अशा कृत्रिम रीतीनें कांहीं प्रांतांत परकीय मिठाची आवड मुद्दाम उत्पन्न करण्यांत आली.

ईस्ट इंडिया कंपनीनें आपल्या स्वतःच्या मिठाच्या कारखान्यांसाठीं जी गोष्ट केली तीच आतां हिंदी कारखान्यांसाठीं सरकारनें करावयास पाहिजे. यासाठीं परदेशी मिठावर जबर जकात बसवून देशी मीठ अधिक चांगलें होईल अशी तजवीज केली पाहिजे. निरनिराळ्या प्रांतांतील मिठाच्या कारखान्यांची सुधारणाहि केली पाहिजे.

१९२५ सालीं असेंब्लीमध्यें सर शिवस्वामी अय्यर यांनीं चांगल्या प्रकारें मीठ तयार व्हावें यासंबंधानें संशोधन करण्याबद्दल सूचना केली होती. सरकारानें असें संशोधन केलें आहे काय? असें संशोधन करून मीठ तयार करणारांना सरकार योग्य मार्ग दाखवील व त्यांच्या अडचणी दूर करील तर हिंदुस्थानांत चांगल्या तऱ्हेचें मीठ सहज तयार होईल. त्याचप्रमाणें देशाच्या एका भागांतून दुसऱ्या भागांत रेल्वेनें मीठ नेण्याचे दर सरकारनें कमी केले पाहिजेत. १९२५ सालीं असेंब्लीमध्यें याच

विषयावर वादविवाद झाला त्या वेळीं कांहीं युरोपियनांनींच सरकारनें मुद्दाम मिठाच्या धंदा बुडविला असे उद्‌गार काढले. महायुद्धाचे वेळीं ब्रह्मदेशांत परदेशचें मीठ येणें बंद झाल्यावर सरकारनें स्थानिक मिठाच्या कारखान्यांना उत्तेजन दिलें. त्यामुळें १९१७ सालीं ब्रह्मदेशांत ४० ते ५० हजार टन मीठ तयार झालें. पण तह झाल्याबरोबर सरकारानें हें उत्तेजन देण्याचें सोडून दिलें व ब्रह्मदेशांतील मिठाचा धंदा बुडून तेथें पुन: परदेशांतील मीठ येऊं लागलें. मद्रासकडून बंगालकडे कोळसे आणण्यासाठीं बहुतेक रिकाम्या मालगाड्या जात असतात. त्यांतून अगदीं कमी दर आकारून बंगालकडे मीठ नेणें शक्य आहे. हल्लीं कांहीं एक ठराविक टनांच्या वर माल नेणाऱ्या जहाजांतूनच मीठ नेण्याची परवानगी आहे. लहान लहान जहाजांतून मीठ नेण्यास परवानगी दिली तर चोरून माल नेण्यांत येईल अशी सरकारची तक्रार आहे. पण असा चोरून माल नेण्यांत फारसा फायदा नसल्यामुळें सरकारची ही भीति निरर्थक आहे.

१९२५ सालीं या विषयासंबंधीं वाद झाला तेव्हां करकमिटीचा रिपोर्ट बाहेर पडला नव्हता. त्या वेळीं सरकारतर्फे नेहमींप्रमाणें ‘सर्व सूचनांचा काळजीपूर्वक विचार करण्यांत येईल’ असें सांगण्यांत आलें. पुढें करकमिटीचा रिपोर्ट झाला त्यांत सरकारनें उराशीं बाळगलेल्या तत्त्वांच्या अगदीं उलट सूचना कमिटीनें केल्या. १८३५ ते १८६३ पर्यंत क्रमशः बंगाल्यांतील मिठाचा धंदा बुडून परदेशी मिठाची आयात कशी वाढत गेली हें करकमिटीनें दाखविलें आहे. १९२६ सालीं असेंब्लीमध्यें मिठाच्या धंद्याच्या बाबतींत सरकारनें काय केलें असा प्रश्न विचारतांच सर बेसिल ब्लॅकेट यांनीं करकमिटीच्या रिपोर्टाचें पुस्तक पुढें केलें. पण नुसता रिपोर्ट पुढें करून काय उपयोग? सरकारनें स्वतः कमिटी नेमली तर तिच्या सूचना सरकारनें अमलांत आणणें जरूर आहे; पण आपल्या उराशीं बाळगलेल्या कल्पनांच्या विरुद्ध रिपोर्ट झाला म्हणजे सरकार तो बाजूला सारतें व त्यासाठीं स्पेशल ऑफिसरची नेमणूक करण्यांत येते. पुढें त्या ‘स्पेशल ऑफिसरां’नींहि सरकारच्या मनाजोगता रिपोर्ट केला नाहीं तर त्या अडचणींतून दुसरा कांहीं तरी मार्ग काढण्यांत येतो.

या बाबतींत स्पेशल ऑफिसर नेमण्यांत आला. पण कोणकोणत्या व्यापारी संस्थांना व व्यक्तींना या ऑफिसरानें सल्ल्यासाठीं बोलावलें हें जाहीर झालें

नाहीं व त्यानें गुप्तपणें रेव्हिन्यू बोर्डाकडे जो रिपोर्ट केला तोहि बाहेर आला नाहीं. अशा रीतीनें कर-कमिटीवरील अनुभवी तज्ज्ञांच्या सूचनांना हरताळ फासण्यांत आला. यानंतर १९२७ सालीं सेंट्रल रेव्हिन्यू बोर्डानें या स्पेशल अधिकाऱ्याच्या टांचणाचे आधारें एक रिपोर्ट लिहिला व त्यावर त्या वेळीं असेंब्लीमध्यें थोडासा वादहि झाला. सरकारनें त्या रिपोर्टावर १९२८ सालीं आपला ठराव प्रसिद्ध केला व परदेशचें मीठ व देशांतील मीठ यांना सारख्याच सवलती देण्यांत आल्या. पण या बाबतींत असली समता मला मान्य नाहीं. स्वदेशांत तयार होणाऱ्या मालाला विशेष उत्तेजन दिलें पाहिजे.

या बाबतींत सेंट्रल रेव्हेन्यू बोर्डानें एकामागून एक सबबी कशा सांगितल्या आहेत त्या पाहा. एखाद्या ठिकाणीं मिठाच्या धंद्याला उत्तेजन देण्याबद्दल मागणी केली कीं, तेथें मीठ तयार करतां येणार नाहीं असें म्हणावयाचें. तें तयार करतां येईल असें दाखवून दिलें कीं, विशिष्ट प्रकारचें मीठ होणार नाहीं अशी सबब सांगावयाची. विशिष्ट प्रकारचें मीठ तयार होऊं शकेल असें सिद्ध केलें तर पुरेसे मजूर मिळणार नाहींत असें म्हणावयाचें. मजूर मिळतील असें दाखवून दिलें तर निष्णात मजूर मिळणार नाहींत अशी अडचण दाखवावयाची व शेवटीं निष्णात मजूर मिळतील हेंहि सिद्ध केलें तर शेतीकडील मजूर कमी होऊन शेतीचें नुकसान होईल अशी तक्रार पुढें करावयाची ! पण शेती व मिठाचा धंदा या दोहोंनाहि पुरतील इतके मजूर या देशांत मिळण्यासारखे आहेत.

मिठाच्या धंद्याला संरक्षण देण्याविरुद्ध सेंट्रल रेव्हेन्यू बोर्डानें अशी सबब पुढें आणली आहे कीं, हा धंदा मूलभूत ( बेसिक ) नाहीं. ही सबब अत्यंत विक्षिप्त होय ! मिठाचा अनेक धंद्यांमध्यें कच्चा माल म्हणून उपयोग होत नाहीं काय ? मिठाचा धंदा हा मूलभूत धंदा नाहीं या सबबीवर तो चौकशीसाठीं टॅरिफ बोर्डाकडे सोंपवूं नये असें रेव्हिन्यु बोर्डानें म्हटलें आहे. कारण काय तर औद्योगिक कमिशननें टॅरिफ बोर्ड नेमण्याची शिफारस केली त्या वेळीं बोर्डानें मूलभूत अशा धंद्यांस संरक्षण देण्याबद्दल चौकशी करावी असें म्हटलें आहे. पण नुकतीच टॅरिफ बोर्डानें छापण्याचे टाईप तयार करण्याच्या धंद्याची चौकशी केली व त्या धंद्याला संरक्षणहि दिलें. पण हा धंदा मूलभूत धंदा म्हणून मानतां येईल काय ? याचें सरळ उत्तर फडणविसांनीं द्यावें.

माझ्या म्हणण्याचा थोडक्यांत सारांश असाः—सरकारनें मिठाचे बाबतींत हिंदुस्थानास स्वयंपूर्ण करण्याचा प्रामाणिकपणानें प्रयत्न केला नाहीं. कारण सरकारचा परदेशी व्यापाऱ्यांकडे ओढा आहे. पण मनांत आणलें तर सरकारला अजूनहि असा प्रयत्न करतां येईल. सरकारनें वाटल्यास हा धंदा सरकारी रीत्या चालवावा, अगर दुसरा कोणताहि उपाय करावा, पण हिंदुस्थान जर ब्रिटिश अमलापूर्वीं मिठाचे बाबतींत स्वयंपूर्ण होतें तर ब्रिटिश राज्यांत तें तसें कां नसावें याला कारण सांगतां येणार नाहीं. हें कारण सांगण्याची जबाबदारी सरकारवरच आहे.

---

# ग्राम-पंचायतीचा कायदा

## ( १९२९ )

[ यंदा असेंब्लींत मद्रासचे के. व्ही. रंगास्वामी अय्यंगार यांनीं ग्रामपंचायतीची चौकशी करावी, असा ठराव आणला होता. त्या ठरावावर रा. न. चिं. केळकर यांचें खालीलप्रमाणें भाषण झालें.]

" सरकारतर्फे असें सांगण्यांत आलें कीं, 'ग्रामपंचायत' हा विषय प्रांतिक सरकारच्या कक्षेंतील आहे, पण ही गोष्ट आम्हासहि माहीत आहे. फार कशाला, या ठरावांत उद्धृत केलेल्या कांहीं महत्त्वाच्या बाबी सोंपीव खात्यांच्या दिवाणांच्या अधिकारांतल्या आहेत हेंहि आम्हास ठाऊक आहे. परंतु हा ठराव आणण्याचा मुख्य हेतु हा कीं, वरिष्ठ सरकारनें प्रांतिक सरकारला आदर्शवत् मान्य होईल असें धोरण घालून द्यावें. केवळ या ठरावावरील वादविवादाचीं चोपडीं प्रांतिक सरकारांकडे पाठवून काय फायदा ? त्यांनीं स्वतःचें धोरण ठरवून तेंहि कळवावें.

शेतकी कमिशन बसलें त्या वेळीं त्या कमिशननें या प्रश्नाचा विचार करावयास पाहिजे होता. या कमिशननें निवळ शेतकीचा धंदा करणाऱ्या शेतकऱ्यांचाच विचार केला हें खरें; पण ग्रामपंचायती यादेखील शेतकरी वर्गाकरितांच आहेत. कारण शेतकरी वर्ग हाच प्रायः ग्रामसंस्थांचा घटक होय. या शेतकी कमिशननें ग्रामसंस्थांचा विचार केला, पण तोहि अगदीं अडून. पंजाबांतील गुरगांव खेड्याच्या पाहणीला माझ्या मतें या कमिशननें अधिक महत्त्व दिलें. खेडेगांवांतील लोकांना त्यांच्या सुख-

सोईच्या दृष्टीनें तें एक आदर्श व्हावें हा त्याचा हेतु होता व इतरहि कांहीं सूचना या कमिशननें केल्या आहेत. पण ग्रामपंचायत या शब्दाचा उल्लेखहि कोठें केलेला नाहीं ! शेतकी कमिशननें या प्रश्नाचा विचार बारकाईनें कसा केला नाहीं याचेंच मला आश्चर्य वाटतें आणि या ठरावांतील तक्रार आहे ती हीच कीं, सरकारनें या प्रश्नाची चौकशी करावयास पाहिजे होती तशी केली नाहीं; सबब चौकशी करावी.

ना. फझली हुसेन—कोणतें सरकार ?

केळकर—हिंदुस्थान सरकार. विभागणी (Decentralisation) कमिशननें ग्रामपंचायतींचें कार्यक्षेत्र व घटना यासंबंधानें कांहीं नेमक्या सूचना केल्या आहेत. प्रांतिक सरकारांनीं पंचायतीचा कायदाहि केला आहे. पण आज विभागणी-कमिशनच्या रिपोर्टानंतर २० वर्षांनीं ज्या खात्याशीं या ग्रामपंचायतींचा संबंध येतो त्या खात्याच्या कारभाराची तऱ्हाच कांहीं विलक्षण आहे. कांहीं प्रांतांत लोकल बोर्डांच्या हवालीं ग्रामपंचायती केल्या आहेत. कांहीं प्रांतांत सरकारच ग्रामपंचायतींची व्यवस्था पाहतें व पैसा पुरवितें.

एफ्. एल्. ब्रेन यांच्या 'व्हिलेज अपलिफ्ट इन इंडिया' या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत सर माल्कम हेले यांनीं यासंबंधानें अशी कबुली दिली आहे कीं, "सरकारनें या बाबतींत जितका एकवटून प्रयत्न करावयास पाहिजे होता तितका केला नाहीं. शेतकऱ्याची वैयक्तिक व सामाजिक परिस्थिति समजून घेऊन त्याची मनोवृत्ति बदलण्याचा प्रयत्न झाला नाहीं. त्याचीं जुनीं मतें बदलण्याचा व स्थिति सुधारण्याचा प्रयत्न जो मिशनऱ्यांप्रमाणें करावयास पाहिजे होता तो आमचे हातून झाला नाहीं. कारण शेतकऱ्याला आपल्याजवळचा कोण, आपल्या गांवांत राहणारा कोण, विश्वास ठेवण्यास लायक कोण, अडचणीचे प्रसंगीं उपयोगी पडणारा कोण हें बरोबर कळतें, आणि ज्याच्याबद्दल आपलेपणा वाटणार नाहीं त्यावर तो विश्वासहि ठेवणार नाहीं." या शेवटच्या शब्दाचा अर्थ असा कीं, ग्रामपंचायतींतील लोकच शेतकऱ्याबरोबर त्या खेड्यांत राहणार व त्याच्या सुखदुःखाचे वांटेकरी होणार. यावरून हें लिहितांना ग्रामपंचायतींचाच विचार हेले यांचे मनांत असावा.

मद्रास व वऱ्हाड या प्रांतांत ग्रामपंचायतीची चळवळ यशस्वी झाली आहे; पण मुंबई इलाख्यांत ती यशस्वी झाली नाहीं. या चळवळीची

यशस्विता दोन गोष्टींवर अवलंबून आहे. (१) गांवांतील भांडणतंटे तोडण्याचा अधिकार देणें; व (२) कर न बसविणें. आणि या दोनहि बाबतींत विभागणी-कमिशनच्या शिफारशी पंचायतीच्या कायद्यानें धाब्यावर बसविल्या आहेत !

१९१८ सालीं लोकल सेल्फ-गव्हर्मेंट कमिटी मुंबई सरकारनें नेमली. परंतु ग्रामपंचायतीचा प्रश्न त्या कमिटीच्या कार्यक्षेत्रांतून वगळून टाकला व स्वतःच पंचायतीचा कायदा करण्याचें सरकारनें ठरविलें; आणि जो कायदा केला तो विभागणी-कमिशनच्या शिफारशींविरुद्ध केला. लहानसान दिवाणी, फौजदारी फिर्यादी चालविण्याचा अधिकार द्यावा म्हणजे खेडेगांवांतील लोकांचे तंटे लवकर मिटतील व तालुक्याच्या व जिल्ह्याच्या ठिकाणीं जाण्याचा प्रवासखर्च वांचेल. त्यावर लांचलुचपतीचे प्रकार घडतील असें सांगण्यांत आलें! पण हे असले प्रकार मोठ्या कोर्टांतूनहि घडतात; आणि ग्रामपंच हे तेथीलच वजनदार रहिवासी असल्यामुळें त्या पंचांना खरा कोण खोटा कोण हें सहजच कळूं शकेल, अशी शिफारस विभागणी-कमिशननें केली आहे. पण या शिफारसीला मुंबई सरकारच्या ग्रामपंचायतीच्या कायद्यानें हरताळ फासला! महाराष्ट्रांत तर ग्रामपंचायतीची वहिवाट बऱ्याच वर्षांपासून लोकांच्या अंगवळणीं पडलेली आहे. मौंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन यांनीं महाराष्ट्राच्या भरभराटीचें व मराठे लोकांच्या कर्तबगारीचें श्रेय ग्रामपंचायतीला दिलें आहे. १९ व्या शतकाच्या पूर्वी या ग्रामपंचायतींना न्यायदानाचा अधिकार देण्यांत आला होता. या अधिकाराचा सदुपयोग ग्रामपंचायतींनीं केला. यामुळेंच हीं ग्रामपंचायतीची चळवळ यशस्वी झाली होती व सरकारनें हा न्यायदानाचा अधिकार काढून घेतला यामुळेंच अलीकडे ही चळवळ लोकप्रिय झाली नाहीं. हा ग्रामपंचायतीचा कायदा प्रांतिक कायदेमंडळांनींच केला हें खरें; पण सुधारलेलीं कायदेमंडळें कशीं आहेत हें माहीतच आहे. वऱ्हाडांतील ग्रामपंचायतींना हा न्यायदानाचा अधिकार देण्यांत आला आहे आणि ही साधी गोष्ट देखील मुंबई सरकारच्या हातून झाली नाहीं यावरून सुधारणांचा फोलपणा दिसून येतो.

आतां दुसरा प्रश्न करवसुलीच्या अधिकारासंबंधींचा. या दृष्टीनेंहि विभागणी-कमिशननें असें नमूद केलें आहे कीं, ग्रामपंचायतींनीं स्थानिक नवीन कर लादूं नयेत, या जादा करामुळेंच आरोग्य-कमिट्या व ग्रामसंघ लोकांना पसंत

पडले नाहींत. तसेंच ग्रामसंस्थांच्या अधिकारांत सरकारी स्थानिक अधिकाऱ्यांनींहि हात घालूं नये. विभागणी-कमिशन म्हणतें कीं, 'ग्रामपंचायतीची स्थापना झाल्याबरोबरच जादा कर लादण्याचा प्रश्न उपस्थित होऊं नये. खर्चाची सोय अन्य तऱ्हेनें करण्यांत यावी.' पण सरकारनें या दोनहि महत्त्वाच्या प्रश्नांचे बाबतींत विभागणी-कमिशनच्या शिफारशींकडे डोळेझांक केली व यामुळें ग्रामपंचायतीचा कायदा लोकोपयुक्त झाला नाहीं. सरकारनें हा कायदा करण्याकरितां जें बिल आणलें तेंच मुळीं या शिफारशींचा समावेश न करतां आणलें व बिलाला अनुकूल मतें कशीं मिळविलीं जातात हें सर्वांनाच माहीत असल्यामुळें मूळ बिलच मंजूर झालें यांत आश्चर्य नाहीं. यावरून ग्रामपंचायतीच्या चळवळीची कशी हेळसांड होत आहे हें दिसून येईल व याकरितांच वरिष्ठ सरकारनें प्रांतिक सरकारांना आदर्श होईल असें आपलें धोरण जाहीर करणें जरूरीचें आहे."

---

# क्रिमिनल प्रोसीजर कोडाचें नवें बिल

## (१९२९)

या बिलावर माझी अशी उपसूचना आहे कीं, त्यावर सर्व सामान्य लोकांचें व कायदेपंडितांचें काय मत आहे तें समजण्याकरितां हें बिल रीतीप्रमाणें बाहेर पाठवावें. होममेंबर क्रेरर यांनीं प्रथमच कबूल केलें कीं, हें बिल फार वादग्रस्त आहे. त्या वादांतील सरकारी बाजू त्यांनीं मांडली तरी माझी बाजू काय आहे हें मी आतां या सभेला थोडक्यांत सांगतों.

उपसूचनेचा उद्देश हें बिल कांहीं दिवस लांबणीवर टाकण्याचा आहे हें मी स्पष्टपणें कबूल करतों. त्याला माझीं दोन कारणें आहेत. एक असें कीं, एक नवीन मोठें तत्त्व या बिलांत प्रथमच घातलें जात आहे; म्हणून त्यावर देशांतील अनेक तज्ज्ञांचे अभिप्राय कळणें अवश्य आहे. दुसरें कारण असें कीं, लाहोरच्या खटल्यांतील दूषित वातावरणांतून हें बिल बाहेर निघालें तर तें मला हवें आहे. लाहोरच्या खटल्याचा मीं उल्लेख केला, पण त्याचा संबंध खटल्यांत पुढें येणाऱ्या हकिकतीशीं नाहीं. फक्त त्यांतील सत्याग्रहाशीं आहे. हा खटला क्षणभर विसरला तर या बिलांतील कांहीं भाग मला घेण्यासारखा वाटतो. कारण अनेक आरोपी ज्यांत एकत्र आणले जातात अशा खटल्यांत

एकाच्या कृत्यामुळें इतरांची विनाकारण कुचंबणा होऊं शकते. दरवडेखोरांच्या टोळया, गर्दी-मारामारींतील लोक, बेकायदेशीर सभा, समित्या, कट अशा स्वरूपाच्या खटल्यांत ही गोष्ट पुष्कळ वेळां घडते. एखादें धाडशी कृत्य घडलें तर त्यांत भलते लोक सामील होतात किंवा पोलिसांच्या अज्ञानानें किंवा फाजील उत्साहानें भलते लोक पकडले जातात व त्यांची एकत्र चौकशी सुरू होते. पुढें चौकशींत असें आढळतें कीं, निरनिराळे आरोपी निरनिराळ्या रीतीनें आपला बचाव करतात व कित्येक निरपराधी म्हणून सुटूनहि जातात. अशा खटल्यांत एक आरोपी हजर राहण्याला स्वतःच्या कृत्यानें असमर्थ झाला तर त्याकरितां इतरांची चौकशी डांबून कां राहावी ? व त्यांनीं कच्च्या कैदेंत लोळत कां पडावें ? या दृष्टीनें पाहतां या बिलांतील तत्त्व अगदींच टाकाऊ आहे असें मला वाटत नाहीं. पण केवळ उपयोगाच्या दृष्टीनें हें बिल पुढें आणावयाचें होतें तर यापूर्वीं कित्येक महिने आणावयास हवें होतें किंवा पुढें कित्येक महिन्यांनीं तें फिरून आणावें. पण मला या घटकेला त्याला संमति देतां येत नाहीं.

## तज्ज्ञांचें मत

पण हें माझें अतज्ज्ञांचें मत झालें. माझे कित्येक वकील, बॅरिस्टर स्नेही मला म्हणाले कीं, न्यायाच्या दृष्टीनें हें तत्त्व चुकीचें आहे. ज्या लाहोर हायकोर्टाच्या एका विशिष्ट निकालांतून हें बिल निघालें असें म्हणणें आहे तें कोर्ट तरी हें बिल अभिप्रायाला गेलें असतां या तत्त्वाला संमति देईल कीं नाहीं कोणी सांगावें ? इतर देशांच्या कायद्यांतून अशीं कलमें आहेत कीं काय ? तात्पर्य, सर्व बाजूंनीं अभिप्राय मिळविल्याशिवाय, हें बिल मंजूर करण्याची घाई करणें योग्य नाहीं.

कसेंहि असो, या बिलाचा फायदा या प्रकरणांत तरी आम्हीं सरकारला घेऊं देतां कामा नये. या खटल्यांतील आरोपी पकडून कच्च्या कैदेंत घातल्यानंतर चौकशीचें काम सुरू करण्यालाच सरकारनें किती तरी दिवस घेतले. तसेंच आणखी कांहीं दिवस थांबून या अन्नत्यागसत्याग्रहाचा अखेर निकाल काय होतो तें पाहावें. सरकारची अडचण आम्हाला दिसते; पण आम्हाला त्याचा काय उपकार सांगतां ? ज्यानें मूळ कोडें रचलें त्यानेंच तें सोडविलें पाहिजे. ज्यानें आपला व्यूह रचला त्यानेंच तो फोडला पाहिजे. सरकारची कुचंबणा

झाली तर ती खुशाल होऊं दे. त्यांचा मार्ग त्यांनीं काढावा. कायदेमंडळाकडे येऊन तोंड वेंगाडून मदत मागण्याचें कारण नाहीं.

### दोन शक्तींचें झुंज

बरें, या अडचणींतून निघण्याला मार्ग मुळींच नाहींत असेंहि नाहीं. सत्याग्रहाचा निकाल होईपर्यंत स्वस्थ बसावें हा पहिला उपाय. सरकारी व खासगी प्रयत्नांनीं मिळून कांहीं आरोपींना सत्याग्रहांतून सोडविण्याचें यश घेतलें आहे, तसेंच आणखी प्रयत्न झाल्यास उरलेले लोकहि आपला सत्याग्रह कां सोडणार नाहींत ? दोन विरोधी शक्तींचें झुंज चालू आहे. एक सत्याग्रही लोकांची इच्छाशक्ति व दुसरी त्यांना बळेंच अन्न घालू पाहणारी जेल अधिकाऱ्यांची इच्छाशक्ति. पहिली यशस्वी झाली तर कामच संपलें. आरोपी मरून जातील व सरकारचा सर्वच त्रास चुकेल ! दुसरी शक्ति प्रभावी ठरली तर लवकरच आरोपी कोर्टापुढें हजर करण्याच्या स्थितींत येतील. म्हणजे मुद्दा हा कीं, सत्याग्रह इतके दिवस चालल्यावर आणखी थोडे दिवस या द्वंद्वाचा निकाल काय लागतो हें पाहण्यास थांबण्याला हरकत नाहीं. एकंदर १७ आरोपींपैकीं, ११ जणांनीं सत्याग्रह टाकला आहे असें काल होममेंबर यांनीं दाखल केलेल्या टिपणावरून दिसून येतें. त्यांच्यापुरता खटला सुरू करावा. बाकीच्यापुरता तहकूब ठेवून वाटेल तर पुनः वेगळा करावा. इतके बळी सरकारला मिळाले तर काय थोडें झालें ? बरें जे उरले त्यांत तरी कांहीं असे आहेत कीं, त्यांच्यावर हा खटला केला काय, न केला काय सारखेंच. भगतसिंग व दत्त यांना आधींच जन्मठेप काळ्या पाण्याची शिक्षा झाली आहे; आणि जतींद्रदास तर मरणाच्या द्वारीं उभा आहे. मग आपल्या मरणानें मरणाऱ्या या लोकांना फांसावर चढवून मारावें व खुनी म्हणून त्यांची अपकीर्ति करावी इतकाच सरकारचा खुनशी आग्रह असेल तर गोष्ट वेगळी. तात्पर्य, सरकारला थांबावयाचें नसेल तर त्यांनीं खटले फोडून वेगळे करावे. खटले वेगळे करण्याला वेळ व खर्च लागेल. पण सरकारला या दोहोंचीहि क्षिति वाटण्याचें कारण नाहीं. तिसराहि एक उपाय असा कीं, ११ जणांवर खटला चालू करून इतरांवरचा काढून घ्यावा म्हणजे एकाच खटल्यानें काम भागेल. खटले काढून घेणें ही गोष्ट सरकार करूं शकतें. नुकताच सिंध प्रांतांत असा एक खटला काढून घेऊन मोठी खळबळ उत्पन्न केली आहेच कीं नाहीं ? तसा हाहि काढून घ्यावा. सिंधमधील खटल्यांत बायको पळवून नेणें व खून करणें असे आरोप होते.

## सत्याग्रही लोकांची बहादुरी

पण बिल पुढें ढकलण्याचें माझें तिसरें व अधिक महत्त्वाचें कारण अजून पुढेंच आहे. तें असें कीं, बिल कसेंहि असो, त्याला या प्रकरणांतील सत्याग्रही लोक बळी देऊं नयेत असें माझें आग्रहाचें म्हणणें आहे. कारण बिल सत्याग्रहानें उत्पन्न झालें. पण सत्याग्रह कशानें उत्पन्न झाला हें पाहिलें पाहिजे. खरोखर या सत्याग्रही लोकांनीं एक प्रकारची बहादुरी केली आहे. तुरुंगांत राजकीय कैद्यांना नीट वागवीत नाहींत आणि तेथेंहि काळा-गोरा हा भेद करतात अशी सगळ्या देशभर आज किती तरी वर्षांची तक्रार चालू आहे, आणि यांत बाहेर आम्हां लोकांना जें करतां आलें नाहीं तें यांनीं तुरुंगासारख्या कठीण परिस्थितींत केलें. वकील लोक आपल्या खोलींत आरामखुर्चीवर पडून वाद उत्पन्न करतात किंवा गुन्हेगारीच्या शास्त्रांत संशोधन करणारे पंडित ग्रंथसंग्रहालयांत बसून कल्पना चालवितात तसें यांनीं केलेलें नाहीं. तुरुंगांतला जाच सोशीत व अन्नत्यागानें देह झिजवीत एका मोठ्या महत्त्वाच्या राजकारणी तत्त्वाचा वाद त्यांनीं उभारला. इतकेंच नव्हे तर कांहीं अंशीं तो जिंकलाहि. हें लोकपक्षाचें मोठें काम ज्यांनीं केलें त्यांना या बिलाला आम्ही कधीं तरी बळी देऊं काय? कधींहि नाहीं.

## सत्याग्रहाचे शुद्ध हेतु

अन्नत्यागसत्याग्रह करावा कीं नाहीं याबद्दल दुमत असूं शकेल. कोणी म्हणतील ही पापी आत्महत्या आहे, आततायीपणा आहे. पण खुद्द गांधींसारख्या पुण्यवंतानें २० दिवस उपोषण करून जगाला चिंतेंत पाडलें. त्याला जर तपःसाधन हें उज्ज्वल नांव द्यावयाचें तर तें यालाहि कां देऊं नये? दोहोंतहि अन्नत्याग हा मुद्दा सारखाच आहे. कोणी म्हणतील हा सत्याग्रह म्हणजे भावनाप्राधान्याचा कडेलोट होय. पण तसेंहि नाहीं. कारण या सत्याग्रहाचा हेतु मर्यादित, निश्चित व राजकारणी स्वरूपाचा आहे व त्यामागें तीक्ष्ण भावनेइतकीच सूक्ष्म व विवेकबुद्धि आहे असें उघड दिसतें. कोणी म्हणतील कीं, खटल्यांतील शिक्षा चुकविण्याचा हा प्रयत्न आहे. पण ही शुद्ध बदनामी होय. तुरुंगाला किंवा फांसाला भिणारे हे लोक खचित नाहींत. तुरुंगांतून मनुष्य सुटूं शकतो. फांशीस जाणारा मनुष्य एकदम दुःखमुक्त होतो. पण तिळतिळानें झिजून प्राण घालविणें व तोहि स्वेच्छेनें, हें या दोहोंहून अवघड आहे. अन्नत्यागाची थट्टा करणारांनीं तो चारदोन दिवस करून

पाहावा. मग हे लोक आपला प्राण तिळतिळ घालविण्याला कां तयार झाले? तर त्याचें उत्तर हें कीं, त्यांची प्राण देण्याची तयारी आहे. पण त्यांना तो सरकारला फार महाग विकावयाचा आहे. आपल्या प्राणांचा मोबदला म्हणून सरकारकडून त्यांना जनतेकरितां विशेष कांहीं मिळवावयाचें आहे. व तो लाभ म्हणजे राष्ट्रीय चळवळींतील लोकांच्या स्वाभिमानाला योग्य अशी सरकारकडून तुरुंगांतील वागवणूक!

## लोकांची सहानुभूति

यामुळें या लोकांना सहानुभूति मिळते, ती व्यर्थ नाहीं. आयरिश दे. भ. टेरेन्स मॅक्स्विनी यानें इंग्रजांच्या तुरुंगांत असाच जीव दिला. पण त्याचा मोबदला म्हणून जगभर कीर्ति मिळविली, इतकेंच नव्हे तर आयर्लंडच्या स्वातंत्र्याचें कार्य दहा पावलें पुढें ढकललें. त्याच्या प्रेतयात्रेला धर्माधिकारी लोक व प्रचंड लोकसमुदाय हजर होता व त्यांनीं धार्मिक विधीनें व बहुमानपुरःसर त्याचा दफनविधि केला, तो काय मॅक्स्विनी पापी म्हणून? आमच्या या लोकांची गोष्टहि तशीच आहे. लाहोर खटल्यांतील गुन्हा कित्येकांच्या हातून घडला असला तरी ती लाला लजपतराय यांच्या अपमानाविरुद्ध प्रतिक्रिया नसेल कशावरून? पूर्वीं याच सभेंत लाला लजपतराय यांच्यासंबंधाचा ठराव चर्चेला निघाला तेव्हां या समोरच्या सरकारी बाकांवरून शपथेला एका भल्या माणसानें तरी पोलिसांच्या अपकृत्याबद्दल एक ओझरता उल्लेख तरी करावयाचा होता! मग सरकारनें तरी आम्ही या लोकांवर एका शब्दानें टीका करूं किंवा त्यांना योग्य ती सहानुभूति प्रकट करणार नाहीं अशी अपेक्षा कां करावी? ते गुन्हेगार असले तरी त्यांच्याविषयीं आम्हांला सहानुभूति वाटणारच! जगांत कोणतेंहि दुःख कोणी पाहिलें तर सहजच सहानुभूति वाटते, मग या प्रकरणांत तर काय बोलावयालाच नको.

## उज्ज्वल ध्येयवादित्व

फारच झालें तर इतकेंच म्हणतां येईल कीं, त्यांचे व आमचे मार्ग वेगळे आहेत. असें म्हणणें म्हणजे या तरुण देशभक्तांवर आम्ही टीका करतों असें नव्हे, तर उलट त्यांना आम्ही सहानुभूतिच दाखवितों. अन्नत्याग केलेले हे मुलगे क्रियाशूर नव्हेत काय? त्यांच्यापैकीं कोण अपराधी, कोण निरपराधी हें चौकशी अंतीं कळून येईल. तेव्हां त्या कृत्याबद्दल त्यांना कोणी बरेंवाईट म्हणावयाचें तें म्हणो; पण आज सत्याग्रहापुरतें बोलावयाचें तर त्यांच्या धैर्याचें कौतुकच केलें

पाहिजे. त्यांचे आमचे मार्ग भिन्न याचा अर्थ आमच्यासारख्या प्रौढ किंवा वृद्ध लोकांच्या पिढीमध्यें जो सोशिकपणा, धिमेपणा किंवा चावून चिवटपणा आला आहे तो त्यांना नाहीं. शिवाय कोणतीहि चळवळ करून आज राजकारणांत खरी स्थिति काय आहे किंवा उद्यां केव्हां काय मिळण्याचा संभव आहे हें आम्ही जाणूं शकतों, तसें ते जाणत नाहींत. पण त्यांनाहि उलट असें म्हणतां येणार नाहीं काय, कीं आम्हां तरुण लोकांचें उज्ज्वल ध्येयवादित्व व मनोधैर्य हें तुमच्यांत तरी कोठें आहे? आणि तेंहि खरेंच. म्हणूनच गुणवैचित्र्याप्रमाणें आम्हां दोघांना निरनिराळे परिणाम भोगावे लागतात. ते तुरुंगवास भोगतात किंवा फांसावर चढतात; आणि इकडे आम्ही असल्या या कायदेकौन्सिलांत येऊन व बाहेर सनदशीर चळवळीचा व अनत्याचाराचा उपदेश करून अशा लोकांकडून शिव्या खातों व अपकीर्ति करून घेतों. पण परदेशांत तरी या तरुण पिढीच्या गुणांचें चीज अधिक होईल. तिकडचे लोक विचारतात, "तुम्ही हिंदुस्थानांत इतके ३० कोटी लोक असून स्वातंत्र्य मिळत नाहीं म्हणतां?" अशा लोकांपुढें जाब देण्याची वेळ आली तर आम्ही म्हणणार, "आम्हीं राष्ट्रीय चळवळ चालविलीच आहे; स्वराज्य मिळणारच आहे." तेंच या तरुण पिढींतले लोक असा जाब देतील कीं, "स्वराज्य मिळेल न मिळेल ईश्वराधीनः पण त्याकरितां आम्हीं प्राण देतों खरें." आणि प्राण देण्याहून मनुष्याला अधिक कांहींच करतां येत नाहीं. तेव्हां आमच्यांत सरस-निरस कोण हें जग ठरवीत नसेल काय?

## तुरुंगांतील गैरव्यवस्था

या सत्याग्रही लोकांनीं एक मोठा राजकीय वाद पायावर खडा केला असें मीं पूर्वीं म्हटलेंच आहे. पण आणखीहि असें म्हणतों कीं, तो जिंकण्याचेंहि थोडेंसें कार्य त्यांनीं केलें आहे. भगतसिंग व दत्त यांच्या तक्रारीचा कागद माझ्या हातीं नाहीं. पण मियानवाली तुरुंगांतील सरदार गोपाळसिंग यानें अन्नत्यागाच्या गुन्ह्याच्या चौकशींत खुद्द मॅजिस्ट्रेटपुढें जो लेखी जबाब दिला तोच मी वाचून दाखवितों. ( अर्ज वाचून दाखविण्यांत आला. ) बरें, सत्याग्रही लोक विक्षिप्त असतात आणि भलतेंच कांहीं घेऊन बसतात असें म्हणावें तर अलाहाबाद सरकारनें नेमलेल्या तुरुंग कमिटीचे सभासद पं. जगत् नारायण व हफीज हिदायत हुसेन यांनीं रिपोर्टाच्या भिन्न पत्रिकेंत बरोबर तसल्याच तक्रारी, विशेषतः काळ्या-गोऱ्या कैद्यांच्या वागणुकींत फरक

असण्याच्या तक्रारी खऱ्या आहेत असें स्पष्ट लिहिलें आहे. याचेंच प्रत्यंतर असें कीं हिंदुस्थान सरकारनेंहि याच मुद्याची चौकशी करण्याकरितां प्रांतिक सरकारांना लिहिलें आहे व आतां कांहीं तरी होणार असें दिसत आहे. तात्पर्य १९२२-२३ सालच्या सरकारी तुरुंगचौकशीच्या कमिशननें जें ठरविलें तें मान्य नाहीं असें सर्वांचें म्हणणें असतां त्यांत बदल करण्याचा प्रसंग आम्हां कौन्सिलांतील लोकांना जो उपस्थित करतां आला नाहीं तो तुरुंगांत अन्नत्याग करून या तरुण मुलांनीं उभा केला. ही त्यांची केवढी थोरवी वर्णावी !

## नव्या मार्गाचा अवलंब

या लोकांनीं राष्ट्रीय चळवळीचा हा एक नवा मार्ग, पंथ किंवा निष्ठाच उत्पन्न केली असें म्हणतां येईल. आणि जें राजकारण प्रगतिपर असतें त्यांत असेच नवे नवे मार्ग निघतात. यावरून परवां मीं मि. जी. के. चॅस्टरटन, विलायतेंतले एक नामांकित ग्रंथकार, यांचें पुस्तक वाचलें त्याची आठवण झाली. या पुस्तकांत एक गमतीची गोष्ट लिहिली आहे. 'एक क्लब होता. त्याचा सभासद होण्याची अट अशी होती कीं, उमेदवारानें असें सिद्ध करावें कीं, आपण आपली संसारयात्रा प्रामाणिकपणानें तर करीतच आहों, पण ती यात्रा करण्याचीं साधनें स्वतःच कल्पनेनें काढलेल्या एखाद्या नव्या धंद्यानें मिळवीत आहों. तो धंदा पूर्वीं कोणी करीत नव्हता असा नवीन, स्वतंत्र व स्फूर्तिजन्य असला पाहिजे.' हा दाखला घेतला तर हिंदुस्थानच्या राजकीय ध्येयाकरितां खऱ्या मनानें खटपट करणाऱ्या लोकांचा एक क्लबच आहे; व तो वरच्यासारखाच क्लब आहे असें म्हणतां येईल. कसें तें पाहा. राजनिष्ठ लोक हे ह्या क्लबाचे पहिले सभासद ! त्यांनीं तोंडपूजेचा मार्ग चालवून पाहिला. त्यापुढें आलेले नेमस्त, त्यांनीं युक्तिवाद व आंकडेगिरी यांचा नवा मार्ग काढला. त्यामागून आले अर्ध-जहाल. त्यांनीं सौम्य भाषा टाकून, निषेध किंबहुना अपशब्द यांचा नवा मार्ग काढला. त्यामागून जहाल सभासद आले. ते म्हणाले, " तुरुंगवासाला आपण भीत नाहीं असें सिद्ध केलें म्हणजे सरकारला वचक बसेल " म्हणून तो त्यांनीं नवा मार्ग काढला. आणि आतां हे क्रांतिकारक किंवा अन्नसत्याग्रही या क्लबाचे नवे सभासद झाले. त्यांनीं मरणापर्यंत अन्नत्याग करण्याचा नवाच मार्ग शोधून काढला. मूळच्या गोष्टींतील 'क्लब' उदरंभरूंचा होता आणि राजकारण हा कांहीं उदरनिर्वाहाचा धंदा नव्हे. पण तो एक प्रकारच्या कारागिरीचा धंदा खरा, व कोणताहि व्यावहारिक

धंदा यशस्वी व्हावयाचा तर त्यांत नवीन नवीन पद्धति हुडकून अंमलांत आणल्याखेरीज यशाची पायरी चढती राहात नाहीं.

असो. अशा प्रकारचे हे लोक असल्यामुळें व त्यांनीं राजकारणांत एक नवें कार्य केल्यामुळें त्या कार्यांतूनच उत्पन्न झालेल्या या बिलाला आम्ही त्यांना आपल्या हातानें बळी कसें देऊं ? व देऊं असें सरकाराला वाटतें तरी कसें ? या देशभक्तांची करणरूप कांहीं सेवा आमच्या हातून न घडली तरी एवढी ही अकरणरूप सेवा तरी घडावी अशीच आमची इच्छा आहे.

---

# शारदा बिल

## (१९२९)

" हें बिल सिलेक्ट कमिटीकडून मंजूर होऊन आलें असल्यामुळें त्याचें दुसरें वाचन होऊं देणें हें योग्य आहे. मग अखेर त्याचें काय होईल तें होईल. या बिलांतील तत्त्व म्हणजे वयाची लग्नमर्यादा वाढविणें ही गोष्ट मला स्वतःला मान्य आहे. तथापि हें बिल आहे असें मात्र मला मान्य नाहीं. या दृष्टीनें मीं स्वतः अनेक उपसूचना पाठविल्या आहेत, व सभेंतील बहुमतवाल्यांनीं जर त्याचा योग्य विचार केला नाहीं व दडपशाहीनें आपलेंच म्हणणें अमलांत आणलें, तर बिलाला अनिष्ट स्वरूप येईल. म्हणून आतां जरी सिलेक्ट कमिटीचा रिपोर्ट विचारांत घ्यावा असें मत मी देणार आहे तरी अखेर तिसऱ्या वाचनाचे वेळीं कोणत्या बाजूला मत द्यावयाचें याविषयीं निर्णय करण्याचा माझा हक्क मीं राखून ठेवला आहे हें आतांच स्पष्ट सांगतों.

### प्रतिनिधी व मतदार

सुदैवानें माझे मित्र मिस्टर नियोगी यांचेसारखी मात्र माझी स्थिति नाहीं. व्यक्तिशः ते बिलाला अनुकूल—सर्वस्वीं अनुकूल आहेत. परंतु त्यांच्या मतदारसंघानें त्यांना अशी स्पष्ट आज्ञाच दिली आहे कीं, 'बिलाला विरोध करावा.' पण माझ्या मतदारसंघाकडून मला अमुक एक आज्ञा अशी मिळाली नाहीं. नाहीं म्हणायला मला नुकतीच कऱ्हाड येथील हिंदु सभेकडून बिलाला विरोध करण्याविषयीं तार आली आहे. तिचा उल्लेख मी अवश्य करतों. पण याहून अधिक आज्ञापत्रें मला अजून आलेलीं नाहींत. माझे कांहीं

मतदार लोक तत्त्वतः या बिलाला प्रतिकूल आहेत, हें मला माहीत आहे. कांहीं अनुकूल आहेत असेंहि मला माहीत आहे. पण पुष्कळ लोक याविषयीं तटस्थ किंवा उदासीन आहेत. याचा अर्थ मी तरी असा समजतों कीं, जाग्यावर हजर असलेल्या लायक माणसानें त्याच्या निर्विकार बुद्धीला सुचेल तसें करावें, व हें उघडच आहे. कारण निवडणुकीच्या वेळीं मतदारांच्या डोळ्यांपुढें एकच तत्त्व असतें. तें हें कीं, 'सामान्यतः आपण निवडूं तो प्रतिनिधि आपल्या हिताचें रक्षण करील कीं नाहीं?' निवडणुकीच्या वेळीं उमेदवारालाहि प्रचलित विषयापेक्षां अधिक विषय त्यांचेपुढें मांडतां येत नाहींत. यामुळें पुढें तीन वर्षांत कायदेमंडळांत जे जे म्हणून कल्पनागम्य वादग्रस्त प्रश्न निघतील त्या सर्वांसंबंधीं उमेदवाराला आगाऊ मतदारांना 'तुमची काय ती आज्ञा द्या' असें म्हणतां येत नाहीं व मतदारांनाहि 'आम्ही तुम्हाला अमुकच एक आज्ञा देतों' असें सांगतां येत नाहीं. आपल्या असेंब्लीच्या अध्यक्षाच्या अधिकारासंबंधानें आतांच प्रश्न उपस्थित झालेला आपण पाहिलाच. एक सेफ्टी बिल पुढें आलें म्हणून अध्यक्षांच्या नियंत्रणाकरितां नवा नियम केला. पण आणखी कितीहि नियम करून ठेवले तरी कोणत्या वेळीं कोणता विषय किंवा मुद्दा उपस्थित होईल हें कोणालाहि आगाऊ सकारण रीतीनें सांगतां येत नसल्यानें शेवटीं आपल्या मनाला विचारून योग्य तोच निर्णय आपले अध्यक्ष देणार हें उघड आहे. त्याचप्रमाणें मतदार व त्यांचे प्रतिनिधी यांचीहि स्थिति सामान्यतः असते.

## सिलेक्ट कमिटींतील मतें

आतां सिलेक्ट कमिटीचा रिपोर्ट विचारांत कां घ्यावा व बिलाला येथें तरी अटकाव कां करूं नये असें मी म्हणतों त्याचीं कारणें सांगतों. हें बिल दोन सिलेक्ट कमिट्यांकडे एकामागून एक पाठविण्यांत आलें होतें. रीतीप्रमाणें त्याची प्रसिद्धीहि झाली आहे. या बाबतींत कोणतीहि तक्रार उरलेली नाहीं. आतां दुसऱ्या सिलेक्ट कमिटींत कोण लोक आहेत हें पाहूं. एकंदर सभासद अठरा. त्यांत २ युरोपियन, १ अँग्लोइंडियन, १ हिंदी, १ ख्रिस्ती, ३ मुसलमान व बाकी राहिले ११ हिंदु. पैकीं युरोपियन, अँग्लोइंडियन व ख्रिस्ती यांचीं अनुकूल मतें मी जमेसच धरीत नाहीं. त्यांच्या समाजांत विवाहमर्यादा आधींच इतकी पुढें गेली आहे कीं, त्यांना १४ वर्षें हीदेखील थट्टाच वाटावयाची. म्हणून त्यांची अनुकूलता हें कांहीं मोठेंसें समर्थन नव्हे.

तीन मुसलमान सभासदांनीं कमिटीच्या रिपोर्टांतच असें लिहून ठेविलें आहे कीं, "हें बिल मुसलमानांना लागू करूं नये" पण बिलांतील तत्त्वाला आपण विरोधी आहों असें मात्र त्यांनीं त्यांत म्हटलें नाहीं. अर्थात् बिल कोणाला वगळून कोणाला लावावें किंवा एकट्या हिंदु समाजालाच लावावें एवढाच प्रश्न उरला.

## हिंदु सभासदांची वर्गवारी

नंतर ११ हिंदु सभासदांची वर्गवारी करूं. त्यांतील फार तर चौघांना सामाजिक सुधारक म्हणतां येईल. बाकीचे सात सर्वस्वीं पुराणमतवादी नसले तरी त्यांतील कोणीहि स्वतःच्या आचारांत पाश्चात्य सामाजिक स्थितीच्या वळणावर गेलेला नाहीं. ११ हिंदु सभासदांपैकीं, जयकर, हरबिलास शारदा, लाला लजपतराय, हरीसिंग गौर, श्रीनिवास अय्यंगार, लाला रंगबिहारीलाल, घनश्यामदास बिर्ला, इतक्यांनीं या बिलाला आहे त्याच स्वरूपांत सर्वस्वीं संमति दिली असून, त्यांनीं भिन्नमतपत्रिका मुळींच लिहिलेली नाहीं. उरल्या चार हिंदु सभासदांनीं भिन्न मतपत्रिका लिहिल्या आहेत. ते म्हणजे पंडित मदन मोहन मालवीय, कुमार गंगानंद सिंह, पं. ठाकुरदास भार्गव व पं. नीलकंठदास हे सर्वच्या सर्व पुराणमतवादी असें सामान्यपणें म्हणतां येईल. पण त्यांच्या भिन्न मतपत्रिकांत काय विषय आहे तो पाहूं. पं. ठाकुरदास भार्गव व नीलकंठदास यांनीं बिलांतील तत्त्वाला मुळींच विरोध केलेला नाहीं, तर बिल अमलांत येण्याच्या कलमाच्या तपशिलाविषयीं त्यांचें व कमिटीचें एकमत नाहीं. उदाहणार्थ, पं. ठाकुरदास भार्गव म्हणतात कीं, "झाला तो बालविवाह नाहीं हें शाबीत करण्याच्या पुराव्याचा बोजा आरोपीवर टाकणें चूक आहे." याविषयीं त्यांचें व माझें एकमत असून मीं तशी उपसूचना दिली आहे. पं. नीलकंठदास यांचें म्हणणें असें कीं, "बिलाला हरकत नाहीं, परंतु कित्येक ठिकाणीं त्याचा अंमल त्रासदायक होईल म्हणून विशेष कारणाकरितां एखादे वेळीं हें बिल आपणास लागू होऊं नये, म्हणजे त्यांतून आपणाला सुटका व्हावी व ठरलेल्या वयोमर्यादेच्या आधीं लग्न करतां यावें अशी इच्छा असल्यास, कोणी तरी अधिकारी नेमून त्याला ही माफी देण्याचा अधिकार देऊन ठेवावा. अशा प्रकारची सवलत बडोदें राज्यांतील कायद्यांत आहे असें मला वाटतें, व या अर्थाची उपसूचना पुढें आल्यास मी तिला संमति देणार आहें.

## पुराणमतवाद्यांचें म्हणणें

आतां राहिले फक्त दोघे. पं. मदन मोहन मालवीय व कुमार गंगानंद सिंह. कुमार गंगानंद सिंह आपल्या भिन्नमतपत्रिकेंत म्हणतात कीं, "अनेक पुराणमतवादी लोकांना मुळींच विवाह रजोदर्शनापूर्वीं व्हावा असें वाटतें. पण त्यांचा हेतु १४ वर्षांपूर्वीं फक्त विवाहसंस्कार व्हावा, गर्भाधानसंस्कार होऊं नये, असाच आहे. म्हणून त्यांच्या मतें विवाहमर्यादा १४ न ठेवतां १२ ठेवावी. बिलाचीं कलमें जाचक किंवा त्रासदायक अशीं असूं नयेत. अशा प्रकारच्या कायद्याचा हा पहिलाच प्रयत्न म्हणून लोकांना प्रथम सहानुभूतीनें वागविलें पाहिजे. वाटल्यास गर्भाधानसंस्काराची हल्लींची वयोमर्यादा आहे ती आणखीहि पुढें वाढवावी. तूर्त १२ वर्षें वयोमर्यादा लग्नाची ठेवून कसें काय होतें तें पाहावें व नंतर पुढें योग्य तें करावें." पंडित मदन मोहन मालवीय यांचेंहि मत कायद्यांत १२ वर्षांची वयोमर्यादा घालावी असें आहे. "१४ वर्षांच्या वयोमर्यादेला पुराणमतवादी लोकांचा फार विरोध होईल. पण १२ वर्षें ही वयोमर्यादा ठेवल्यास या बिलाला पुराणमतवादी लोकहि संमति देतील. विलायतेंतहि १२ वर्षांची मर्यादा आहे. बिलांत योजलेली सुधारणा कायदा करून अवश्य झाली पाहिजे. पण १२ वर्षांवर वयोमर्यादा नेण्याचें काम शिक्षणावर सोंपवावें. तसेंच बिलांत कैदेची शिक्षा ठेविली आहे पण ती ठेवूं नये, जाचक होईल."

सिलेक्ट कमिटीच्या रिपोर्टांचें केलेलें हें पृथक्करण लक्षांत घेतां काय दिसून येतें ? पंडित मालवीयांसुद्धां कोणाहि हिंदु सभासदाचा विरोध बिलाच्या तत्त्वाला नाहीं. म्हणजे प्रत्यक्ष कायदा करून १२ वर्षांच्या आंतील का होईना बालविवाह कायद्यानें बंद करावा या तत्त्वाला विरोध नाहीं. हिंदुस्थानांतील स्त्री-जातीची एकंदर लोकसंख्या लक्षांत घेतां संमति वय कमिटीच्या रिपोर्टाच्या शेवटीं खानेसुमारीचे आंकडे दिले आहेत त्यांवरून असें दिसतें कीं, शेंकडा ५० मुलींचीं लग्नें १५ वर्षांच्या वयानंतर होतात. हा आंकडा पाहून मला प्रथम थोडेंसें आश्चर्यच वाटलें, पण बरेंहि वाटलें. अर्थात् या शेंकडा ५० लोकांना हें बिल लागतच नाहीं. यांतून ते मुक्तच आहेत. आतां दुसऱ्या टोकाच्या बाजूला वळूं. एकंदर हिंदु स्त्री-जातीपैकीं १२ वर्षांच्या आंत लग्नें होणाऱ्या मुलींचें प्रमाण शेंकडा सुमारें २० टक्के आहे. आतां क्षणभर असें समजूं कीं, पंडित मदन मोहन मालवीय व कुमार गंगानंद यांच्या सूचनेप्रमाणें या बिलांतील

वयोमर्यादा १२ वर्षांची ठरविली, तर काय होईल? "मुलीचें लग्न केव्हां करावें हें ज्याचें त्यानें ठरवावें. त्याला या बाबतींत पूर्ण अधिकार आहे व मतस्वातंत्र्य असावें, त्यांत कायद्यानें हात घालूं नये" असें म्हणणें जर ग्राह्य मानलें तर असा अर्थ निघतो कीं, हिंदुस्थानांतील एकंदर हिंदूंत अतिशय श्रेष्ठ व पुराणमतवादी असा हिंदु म्हणजे पं. मदन मोहन मालवीय, हे या २० टक्के लोकांना कायदा लावावयाला व त्यांच्या सामाजिक चालीरीतींत हात घालावयाला व त्यांच्यावर कायद्याची सक्ती करण्याला तयार आहेत. असें करण्यांत त्यांना कोणत्याहि तत्त्वनिष्ठेचा भंग झाला असें वाटत नाहीं. मग येऊन-जाऊन प्रश्न उरला तो १२ ते १४ या दरम्यानच्या वयाच्या मुलींच्या लग्नासंबंधींचा. मग सहजच असाहि प्रश्न उत्पन्न होतो कीं, कायद्याचें बंधन हाच जर जुलूम मानला तर १२ किंवा त्याखालील वयाच्या मुलींचीं लग्नें करणाऱ्या लोकांवर तो करण्याला पंडितजींची हरकत नाहीं तर १२ ते १४ या मर्यादेंतील मुलींचीं लग्नें करणारावर तेंच बंधन त्यांनीं कां घालूं नये? १२ वर्षांच्या खालीं या कायद्याचा अंमल किंवा जुलूम करावा असें म्हणणाराला १२ ते १४ या वयांत लग्नें करणाऱ्या लोकांवर मात्र तो अंमल किंवा जुलूम करूं नये असें तत्त्वदृष्ट्या म्हणतां येणार नाहीं. जें एकाला तें दुसऱ्याला.

### प्रौढ-विवाहाकडे लोकांची प्रवृत्ति आहे

पण येथें कदाचित् असें म्हणतां येईल कीं, "१२ ते १४ हीच वयोमर्यादा रजोदर्शनाची असूं शकते; व रजोदर्शनापूर्वी मुलीचा विवाह व्हावा अशी शास्त्राची आज्ञा आहे. म्हणूनच या वर्गाला कायद्यांतून वगळावें." पण येथें इतरहि अनेक विचार त्याबरोबरच निघतात ते असेः - ज्यांनीं वयोमर्यादा १२ पर्यंत स्वतः आधीं आणली त्यांनीं मुलीचें लग्न आठव्या वर्षी करण्याची जी मानीव शास्त्राची शिफारस किंवा आज्ञा ती मानली नाहीं. तेव्हां अर्थात् त्यांना १२ च्या पुढें एक किंवा दोन वर्षें जाण्याला हरकत नसावी. १४ ऐवजीं १३ ही मर्यादा असावी अशी एक उपसूचना आलीच आहे. पण रजोदर्शना-पूर्वी मुलीचा विवाह झालाच पाहिजे अशी शास्त्राची सक्त—आज्ञा आहे, असें इतर पुष्कळ विद्वान पुराणमतवादी लोक मानीत नाहींत त्याला काय करावें? रजोदर्शनानंतरचा विवाह ते प्रशस्त मानतात! स्वतः मी कांहीं शास्त्री-पंडित नाहीं. पण क्षणभर असा कायदा असावा कीं नसावा हा प्रश्न बाजूला ठेवला असतां, नुसतें विवाहाच्या वयोमर्यादेपुरतें बोलावयाचें

तर मीं प्रौढ-विवाहासंबंधीं पुष्कळ पंडितांचे लेख व अभिप्राय वाचले आहेत. अकोला येथील ब्राह्मणसभेंत काय झालें हें मला माहीत आहे; व काशी येथील ब्राह्मण-महासभेनंतर पुण्यास ज्या सभा झाल्या त्यांचा अध्यक्षच मी होतों. खुद्द काशीच्या ब्राह्मण-सभेनें जो निर्णय अखेर दिला त्यांतहि हेंच सांगितलें कीं प्रौढ मुलीचा विवाह केला तरी त्या गोष्टीला प्रायश्चित्त नाहीं असें नाहीं. आईबाप किंवा ती जातींतून बाहेर जात नाहीं. अर्थात् कायद्यांत जशी आपण सवलत मागतों तशी धर्मांतहि ती दिलेलीच आहे. प्रौढविवाह ज्यांना सशास्त्र वाटतो त्यांचा प्रश्नच नाहीं. पण ज्यांना प्रामाणिकपणें तो अशास्त्र वाटत असेल त्यांनीं देशकालपरिस्थिति लक्षांत घेऊन व पोक्त विचार करून, या प्रायश्चित्ताच्या सवलतीचा फायदा घेऊन योग्य तें करण्यास तयार व्हावें. बरें, प्रायश्चित्त न घेतलें तरी आज म्हणजे प्रौढ-विवाहित मुलींचा छळ होतो किंवा ग्रामण्यें होतात अशीहि गोष्ट नाहीं. माझ्याबरोबर कोणी गांवोगांव हिंडावयास येईल तर त्याला मी हें प्रत्यक्ष दाखवून देईन. याचीं इतर कारणें कांहींहि असोत; पण प्रौढविवाह करण्याकडे वरच्या वर्गांतील लोकांची प्रवृत्ति होऊं लागली आहे, व हा समाज अत्यंत सहिष्णु बनत चालला आहे.

धर्मस्य तत्त्वं निहितं गुहायां । महाजनो येन गतः स पन्थाः ॥

हें वचन लोकांना पटूं लागलें असून, स्मृतींतून असणारी विविधता त्यांना दिसूं लागली आहे.

## सत्याग्रहाचा विचार

जुन्या काळीं शास्त्रीय नियमांचा अर्थ विचारावयाचा झाल्यास राजा हा निःस्वार्थी ब्राह्मण लोकांना बोलावून आणून त्यांचा विचार घेत असे. हल्लीं तें राहिलें नाहीं. पण मी म्हणतों कीं, असंख्य मतदारांनीं निवडून दिलेल्या या लोकसभेंत, पुष्कळ लोक ब्राह्मण नसले तरी ते निःस्वार्थी आहेत, इतकेंच नव्हे तर राष्ट्रीय दृष्टीनें विचार करणारे आहेत, हें कबूल करावें लागेल. बिलाला विरोध करणारे जसे निःस्वार्थी तसेंच बिलाचें समर्थन करणारे हेहि निःस्वार्थीच दिसतात. तात्पर्य १२ ते १४ या मर्यादेंत लग्न करण्याविषयीं शास्त्राज्ञा अमुकच आहे असें कोणासहि निःसंदेह म्हणतां येत नाहीं; परंतु माझाच शास्त्राधार खरा व म्हणून उद्यां हा कायदा झाला तर मजवर जुलूम होईल किंवा मी त्याला विरोध करीन असें म्हणणारे एक प्रकारचे सत्याग्रही

असूं शकतील. आणि देवीची लस टोंचून घेण्यासारख्या बाबतींत लोक कायद्याची शिक्षा सोसण्याला तयार होतात, परंतु कायदा मानीत नाहींत. तसा कोणी येथेंहि निघाल्यास अर्थात् आपल्यापुरता सत्याग्रह करणें हें त्यांना प्राप्त होईल. पण देशकालपरिस्थिति अशी अशी आहे. भावी पिढीचें त्यांत कल्याण आहे. शास्त्राचा निर्बंध अनिश्चित आहे. शास्त्राचें उल्लंघन केल्यास प्रायश्चित्त आहे. इतकें असूनहि जर कोणी हा कायदा मोडून सत्याग्रह केला तर असें म्हणतां येईल कीं, असहकारितेच्या चळवळींत हजारों लोकांनीं कायदा मोडून त्याचे परिणाम आनंदानें सोसले तसे याचेहि सोसतील. एक गोष्ट राजकारणाच्या प्रेमाकरितां घडली तर दुसरी सामाजिक किंवा धार्मिक स्वातंत्र्याच्या प्रेमाकरितां घडेल असें म्हणतां येईल.

अशा रीतीनें साधक-बाधक गोष्टींचा पक्षोपन्यास करतां येतो; व तोच मीं पृथक्करणपद्धतीनें मांडून दाखविला आहे. पण फिरून सांगतों कीं, या बिलांत अनेक प्रकारच्या सुधारणा करण्याच्या उपसूचना, विशेषतः लोकांना बिलाचा अम्मल जाचक होणार तो न व्हावा अशा अर्थाच्या उपसूचना, दिल्या गेल्या आहेत. त्या जर नामंजूर झाल्या तर, या अशा बिलाला मत अनुकूल द्यावें कीं प्रतिकूल द्यावें याविषयीं विचार मी पुढें करीन हें पूर्वीं मीं सांगून ठेविलेंच आहे. या वेळीं फक्त सिलेक्ट कमिटीचा रिपोर्ट विचारांत घ्यावा इतकेंच मी म्हणतों."

---

# जबाबदारीचें स्वराज्य व गांधींचा खलिता

[ तारीख ७ मार्च १९३० रोजीं असेंब्लीच्या बैठकींत रा. केळकर यांनीं गव्हर्नर-जनरलच्या एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलचा सर्व खर्च नामंजूर करावा अशी सूचना मांडली त्यांत महात्मा गांधींच्या चळवळीचा उल्लेख असून, तिचें समर्थन केलें होतें. त्यासंबंधाचा कांहीं भाग याखालीं देत आहों. ]

एक्झिक्यूटिव्ह कौन्सिल म्हणजे सरकार अजून राष्ट्राला जबाबदार झालेलें नाहीं. तें तसें झालें पाहिजे ह्या अर्थाची माझी ही सूचना आहे. योग असा कीं, आज ही सूचना मी चर्चेला पुढें आणीत आहे त्याच दिवशीं महात्मा गांधी यांनीं पाठविलेला निर्वाणीचा खलिता व्हाइसरॉयसाहेबांच्या

हातीं पडला आहे; पण हा केवळ काकतालीयन्याय नव्हे, किंवा 'चुकली वेळ व पडला मेळ' असाहि प्रकार नाहीं. त्याहून अधिक खोल अर्थ या योगायोगांत आहे. त्यावरून प्रथमच हें दिसेल कीं, कौन्सिलांत येऊन काम करणारे काय किंवा कौन्सिलाच्या बाहेर राहून काम करणारे काय दोघांच्याहि मनांत तंतोतंत एकाच प्रकारचे विचार खेळत आहेत. गांधीजींनीं आपल्या खलित्यांत ज्या मागण्यांचा ओझरता उल्लेख केला आहे, त्या तत्पूर्वी कांहीं दिवस त्यांनीं खुलासेवार प्रसिद्ध केल्या होत्या; व हा खुलासा करतांना असेंहि जाणविलें होतें कीं, ह्या मागण्या आजच्या नव्या नसून, पहिल्या असहकारितेच्या चळवळींत ८-९ वर्षांपूर्वीहि केल्या होत्या. या मागण्यांनीं राष्ट्राचें सर्व मागणें संपलें असा अर्थ नाहीं. पण त्या उदाहरणादाखल, उपलक्षणादाखल समजल्या पाहिजेत असेंहि गांधीजींनीं म्हणून ठेवलें आहे. मग या मागण्या मांडण्यांत हेतु कोणता? तो हेतु असा; स्वराज्याची तहान सुराज्यानें भागत नाहीं हें वचन प्रसिद्धच आहे. पण स्वराज्य असलें किंवा नसलें तरी सुराज्य म्हणून कांहीं हवें असतेंच. आणि यच्चयावत् राष्ट्रांचा हेतु हाच असतो कीं, स्वराज्य व सुराज्य हीं दोन्ही हवीं. त्यांतल्या त्यांत स्वराज्याच्या द्वारेंच सुराज्य मिळविणें ही अधिक सोय. पण आज स्वराज्य नाहीं तर सुराज्य तरी सरकार देण्याला तयार आहे काय? देऊं म्हणेल तर माझ्याजवळ मागण्या तयार आहेत, सरकारनें त्या द्याव्या. सरकार आम्ही मागूं त्या रास्त मागण्या देत गेल्यास स्वातंत्र्याची मागणी अर्थातच तितकी शिथिल होईल, पण हें नतद्रष्ट सरकार इतकेंहि करण्यास तयार नाहीं!

आतां आपण गांधीजींनीं मागितलेल्या मागण्या क्रमानें घेऊं. म्हणजे त्यांतील एकहि मागणी अयोग्य आहे, भलतीच कांहीं तरी मागितली आहे, असें कोणीहि म्हणणार नाहीं. उलट प्रत्येकजण असें म्हणेल कीं, सरकार इतकेंहि करावयास तयार नसेल तर त्यांची निंदा व निषेध त्यांनीं आपल्याच तोंडानें केली असें होईल. पहिली मागणी मद्यपाननिषेधाची. मद्यपाननिवर्तनाबद्दल हिंदुस्थानचा हजारों वर्षांचा लौकिक आहे. प्रत्येक धर्मानें त्याचा निषेध केला आहे, आणि शेंकडों वर्षें मद्यांत भिजत घातलेला अमेरिकन देश जर अखेर मद्यपानाची हकालपट्टी करण्याला तयार होतो, तर हिंदुस्थाननें ती मागणी केल्यास त्यांत वावगें कोणतें? देशाचें मत घ्या, व लोकांनीं होय

म्हटलें तर मद्याची हकालपट्टी करण्याचा कायदा करा. ही नुसत्या सुराज्याची मागणी झाली व तीहि मान्य न केलीत तर संपूर्ण स्वराज्य द्या, हें ओघानेंच प्राप्त होतें.

दुसरी मागणी हुंडणावळीचा भाव १८ पेन्स जबरदस्तीनें केला तो बदलून पूर्वीसारखा १६पेन्स करा. या मुद्द्यावर आज ३-४वर्षें सतत चळवळ सुरू आहे. तेव्हां त्यासंबंधानें फारसें सांगण्याचें कारण नाहीं. १६ पेन्सचा भाव पूर्वीं किती तरी वर्षें होताहि. तिसरी मागणी शेतसाऱ्यासंबंधाची. ती अशी कीं, हल्लींचा शेतसारा आहे त्याहून तो एकदम निदान निम्मा करण्यांत आला पाहिजे व सारावाढ यापुढें कायदेमंडळाच्या हुकमानें झाली पाहिजे. या दोन्ही मागण्या लँडलीग म्हणजे शेतकरीसंघानें केल्याच आहेत. सरकार हल्लीं तात्त्विकदृष्ट्या असें म्हणतें कीं, शेतीच्या फायद्यांतील ५० टक्केपर्यंत घेण्याचा आम्हाला हक्क आहे. पण शेतकीसंघानें पूर्वींच अशी मागणी केली आहे कीं, शेतीच्या ऐन उत्पन्नाच्या २५ टक्क्यांहून अधिक वाढ करतां येऊं नये व हा सर्व कारभार कायद्यानेंच झाला पाहिजे. आम्ही प्रांतिक सरकारपाशीं जें मागत आहों तेंच गांधीजी व्हाइसरॉयसाहेबांपाशीं मागतात इतकेंच.

चौथी मागणी अशी कीं, लष्करी खर्च आहे त्याहून निम्मा करावा. कोणी म्हणेल केवढी ही मागणी! पण राष्ट्रानें लष्करावर एकंदर खर्चापैकीं २० टक्क्यांहून अधिक खर्च करणें गैरशिस्त होय असें तज्ज्ञ अर्थशास्त्रकार म्हणतात. आज हिंदुस्थानांत लष्करावर ५४ कोटी रुपये खर्च होतात. त्याचा निम्मा हिस्सा म्हणजे २७ कोटी व हिंदुस्थानचा आढावा १३५ कोटींचा मानला तर या २७चें या १३५ शीं प्रमाण $\frac{१}{५}$ म्हणजे २० टक्केच पडलें. मग यांत वावगें कोणतें? पांचवी मागणी वरिष्ठ अधिकाऱ्यांचा पगार निम्मा करावा. ही देखील वरच्याप्रमाणेंच सयुक्तिक मागणी आहे. कारण एरवीं खर्च हटणार कसे? अधिकाराच्या जागांवर हिंदी लोक नेमले असतां, त्यांना हल्लींच्या निम्म्या पगारांत तेंच काम करतां येईल. जपानची तुलना केली तर हेंच दिसून येईल.

सहावी मागणी बंदर-किनाऱ्याच्या व्यापारासंबंधाची. या मुद्द्यावरील बॅ. हाजी यांच्या बिलावर अजून रण माजून राहिलें आहे हें लोकांना माहीतच आहे. सातवी मागणी राजकीय बंदिवानांची मुक्तता करणें. ती पुरी करण्याइतकी सरकारला दुसरी सोपी गोष्ट कोणती? आणि तीहि न घडली तर

देशांत शांततेचें वातावरण कसें निर्माण होणार ? व दिलजमाईचें वारें वाहूं लागलें नाहीं तर इकडील चळवळ कशी थांबणार ? किंवा विलायतेंतलें राउंड टेबल कॉन्फरन्सचें तारूं परतीराला कसें जाणार ? आठवी मागणी अशी कीं, गुप्त पोलीसखात्यावर राष्ट्राची हुकमत राहिली पाहिजे. यांत गुप्त पोलीस-खातेंच नको अशी मागणी नाहीं हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. उद्यां आमचें स्वराज्य झालें तरी त्यालाहि गुप्त पोलीसखातें म्हणून कांहीं लागेलच. पण तें लोकपक्षीय अधिकारी मंडळाच्या ताब्यांत राहील व हल्लींसारखे चाळे करणार नाहीं.

नववी मागणी ही कीं, स्वसंरक्षणाकरितां हत्याराचे परवाने सहज मिळावे. या बाबतींत माझे मित्र डॉ. मुंजे हे असेंब्लींत सर्वसंमत अशी चळवळ करीत आहेत. तेव्हां त्यासंबंधानें मला अधिक सांगावयास नको. तात्पर्य, गांधीजींची कोणतीहि मागणी घ्या ती सयुक्तिक आहे, असें सहज सिद्ध करतां येईल. व गांधींचें झालें तरी म्हणणें हेंच कीं, आमच्या मागण्या पुरवा नाहीं तर स्वराज्य झालें म्हणजे त्या आपल्या हातानें आम्ही पुरवून घेऊं. अर्थात् ही गोष्ट अधिकारी-मंडळ राष्ट्राला जबाबदार झाल्याशिवाय आपल्या हातानें करून घेतां येत नाहीं. यावरून गांधीजींच्या सवलतीच्या मागण्यांतूनहि माझ्या आजच्या सूचनेंतील जबाबदारीच्या स्वराज्याची मागणी आपोआपच कशी निष्पन्न होते हें आपणाला दिसून येईल.

यावर तुम्ही कोणी मला म्हणाल कीं, तुम्हाला उद्यां स्वराज्य दिलें तरी वरील सर्व मागण्या तुमच्या पदरांत पडतीलच हें कशावरून ? त्याला मींहि उलट उत्तर म्हणून असें विचारीन कीं, स्वराज्यांत या मागण्या आमच्या पदरांत पड-णार नाहींतच असें तुम्ही तरी कोणाच्या आधारानें म्हणतां ? माझा तर असा विश्वास आहे कीं, स्वराज्य मिळाल्यास आम्ही या सुधारणा खचित घडवून आणूं. पण क्षणभर तुमचेंच म्हणणें खरें असें घेऊन चाललों तरी, त्यावर फिरून माझें म्हणणें असें कीं, पूर्ण लोकनियुक्त कायदे-मंडळ व जबाबदार प्रधान-मंडळ या गोष्टी लाभल्या असतांहि या सुधारणा घडून आल्या नाहींत तर आम्ही स्वतःलाच दोष देऊन स्वस्थ न बसतां त्या मिळेपर्यंत एकामागून एक मंत्रिमंडळें उलथून पाडूं. एका मंडळाच्या हातून हें काम न झालें तर दुसरें नेमूं, व त्या त्या मताचे मतदारसंघ बनवूं, व इतकेंहि करून एखादी गोष्ट न घडली तर राष्ट्राला ती नको आहे हें आपोआपच सिद्ध होईल व

ही गोष्ट राष्ट्रालाच नको असें ठरल्यावर तक्रार कसली ? पण हल्लीं मात्र हें घडत नाहीं. मंत्रिमंडळें उलथून पाडतां येत नाहींत. मत किंवा योजना पुढें मांडणाराला तिचा प्रयोग आपल्या हातानें करून पाहण्याला सवड मिळत नाहीं, ही तक्रार आहे; व ती खरीच आहे. तात्पर्य, स्वराज्य याचा अर्थच हा कीं, मनाला सुचलेली गोष्ट करून पाहण्याची संधि व स्वतंत्रता राष्ट्राला असली पाहिजे. मग त्यांत चुका झाल्या तरी त्याचा दोष लागत नाहीं. दांतांनीं ओठ चावले तर आपलेच दांत आपलेच ओठ.

स्वातंत्र्यामध्यें चांगल्या गोष्टींबरोबर वाईट गोष्टी घडण्याचा संभव अंतर्भूत असतो. मनुष्याचा आत्मा मागतो तें हेंच कीं, बरें किंवा वाईट घडणें कांहीं असलें तरी, मला कर्माधिकाराचें स्वातंत्र्य हवें, मलाच मी जबाबदार राहीन व चांगल्याचे व वाइटाचे परिणाम मींच सोशीन. स्वयंपाकी हाच जेवणारा असला म्हणजे भाकरी करपल्याची तक्रार उरतच नाहीं. जबाबदारीचें राजकीय स्वराज्य राष्ट्र स्वतःकडेच मागतें व स्वतःच तें देतें. या देण्याघेण्यांत व करण्या-सवरण्यांत राष्ट्रीय जीविताचें सर्वसार संग्रहीत आहे. तें असलें तरच राष्ट्राला आपण जिवंत आहों असें वाटतें. राष्ट्राच्या बुद्धीला विकास मिळूं शकतो व राष्ट्राच्या आत्म्याला सद्‍गति मिळालीसें वाटतें.

जबाबदारी या शब्दांत सत्ता आणि सत्तेचें नियंत्रण ह्या दोन्ही गोष्टी येतात. इतकेंच नव्हे तर मंत्रिमंडळ, कायदेमंडळ, मतदारसंघ व अखिल जनता या चौघांमध्यें राजकीय सत्ता व नियंत्रण हीं यथाप्रमाण वाटून देणारा ताजवा जबाबदारीच्या कांट्यावरच झुलत असतो. आज अधिकारीमंडळ जबाबदार आहे पण तें कोणाला? तर ६००० मैल दूर असलेल्या स्टेट सेक्रे-टरीला; व तोहि फिरून जबाबदार कोणाला, तर ब्रिटिश जनतेला! जबाब-दारीचें स्वराज्य या ब्रिटिश मुलखांतच आम्हांला हवें असें नाहीं; तर संस्थानी मुलखांतहि एखाद्या संस्थानांत सुराज्य नसलें तर आम्ही प्रथम सुराज्यच मागतों. पण सुराज्य असलेल्या संस्थानांतहि आम्ही त्यापुढें एक पाऊल जाऊन स्वराज्य मागतों. अर्थात् अधिकारी हा हिंदी असला तरी तेवढ्यानें स्वराज्याची मागणी पुरी होत नाहीं. याचा अर्थ आम्ही स्वराज्याची मागणी मागतों ती केवळ इंग्रजांना खिजविण्याकरितां नव्हे. पण गोष्ट इतकी सरळ असतांहि जर मागणी मान्य न होईल तर काय होणार हें दिसतेंच आहे. हिंदी राष्ट्र आपल्या पायावर आतां खडें उभें राहिलें आहे. त्याला आपलें चुकतें

कोठें, किंवा आपला कमीपणा कशांत आहे हें जसें कळतें तसें आपण कशांत खंबीर आहों व आपली चढती बाजू कोणती हेंहि त्याला कळूं लागलें आहे. यामुळें त्याचें पाऊल आतां माघारें पडणार नाहीं. एखाद्या धाडसी प्रवाश्या-प्रमाणें त्यानें आपल्या तंबूच्या काठ्या पाडून तंबू गोळा करून घेतला आहे. आशेचे सुरेल नाद त्याच्या कानांत घुमूं लागले आहेत व आत्मविश्वासाचें बळ त्याच्या पायांत खेळूं लागलें आहे. त्याला क्षितिजावर दुरून डोमीनियन स्टेटसचें स्वराज्य व पूर्ण स्वातंत्र्यमय स्वराज्य यांची सरमिसळ झालेली दिसत आहे. पण त्यांपैकीं आपलें ध्येय कोणतें हें ठरविणें हें सरकारच्या तत्परतेवर अवलंबून राहील.

---

# टॅरिफ बिल

[ ता. २६ मार्च १९३० रोजीं ले. असेंब्लींत टॅरिफ बिलावर रा. न. चिं. केळकर यांनीं केलेल्या विस्तृत भाषणाचा थोडक्यांत सारांश दिला आहे. ]

या बिलाचा विचार करतां एखाद्या न्यायकोर्टानें मुद्दे काढावे त्याप्रमाणें खालील प्रश्न सुचतात. बिलानें हिंदी गिरण्यांना ऐन संरक्षण किती मिळतें! यापूर्वीं फायनॅन्स बिलानें किती दिलें आहे? हीं दोनहि कलमें जमेस धरलीं तरी मिळणारें संरक्षण पुरण्यासारखें आहे काय? नसेल तर तें कोणत्या रीतीनें देतां येईल? बिलानें दिलेलें आजचें संरक्षण हें मोकळ्या मनानें स्वीकारल्यासारखें निर्दोष आहे काय? व गिरणीवाल्यांनीं तें स्वीका-रलें तरी लोकमतानें त्याला मान्यता द्यावी काय? यांपैकीं कांहीं मुद्दयांना मी उत्तरें देणार आहें.

माझ्या मतें हल्लींचें संरक्षण गिरण्यांना पुरण्याइतकें नाहीं व या बिलानें ज्या स्वरूपांत तें दिलें जातें तें तसें स्वीकारण्यासारखें नाहीं. कोणी म्हणेल कीं, फायनॅन्स बिलानें दिलेलें १५ टक्के व एक्साईज ड्यूटी निघाल्यानें मिळणारें ३½ टक्के आणि जपान वगैरे राष्ट्रांच्याविरुद्ध मिळणारें जादा ५ टक्के मिळून प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष असें २३½ टक्के संरक्षण मिळालें तें काय थोडें झालें? पण प्रथम-दर्शनींच यांतलें १२½ टक्के नव्या हुंडणावळीच्या दरानें काढून घेतलेलें आहे. एक्साईज ड्यूटी उठविली त्यामुळें फक्त अन्याय दूर झाला म्हणून तें संरक्षण

या सदराखालीं पडत नाहीं. एतावता फक्त ७३/४ टक्केच संरक्षण गिरण्यांच्या पदरीं पडणार. पण फिरून यांतील ४ टक्के ( आयात जकात ११ होती ती १५ केली यामुळें मिळालेलें ) सरकारला आज पैशाची गरज म्हणूनच दिलें गेलें. तें संरक्षण द्यावें म्हणून दिलेलें नाहीं. इतकें खोलांत शिरलें म्हणजे खरें संरक्षण देण्याच्या बुद्धीनें दिलेलें किती थोडें जागेवर उरतें हें सहज लक्षांत येईल.

गिरणीवाल्यांवरील सर्व आक्षेप मला विदित आहेत. पण या वेळीं ते लक्षांत घेणें अप्रयोजकपणाचें आहे. कांहीं झालें तरी गिरण्यांचा धंदा हा राष्ट्रीय धंदा नव्हे असें म्हणणें चुकीचें ठरतें. एकट्यादुकट्या हिंदी प्रजाजन व्यक्तीला जर आपण 'नॅशनल ऑफ इंडिया' म्हणतों तर गिरण्यांचा हा सामुदायिक धंदा राष्ट्रीय कां नव्हे? तो सर्व धंदाच्या धंदा सरकारी मालकीचा होईल तेव्हां त्याला 'नॅशनलाइज्ड' हा शब्द लावतां येईल. पण तोंपर्यंत नॅशनल असें तरी म्हटलेंच पाहिजे. जमशेटपूर येथील टाटाच्या कारखान्याला, त्यांतील कांहीं दोष माहीत असतांना, असेंब्लीनें संरक्षण दिलें कीं नाहीं? उद्यां ट्रेड यूनियन्सच्या हिताचें एखादें बिल पुढें आल्यास जर कोणी असें म्हणूं लागेल कीं, कांहीं कांहीं ट्रेड यूनियन्समध्यें पैशाची अफरातफर होते, किंवा ट्रेड यूनियन परिषदेंत कम्युनिझमला अनुकूल ठराव होतात तर या गोष्टी आपण गैरलागू ठरविणार नाहीं काय? शिवाय मुंबई शहरांतील गिरण्या सदोष असोत, पण निदान अहमदाबाद, दिल्ली वगैरे ठिकाणच्या गिरण्यांवर तरी असले आक्षेप कोणी घेत नाहींत. मग त्यांना जपानविरुद्ध संरक्षण कां नको? वड्याचें तेल वांग्यावर काय म्हणून? असो. आपला खरा राग गिरण्यांविरुद्ध असतां कामा नये, तर सरकारविरुद्ध. कारण त्यानें या बिलानें गिरणीवाल्यांना व आम्हाला कोलदांडा घातला आहे. ख्रिस्ती पुराणांतील सैतान हा मनुष्यमात्राला लोभ दाखवून त्यांना नरकांत खेचतो त्यांतलाच प्रकार सरकारनें येथें केला आहे. बिलाच्या प्रस्तावनेंत सर जॉर्ज रेनी यांनीं असा कांहीं आव आणला आहे कीं, हें बिल ताबडतोब मंजूर न केलें तर चार-सहा महिन्यांत गिरण्या नामशेष होऊन जातील. साहेबमजकुरांना या देशी धंद्याची इतकी कळकळ वाटत होती तर १९२७ सालीं गिरणीवाले हातापाया पडून संरक्षण मागत होते, तेव्हांच तें कां दिलें नाहीं? पण न दिलें याचें कारण इतकेंच कीं, तेव्हां सरकारी बजेटांत हल्लींसारखी तूट पडली नव्हती.

आजचें हें सरकारचें वर्तन म्हणजे तहान लागल्यावर विहीर खणण्यास प्रारंभ करण्यासारखें आहे.

बरें, जें संरक्षण देण्याला काढलें तें तरी भरपूर व कायमचें असावें तर तसेंहि नाहीं. बिलांतच जादा संरक्षणाची मुदत ३ वर्षे घातलीं आहे. म्हणजे ऊन लागतें म्हणून घर बांधून दिलें नाहीं तर फक्त डोक्यावर छत्री धरली. या तीन वर्षांत पहिलें वर्ष असें तसेंच जाणार! कारण जादा जकातीची बोलवा ऐकून जपानी व्यापाऱ्यांनीं आगबोटी एकामागून एक पाठवून आपला माल इतका भरला कीं, तो एक वर्षभर इकडील मालाला हार जाणार नाहीं आणि तिसऱ्या वर्षांतील कांहीं थोडे महिने गेले म्हणजे टॅरिफ बोर्डाची चौकशी सुरू होणार! मिळून मधलें एकच वर्ष काय तें हें संरक्षण हिंदी गिरणीवाल्यांच्या पदरांत अबाधित पडेल आणि त्या अवधींत झालें तरी जपानी माल मागें रेटला गेल्यानें रिकामी पडलेली जागा मँचेस्टरवाल्यांनीं आपल्या मालानें काबीज केली नाहीं तर!! हें झालें फायद्याचें कलम. याच्या उलट तोट्याचीं कलमें किती तरी! जपान, इटाली, बेल्जम वगैरे देशांचें वैर संपादावयाचें; इकडील कापसाचें गिऱ्हाईक थोडेंबहुत तोडावयाचें; देशांतील स्वदेशी बहिष्काराच्या प्रवर्तकांना नाराज करावयाचें व सर्वांत मोठी आपत्ति ही कीं, हिंदी गिरणीवाल्यांनीं विलायतेस जाऊन इंपीरियल प्रेफरन्सच्या बाबतींत विलायती गिरणीवाल्यांशीं गुप्त संगनमत केलें असा जो आधींच त्यांच्यावर आरोप आहे तो दृढ करावयाचा.

मि. एच्. पी. मोदीः—गिरणीवाल्यांच्या संघानें हा अपराध केलेला नाहीं. कोणा व्यक्तीविषयीं मी काय सांगूं?

अध्यक्षः—केळकर तरी कांहीं व्यक्तींना उद्देशूनच बोलले.

सर जॉर्ज रेनीः—सरकारनें अशा संगनमतांत केव्हांहि भाग घेतला नाहीं.

रा. केळकरः—गोष्ट तर घडते व सर्व नामानिराळे राहतात याचेंच नांव नाटक.

मि. बी. दासः—तें कां? मी सर नेस वाडिया यांचें स्पष्टच नांव घेतों.

मि. के. सी. नियोगीः—सर्व्हंट ऑफ इंडिया पत्रांत जेव्हां ती गोष्ट स्पष्टच म्हटली होती तेव्हांच त्याचा इन्कार कां केला नाहीं? तेव्हां नसो; पण कोणी तरी, केव्हां तरी इन्कार केला काय?

रा. केळकर— तात्पर्य इतकेंच कीं, इतक्या यांत भानगडी असल्यामुळें गिरणीवाल्यांनीं फायनॅन्स बिलांतील १५ टक्के जकातीनें Revenue duty जेवढें संरक्षण अप्रत्यक्ष मिळालें आहे तेवढेंच घेऊन स्वस्थ बसावें. पण म्हण आहे ना कीं, 'बुभुक्षितः किं न करोति पापम्'. एवढा विश्वामित्र ऋषि पण त्यानें दुष्काळ पडला तेव्हां मेलेल्या कुत्र्याचें मांस खाल्लें असें पुराण सांगतें; मग गिरणीवाल्यांना तरी काय दोष द्यावा ? पण माझे मित्र शेठ घनश्यामदास बिर्ला हे स्वतः गिरणीवाले असतां, त्यांनीं साम्राज्यपक्षपाताला विरोध करून जी स्वार्थत्यागी बाणेदार वृत्ति दाखविली ती अनुकरणीय आहे इतकें म्हटल्याशिवाय माझ्यानें राहवत नाहीं. गिरणीवाल्यांनीं सरसकट २० टक्के जकातीला संमति द्यावी म्हणजे स्वार्थ व परमार्थ दोनहि साधतील. वीसच काय पण निरनिराळ्या देशांचीं आयात जकातींचीं कोष्टकें काढून पाहा. त्यांत जकातीचें मान परदेशी मालावर ३०-४०-५० टक्केहि सांपडेल. असो.

आपण गिरणीवाले सोडून क्षणभर सरकारकडे वळूं. या बिलांत 'इंपीरिअल प्रेफरन्स' म्हणजे ब्रिटिश साम्राज्याला पक्षपात आहे कीं नाहीं, याबद्दल आमच्या प्रधानमंडळांतच मतभेद आहे. सर जॉर्ज रेनी हा पक्षपात असल्याचें उघड कबूल तरी करतात. पण सर जॉर्ज शूस्टर हे अधिक वस्ताद. ते म्हणतात "या बिलांत इंपीरिअल प्रेफरन्सचा स्वीकार किंवा शिफारस केलेली नाहीं. नडीच्या वेळीं म्हणून कांहीं एका विशिष्ट उपायाचा तात्पुरता अवलंब केला आहे." (येथें केळकरांनीं विलायतेंतला एक पाद्री भट व एक अविवाहित माता यांची विनोदी गोष्ट सांगितली, व सर जॉर्ज शूस्टर यांचेच शब्द घेऊन त्यांची चेष्टा केली तेव्हां सभागृहांत मोठाच हशा पिकला.)

सर जॉर्ज शूस्टर यांचें समाधान या लपंडावानें किंवा ढोंगीपणानें झालें नाहीं. कारण त्यांनीं असाहि बहाणा केला आहे कीं, या बिलाच्या योगानें मॅाटेग्यु-चेल्म्सफर्ड रिपोर्टांत व क्रयू कमिटीच्या रिपोर्टांत हिंदुस्थानला जें आर्थिक स्वातंत्र्य ( Fiscal Autonomy ) देण्यांत आलें आहे, त्याचें फल हिंदुस्थानच्या पदरांत पडत आहे. पण ही मात्र ढोंगीपणाची कमालच झाली. या आर्थिक स्वातंत्र्याची कल्पना अशी आहे कीं, हिंदुस्थान सरकार व हिंदी कायदेमंडळ यांची एकवाक्यता ज्या आर्थिक प्रश्नावर होईल त्यांत स्टेट-सेक्रेटरीनें विलायतेहून ढवळाढवळ करूं नये. पण येथें खरा प्रकार काय आहे तो पाहा. शूस्टरसाहेब म्हणतात. आम्हाला साम्राज्यपक्षपात करून

जपानविरुद्ध ५ टक्के जादा जकात बसविण्याची सूचना लँकेशायरकडून झाली नाहीं किंवा स्टेट-सेक्रेटरीकडूनहि झाली नाहीं. असेंब्लीकडे पहावें तों बिलाला अनुकूल असणारे लोकहि इंपीरिअल प्रेफरन्सचा उल्लेख करतांना त्याची खंती प्रकट करून हातांत नाक धरूनच बोलतात. सरकारी सभासद बाजूला ठेवून फक्त लोकनियुक्त सभासदांच्या मतानें हें बिल निकालांत काढा असें म्हटलें तर तेंहि सरकार मान्य करीत नाहीं. या सर्वांचा अर्थ हाच कीं, हिंदुस्थान सरकारनें जें कांहीं योजिलें त्याला आम्हीं अशा जुलमानें संमति द्यावी, आणि विलायतेहून आलेली स्फूर्ति किंवा सूचना लपवून ठेवून, सरकारनें टाळी वाजवून जाहीर करावें कीं, ही पाहा, हिंदुस्थानला आर्थिक स्वतंत्रता मिळाली ! पण आम्हाला हें माहीत आहे कीं, साम्राज्यपक्षपाताची ही कल्पना मुळांत येथली नव्हे; ती विलायतेंतून आली आहे ! तसें नसतें तर यासंबंधींचा एकंदर पत्रव्यवहार आमच्यापुढें मांडा अशी मागणी आम्हीं केली असतां तो तुम्ही टेबलावर कां ठेवीत नाहीं ? इकडे म्हणतां असेंब्ली विश्वासांत घेतों आणि इकडे पत्रव्यवहार गुप्त ठेवतां ! या विसंगतीचा मेळ कसा घालावयाचा ! तुमच्या विलायतच्या धन्यांना हवें तेंच तुम्हीं केलें, आणि आम्हांला चिमट्यांत धरून आमची संमति घेतली, तर मग स्टेट-सेक्रेटरीला न जुमानण्याचें धैर्य दाखविण्याचा प्रश्नच कोठें उत्पन्न होतो ? अर्थात् आर्थिक स्वातंत्र्याचा हा सरकारचा बहाणा फोल आहे व लज्जास्पद आहे, हें कळण्यापुरती बुद्धि तरी देवानें आम्हाला दिली आहे, मग सत्ता असो वा नसो. पण पूर्वीं सांगितलेल्या त्या 'अविवाहित माते'च्या गोष्टीचाच उल्लेख करून मी म्हणतों कीं, हिंदुस्थान सरकार हें आईच्या ठिकाणीं आहे व लोकप्रतिनिधि मंडळ हें बापाचे ठिकाणीं आहे. म्हणून आम्हांला या बिलाचा निषेध, इन्कार व धिक्कारच केला पाहिजे. कारण हें बिल म्हणजे कायदेशीर औरस संतति नव्हे. हिंदुस्थान सरकाररूपी मातेनें ही वाममार्गानें केलेली प्रजोत्पत्ति होय ! तेव्हां त्याला असेंब्ली दुरून तरी स्पर्श कशी करील ?

यानंतर केळकर यांनीं लँकेशायरच्या हिताकरितां हिंदुस्थानांतील कापडाच्या धंद्याचा नाश पद्धतशीर रीतीनें हिंदुस्थान सरकारनें कसा केला याचा त्रोटक वृत्तान्त सांगितला व शेवटीं बजावलें कीं, हल्लींचें बिल हें सरकारची तिजोरी भरण्याकरितां पुढें आलें आहे, गिरणीवाल्यांना संरक्षण देण्याकरितां पुढें आलेलें नाहीं अशी आमची खात्री आहे; व स्वतः गिरणीवाल्यांनींहि उलट

भ्रम डोक्यांत ठेवूं नये. त्यांनीं उष्टें खाण्याकरितां तोंड उघडलेंच आहे, पण त्यांत खरें तूप तरी किती आहे हें तरी नीट पाहावें.

---

## असेंब्लींतील जागेचा राजीनामा

[ १९३० सालीं रा. न. चिं. केळकर यांनीं असेंब्लींतील आपल्या जागेचा राजीनामा व्हाइसरॉयसाहेबांकडे पाठविला. त्याबरोबर जें पत्र पाठविलें त्यांत खालील मजकूर आहे.]

"टॅरिफ बिलासंबंधानें सरकारनें जें धोरण स्वीकारलें तें पाहून मला अतिशय खेद झाला; व माझ्या कांहीं मित्रांनीं या धोरणाच्या रागावरच असेंब्लींतील जागांचे राजिनामे पाठविले आहेत. मला आशा आहे कीं, ज्या मुद्द्यावर त्यांनीं हे राजिनामे पाठविले त्याला अनुलक्षून ते फिरून निवडणुकीस उभे राहून व निवडून येऊन त्यासंबंधीं लोकमत व्यक्त करतील. परंतु मी जो राजीनामा पाठवीत आहे, त्याचें कारण केवळ खासगी आहे. तें असें कीं, चालू कायदेभंगाच्या चळवळींत मी कदाचित् समाविष्ट झाल्यास मला सिमला येथील बैठकीस हजर राहतां येणार नाहीं. पण तेंहि न घडलें तरीं सिमला येथलि बैठकीस मला इतर कारणांकरितांहि हजर राहतां येईल असें वाटत नाहीं. म्हणून मी आधीं इतक्यांतच आपला राजीनामा पाठवीत आहे. हेतु हा कीं, या पुढील दोन महिन्यांत माझ्या जागीं फेरनिवडणूक होऊन दुसरा कोणी उमेदवार जूनच्या बैठकीपूर्वी निवडून येणें शक्य व्हावें.

आज पांच सहा वर्षे मी असेंब्लींत सरकारचें धोरण पाहत आहे, व त्याचा निषेध करावा तितका थोडाच होईल. बेजबाबदारीची सनदच ज्यांना मिळाली, व या सनदेनें जे स्वतःस धन्य मानतात, त्या अधिकारी मंडळानें अराष्ट्रीय किंबहुना उपमर्दकारक धोरण ठेवावें यांत काय आश्चर्य ? हल्लींच्या राज्यघटनेंतहि जें सहजासहजीं लोकांच्या पदरीं पडावें तेंहि सरकार पदरीं पडूं देत नाहीं. पण त्यांचें वर्तन कसेंहि असलें तरी निदान लोकांनीं तरी आपलें धोरण कसें ठेवावें याविषयीं संशय असण्याचें कारण नाहीं. तें धोरण असेंच असलें पाहिजे कीं, हल्लींच्या राज्यघटनेंत लोकांना मतदारसंघाच्या

द्वारें जी थोडीबहुत सत्ता मिळाली आहे तिचा उपयोग भरपूर करून घेऊन नवीन हक्कांकरितां झुंजण्यासाठीं खंबीर व निश्चयी असे प्रतिनिधी निवडून दिले पाहिजेत, त्यांच्या तोंडून शक्य तितका जोरदार निषेध अधिकारी-मंडळाला प्रत्यक्ष कानांनीं ऐकविला पाहिजे, व इतर उद्योग व खटपटी करून नसलेलेहि हक्क मिळविले पाहिजेत. म्हणून जागा रिकाम्या टाकणें हें आत्मघातकीपणाचें होईल. सरकारला काय? कोणी वैतागानें किंवा इतर कशानें आपल्या जागा रिकाम्या टाकल्या तर सरकारचें आयतें बरेंच झालें. त्यांच्या बेजबाबदारीच्या दुधांत ही साखरच पडली म्हणावयाची! असो.

माझा हा राजीनामा टॅरिफ बिल किंवा राउंड टेबल कॉन्फरन्स किंवा दडपशाही यांपैकीं कोणत्याहि गोष्टीला उद्देशून दिलेला नाहीं. कारण यांपैकीं एकहि गोष्ट केवळ लोकांनीं राजिनामे दिल्यानें सुधारणारी नाहीं. असेंब्ली-बाहेर देशांत होणाऱ्या इतर चळवळींबरोबरच ते जाग्यावर राहून झगडतील तरच थोड्याबहुत त्या गोष्टी सुधारणार आहेत. अर्थात् माझ्या राजिनाम्याचा कारणें खासगी व्यक्तिविषयक आहेत, व माझ्या जागेकरितां फेर निवडणूक होणें ती सरकार लवकरच करील अशी मला आशा आहे.''

---

# पंडित मालवीय व महाराष्ट्र

पंडित मदन मोहन मालवीय यांनीं १९३१ सालीं वाई-सातारा भागांत एक लहानसा दौरा काढला होता तो अनेक दृष्टींनीं यशस्वी झाला. आज दोन वर्षें ते जून महिन्याचे सुमारास पुण्यांत येऊन कांहीं दिवस राहात असतात. त्याचें एक कारण या दिवसांत पुण्याची हवा समशीतोष्ण, विशेषतः काशीप्रयाग यांच्या तुलनेनें थंड व उत्साहवर्धक असते. आज उतारवयांत त्यांना अशा थंड हवेंत कांहीं दिवस विश्रांति घेणें अवश्यच झालें आहे. मन कितीहि उद्योगप्रिय व स्वाभाविक उल्हासानें तरतरीत असलें तरी शरिरापुढें कोणाचाहि इलाज चालत नाहीं. आणि मृगशीतळाईच्या थंड वाऱ्याची झुळूक अंगाला लागल्याबरोबर पंडितजी जे आनंदोद्गार काढतात ते ऐकले म्हणजे, या वृद्ध देशभक्ताला इतकें तरी सुख आपणाला देतां येतें या विचारानें महाराष्ट्राला कृतार्थताच वाटेल.

* * *

पण पंडितजींचा पुण्यास येण्यांत येवढाच उद्देश नसतो. त्यांना देशांत कोठें काय चाललें आहे हें पाहण्याची फार हौस, म्हणून पुण्यास ते विश्रांतीकरितां आले तरी क्षणभरहि स्तब्ध बसत नाहींत. ते शहरांतील संस्थांना भेटी देण्यांत तरी गुंतलेले असतात, किंवा कोणत्या ना कोणत्या संस्थेच्या चालकांशीं ते घरींहि विचारविनिमय करीत बसलेले असतात. समजून घेण्याप्रमाणें समजून देणें व सुचाविणें याचीहि त्यांना फार हौस असल्यामुळें, ज्ञानाच्या घेवीबरोबरच त्यांची ज्ञानाची देवहि सुरू असते. आणि वेदान्तापासून वास्तुविधानापर्यंत असा एकहि विषय निघूं शकत नाहीं कीं ज्यांत पंडितजींना कोणास कांहीं विधायक सूचना करावयाच्या नसतात. ज्ञान व कर्तृत्व यांच्या जाणिवेचा त्यांचा ओघ अनिरुद्ध असाच असतो.

* * *

पुण्यास ते सर्व्हेंटस् ऑफ इंडिया सोसायटींत उतरतात. कै. गोखले यांचा व पंडितजींचा फार जुना स्नेह. यामुळें सोसायटी हें एक प्रकारें आपलें घर असें ते सहजच मानतात. आज तरी ते नैमित्तिक चळवळीच्या राजकीय बाबतींत सोसायटीच्याच मताचे सर्वस्वीं नाहींत; तसेंच धर्म, समाजशास्त्र व महाराष्ट्रीय इतिहास या विषयांत त्यांच्याशीं समानधर्म असे लोक सोसायटीच्या आवारांत जितके आहेत त्यांपेक्षां बाहेरच अधिक आहेत. तथापि जुने ऋणानुबंध, सोसायटीचे कुंझरूसारखे कांहीं आजचेहि सभासद, आणि राजकीय विषयांतील नित्य स्वरूपाचें सर्वसामान्य धोरण या दृष्टीनें ते सोसायटीलाच अधिक जवळ आहेत. पण विशेष हा कीं, आपपरभाव, दूषित दुराग्रह यांच्यामुळें दळणवळण व विचारविनिमय या बाबतींत कित्येक लोक जसे मनांत अढी धरून वागतात तसे पंडितजी वागत नाहींत; म्हणून सर्वांना ते आपलेसेच वाटतात.

* * *

पंडितजींनीं ज्ञानलालसेनें व विशेषतः हिंदु युनिव्हर्सिटीच्या वर्गण्या गोळा करण्याचे उद्योगांत, सर्व हिंदुस्थान अनेक वेळ पालथा घातला आहे; व सर्व प्रांतांवर त्यांचें प्रेमहि आहे. तथापि महाराष्ट्रावर आपलें प्रेम विशेष आहे असें जेव्हां ते बोलून दाखवितात तेव्हां ते उगीच तोंडदेखलें कांहीं तरी बोलतात असें सहसा म्हणवत नाहीं. रानड्यांशीं झटून पूज्य बुद्धीनें, गोखल्यांशीं जुटून प्रेमबुद्धीनें, व टिळकांशीं तुटून आदर बुद्धीनें वागण्यांत पंडितजींचा जन्म

गेला. यामुळें महाराष्ट्राशीं त्यांचा अखंड संबंध जन्मभर राहिला आहे. पण महाराष्ट्राच्या इतिहासानें त्यांच्यावर जी मोहनी घातली आहे ती कांहीं विशेषच आहे. ते नेहमीं म्हणतात कीं, 'मीं येवढें हिंदु विद्यापीठ बनारसेस स्थापलें पण त्यांत महाराष्ट्रीय 'स्पिरिट' उत्पन्न करण्याचा उद्योग मला अजून आणखी कांहीं काळ केला पाहिजे.'

मराठ्यांनीं हिंदवी स्वराज्य स्थापून व गाजवून भरतखंडाची विशेष प्रकारची सेवा केली असें त्यांचें मत आहे. उत्तर हिंदुस्थानांत मराठ्यांच्या हातून झालेल्या कांहीं कृत्यांबद्दल बंगाली—हिंदुस्थानी लोकांप्रमाणें पंडितजींच्या मनांत नापसंती असणारच. पण आतां हिंदुस्थान हें एक अखंड राष्ट्र अशी भावना उत्पन्न झाल्यामुळें, मराठे उर्मट किंवा लुटारू प्रवृत्तीचे होते, या उत्तर-हिंदुस्थानीय समजुतींत व्यक्त होणाऱ्या मराठ्यांच्या दोषांपेक्षां, त्यांच्या पराक्रमादि गुणांकडेच पंडितजींचें लक्ष अधिक वेधतें. पुण्याच्या भारत-इतिहाससंशोधकमंडळांतील सवाई माधवरावांच्या दरबारचें चित्र व नव्या पुलापलीकडील शिवाजीचा पुतळा पाहून त्यांना वाटलें कीं, हीं दोनहि उचलून आपल्या युनिव्हर्सिटींत नेऊन ठेवतां आलीं तर काय बहार होईल! तूर्त त्यांनीं युनिव्हर्सिटींत 'शिवाजी–हॉल' म्हणून एक इमारत बांधली असून, ती एखाद्या महाराष्ट्रीय संस्थानिकाच्या हातून उघडवावी व तींत एखाद्या महाराष्ट्रीय इतिहासज्ञाकडून एखादी व्याख्यानमाला गुंफवावी असा त्यांचा मनोदय असल्याचें त्यांनीं नुकतेंच बोलून दाखविलें आहे.

* * *

जमल्यास पुढच्या सालीं त्यांचा असाहि एक विचार आहे कीं, उन्हाळ्याचे तोंडीं काशी हिंदु विद्यापीठाच्या इतिहासशाखेचे कांहीं विद्यार्थी, बरोबर त्यांचे एकदोन अध्यापक देऊन, महाराष्ट्रांत पाठवावयाचे व त्यांच्याकडून महाराष्ट्रांतील व कोंकणांतील किल्ले आणि इतिहासप्रसिद्ध स्थळें यांची 'यात्रा' करवावयाची. तळेगांव-वडगांवच्या दरम्यान महादजी शिंद्यानें इंग्रजांचा पराभव केला ही गोष्ट त्यांना माहीतच नव्हती. पुरंदरचा किल्ला दुरून पाहतांना पुरंदरच्या तहाच्या गोष्टींवरून, ही इंग्रजांच्या प्रत्यक्ष पराभवाची गोष्ट त्यांना प्रथम कळली. तेव्हां 'अरेरे! मी किती अज्ञानी आहें' असे उद्गार त्यांनीं काढले व या ज्ञानाचा उपयोगहि त्यांनीं ताबडतोब याच दौऱ्यांत केला तो असा. वाई, सातारा, कऱ्हाड येथील व्याख्यानांत गोलमेज परिषद,

सँढर्स्ट कॉलेज व लष्करी सत्ता हे विषय निघाले असतांना ते श्रोतृवृंदाला विचारीत, " बोलो, वडगांवके युद्धमें इंग्रजोंको चीत करनेवाले महादजी कोनसे सँढर्स्टमें पढे थे ? " हें मार्मिक वाक्य ऐकतांच सर्व सभा हसून बेजार होई.

* * *

वाईचे चौंडेमहाराज, मसूरचे विनायकमहाराज इत्यादि लोक राजकारणांत पडणारे नव्हत. तथापि पंडितजींचा व त्यांचा यापूर्वी बरेच दिवसांचा परिचय आहे. वाईची गोशाळा आज पुष्कळ दिवस बांधून राहिली होती; पण पंडितजींच्याशिवाय इतर कोणाच्या हातून ती उघडावयाचीच नाहीं असा धर्मवीर भागुजीबुवा कीर यांचा निश्चय होता, व तो पुरा करण्याकरितांच पंडितजी वाईला गेले. तेथील समारंभ फार प्रेक्षणीय झाला. पंडितजींचें गाईवर फार प्रेम. यामुळें हा समारंभाचा दिवस त्यांनीं मोठ्या आनंदांत काढला. वाईचीं सुंदर देवळें व घाट पाहून तर पंडितजी डोलूं लागले. गोशाळेनजीक कै. विसूभाऊ साळवेकर यांच्या स्मरणार्थ बांधलेल्या संगमरवरी दत्तमंदिरांचेंहि त्यांनीं प्रेमानें दर्शन घेतलें. दुसरे दिवशीं क्षेत्र महाबळेश्वर पाहून परत पांचगणीस येऊन तेथील हिंदु हायस्कूलला व पार्शी हायस्कूलला त्यांनीं भेट दिली. महाबळेश्वरापेक्षां पांचगणीच पंडितजींना अधिक आवडली असें दिसलें. न जाणो पुढच्या वर्षीं कांहीं दिवस त्यांचा मुक्काम पांचगणीलाच होईल.

* * *

वाईनंतर सातारा, कऱ्हाड हीं गांवें ओघानेंच आलीं. तेथील निमंत्रणांना त्यांना नाहीं म्हणवेना. साताऱ्यास त्यांना दाखविण्यासारखें कांहीं स्थळ नव्हतें. जुना राजवाडा व नवा राजवाडा म्हणतांच त्यांनीं तिकडे आस्थेनें नजर फेकली. पण एकांत सरकारी हायस्कूल व दुसऱ्यांत सेशन कोर्ट आहे असें सांगतांच त्यांनीं चटदिशीं दुसरीकडे मान वळविली. फक्त माहुलीस जाऊन त्यांनीं संगमक्षेत्र पाहिलें. कन्याशाळा, राष्ट्रियशाळा व भाऊ पाटलांचें अस्पृश्य वसतिगृह येवढ्याच संस्था त्यांनीं साताऱ्यास पाहिल्या. कऱ्हाडास वेळांत वेळ काढून त्यांनीं ओगलेवाडीस जाऊन कांचकारखाना पाहिला. तो पाहून त्यांच्या मनावर फारच चांगला परिणाम झाला.

* * *

कऱ्हाडच्या वाटेवर मसूर चार मैल बाजूला राहतें, व तेवढ्यांतच कृष्णानदीचें रेताड व चिखली पात्र ओलांडावयाचें असतें. भर मध्यान्हहि होत

आली होती. तरी पंडितजींनीं मसुरास जाण्याचा आग्रह सोडला नाहीं. येथील आश्रमांत विनायकबुवा व पंडितजी समोरासमोर बसलेले पाहून प्रेक्षकांच्या मनांत उदात्त भावना आल्याशिवाय राहिली नसेल. एका बाजूस पंडितजी म्हणजे ते असे– प्रवासाकरितां हजारों रुपये किंमतीच्या मोटारी, अंगावर जब-दार काश्मिरी वस्त्रांचा पोषाख, पाय चेपण्यापासून बोललेल्या शब्दागणिक मान हलविणारे सहचर व नोकर, प्रत्येक ठिकाणीं आगाऊ जाऊन चौका बनवून स्वयंपाक सिद्ध करणारे परिजन व साधनसंभार. दीडशें लक्ष रुपये जमवून राजवाड्यासारख्या प्रचंड इमारती उभारून त्यांत हजारों विद्यार्थी पढ-विणाऱ्या विद्यापीठाच्या जनकत्वाचा मान लाभलेले पंडितजी! आणि दुसऱ्या बाजूस विनायकबुवा ब्रह्मचारी! पादत्राणाशिवाय रात्रीं अंधारांतून व कांट्याकुट्यांतून प्रवास होतो आहे, उन्हानें सूर्य व पाण्यानें पर्जन्य नख-शिखान्त रोमरंध्रांचा ठाव घेत आहे, अंगावर एकाशिवाय दुसरें वस्त्र नाहीं, डोक्यावर राठ केसाच्या जटांचे दोर वळलेले, दाढी हवी तशी वाढलेली, काठी व लोटा याशिवाय सामान नाहीं, तोंडीं रामाशिवाय नाम नाहीं, ब्रह्म-चाऱ्याशिवाय सहचर नाहीं! आश्रमाची ती उधळलीउखरलेली जमीन, खालींवर नुसत्या लोखंडी पत्र्यांचें वेष्टन, आंत छापखान्याचीं लोखंडी यंत्रें, आणि दारांत पहाऱ्यास बसलेला जागता रागीट मारुति. अशा या दोन मूर्ती पाहून त्यांच्या परिस्थितींतल्या विरोधाचें आश्चर्यच वाटे. पण दोघांचेंहि अंत-रंग एक, भावना एक व उद्दिष्ट कार्य एक. यामुळें समरस होऊन परस्पर आदरबुद्धीनें परस्परांचें कौतुक करणारे ते दोघे पाहून असेंच वाटलें कीं, राष्ट्र-कार्यांतहि देहाव्यतिरिक्त—किंबहुना देहाला अवगणून राहणारा एकच अंत-रात्मा या देशांत आज वावरत आहे ही गोष्ट कांहीं खोटी नाहीं. पंडित-जींचा राजयोग आणि विनायकबुवांचा वैराग्ययोग दोन्ही या देशाला आज सारखेच उपयोगी पडत आहेत.

* * *

पंडितजी हे पूर्वी नेमस्त पक्षांतले, व १९२० सालापासून पुढें कांहीं वर्षें त्यांनीं असहकारितेच्या चळवळीला विरोध केला. लाहोरासहि त्यांनीं मुख्य ठरावाला विरोध केला. असें असून ते मुंबईस आले असतां चळवळींत दाखल झाले याबद्दल त्यांचें कौतुक व अभिनंदन सर्वत्र होत आहे हें योग्यच आहे. पण त्यांचें म्हणणें असें आहे कीं, “ या चळवळींत प्रथमपासूनच मीं पडलों

असें नाहीं व कदाचित् पडणार नव्हतोंहि. पण राष्ट्रीय सभेच्या कांहीं कमिट्या बेकायदा ठरविण्याचा सपाटा सरकारनें चालविला तेव्हां मला राग आला व मीं चळवळींत पडलों." महाराष्ट्रांत या चळवळींत काय काय घडलें हें समजून घेण्याची इच्छा त्यांनीं वाई, कऱ्हाड वगैरे ठिकाणीं दर्शविली आणि इकडील हकीकती—विशेषतः कऱ्हाडच्या व बिळाशीच्या हकीकती त्यांना कळल्या, तेव्हां ते हसून म्हणाले—" हें तर बाहेरच्या प्रांतांत कांहींच माहीत नाहीं! तुम्हां महाराष्ट्रीयांना आपला डांगोरा पिटण्याची, डंका वाजविण्याची, जाहिराती फडकविण्याची विद्या चांगली माहीत नाहीं असें दिसतें. महाराष्ट्राचें एखादें चांगलें दैनिकपत्र इंग्रजींत अवश्य पाहिजे."

* * *

पंडितजी या चळवळींत पडले तरी त्यांना राष्ट्रीय सभेच्या गाभाऱ्यांत कितपत मान्यता आहे म्हणाल तर 'विष्णवे नमः!' त्याचीं कारणेंहि तशींच आहेत. उ० खादीचा उपदेश करण्याचें पुण्य करीत असतां बहिष्काराला पूर्णता आणण्याच्या दृष्टीनें ते गिरण्यांचा स्वदेशी माल घेण्यास सांगण्याचें पापहि करितात! मग त्यांना राष्ट्रीय सभेच्या गाभाऱ्यांत कोण मान्यता देणार? तेथें आज सगळेच विजेचे चकचकीत दिवे प्रकाशित असून त्यांच्या मागें गांधींच्या शिष्यत्वाचे उत्प्रकाशक ( रिफ्लेक्टर ) लाविलेले आहेत. पंडितजी हे आज चाळीसपंचेचाळीस वर्षें सतत राष्ट्रकार्य करीत असल्यानें ते गांधींचे शिष्य होऊं शकत नाहींत; म्हणून राष्ट्रीय सभेच्या गाभाऱ्यांत त्यांना वरील कारणामुळें स्थान नसलें तरी त्यांचें एकंदर हिंदुस्थानांतलें—हिंदुस्थानच्या देवस्थानच्या गाभाऱ्यांतील—स्थान अढळ आहे. इतर कोणाला विजेच्या दिव्याची उपमा साजली तर ती अनेकार्थानेंहि लागते. पंडितजींना देवाजवळच्या मंद नंदादीपाची उपमा लावण्यांत येते ती मात्र यथार्थ आहे. देवाचें अखंड सान्निध्य. इतरत्र विजेचे दिवे मालवले गेले तरी हा आपला मिणमिण का होईना, पण सतत तेवत राहून देवाचें दर्शन उभ्या रात्रींहि घडविणारा. कोणाचा हात लागला तरी फार माजावयाचा नाहीं, आणि उलट तो मालवावा असेंहि कधीं कोणाच्या मनांत यावयाचें नाहीं.

# विलायतेची दुसरी खेप

## मुलाखत

(केसरी, ता. ६ डिसेंबर १९३२)

[ गोलमेज परिषदेसंबंधींचें सर्वसामान्य बातमीपत्र आणि केळकर यांच्या प्रवासाची व अवांतर माहिती मुलाखतीच्या स्वरूपानें खालीं दिली आहे.]

प्रश्न—आपली ही विलायतेस येण्याची दुसरी खेप नव्हे काय?

उत्तर—होय, दुसरी. पण पहिली खेप संपवून परत गेलों तेव्हां पुनः मी विलायतेस येईन अशी कल्पना मला स्वप्नांतहि आली नाहीं; व मनांतून तशी विशेष इच्छाहि नव्हती. मात्र माझे एक गुजराथी स्नेही शेठ दीपचंद जव्हेरी यांच्या घरीं (नं. ६० टालबट रोड, बेस वॉटर येथें) लो. टिळक, मी, वासुकाका जोशी, खापर्डे वगैरे मंडळी राहत होतों, तेव्हा दीपचंद मला नेहमीं म्हणत कीं, "केळकर, तुम्ही पुनः विलायतेस येणार खास असें माझें भविष्य आहे. तर केव्हां येणार तें सांगा." तेव्हा मी त्यांना म्हणे कीं, "मी पुनः येणार हें भविष्य जर तुम्ही करतां तर केव्हां येईन याचेंहि भविष्य तुम्हांला कां करतां येऊं नये? मला तर तूर्त संभव दिसत नाहीं." सुमारें २-३ वर्षांपूर्वीं अहमदाबादेच्या शेतकरी परिषदेचा अध्यक्ष म्हणून काम संपवून मी सुरतेस जव्हेरीशेठ यांचा पाहुणा म्हणून गेलों तेव्हांहि त्यांनीं पूर्वींचीच गोष्ट काढली; तेव्हां मी त्यांना म्हणालों, "तुमच्या भविष्याला आतां मुदतीचा कायदा लागणार. तेव्हां ती बात सोडून द्या." पण कांहीं लोक कायद्यांतील मुदत होऊन गेली तरी इमानानें ऋण फेडतात. त्याप्रमाणें जव्हेरी शेठ यांच्या भविष्याचें झालें आहे. कारण पुऱ्या १३ वर्षांनंतर पुनः मी विलायतेला आलों! आणि मौज ही कीं, पूर्वीं एका २९ तारखेला मुंबईस आगबोटींत बसलों व बरोबर त्या म्हणजे २९ तारखेसच या खेपेसहि मुंबईस आगबोटींत बसलों.

प्र.—मग ही विलायतेची दुसरी फेरी करावयास लागणार हें आपणास केव्हां कळलें?

उ.—ता. १२ आक्टोबर रोजीं हैद्राबाद येथें अंदाजानें व नक्की ता. २४ नोव्हेंबर रोजीं पुणें येथें. पण यासंबंधाची हकीकत मीं इकडे येण्यापूर्वी पुण्याच्या सभेंत जाहीर रीतीनें सांगितली आहे व तुम्हीं ती वाचली नसली तरी तिकडील लोकांना वर्तमानपत्रांतून आतां ती समजली असल्यामुळें पुनः सांगत नाहीं.

प्र.—मग अवघ्या ४ दिवसांत तुमची विलायतच्या सफरीची सर्व तयारी कशी झाली ?

## राजापुरी तांब्या

उ.—पूर्वीच्या अनुभवानें. 'विलायतेच्या यात्रेची तयारी' हा विषय मीं पूर्वी विनोदी कवितांच्या रूपानें वर्णिला, त्यांत गमती अशा पुष्कळ असल्या तरी सत्याचा अंशहि पुष्कळच होता. म्हणून या खेपेस मला हिंवाळ्याकरितां मुद्दाम कपडे शिवण्यापलीकडे अधिक तयारी अशी कांहीं करावयाची नव्हती. मात्र स्वदेशी शिंप्याकडून तीन दिवसांत कपडे कसे तयार होणार ही चिंता वाटली. पण पुण्याचे कुशल शिंपी कारखानदार रा. आर. डी. गोखले यांनीं ती सर्व चिंता दूर केली; व खरोखरच ३ दिवसांत सर्व कपडे तयार करून दिले. इतकेंच नव्हे तर, विलायती शिंप्यानें शिवलेल्या कपड्याइतका मान त्यांना येथें मिळत आहे. ही कपड्यांची अडचण नसती तर मी बाकीची सर्व तयारी एका दिवसांत करूं शकलों असतों. पण याहि खेपेला वाजवीहून अधिकच सामान मीं आणलें आहे. हिंदी प्रवाशाला सामानाचा मोह सुटत नाहीं; पण अखेर खरी अडगळ व अडचण बरोबरच्या सामानाचीच होते. वास्तविक एक सूट-केस व एक हँडबॅग घेऊन मनुष्याला विलायतेचीच काय पण साऱ्या युरोपची सफर करतां येईल व तसे करणारे लोक आढळतातहि. मीं आणलेल्या सामानापैकीं कदाचित् निम्में सामानहि मला वाटेंतून परत पाठवितां आलें असतें. फक्त एकच वस्तु मीं माझ्या खास आठवणीनें आणली; ती म्हणजे अस्सल मोठा राजापुरी तांब्या! तो कां हवा होता याचें कारण ज्याचें त्यानें समजावें!

## म. गांधींचें सामान

मला असें आठवतें कीं, १९०५ सालीं आम्ही कुटुंबाची सर्व मंडळी काशीयात्रेला गेलों. त्या वेळीं प्रत्येकाच्या गरजेचें असें समजून आम्हीं इतकें सामान बरोबर घेतलें कीं, पहिल्या जळगांवच्या मुक्कामालाच त्यांतलें निम्में

सामान गुड्स करून पुण्यास परत पाठविलें. कारण माणसांच्या काळजीपेक्षां सामानाची विवंचनाच अधिक होऊं लागली. फकीर, बैरागी लोक खरे सुखी. कारण हिंदुस्थानच्या या टोकापासून त्या टोकापर्यंत केवळ खांद्यावर वाहून नेण्याइतक्या सामानानें त्यांचें काम सहा ऋतु व तीन काळ भागतें. पण एखाद्या विरागी माणसालाहि स्वतःचा नसला तरी दुसऱ्याच्या हव्यासाच्या आग्रहापासून उपद्रव होतो. म. गांधी यांना प्रवासाला किती थोडें सामान लागत असेल याची कल्पना कोणीहि करील. पण मला असें समजतें कीं, त्यांच्या प्रेमाखातर इतर मंडळींनीं मुंबई बंदरावर त्यांच्या खोलींत इतकें सामान भरून दिलें कीं, त्याची वाट कशी लावावी यावर ३ दिवस एक कमिशन बसून, सभासदांचा मतभेद होऊन, महात्मा गांधींना निर्णयाचा सर्वाधिकार आपल्या हातीं घेऊन निम्म्याहून अधिक सामान एडनहून मुंबईस परत पाठवावें लागलें!

प्र.—आपला प्रवास एकंदरीनें कसा काय झाला?

उ.—एकंदरीनें प्रवास फारच सुखकर झाला. फक्त जुन्या प्रवासाची याहि खेपेला बरोबर पुनरावृत्ति व्हावयाची होती म्हणूनच कीं काय नेमकें भूमध्य समुद्रांत शेवटल्या दिवशीं बारा तास वादळ झालें. पण उद्यांपासून समुद्रप्रवास संपला या खुषींत असल्यामुळें त्याचें आम्हीं कांहीं मानलें नाहीं. पूर्वीच्या प्रवासांत तेव्हां जर्मनीशीं पक्का तह न झाल्यामुळें आमची बोट मार्सेलिसला लागली नाहीं. यामुळें अटलांटिक महासागर व इंग्लिश चॅनल यांमधून आणखी ८–९ दिवस समुद्रप्रवास करावा लागला होता. तो या खेपेस टळणार ही आनंद वाटण्यासारखीच गोष्ट होती.

प्र.—तर मग आपण फ्रान्सची भूमि यंदाच प्रथम पाहिली म्हणावयाची?

उ.—होय. पण भूमि पाहिली इतकेंच पाहिलें. कारण मार्सेलिसहून संध्याकाळीं ४॥ वाजतां आगगाडींत बसलों तो कॅले बंदरावर दुसरे दिवशीं दोन प्रहरीं एकाचे सुमारास येऊन पोंचलों. वाटेंत पॅरिस शहर लागलें, खुद्द पॅरिस स्टेशनावर गाडी उभी राहिली व पुण्याची पॅसेंजर गाडी भायखळ्यावर थांबते तितका वेळ थांबली. तितक्या अवधींत मी प्लॅटफॉर्मवर उतरून पॅरिस जितकें पादाक्रांत करतां येईल तेवढें केलें म्हणजे खरा फ्रान्स अजून मला पाहावयाचाच आहे. मात्र आदले दिवशीं दोन तास व दुसरे दिवशीं ६ तास

आगगाडींतून फ्रान्सचा प्रदेश भरपूर पाहावयास सांपडला. तसेंच रात्रीं चांदणें होतें यामुळें भिंगाच्या खिडकींतून कांहीं वेळ पाहत बसलें होतों.

## फ्रान्स पाहून काय वाटलें?

प्र.—हा प्रदेश पाहून आपली काय कल्पना झाली ?

उ.—कल्पना हीच कीं इकडे हिंदुस्थानसारखे मोठे भूभाग कांहींच दिसत नाहींत. डोंगर, नद्या भेटल्या तरी त्या हिंदुस्थानच्या मानानें लहान. पण सपाटी असो, डोंगर असो, सगळ्या भागावरून माणसाचा हात फिरला आहे असें स्पष्ट दिसतें. रानवट किंवा इंग्रजींत ज्याला 'वाइल्ड' असें म्हणतात असें कोठेंच कांहीं दिसलें नाहीं. हिंदुस्थानप्रमाणें मोठे वृक्ष नाहींत. आहेत ते सुरूच्या झाडासारखे म्हणजे बारीक पानांचे असतात. मात्र ते सरळ उंच असतात आणि पाहावें तेथें लागवड करून मुद्दाम लावल्यासारखे हारीच्या हारीनें दिसतात. गाईभेंड्यांच्या कळपांकरितां राखलेलीं मोठमोठीं कुरणेंदेखील नव्या दिल्लींतील हरळीगवताच्या राखीव मैदानाप्रमाणें सारखीं दिसतात. बागबगीचे विस्तृत असे कोठेंच नाहींत. थोड्या जागेंत पुष्कळ पीक काढण्याची विद्या सफळ झाल्यामुळें लहान लहान तुकडे करून लागवड करतात तसें दिसतें. बांध-उरोळ्या कोंकणच्या बांधासारख्या. एक गोष्ट विशेष दिसली कीं, फ्रान्समध्यें आगगाड्यांचा फैलाव फार. बहुतेक सर्व वाटभर रेल्वे यार्डांतूनच जातों कीं काय असें भासत होतें. मधून मधून जंक्शनें व रेल्वेच्या शाखा बऱ्याच आढळत. उलट सुलट जाणाऱ्या गाड्यांचीहि रहदारी बरीच दिसली. असें दोन तीन मैलहि जात नव्हते कीं, जेथें एखादें लहानसें खेडें रेल्वेलगत नव्हतें व जें पाहावें तें टुमदार व नमुनेदार. विजेची रोषनाई नाहीं असें गांव क्वचितच दिसलें व खेडेगांवांत वीज कशी परवडते याचें आश्चर्य वाटलें. खेडीं सांधणारे रस्ते व रानांतील रस्ते अरुंद पण अत्यंत नीटनेटके व वळणदार. रस्ता अरुंद ठेवण्यांत खर्चाची बचत होत असेल तीं तो रस्ता दुरुस्त ठेवण्यावर खर्च होत असावी.

प्र.—आगबोटीवरील दिवस सहवासाच्या दृष्टीनें कसे गेले ?

## बोटीवरचा सहवास

उ.— पूर्वीच्या खेपेपेक्षां यंदा बोट मोठी तरी गर्दी कमी होती. कारण विलायतेला जाण्याचा आतां उलटा मोसम होता, तेव्हां सुलटा होता.

यामुळें या खेपेस अगदीं जरूरीच्या कामानिमित्त जाणारी तेवढी मंडळीच बोटीवर होती. सुदैवानें मला सर्वांत वरच्या डेकवर खोली व तीहि सिंगल म्हणजे एका माणसाची असल्यामुळें मी खालच्या डेकवर क्वचितच जाई. वरचें माझें डेक मला पुरून उरण्याइतकें होतें. म्हणून हिंडून-फिरून, वाचून वेळ घालवीत होतों. अपरिचिताशीं आपण होऊन ओळख करून घ्यावी किंवा नसत्या गोष्टी उकरून काढून बोलाव्या याचा मला कंटाळा आहे. शिवाय ज्या कामाकरिता निघालों त्यासंबंधींच वाचावयाचें किती तरी होतें. खालीं येणेंजाणें जेवणापुरतें; किंवा बरोबरच्या हिंदी प्रतिनिधींशीं बोलण्यापुरतें.

प्र.— मग तेथें गोलमेज परिषदेविषयीं बरीच चर्चा होत असेल ?

उ.— होत होती. पण याविषयीं मनमोकळेपणानें बोलणें होई तें सप्रू, जयकर, मी व सर कावसजी जहांगीर यांच्यामध्येंच होई. इतरांपैकीं सर अकबर हैदरी, डॉ. शफत अहमदखान व वाजायत हुसेन यांच्याशींच संभाषण होई. हैदरी यांच्याशीं मी वऱ्हाडासंबंधानें बोलत असे; कारण वऱ्हाडची मागणी अशी आहे कीं, आपला प्रांत हिंदी प्रांतापासून अलग व स्वतंत्र व्हावा, पण निजामच्या राज्यांत परत जाऊं नये. डॉ. अहमदखान यांच्याशीं हिंदु-मुसलमानांच्यासंबंधीं कांहीं भाषण होई; पण अधिकारानें बोलण्याइतके ते जबाबदार नाहींत असें दिसलें. पण इतिहासाचे प्रोफेसर म्हणून त्यांच्याशीं गप्पा मारीत होतों. वायाजत हुसेन हे काश्मीर संस्थानचे प्रतिनिधि व तरुण सिव्हिलियन आहेत. मी पूर्वी विलायतेला गेलों होतों तेव्हां केंब्रिज येथें त्यांची गांठ पडली होती. त्यांच्या सांगण्यांत असें आलें कीं, काश्मीरच्या महाराजांचें मुसलमान प्रजेशीं वागण्याचें धोरण खरोखरीच चांगलें आहे व दंगेधोपे होतात ते फालतू माणसांकडून होतात. शिवाय बाहेर गवगवा ऐकूं येतो इतका मुळांत बखेडा नाहीं. काश्मीर संस्थान फेडरेशनमध्यें सामील होऊं इच्छितें असेंहि दिसलें.

प्र.— सप्रू, जयकर व आपण या त्रिवर्गाच्या संभाषणांत काय निष्पन्न झालें ?

उ.— सप्रू, जयकर या दोघांनाहि परिषदेच्या फलश्रुतीबद्दल थोडी चिंताच वाटत होती. पण मध्यवर्ती सरकार जबाबदार करण्याचा प्रश्न न निघेल किंवा निघून त्यास वाटाण्याच्या अक्षता लागतील तर आपण त्या-

पुढें परिषदेच्या कामांत भाग घेऊं नये असें माझ्याप्रमाणें त्यांचेंहि म्हणणें दिसलें. व एकंदरीनें मानीव पुढारी या नात्यानें सप्रू यांचा रोख बरा दिसला. आपल्यावर इतरांपेक्षांहि कांहीं विशेष जबाबदारी पडत आहे ही जाणीव त्यांना असलेली दिसली.

## मुक्कामाची सुखसोय

प्र.—लंडनमधील मुक्कामाची सुखसोय आपणांस कशी वाटते ?

उ.—ही सुखसोय पूर्वीपेक्षां या खेपेस मला यंदा विशेष रीतीनें करूनच घ्यावी लागली आहे. पूर्वी उन्हाळ्यांत आलों. यंदा भर हिंवाळ्याशीं गांठ पडली आहे. पूर्वी चिटणीस म्हणून आलों, हल्लीं यजमान किंवा स्वतः प्रतिनिधि या नात्यानें आलों आहें. या दोनहि कारणांमुळें विशेष चांगल्या प्रतीची जागा घेऊन, विशेष चांगल्या पद्धतीनें राहावें लागत आहे व त्याप्रमाणें करीतहि आहें. यामुळें सुखसोयींचा प्रश्न फारसा उरलेला नाहीं. खर्च मात्र किती होईल हें न सांगितलेलेंच बरें.

प्र.—पण सरकार भत्त्याच्या रूपानें प्रतिनिधींना कांहीं रक्कम देणार आहेना?

उ.—तें तर उघडच आहे. पण तो सर्व भत्ता संपवून बहुतेक प्रतिनिधींना पदरमोड बरीच करावी लागेल.

प्र.—येथील मुक्कामाचा अंदाज काय आहे ?

उ.—सर्वच बाजूंनीं नाताळची मजल दिसते. तशी उचलच आहे. तसें झालें तर मला आनंदच वाटेल. कारण माझ्यासारख्या बैठ्या वृत्तीच्या माणसाला कारणाशिवाय एक दिवसहि अधिक या असल्या हवेंत राहणें आवडणार नाहीं. याचा अर्थ कामच लांबलें तर हवेला कंटाळून तें टाकून देऊन जाईन असा मात्र नाहीं.

प्र.—मग याहि खेपेस युरोप खंड पाहण्याची आपली इच्छा साधणार नाहीं.

उ.— मी स्वतः प्रवासाचा कंटाळा करणारा असल्यामुळें बहुधा एकदमच हिंदुस्थानास परत जाईन. कारण या हिंवाळ्यांत युरोप झालें तरी इंग्लंडासारखेंच. जॉन्सनप्रमाणें मीहि असें म्हणणारा आहे कीं, I want to see but I do not want to go to see "पाहावेंसें वाटतें, पण पाहावयासाठीं उठून जावेंसें वाटत नाहीं." अर्थात् माझ्यासारख्या माणसाला कोण कृपाळू उपकारी देवदूत खाकेंत मारून हिंडून जग दाखविणार ? तेव्हां

डोळे मिटून कल्पना करून किंवा डोळे उघडून लेखी वर्णनें वाचून भूगोलाचें ज्ञान मिळवावें.

इतकें बोलणें झाल्यावर मीं तात्यासाहेब केळकरांची रजा घेतली.

---

## वक्तृत्वकला

( किर्लोस्कर—१९३२ )

[वक्तृत्वकलेची गोडी तरुण पिढीस लागावी या हेतूनें ज्या गृहस्थांचे विचार संग्रहित करून तरुण स्त्रीपुरुषांपुढें मांडावें असें मला वाटलें त्यांत श्री. तात्यासाहेब केळकर यांस बरेंच वरिष्ठ स्थान द्यावें लागेल. त्यांच्यासारख्या विद्वान् व चिकित्सक गृहस्थाचें वक्तृत्वासंबंधींचे विचार उद्‌बोधक खचित असणार असें तर मला वाटलेंच, पण त्याहूनहि आणखी जी कल्पना माझ्या मनांत आली तीं अधिक महत्त्वाची होती. ती ही कीं, तात्यासाहेबांनीं वक्तृत्वकलेंत जें चातुर्य संपादन केलें आहे तें त्यांनीं निसर्गावर प्रयत्नतः मिळविलेल्या विजयाचें मोजमापच समजावें लागेल. वक्त्याला लागणारे गुण-धर्म अंगीं असल्यावर त्यांचें संवर्धन कसें करावें हा जसा महत्त्वाचा प्रश्न आहे तसाच किंबहुना त्याहूनहि अधिक बोधप्रद प्रश्न आहे तो हा, कीं ज्याला निसर्गानें वक्तृत्वाचें देणें दिलें नाहीं त्याला आशेला कांहीं जागा आहे कीं नाहीं? मला वाटतें या प्रश्नाच्या दृष्टीनें श्री. तात्यासाहेबांचे विचार अत्यंत मननीय ठरतील. संगीतकलेच्या इतिहासांत आपल्याला अशा कित्येक गवयांचीं उदाहरणें दाखवितां येतात, कीं नैसर्गिक कंठमाधुर्याचें भांड-वल त्यांच्याजवळ शून्यांशानें असूनहि त्यांनीं केवळ मेहनतीच्या व बुद्धीच्या बळावर गायनक्षेत्रांत नामदार म्हणून पदवी मिळविली. श्री. तात्यासाहेबांचें उदाहरण या जातीचेंच आहे. इंग्रजींत Orator व Speaker असे जे दोन भिन्न अभिप्रायाचे शब्द आहेत त्यांच्या अर्थाचे मराठींत रूढ शब्द नाहींत परंतु Orator या अर्थीं 'वक्ता' आणि Speaker या अर्थीं 'व्याख्याता' हे दोन शब्द रूढ करावेसें मला वाटतें. हें मान्य केल्यास श्री. केळकर हे वक्ते नव्हेत परंतु मोठे चतुर व श्रवणीय व्याख्याते आहेत यांत संशय नाहीं. इंग्रजी बोलण्यांत जसा बॅ. जयकर यांचा कित्ता मीं डोळ्यांपुढें ठेवलेला आहे तद्वत् मराठी व्याख्यानाच्या वेळीं श्री. केळकर यांच्या शैलींतून उचललेल्यां कांहीं गुणांचा मी भरपूर उपयोग करतों. विशेषतः प्रमाणबद्धता,

ताजेपणा आणि उच्च कोटिक्रम हे त्यांच्या व्याख्यानांतील गुण प्रत्येक वक्त्यानें घेण्यासारखे आहेत. ते एकदां मजजवळ विनोदानें म्हणाले, "मी मोठा वक्ता नसलों तरी येवढें मात्र अभिमानानें सांगतों, कीं 'पुरे पुरे'ची टाळी मीं अजून कधीं घेतलेली नाहीं!" या त्यांच्या बोलण्यांत फार खोल अर्थ आहे.

—ना. सी. फडके. ]

प्रश्न— वक्ता जन्मसिद्ध असतो कीं यत्नसिद्ध असतो?

उ.— वक्तृत्व हें दोनतीन प्रकारचें असतें. त्यांतील एक प्रकारचा वक्ता हा जन्मसिद्धच असतो. तो यत्नानें तयार होत नाहीं. दुसऱ्या प्रकारचा वक्ता हा प्रयत्नानें व अनुभवानें तयार होऊं शकतो. म्हणजे भावनाप्रधान व नाटकी वक्ता हा जन्मसिद्ध असतो, आणि विषयप्रतिपादनानें वक्तृत्व उमटविणारा वक्ता हा प्रयत्नानें तयार होतो.

प्र०— जन्मसिद्ध वक्तृत्वकलेच्या गुणविकासासाठीं मनुष्यानें कोणत्या दिशेनें प्रयत्न करावा?

उ०— उपजत वक्तृत्व अंगीं असलें तरी मनुष्यानें बहुश्रुतता मिळवावी म्हणजे त्या जन्मसिद्ध वक्तृत्वगुणाचें चीज होईल. कांहीं तरी सांगण्यासारखें महत्त्वाचें असल्याशिवाय नुसतें वक्तृत्व वाहवत जातें व हास्यास्पद होतें.

प्र०— वक्तृत्वकला शिकवितां येईल काय?

उ०— शाळाच काढली तर वक्तृत्वकला शिकवितां येणार नाहीं असें नाहीं पण शिकून तयार झालेला वक्ता कोणी माझ्या पाहण्यांत आजवर नाहीं.

प्र०— आपण अगदीं पहिलें भाषण केव्हां केलें त्याच्या कांहीं आठवणी सांगतां येतील काय?

उ०— मीं माझें पहिलें भाषण १८९३ सालीं केलें. सातारा येथें एल्एल्. बी.चा अभ्यास करीत असतां, राष्ट्रीय सभेहून करंदीकर, पारसनीस इत्यादि प्रतिनिधी आले. त्यांचें गद्यात्मक व पद्यात्मक स्वागत करण्याचें काम माझ्यावर आलें होतें. त्या वेळीं मी माझें भाषण लिहून काढलें होतें, व तेव्हां स्मरणशक्ति चांगली असल्यामुळें तें भाषण पाठ न करतां मीं बोलल्यासारखें म्हणून दाखविलें. पण तसे प्रयोग पुनः मीं कधीं केले नाहींत. प्रारंभीं मला

मुळींच बोलतां येत नसे. इंग्रजी नाहीं व मराठीहि नाहीं. आणि अजूनहि मला कोणी 'वक्ता' असें म्हटलें तर मी त्याला मनांत हसतों. कारण माझ्या समजुतीप्रमाणें मजमध्यें खरें वक्तृत्व असें मुळींच नाहीं. वक्तृत्व दोन प्रकारचें असतें. एक फुलबाजीचें किंवा भुइनळ्याचें वक्तृत्व व दुसरें चिचुंद्रीचें वक्तृत्व. खरा वक्ता, कलावान् वक्ता, दारूच्या चिचुंद्रीसारखा कोणीकडे धावेल, पळेल, कोणाच्या अंगावर जाईल याचा नियम नाहीं; पण चमत्कृति उत्पन्न करील. 'फुलबाजीचा' वक्ता किंवा 'भुइनळ्याचा' वक्ता म्हणजे तो असा असतो कीं, तो प्रारंभ कसा करील, त्याच्या भाषणाचा शेवट कसा होईल, या गोष्टीसंबंधानें किंचित् परिचय असलेल्याहि श्रोत्यांना अदमास करतां येतो. मात्र यांत आणि त्यांत फरक हा कीं, चिचुंद्रीचा वक्ता साधलें तर बहार करील नाहीं तर कांहींच परिणाम न होतां तो हास्यास्पद ठरेल. पण दुसऱ्या प्रकारचा वक्ता आपल्या मुद्देसूद विषयाच्या मांडणीनें लोकांच्या मनांवर केव्हांहि, निदान मध्यम प्रतीचा परिणाम केल्याशिवाय राहणार नाहीं. माझें वक्तृत्व हें दुसऱ्या प्रकारचें आहे. मी विषयाची आखीव मर्यादा सहसा कधींच सोडीत नाहीं. माझ्या 'वक्तृत्वा'ची रुंदी फारच थोडी असते; पण विषयाची पुष्कळच असते. ज्याला इंग्रजींत 'रेलेव्हन्स' म्हणतात तें माझें सहसा कधींहि सुटत नाहीं. एकंदर भाषण घेतलें तर त्यांत उपक्रम, उपसंहार व दरम्यानचा युक्तिवाद साधारण प्रमाणबद्ध असतो. एखाद्या प्रसंगीं विनोद, कोटी, खटका हीं सुचलीं तर माझ्या भाषणांत रंग भरतो. नाहीं तर "माहिती बरी होती" असें म्हणून श्रोत्याला समाधान करून घ्यावें लागतें व तें करून घेतां येतेंहि.

प्र०— आपल्या वक्तृत्वांत कोणता गुण प्रारंभीं नव्हता व तो आपण प्रयत्नानें आणला ?

उ०— प्रारंभीं म्हटलें तर मजजवळ वक्तृत्व नव्हतें व त्यासंबंधीं कोणता गुणहि नव्हता. शिवाय आवाज वाईट, चिरका, कोरड्या खोकल्याची ढास फारच लागते व आवाज लहानमोठा किंवा उचित अंगविक्षेप किंवा चेहऱ्याच्या दृश्यांतील सूक्ष्म फरक दाखविण्याची कला यांपैकीं मजजवळ कांहीं नाहीं. पण विचार केल्याशिवाय सहसा न बोलण्याची खबरदारी मी घेतों. मुद्द्यांचीं टिपणें कागदावर आठवणीकरितां उतरून घेण्याला व त्यांचा उघड उपयोग करण्याला मी लाजत नाहीं. विषयासंबंधीं शक्य तितकी भरपूर माहिती व

टिपणांच्या साहाय्यानें त्यांचा बरोबर क्रम या दोन गोष्टीच मीं प्रयत्नानें वाढविल्या; व सुदैवानें मला बोलण्याचें काम गेल्या वीस वर्षांत इतकें पडलें कीं इतक्या सरावानें बोलतां आलें नसतें तर मी अगदीं दगडच ठरलों असतों, पण तितका निर्बुद्ध मात्र मी नाहीं. माझें भाषण एखादे वेळीं सजलें किंवा रंगलें तर, प्रमाणबद्ध व मर्यादित उंचीच्या ठिणग्या पाडणाऱ्या भुइनळ्याप्रमाणें तें आल्हाददायक होत असेल; पण वक्तृत्वाची खरी वीज म्हणतात ती माझ्या भाषणांत कधीं चमकून जाते असें मला वाटत नाहीं. मी वक्तृत्वकलेची उणीव आपल्या माहितीनें व युक्तिवादानेंच निघेल तेवढी भरून काढतों. मात्र एक गोष्ट अभिमानानें सांगतों, कीं कंटाळवाणें भाषण करून 'पुरेंपुरें' म्हणण्याच्या अर्थाची टाळी मीं श्रोत्यांकडून जन्मांत घेतली नाहीं! दीड दीड तास बोलूनहि लोकांना भाषण थांबावें असें वाटण्याच्या आंत मी भाषण पुरें केलें असें होई.

प्र०—गेल्या वीस वर्षांत वक्तृत्वाचें तंत्र बदललें आहे काय?

उ०—गेल्या वीस वर्षांत वक्तृत्वाची पद्धत थोडथोडी बदलत आहे. म्हणजे ती अवघड, बोजड यावरून निघून सोपेपणावर येत आहे. शिवाय भाषणाच्या विषयांत फारच विविधता येत चालली आहे. राजकारणाच्या विषयांतील भाषणें मात्र आतां कंटाळवाणीं होऊं लागलीं आहेत. कारण त्यांतील मुद्द्यांत नवेपणा राहिला नाहीं. भावनाच भाषणाला काय रंग आणील तेवढाच. पण इतर दृष्टींनीं भाषणांचे विषय पुष्कळ वाढले आहेत. यामुळें वसंत व्याख्यानमालेसारखी एखादी माला सबंध ऐकली तर पूर्वींपेक्षां ती अधिक चित्ताकर्षक होते.

प्र०—आपण आपल्या पूर्ववयांत एखादें ध्येय डोळ्यांपुढें ठेवलें होतें काय?

उ०—वक्ता या दृष्टीनें मीं आपल्या डोळ्यांपुढें ध्येय असें कधींच कोणतें ठेवलें नव्हतें. कारण माझी हौस लेखनाची होती; भाषणाची नव्हती. मी हल्लीं कांहीं प्रमाणांत वक्ता बनलों असेन तर तो 'मारून-मुटकून' बनलों आहे, प्रसंगानें बनलों आहे, अनुभवानें बनलों आहे. आणि बोलतां येऊं लागल्यामुळेंच मला आतां कोठें थोडीबहुत बोलण्याची हौस वाटूं लागली आहे.

प्र०—आपल्या भाषणांपैकीं आपणा स्वतःस कोणतीं फार आवडलीं आहेत?

उ०—या प्रश्नाचें उत्तर देणें कठीण आहे. तथापि माझी कांहीं कांहीं भाषणें मला स्वतःलाहि आवडण्यासारखीं झालीं आहेत असें वाटतें. त्यांतील कांहीं मराठींत व कांहीं इंग्रजींत, असेंब्लीमध्यें. पण तीं आतां स्मरणानें सांगतां येत नाहींत. दोन भाषणें मात्र मला आठवतात तीं क्रिमिनल लॉ अॅमेंडमेंट अॅक्टवरील व पब्लिक सेफ्टी बिलावरील. या दुसऱ्या भाषणाच्या प्रसंगींच असेंब्लींतील एक मोठा वाङ्मयप्रेमी युरोपियन, सर डेनिस ब्रे, यानें खालील शब्दांनीं माझ्या भाषणाची तारीफ केलीः—

"Ordinarily, Sir, when my Hon. friend gets up to speak, I settle myself down in my chair for a delightful half-hour. For, I greatly enjoy his charm of manner, his urbanity of speech, his delightful quips and literary anecdotes, his touches of humour and the tolerance and moderation of his views."

प्र०—वक्तृत्वाच्या बाबतींत मद्रास व बंगाल यांच्याहून महाराष्ट्र कंगाल आहे असें कोणी म्हणतात हें खरें आहे काय ?

उ०—बंगाल व मद्रास हे दोन्ही प्रांत वक्तृत्वाच्या दृष्टीनें महाराष्ट्राच्या पुढें आहेत असें म्हणण्यांत येतें तें इंग्रजी वक्तृत्वाच्या बाबतींत अधिक खरें आहे. देशी भाषेंतील भाषणासंबंधीं तें खरें आहे असें मला वाटत नाहीं. महाराष्ट्रांतील लोकांना इंग्रजी वक्तृत्व येणार नाहीं असें मला वाटत नाहीं. पण ते इंग्रजींत सहसा भाषणेंच करीत नाहींत. मी स्वतः असेंब्लींत जें पहिलें भाषण केलें तें त्या वेळेपर्यंतच्या आयुष्यक्रमांतील माझें तिसरें किंवा फार तर चौथें इंग्रजींतील भाषण असेल. यावरून इंग्रजी भाषणाचा आमचा सराव लक्षांत येईल!! विषयाच्या तपशिलांत मद्रासी व भावनेंत बंगाली हा महाराष्ट्रीयांच्यापुढेंहि कांहींसा असतो. तथापि महाराष्ट्रीय वक्त्यांचें भाषण कोठेंहि आदरबुद्धीनेंच ऐकलें जातें, व मद्रासी किंवा बंगाली व्याख्याता जितके वेळां स्वतःला हास्यास्पद करून घेतो तितका महाराष्ट्रीय वक्ता करून घेत नाहीं.

प्र०—लोकांमध्यें एक असा समज आढळतो कीं, लेखकाला वक्ता होणें अवघड आहे व वक्त्याला लेखक होणें अवघड आहे ? या कल्पनेंत सत्याचा किती अंश आहे ? असल्यास त्याबद्दल मानसशास्त्रदृष्ट्या कसा उलगडा कराल ?

उ०—लेखनाची सवय ही वक्तृत्वाला किंचित् विघातक आहे; व वक्तृत्वाची सवय लेखनाला थोडी विघातक आहे; असें मला वाटतें. माझा प्रथमपासूनचा सराव लिहिण्याचा पडल्यामुळें मला भाषणें करण्याला अडचण झाली असा अनुभव आहे. त्याचें कारण असें, कीं लेखक हा स्मरणशक्तीवर फारसा अवलंबून राहत नाहीं. कारण त्याला संदर्भग्रंथ हाताशीं असतात. टिपणें केलीं तरी शब्दांकरितां वक्त्याला स्मरणशक्तीवरच भिस्त ठेवावी लागते. मी तोंडानें मराठी इंग्रजी मजकूर सरोस सांगूं शकतों, व पुष्कळ वर्षें तोच परिपाठ ठेवला. यामुळें तोंडानें सांगून लिहिण्याची जी गति असते तितकें सावकाश बोलणें जर वक्तृत्वाला चाललें असतें तर मी मोठा वक्ता झालों असतों. पण दुर्दैवानें सावकाश बोलण्याचीहि गति याहून फार अधिक द्रुत असावी लागते. हातानें कितीहि जलद लिहिलें तरी ती गति व बोलण्याची गति यांत तर फारच अंतर असतें. शिवाय माझा विशेष स्वभाव असा कीं, शब्द होईल तितका समर्पक व उचित पडावा अशी फार इच्छा. यामुळें बोलतांना जर मनाप्रमाणें शब्द बाहेर पडला नाहीं, भलताच शब्द बाहेर पडला तर मी तेथल्या तेथेंच मनांत विरमून जातों व त्या विरमण्याचा परिणाम लगेच माझ्या भाषणावर होतो. मला आहे याहून कमी लज्जास्पदतेची जाणीव असती तर मी आहे याहून अधिक चांगला वक्ता झालों असतों. मी स्वतःला हास्यास्पद करून घेतल्याची जाणीव नसेल तर मी अधिक चांगलें बोलेन. माझी स्मरणशक्ति फार वाईट आहे. यामुळें मला मुद्द्यांचीं टिपणें करावीं लागतात; आणि तशीं न केल्यामुळें जर योग्य शब्द किंवा युक्तिवादाला अवश्य असा दुवा आठवला नाहीं तर माझें बोलणें फिकें पडतें. लिहिण्याची फार सवय झाल्यानें गाडीचें चाक खोल चाकोरींत जाऊन बसावें अशी माझी स्थिति झाली आहे. पण उलट पुष्कळ नामांकित वक्ते हातांत लेखणी पडल्याबरोबर दिङ्मूढ कसे होतात व बोलण्याच्या निम्मेंहि स्वारस्य त्यांच्या लेखनांत उतरत नाहीं, हेंहि मीं पाहिलें आहे. म्हणजे एकाला एक आहे तर दुसरें नाहीं. लिहिणें व बोलणें दोन्ही गोष्टी सारख्याच सौष्ठवानें करणारा मनुष्य क्वचितच आढळला.

प्र०—शाळेंतील व कॉलेजांतील होतकरू तरुण वक्त्यांस विशेषतः सांगण्यासारख्या कोणत्या सूचना आपणांस करतां येतील!

उ०—तरुण विद्यार्थ्यांना मी इतकाच उपदेश करीन कीं त्यांनीं खूप वाचावें, बहुश्रुत व्हावें व बोलण्याचा प्रत्येक प्रसंग मिळेल तो विचार करून

बोलून साधावा. म्हणजे दुसऱ्या कोणाला न विचारतांहि त्यांच्यांत वक्तृत्वाचे गुण कोणते आहेत हें त्यांचें त्यांला कळून येईल. पुढें येणारे दिवस पूर्वीं-पेक्षांहि वक्तृत्वाला अधिक वाव देणारे असणार यांत शंका नाहीं. तेव्हां त्यांनीं आपल्या गुणांचा भरपूर उपयोग करण्याची तयारी ठेवावी.

---

# गोलमेज परिषदेचें कामकाज

(केसरी–ता. २ डिसेंबर १९३२)

तिसऱ्या गोलमेज परिषदेच्या खऱ्या कामाला ता. २१ नोव्हेंबर रोजीं सुरुवात झाली. परिषदेचें काम खासगी रीतीनें चालणार असल्यानें पूर्वींच्या परिषदांप्रमाणें साग्र व सविस्तर हकीकत आणि निरनिराळ्या सभासदांचीं भाषणें आणि त्यांचीं मतें वगैरे प्रसिद्ध होणें शक्य नाहीं. अधिकृत रीत्या कामाचा जो अहवाल प्रसिद्ध केला जातो तेवढाच साहजिक प्रसिद्ध होतो. तथापि दारें बंद करण्याची कितीहि खबरदारी घेतली तरी ज्याप्रमाणें कांहीं बाहेरचा प्रकाश आंत जातोच तसाच आंतील प्रकाशहि बाहेर येतो. त्याप्रमाणें आस्ते आस्ते का होईना पण सर्व हकीकत बाहेर येईलच.

काम कोणत्या तऱ्हेनें चालवयाचें याची कार्यक्रमपत्रिका आगाऊच तयार असल्यामुळें मुख्य प्रधानांच्या ऐवजीं काम करणारे परिषदेचे अध्यक्ष लॉर्ड सँकी यांनीं लॉर्ड लोथियन यांनीं केलेल्या मतदान कमिटीच्या शिफारशी विचारांत घ्याव्या असें प्रथम ठरविलें.

### प्रत्यक्ष मतदानास मान्यता

प्रांतिक कायदे-मंडळांच्या सभासदांची निवडणूक कशी व्हावी या बाबतींत आपला कांहीं संबंध नसल्यामुळें संस्थानांच्या प्रतिनिधींनीं या वादविवादांत भाग घेण्याचें नाकारलें. इतर सभासदांपैकीं जवळजवळ १८ सभासदांचीं भाषणें झालीं. लॉर्ड लोथियन यांनीं प्रांतिक कायदेमंडळांकरितां प्रत्यक्ष मतदानपद्धतीचा अवलंब करावा असें सुचविलें. प्रत्यक्ष मतदानपद्धति म्हणजे प्रत्येक मतदारानें सभासदांकरितां आपलें मत स्वतःच नोंदवावयाचें,

कोणत्याहि गटामार्फत अगर संस्थेमार्फत अगर दुसऱ्या प्रतिनिधींमार्फत त्याची नोंद करावयाची नाहीं. यावर सर कावसजी जहांगीर यांनीं मतदारांचे संघ करून त्यांमार्फत निवडणुकी कराव्या अशी सूचना केली. मद्रासचे ए. पी. पेट्रो यांनीं लॉर्ड लोथियन यांना पाठिंबा दिला. श्री. रामस्वामी मुदलियार यांनींहि अप्रत्यक्ष मतदानपद्धतीविरुद्ध मत दिलें. अशा रीतीनें मतप्रदर्शन झाल्यावर परिषदेनें प्रांतिक कायदे-मंडळांत प्रत्यक्ष मतदानपद्धति अंमलांत यावी असा निकाल दिला.

### मतदानाचा हक्क

यानंतर मतदानाचा हक्क कोणाला असावा व तो असण्यास कोणते गुण अवश्य असावे याबद्दलची चर्चा सुरू झाली. प्रस्तुतची पद्धति म्हणजे मालमत्ता अगर जमीन असली पाहिजे, त्याशिवाय मतदानाचा हक्क नाहीं हीच चालू ठेवावी असें लॉर्ड लोथियन यांनीं सुचविलें. तथापि या मताधिकाराबरोबरच प्रत्येक साक्षर मनुष्यालाहि मत असावें असें सुचविण्यांत आलें. परिषदेचें एकंदरींत मत असें दिसलें कीं, मालमत्तेच्या किंवा जमिनीच्या मालकीच्या गुणाबरोबरच शिक्षणाचाहि विचार व्हावा. लोथियन कमिटीनें ज्या शिफारशी केल्या होत्या त्यांचाच या बाबतींत तपशीलवार विचार करावा असें ठरलें व सभा ता. २२ रोजीं दुपारीं २॥ वाजतां भरण्याचें ठरून त्या दिवसाचें काम संपलें.

### स्त्रियांना मतदानाचा हक्क

ता. २२ रोजीं बेगम शहानवाज यांनीं स्त्रियांना मतदानाचा हक्क पुरुषांप्रमाणेंच असावा असें प्रतिपादन केलें. या प्रश्नावरच कित्येक तास चर्चा झाली. या बाबतींत लोथियन कमिटीनें जी शिफारस केली होती ती सभासदांना नापसंत होती. त्या ऐवजीं उच्च प्राथमिक शिक्षण घेतलेल्या सर्व स्त्रियांस मतदानाचा हक्क द्यावा असें बहुमत होतें. पण खरी अडचण विवाहित स्त्रिया व विधवा यांना कोणत्या पद्धतीनें मतदानाचा हक्क द्यावा या बाबतींत होती. लॉर्ड आर्यावन यांनीं सुचविलें कीं, या प्रश्नाचा विचार प्रांतिक सरकारांचीं मतें घेऊन ठरवावा. पण सर्वसाधारणतः या बाबतींत असा निकाल झाला कीं, लोथियन कमिटीच्या शिफारशींप्रमाणें ज्या पुरुषांना मताधिकार आहे, त्यांच्या बायकांना व विधवांना मताधिकार असावा. त्याप्रमाणेंच साक्षर स्त्रियांनाहि मताधिकार असावा.

## लोक-सभेचा मताधिकार

संयुक्त राज्यपद्धतींत जी मध्यवर्ती लोकसभा स्थापन केली जाईल तिला प्रतिनिधी पाठविण्याचा मताधिकार कोणाला द्यावा या प्रश्नाची चर्चा सुरू झाली. सर्वसाधारण मत असें कीं, प्रत्यक्ष पद्धतीनेंच लोकसभेच्या बाबतींतहि मतें दिलीं जावीं. त्याचप्रमाणें हल्लीं ज्यांना मताधिकार आहे व तो ज्या गुणांमुळें आहे तेच गुण पुढेंहि कायम ठेवावे. शिक्षणविषयक बाबतींत लोथियन कमिटीनें ज्या शिफारशी केल्या होत्या त्याच मान्य झाल्या, तथापि लोकसभेंतील प्रतिनिधींची संख्या केवढी असावी हें ठरल्यावर तपशिलाच्या बाबतींत पुनः विचार व्हावा असें ठरलें. श्री. ना. म. जोशी व मि. पेट्रो यांचें मत असें होतें कीं, संस्थानी प्रतिनिधींची निवड कोणत्या पद्धतीनें व्हावी हें आगाऊ ठरल्याशिवाय या निकालाला कायमचें स्वरूप देऊं नये. सर पुरुषोत्तमदास यांनीं युरोपियनांप्रमाणेंच हिंदी व्यापाऱ्यांना मताधिकार असावा असें सांगितलें. पण या सर्व बाबतींत लोथियन कमिटीच्या शिफारशी मान्य झाल्या. याप्रमाणें ता. २२ चें काम संपून ता. २३ रोजीं ११ वाजतां सभा भरण्याचें ठरलें.

## अस्पृश्यांची मतदारी

ता. २२ रोजीं जो वादविवाद झाला, त्यांत अनेक गोष्टींचा खल झाला. परंतु या वादविवादांत सभासदांचें फारसें लक्ष नव्हतें. सर्वच कार्यक्रम कंटाळवाणा झाला. प्रथम लोकसभेमध्यें अस्पृश्य वर्गाकरितां जे प्रतिनिधी पाठविले जातील त्यांना मतदानाकरितां कोणते गुण असावेत याबद्दल चर्चा झाली. त्यांच्या साक्षरतेच्या बाबतींत लोथियन कमिटीनें केलेली शिफारस सभेला मान्य झाली. नेहमींच्या गुणांबरोबरच साक्षरतेची लायकी जमेस घेतल्यास दोन टक्क्यांपेक्षां अधिक लोकांना मतदानाचा हक्क मिळतो. एकंदर अस्पृश्यांच्या लोकसंख्येच्या १० टक्केपर्यंत मतदानाचा हक्क देण्यांत यावयाचा असल्यामुळें व पुण्याच्या कराराप्रमाणें वरिष्ठ लोकसभेंत १८ टक्के जागा अस्पृश्यांना मिळणार असल्याकारणानें प्रत्येक अस्पृश्य साक्षराला मतदानाचा हक्क असावा असें शेवटीं ठरलें.

## मजुरांचे व भांडवलवाल्यांचे प्रतिनिधी

मजुरांना व भांडवलवाल्यांना किती प्रतिनिधी असावे, यासंबंधीं बरीच वाटाघाट झाली पण निश्चित निकाल लागला नाहीं. जमीनदारांच्या बाबतींत

मात्र लोथियन कमिटीनें केलेल्या शिफारशी मान्य झाल्या. मुंबईच्या गिरणीवाल्यांकरितां स्वतंत्र मतदारसंघ असावा असें सुचविण्यांत आलें पण या बाबतींत वादविवाद अपुराच राहिला. स्त्रियांच्या बाबतींत मात्र वरिष्ठ प्राथमिक शिक्षण ज्यांना मिळालें आहे त्या सर्वांना मतदानाचा हक्क मिळाला. लोकसभेच्या प्रतिनिधींची निवडणूक प्रत्यक्ष पद्धतीनें केली जावी असें एकमतानें ठरलें.

## वरिष्ठ सभेची निवडणूक

लोकसभेशिवाय मध्यवर्ती संयुक्त कायदेमंडळांतील बड्या लोकांच्या सभेची म्हणजे 'सेनेट'ची निवडणूक कशी करावी याबद्दल बराच वादविवाद झाला. मुसलमानांचें म्हणणें कीं, जातवार प्रतिनिधित्वावर निरनिराळ्या सूचनांचा काय परिणाम होतो हें पाहून मगच या प्रश्नाचा विचार व्हावा. पण शेवटीं असें ठरलें कीं, सेनेटकरितां प्रतिनिधींची निवडणूक प्रांतिक कायदे-मंडळांनीं सिंगल ट्रॅन्सफरेबल व्होटनें करावी. याला प्रमाणशीर पद्धति असें म्हणतात. यामध्यें प्रत्येकानें आपल्याला योग्य वाटेल त्याप्रमाणें मतें द्यावयाचीं असतात व तीं मतें निरनिराळ्या सभासदांत वांटून दिलीं जावीं अशी हीं पद्धत आहे.

## लोकसभेंतील प्रतिनिधींची संख्या

मध्यवर्ती कायदेमंडळांतील लोकप्रतिनिधींची संख्या किती असावी यावर कडाक्याचा वाद झाला व मतभिन्नताहि फार झाली. मुसलमान सभासदांनीं आपला जातवारीचा हक्क कायम ठेवल्यानें सभेंत कांहींच निर्णय होऊं शकला नाहीं. संस्थानी प्रतिनिधींनींहि या बाबतींत बराच गोंधळ घातला. या बाबतींत मुसलमानांचें म्हणणें कीं, संस्थानी प्रतिनिधींपैकीं निदान २५ जागा तरी आपणांस द्यावयास पाहिजेत. कारण तसें न झाल्यास जातवारीबाबत आपलें नुकसान होईल. अशा तऱ्हेनें मतभेद झाल्यामुळें त्या दिवशीं कांहींच ठरलें नाहीं व सभा दुसरे दिवसापर्यंत तहकूब झाली.

## शेषाधिकाराबद्दलचा वाद

ता. २४ रोजीं मध्यवर्ती सरकारला कोणते हक्क असावे व प्रांतिक सरकारला कोणते हक्क असावे याबद्दल बरीच चर्चा झाली. संस्थानांच्या प्रतिनिधींचें म्हणणें कीं जेवढे हक्क मुख्य सरकारला दिले जातील तेवढ्याखेरीज बाकीच्या

बाबतींत संस्थानांचें स्वातंत्र्य कायम असावें. मुसलमानांचें म्हणणें सर्व शेषाधिकार प्रांतिक सरकारांकडेच असावेत. सर पेट्रो यांनीं सुचविलें कीं, सर्व सत्ता गव्हर्नर जनरलच्या हातीं द्यावी. या सर्व विषयांच्या बाबतींत इतका गोंधळ माजला कीं, ऐकमत्य तर झालें नाहींच, पण परिषदेचें कामहि बंद पडलें. या प्रश्नाच्या बाबतींत फेडरल स्ट्रक्चर कमिटीनें जे निर्णय दिले होते, त्यांचा पुन्हा विचार करण्यासाठीं एक कमिटी नेमण्यांत आली. या कमिटींत पुढील सभासद आहेत:—

(१) लॉर्ड सँकी (चेअरमन), (२) सर तेजबहादूर सप्रू, (३) चौधरी झापरउल्लाखां, (४) सर अकबर हैदरी, (५) सर मनुभाई मेहता, (६) सर ए. पी. पेट्रो, (७) सर एन्. एन्. सरकार (८) लॉर्ड रेडिंग, (९) सर सॅम्युअल होअर, (१०) मि. आर. ए. बटलर.

हौस ऑफ लॉर्ड्सच्या इमारतींतील जागा फारच लहान व कोंदट असल्यामुळें सोमवार ता. २८ ची बैठक बादशहाच्या खास कपडे घालण्याच्या जागेंत भरविण्यांत आली होती. संयुक्त राज्यपद्धतींत शेषाधिकार कोणाकडे असावे या प्रश्नांतून साहजिकच प्रांतिक सरकारच्या अधिकाराचा प्रश्न निघाला व त्यांतल्या त्यांत सध्यां गृहमंत्र्यांकडे असलेलें

## कायदा व शांतता

खातें कोणाकडे असावें ह्या मुद्द्यावर मोठा वादविवाद झाला. पोलीस, तुरुंग, न्याय व सरकारी खास अधिकारांची अंमलबजावणी वगैरे गोष्टींचा अंतर्भाव यांत होतो. त्याबरोबरच दिवाणी व फौजदारी कायदे कोणी करावयाचे हाहि विषय आलाच. ब्रिटिश सरकारचें म्हणणें कीं, हल्लींच्या कायद्यांत जी एक सुसंगतता आहे ती राहण्याकरितां हा अधिकार संयुक्त सरकारकडे ठेवावा. याबाबत कांहीं तडजोड निघणें शक्य आहे असें दिसलें. पण कायदा व शांतता राखण्याचा अधिकार प्रांतिक सरकारकडेच असला पाहिजे, नाहीं तर प्रांतिक स्वायत्ततेची थट्टा होणार आहे असा सप्रू, जयकर, केळकर प्रभृतींचा अभिप्राय पडला. पण एखादा प्रांत अविचारानें बहुमताच्या जोरावर वाटेल तसा धिंगाणा घालूं लागला तर त्याच्यावर नियंत्रण घालण्याचा अधिकार वरिष्ठ सरकार किंवा प्रांताचे गव्हर्नर व गव्हर्नर जनरल यांच्याकडे ठेवला

पाहिजे असें सरकारतर्फे प्रतिपादन करण्यांत आलें. याबाबत पंजाब व बंगाल यांच्या प्रतिनिधींचा सप्रूप्रभृतींना पाठिंबा मिळाला.

## शिखांचें आव्हान

पंजाबांत मुसलमानांचें कायमचें बहुमत मुख्य प्रधानांच्या निवाड्याप्रमाणें राहणार असल्यामुळें मुसलमानांकडून इतरांवर फार जुलूम होईल म्हणून, व ही आपत्ति टळावी यासाठीं गव्हर्नर व गव्हर्नर जनरल यांना या बाबतींत लगाम घालण्याचे पूर्ण अधिकार द्यावे. नाहीं तर हें खातेंच अजिबात सरकारकडे ठेवावें. सध्यांच्या मुसलमानी बहुमताच्या परिस्थितींत प्रांतिक सरकारचा कारभार आपण चालूं देणार नाहीं असें शीख-प्रतिनिधि सरदार तारासिंग यांनीं आव्हान दिलें! पंजाबचे हिंदु-प्रतिनिधि श्री. नानकचंद यांनीं त्यांना दुजोरा दिला. सर ह्यूबर्ट कार व सर हेन्री गिडने यांनींहि त्यांच्याच बाजूचें मत दिलें. बंगालच्या परिस्थितींत 'लॉ व ऑर्डर' हें खातें सरकारकडेच पाहिजे असें सर नृपेंद्रनाथ सरकार यांनीं प्रतिपादिलें! लॉर्ड आयर्विन, सर अकबर हैदरी, सर मनुभाई, सर मिर्झा इस्माईल यांनीं या मतालाच पाठिंबा दिला. डॉ. अंबेडकर यांनीं सांगितलें कीं, प्रांतिक सरकारांनीं वाटेल त्या वेळीं सैन्याची मदत घेऊन वाटेल तसा अधिकार चालविल्यास पंचाईत पडेल, म्हणून त्यांच्यावर बंधन असावें. या बाबतींत एक कमिटी नेमून त्या कमिटीच्या सांगण्याप्रमाणें गव्हर्नरानें व गव्हर्नर जनरलानें आपले अधिकार चालवावे अशीहि सूचना आली. या सर्वांस मि. चौधरी झाफरउल्ला वगैरे मुसलमानांनीं विरोध केला.

## ता. २९ ची खडाजंगी

गोलमेज परिषदेच्या कामास ता. २९ रोजीं लॉर्ड आयर्विन यांनीं सुरुवात केली. प्रांतिक स्वायत्तता दिली व जबाबदारीचें तत्त्व मुख्य सरकारच्या कारभारांत अमलांत आणिलें तरी पुढील अधिकार गव्हर्नर जनरलांना पूर्णपणें असणें जरूर आहे असें सरकारचें म्हणणें पडलें. ते अधिकार असे—(१) शांतता व सुव्यवस्था, (२) अल्पसंख्याकांचें संरक्षण, (३) सिव्हिल सर्व्हिसच्या नोकरांचे हक्क, (४) गव्हर्नर जनरल यांच्याकडील खातीं, (५) संस्थानांच्या अधिकारांचें संरक्षण, (६) व्यापारी सवलती, (७) साम्राज्यांतील इतर घटकांसंबंधींची भानगड. या प्रश्नांवर सर तेज बहादुर सप्रू व लॉर्ड आयर्विन यांची खूपच खडाजंगी झाली!

## लॉर्ड आयर्विन यांची 'तिपाई'

लॉर्ड आयर्विन यांनीं सांगितलें कीं, म. गांधींशीं केलेल्या करारांत आम्हीं असें स्पष्ट म्हटलें आहे कीं, जबाबदारीचें तत्त्व आम्ही मान्य करूं पण संरक्षक बंधनें तुम्हीं मान्य केलीं पाहिजेत. संयुक्त राज्यपद्धति, जबाबदारी व संरक्षक बंधनें हे पुढील राज्यपद्धतीच्या तिपाईचे पाय आहेत व यांपैकीं संरक्षक बंधनांचा पाय आपण मोडूं देणार नाहीं. त्यांनीं सांगितलें कीं, पुढील निवडणुकींत राष्ट्रीय सभेचेच सर्व लोक निवडून येतील म्हणून ह्या सुधारणांचें यंत्र सुरक्षित राहण्याची आपण तजवीज केली पाहिजे.

## संप्रूचा तीव्र विरोध

सर तेज बहादुर सप्रू यांनीं या म्हणण्याला तीव्र विरोध केला. ते म्हणाले, " राष्ट्रीय सभा पुढील कौन्सिलें जिंकील हें खरें; पण त्याबद्दल सरकारच जबाबदार आहे. त्यांनीं प्रागतिकांना कस्पटासमान वागविलें त्याचेंच हें फळ आहे. पण त्याबरोबरच हेंहि लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, राष्ट्रीय सभेनें स्वराज्याचा बंदा रुपया मागितला तोच आम्हीहि मागतों. आम्ही बारा आणे घेऊं पण तें खरें नाणें पाहिजे. नकली नाणें चालणार नाहीं. अडचणींच्या सबबीवर जर गव्हर्नर जनरल आपल्या अधिकारांचा उपयोग करून जबाबदारीच्या तत्त्वाला हरताळ फाशील तर आम्ही

## सरकारशीं असहकार

करूं व सरकारला कोणतीहि मदत न देतां त्यांना सर्व रान मोकळें सोडूं. म्हणून या सर्वांवर उपाय एकच कीं, हीं संरक्षक बंधनें सरकारनें हिंदुस्थानच्या हिताचींच आहेत असें सिद्ध केलें पाहिजे. संस्थानांच्या अगर अल्पसंख्याकांच्या संरक्षणाच्या सबबीवर सरकारचें कोणतेंहि नियंत्रण आपण पत्करणार नाहीं. आम्हांस खरेंखुरें स्वराज्य पाहिजे."

## श्री. केळकर

श्री. केळकर यांनीं आपल्या भाषणांत सर तेज बहादुर सप्रू यांना दुजोरा दिला. त्यांनीं जबाबदारीचें स्वराज्य म्हणजे काय याची छाननी करून राखीव खात्यांत हिंदी लोक नेमावे व त्यांच्याकडेच सर्व अधिकार सोपवावे असें प्रतिपादिलें. लॉर्ड आयर्विन यांनीं पुढें मांडलेल्या सूचना कशा अयोग्य आहेत हेंहि त्यांनीं विशद केलें. मि. हिदायत हुसेन व गझनवी यांनींहि

सप्रूंना पाठिंबा दिला. सर नृपेंद्र सरकार यांनीं आपल्या भाषणाचा खुलासा केला. ते म्हणाले, आपल्या आदले दिवशीच्या भाषणाचा अर्थ बंगालमध्यें 'कायदा व सुव्यवस्था' हें खातें लोकांकडे देऊं नये असा नव्हता नंतर सभा तहकूब झाली.

### ता. ३० चा वाद

गव्हर्नर व गव्हर्नर जनरल यांना जादा अधिकार द्यावे कीं नाहीं या प्रश्नावरील वादविवाद पुढें चालू झाला. ता. २९ ला लॉर्ड आयर्विन यांनीं जी बाजू मांडली तिलाच लॉर्ड रेडिंग यांनीं ता. ३० रोजीं पुष्टि दिली. व्हाइसरॉय यांना वटहुकूम काढण्याचा व सरकारी राज्यकारभार चालण्याकरितां पैसा वसूल करण्याचा अधिकार दिलाच पाहिजे, व मंत्रिमंडळ विरुद्ध असलें तरी, हे अधिकार त्यांना बजावतां आलेच पाहिजेत असें त्यांनीं आग्रहानें सांगितलें. लॉर्ड रेडिंग यांनीं शिक्केबाजीचा अधिकार त्यांना द्यावा असें सुचविलें. आपल्या भाषणाच्या शेवटीं सर सप्रू यांनीं तुमचें पूर्वींचें धोरण बदललें कीं काय असाहि सवाल त्यांना टाकला! सर सप्रू यांनीं आपल्या उत्तरांत आपलीं मतें बदललीं नसून जबाबदारी व बंधनें यांची खिचडी करूं नका; कारण त्यामुळें खरें स्वराज्य दूर पळेल असें सांगितलें. मद्रासचे सर पेट्रो यांनीं त्यांना दुजोरा दिला. यानंतर परिषदेचें काम ता. १ पर्यंत तहकूब राहिलें.

( केसरी—१३ डिसेंबर १९३२ )

सोमवार ता. ५ रोजीं लॉर्ड सँकी यांच्या अध्यक्षतेखालीं गोलमेज परिषदेच्या कामास सुरुवात झाली. या दिवशीच्या कामाचा मुख्य विषय भावी स्वराज्यांतील लष्कराची व्यवस्था हा होता. सर तेज बहादुर सप्रू यांनीं प्रथमतःच सांगितलें कीं, पहिल्या गोलमेज परिषदेंत नेमलेल्या पोट-मंडळानें ज्या शिफारशी केल्या होत्या त्या त्यांना मान्य आहेत; तथापि कांहीं प्रश्नांसंबंधानें चर्चा होऊन निश्चित मत या परिषदेंत नमूद करणें जरूर आहे. त्यांपैकीं सर तेज बहादुर यांनीं पहिला प्रश्न विचाराकरितां घेतला. तो प्रश्न

### लष्कराचें हिंदीकरण

हा होय. या हिंदीकरणाच्या बाबतींत सर सप्रू यांचें म्हणणें असें कीं, लष्कराच्या हिंदीकरणाची कालमर्यादा निश्चितपणें मांडली गेली पाहिजे. या बाबतींत आजपर्यंत कांहींच निकाल न झाल्याकारणानें मुख्य अडचण उपस्थित झाली आहे. तेव्हां अमुक इतक्या वर्षांत लष्कराचें हिंदीकरण पूर्ण करूं असें

आश्वासन दिलें गेलें पाहिजे. या प्रश्नावर लॉर्ड रेडिंग, लॉर्ड पील व अर्ल विंटर्टन यांनीं बोलतांना सांगितलें कीं, अशा तऱ्हेची कालमर्यादा घालणें अशक्य आहे. लष्कर हें अत्यंत कार्यक्षम व हिंदुस्थानचें संरक्षण करण्याचे कामीं जय्यत तयार असणें हा मुख्य मुद्दा असल्यानें हिंदीकरणाच्या प्रश्नावर जोर देतां येत नाहीं. लॉर्ड आयर्विन यांनीं सांगितलें कीं, अशा तऱ्हेनें कालमर्यादा घातल्यास हिंदुस्थानचेंच अहित होईल. सर्वांत उत्तम मार्ग हा कीं, दरवर्षीं किती 'कॅडेट' किंवा उमेदवार घ्यावेत हें ठरवावें व तो क्रम पुढें चालवावा. सर सॅम्युअल होअर यांनीं या वादाचा समारोप करतांना सांगितलें कीं, हिंदी-करणाच्या प्रयत्नाची हल्लींची गति लवकरच दुप्पट केली जाईल. म्हणजे दर वर्षीं हल्लींच्यापेक्षां लष्करी अधिकाऱ्यांच्या जागांकरितां दुप्पट हिंदी उमेदवार घेतले जातील. यापेक्षां अधिक जलदी करणें हिंदुस्थानच्या हिताचें नाहीं. लष्कराच्या सर्व खात्यांत आज हिंदी लोकांचा प्रवेश आहेच. तेव्हां या बाबतींत अधिक माहिती तज्ज्ञांकडून आल्याशिवाय त्याचा अधिक विचार करतां येत नाहीं.

## राष्ट्रसंरक्षणाचा प्रश्न

श्री. जयकर यांनीं यानंतर असें सुचविलें कीं, "यापुढें हिंदुस्थान सरकारचा जो नवा कायदा होणार आहे त्यांत प्रारंभींच एका तत्त्वाची घोषणा नमूद करून ठेवावी. तें तत्त्व हें कीं, " हिंदी राष्ट्राचें संरक्षण करण्याची जबाबदारी यापुढें हिंदी लोकांवरच टाकली जाईल व तिचा बोजा ब्रिटिश सरकारवर ठेवला जाणार नाहीं." सर सॅम्युअल होअर यांनीं अशा तऱ्हेचें तत्त्व नमूद करण्याच्या प्रश्नाचा विचार करूं असें सांगितलें.

## हिंदी लष्करी मंत्री

सर तेज बहादुर सप्रू यांनीं हिंदी लष्करी खातें व वरिष्ठ लोकसभा यांच्या-मध्यें कोणता संबंध असावा हा प्रश्न विचाराकरितां घेतला व असें सुचविलें कीं, इंग्लंडमध्यें ज्याप्रमाणें एक लष्करी कौन्सिल आहे त्याप्रमाणें हिंदुस्थानां-तहि एक लष्करी कमिटी नेमिली जावी, व तसेंच लष्करी खात्याचा ताबा हिंदी लोकसभेचा सभासद असलेल्या हिंदी गृहस्थाकडे द्यावा. हा सभासद व्हाइसरॉयांना जबाबदार असावा. तथापि मंत्रिमंडळ मोडलें तर यांनीं राजी-नामा द्यावा, परंतु त्याला पुन्हा निवडून येतां येण्यास हरकत नाहीं. या प्रश्नावर बरीच चर्चा झाली. ब्रिटिश कॉन्झरव्हेटिव्ह पक्षातर्फे असें सांगण्यांत

आलें कीं, गेल्या डिसेंबरमध्यें जो 'व्हाइट पेपर' सरकारकडून प्रसिद्ध झाला त्यापेक्षां अधिक सवलती देण्यास ते तयार नाहींत. याचें कारण असें सांगण्यांत आलें कीं त्या योगानें व्हाइसरॉयसाहेबांचे राखीव अधिकार कमी केले जातील व ही गोष्ट बरी नाहीं. ब्रिटिश लिबरल पार्टीतर्फें असें सांगण्यांत आलें कीं, लष्कर मंत्री कोण असावा हें व्हाइसरॉयांनींच ठरवावें. संस्थानांतर्फें सर अकबर हैदरी यांनीं सप्रूंच्या या सूचनेला विरोध केला. त्यांचें म्हणणें कीं लष्कर हा विषय संस्थानें व ब्रिटिश इंडिया या दोघांनाहि जिव्हाळ्याचा असल्यामुळें या दोन्ही पक्षांचा विचार केला पाहिजे. सर सॅम्युअल होअर म्हणाले कीं, स्वतंत्र लष्करी अधिकारी नेमावयाचा किंवा जबाबदार असा लष्करमंत्री नेमावयाचा हा प्रश्न व्हाइसरॉयांकडे सोंपविला पाहिजे. शिवाय लष्करमंत्री व लष्करी अधिकारी यांनीं नेहमीं एकमेकांची सल्लामसलत घ्यावी हें उत्तम. लॉर्ड लोथियन यांनींहि आपलें मत तसेंच दिलें. यावर सप्रूंनीं सांगितलें कीं, मोघम गोष्टी न ठेवतां संबंध कसे असावेत ही गोष्ट निश्चितपणें नमूद केली जावी. डॉ. शफत अहमद यांनीं गव्हर्नर जनरलला जें सूचनापत्र देण्यांत येतें त्यांत या गोष्टी नमूद केल्या जाव्या असें सांगितलें. परंतु चौधरी झाफर उल्लाखान यांना ही गोष्ट पसंत पडली नाहीं. त्यांच्या मतें व्हाइसरॉयांचा लष्करमंत्री नेमण्याचा अधिकार कोणत्याहि तऱ्हेनें कमी करूं नये. तसेंच मंत्रिमंडळाबरोबर लष्कर-मंत्र्यानें राजीनामा देऊं नये. या सर्व सूचनांचा विचार करण्याचें आश्वासन दिल्यावर या प्रश्नावरील चर्चा थांबली.

## लष्करी खर्च

सर तेज बहादुर सप्रू यांनीं लष्करी खर्चाचा प्रश्न पुढें मांडला व असें सुचविलें कीं, लष्कराच्या अंदाजपत्रकावर लोकसभेचें मत घेऊं नये; तसेंच युद्धासारख्या प्रसंगीं व्हाइसरॉयांना अधिक खर्च करण्याची परवानगी असावी; तथापि त्यापेक्षां अधिक खर्च करावयाचा असला तर मात्र लोकसभेची परवानगी घेतली पाहिजे. तसेंच जर एखाद्या प्रांतानें लष्कराची मदत मागितली तर ती मदत देतांना त्याचा खर्च त्या प्रांतानें सोसला पाहिजे. कारणांचा विचार करून हा खर्च प्रांतानें सोसावा किंवा मध्यवर्ती सरकारनें सोसावा हें गव्हर्नर जनरलनें ठरवावें. परंतु सर सप्रूंचें वरील बाबतींतच पुढें म्हणणें असें कीं, जरी लष्करी अंदाजपत्रकावर लोकसभेला मत देतां आलें नाहीं तरी पूर्वींच्या पांच वर्षांच्या खर्चाचा आढावा घेऊन लष्करी खर्च किती करावा

हें लोकसभेच्या अनुमतीनें ठरवावें व प्रत्येक पांच वर्षांनीं पुन्हा याची छाननी व्हावी. तसेंच जरूर पडल्यास गव्हर्नर जनरलांनीं हा प्रश्न उपस्थित करावा. या प्रश्नाचा विचार पुरा झाला नाहीं.

## गोरें लष्कर

सर तेज बहादुर सप्रू यांनीं गोरें लष्कर कमी करण्याचाहि प्रश्न उपस्थित केला. या सर्व बाबतींत रॉलिन्सन कमिटीच्या रिपोर्टांतील शिफारशी अमलांत आणाव्या असें त्यांनीं सुचविलें. लॉर्ड रेडिंग व अर्ल विंटर्टन यांनीं सांगितलें कीं, हिंदुस्थानचें स्थैर्य लष्करावर अवलंबून आहे ही गोष्ट लक्षांत ठेवावी. शिवाय रॉलिन्सन रिपोर्ट सरकारनें कधींच कबूल केला नाहीं. सर पुरुषोत्तमदास ठाकुरदास यांनीं हिंदुस्थानबाहेर हिंदी लष्कराचा उपयोग करावयाचा असल्यास हिंदी कायदेमंडळाची संमति घेतली पाहिजे असें सुचविलें. श्री. जयकर यांनीं सांगितलें कीं, लष्करी खातें व लोकसभा यांच्यामध्यें विभक्तता असतां उपयोगाची नाहीं. सरसेनापति हे मुख्य लष्करी अधिकारी व लोकनियुक्त लष्करमंत्री ही जोडी सर्वांपेक्षां अधिक चांगलें काम करील.

## राष्ट्रीय लष्कर

सर हेन्री गिडने हे सँढर्स्ट कमिटीचे एक सभासद होते. त्यांचा या प्रश्नावर बोलण्याचा अधिकार मोठा होता हें निःसंशय आहे. त्यांच्या भाषणांत त्यांनीं महत्त्वाचे नवीन मुद्दे उपस्थित केले. ते म्हणाले कीं, हिंदीकरणाची जी पद्धति हल्लीं अमलांत आहे ती अगदीं अपुरी आहे. कार्यक्षमता या गुणाकडे लक्ष दिलें पाहिजे हें खरें, तथापि त्यामुळें लष्कराचें हिंदीकरण मागें पडतां कामा नये.

## मराठे लोक

यावर बोलतांना ते पुढें म्हणाले कीं, हल्लीं सरकारचें धोरण फक्त लढाऊ जातींतले लोकच लष्करांत घेतले जावे असें आहे. लष्करांत यापुढें मराठे, दलित वर्गांतील लोक, अँग्लो-इंडियन्स यांना ध्यावयाचें नाहीं असें ठरलें आहे. ही गोष्ट निषेधार्ह आहे. लष्करांत शिरण्याचा हक्क राष्ट्रांतील प्रत्येक जातीस असावयास पाहिजे व त्यांत लढाऊ व बिन-लढाऊ असा फरक करतां उपयोगी नाहीं. अधिकारांच्या जागा मात्र सर्वांस देण्याचा विचार आहे, ही त्यांतल्या त्यांत बरी गोष्ट आहे. गोरें सैन्य कमी करूं नये असें आपलें मत त्यांनीं दिलें.

लष्करांतील इतर अनेक खात्यांत हिंदी लोकांचा प्रवेश करणें मात्र लांबणीवर टाकूं नये असेंहि त्यांनीं सांगितलें.

## सप्रू-होअर यांचा खटका

मगंळवार ता. ६ रोजीं परिषदेच्या कामास लॉर्ड सँकी यांच्या अध्यक्षतेखालीं सुरुवात झाली. प्ररंभींच सर तेज बहादुर सप्रू यांनीं अध्यक्षांना विनंति केली कीं, लष्करी प्रश्नासंबंधानें ता. ५ रोजीं जी चर्चा झाली तीमध्यें आपल्या गटातर्फें केलेल्या मागण्या पुनः समजुतीकरितां परिषदेपुढें वाचण्याची परवानगी द्यावी. अध्यक्षांनीं तशी परवानगी दिली; परंतु होअरसाहेबांचें पित्त खवळलें व त्यांनीं या मागणीस विरोध केला. विरोध करतांना ते म्हणाले कीं, सप्रू यांनीं खेळांतील शिरस्त्याप्रमाणें आपले सर्व पत्ते आगाऊ दाखविले पाहिजेत. त्यांत गुप्तपणा नसावा. नवे प्रश्न उपस्थित करणें चूक. सप्रूंनीं या भाषणाचा निषेध केला व उलट होअर यांना दोष देऊन ते कार्यक्रमपत्रिका रात्रीं उशिरा पाठवितात म्हणून तक्रार केली. शेवटीं श्री. जयकर यांनीं आपल्या पक्षातर्फेंचें म्हणणें वाचून दाखविलें.

## होअर यांचें उत्तर

लष्करासंबंधाच्या प्रश्नाबाबत सरकारचें म्हणणें म्हणून होअर यांनीं एक पत्रक वाचून दाखविलें, त्यांत पुढील गोष्टी सांगितल्या आहेत. (१) लष्कराच्या खर्चासंबंधाचा निश्चित आंकडा ठरवितां यावयाचा नाहीं. (२) लष्कराच्या खात्याची सर्व जबाबदारी गव्हर्नर जनरलकडेच असली पाहिजे. साम्राज्याकरितां लष्कराचा उपयोग केला गेला तर त्याचा खर्च साम्राज्य भरील. खर्चाबद्दल लंडनमध्यें जी पंचायत-कमिटी चर्चा करीत आहे तिचा निकाल झाल्यावर मग विचार करावा. (३) हिंदीकरणाचा निश्चित काल सागतां येणार नाहीं. (४) लष्करमंत्री कोणास नेमावयाचा याबाबतचे सर्व अधिकार गव्हर्नर जनरलकडे राहतील. इंपीरियल डिफेन्स कमिटीसारखी एखादी कमिटी असेंब्लीनें नेमण्यास हरकत नाहीं. (५) प्रत्यक्ष हिंदुस्थानच्या कायद्यामध्यें लष्करासंबंधीं निश्चित योजना व तत्त्वें घालण्याचें कारण नाहीं. तीं तत्त्वें अधिकारदानपत्रांत घातलीं म्हणजे पुरें.

## आर्थिक प्रश्नाची चर्चा

यानंतर हिंदुस्थानच्या आर्थिक प्रश्नासंबंधीं चर्चा सुरू झाली. सर सॅम्युअल होअर यांनीं प्रांतिक सरकारची व हिंदुस्थान सरकाराची आर्थिक स्थिति

सांगून प्रातीवरील कर मुख्य सरकारकडे असावा असें सुचविलें. तसेंच ज्या प्रांतांना खर्च भागविण्याकरितां पैसा कमी पडेल त्यांना तो कांहीं वर्षेंपर्यंत द्यावा. सिंध प्रांत वेगळा करणें जरूरीचें आहे, पण खर्चांची काय वाट करावयाची या प्रश्नाचा आपण विचार करावयास पाहिजे. ओरिसा प्रांताचाहि विचार केला पाहिजे. सर कावसजी जहांगीर यांनीं पर्सी व पील यांच्या कमिट्यांनीं ज्या सूचना केल्या होत्या त्याच मान्य कराव्या असें सांगितलें. सर पुरुषोत्तमदास ठाकुरदास यांनीं लष्कराचा खर्च कमी करून मुख्य सरकारचा खर्च भागवावा असें सुचविलें. या सूचनेला आगाखानांनीं विरोध केला. सर एन्. एन्. सरकार यांनीं लष्करी खर्च कमी केला नाहीं तर सरकारचें दिवाळें निघेल असें बजावलें. कांहीं वक्त्यांनीं प्रातीवरील कर मुख्य सरकारास देऊं नये असें सांगितलें. सर पात्रो व शफत अहमदखान यांनींहि हीच सूचना मांडली. यानंतर निरनिराळ्या कामांकरतां लहान लहान पोट-कमिट्या नेमण्याचें ठरविण्यांत आलें व त्या दिवशीचें काम संपलें.

(केसरी— १६ डिसेंबर १९३२)

बुधवार ता. ७ रोजीं गोलमेज परिषदेच्या कामकाजास सुरुवात झाली त्या वेळीं संयुक्त सरकारच्या तिजोरीची काय व्यवस्था लावावयाची हा प्रश्न विचारांत घेण्याचें ठरलें. पर्सी कमिटीनें या बाबतींत कोणत्या कराचें उत्पन्न संयुक्त सरकारनें ठेवावें व कोणतें उत्पन्न प्रांतिक सरकारांकडे राहावें या बाबतींत ठरविलेली योजना पुष्कळ सभासदांना सर्वसाधारणतः पसंत असल्याचें दिसलें. प्रातीवरील कराचें उत्पन्न कोणी घ्यावें व प्रांतांना स्वतंत्र रीतीनें कर्ज काढण्याची सत्ता असावी कीं नाहीं हे वादाचे प्रश्न होते. प्रांतांना प्रातीवरील कराचा वांटा द्यावा व त्यांना कर्ज काढण्याचीहि परवानगी असावी असें सांगण्यांत आलें.

## संस्थानिकांची बाजू

सर अकबर हैदरी, संस्थानिकांची या प्रश्नासंबंधींची बाजू मांडतांना म्हणाले, " जर संयुक्त सरकार उत्पन्न करावयाचें असेल तर त्याचें आर्थिक बल उत्तम असलें पाहिजे. आजच नऊंपैकीं सात प्रांतांजवळ भरपूर पैसा नसल्यामुळें त्यांच्या जमाखर्चांत तूट येते. मध्यवर्ती सरकराजवळहि पैसा जर नसला तर मोठी आपत्ति येईल. म्हणून प्रातीवरील कर त्या सरकारकडे असावा. संयुक्त सरकार हें दरिद्रीच झाल्यास संस्थानिक पुढील राज्यकार-

भारांत भाग घेणार नाहींत." सर मनुभाई मेथा यांनीं वरील बाबतींत हैदरींना विरोध केला. ते म्हणाले कीं प्रातीवरील कर प्रांताकडेच असावा. संस्थानें अप्रत्यक्ष रीतीनें मध्यवर्ती सरकारास मदत करतील. परंतु संयुक्त सरकार होण्यापूर्वीं हिंदुस्थान सरकारानें जें कर्ज केलें आहे त्या कर्जाची जबाबदारी घेण्यास संस्थानें तयार नाहींत. तेव्हां उत्तम उपाय म्हणजे लष्करी खर्चांत व इतर खर्चांत शक्य तितकी काटकसर करावी. या विषयावर आणखी कांहीं भाषणें झाल्यावर या निरनिराळ्या प्रश्नांसंबंधानें तीन स्वतंत्र कमिट्या नेमण्याचें ठरलें व ५ वाजून २० मिनिटांनीं त्या दिवसाचें काम संपलें.

### कमिटींतील सभासद

संयुक्त सरकारच्या तिजोरींत कोणकोणत्या करांचें उत्पन्न यावें हें ठरविण्याकरितां नेमलेल्या कमिटींत पुढील सभासद आहेत. ( १ ) लॉर्ड पील ( अध्यक्ष ), ( २ ) लॉर्ड लोथियन, ( ३ ) मि. डेव्हिड्सन, ( ४ ) मि. बटलर, ( ५ ) सर मनुभाई मेथा, ( ६ ) सर मिर्झा इस्माईल, ( ७ ) सर अकबर हैदरी, ( ८ ) मि. व्ही. टी. कृष्णम्माचारी, ( ९ ) सर कावसजी जहांगीर, ( १० ) सर पुरुषोत्तमदास ठाकुरदास, ( ११ ) मि. रामस्वामी मुदलियार, ( १२ ) सर एन्. एन्. सरकार, ( १३ ) डॉ. शफत अहमद, ( १४ ) मि. ए. एस्. गझनवी, ( १५ ) सर ह्यूबर्ट कार.

अँग्लो-इंडियन लोकांच्या शिक्षणाबाबत पुढील कमिटी नेमण्यांत आली:— लॉर्ड आयर्विन ( अध्यक्ष ), सर हेन्री गिडने, रा. जयकर, सर महमद इक्बल, सर ह्यूबर्ट कार.

आर्थिक संरक्षक बंधनांचा विचार करण्याच्या कमिटींत पुढील सभासद आहेत:—सर सॅम्युअल होअर (अध्यक्ष), लॉर्ड आयर्विन, लॉर्ड रेडिंग, लॉर्ड पील, सर अकबर हैदरी, सर मनुभाई मेथा, सर टी. बी. सप्रू, सर पुरुषोत्तमदास ठाकुरदास, सर कावसजी जहांगीर, सर ह्यूबर्ट कार, मि. झाफरउल्ला, मि. हिदायत हुसेन.

गुरुवार ता. ८ या दिवशींच्या कामाला सुरुवात झाली त्या वेळीं संस्थानी सभासदांनीं सांगितलें कीं आज हिंदुस्थानचें एक अब्ज एकोणीस कोटी रुपयांचें कर्ज आहे त्याचा बोजा संस्थानिक सोसणार नाहींत. तसेंच महा-

युद्धाच्या बाबतींत हिंदुस्थाननें जें कर्ज केलें आहे त्याला तहकुबी द्यावी. अशाच तऱ्हेचे कांहीं विचार मांडल्यावर व आदले दिवशीं नेमलेल्या कमिट्यांचें काम करण्यास फुरसत मिळावी म्हणून सभा तहकूब ठेवण्यांत आली.

### श्री. केळकरांचें मत

सर सॅम्युअल होअर यांनीं लष्कर, आर्थिक बाबी, आणि व्हाइसरॉय व गव्हर्नर यांना देण्यांत येणारे खास अधिकार यासंबंधीं जें भाषण केलें तें सप्रू वगैरेस मुळींच पसंत पडलें नाहीं. यासंबंधीं मुख्य प्रधान मि. मॅक्डोनाल्ड यांच्याकडे तक्रारीचें एक पत्र पाठविण्याचें ठरलें आहे. मुख्य प्रधानांनीं मनांत आणल्यास गोलमेज परिषदेंत जें दुमत झालें आहे तें त्यांना काढतां येईल. तथापि श्री. केळकर यांनीं मद्रासच्या हिंदु पत्राच्या खास बातमीदाराला जी मुलाखत दिली आहे तिजवरून तसें होईल असें दिसत नाहीं. आपल्या मुलाखतींत श्री. केळकर म्हणतात, " लॉर्ड सँकी, लॉर्ड आयर्विन, लॉर्ड रेडिंग व लॉर्ड लोथियन यांनीं कितीहि आग्रह केला व स्नेह दाखविला तरी यापुढें कोणत्याहि तऱ्हेनें वरील चार बाबतींत सर सॅम्युअल होअर यांच्या म्हणण्याला रुकार देण्यास आपण तयार नाहीं. आज जी कटकट उपस्थित झाली आहे तिजवरून असें स्पष्ट दिसतें कीं, गोलमेज परिषदेच्या कार्याच्या परिसमाप्तीस प्रारंभ झाला! आणखी हिंदी राष्ट्राच्या जिव्हाळ्याचे पुष्कळ प्रश्न अद्याप परिषदेपुढें आले नाहींत. उदाहरणार्थ, व्यापारी बाबतींत वर्णभेद करणें व आर्थिक बाबतींत संरक्षक बंधनें घालणें हे दोन प्रश्न अत्यंत महत्त्वाचे आहेत. सरकारनें पहिल्या चार प्रश्नांसंबंधीं जें प्रतिगामी धोरण स्वीकारलें तेंच धोरण या प्रश्नांचे बाबतींतहि सरकार ठेवील असें दिसतें. संयुक्त राज्यव्यवस्थेमध्यें संस्थानिकांनीं केव्हां येऊन मिळावयाचें हेंहि निश्चित झालें नाहीं. तसेंच मध्यवर्ती जबाबदारीबद्दलहि अद्याप वार्ता नाहीं. अशा परिस्थितींत पुढें काय होतें हें सांगणें कठीण आहे."

### श्री. जयकर यांची मुलाखत

मद्रासच्या हिंदु पत्राच्या प्रतिनिधीनें जयकरांचीहि मुलाखत घेतली. सर तेज बहादुर सप्रूंप्रमाणेंच श्री. जयकर हेहि कांहीं गोष्टी सांगूं इच्छीत नव्हते. तथापि सर्वसाधारणरीत्या श्री. जयकर आपल्या मुलाखतींत म्हणाले, "आमच्यांपैकीं अकरा-बाराजणांनीं सरकारला एक खणखणीत पत्र लिहून आमचें लष्कर वगैरे बाबतींत काय मत आहे हें स्पष्टपणें कळविलें आहे. या

पत्राच्या उत्तराची आम्ही वाट पाहत आहों. आम्हांला कमींत कमी काय पाहिजे हें आम्हीं ठरविलें आहे व आमची मागणी मंजूर झाल्याशिवाय आम्हांला समाधान होणार नाहीं. ठरलेल्या वेळाच्या आंत उरलेले अनेक महत्त्वाचे प्रश्न निकालांत कसे निघणार हें समजणें कठीण आहे. परंतु परिषद पुढें लांबवा किंवा तहकूब करा असें कोणी म्हणणार नाहीं व तशी आमची अपेक्षाहि नाहीं. प्रांतिक स्वायत्तताच फक्त घेऊन आमचें समाधान होणें शक्य नाहीं. सरकारनें जर प्रामाणिकपणें प्रयत्न केला तर संयुक्त घटना अंमलांत येणें कठीण नाहीं. संस्थानिकांना काय पाहिजे आहे याचा विचार करण्यास आम्ही तयार आहों. परंतु संस्थानिक स्वतः हजर नाहींत व त्यांनीं पाठविलेल्या त्यांच्या दिवाणांना फक्त मर्यादित अधिकार आहेत. तथापि मध्यवर्ती सरकारांत संस्थानिक व ब्रिटिश हिंदुस्थान यांची मिळून संयुक्त राज्यघटना अंमलांत आली नाहीं तरी ब्रिटिश हिंदुस्थानांतील मध्यवर्ती सरकारांत जबाबदारीचें तत्त्व घालण्याचा आम्ही आग्रह धरूं. संस्थानी प्रतिनिधी व ब्रिटिश हिंदुस्थानांतील प्रतिनिधी यांच्यामध्यें जो मतभेद झाला आहे तो मतभेद संपविण्याकरितां सर अकबर हैदरी व सर पुरुषोत्तमदास ठाकुरदास या दोघांची एक स्वतंत्र कमिटी नेमून त्यांनीं हिंदुस्थानचें कर्ज व निरनिराळ्या प्रांतांनीं व संस्थानांनीं किती मदत मध्यवर्ती सरकारला करावी हें ठरवावें असा एक ठराव फेडरल फायनॅन्स कमिटीपुढें आणण्याचें ठरलें आहे."

या निरनिराळ्या कमिट्यांचीं कामें संपून त्यांच्या शिफारशी आल्याशिवाय पुढें काम करणें शक्य नसल्यामुळें गोलमेज परिषदेची बैठक मंगळवार ता. १२ पर्यंत बंद ठेवण्यांत आली.

(केसरी—२३ डिसेंबर १९३२)

गुरुवार ता. १५ व शुक्रवार ता. १६ या दिवशीं परिषदेचें काम चाललें नाहीं. या दोन दिवसांत फेडरल फायनॅन्स कमिटीच्या कामाच्या वेळीं सर तेज बहादुर सप्रू व इतर हिंदी सभासद एका बाजूस आणि सर सॅम्युअल होअर व ब्रिटिश सभासद दुसऱ्या बाजूस असे तट पडल्यामुळें त्यांच्यामध्यें फार खटके उडाले. हिंदुस्थानच्या तिजोरीवर कोणाचा ताबा असावा व हिंदुस्थानास आर्थिक स्वातंत्र्य किती व कोणत्या प्रकारचें द्यावें हा वादाचा विषय होता. सर सॅम्युअल होअर व ब्रिटिश प्रतिनिधी यांचा आग्रह असा कीं,

## आर्थिक स्वातंत्र्याची अशक्यता

( १ ) प्रस्तुतची जगाची आर्थिक परिस्थिति अत्यंत वाईट व गुंतागुंतीची झाली आहे. ( २ ) हिंदुस्थाननें इंग्लंडमधील लोकांकडून जें मोठें कर्ज घेतलें आहे त्याबद्दलची हमी पाहिजे व ( ३ ) हिंदुस्थानच्या अवाढव्य कर्जाबद्दल ब्रिटिश पार्लमेंट त्याला जामीन राहिलें आहे. या तीन कारणांकरितां तिजोरीवरील ताबा व आर्थिक स्वातंत्र्य हिंदुस्थानास देणें ही गोष्ट अशक्यप्राय आहे. लंडनमधील ज्या बँकांनीं हिंदुस्थानास कर्ज दिलें आहे त्यांच्या प्रतिनिधींची व हिंदी प्रतिनिधींची भेट या निर्णयाच्या चर्चेसाठीं घडवून आणली तेव्हां बँकवाल्यांनीं तर एक पाऊल पुढें जाऊन हिंदी प्रतिनिधींना स्पष्ट बजावलें कीं, हिंदी रिझर्व्ह बँक निघाली तरी तिच्यावर आमचाच ताबा राहील. यावर हिंदी सभासदांचें म्हणणें कीं

## आर्थिक स्वातंत्र्य हा स्वराज्याचा पाया

आहे. शिवाय ( १ ) पहिल्या व दुसऱ्या गोलमेज परिषदेंत आर्थिक संरक्षक बंधनाच्या ज्या सरकारी कल्पना म्हणून आतां आमच्यापुढें मांडल्या जात आहेत त्या केव्हांहि कबूल केल्या गेल्या नव्हत्या. उलट सर्व हिंदी प्रतिनिधींनीं आपणांस ह्या अटी मान्य नाहींत असें नमूद केलेलें पहिल्या व दुसऱ्या परिषदेच्या अहवालांत आढळतें. ( २ ) जर इंग्लंडचें कर्ज फिटेपर्यंत हिंदुस्थानास आर्थिक स्वायत्तता मिळणार नाहीं तर हिंदुस्थानास शंभर वर्षांतहि स्वराज्य मिळणार नाहीं ! कारण, एवढें मोठें कर्ज फिटणें ही अशक्य गोष्ट आहे; व शिवाय हिंदुस्थानच्या संमतीशिवाय आजहि इंग्लंडांत हिंदुस्थान सरकार हवें तेवढें कर्ज काढीत आहे. ( ३ ) हिंदी रिझर्व्ह बँकेवर इंग्लंडांतील बँकांचा ताबा असावा हें म्हणणें विलक्षण आहे. स्वराज्याचे हक्क असणाऱ्या कोणत्याहि वसाहतींत हा प्रघात नाहीं. ( ४ ) नव्या घटनेंत जर आर्थिक बाबतींत सरकारी ताबा राहावयाचा असला तर स्वराज्य नाहींच असें म्हटलें पाहिजे. कारण त्याशिवाय मध्यवर्ती सरकारांत जबाबदारीचें तत्त्व मान्य केलें असें होत नाहीं. ह्या परिस्थितींत संस्थानें तरी संयुक्त घटनेंत कां सामील होतील? तात्पर्य, आर्थिक स्वातंत्र्य नाहीं म्हणजे स्वराज्य नाहीं असाच निष्कर्ष निघतो.

## राष्ट्रीय सभेची भीति

बँक ऑफ इंग्लंडचे गव्हर्नर मि. मॅांटेग्यु नॉर्मन यांनीं असेंहि सांगितलें कीं, यापुढील निवडणुकींत राष्ट्रीय सभेनें भाग घेतला तर सर्व निवडणुकी राष्ट्रीय सभा जिंकील व राष्ट्रीय सभेनें परराष्ट्रीय कर्जे देण्याचें नाकबूल करावयाचें ठरविलें आहे. अशा परिस्थितींत हिंदुस्थानची बाजारांत फारशी पत राहणार नाहीं. म्हणून पार्लमेंटनें जामिनकी घ्यावयास पाहिजे व अशी जामिनकी दिली तर इंग्लंडचा आर्थिक बाबतींतील ताबा कायम ठेवलाच पाहिजे. ही भाषा हिंदी प्रतिनिधींना रुचली नाहीं. शेवटीं, सर सॅम्युअल होअर यांनीं समारोप केला. त्या वेळीं त्यांनीं सांगितलें कीं, बँक ऑफ इंग्लंडच्या अगर इतर बँकांच्या प्रतिनिधींचें म्हणणें सरकारास सर्वस्वीं पटतेंच असें नाहीं.

## व्यावहारिक सूचना

तसेंच, पहिल्या व दुसऱ्या गोलमेज परिषदेंत आम्हीं आर्थिक बाबतींत हिंदुस्थानाला पूर्ण अखत्यारी द्यावयाची कबुली दिली होती हेंहि खरें; पण या बाबतींत कांहीं व्यवहार हा पाहिलाच पाहिजे. म्हणून आहे ही परिस्थिति डोळ्यांसमोर ठेवून कांहीं व्यावहारिक सूचना केल्या पाहिजेत. रिझर्व्ह बँक मात्र आम्ही तावडतोब काढण्याची योजना करतों. अशा रीतीनें गुरुवार ता. १५ व शुक्रवार ता. १६ या दिवशीं पुष्कळ वादविवाद झाला खरा; पण काम संपलें नाहीं व ऐकमत्यहि झालें नाहीं. शनिवार ता. १७ व सोमवार ता. १९ रोजीं हा वादविवाद पुढें चालू होताच.

## शनिवार ता. १७

गोलमेज परिषदेच्या मुख्य बैठकीस ता. १७ रोजीं पुन्हा सुरुवात झाली त्या वेळीं, हिंदी नागरिकांचे मूलभूत हक्क कोणते असावेत व त्यांचा अंतर्भाव प्रत्यक्ष घटनेंत करावा कीं नाहीं या विषयावर वादविवाद सुरू झाला. सर जॉन सायमन यांनीं असें कोडें घातलें कीं, मूलभूत हक्कांच्या संरक्षणासाठीं न्यायकोर्टांना सत्ता दिली पाहिजे, तरच याचा उपयोग आहे. पण अशा तऱ्हेनें कायद्यांत फेरबदल केला तर फारच घोटाळा माजेल ! शिवाय संस्थानिकांना या मूलभूत हक्कांची जरूरीच नाहीं. सर ए. पी. पात्रो म्हणाले कीं, सर्व घटनांमधून मूलभूत हक्कांचा समावेश केला गेला आहे. मग हिंदी घटनेंत तो कां असूं नये. सर सॅम्युएल होअर यांनीं सांगितलें कीं, गव्हर्नर व

गव्हर्नर जनरल यांना जे अधिकार दिले आहेत त्यांत या हक्कांच्या संरक्षणाची तजवीज केली आहे. लॉर्ड हॅलशॅम यांच्या मतें व्यक्तिस्वातंत्र्याचा हक्क क्रिमिनल प्रोसीजर कोडानें मान्य केला आहेच. या सर्व विवादाचा निष्कर्ष हा होता कीं, ब्रिटिश प्रतिनिधींच्या मतानें मूलभूत हक्कांचा समावेश घटनेंत करण्याचें कारण नाहीं; यास्तव तडजोडीचा म्हणून असा मार्ग सुचविला गेला कीं, घटनेंत त्याची नोंद न करतां बादशहा जो जाहीरनामा काढतील त्यांत या हक्कांचा उल्लेख करावा. इतक्या कामानंतर त्या दिवशीची बैठक संपली.

## सोमवार ता. १९

रोजीं मूलभूत हक्कांच्या प्रश्नासंबंधींचा वादविवाद पुन्हा सुरू झाला. संस्थानांच्या प्रतिनिधींनीं मूलभूत हक्कांचा जाहीरनामा काढला अगर त्यांचा घटनेंत अंतर्भाव केला गेला तर त्यांत आपल्या अधिकारावर आक्रमण होतां कामा नये असा इशारा दिला. शिवाय संयुक्त घटनेमध्यें संस्थानिक येऊन मिळणार आहेत हें खरें; पण त्या गोष्टीचा व मूलभूत हक्कांचा फारसा संबंध नाहीं म्हणून जाहीरनाम्याची जरूर नाहीं. पण असा जाहीरनामा काढण्याचेंच ठरलें तर मात्र संस्थानिकांशीं झालेल्या तहनाम्यांत फेरफार होतां कामा नये व तसेंच त्यांच्या अधिकारांतहि कांहीं कमी होतां कामा नये असें त्यांनीं सांगितलें. या दिवशींहि या प्रश्नावरील वादविवाद संपला नाहीं.

## व्यापारी कमिटी

व्यापारी हितसंबंधांत वर्णभेदाचा प्रश्न आड येऊं नये व विशेषतः हिंदी व्यापार व युरोपियन व्यापार असा फरक पुढील स्वराज्याच्या कारभारांत करावा किंवा काय या प्रश्नाचा विचार करण्याकरितां पुढील सभासदांची कमिटी नेमण्यांत आली. लॉर्ड रेडिंग ( अध्यक्ष ), लॉर्ड आयर्विन, लॉर्ड पील, मि. आर. ए. बटलर, सर अकबर हैदरी, सर एम्. मेथा, डॉ. आंबेडकर, सर पुरुषोत्तमदास ठाकुरदास, सर कावसजी जहांगीर, नबाब झाफरउल्ला, मि. हिदायत हुसेन आणि सर ह्यूबर्ट कार. यानंतर या दिवसाचें काम संपलें.

ता. १९ रोजीं नागरिकांच्या मूलभूत हक्कासंबंधींच्या प्रश्नांवरील चर्चेला सुरुवात झाली. पंजाबमधील हिंदु व शीख यांच्या प्रतिनिधींनीं मूलभूत हक्कांचा घटनेंत अंतर्भाव झाला पाहिजे असें सांगितलें.

ब्रिटिश सरकारतर्फे असें सांगण्यांत आलें कीं, 'खुद्द इंग्लंडच्या अगर वसाहतींच्या घटनेंत या हक्कांचा अंतर्भाव केला गेला नाहीं. हिंदुस्थानच्या बाबतींत कांहीं हक्कांची नोंद घटनेंत करावी लागलीच तरी त्यांची संख्या फारच थोडी असावी. कारण या हक्कांमुळें हिंदी लोकांचीच कायदे करण्याची सत्ता मर्यादित होईल. म्हणून त्यांनीं स्वहिताच्या दृष्टीनेंहि या बाबतींत फारसा हट्ट धरूं नये. कोणतीहि घटना सुटसुटीत पण लवचीक असावी. जर या हक्कांचा अंतर्भाव तींत केला तर घटनेचा साधेपणा व लवचीकपणा जाईल. शिवाय पुढील संयुक्त घटनेचा पाया एकमेकांवरील विश्वास हाच असला पाहिजे.'

## संस्थानिकांचा विरोध

संस्थानांतर्फे बोलतांना सर मनुभाई मेथा म्हणाले कीं, 'हे हक्क म्हणजे नीतिबोधवचनें आहेत. फौजदारी किंवा दिवाणी बाबींवर जर या हक्कप्रकरणामुळें परिणाम होणार असेल तर त्यामुळें संस्थानांच्या अंतर्गत कारभारावर अतिक्रमण केल्यासारखें होईल. म्हणून हा हक्कांचा प्रश्न बाजूसच ठेवला पाहिजे. त्यांना संस्थानांचाहि विरोध आहे. शिवाय संयुक्त घटनेप्रमाणें जीं कायदेमंडळें होतील त्यांचीहि कायदे करण्याची सत्ता त्यामुळें मर्यादित होईल तें वेगळेंच.'

श्री. केळकर यांनीं सांगितलें कीं, 'मूलभूत हक्कांचा प्रश्न फार महत्त्वाचा आहे. रोजच्या नेहमींच्या व्यवहारांत त्यांचा फार उपयोग होणारा आहे. पण अल्पसंख्याकांच्या व इतरांच्या मनांत तेवढ्यानें विश्वास उत्पन्न होईलच असें सांगतां येणार नाहीं.'

डॉ. आंबेडकर म्हणाले कीं, 'सार्वजनिक सुख-सोयी व सार्वजनिक इमारती यांचा उपयोग सर्वांना सारखाच झाला पाहिजे. त्यांत वर्ण, जाति किंवा धर्म यांमुळें विषमता उत्पन्न होऊं नये. कायद्याच्या दृष्टीनें सर्वांची सारखीच योग्यता असावी. म्हणून या हक्कांचा समावेश घटनेंत केला पाहिजे.'

सर ह्यूबर्ट कार यांनीं ख्रिस्ती समाजाकरितां व सर हेन्री गिडने यांनीं अँग्लो-इंडियन लोकांकरितां हे हक्क पाहिजेत असें सांगितलें.

## लॉर्ड सँकींचें मत

समारोप करतांना लॉर्ड सँकी म्हणाले, 'मूलभूत हक्कांचे राजकीय व कायदेविषयक असे दोन प्रकार आहेत. परंतु या दोहोंच्या मुळाशीं परस्पर विश्वासाचा

अभाव असतो. जर आपल्याला संयुक्त घटना पाहिजे असेल तर आपण परस्परांवर विश्वास ठेवलाच पाहिजे. निरनिराळया देशांच्या घटनेंतून कांहीं तुकडे घेऊन घटना तयार करणें बरोबर नाहीं. ती एकसंधि व सुटसुटीत पाहिजे. तशांतून आपल्याच लोकांकडून आपल्यास अन्याय होईल असें मानण्याचें कारण नाहीं.'

## घटनेंत फरक

यानंतर घटनेंत फरक करतां येईल कीं नाहीं व तो करावा कीं नाहीं याची चर्चा झाली. त्या फरकाचे तीन प्रकार असूं शकतात. सरकारी राज्ययंत्रांत तपशिलामध्यें सोयीकरितां फरक करणें हा पहिला प्रकार, संयुक्त घटनेच्या निरनिराळया घटकावयवांचा संबंध बदलेला असा फरक करणें हा दुसरा प्रकार व तिसरा म्हणजे मूलग्राही उपसूचना आणून घटनेचें स्वरूपच बदलणें हा होय. या प्रश्नावरील चर्चेत ब्रिटिश प्रतिनिधींनीं सांगितलें कीं, पहिल्या प्रकारचा फरक करण्यास हरकत नाहीं. पण दुसऱ्या व तिसऱ्या प्रकारचा फरक करावयाचा असल्यास तो दहा वर्षांनीं करावा, निवडणुकीपूर्वीं तो स्पष्टपणें मतदारांपुढें मांडला जावा व नंतर संयुक्त घटनेंतील कायदेमंडळानें तो पसार करावा. लॉर्ड रेडिंग यांनीं सांगितलें कीं, पार्लमेंटच्या संमतीशिवाय दुसऱ्या व तिसऱ्या प्रकारचे फरक करूं नयेत. इतकें झाल्यावर त्या दिवसाचें काम संपलें.

ता. २० रोजीं फेडरल फिनॅन्सच्या व इतर कमिट्यांच्या कामाकरितां परिषदच बंद ठेवली होती.

## सप्रू-प्रभृतींचा तिसरा खलिता

सर तेज बहादुर सप्रू, श्री. जयकर व श्री. केळकरप्रभृति सभासदांनीं मुख्य प्रधानांकडे तिसरा खलिता पाठविला असून त्यांत परिषदेंतील कामाच्या पद्धतीसंबंधीं तक्रार केली आहे व मुख्य प्रश्नाला अद्याप हातच लागत नाहीं याचा निषेध केला आहे.

बुधवार ता. २१ रोजीं ब्रिटिश प्रधान मंडळाची साप्ताहिक सभा सकाळीं ८ वाजतां असल्यानें व दुपारीं फेडरल फिनॅन्स कमिटीची व इतर कमिट्यांचीं कामें चालणार असल्यानें गोलमेज परिषदेची बैठक त्या दिवशीं रात्रौ ८ वाजतां भरविण्याचें ठरलें.

(केसरी—२७ डिसेंबर १९३२)

बुधवार ता. २१ रोजीं गोलमेज परिषदेच्या कामास रात्रौ साडेआठ वाजतां सुरुवात झाली. लॉर्ड सँकी हे उपस्थित नसल्यामुळें हिंदुस्थानचे स्टेट सेक्रेटरी सर सॅम्युअल होअर हेच अध्यक्ष झाले. या बैठकीचें काम रात्रीं ११ पर्यंत चाललें होतें व त्यांत घटनेंत बदल कोणी व कसा करावयाचा या प्रश्नाचीच चर्चा झाली. ह्या चर्चेनंतर प्रांताची फेरविभागणी करण्याचा प्रश्न चर्चेस निघाला व त्यावरहि कडाक्याचा वाद झाला.

## वऱ्हाडचा प्रश्न

अर्थात् या वेळीं वऱ्हाड प्रांत त्याच्या जवळच्याच मराठी प्रांतांत सामील करून एक स्वतंत्र महाराष्ट्र प्रांत बनवावा अशी सूचना पुढें मांडण्यांत आली. ही सूचना ब्रिटिश हिंदुस्थानांतील सभासदांना मान्य झाली. परंतु संस्थानी प्रतिनिधींनीं व त्यांतल्या त्यांत निजाम हैदराबादच्या शिष्टमंडळानें त्याविरुद्ध बरेंच अकांडतांडव केलें व त्यांचें म्हणणें असें कीं, वऱ्हाडच्या प्रश्नाची चर्चाच गोलमेज परिषदेंत होऊं शकत नाहीं. कारण तो प्रश्न निजाम सरकार व ब्रिटिश सरकार यांच्यामधील आहे, व असल्या प्रश्नाची चर्चा त्या परिषदेंत करणें युक्त नाहीं! एवढा वादविवाद झाल्यावर त्या रात्रीचें काम संपलें.

## गुरुवार ता. २२

गुरुवार ता. २२ रोजीं पुनः रात्रींच सभा भरली व त्या वेळींहि सर सॅम्युएल होअर हेच अध्यक्ष होते. बुधवारच्याच प्रांत-विभागणीचा प्रश्न पुन्हा चर्चेस घेतला होता. एका मद्रासी प्रतिनिधीनें ओरिसा प्रांत स्वतंत्र करावा अशी सूचना मांडली व त्या सूचनेवर भाषण केलें. पंजाबचे श्री. नानकचंद यांनीं सांगितलें कीं, पंजाबच्या पूर्वभागांतील लोक व पश्चिम भागांतील लोक यांचें कोणत्याच बाबतींत साम्य नाहीं. तरी पंजाबचे दोन भाग करावे म्हणजे पंजाबचा अवघड प्रश्नहि सुटेल. ही सूचना पुष्कळ प्रतिनिधींना आवडली नाहीं. त्यांनीं अशी धोक्याची सूचना दिली कीं, प्रांतांचे जर वरीलप्रमाणें तुकडे पाडून घेणें सोपें होईल तर अनर्थ होईल! तरी ती सत्ता देऊं नये. याबाबतींत भावी संयुक्त सरकारकडेच हा हक्क ठेवला पाहिजे. मतदानाचा हक्क कांहीं वर्षें गेल्यानंतर, नागरिकांना अधिक देण्याचा अधिकार प्रांतिक व वरिष्ठ कायदेमंडळाला असावा अशी सूचना

एका मद्रासी गृहस्थानें केली. लॉर्ड लोथियन म्हणाले कीं, संयुक्त सरकारच्या लोकसभेलाहि घटना बदलण्याचा हक्क फारसा ठेवूं नये. संयुक्त राज्यपद्धति यशस्वी होण्याचीं जीं अनेक कारणें आहेत त्यांत मूळ घटना बदलण्याचा हक्कच ठेवला गेलेला नसता हें एक प्रमुख कारण आहे हें लक्षांत ठेवलें पाहिजे. जर राष्ट्रांत घटना बदलण्यासंबंधीं मोठी खळबळच माजली, तरच घटना बदलली जावी, एरव्हीं ती बदलणें कठीण जावें.

## होअर यांचा समारोप

ब्रिटिश सरकारतर्फें समारोप करतांना सर सॅम्युएल होअर म्हणाले कीं, रोप लावल्याबरोबर त्याचीं मुळें उपटून तीं किती वाढलीं हें पाहणें जसें इष्ट नाहीं तसेंच घटनेसंबंधाचें आहे. घटनेचींहि मुळें पाहण्यांत अर्थ नाहीं. नवे प्रांत बनविण्याचा अधिकार कायदेमंडळाकडे दिला पाहिजे. त्याची आतां येथें चर्चा करण्यांत अर्थ नाहीं. नवे प्रांत बनविण्याच्या प्रश्नाचा विचार मोठ्या सावकाशीनें केला पाहिजे. ज्या जिल्ह्यांचा नवा प्रांत बनवावयाचा त्या जिल्ह्यांतील लोकांना स्वतंत्र प्रांत बनविण्याची इच्छा व जरूरी वाटली पाहिजे व शिवाय तसा नवा प्रांत बनविला तर त्याचा खर्च इतर प्रांतांवर किंवा मध्यवर्ती सरकारवरहि पडतां उपयोगी नाहीं. संयुक्त सरकारलाच एखादा नवा प्रांत बनविणें इष्ट वाटलें तर मात्र त्याला साम्राज्य सरकारकडे तशी शिफारस करण्याचा अधिकार असावा.

मताधिकाराचें क्षेत्र वाढविण्याच्या संबंधांत सर सॅम्युएल होअर यांनीं सांगितलें कीं, सध्यां जी पद्धति ठरविली आहे, ती कांहीं वर्षेंपर्यंत चालू ठेवावी हें उत्तम. परंतु हा अधिकार अधिक नागरिकांना द्यावयाचा किंवा नाहीं, हें संरक्षक बंधनें घालून कायदेमंडळानेंच ठरवावें हें उत्तम.

मूलभूत हक्कांसंबंधीं ते म्हणाले कीं, अशा तऱ्हेच्या अधिकारांची यादी पार्लमेंटनें कायद्यांत समाविष्ट करणें फार अवघड आहे; तथापि या प्रश्नाला पुष्कळच सभासद फार महत्त्व देत आहेत, म्हणून मी इतकेंच म्हणतों कीं, कायदेमंडळांत चर्चा होण्याला योग्य अशा कांहीं अधिकारांचा नामनिर्देश कायद्यांत करूं, पण त्याव्यतिरिक्त बाकीच्यांबद्दल मात्र ज्या वेळीं संयुक्त राज्यपद्धतीसंबंधीं जाहीरनामा निघेल त्या वेळीं त्या जाहीरनाम्यांत त्यांचा समावेश केला जाईल. इतकें काम झाल्यावर परिषदेची बैठक दुसरे दिवशीं रात्रीं ८॥ वाजेपर्यंत तहकूब राहिली.

## फेडरल फायनॅन्स कमिटीचा अहवाल

फेडरल फायनॅन्स कमिटीनें अशी योजना केली आहे कीं, ज्यामुळें सर्व प्रांतांना व मध्यवर्ती सरकारला आद्यापेक्षां जास्ती खर्च करावा लागणार नाहीं, दोन्ही तोंडें मिळून तूट येत नाहीं, असें झाल्यावर मग संयुक्त सरकारला ब्रिटिश हिंदुस्थानांतील प्रांत व संस्थानें यांचेकडून मदत केली जाईल.

प्राप्तीवरील कराच्या उत्पन्नाच्या वांटणीबाबत अशी योजना केली आहे कीं, सरकारी रोख्यांवरील कर मग खालसांतील असो वा संस्थान हद्दींतील असो, संयुक्त सरकारनें घ्यावयाचा. परंतु ही योजना अनुभवानें अव्यवहार्य ठरली तर मग सर्व उत्पन्नाचा कांहीं भाग संयुक्त सरकारास तोडून द्यावयाचा. संयुक्त सरकारच्या हिश्शाबाबत दुमत आहे. संस्थानी प्रतिनिधि म्हणतात कीं, साडेआठ कोटी रुपये उत्पन्न संयुक्त सरकारला द्यावें. खालसा मुलुखांतील प्रतिनिधींच्या मतानें पांच कोटी रुपये होतील. प्रारंभीचीं कांहीं वर्षें मात्र वरील कोणतीच योजना अमलांत न येतां जरूर तितका पैसा संयुक्त सरकारनें ठेवावयाचा असें ठरलें आहे. हीं कांहीं वर्षें म्हणजे संस्थानी प्रतिनिधींच्या मतानें दहा असावीं, खालसांतील प्रतिनिधींच्या मतानें पांच असावीं. इतकें करूनहि जर संयुक्त सरकारला पुरेसा पैसा हातीं आला नाहीं तर त्या सरकारनें नवीन कर बसवावे व त्यांतील कांहीं हिस्सा आपण ठेवून कांहीं प्रांतांना द्यावा. हा कर खालसा मुलुखांतच वसूल करावयाचा व ही योजना ज्यांना संमत नसेल अशा संस्थानिकांकडून कांहीं ठराविक रकमा घ्यावयाच्या. याशिवाय साडेबारा टक्केपर्यंत जादा कर बसविण्याचा हक्क प्रांतांना व संयुक्त सरकारला दिला गेला आहे.

### लहान प्रांतांना मदत

ज्या प्रांतांच्या जमाखर्चाची तोंडमिळवणी होत नाहीं त्या प्रांतांना संयुक्त सरकारकडून द्रव्यद्वारा मदत करण्याचें ठरलें आहे. परंतु ही मदत किती मुदतीपर्यंत करावयाची हें मात्र ठरलें नाहीं.

सिंध प्रांताला किती मदत करावयाची हें आगाऊ निश्चित करण्याचें ठरलें. बंगाललाहि तागाच्या जकातीच्या उत्पन्नाचा कांहीं भाग द्यावयाचा असें ठरलें.

## पूर्वीचें कर्ज

संयुक्त राज्यघटना अमलांत येण्यापूर्वी जो कर्जाचा बोजा हिंदुस्थानवर आहे तो आपल्या अंगावर घेण्यास संस्थानें तयार नाहींत तो बोजा हिंदुस्थानच्याच जमाबंदींतून उचलला गेला पाहिजे. पुढील काळांत जीं कर्जें काढावीं लागतील तीं मात्र संयुक्त सरकारच्या पतीवर काढलीं जातील. वर जी कालमर्यादा सांगितली आहे ती कालमर्यादा संपल्यानंतर संस्थानें पुढील कर्जाबद्दल जबाबदार राहतील व त्याची फेड करण्याकरितां नवे कर बसवून रक्कमा भरतीलहि. फक्त या रक्कमा कशा वसूल करावयाच्या हें त्यांनीं ठरवावयाचें आहे. पुढील वीस वर्षांच्या आंत संस्थानें आज जी खंडणी देत आहेत ती बंद करावयाची. जमल्यास ती लवकरहि बंद करावयाची.

## तोडलेल्या प्रांतांचा प्रश्न

पूर्वीच्या काळीं संस्थानांचें संरक्षण ब्रिटिशांनीं करावें म्हणून संस्थानांकडून कांहीं प्रांत तोडून ब्रिटिश सरकारनें घेतले होते. ह्यांपैकीं जे प्रांत परत संस्थानांकडे देणें अव्यहार्य असेल त्या प्रांतांची त्या वेळची किंमत करून ही किंमत संस्थानांना द्यावी अशीहि या कमिटीची शिफारस आहे, अर्थात् पैशाऐवजीं जर प्रांतच परत करतां आले तर ते परत करण्याची मुभा आहे. समुद्रकिनारा असणाऱ्या संस्थानांनीं दर्यावर्दी मालावरील करापैकीं आपल्या प्रजेंत जितका माल खपेल तेवढ्या प्रमाणांतच त्या जकातीचा वांटा आपल्याकडे ठेवावा. शिल्लक बाकी ब्रिटिश सरकारला द्यावी.

## शुक्रवार ता. २३ रोजीं तीन सभा

शुक्रवार ता. २३ रोजीं सकाळीं, संध्याकाळीं व रात्रौ साडेआठ वाजतां म्हणजे तीन वेळां परिषदेची बैठक भरली होती. या तीनहि वेळीं निरनिराळ्या सर्व कमिट्यांचे अहवाल मांडण्यांत आले व कांहीं दुरुस्त्यांसह ते सर्व मान्य करण्यांत आले.

या कमिट्यांच्या शिफारशींचा गोषवारा सरकारी रीतीनें प्रसिद्ध झाला असून त्यांत कोणत्या मुद्द्यावर पूर्ण ऐकमत्य झालें, कोणत्यावर मुळींच झालें नाहीं व कोणत्यावर अर्धवट झालें हें दिलें आहे. कायदेमंडळाच्या सभासदांची संख्या जी पूर्वी ठरली तीच कायम झाली. त्यांत फेरफार नाहीं.

## व्यापारी संरक्षक बंधनें

गेल्या वर्षीं फेडरल स्ट्रक्चर कमिटींत ठरल्याप्रमाणेंच व्यापारी बाबतींतील धोरण कायम ठरविण्यांत आलें. घटनेंतच अशी मर्यादा घालून ठेवावयाची कीं, ज्या योगानें व्यापारी बाबतींत वर्णभेदाच्या अगर दुसऱ्या कोणत्याहि भेदाच्या पायावर जकातीमध्यें वगैरे फरक केला जाणार नाहीं. परंतु कोणत्या जिनसांपुरती याची अंमलबजावणी करावयाची हें मात्र आगाऊ ठरवावयाचें आहे. तसेंच, बौंटी, सबसिडी वगैरे जे आर्थिक पद्धतींचे भाग आहेत त्यांचेंहि धोरण ठरलें. इंग्लड व हिंदुस्थान यांनीं परस्परांच्या मालाला सवलती द्यावयाच्या असेंहि एक कलम घातलें आहे.

## संस्थानांचा प्रश्न

संयुक्त सरकारला अधिकारदान संस्थानांनीं कसें करावयाचें असा एक प्रश्न शिल्लक होताच. त्याचा विचार लॉर्ड आयर्विन यांच्या अध्यक्षतेखालीं भरलेल्या एका कमिटीच्या सभेनें केला. त्यांत असें ठरलें कीं, हिंदुस्थानच्या भावी राज्याची जी घटना पार्लमेंटाच्या कायद्याच्या रूपानें तयार होईल तिची छाननी करून पाहण्याकरितां संस्थानिकांना कांहीं मुदत दिली पाहिजे. तसेंच ही घटना तयार होतांनाहि संस्थानिकांच्या प्रतिनिधींचा सल्ला वारंवार घेतला पाहिजे; व त्यानंतर संस्थानिकांना ती घटना पसंत झाली म्हणजे त्यांनीं एका खलित्याच्या ( इन्स्ट्रुमेंट ऑफ ॲक्सेशन ) द्वारा आपले, घटने- प्रमाणें ठरलेले, कांहीं अधिकार बादशहांना परत द्यावयाचे व ते अधिकार बादशहांनीं मग संयुक्त सरकारला द्यावयाचे. किती अधिकार द्यावयाचे हें प्रत्येक संस्थानानें ठरवावयाचें आहे. या खलित्याचा नमुना काय असावया- चा हें व्हाइसरॉय व संस्थानांचे प्रतिनिधि यांनीं ठरवावयाचें.

शुक्रवार ता. २३ रोजीं रात्रौ साडेआठ वाजतां गोलमेज परिषदेच्या त्या दिवशीच्या तिसऱ्या बैठकीस सर सॅम्युएल होअर यांच्या अध्यक्षतेखालीं सुरु- वात झाली. सर तेजबहादुर सप्रू यांनीं विस्तृत भाषण करून आपलें म्हणणें सविस्तर मांडलें. या त्यांच्या भाषणांत त्यांनीं बऱ्याच महत्त्वाच्या मुद्द्यांचा खल केला. ते म्हणाले कीं, "संयुक्त राज्यपद्धति स्थापन करण्याचा प्रश्नच फार महत्त्वाचा आहे. नुसती प्रांतिक स्वायत्तता घेण्यास आम्ही इतक्या दूर आलों नाहीं.

## १९३५ मध्यें 'फेडरेशन' व्हावें !

संस्थानिकांनीं संयुक्त राज्यपद्धतीच्या योजनेंत सामील व्हावें पण त्याचा अर्थ असा नव्हे कीं, ब्रिटिश हिंदुस्थान त्यांच्या अंकित राहण्यास कबूल आहे. कायदा पसार झाल्यापासून फार तर एक वर्षाच्या आंत संयुक्त कारभारास सुरुवात झाली पाहिजे. संस्थानिक आले नाहींत तरीहि १९३५ मध्यें फेडरेशन झालेंच पाहिजे. नाहीं तर प्रांतिक स्वायत्तता देण्यांत अर्थ नाहीं. रिझर्व्ह बँकेची खरोखरी अडचण नाहीं. वसाहतीच्या वेळीं ही अडचण भासली नाहीं मग ती आतांच कां भासावी ? जर हें होत नसेल तर प्रांतिक स्वायत्ततेच्या गोष्टी बोलण्यांत अर्थ नाहीं.

## सैन्यावरील ताबा

लष्करावर आमचा ताबा असल्याशिवाय आम्हांला लष्कराचें हिंदीकरण, लष्करी शिक्षण, राष्ट्रीय सैन्य वगैरे बाबतींतील अडचणी सोडवितां येणार नाहींत. म्हणून लष्करावर आमची सत्ता ठेवा असें त्यांनीं सांगितलें.

## गांधींची मुक्तता करा

आपल्या भाषणाच्या शेवटीं सप्रूंनीं अत्यंत कळकळीनें गांधीजी व इतर राजकीय कैदी यांच्या मुक्ततेची जरूरी पटवून दिली. ते म्हणाले, "माझा व गांधींचा मतभेद असला तरी हिंदुस्थानांतील जनतेची स्वाभिमानवृत्ति व स्वदेशाभिमान यांचें गांधींमध्यें एकत्रीकरण झालें असल्यानें हिंदुस्थानचे खरे प्रतिनिधि तेच होत. राष्ट्रीय सभावाले यांनीं कायद्याच्या कक्षेबाहेर कां राहावें ? या नव्या सुधारणांच्या बाबतींत जर कोणाचा सल्ला घ्यावयाचा असेल तर तो गांधींचाच घेतला पाहिजे. आम्हीं दुसऱ्या कोणाचा सल्ला घ्यावा ? पण ते तुरुंगांत असेपर्यंत त्यांचा सल्ला घेणें शक्य नाहीं. म्हणून माझी कळकळीची विनंति कीं, गांधींना व इतर सर्व राजकीय कैद्यांना तुम्ही मुक्त करा. तसें केल्याची बातमी मी हिंदुस्थानांत पोंहोचण्यापूर्वीं मला ऐकण्यास मिळावी अशी माझी इच्छा आहे." त्यांच्या भाषणानंतर लॉर्ड पील, लॉर्ड रेडिंग, सारिलाचे राजे, सर अकबर हैदरी, सरदार तारासिंग, नबाब लियाकत हैयतखान, सर पुरुषोत्तमदास, अर्ल वुइंटरटन, सर मनुभाई मेथा, राजा औदिच्य नारायण मित्र यांचीं भाषणें झालीं. त्या रात्रीची सभा पहांटे एक वाजून पांच मिनिटांनीं संपली.

## परिषद् संपली

शनिवार ता. २४ हा परिषदेचा शेवटचा दिवस. त्या दिवशीं सकाळीं परिषदेच्या कामास लॉर्ड सँकी यांच्या अध्यक्षतेखालीं सुरुवात झाली. होअर यांचें समारोपादाखल भाषण झालें. त्यांनीं सांगितलें कीं, इंग्लंडला व हिंदुस्थानला मागचा इतिहास असल्यानें आम्हांला त्या सर्व गोष्टी डोळ्यांपुढें ठेवूनच विचारविनिमय करावा लागला; पण एक गोष्ट खरी कीं, भूतकाळ मागें टाकून उज्ज्वल अशा भविष्यकाळाला आम्हीं प्रारंभ केला आहे.

## सप्रूंची स्तुति

होअर यांनीं सर तेजबहादुर सप्रू यांनीं पहिल्यापासून जी कामगिरी केली त्याबद्दल त्यांचे आभार मानून त्यांची योग्य शब्दांत स्तुति केली. " निरनिराळ्या प्रश्नांवर वास्तविक ऐकमत्य व्हावें असें पुष्कळांस वाटतें. पण प्रश्नच असे बिकट आहेत कीं, तसें ऐकमत्य होणें शक्यच नाहीं.

## आमचीं नवीं नातीं

कारण, ब्रिटिश हिंदुस्थान, संस्थानिक व ग्रेट ब्रिटन या तिघांच्या हिताहिताकडे पाहून आम्हांला हा प्रश्न सोडविला पाहिजे. आम्ही यापुढें पूर्वींचे संबंध सोडून देऊन नवे संबंध जोडूं पाहत आहों हें लक्षांत ठेवलें पाहिजे.

## स्वराज्याची नक्की तारीख

" सर तेजबहादुर सप्रू यांनीं संयुक्त राज्यघटना कधीं सुरू करणार म्हणून विचारलें खरें, पण तो प्रश्न अवघड झाला आहे. कारण संस्थानिकांच्या मर्जीवर त्याचें उत्तर अवलंबून आहे. पण ते काय करतील हें सांगतां येणें शक्य नाहीं. लष्कराच्या बाबत आम्ही शक्य तें करूं.

## गांधींच्या सुटकेचा विचार

" गांधींच्या सुटकेबद्दल सप्रू यांनीं आग्रह केला. पण त्याचें निश्चित उत्तर मी आजच देऊं शकत नाहीं; व होकार अगर नकार आतांच मीं द्यावा असें तेहि म्हणणार नाहींत." शेवटीं सर्वांचे आभार मानून हिंदुस्थानांत गेल्यावर सर्वांच्या साहाय्याची आम्हांस अपेक्षा आहे असा माझा संदेश सांगा असें म्हणून त्यांनीं आपलें भाषण संपविलें.

## परिषदेची आरती

अध्यक्ष लॉर्ड सँकी यांनींहि सर्वांचे आभार मानले; मृत सभासदांची आठवण केली व स्वराज्याची चाकोरी तरी आम्हीं पाडली आहे असें सांगून शेवटीं 'आम्ही सलोखा करण्यास तयार आहों, तरी तुम्ही युद्धाच्या विचारांत पडूं नका' असा राष्ट्रीय सभेला त्यांनीं संदेश सांगितला. यापुढें लवकरच आम्ही पार्लमेंटरी कमिटी बोलावूं व कायद्याचा मसुदा तयार करूं आणि अशा रीतीनें स्वराज्याची प्राणप्रतिष्ठा करूं असें सांगून त्यांनीं आपलें भाषण संपविलें! अशा रीतीनें तिसऱ्या गोलमेज परिषदेचें काम समाप्त झालें.

## सभासद परत निघाले

गोलमेज परिषदेचे हिंदी सभासद परत हिंदुस्थानास येण्याकरितां ता. २९ व ३० च्या आगबोटीनें निघतील व ता. १३ जानेवारीला पोहोंचतील. आपल्या शेवटच्या मुलाखतींत होअर यांच्या भाषणानें आपलें समाधान झालें नाहीं असें सप्रू म्हणाले!

## केळकर व सप्रू यांचे अभिप्राय

(टेलिफोनवरून)

गोलमेज परिषदेसंबंधीं अभिप्राय विचारतां श्री. न. चिं. केळकर यांनीं मुलाखतींत पुढील उद्गार काढले, "मीं गोलमेज परिषदेंत भाग घेतला असल्यामुळें तिच्या कामकाजावर टीका करूं शकत नाहीं. तथापि कामाला प्रारंभ करतांना जितकें भय वाटत होतें, तितका अनिष्ट निर्णय परिषदेंतून बाहेर पडला नाहीं. उलटपक्षीं मनांत होती तितकी चांगली फलश्रुतिहि ऐकावयाला सांपडली नाहीं. तरी परिषदेचे निर्णय स्वीकारावे कीं अव्हेरावे हें ठरविण्याची, तसेंच पक्षांची स्थापना व संघटना करण्याचीहि वेळ अजून आली नाहीं. लॉर्ड सँकी यांनीं सूचित केल्याप्रमाणें फेब्रुवारीअखेरपर्यंत वाट पाहणें जरूर आहे."

डॉ. सप्रू यांनीं मुलाखतींत आपलें असें मत प्रदर्शित केलें कीं, "मी आशापूर्ण नाहीं आणि निराशापूर्णहि नाहीं. पण एवढें मात्र मी सांगूं इच्छितों कीं, हिंदुस्थानच्या राज्यघटनेसंबंधीं वाटाघाट करण्याचा अध्याय आतां समाप्त झाला!"

---

# माझी म्हैसूरकडील प्रवासयात्रा

( केसरी—२७ नोव्हेंबर १९३७ )

## लेखांक १ ला

“ का हो, आला का म्हैसूरच्या सफरीहून ?” म्हैसूर-बंगलोरच्या प्रवासाहून परत आल्यावर त्यासंबंधीं माझ्यावर प्रश्नांची सरबत्ती सुरू झाली. मी जाणार, गेलों हें वर्तमानपत्रांतून वाचणारे तो प्रश्न विचारतीलच, पण प्राय: न वाचणारे असेहि कांहीं विचारतात! म्हणून वाटलें कीं प्रवासाहून आल्याचें कांहीं चिन्हच माझ्या तोंडावर उमटलें असावें ! प्रवासानें माणूस काळवंडतो, थकल्याभागल्यासारखा दिसतो, हें एक ठरीव चिन्ह असतेंच. पण नक्की म्हैसूर-बंगलोरची ओळख सांगणारें असेंहि कांहीं चिन्ह उमटलें आहे कीं काय माझ्या तोंडावर ?

तोंडावरून माणूस कोणत्या देशांतला, प्रांतांतला हें आपण ओळखतोंच कीं नाहीं ? पण तें काय त्या प्रांताचा नकाशा किंवा फोटो त्याच्या तोंडावर उमटलेला असतो म्हणून ? हा माणूस अमुक प्रांतांतला हें आपण ओळखतों इतकें मात्र खास. आणि याचें कारण त्या प्रांतांतल्या पुष्कळ माणसांचें रंगरूप ढोबळ मानानें एकाच प्रकारचें असतें. फिरून याचेंहि कारण संशोधकांना शेवटीं त्या देशाची माती, हवापाणी, अन्न यांत सांपडेलच. पण याहून पलीकडे जातां, भूप्रदेशांतल्या सृष्टिरूपाच्या खुणा माणसांच्या अंतरंगांत प्रविष्ट होऊन तोंडावर उमटतात असें कवि लोक तरी मानतात खरें. वर्डस्वर्थ कवीनें रूथ नांवाच्या एका, सुंदर वनांत राहणाऱ्या, सुंदर मुलीचें वर्णन करतांना म्हटलें आहे—

“ Nature’s beauty silently passed into her face.”

हें कदाचित् खरेंहि असेल ! शरिराच्या डोळ्यांनीं, आणि विशेषत: मनाच्या डोळ्यांनीं, जर आपण एखादा सृष्टिसौंदर्याचा भाग सतत पाहत असूं, त्याचें सतत ध्यान करूं, त्याचा आनंद सतत सेवीत राहूं, तर अमूर्त असा त्याचा कांहीं तजेला, कांहीं छटा, आपल्या तोंडावर उमटणें शक्य आहे !

## सृष्टिसौंदर्याच्या छटा

त्या प्रकारें म्हैसूर-बंगलोर प्रांताच्या सृष्टिसौंदर्याची कांहीं छटा माझ्याहि तोंडावर आली असावी ! म्हणून हे पृच्छकलोक एकदम म्हैसूर-बंगलोरचेंच नांव घेऊन 'प्रवासाहून आला का' म्हणून विचारीत असावेत! अशी शंकेची चमक मनांत उठल्यानें मी आपलें तोंड पाहण्याकरितां आरशाकडे वळणार तोंच विवेकबुद्धि मला म्हणाली, "अहो शहाणे गृहस्थ, रूपसंक्रमणाचें वरील तत्त्व खरें असलें तरी तुम्ही म्हैसूर-बंगलोरकडे अवघे पंधरा दिवस होता हें लक्षांत आहे ना ?" तेव्हां मी खजील होऊन आरशाकडून परत वळलों; आणि प्रश्न विचारणारे कां विचारतात याची चिकित्सा सोडून देऊन त्यांच्या प्रश्नाचीं उत्तरें देऊं लागलों.

म्हैसूरची प्रवासयात्रा संपवून पुणें स्टेशनावरून घराकडे निघालों तेव्हां असा निश्चय केला कीं, कांहीं दिवस मौनव्रत स्वीकारावयाचें ! कारण ता. ८ ऑक्टोबरपासून ता. ३० पर्यंत आगगाडी-मोटारींचा प्रवास, पायापिटी, पाहुणचारांचा प्रेमळ अत्याचार, संभाषणें, मुलाखती, सत्कारसमारंभ आणि व्याख्यानें यांनीं मी इतका दमून गेलों होतों कीं, बोलावयाची सोय नाहीं. म्हणून मनानें असें ठरविलें कीं, काशीहून परत आलेल्या यात्रेकरूंच्या पायां पडून त्याचा पुण्यांश मिळवितां येतो तसा वाटेल तर माझ्या प्रवासयात्रेचा आनंद कोणीहि घ्यावा. त्याला माझी हरकत नाहीं. पण आपण होऊन तोंड उघडून प्रवासाचें वर्णन तर करावयाचें नाहींच, पण कोणी मुद्दाम प्रश्न करून माहिती विचारली तरी सांगत नाहीं असें स्पष्ट म्हणावयाचें ! बरोबरच आहे ! मी इतका खर्च आणि इतके श्रमसायास करून आलों व माझी माहिती लोकांनीं फुकट लुटावी हा काय न्याय झाला ?

## माझीं नातवंडें

पण माझी माहितीच काय, मीं बरोबर आणलेली सर्व चीजवस्तहि आपल्या स्वतंत्र अधिकारांत लुटणारी कांहीं मंडळी मी घरीं येण्याची वाट पाहत टपून बसली होती. तीं म्हणजे माझीं नातवंडें ! घरांत सामान जाऊन पडतांच त्यांनीं तें सर्व सोडलें; आणि ज्याला जें सांपडेल तें त्यानें हस्तगत तर केलेंच पण त्याविषयीं अनेक प्रश्न विचारण्याचाहि सपाटा लावला. फक्त खाण्याचे पदार्थ ज्यांच्या हातीं लागले त्यांचीं तोंडें बंद होतीं ! प्रश्न विचारण्याची लहान मुलांची रीत सर्वांच्या परिचयाची आहेच. त्या प्रश्नांचीं उत्तरें देतां देतां

कोणालाहि पुरेवाट होते. कोणाच्या हाताला म्हैसुरी उदबत्त्या लागल्या. कोणी म्हैसुरी चंदनाचीं खोडें उचललीं. कोणी म्हैसुरी साबणाचे डबे फोडले. कोणी रंगीत लांकडी तबकें पळविलीं. कोणी मानपत्राचे चांदीचे करंडे तपासूं लागला. कोणी मुरावलेल्या फळांच्या डब्यांवर हल्ला केला. हें सर्व पाहून, एकदां एका अरण्यांत एका फेरीवाल्यानें विकाऊ सामानाचे बस्ते सोडले, त्यांतले जिन्नस झाडावरच्या माकडा-वानरांनीं कसे पळविले, याविषयीं एक गोष्ट मीं वाचली होती तिची आठवण झाली. पण वानरसेना चीजवस्त नुसती पळवूनच संतुष्ट होती. वरती प्रश्न विचारून आणि उत्तरांचा आग्रह धरून तरी ती दमवीत नाहीं. मानवी वानरांचें तसें नाहीं. मला नातवंडांनीं विचारलेल्या प्रश्नांचीं उत्तरें देतांना नाकीं नव आले. त्यांना म्हैसूरच्या देखाव्यांशीं व राजकारणाशीं कांहीं कर्तव्य नव्हतें. पण म्हैसुरांत फार म्हशी आहेत म्हणून शहराला म्हैसूर हें नांव पडलें नसून, चामुंडा महिषासुर मर्दिनीशीं त्या नांवाचा संबंध आहे हें मला त्यांना सांगावें लागलें. विकत आणलेल्या पदार्थांच्यासंबंधानें प्रदर्शनाची, चंदन-तेलाच्या कारखान्याची, साबणाच्या कारखान्याची वगैरे हकिकत तांत्रिक तरी मला त्यांना सांगावी लागलीच.

## वधू पाहिजे

कांहीं तरी इकडचें तिकडचें सांगून नातवंडांची बोळवण केल्यावर तो प्रसंग आवरला. मौनव्रताचा निश्चय प्रथमच फुकट गेला, पण वाटलें कीं, इतर लोकांसंबंधानें तरी तो पाळूं. दुसरे दिवशीं सकाळीं इतर स्नेही मंडळी भेटीला येऊं लागली. तेव्हां या निश्चयानुरूप मी जणूं कांहीं कोठें प्रवासाला गेलोंच नव्हतों अशा बतावणीनें उलट त्यांनाच इकडचे तिकडचे स्थानिक प्रश्न विचारूं लागलों. मी प्रवासाचा विषय टाळतों असें पाहून एकजण म्हणाला, "आपल्या प्रवासाविषयीं कांहीं सांगावयाचें नाहीं असा बेत तुम्हीं केला आहेत कीं काय? पण संभाळा बरें. असाच कांहीं वेळ आणखी गेला आणि तुमचें पुनरागमन शिळें झालें, म्हणजे मग 'मला विचारा' म्हटलेंत तरी कोणी विचारणार नाहीं. एका तरुण वराची गोष्ट माहीत आहे ना? त्याला मुली सांगून येऊं लागल्या असें पाहून तो शेफारून गेला आणि 'यंदा आम्हांला कर्तव्य नाहीं' असें उत्तर देऊं लागला. पण असे कांहीं दिवस गेल्यावर त्याला मुलीच सांगून येईनातशा झाल्या. तेव्हां 'वधू पाहिजे' अशी जाहिरात द्यावी लागली! तसें तुमच्या प्रवासवर्णनाचें होईल." दुसरा

एक मित्र म्हणाला, "झऱ्याच्या तोंडांत गुडदी बसविली म्हणजे पाणी दुसरीकडे वाहूं लागून झरे आटतात आणि विहीर कोरडी पडते हें माहीत आहे ना? तसें तुमच्या प्रवासवर्णनाचें होईल, संभाळा."

हें ऐकून मी म्हणालों, "मला भीति दाखवितां ती व्यर्थ आहे. मीं इतका खर्च आणि श्रम करून प्रवास केला, तो त्यांत पाहिल्या-ऐकल्या गोष्टींच्या आनंदाचा लाभ तुम्हांला फुकटाफुकटी करून द्यावयाला वाटतें? कोणी विचारल्याशिवाय सांगूं नये ( नापृष्टः कस्यचित् ब्रूयात् ) हें एक नीतिवचन तर आहेच. पण कोणी विचारलें तरीहि सांगावें असें शास्त्र कोठें आहे?"

हें ऐकून एकजण म्हणाला, "तें शास्त्रबिस्त्र राहूं द्या म्हणा! गायींच्या धारेची वेळ झाली आणि वासरूं सोडावयाला कोणी येत नाहीं असें पाहिलें, म्हणजे गाय आपण होऊन हंबरूं लागून, माझी धार काढा अशी याचना करूं लागते. कारण कांसेंत सांचलेल्या दुधाची कळ लागते तिला! तसेंच तुमचेंहि होईल संभाळा. मग मुद्दाम आम्हांला हाक मारून प्रवासाची हकीगत सांगावी असें तुमचें तुम्हांलाच वाटूं लागेल."

मीं हसून म्हटलें, "पण कांहीं गायी पान्हा चोरणाऱ्या किंवा वासरालाहि न पाजणाऱ्या असतात. मीं असेंहि ऐकलें आहे कीं कांहीं गायी आपलें दूध आपणच पितात! निदान मी तरी माझ्या प्रवासानंदाच्या दुधाविषयीं तसेंच करावयाचें ठरविलें आहे म्हणा ना!"

## जॉन्सनचें मत

अशानें मी बधत नाहीं असें पाहून एकजण म्हणाला, "प्रवासाचा आनंद म्हणून काय सांगतां कोणाला ठाऊक? मी तरी असें मानणारा आहे कीं, प्रवासांत आनंद नसतोच. फक्त कष्ट असतात. सुखासुखी गृहवास सोडून बाहेर कां पडावें? आणि परत आल्यावर दमल्यासारखें हश्श हुश्श कां करावें? इंग्रजींतील दोन शब्द ट्रॅव्हल ( प्रवास ) आणि ट्रॅव्हिल ( श्रम ) हे समानार्थक मानतात ते उगीच काय? जॉन्सन हा माझ्याच मताचा होता. तो प्रवासासंबंधानें "I wish to see but I do not wish to go to see" असें म्हणे. "पाहण्याची इच्छा आहे. पण पाहण्याकरितां जावें, जागचें हलावें, अशी इच्छा नाहीं." प्रेक्षणीय देखाव्यांनीं जग हें काय भरलेंच आहे; पण तें पाहण्याचा हव्यास माणसानें किती व कां करावा? आणि माणूस

पाहून तरी किती पाहील? प्रेक्षणीय वस्तू पाहण्याची इच्छा सहज मारून टाकतां येण्यासारखी आहे. किंवा ती दुर्दम ठरली तर कल्पनेनें प्रेक्षणीय वस्तूंचें चित्र मनश्चक्षूंपुढें रंगवावें म्हणजे झालें! ती इच्छा मारण्यापेक्षां कल्पनेनें बसल्या जागींच ती तृप्त करणें मला अधिक आवडतें. इतकेंच नव्हे, तर पुष्कळ वेळां कल्पनेनें काढलेलें चित्र प्रत्यक्ष वस्तूपेक्षां सरस ठरतें. उलट प्रत्यक्ष पाहून निराशा होते. ताजमहालाची कीर्ति ऐकल्यामुळें तो मुद्दाम पाहण्यास गेलेल्या कांहीं मित्रांनीं मजजवळ असे उद्गार काढले आहेत कीं, "आहे, चांगला आहे; पण येवढा वाखाणतात इतका कांहीं भव्य नाहीं." वर्डस्वर्थ कवीची कविता प्रसिद्धच आहे—

"Is this Yarrow this the stream ?
Of which my memory cherished
so fond a dream ?"

(हात् त्याच्यारे! यॅरो-यॅरो म्हणून काय पण वर्णनाचा घोष लावतात आणि जाऊन प्रत्यक्ष पाहावी ती हीच का तुमची यॅरो नदी आणि तिची वीतभर दरी!) तात्पर्य, काय? नसता गोठेपणा अंगीं आणण्याचा एक प्रकार म्हणजे उठून दूर जाऊन कोठें तरी भटकून यावें, आणि मनमुराद तोंडभर वर्णन करीत अ-हा-हा!! चें कारंजें उडवावें!"

## झोन तिकिटांची एजन्सी

हें सर्व मला उद्देशून मला डिवचण्याकरितां होतें हें सांगावयास नकोच. पण त्यांतला दोष मला तरी लागण्यासारखा नव्हता. कारण म्हैसूर प्रांताचें वर्णन करण्याकरितां व आश्चर्यदर्शक उद्गारांचीं कारंजीं उडविण्याकरितां मीं आपण होऊन तोंड उघडलेंच नव्हतें, तर उलट तें प्रयत्नानें बंद करून ठेवलें होतें आणि मी प्रवासवर्णन करीत नाहीं हीच तर माझ्या मित्रांची मनांतून तक्रार होती. म्हणून मी म्हणालों, "राव, तुमचा बाण मला लागूं शकतच नाहीं म्हणा! प्रवासानंदाचीं वर्णनें करून लोकांना प्रवासाचा मोह उत्पन्न करावयाचें काम, किंवा 'झोन' तिकिटाची रेल्वे एजन्सी मीं पत्करलेली नाहीं हें खरें. तसेंच प्रेक्षणीय सुंदर वस्तु मनश्चक्षूंपुढें आणून उभ्या करतां येत असतां, पैसे खर्चून व दगदग सोसून मीं प्रवास केला ही माझी चूक असेल. पण म्हैसूर प्रांतांतल्या एखाद्या

अद्भुत देखाव्याचें, म्हणजे तुम्हीं न पाहिलेल्या अशा देखाव्याचें, दर्शन तुमचे मनश्चक्षू कसे काय घडवितात याचें थोडेंसें वर्णन कराल काय ?

माझा मित्र म्हणाला, " हो, त्यांत काय कठीण ? अद्भुत असें जगांत खरोखर कांहींच नाहीं. 'अद्भुत' म्हटलें जाते ती 'भूतां'ची बेरीज किंवा वजाबाकी किंवा गुणाकार-भागाकार असतो. भूतांची म्हणजे पूर्वी अनुभवांत आलेल्या गोष्टींची. कसें तें पाहा. भूतसमंध ही अद्भुत सृष्टि; पण मीं स्वप्नांत एकदां भूत पाहिलें. त्याचें तोंड पाठीला मानेच्या बाजूला व मान पुढें तोंडाच्या बाजूला होती. एकदां एक कोंकणी समंध स्वप्नांत पाहिला त्याचा हात दहा हात लांब होता, आणि त्यानें बसल्या बसल्या हातानें माडावरचे नारळ तोडले. हें सर्व अद्भुत. पण तोंड, मान, हात हे सर्व अवयव 'भूत' म्हणजे अनुभूतच कीं नाहीं ? पुराणकारांनीं आपणांकडून अद्भुतदर्शन म्हणून नारसिंहाचें चित्र निर्माण केलें. पण त्यांत फक्त बेरीज व वजाबाकीच आहे. अशी कीं, मुंडक्याविरहित मनुष्याच्या धडाला ( म्हणजे कबंधाला ) फक्त कबंध-विरहित सिंहाचें मुंडकें जोडलें ! यांत बाहेरचें नवें काय आलें ? चित्रकला, शिल्पकला यांत स्वतंत्र रचनेपेक्षां अनुकरण, तोड-जोड हींच अधिक असतात. मनुष्यच काय पण सृष्टिदेखील हेंच करते. कालिदासाला अद्भुत सुंदर अशा स्त्रीचें वर्णन करावेंसें वाटलें तेव्हां त्यानें तरी काय केलें ? " चंद्र, मदन, वसंतमास अशा भूत म्हणजे ज्ञात कल्पनाच एकत्र आणून

> 'अस्याः सर्गविधौ प्रजापतिरभूत् चंद्रो नु कांतिप्रदः
> शृंगारैकरसः स्वयं नु मदनो मासो नु पुष्पाकरः'

असा श्लोक बनवून सोडला ! "

## म्हैसूरचें वर्णन

मी म्हणालों, " पण तुमच्याकडून म्हैसूरवर्णन—मनःश्चक्षुदर्शित म्हैसूर-वर्णन– करावयाचें राहिलें आहे अजून त्याचें काय ? " माझा मित्र म्हणाला " त्यांत हो काय कठीण ? म्हैसूरच्या विजेच्या रोषनाईची फार ख्याती ऐकतों. पण त्यांत काय विशेष ! म्हैसुरांत विजेच्या दिव्यांची गर्दी असली तरी आकाशांतल्या चांदण्यांच्या गर्दीपेक्षां खचित अधिक भरणार नाहीं. एका आकाशगंगेच्या जोडीला मी आणखी तशाच चार पाहत आहे, आणि

ते सर्व विजेचे दिवे आहेत, अशी कल्पना करीन म्हणजे झालें. गिरसप्पाचा धबधवा असेल बाराशें फूट खालीं पडत. पण मनानें मीं तें अंतर दुप्पट केलें तर चांगला चोवीसशें फुटांचा धबधबा दिसेल कीं माझ्या डोळ्यांना! म्हैसूरचा राजवाडा असेल चांगला; पण बडोदा, ग्वाल्हेर, बिकानेर या तीन ठिकाणचे राजवाडे मनानें मीं एकत्र केले किंवा एकावर एक रचले, तर होईल कीं नाहीं तो देखावा म्हैसूरच्या राजवाड्याहून 'अद्‌भुत'? उगाच पैसे खर्च करा, वणवण हिंडा, आणि अहाहा! अहाहा! करा, यांत काय अधिक मिळणार? अधिक असेल तर तें इतकेंच कीं, दुसऱ्यानें पाहिलें नाहीं असें आपण कांहीं तरी पाहिलें हा त्याचा उणेपणा आणि स्वतःचा मोठेपणा कल्पून अहंकाराचा खेळ खेळावयाचा दुसरें काय?"

## लोकांचा मुलगा

त्यावर मी इतकेंच म्हणालों, "असें काय? तर तुमच्या राजवाड्याचीच गोष्ट घेऊं. बडोदा, ग्वाल्हेर, बिकानेरचे तुम्हीं पाहिलेले राजवाडे एकत्र केले तर मग म्हैसूरचा राजवाडा कांहींच नाहीं हें कबूल; पण तीन निरनिराळ्या रचनापद्धतीचे ते तीन राजवाडे एकत्र करणें अशक्य. ते कसे करतां येतील याविषयीं एखाद्या शिल्पज्ञाचा सल्ला तुम्हीं कधीं घेतला होता काय? पण त्यापुढचा प्रश्न हा कीं, जे तीन राजवाडे एकत्र करून तुम्ही मनानें पाहणार त्यांतला प्रत्येक तरी तुम्हीं आधीं वेगवेगळा प्रत्यक्ष पाहिला आहेच; आणि तो मात्र केवळ मनश्चक्षूंनीं नसून शारीरचक्षूंनींच ना? तो कांहीं तुम्हांला घरबसल्या येऊन भेटला नाहीं खचित. मग तो पाहावयाला तरी तुम्ही जागेवरून उठून कां गेलां? श्रम कां केले? खर्च कां केला? आकाशांतले सगळे तारे खालीं आणून जशी म्हैसूरच्या दीपोत्सवाची कल्पना तुम्हाला करतां येते, तशीच या प्रत्येक वाड्याची कल्पना नसती का तुम्हाला करतां आली घरबसल्या मनानें? त्या वाड्यांत तरी काय अधिक होतें? आकृति, रूप, रंग हेंच कीं नाहीं? तुमच्या स्वतःच्या घरांत किंवा गांवांतल्या गांवांत आकृति, रूप, रंग असलेले कांहीं पदार्थ असतीलच! मग त्यांची बेरीज, वजाबाकी, गुणाकार करून नसतें का तुमचें भागलें? तसेंच समाजांत लोकांचे संसार तुम्ही पाहतां, त्यांतला एखादा तुमचाच आहे असें तुम्हीं कां समजत नाहीं? संसार म्हणजे तरी स्त्री-पुरुष-मुलें-माणसें यांची बेरीज, वजाबाकी, गुणाकार यांहून त्यांत काय अधिक आहे? आपला स्वतंत्र संसार मांडणें हें

तरी श्रमाचें व खर्चाचेंच काम नव्हे काय ? लोकांचा एखादा चांगलासा मुलगा पाहावा आणि तो आपलाच अशी कल्पना करावी म्हणजे झालें."

## खरें सुख कोणतें ?

हें ऐकून माझा मित्र म्हणाला, "वा: तसें कसें होईल ? स्वानुभवाचें सुख तेंच खरें सुख." तेव्हां मीहि म्हणालों, "हें तत्त्व प्रेक्षणीय वस्तु प्रत्यक्ष पाहण्यालाहि कां लागू नये ? त्यांतच तेवढा कल्पनेवर हवाला कां ? आणि त्या कल्पनेनें खरें समाधान कसें होणार ?"

तेव्हां तो मोठ्यामोठ्यानें हसूत म्हणाला, "अहो, तुम्हीं म्हैसूरच्या यात्रेची कांहीं माहिती न सांगण्याचा निश्चय केलेला दिसला म्हणून उगीच थट्टेनें हा वितंडवाद केला. विस्तव फुंकला म्हणजे पेटतो."

मीहि मिस्किलपणानें म्हणालों—

"ठीक आहे. विस्तव पेटविला असें वाटतें तर मग आतां कणसें भाजून घ्या कशीं ! तुम्हांला मीं प्रवासवर्णन कोणत्या पद्धतीनें सुरू करावेंसें वाटतें ?"

"वा: यांत पद्धति त्या कसल्या ?"

"कशा त्या सांगतों. एक पद्धति अशी–'आम्हीं म्हैसूरच्या प्रवासाला ता.— रोजीं सकाळीं साडेसात वाजतां निघालों.' जसें कांहीं सरकारी भत्ता-बिल तयार करण्याकरितां वेळ लिहावयाची होती ! दुसरी पद्धति अशी— 'अहाहा ! ईश्वराची लीला अगाध आहे. त्यानें आपल्या चातुर्यानें इ.' यांतच सर्व अद्‌भुत रस येऊन गेला. पुढें रुक्ष कोरडें वाळवंट. तिसरी पद्धत अशी– 'ईश्वर कृपेनें हिंदुस्थानांत इंग्रजांचें राज्य प्रस्थापित झाल्यापासून इत्यादि.' जसें कांहीं हे एखादा इतिहासच लिहावयाला बसले आहेत !

मित्र म्हणाला, "तसलें कांहीं नाहीं. मी सरळ मार्गानें जाणारा माणूस आहें."

मग प्रश्न विचारण्यास सुरुवात झाली—"म्हैसूरला जावयाला निघून तुम्हांला किती दिवस झाले ?"

मीं लगेच डायरी पाहून तारीख सांगितली. मग प्रश्न–"म्हैसूरला जायचें कोणत्या मार्गानें ?" तेव्हां टेबलांतला नकाशा काढून पुढें ठेवला.

मग प्रश्न—" बरें, वाटेंत मुक्काम कोठें कोठें केलेत ? "

मी म्हणालों—" बैलगाडींतून थोडाच गेलों होतों. वाटेंत मुक्कामावर मुक्काम करायला, आणि झाडाखालीं उतरून पिठलेंभात खायला ! पुण्यांत आगगाडींत बसलों तों मध्यें गाडीखालीं कोठेंहि पाय न टेंकतां एका आंवढ्यांत बंगलोरास जाऊन थडकलों. त्यांतूनहि वाटेंत कोणकोणतीं स्टेशनें लागतात व प्रवासाला किती तास लागतात हें समजून घ्यावयाचें असेल तर तें यांत सांपडेल." असें म्हणून एम्. एस. एम्. चें टाईम-टेबल त्यांच्या हातीं दिलें.

मग प्रश्न—" तिकडे काय काय पाहिलेंत ? "

आतां मात्र पंचाईत आली. पण जवळच म्हैसूर इलाख्याचें ग्याझेटिअर होतें तें दिलें आणि म्हणालों, " यांत मी सांगू शकेन त्यापेक्षां तुम्हांला पुष्कळ अधिक सांपडेल." ( मात्र खरें बोलावयाचें तर त्यांतलें मीं स्वतः एक अक्षरहि वाचलें नव्हतें. ) त्यांतूनहि आणखी माहिती पाहिजे असेल तर सरदेसायांच्या रियासतींतील, खरेशास्त्र्यांच्या ऐतिहासिक लेख-संग्रहांतील आणि दत्तोपंत आपट्यांच्या 'श्रीरंगपट्टणच्या' मोहिमेंतील हकीकत वाचा म्हणजे म्हैसूरचा इतिहास कळेल ! "

## हळेबिड आणि बेलूर

मग एकानें विचारलें, " कृष्णराजसागर म्हणतात तो केवढासा आहे ? " त्याला उत्तर म्हणून तोंडाला आला तो दशलक्ष घनफूट गॅलन पाण्याचा आंकडा सांगून दिला. " हळेबिड आणि बेलूर येथील देवालयांची माहिती कशी काय ? " असें कोणीं विचारलें, " तेव्हां देवळांच्या कलाकुसरीचें काम पांचशें कारागीर पंचवीस वर्षें करीत होते असें बेलाशक सांगून दिलें ! आणि " म्हैसुरांतील दसऱ्याची व मिरवणुकीच्या रोषणाईची शोभा कशी काय असते " असा प्रश्न विचारण्यांत आला. त्याला उत्तर म्हणून 'अहाहा' असा उद्गार तोंडानें काढून डोळे मोठे करून छताकडे लावले ते पांच मिनिटें खालीं आणलेच नाहींत. पण वाटलें कीं, आणखी कांहीं वेळ हें सोंग असेंच ठेवीन तर माझ्या मित्रांना माझ्या प्रकृतीविषयीं भलतीच शंका यावयाची !

आतां मात्र माझे मित्र मनांत तरकले. एकजण म्हणाला, " जाऊं द्या. यांच्या अंगांतला प्रवासाचा शीण अजून गेलेला दिसत नाहीं. म्हणून सरळ उत्तरें देण्याची टाळाटाळ हे करीत असावे. प्रवासवर्णनें ऐकण्याची इच्छा खरी. पण अधिक त्रास न द्यावा हें बरें. "

इतक्यांत केसरीचा वार्ताहर तेथें येऊन दाखल झाला. तेव्हां एकजण म्हणाला, "चला. आयतेंच आपलें काम झालें. वांसराचें तोंड कांसेला लागलें आणि फिरून आमच्या एकट्यावर उपकार व्हायचे ते नकोत. तुम्ही जसें आतां स्वस्थपणानें हकीकत सांगाल तशी ती आम्हीहि स्वस्थपणानेंच वाचूं."

मग मी हसत म्हणालों, "गड्याहो, थकल्याभागल्या प्रवाशावर कांहीं दया करायची होतीत कीं नाहीं ? प्रवाशाच्या श्रमापाठोपाठ प्रवासवर्णनाचे श्रम कुणाचेहि वांचवावे. हे श्रम वांचविण्याकरितां मीं थोडें मौन धरलें, आडवीं-तिडवीं उत्तरें दिलीं, त्याबद्दल क्षमा करा हं. आतां केसरीचा वार्ताहर आहे आणि मी आहें. हळूहळू जमेल तसें पाहून घेऊं."

या दौऱ्यांत मीं सतत तीन आठवडे प्रवास केला तरी त्यांत माझी प्रकृति सुदैवानें फार चांगली राहिली. मात्र शीण सांचत आला तो अजून अंगां-तून जात नाहीं इतकेंच ! या वयांत इतके श्रम करतां आले ही एक प्रकारें प्रकृतीची परीक्षाच झाली, असें मी समजतों. म्हैसूर-बंगलोर प्रांता-कडे ही माझी खेप पहिलीच ! आजपर्यंत हुबळीच्या दक्षिणेस मीं कधींच प्रवास केला नव्हता. पंधरा वर्षांपूर्वी आंध्र-कर्नाटक प्रांतिक कॉंग्रेस कमिट्यां-मध्यें बल्लारी जिल्ह्याच्या वांटणीचा तंटा उत्पन्न झाला, तेव्हां तो तोडण्या-करितां कॉंग्रेस वर्किंग कमिटीचा पंच म्हणून मी बल्लारीस गेलों होतों. त्या वेळीं हंपी येथील प्राचीन विजयनगरचे ऐतिहासिक अवशेष मीं पाहून घेतले. परंतु कर्नाटकांत इतका मोठा दौरा मीं यापूर्वी कधीं केला नव्हता.

यंदा तिकडे जाण्याला विशेष कारण काय म्हटलें तर तें असें. निमंत्रण व रिकामपण यांची यंदाच प्रथम गांठ पडली ! गेल्या एप्रिलपासून मी सेवा-निवृत्त झालों तरी, विनोद विषयावरील नवीन पुस्तक लिहिण्या-छापण्याचें माझें काम ऑक्टोबरच्या प्रारंभापर्यंत पुरलें. मला खरें रिकामपण ता. १ ऑक्टोबरपासून मिळालें आणि लगेच ता. ८ रोजीं मी या दौऱ्यावर निघालों.

रिकामपणाबरोबर निमंत्रणाचा मेळ बसला. तें निमंत्रण एकच होतें असें नाहीं. तर निमंत्रणें सांचत सांचत आलीं होतीं. संस्थानी प्रजा परिषदेची

चळवळ सुरू झाली तेव्हां तिकडील एक पुढारी गुंडाप्पा यांनीं मला बंगलोरास निमंत्रण दिलें होतें. बंगलोरच्या महाराष्ट्रीय मंडळींकडून मधून मधून बोलावणीं येत. नुकतेच जपानला जाऊन आलेले रेशीम कारखान्याचे मालक रा. नाईक हे पुण्यास आले होते, त्यांनीं आमंत्रण दिलेंच. नंतर म्हैसूरच्या दिवाणसाहेबांचें निमंत्रण आलें. बेळगांव-धारवाड-हुबळी इकडेहि मी एरवीं फारसा जाऊं शकत नाहीं. म्हणून मधून मधून त्यांचीं निमंत्रणें येत असतात. अर्थात् एम्. एस. एम्. रेल्वेनें म्हैसूरला गेल्यास वाटेंत ओळीनें या सर्व ठिकाणच्या मित्र-मंडळीलाहि भेटतां येईल म्हणून, परतीच्या तिकिटांत जितकें अधिक दिवस फिरतां येईल तितकें फिरावें असें ठरवून तीन आठवडे प्रवास केला. तरीहि सर्व निमंत्रणांचा स्वस्थपणें परामर्ष मला घेतां आला नाहींच याचें वाईट वाटतें.

## दिवाणसाहेबांचें निमंत्रण

म्हैसूरच्या दिवाणसाहेबांनीं मला निमंत्रण देण्याचें कारण असें—१९३२सालीं दिवाणसाहेब हे मजबरोबरच 'राऊंड टेबल कॉन्फरन्स'चे एक सभासद होते. तेथें त्यांच्या-माझ्या गाठी पडत. त्या वेळीं ते मला म्हणाले, "तुम्ही आमच्या म्हैसुराकडे कधीं कां येत नाहीं? तिकडे पाहण्यासवरण्यासारखें पुष्कळच आहे." मी म्हणालों, "तुमच्या संस्थानांतील लोकांशीं राजकारणाचा प्रत्यक्ष संबंध माझा नाहीं. भाषाहि परकी. आतां तिकडील प्रेक्षणीय प्रसिद्ध स्थळें पाहावींशीं वाटतात, पण त्याला पाहिजे तितकें रिकामपण मला अजून लाभत नाहीं. तें मिळालें म्हणजे जावें असा विचार आहे." हें बोलणें तेव्हां तितकेंच राहिलें. पण यंदा कृष्णमूर्ति नांवाच्या एका गृहस्थानें म्हैसूरविषयीं एक पुस्तक लिहिलें. त्याला त्याच्या आग्रहावरून मीं प्रस्तावना लिहिली. कदाचित् ती पाहून दिवाणसाहेबांना मला निमंत्रण देण्याचें सुचलें असावें. प्रथम म्हैसूर-महाराजांच्या गेल्या वाढदिवस-समारंभाला त्यांनीं मला निमंत्रण केलें. पण माझ्या येथील कामामुळें मला तेव्हां तें स्वीकारतां आलें नाहीं. तेव्हां त्यांनीं आठवण ठेवून फिरून दसऱ्याच्या समारंभाकरितां मला निमंत्रण दिलें. आणि मला आतां रिकामपण होतें म्हणून मींहि तें स्वीकारलें.

---

## लेखांक २ रा

(केसरी—१९ नोव्हेंबर १९३७)

म्हैसूर दरबारचा परिपाठच असा आहे कीं, अशा समारंभांना बाहेरचे दहा पांच पाहुणे बोलवावे. त्यांतच एक मला त्यांनीं यंदां बोलावलें. आणि दरबारचेंच निमंत्रण असल्यानें पाहाण्यासवरण्याची सोय सहजासहजीं सुलभ होते या दृष्टीनें मीं तें निमंत्रण स्वीकारलें. यंदा अमृतबझार पत्रिकेचे संपादक तुषार कांति घोष यांनाहि मजप्रमाणेंच त्यांनीं निमंत्रण दिलें होतें व त्याप्रमाणें तेहि आले होते. आम्हा दोघांखेरीज इतरहि दहा पंधरा पाहुणे निरनिराळया धंद्यांचे व दर्जाचे बोलाविले होते. मी व इतर लोक संस्थानचे पाहुणे होतों याचा अर्थ इतकाच कीं, जो तो पाहुणा प्रवासासुद्धां इतर सर्व खर्च आपण आपला करतो. फक्त येथील मुक्कामांत उतरण्याच्या जागेची, जेवणाखाण्याची, आणि समारंभ व प्रेक्षणीय स्थळें दाखविणें इत्यादि सोयी संस्थान आपल्या खर्चानें आपल्या नोकरांकडून करवितें. शिवाय पाहुणे या नात्यानें दिवाण व महाराज यांच्या भेटी-मुलाखतींचीहि व्यवस्था ते आपण होऊन करतात. आपल्या संस्थानांतील राजव्यवस्था व राजकारण यांच्याविषयीं अनुकूल लोकमत बनविणें हा संस्थानचा एक हेतु, असे पाहुणे बोलावण्यांत असतो, असें सकृद्दर्शनीं वाटतें. पण आपल्या पाहुण्यांचें आपल्याविषयीं बरें मत व्हावें अशी कोणाहि यजमानाची इच्छा असणें स्वाभाविकच नव्हे काय? परंतु बरें मत व्हावयाचें तें प्रथम आपलें 'वैभव' पाहून व्हावें असा मुख्य हेतु दिसतो! राजकारणाचा संबंध त्यांत येत नाहीं, किंवा आपल्या राज्यव्यवस्थेसंबंधीं तुम्हाला काय वाटतें असा साधा प्रश्नहि ते तोंडीं संभाषणांत देखील विचारीत नाहींत. निदान मला तरी त्यांनीं तो विचारला नाहीं. पाहुणा जें काय पाहतो ऐकतो त्यावरून त्याचें प्रामाणिक मत बनेल तेंच खरें!

### माझी प्रस्तावना

मी म्हैसूराविषयक पुस्तकाला प्रस्तावना लिहिल्याचें पूर्वीं बोललों. त्या प्रस्तावनेंत, ऐकीव माहितीवरून, संस्थानाविषयीं मला चांगलें असें काय वाटत होतें तें जसें लिहिलें, तसेंच मला एक दोन दोष ऐकिवांत आले त्याचाहि स्पष्ट उल्लेख त्या प्रस्तावनेंत केला होता. राज्यव्यवस्था पद्धतशीर

व प्रगतिपर आहे पण थोडीशी दीर्घसूत्री आहे, आणि अधिकारी वर्गाच्या कांहीं भागांत लाचलुचपतीची बोलवा ऐकूं येते, असें मीं लिहिलें होतें हें वाचून तिकडच्या वाचकांत बरीच खळबळ झाली. पण मला 'चूक' म्हणणारीं पत्रें आलीं, तशींच 'तुमचें म्हणणें बरोबर आहे' असें समर्थन करणारीं पत्रेंहि आलीं. तेव्हां परस्पर आयती फिटास फीट झाली असें मानून मीं कोणास कांहींच उत्तर पाठविलें नाहीं. अशा रीतीनें मी म्हैसुरास जाण्यापूर्वींच तिकडे एक प्रकारें माझी जाहिरात झाली होती असें आढळून आलें! दिवाणसाहेबांनीं ही प्रस्तावना वाचली होती; व मी संस्थानला बरें म्हटलें होतें त्यापुरते त्यांनीं खासगी पत्रांत माझे आभारहि मानले होते; परंतु मीं दोष दाखविले त्याला त्यांनीं हरकत घेतली नाहीं, आणि समक्ष भेटींतहि त्याविषयीं कांहींच उल्लेख केला नाहीं. पण औद्योगिक दृष्ट्या म्हैसूर संस्थान विशेष प्रगतिपर आहे इतकेंच मीं प्रस्तावनेंत म्हटलें होतें तें खरेंच होतें. आणि आज म्हैसूर पाहून आल्यावर तर तें मी अधिक खात्रीनें म्हणूं शकतों. दिवाणांच्या मनांत आपल्या संस्थानांतील राज्यव्यवस्थेविषयीं पूर्ण आत्मविश्वास दिसतो. म्हणून ते लोकांजवळ तो विषय मुद्दाम काढून मत विचारीत नसतील. तसेंच, ज्याला जे दोष म्हणून वाटतील ते त्यानें बोलून दाखवावे असेंहि कदाचित् त्यांचें मत असेल.

तात्पर्य, संस्थानी राज्यव्यवस्थेच्या गुणदोषांविषयीं त्यांनीं मजजवळ मुळींच वाद केला नाहीं. पण फेडरेशन किंवा सर्वसामान्य राजकारण असले विषय माझ्या व दिवाणसाहेबांच्या संभाषणांत निघालेच. ते कसे टळणार? आणि ते टाळण्याचा उभयपक्षींहि उद्देश नव्हता. त्या प्रश्नाविषयीं ते व मी काय बोललों याची कांहीं माहिती मीं सांगावी असें कित्येकांना सहजच वाटणार आणि सार्वजनिक विषयावर माझीं खासगी, म्हणजे प्रसिद्ध न करण्यासारखीं अशीं मतें कांहींच नसतातहि. म्हणून म्हैसूरचे महाराज किंवा दिवाणसाहेब यांच्यापुढें जीं मतें मीं मांडलीं तीं सांगण्यास माझी कांहींच हरकत नाहीं. किंबहुना तीं इकडील लोकांस पूर्ण परिचयाचीं आहेत. मात्र महाराज व दिवाणसाहेब माझ्या मुलाखतींत काय बोलले हें त्यांच्या परवानगीशिवाय मला प्रसिद्ध करण्याचा अधिकार नाहीं. अशीं संभाषणें खासगी असतात म्हणून कदाचित् मीं आपल्यापुरतें कोणाशीं काय बोललों हें मला सांगतां

येईल आणि मी तें या लेखमालेंत पुढें सांगणारच आहें. तथापि प्रथम दौऱ्याची हकीकत सांगून मागाहून अवांतर विषयासंबंधीं लिहीन.

माझ्या तीन आठवड्यांच्या प्रवासापैकीं फक्त दोनच आठवडे मला म्हैसूर प्रांतांत घालवितां आले. एक सबंध आठवडा हुबळी ते सांगली या भागांतील प्रवासाकरितां राखून ठेवावा लागला. या शेवटच्या आठवड्यांत मला नवीन पाहण्यासारखें असें कांहीं नव्हतें. तो सर्व वेळ सभा, भेटी, सत्कार, संभाषणें, पाहुणचार अशा ठरीव नित्यक्रमांतच गेला. या कार्यक्रमाविषयीं केसरीच्या वाचकांना कल्पना असल्यामुळें त्याविषयीं मी कांहीं लिहीत नाहीं. फक्त म्हैसूर इलाख्यांतील कार्यक्रमासंबंधानेंच आणि तेंहि थोडक्यांत सांगतों.

## बंगलोरांतील विशेष

ता. ८ व ९ ऑक्टोबर हे दोनच दिवस मला बंगलोरांत घालवावयास सांपडले. प्रथम तेथील महाराष्ट्रीय मंडळींच्या गांठीभेटी घेतल्या. या मंडळींत कर्वे यांचें घराणें प्रमुख आहे. त्यांची तेथें आज तिसरी पिढी चालू आहे. पहिल्या व दुसऱ्या पिढीचे लोक वरिष्ठ दर्जाचे सरकारी नोकर होते. म्हैसूर राज्यांत ब्रिटिश व्यवस्था चालू झाली तेव्हां इकडील खालसा इलाख्यांतून इंजीनियर, सर्व्हेअर वगैरे लोक नेण्यांत आले. ते सहजच तिकडे स्थायिक होऊन राहिले. अलीकडच्या पिढींतील बाहेरून जाऊन राहिलेल्या लोकांत रा. नाईक (शहापूरकर) हे प्रमुख असून, रेशीम कारखान्याचे चालक म्हणून प्रसिद्ध आहेत. ते रयतसभेचे एक सभासद झाले आहेत. हल्लीं त्यांना राजाश्रय मिळालेला असून, रेशमाचा नवीन कारखाना काढण्याकरितां त्यांस म्हैसूर सरकारनें शेंकडों एकर जमीन सवलतीनें दिली आहे आणि जपानच्या ताज्या सफरींत त्यांनीं हेरलेल्या नवीन रेशमाच्या लागवडीच्या कल्पनांचा प्रयोग ते येथें करून पाहणार आहेत. याशिवाय कोणी मोटारींचा, कोणी फोटोग्राफीचा, कोणी सुगंधी मालाचा इत्यादि धंदे करणारे महाराष्ट्रीयहि तेथें आहेत. बंगलोरांतील महाराष्ट्रीय वसाहतीमध्यें मुंबईचे शिंपी आणि विणकर या लोकांची वस्ती पुष्कळच आहे. मूळ शहाजी राजांचे वेळीं तिकडे गेलेल्या घराण्यांपैकीं सज्जनराव नांवाचे एक गृहस्थ मोठे धनिक व्यापारी असून, त्यांनीं अनाथ विद्यार्थिगृह, देवस्थान इत्यादि संस्था स्वतःच्या खर्चानें चालविलेल्या आहेत. एका मोठ्या चौकालाहि त्या गृहस्थांचें नांव सरकारकडून

देण्यांत आलें आहे. बंगलोर येथें व्यंकोजी राजे यांनीं बांधलेलें किंवा पुरस्कार केलेलें एक देवस्थान असून, त्यालगत एका खडकावर त्यासंबंधीं खोदलेला मोठा शिलालेख आहे. शहाजी राजांच्या वेळच्या भुइकोट किल्ल्याच्या तटांचे व बुरुजांचे फक्त कांहीं अवशेष असून, बाकी किल्ला नवीन वस्तींत सामील झालेला आहे.

बंगलोर येथें पांच-सहा दिवस घालवून पाहण्याइतक्या संस्था आहेत. परंतु त्यांतील इस्पितळ, म्यूझियम, साबणाचा सरकारी कारखाना, आणि टाटा यांची सायन्स इन्स्टिटयूट इतक्याच मला पाहतां आल्या.

बंगलोरच्या इस्पितळाइतकें प्रशस्त, संपन्न व स्वच्छ इस्पितळ दुसरें कोणतेंच आजवर माझ्या पाहण्यांत आलें नाहीं. सायन्स इन्स्टिटयूट पाहून मला फार आनंद झाला. तेथील महाराष्ट्रीय मंडळींत कांहीं शिक्षक पण पुष्कळसे विद्यार्थी असून त्यांनीं मला सर्व संस्था दाखविली; आणि भोजनप्रसंगीं पुष्कळ गप्पा-गोष्टी झाल्या. त्यांत संस्थेतील भांडणांची हकीकतहि कळली. या भांडणांचें मूळ कारण सर व्ही. रामन् यांची पक्षपाती वृत्ति ही असून, शेवटीं सरकारी कमिटी नेमून संस्थेच्या कारभाराची नवी घटना व व्यवस्था करण्यापर्यंत मजल गेली, इत्यादि गोष्टी पूर्वी वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झाल्यामुळें त्याविषयीं कांहीं अधिक लिहीत नाहीं.

बंगलोरच्या मुक्कामांत महाराष्ट्रीय मंडळांकडून मला मानपत्र व उपाहार देण्यांत आला. कॉमनवेल्थ कंपनीचे तरुण उत्साही चीफ एजंट रा. गवाणकर यांनीं आपल्या संस्थेतर्फे 'पार्टी' दिली. दोन्ही कार्यक्रम तेथील चेंबर ऑफ कॉमर्सच्या इमारतींत झाले. तसेंच कर्नाटकांत वर्तमानपत्रासंबंधीं व्यवसाय करणाऱ्या मंडळींनीं मला उपाहारास बोलावलें. या दोन-तीन प्रसंगीं मला जाहीर भाषणें करावीं लागलीं. तसेंच एके रात्रीं बंगलोर येथील कॉंग्रेस कमिटीचे अनेक कार्यकर्ते मिळून माझ्या भेटीला आले. त्यांच्याशीं मी एक तासभर विचारविनिमय केला.

म्हैसूर शहर ही राजधानी असली तरी बंगलोर हीच राज्यकारभाराची मुख्य जागा असल्यानें प्रमुख सरकारी कचेऱ्या येथेंच असतात. शहर फार स्वच्छ असून अत्यंत विस्तृत असतांहि, सर्व नवे भाग आंखीव—रेखीव असून रस्ते प्रशस्त आणि उत्तम स्थितींत ठेवण्यांत आलेले दिसले. येथील हवा समशीतोष्ण असून उन्हाळ्यांतहि मुक्काम करण्यासारखी आहे.

## सर विश्वेश्वरअय्या

बंगलोरच्या मुक्कामांत माझे स्नेही सर विश्वेश्वरअय्या यांची गांठ पडली. त्यांच्या घरीं चहापार्टीच्या निमित्तानें अनेक मोठमोठे जुने-नवे अधिकारी एकत्र आले होते. त्यांची अनायासानें ओळख झाली आणि बरेंच बोलणें-चालणें झालें. सर विश्वेश्वरअय्या हे आतां वृद्ध झाले असले तरी मनानें तरुण आहेत. त्यांनीं आपली सात वर्षांची दिवाणगिरी सर्व बाजूनीं यशस्वी केलेली असून, उद्योगवृद्धीच्या कामांत तर त्यांनीं मोठेंच नांव मिळविलें आहे. त्यांनीं राजीनामा दिला तो स्वाभिमानरक्षणासाठींच दिला. आणि अलीकडे ते म्हैसुरास फारसे जातहि नाहींत. आपल्या कर्तृत्वाच्या यशाचा आनंद आणि समाधान उपभोगीत, आपल्या विधायक बुद्धीचा उपयोग कोणाला करून घ्यावयाचा असल्यास त्याला साहाय्य करण्याला ते तत्पर असतात. म्हैसूरच्या दिवाणांची एकंदर परंपरा लक्षांत घेतली तर ती अभिमानास्पद वाटते. म्हैसूर संस्थानाला आज जें अग्रस्थान प्राप्त झालें आहे त्यांत महाराजमंडळीपेक्षां दिवाणांचा हातच अधिक प्रभावी ठरला आहे. इतर कोणत्याहि संस्थानांत हा प्रकार आढळत नाहीं. संस्थानच्या लहानशा क्षेत्रांत हिंदी लोकांच्या कर्तृत्वाला वाव कसा मिळूं शकतो, आणि राज्यकारभाराच्या कामीं हिंदी लोक युरोपियन लोकांची बरोबरी कशी करूं शकतात हें म्हैसूरच्या उदाहरणावरून चांगलेंच दिसून येतें.

ता. १२ आक्टोबर रोजीं बंगलोराहून म्हैसुरास मोटारमार्गें गेलों. माझ्या राहण्याजेवणाची व्यवस्था तेथें 'राममंदिर' नांवाच्या सरकारी बंगल्यांत केली होती. दरबारच्या सर्व पाहुण्यांत मी एकटाच शाकाहारी होतों. म्हणून माझी व्यवस्था स्वतंत्र करण्यांत आली होती. सर्वभक्षक पाहुणे कांहीं दिवाण-साहेबांच्या घरीं आणि कांहीं इतर सरकारी बंगल्यांत उतरले होते.

म्हैसूर शहरांत माझा मुक्काम सुमारें सहा दिवस पडला होता. तरी तेथील सर्व कांहीं पाहण्यासारखें होतें तें मला पाहतां आलें नाहीं. तथापि नरसिंह-मूर्ति नांवाचे जे एक म्हैसूर सिव्हिलियन माझ्या दिमतीला देण्यांत आले होते त्यांनीं, त्यांच्या स्थानिक माहितीमुळें, माझे कार्यक्रम सकाळदुपार मिळून त्यांतल्या त्यांत सोयीनें बसवून दिले होते. ते सरकारी मोटारींतून मजबरोबर हिंडत. यामुळें मला कोठेंच स्वतःची ओळख स्वतःच करून द्यावी लागली नाहीं. जेथें जावें तेथील चालक मजबरोबर स्वतः हिंडून सर्व कांहीं दाखवीत.

त्याप्रमाणें मीं सरकारी गोशाळा, फळाफुलांचें प्रदर्शन, औद्योगिक प्रदर्शन, दसऱ्याची मिरवणूक, राजवाड्यांतील दरबार, चामुंडीचें देवस्थान, ललित-महाल, जगन्मोहन राजवाडा, चित्रकलेचें प्रदर्शन, प्रातिनिधिक लोकसभेची बैठक आणि सामान्यतः सर्व शहर इत्यादि अनेक स्थळें व देखावे पाहून घेतले.

## औद्योगिक प्रदर्शन

सरकारी गोशाळा शास्त्रीय पद्धतीनें चालविलेली असून, गाईंच्या खिल्लारां-करितां शेंकडों एकर वनभूमि व कुरणें म्हणून राखून ठेविलेले दिसले. मात्र गाई फारशा नजरेंत भरण्यासारख्या वाटल्या नाहींत.

फळांफुलांचें प्रदर्शन पाहण्यासारखें होतें. तेथें पाहिलेल्या नारळांइतके मोठे नारळ मीं कोठेंच पाहिले नव्हते. प्रदर्शन-कमिटीकडून पदकें, बक्षिसें, सर्टिफिकिटें इत्यादिकांनीं संभावना करून फळांफुलांच्या लागवडीला पुष्कळ उत्तेजन देण्यांत येतें. बागा सुंदर व नीटनेटक्या ठेवण्याबद्दलहि कांहीं विशेष बक्षिसें दिलीं जातात.

औद्योगिक प्रदर्शन दरवर्षीं भरविण्यांत येतें. त्याकरितां सोईची अशी प्रशस्त इमारत सरकारनें कायमचीच बांधून ठेविली आहे. यामुळें प्रदर्शन सुव्यवस्थित व भरदार दिसतें. प्रदर्शनांत मांडलेल्या दुकानांतून खूपच विक्री होत असलेली दिसली. म्हैसूर टेक्निकल स्कूलनें मांडलेलें रोजवुडचें सामान प्रेक्षणीय होतें. सगळ्यांत मध्यवर्ती व मोठा असा विभाग ब्रिटिश सरकारच्या पोस्ट व तारखात्यानें व्यापला होता. त्यांत जुन्या काळच्या घुंगुरवाल्या व्हिलेज पोस्टमनपासून टपाल नेणाऱ्या विमानापर्यंत सर्व प्रगति क्रमानें दाखविली होती. पूर्वींच्या 'कडकट्ट' तारायंत्रापासून, आज हजारों मैलां-वरून येणारे विद्युत् संदेश स्वतः टाइप रायटरवर लिहून भेंडोळींच्या भेंडोळीं स्वाधीन करणाऱ्या यंत्रापर्यंत सर्व प्रकार दाखविले होते.

## दसऱ्याची स्वारी व दरबार

म्हैसुरांतील दसऱ्याची मिरवणूक सुप्रसिद्धच आहे. तशी आजकाल इतर कोणत्याहि दरबारांत पाहावयास सांपडत नाहीं. संस्थानचें चतुरंग सैन्य मागेपुढें चालवीत, अनेक प्रकारचीं वाद्यें वाजवीत, सोन्याच्या अंबारींतून प्रचंड हत्तीवरून सर्वांचे मुजरे घेत, महाराज सीमोल्लंघनाला जातात तो

देखावा कधींहि विसरण्यासारखा नाहीं. जाती-येती मिरवणूक चांगली तीन तास चालते. शेवटीं एका शामियान्यांत महाराज शमीपूजन करतात व नंतर घोड्यावर बसून आपणांपुढून जाणाऱ्या चतुरंग दलाचे मुजरे घेत घेत पाहाणी करतात. या मिरवणुकीचा समारंभ व शोभा प्रारंभीं उन्हामुळें जशी दिसते त्यापेक्षां परत येतांना ती अधिक चांगली दिसते; कारण सर्व वाटभर हजारों किंवा लाखों विजेचे दिवे इतका प्रकाश पाडीत असतात कीं, चार हातांवर पडलेली सुई-टांचणीहि साध्या डोळ्यांना दिसावी.

---

## लेखांक ३ रा

( केसरी—२३ नोव्हेंबर १९३७ )

दरबारची शोभाहि अशीच विलक्षण असते. दरबारी लोकांनीं माडीवरचें प्रचंड दालन भरून गेलेलें असतेंच, पण खालीं निदान पांचपन्नास हजार प्रेक्षक उभे असून त्यांच्या शेवटच्या रांगेपर्यंत दृष्टि पोंचत नाहीं. अगदीं ठराविक वेळीं महाराज प्रवेश करतात. प्रथम राजवाड्यांतला पुरोहित त्यांच्या हातून सुवर्ण सिंहासनाची यथाविधि पूजा करवितो आणि मग सिंहासनाला वंदन करून महाराज त्यावर आरूढ होतात. महाराज बसल्यावर सर्व दरबारी लोक त्यांना मुजरा करून आपापल्या मानाप्रमाणें बसतात. दरबारचा पोशाख नियमित असून त्यांत विजार-पाटलोण आणि कमरबंध हे अवश्य आहेत. मला कमरबंध बांधावा लागला नाहीं. पण उसनी विजार घेऊन ती मात्र चढवावी लागली ! प्रथम कांहीं वेळ खालीं चाललेल्या कुस्त्या महाराज पाहत असतात. नंतर गिरमिटानें तिमजल्यापर्यंत उंच चढविलेल्या एका मोठ्या लांकडी हौद्यांत बसलेले लष्करी बँडवाले व सनईवाले वाद्यें वाजवितात. शेवटीं दरबार संपण्याचे वेळीं सर्व दरबारी लोक महाराजांपुढून क्रमानें जाऊन, त्यांना वंदन करून, त्यांच्या हातून प्रसादाचें म्हणून एकेक फूल घेऊन आपापल्या जागीं येतात आणि मग आले त्या थाटानें महाराज परत जातात.

### साहेबांचा मुजरा

हा मोठा दरबार दोन दिवस होतो. यांत पहिल्या दिवशीं फक्त हिंदी दरबारी हजर असतात; दुसऱ्या दिवशीं त्यांच्याबरोबर युरोपियन दरबारी-

हि येतात आणि महाराजांना मुजरा करून जातात. पूर्वी दरबारांत युरोपियन लोकांना खुर्च्या देऊन हिंदी लोकांना मात्र खालीं गालिच्यावर बसवीत असत. पण आतां या दुसऱ्या दरबारांत युरोपियन लोकांबरोबर हिंदी लोकांचाहि मान राहावा म्हणून त्यांनाहि खुर्च्या देण्यांत येतात. पूर्वी दरबारांत रेसिडेंटाची एवढी मिजास असे कीं, दरबारांत प्रमुखस्थान महाराजांचें कीं रेसिडेंटाचें असा भ्रम पडे. पण आतां तें स्थान महाराजांना निःसंदिग्धपणें प्राप्त झालें असून, रेसिडेंट फक्त सिंहासनाशेजारीं एका स्वतंत्र खुर्चीवर बसतो, व तोहि जातांना महाराजांना प्रणाम करून जातो. महाराजांचा हा साधा सरळ हक्क प्रस्थापित करून घेण्याला स्वराज्याभिमानी अनेक दिवाणांना अनेक वर्षे झगडावें लागलें म्हणतात! रेसिडेंटाचें हें प्रस्थ इतकें माजण्याचें कारण हेंच कीं, एके काळीं सुमारें पन्नास वर्षेपर्यंत म्हैसुरांत कमिशनरी अंमल असून राजा सांदीकोपऱ्याला पडलेला असे.

## कांहीं विशेष गोष्टी

दरबारांत दोनतीन गोष्टी विशेष वाटल्या. पहिली ही कीं, सर्व दरबारभर म्हणजे सुमारें दीड तासपर्यंत हल्लींचे महाराज इतके निश्चल बसतात कीं, तो कोणी मनुष्य नसून पुतळाच आहे असें वाटतें! महाराज केव्हां तरी चुकून मान किंवा एखादा अवयव हालवितात कीं काय हें मुद्दाम टक लावून पाहाण्याचें मीं मनांत आणलें; पण शेवटीं माझीच मान ताटकळली आणि डोळे दुखूं लागले. पण प्रसादाचें फूल शेवटीं देण्याच्या वेळेशिवाय महाराजांचा एकहि शरीरावयव हाललासा मला दिसला नाहीं! दुसरी विशेष गोष्ट अशी-दरबारांत हजारों विजेचें दिवे लटकत असतां खालच्या मजल्यांत अनेक पेट्रोलचे जळते दिवे ठेवलेले होते. त्याचा हेतु बहुधा हा असावा कीं, न जाणो विजेनें मध्येंच दगा दिला तर तात्पुरत्या प्रकाशाची ताबडतोब सोय व्हावी. वीज ही पराक्रमी आणि दैदिप्यमान खरी! पण ती तितकीच लहरी असा शेरा तिच्यावर तज्ज्ञांचाहि पडतो, हाच ह्या पेट्रोल दिव्यांचा अर्थ नव्हे काय? तिसरी विशेष गोष्ट ही दिसली कीं, इतका विद्युत्प्रकाश दरबारच्या दिवाणखान्यांत तळपत असतां, तेथेंच मागच्या भिंतीशेजारीं पुरुषभर उंचीच्या दोन चांदीच्या मोठ्या समया उभ्या असून, त्यांत तूप घालून त्यांच्या दहाहि घरांतून कांकडेवजा वाती पेटवून ठेविल्या होत्या. याचाहि अर्थ उघड आहे. वीज दिव्य प्रकाशमान, परंतु तिजमध्यें पुण्यांश किंवा पावित्र्य नाहीं!

घरगुती देवघरांतून विजेचे दिवे असतांहि नंदादीप किंवा नीरांजनें लावतातच कीं नाहीं ?

चामुंडीचें देवस्थान शहराजवळ डोंगरावर असून या डोंगराच्या गळ्यांत रात्रीं विजेच्या दिव्यांच्या माळा झळकत असतात. ती शोभा चांगली दिसते. उलट रात्रींच्या वेळीं या डोंगरावरून खालीं शहराकडे पाहिलें म्हणजे वरचें तारांगण खालीं आलें असें क्षणभर वाटल्याशिवाय राहत नाहीं. चामुंडी पर्वतावरील रात्रीचा हा देखावा पाहणें हें थेट देवस्थानापर्यंत वर मोटार जाऊं शकते यामुळें सुलभ झालें आहे.

## म्हैसूर शहर

मुख्य राजवाडा अर्थातच प्रेक्षणीय आहे. पण माझ्या मतें चौसोपींतील लोखंडी खांब, कलाकुसरीनें शोभिवंत असले तरी, दालनाच्या उंचीच्या मानानें फारच लठ्ठ म्हणून बेढब दिसतात. बाकी सोन्यारुप्याचे आणि हस्तिदंती दरवाजे, राजभूषणाच्या वस्तु, रविवर्म्यांचीं अस्सल पौराणिक चित्रें इत्यादि फारच प्रेक्षणीय आहेत. वाडा जुन्या चौक पद्धतीचा बाहेरून तरी आहे. त्याचें अंतरंग कोणांस कधींच पाहावयास मिळत नाहीं. दुसऱ्या एका वाड्यांत चित्रकलेचें प्रदर्शन मांडलेलें आहे. त्यांत प्राचीनाप्रमाणें अर्वाचीन चित्रकलेचेहि नमुने आहेत. तिसरा एक राजवाडा चामुंडी पर्वतानजीक आहे. तो मात्र अगदीं साहेबी पद्धतीचा, म्हणजे भव्य स्वच्छ पण अगदीं निरलंकार असा आहे. तो बड्या साहेबलोकांकरितां बांधलेला असल्यामुळें त्यांच्याच अभिरुचीला अनुसरून असावा यांत नवल काय ?

असो. रचनेच्या दृष्टीनें म्हैसूर शहर हें अत्यंत सुंदर व स्वच्छ असें वाटलें. नव्या दिल्लीचें कांहीं साम्य येथें दिसलें. मात्र फरक हा कीं, नव्या दिल्लींतील चुन्यानें मढविलेल्या भुंड्या इमारती थडग्यासारख्या भेसूर दिसतात ! उलट म्हैसूर शहरांतील आंखणी पद्धतशीर असून रस्त्यावरील इमारतीहि शोभिवंत दिसतात. जिकडे पाहावें तिकडे झाडें किंवा झाडें म्हणण्यापेक्षां बगीचे ! आणि बगीच्यांतून मोठ्या टुमदार इमारती. म्हैसूरइतकें सुंदर शहर साऱ्या हिंदुस्थानांत नाहीं असें तज्ज्ञ म्हणतात व तें खरें असेलसें वाटतें.

## महाराज व दिवाण यांच्या मुलाखती

म्हैसूरच्या मुक्कामांत दिवाण सर मिरझा इस्माईल यांची दोनदां आणि स्वतः महाराजांची एकदां अशा माझ्या मुलाखती झाल्या. या मुलाखतींत

संस्थानी प्रजेला राजकीय स्वराज्याचे अधिक हक्क दिले पाहिजेत. कमीजास्त फरक स्थानिक परिस्थितीप्रमाणें करावे, तथापि जबाबदारीच्या स्वराज्याचे अधिकार प्रजाजनांना देणें अपरिहार्य आहे, हें माझें मत मीं स्पष्टपणें बोलून दाखविलें. दिवाणसाहेबांशीं बोलतांना मीं सर्वस्वीं बरोबरीच्या नात्यानें युक्तिवाद केला. महाराजांशीं बोलतांना मात्र अर्थातच अधिक नम्रभावानें बोललों; तथापि आपलें तत्त्व उघडपणें मांडण्यास मीं कमी केलें नाहीं.

त्यांच्याविषयीं प्रजेचें प्रेम किती आहे हें चार लोकांकडून मला समजलें तसें सांगितलें. तथापि लोकशाहीचे अधिकार प्रजेला देणें आणि राज्यकारभाराची जबाबदारी त्यांच्यावर निदान कांहीं अंशानें टाकणें, अंतीं अपरिहार्य नव्हे तर एकंदरीनें उभयतांच्या हिताचें आहे ही गोष्ट माझ्या पद्धतीनें मीं त्यांच्या निदर्शनास आणली. जें अपरिहार्य तें आपण होऊन आधींच करावें म्हणजे त्याचे दोष आणि बाधा कमी होते असें मी बोललों. त्याच दिवशीं बंगलोर येथील रयत-प्रतिनिधी-सभेच्या पहिल्या बैठकींत दुपारीं कांहीं कॉंग्रेसवाले सभागृह सोडून निषेध प्रदर्शित करीत गेले, या गोष्टीचा उल्लेख आमच्या संभाषणांत निघाला. तेव्हां मी म्हणालों, "पण महाराज, ते लगेच परत आले तेव्हां 'महाराजकी जय' असें म्हणत आले!" ही गोष्ट मीं मुद्दाम त्यांच्या नजरेला आणली तेव्हां महाराजांना बरें वाटून ते किंचित् हसले. संस्थान व राजा राखूनच प्रजेला अधिक अधिकार मिळवावयाचे आहेत, यामुळें ती आकांक्षा दोषास्पद होत नाहीं असें दर्शविण्याचा माझा झोक होता हें महाराजांच्या लक्षांत आलें असावें.

प्रकृति नादुरुस्त असतांनाहि महाराज वरचेवर परदेशाला जाऊन लाखों रुपये खर्च करीत नाहींत. या गोष्टीबद्दल प्रजा महाराजांना धन्यवाद देते ही गोष्ट त्यांना मीं सांगितली, तेव्हां त्यांना बरें वाटून त्यांनीं असें दर्शविलें कीं, कोणा एखाद्या राजाच्याहि प्रकृतीला कोणत्याहि ऋतूंत सुख लागेल अशीं ठिकाणें हिंदुस्थानांतल्या हिंदुस्थानांतच कांहीं थोडीं नाहींत! आणि खरोखरच म्हैसूरचे महाराज येवढ्या उभ्या आयुष्यांत युरोपला एकदांच गेले आणि तेहि फारच थोडे दिवस. ही गोष्ट लक्षांत घेण्यासारखी नाहीं काय! याच्या उलट युरोप हें आपलें घर आणि स्वतःचें संस्थान ही मुक्कामाची एक वाटेंतली धर्मशाळा असें लेखून वागणारे आणि प्रतिवर्षी परदेशांत लाखों रुपये खर्चून तिकडील हॉटेलवाल्यांची व व्यापारी लोकांची धन करणारे, तसेंच

स्वतःचें संस्थान आणि ब्रिटिश सरकार यांच्यावर अविश्वास दाखवून परराष्ट्रीय बँकांतून आपल्या कोट्यवधि रुपयांच्या ठेवी ठेवणारे संस्थानिक या देशांत काय थोडे आहेत ?

## हा राजर्षि खरा

मी महाराजांशीं बोललों त्यांत स्वतःचें आणि तोंडदेखलेपणाचें असें कांहींच बोललों नाहीं. कारण लोकांत हिंडतांना, त्यांच्याशीं बोलतांना, महाराजांना कोणत्याहि गोष्टींत नांवें ठेवणारा असा एकहि मनुष्य मला आढळला नाहीं. आणि मी म्हणतों यांत अतिशयोक्तीचा एकहि शब्द नाहीं.

म्हैसूरचे महाराज हे मनानें सात्त्विक, धर्मबुद्धीनें नैष्ठिक, स्वभावानें परोपकारप्रिय असे तर आहेतच; परंतु नियमबद्ध अशा राजशासित राज्यपद्धतीचे ते भोक्ते आहेत. विशेषतः खासगी खर्चाच्या बाबतींत त्यांचें उदाहरण आमच्या इतर संस्थानिकांनीं अनुकरण करण्यासारखें आहे. कारण ते आपला खासगी खर्चाचा तनखा कधीं वाढवून मागत नाहींत. सरकारी पब्लिक वर्क्स खात्याच्या नांवें लिहून, त्याचा वाटेल तितका पैसा आपल्या खासगी सुखसोयींकडे खर्च करण्याची कित्येक संस्थानिकांची जी रीत आहे, ती ते अनुसरीत नाहींत. उलट मीं ऐकलें तें खरें असेल तर आपल्या खासगी तैनातीचे जमाखर्च ते, त्याबद्दल आपण खर्च देऊन, स्वतंत्र सरकारी हिशेबनिसांकडून तपासून घेतात. तसेंच कित्येक आवडत्या सार्वजनिक बागा व रम्य स्थळें यांची शोभा राखणें व वाढविणें या कामीं ते सरकारी पैसा खर्च न करतां स्वतःचा करतात. पदरच्या नोकरांना ते फार सदयतेनें वागवितात. ते धार्मिक वृत्तीचे असून स्वतः पोथीपुस्तकें वाचतात, देवदर्शन घेतात, देवस्थानें यथाविधि चालवितात. श्रृंगेरीच्या मठसंस्थेकडे ते आदरबुद्धीनें पाहतात. तेथील एका पंडिताची नेमणूक आपणाजवळ करून त्याच्याशीं परवां ते पंडित निवर्तेपर्यंत त्यांनीं धर्मचर्चा व तत्त्वचर्चा करण्याचा परिपाठ ठेवला होता. या सर्व गोष्टी पाहून त्यांना राजर्षि या नांवानें प्रजा नेहमीं उल्लेखिते. त्यांच्या वैराग्याला घरगुती इतरहि कांहीं कारणें आहेत असें म्हणतात. पण 'जगीं सर्व सुखी असा कोण आहे ? विचारी मना तूंच शोधूनि पाहे !' हें समर्थ रामदासांचें वचन घेऊनच त्या गोष्टीचा निर्वाह करावा लागतो.

## इतर सार्वजनिक कामें

असो. म्हैसूर येथील मुक्कामांत सार्वजनिक स्वरूपाचीं अशीं दोन तीन कामें मीं केलीं. पैकीं एक म्हणजे म्हैसूर विमा कंपनीच्या संमेलनाचें अध्यक्षपद स्वीकारून भाषण केलें. स्वतः म्हैसूर संस्थान सरकारनेंच एक विमाखातें चालविलेलें असून त्याच्यामार्फत प्रत्येक सरकारी नोकराचा विमा उतरविला जातो. नोकराकडून पगाराचा कांहीं ठराविक अंश घेतला जाऊन त्यांत सरकार स्वतःची म्हणून तितकीच भर घालतें. यामुळें नोकरी सोडून जातांना पेन्शनीबरोबर त्याला एखाद्या चांगल्या प्रॉव्हिडंट फंडाच्या पद्धतीनें बरीच रोख रक्कम मिळते. शिवाय अकालीं मृत्यु आल्यास विमानपद्धतीप्रमाणें भर रक्कमहि मिळते. सरकारी नोकरांच्याप्रमाणें खासगी लोकांच्या सोयींकरितां सरकार-विमाखात्याची एक शाखा उघडलेली असून तिचें काम सर्वसामान्य विमाकंपन्यांप्रमाणें चालतें. त्यांत मुख्य फायदा हा कीं, सरकारच विमेदाराला जामीन मिळाल्यामुळें विमाकंपनी बुडण्याची भीति राहत नाहीं. उलट विमाखात्याच्या फंडाचा उपयोग व्याजाऊ कर्जाच्या रूपानें सरकारला उत्पादक धंदे व कारखाने काढण्याला होतो.

दुसरी सार्वजनिक स्वरूपाची गोष्ट मीं केली ती म्हैसूर येथील 'ब्रॉडकास्टिंग' स्टेशनमध्यें 'लोकशाहीच्या कार्यांत विनोदाचें स्थान व उपयोग' या विषयावर वीस मिनिटांचें भाषण केलें. तें 'मराठा' पत्रांत छापलें आहे. या ब्रॉडकास्टिंग स्टेशनला हिंदुस्थान सरकारकडून विशेष प्रयत्नानें परवानगी मिळाली आहे. त्याला 'विश्ववाणी' हें यथार्थ नांव दिलेलें असून, त्याचे चालक डॉ. गोपाळस्वामी हे मोठे कल्पक शास्त्रज्ञ आहेत. पण भौतिक शास्त्रांप्रमाणें त्यांची गति मानसशास्त्रांतहि आहे. म्हैसूर विद्यापीठांत मानसशास्त्राचे ते शिक्षक असून, त्यांनीं जर्मनी व अमेरिका येथील पद्धतीला अनुसरून मानसशास्त्राचे प्रत्यक्ष प्रयोग चालविले आहेत. त्यांत 'लहान मुलांचें मानस' याविषयींचे प्रयोग विशेष असतात.

असो. अशा रीतीनें म्हैसुरांतील गर्दीचा कार्यक्रम आटोपून आणि त्यांतल्यांत्यांत म्हैसूर विद्यापीठ व ग्रंथालय हीं पाहून घेऊन ता. १८ आक्टोबर रोजीं मी म्हैसूर शहर सोडून बाहेरचीं ठिकाणें पाहावयास निघालों.

---

## लेखांक ४ था

(केसरी—२६ नोव्हेंबर १९३७)

म्हैसूर सोडण्यापूर्वीं म्हैसुरालगत असणारीं कांहीं प्रेक्षणीय स्थळें पाहून घेतलीं. कारण एकदां म्हैसूर सोडल्यावर फिरून तेथें परत न येतां बाहेरच कोठें तरी आगगाडीच्या रस्त्याला जाऊन मिळावयाचें होतें. प्रथम कृष्णराजसागर हा प्रचंड तलाव, त्यावरील बंधारा आणि त्याच्या खालचीं वृंदावन बागेंतील चित्राविचित्र कारंजीं पाहून घेतलीं. हा तलाव कावेरी नदीवर, सुमारें एक-सव्वा मैल लांब व शंभर फूट उंच बांध घालून, पाणी अडवून तयार केला आहे. या तलावाचा मुख्य उपयोग शेतकी-बागायतीला होत असून, नेहमींच्या पद्धतीनें दोन बाजूंनीं कालवे काढून शेतकऱ्यांना पाणी पुरविण्यांत आलें आहे. या तलावाची मूळ कल्पना सर विश्वेश्वर अय्या यांच्या दिवाणगिरीपूर्वीं निघाली होती. परंतु त्यांनीं ती नेटाला लावून आग्रह धरून सिद्धीस नेली. बांधाचें काम अतिशय मजबूत व त्यावर दोहों अंगें शोभिवंत दगडाच्या भिंती बांधून मधून मोटार जाण्यासारखा सुरक्षित रस्ता केला आहे. धरणाजवळ पाण्याची खोली सुमारें सव्वाशें फूट इतकी असून प्रत्यक्ष पाण्यानें व्यापिलेलें क्षेत्र पन्नास चौरस मैलांइतकें आहे. तलावांत सांठविलेलें पाणी अठ्ठेचाळीस हजार दशलक्ष घनफूट आहे; ज्याला गणित येत असेल त्यानें त्याची कल्पना करावी! त्यांतून पाणी सोडण्याची व्यवस्था आपोआप खालीं-वर होणाऱ्या लोखंडी दरवाजांनीं केलेली आहे. भाटघर किंवा खडकवासला येथें हीच व्यवस्था आढळून येते. अशा प्रकारचा जगांतला हा तिसऱ्या नंबरचा तलाव आहे असें म्हणतात.

### कृष्णराजसागरची शोभा

हा तलाव पहावयाचा तर तो दिवसा व रात्रीं अशा दोन्ही वेळीं पाहिला पाहिजे. कारण दिवसाची शोभा वेगळी आणि रात्रीची वेगळी. दिवसाची शोभा म्हणजे चोहोंबाजूला पसरलेलें समुद्रप्राय पाणी आणि सभोंवतालचें सृष्टिसौंदर्य. रात्रीं यांतील कांहींच दिसत नाहीं. पण या वेळीं दिसते ती शोभा मात्र कल्पनातीत आहे. पहिली शोभा सृष्टिकृत तर दुसरी मनुष्य-

कृत. ही दुसरी शोभा पाण्याचीं कारंजीं पाण्याच्या वेगवेगळ्या आकृति आणि या सर्वांवर व सर्वांतून पसरविलेला विद्युत् प्रकाश यामुळें निर्माण झालेली आहे. बंधाऱ्याच्या माथ्यापासून पाण्याच्या सपाटीपर्यंत एकाखालीं एक असे माचीचे भाग पण प्रत्येक आपापल्यापुरता सपाट असे केलेले आहेत. आणि मोठमोठ्या लोखंडी नळांतून व नळ्यांतून तलावाचें पाणी वरपासून खालपर्यंत सर्वत्र खेळविलेलें असून पाणी आणि वीज यांचें अद्भुत दर्शन असें मधुर मीलन केलेलें आहे.

वाहत्या पाण्यावर प्रकाश पाडल्यानें काय मौज दिसत असेल याची कल्पना पुण्यांत शनवारवाड्यामध्यें पुराणवस्तुखात्यानें उकरून काढलेल्या एका विहिरीवरून किंचित् येण्यासारखी आहे. या विहिरींत एकाखालीं एक असे कोनाडे असून त्याच्या पुढून पाण्याचा प्रवाह पडावा आणि कोनाड्यांत रंगीबेरंगी दिवे ठेवावे अशी योजना आहे. पण या विहिरींतील ही योजना वृंदावन बागेंतील योजनेपुढें पोरखेळ वाटतो. पाणी व प्रकाश यांचा मिलाफ केला असतां शोभा कशी निर्माण होईल याचा एक लहानसा वस्तुपाठ शनिवारवाड्यांत आहे इतकेंच. परंतु सिंहगडच्या मानानें दिवाळींत एखाद्या मुलानें बांधलेला मातीचा किल्ला जसा हसूं आणतो ( मुलांविषयींच्या कौतुकामुळें त्याला हास्यास्पद म्हणवत नाहीं ) त्याप्रमाणें म्हैसुर-वृंदावन बागेंतील देखाव्यापुढें शनिवारवाड्याच्या विहिरींतील चमत्कार क्षुद्र ठरतो. मात्र कल्पना एकच. आणि ती मोंगलापासून घेतलेली असावी असें म्हणतात. तक्षकाच्या मयसभेंत पांडवकाळीं काय असेल हें मात्र सांगवत नाहीं.

## वृंदावन बगीचा

हा वृंदावन बगीचा दिवसा कोणी पाहिला तर त्याला बगीचा असेंहि कोणी म्हणणार नाहीं. कारण फुलझाडें आहेत तीं फारतर हातभर उंच आहेत. मात्र प्रत्येक ताटवा वेगवेगळ्या रंगांच्या फुलांचा केलेला आहे. आणि रात्रीं या ताटव्यांजवळ उडणाऱ्या कारंज्यांतून ज्या रंगाचा प्रकाश उडवावयाचा त्याच रंगाचीं फुलें शेजारच्या ताटव्यांत उमटलेलीं दिसतात. कारंजांच्या रचनेंत बहुधा कोणतीहि आकृति वगळलेली नाहीं. पुष्कळ ठिकाणीं अगदीं समोरासमोर पाण्याच्या नळ्या अशा बसविलेल्या आहेत कीं, त्यांतून जोरानें बाहेर पडणाऱ्या पाण्याच्या भरीव धारा एकमेकांचा छेद करतात. आणि

त्यामुळें वरच्यावर पाण्याचीं व प्रकाशाचीं सहस्रधारी कारंजीं आपोआप निर्माण होतात. विजेच्या दिव्यांच्या कमानी, विजेच्या दिव्यांचे मंडप, सर्व कांहीं जलमय आणि विद्युत्‌मय करून सोडलेलें आहे. पाण्याचा जोर इतका आहे कीं, एके ठिकाणीं उडणारें कारंजें बंधाऱ्यापेक्षांहि उंच उडतें असें म्हणतात ! हा तलाव व ही शोभा निर्माण करून देण्याची कृपा कावेरी नदीनें केली. या कृतज्ञताबुद्धीनें बागेच्या बाजूला बंधाऱ्याच्या निम्या उंचीवर एक प्रशस्त कोनाडा करून त्यांत कावेरी देवीची मूर्ति स्थापिलेली आहे. आणि तिची अखंड पूजा विद्युद्दीपांच्या पुष्पांनीं होत राहील अशी व्यवस्था केली आहे. म्हैसुरांत कोठेंहि गेलें, पाहिलें, तरी ही धार्मिक भावना प्रतीत होते. कारण म्हैसुरांतील बँकेच्या दरवाजावर अशीच लक्ष्मीची मूर्ति बसविलेली आहे. असा देवतापूजकभाव इतर कोठें आढळणार नाहीं.

असो. वृंदावन बगीचा व कारंजीं यांच्याविषयीं तुमचा अभिप्राय लिहून द्या असें तेथील मुख्य इंजिनिअर अधिकाऱ्यानें मला सांगितलें तेव्हां तो मीं एक दोन वाक्यांत लिहून दिला तो असा:—“ येथें प्रचंड राक्षस आणि खेळकर वनदेवता हातांत हात घालून आनंदानें क्रीडा करीत आहेत. आणि हा देखावा पाहिल्याशिवाय ज्याला मरण येईल तो अभागी समजावा.” वर्णन करण्याला मति कुंठित होते इतकाच त्याचा अर्थ.

येथें कावेरीवर धरण बांधून त्या पाण्याचा उपयोग शेती-बागायतीकडे करून देण्याची कल्पना अगदीं नवीन नसून ती खुद्द टिपूच्या वेळीं निघाल्याचा प्रत्यक्ष पुरावा हल्लींच्या धरणाचें काम सुरू असतांच मिळाला. हा पुरावा म्हणजे एक सपाट चौरस शिळा असून तिच्यावर उर्दू लिपींत एक लेख खोदलेला आहे. त्या लेखावरून टिपू सुलतानानें याच जागीं धरण बांधण्याचा उपक्रम १७९२ सालीं केला होता असें दिसतें. लेखांत टिपू म्हणतो— “ मीं हें धरण बांधण्याचें काम सुरू केलें आहे खरें. पण ईश्वर तें केव्हां पुरें करवील तें करो.” विनयशीलता हें पुष्कळ वेळां अहंकाराचें भाषांतर असतें. आणि या वेळीं टिपूची सद्दी इतकी जोरांत होती कीं, बंधाऱ्याचें काम आपणच पुरें करूं अशी आशा त्याला वाटत असावी. पण पुढें अवघ्या सात वर्षांत त्याचा उच्छेद झाला आणि धरणाचें काम अपुरें राहिलें हें मात्र खरें. या तलावाच्या कालव्याचें पाणी घेऊन जो कोणी शेती-बागायती करील त्याला सरकार-देण्यासंबंधानें टिपूनें कांहीं विशेष सवलत ठेवली होती. हल्लीं म्हैसूर

सरकारनें टिपूची धरणाची कल्पना पुरी पाडली. मात्र सवलतीची कल्पना पुरी पाडली नसावी असें वाटतें.

## टिपूचे भग्नमनोरथ

वर लिहिल्याप्रमाणें मीं हा तलाव आदले दिवशीं रात्रीं पाहून घेतला होताच पण फिरून दुसरे दिवशीं श्रीरंगपट्टणाला जातांना मुद्दाम वांकडी वाट करून या बंधाऱ्यावरून गेलों. श्रीरंगपट्टण येथेंहि असाच टिपूच्या भग्नमनोरथाचा इतिहास, मात्र तो फारच मोठ्या प्रमाणावर पहावयास सांपडला. येथें कावेरीचे तीन फांटे होऊन त्यांत मोठें बेट निघालें आहे. तीच मोठ्या मजबुतीची जागा असें ठरवून टिपूनें सभोंवार खंदकामागें खंदक व तटामागें तट बांधून किल्ला तयार केला आणि तो स्वतःच तेथें राहूं लागल्यामुळें ती राजधानी बनली. टिपूची खूण म्हैसुरांतहि आहे पण तेथें असलेला जुना किल्ला पाडून टाकल्याची आहे. श्रीरंगपट्टणास ती खूण किल्ला बांधल्याची असून त्यांत नदीकांठीं असलेला दर्यामहाल आणि हैदर, टिपू व टिपूची आई या तिघांच्या एकत्र असलेल्या कबरी हीं ठिकाणें पाहण्यासारखीं आहेत. अतज्ज्ञ माणसाला किल्ल्यांत उभे राहिलें असतां या किल्ल्याचा भंग करून शत्रू आंत प्रवेश कसा करील याचें आश्चर्य वाटतें. पण मराठे व इंग्रज या दोघांनीं ती गोष्ट केली खरी. टिपू वरचढ होता तेव्हां त्यानें इंग्रजांचा एकदोन ठिकाणीं पराभव करून कांहीं गोरे कैदी श्रीरंगपट्टणच्या किल्ल्यांतील एका तळघरांत कित्येक वर्षें ठेविले होते. हें तळघर नदी-कांठीं असून कैदी ठेविण्याकरितांच केलेलें असावें असें दिसतें. कारण कैद्यांच्या कमरेच्या किंवा पायांतल्या साखळ्या बांधून ठेवण्याची व्यवस्था कमरेइतक्या उंचीवर दगड भिंतींत घालून त्यांना भोकें पाडून केलेली आढळते. पण त्यांतलाच एक कैदी घरभेद्या ठरला. कारण त्यानेंच आपल्या स्थानिक माहितीवरून किल्ल्याचा तट कोठें ढासळतां येईल व किल्ला सर कसा करतां येईल हें सांगितलें. हें ठिकाण म्हणजे ज्या एकाच जागीं दगडाऐवजीं विटांचा तट होता तें होय. तोफांचा भडिमार करण्याला ती जागा सोयीची हें उघड, पण नदी ओलांडून तटापर्यंत येऊन आंत शिरणें ही गोष्ट हल्ला करणाऱ्या शत्रूला किती अवघड झाली असेल याची कोणासहि सहज कल्पना करतां येईल.

श्रीरंगपट्टणच्या बेटांत हिंदु राजानें लष्करीदृष्ट्या संरक्षणाची काय सोय केली होती हें कळत नाहीं. परंतु तेथें असलेलें एक गोपुरमंडित देवालय

आणि स्नानाकरितां बांधलेले घाट हे त्याच्या धर्मभावनेची तरी साक्ष पटवितात. टिपूच्या धर्मवेडाचा आपण जो लौकिक ऐकतों त्यावरून हें देवालय त्यानें कसें उध्वस्त केलें नाहीं आणि तेथील पुजारी हे सुंता करून काजी कसे बनविले नाहींत याचें सहजच आश्चर्य वाटतें. पण खरी गोष्ट म्हणून अशी सांगतात कीं, हैदर व टिपू हे दोघेहि म्हैसूरच्या राज्यांतील हिंदूसंबंधीं अत्यंत सहिष्णु होते. इतकेंच नव्हे तर राज्यांतील अनेक देवस्थानांस त्या दोघांनीं कायमच्या नेमणुका करून दिल्या आणि हैदर तर या देवांना नवस करीत असे असें म्हणतात. टिपूच्या धर्मवेडाचा लौकिक आहे तो मालनाड म्हणजे मलबार प्रांतांत त्यानें केलेल्या अत्याचारामुळेंच मुख्यतः असावा.

हैदर व टिपू या दोघांची मिळून कारकीर्द अवघ्या चाळीस वर्षांची झाली. परंतु तेवढ्या अवधींत त्यांनीं किती धुमाकूळ घातला हें इतिहासवाचकांना माहीतच आहे. पश्चिमेस मंगलोर व कोचीन, पूर्वेस मद्रास आणि उत्तरेस घटप्रभा, मलप्रभा येथपर्यंत टिपूचीं निशाणें फडकलीं आणि इंग्रज व मराठे या दोघांनाहि टिपू पुरून उरणार अशी भीति एक वेळ वाटूं लागली. महाराष्ट्रांतील पटवर्धन सरदारांच्या जहागिरी मुख्यतः टिपूची नाकेबंदी करण्याकरितां दिलेल्या होत्या आणि दुसऱ्या मोहिमेंत हरिपंत फडके व शेवटच्या मोहिमेंत पटवर्धन सरदार हे इंग्रज सरदारांच्या बरोबरीनें टिपूशीं लढत होते. श्रीरंगपट्टणांत मी उभा असतां लॉर्ड कॉर्नवालिस आणि परशुरामभाऊ पटवर्धन हे बरोबरीचे सरदार म्हणून एकमेकांस कसे भेटत असतील, चहापान करीत असतील ( मात्र एका टेबलावर नव्हे ) मेजवान्या जाफती देत घेत असतील याचें चित्र माझ्या डोळ्यांपुढें उभें राहिलें.

## शिवसमुद्रम्‌चा धबधबा

श्रीरंगपट्टण पाहून आल्यावर दुसरे दिवशीं मी शिवसमुद्रम् येथील धबधबा आणि विजेचा कारखाना पहावयास गेलों. येथेंहि कावेरी नदीचीच कृपा फलद्रूप झालेली आहे. पण ती तिच्या अधःपतनानें! पाण्याच्या शक्तीनें वीज उत्पन्न करण्याची कला टिपूच्या वेळीं नव्हती. म्हणून त्यानें फक्त बंधारा बांधण्यापुरताच कावेरीचा उपयोग केला. आणि वाढत्या भौतिक ज्ञानामुळें जलशक्तीनें वीज उत्पन्न करणें हें म्हैसूरचे दिवाण शेषाद्रि अय्यर यांना माहीत होतें. तरी कन्नम्मडी येथें धरण बांधून सांचविलेल्या जलशक्तीनें तें

काम करतां येण्यासारखें नव्हतें. कन्नम्मडी येथेंहि लहानसा कृत्रिम धबधबा करून पुढें केव्हां तरी येथें वीज उत्पन्न करतीलहि. परंतु तिचा पुरवठा भरपूर होण्याइतकी जलशक्ति येथें मिळण्यासारखी नाहीं. शिवसमुद्रम् येथें कावेरीचा प्रवाह शेंकडों फुटांवरून खालीं कोसळत असल्यामुळें ती गोष्ट तेथें सुसाध्य ठरली. येथील प्रचंड दरी सृष्टिशोभेच्या दृष्टीनें फारच शोभेची आहे. अडचणींतून मार्ग काढण्याला नदीच्या प्रवाहाची उपमा देतात तिची प्रतीति येथें आढळते. कारण येथें एके ठिकाणीं ही नदी संसारांत कोंडमारा झालेल्या निराश व बेफाम स्त्रीप्रमाणें जिवावर उदार होऊन कड्याखालीं उडी घेते असें दिसतें. तर लगेच पलीकडे डोंगराच्या निरुंद फटींतून साधेल तशीं वळणें घेऊन ती बाहेर पडते असेंहि दिसतें. पण नदीशीं स्पर्धा करावी अशा रीतीनें कल्पक इंजीनिअर लोकांनीं येथें आपलेंहि कर्तृत्व दाखविलें आहे. कारण पाणी अडवून तें निरनिराळ्या नळांतून खालीं सोडून त्यांतच त्यांजकडून आपलीं टरबाइनचीं चक्रें फिरवून घेण्याचा जो अट्टाहास केला आहे तो डोळे फिरण्यासारखा प्रचंड आहे. येथें अलीकडे नवीन बांधलेलें पॉवर-हाउस एखाद्या टेकडीइतकें उंच वाटतें आणि खालीं जातांना लोखंडी दोरावर बसविलेल्या लॅंडिसांत पाय ठेवतांना घरांतील कपाटांत ठेविलेल्या आयुष्याच्या विमा पॉलिसीची आठवण झाल्याशिवाय राहत नाहीं. दरबारच्या कृपेनें मला येथील वीज उत्पन्न करण्याचें सर्व काम व्यवस्थितपणें पहावयास सांपडलें. या कारखान्यांत ठिकठिकाणीं लाविलेल्या धोक्याच्या सूचना पाहून आंत मोकळ्या मनानें काम करणारीं माणसें स्वर्गांतील देवांकडून आणलेलीं अमरत्वाचीं कवचें अंगावर घालून वावरत असलीं पाहिजेत असेंच मला क्षणभर वाटलें. येथें वीज उत्पन्न करण्याला खर्च जितका मोठा झाला त्याच मानानें त्या विजेमुळें होणारें म्हैसूर सरकारचें उत्पन्नहि मोठेंच आहे. कारण येथें निर्माण झालेली वीज पांचपन्नास मैलांवर असलेल्या सोन्याच्या खाणींचें सर्व काम करते, इतकेंच नव्हे तर राजधानीचें शहर व त्यांबरोबर शेंकडों मैलांचें इतर क्षेत्र यांमध्यें याच विजेचा भरपूर पुरवठा होऊं शकतो.

## लेखांक ५ वा

( केसरी—३० नोव्हेंबर ३७ )

म्हैसूर सोडल्यावर मी प्रथम हसन शहरावरून मुंडाजे येथें गेलों. मला नेण्याकरितां तेथील पुढारी श्री. माधवराव भिडे, प्लँटर, हे मुद्दाम आले होते. हसन जिल्हा हा हवापाणी व सृष्टिसौंदर्य यांच्या दृष्टीनें म्हैसूर इलाख्यामध्यें सर्वांत उत्तम आहे असें म्हणतात. दोन प्रहरीं सकलेशपूर येथील सरकारी बंगल्यांत विश्रांति घेतली. या बंगल्यावरून आठवण झाली म्हणून सांगावेंसें वाटतें कीं, म्हैसूर इलाख्यांत जिकडे तिकडे अशीं विश्रांति-गृहें अधिकाऱ्यांच्या व पाहुण्यांच्या सोयीकरितां बांधलेलीं आहेत. त्यांचा टी. बी. या नांवानें सरसहा उल्लेख केला जातो. म्हैसुरांत सर्वत्र टी. बी. चा फैलाव आहे असें प्रथम मीं ऐकलें तेव्हां टी. बी. म्हणजे ट्युबरक्युलॉसिस ( क्षयरोग ) असें समजून मीं आश्चर्य प्रकट केलें. तेव्हां टी. बी. म्हणजे क्षयरोग नसून " ट्रॅव्हलर्स बंगलो " या शब्दांचा संक्षेप आहे असें सांगण्यांत आलें. तेव्हां माझ्या उतावळ्या प्रश्नाचें मला हसूं आलें.

मुंडाजे येथें व आसपासच्या आणखी पांचचार गांवांत चित्पावन ब्राह्मणांची बरीच वसाहत आहे. अशा दूरच्या अश्रुत भागामध्यें एकजात चित्पावनांचीं अनेक परिचित आडनांवें ऐकून मला विस्मय वाटला. पूर्वीं गी. वा. भिडेशास्त्री व रा. रा. गो. भिडे हे तिकडे जाऊन आले तेव्हां त्यांच्या तोंडून तिकडील संकीर्ण हकीकत ऐकली त्यावरून पूर्वीं एकदां मला स्वप्न पडलें त्याची आठवण होते. स्वप्न असें कीं, " गुडघ्यापर्यंत पंचा नेसलेला, डोक्याला उपरणें बांधलेला, कानांत रुद्राक्ष घातलेला एक कोंकण्या भटजी हत्तीवर बसून मला नेण्याकरितां आला. त्यावर बसून आम्ही दोघेजण जंगलांतून जातांना हातानें बसल्याजागीं नारळ व हिरव्या सुपाऱ्यांचे घोंस तोडीत होतों आणि तो भटजी मला अरे जा रे म्हणत होता."

हें सर्व स्वप्न मला प्रत्यक्षांत अनुभवावयाला येथें सांपडलें नाहीं तरी त्याचा प्रत्येक भाग कांहीं अंशीं खरा होता. कारण या चित्पावन वसाहतीच्या मालकीच्या कांहीं भागांत क्वचित् रानटी हत्ती आढळतात व वर सांगितलेले रा. भिडे यांनीं स्वतः एकदां एका हत्तीची शिकारहि केली होती. इकडे नारळीचीं झाडें त्या मानानें थोडीं. पण शाहाळीं खाण्याचा परिपाठ

पुष्कळ आहे. मात्र मुख्य बागबगीचे पोफळीचेच आहेत. हे चित्पावन लोक कोंकणी पद्धतीप्रमाणें हवेच्या उष्णतेमुळें फारच थोडे कपडे अंगावर घालतात. उत्तर कोंकणाप्रमाणें त्यांच्यामध्यें अजून पोशाखाचा नटवेपणा शिरलेला नाहीं. दक्षिण हिंदुस्थानांतील रुद्राक्षाचीं कर्णकुंडलें पुरुषांनीं आणि चमकीचे खडे नाकांत घालण्याची चाल स्त्रियांनीं उचलली आहे.

### चित्पावन ज्ञातीच्या खुणा

येथें चहाचा प्रसार अद्याप झाला नसून लोक सर्रास कॉफी पितात. चित्पावन ज्ञातीच्या खुणा यांच्या चेहऱ्यावर अजून आहेत. पण भाषा मात्र तिहेरी मिश्र झाली आहे. माझ्यासारख्या पुणेंकरांशीं बोलतांना ते व्याकरण-शुद्ध बोलण्याचा प्रयत्न करतात. त्यामुळें त्यांची भाषा मिशनरी थाटाची वाटते. स्वतः आपापसांत बोलतांना ते मराठीच बोलतात, पण त्यांत पुणेरी व्याकरण सुटतें आणि शब्दविभागावर ते अशा निराळ्या पद्धतीनें जोर देतात कीं, शब्दांचें स्वरूपच पालटून जातें. इतकें कीं, एक हातावर बसून बोलणारे हे चित्पावन मराठी बोलत नसून दुसरीच एखादी भाषा बोलत असावे असा भास होतो, आणि त्यांनीं आपणांला समक्ष शिव्या दिल्या तरी त्या उमगूं नयेत अशी स्थिति होते. इतरांशीं बोलतांना तर हे लोक कानडी व तुळू यांच्या मिश्रणानें बनलेली भाषा बोलतात. प्रतिष्ठितांशीं बोलतांना ते अरे जा रे शब्द वापरतील, याचें कारण अरे तुरे या शब्दांनाच बहुमानास्पदता आली आहे म्हणा किंवा साम्यवादाचें निदान एक तत्त्व तिकडे प्रस्थापित झालें आहे म्हणा. आमच्या कोंकणांतहि हा प्रघात बराच आहे असें देशावरून कोंकणांत गेलेल्या माणसाला प्रायः आढळतेंच.

### ब्राह्मण भ्रष्ट होतो

चित्पावनांच्या या वसाहती मूळ तिकडे केव्हां गेल्या याची त्यांना स्वतःला कांहींच माहिती नाहीं. कोणी म्हणतात, गोमंतकांतील धर्मच्छलामुळें ते खालीं सरकत सरकत येऊन हा जंगली भाग सुरक्षित पाहून तेथें राहिले किंवा कोणी म्हणतात नवीन वसाहत करविण्याची इच्छा धरणाऱ्या एखाद्या पाळे-गारानें त्यांना मोठमोठ्या जमीनविभागांच्या देणग्या देऊन त्यांना येथें स्थायिक केलें असावें. पण हीं सर्व कुटुंबें आज तीन-चारशें वर्षें येथेंच राहून शेतकी-बागायतीचा धंदा करून सुखवस्तु बनलेलीं आहेत येवढें खरें. त्यांतील शेतकीचा धंदा ते स्वतः करीत नाहींत. कारण त्यांच्या धर्मानें त्यांना असें

सांगितलें आहे कीं, नांगराला हात लावणारा ब्राह्मण भ्रष्ट, पतित होतो. नांगर चालल्यानें होणाऱ्या भातपिकावर मात्र नैवेद्य व वैश्वदेव करण्यास त्यांना हरकत वाटत नाहीं ! या समजुतीचा खुळेपणा नव्या युगांत त्यांचा त्यांना भासूं लागला आहे. मी त्यांना म्हणालों, " मी तुमच्यासारखाच अस्सल चित्पावन आहें. माझ्या वडिलांचे वडील व आईचे वडील मिळून दोन्ही घरचे आजे स्वतः हातानें नांगर धरीत व वजनासाठीं मी लहान मुलगा असतां त्या नांगरावर बसलों आहें. तेव्हां मी भ्रष्ट, पतित म्हणून मला तुम्हीं पंक्तीला बसवूं नये." तेव्हां ते म्हणाले, झालें तें होऊन गेलें आणि ही मंडळी आपल्या वार्षिक संमेलनांत नांगरावरील हा बहिष्कार काढून टाकण्याविषयीं सुधारकी ठराव अलीकडे करीत असतात.

चारशें वर्षांत कुटुंबांचा विस्तार झाला, पण जमीन व उत्पन्न तितकेंच राहिलें किंवा कांहीं अंशीं कमी होत चाललें आहे. यामुळें आतां बाहेर तोंड काढावें, परमुलुखांत जावें, शिक्षण घ्यावें हे विचार त्यांना सहजच ग्राह्य वाटूं लागले आहेत. मात्र त्यांनीं आपले आचारधर्म इतक्या आस्थेनें राखले आहेत कीं, त्यांच्या भाषेला किंचित् उजळा मिळतांच ते कोठल्याहि ब्राह्मणी समाजांत तेव्हांच समरस होऊन जातील. या भिडे घराण्यांतलाच एक गृहस्थ बी. एल्. होऊन मंगलोर येथें वकिली करीत आहे. स्वतः माधवराव भिडे हे ऑल इंडिया काँग्रेस कमिटीचे सभासद असून इंग्रजी भाषेचें त्यांचें ज्ञान वाखाणण्यासारखें आहे. मुंडाजे गांवांत एखादी खासगी मोटारहि आढळते. अशी सुधारणा क्रमानें होत आहे. इकडच्या महाराष्ट्रांतील समाजांत दळणवळणच नव्हे तर शरीरसंबंधहि घडावेत अशी त्यांना इच्छा असून ते तसा प्रयत्नहि करीत आहेत. म्हणून इकडील समाजानेंहि त्यांना या कामीं अवश्य साहाय्य करावें. कारण पुणें ते मुंडाजे हा प्रवास सुमारें तीस तासांचाच आहे.

मुंडाजे येथील माझ्या मुक्कामांत त्यांनीं आपलें संमेलन भरविलें होतें तेव्हां नव्या दृष्टीनें मला त्यांना काय सांगावयाचें तें सांगितलें. आणि मी त्यांच्या वसाहतीला भेट दिली याबद्दल त्यांना अतिशय आनंद झाला असें मला आढळून आलें. रा. माधवराव भिडे हे तर सुधारणावादी आहेतच. पण त्यांचे ६८ वर्षांचे वडील हेहि मनानें तरुण, उत्साही व प्रगतिप्रिय दिसले. या भिडे मंडळींनीं अलीकडे एक दहा हजार एकरांचें जंगल खरेदी केलें असून त्यांत ते नव्या पद्धतीनें लागवड करून पाहणार आहेत. 'दहा हजार एकर

जमीन' हे शब्द ऐकतांच इकडील लोकांना विशेषतः रत्नागिरी कोंकणांतील टीचभर खांचरांत वावरणाऱ्या लोकांना काय वाटेल याची कल्पना करावी. पण अस्सल जंगलांतील डोंगर पठारावरील जागेंत मेहनत मशागत करणें हें किती कठीण असतें याची कल्पना त्यांना आहेच.

## मंगलोर शहर

एका मुंडाजे गांवाशिवाय इतर वसाहतींना भेट देण्याला मला वेळ नव्हता म्हणून मीं फक्त मंगलोर शहर, पंचवीस कोसावरचें, पाहून घेतलें. मंगलोर शहर देखणें आहे. समुद्रकांठीं विटांच्या कारखान्यांतून धूर निघतो तो काळा खरा, पण सोन्याचा म्हणून पिवळाच. खालीं सपाटीला लहान टुमदार घरें. आणि सर्वांत एकच उंच जागा आहे ती मिशनरी कॉलेजाला लाभलेली आहे. कॉलेजांतील प्रार्थनामंदिरांत ख्रिस्तचरित्रवर्णनपर अनेक रंगीत चित्रें इटालियन चित्रकारांनीं काढलेलीं इतकीं सुंदर आहेत कीं, तेथून हलूं नये असें वाटतें. मंगलोरच्या विद्यार्थिसंघानें मला निमंत्रण केलें होतें म्हणून मैदानांतील एका जाहीर सभेंत मीं भाषण केलें व प्रश्नोत्तरें झालीं. आणि मुंडाजाला येऊन मी परतीच्या प्रवासाला लागलों.

## बेलूरचें देऊळ

मुंडाजे गांवापासून पांच मैलांवर घाटाला सुरुवात होते. तो सुमारें बारा-तेरा मैल लांब असून झाडीनें व्यापलेला आहे. या घाटाइतका मोठा घाट सह्याद्रींत कदाचित् कोठेंहि, निदान या भागांत तरी, दुसरा नाहीं. घाटाच्या मध्यभागीं म्हैसूर राज्याची हद्द लागते. घाटमाथ्यावर एक लहानसा उतारू बंगला आहे. तेथील हवा महाबळेश्वरासारखी असून, सर्व हिंदुस्थानांत अतिशय पाऊस पडण्याचें ठिकाण जें चेरापुंजी म्हणून आसामांत आहे त्याच्या खालोखाल येथें पाऊस पडतो. सरहद्दीवर कडूर जिल्हा कलेक्टरचे पर्सनल असिस्टंट, मामलेदार, फौजदार इत्यादि अधिकाऱ्यांनीं आमचें स्वागत केलें. तेथून बेलूरच्या डाकबंगल्यांत विश्रांति घेऊन बेलूरचें देऊळ पाहिलें. हसन जिल्ह्याचे डे. कमिशनर यांनीं स्वतः बरोबर हिंडून सर्व स्थळें दाखविलीं. तेथून जवळच दहा-बारा मैलांवर असलेलें हाळेबिड येथील देऊळ पाहण्यास गेलों. हें दुसरें देऊळ आकारानें बेलूरच्या देवळाहून मोठें आहे. पण बेलूर येथील दगडी चित्रांचें काम अधिक प्रेक्षणीय वाटलें. दोन्ही देवळें एकाच राज-वंशाच्या कारकीर्दींत, इतकेंच नव्हे तर एकाच कल्पनेनें आणि एकाच वर्गाच्या

कारागिरांकडून बांधलीं गेलीं असावीं असें उघड दिसतें. हाळेबिडचें देऊळ हें अधिक उंचावर असल्यानें शेजारचा तलाव वगैरे देखावा अधिक चांगला दिसतो. बेलूरचें देऊळ सपाट जमिनीवर प्राकारांत गाडलें गेलेलें आहे. यामुळें देवळांत जाईपर्यंत त्याची खरी शोभा दिसत नाहीं. संध्याकाळीं चिकमंगळूर येथें गेलों. हें कडूर जिल्ह्याचें मुख्य शहर आहे. जिल्हा कलेक्टर श्री. राघवेंद्रराव यांनीं आमचा फार चांगला पाहुणचार केला. संध्याकाळ झाली होती, तरी आम्ही जवळचा घाट चढून बाबाबुडनच्या अलीकडील डोंगरमाथ्यावरून सूर्यास्ताची शोभा डाव्या उजव्या बाजूकडील खोल दऱ्यांतली पाहिली. परत येतांना कॉफीचा एक हिंदी मळेवाला मोठा सधन आहे त्याचा बंगला अगदीं कॉफीच्या मळ्यांत बांधलेला आहे तो पाहिला. दुसरे दिवशीं सकाळीं शृंगेरीला गेलों आणि संध्याकाळीं पुढें भद्रावतीला पोंहोचलों.

भद्रावती येथील गेस्ट हाउस एखाद्या राजवाड्यासारखें वाटलें. त्याच रात्रीं कारखान्यांत जाऊन बीड तयार करण्याचें काम पाहिलें. एका राक्षसी भट्टीमध्यें बिडाचा कच्चा माल घालून रस तयार करून झाला म्हणजे त्याचीं दारें उघडतात. मग बांध फुटून पाण्याचा लोंढा वाहावा त्याप्रमाणें तो रस, खालीं तयार करून ठेविलेल्या पांच पंचवीस वाफ्यांतून, सोडून देतात. ही कृति बागेला पाणी लावण्यासारखी असते. म्हणजे सर्वांत खालचे वाफे आधीं भरून रस तुंबीत तुंबीत वरचे वाफे भरून घेतात. रस म्हटल्यामुळें पाण्याची कल्पना येते. पण तो खरोखरी डोळे दिपविण्यासारखा आगीचा लोळ असतो. आणि त्यांतून ठिणग्या उडत असतात. यामुळें तो जवळ उभे राहून पाहण्याची सोय नसते. हा सर्व देखावा रात्रीं पाहण्यांतच स्वारस्य असतें हें सांगावयास नकोच. दुसरे दिवशीं सकाळीं कारखान्यांतील पोलाद करण्याचें काम पाहिलें. येथील भट्टीचीं दारें उघडलीं म्हणजे आंतील रसाचा देखावा दिसतो तो अवर्णनीय आहे. नदीला पूर आला असतां खडकाळ जागेंत पाण्याचा जसा नाच चालतो असा तो रस नाचत होता व त्यावर जशा कांहीं लाटा उठत होत्या. या रसाकडे नुसत्या डोळ्यांनीं पाहिलें तर इजा व्हावयाची म्हणून निळ्या कांचेशिवाय त्याकडे पाहूं देत नाहींत. नुसत्या बिडाचा पिग आयर्नचा कारखाना फायदेशीर होईना म्हणून अलीकडे त्याला पोलाद करण्याची जोड दिली आहे. या जोडकारखान्यांत रेल्वेच्या रुळांसुद्धां सर्व प्रकारचा माल तयार होतो. हा कारखाना प्रचंड

खराच. परंतु त्याचा वडील भाऊ टाटांचा कारखाना मीं जमशेटपुरास पाहिला होता म्हणून याचें कौतुक इतकेंसें वाटलें नाहीं. असो.

दोनप्रहरीं बिरूर स्टेशनावरील सरकारी बंगल्यांत भोजन करून विश्रांति घेतली व आगगाडींत बसून रात्रीं हुबळीस पोंहोचलों. तेथील तीन दिवसांच्या मुक्कामांत, धारवाड, गदग, शिरहट्टी, लक्ष्मेश्वर, गुडगेरी व कुंदगोळ इतक्या गांवांना भेट दिली. शिरहट्टी येथें फक्त लायब्ररींत गांवच्या मंडळींच्या भेटी घेतल्या. पण कुंदगोळ येथें दोन तास मुक्काम पडल्यामुळें तेथें देवळांत व्याख्यानाचा कार्यक्रम करतां आला. त्यानंतर बेळगांव व सांगली येथें मिळून चार दिवस मुक्काम झाला. त्यांत कार्यक्रमांनीं अगदीं दमून गेलों. हुबळी ते सांगली या मुक्कामांत एक आठवडा घालवला तरी पुरला नाहीं. हा आठवडा इकडे न जातां तर तो म्हैसूर इलाख्यांतील उरलींसुरलीं ठिकाणें पाहून घाल-वितां आला असता. पण म्हैसूरला जातांना वाटेंत या सर्व ठिकाणच्या लोकांना मी वचनबद्ध होऊन राहिल्यानें माझा नाइलाज झाला. हुबळी ते सांगली या प्रवासांत प्रेक्षणीय स्थळें अशीं पाहण्याचीं कोणतींच नव्हतीं. म्हैसूरकडील स्थळांचें वर्णन खरोखर अधिक देण्यासारखें आहे. परंतु केसरी ऑफिसचे रा. वा. कृ. भावे व चि. य. न. केळकर यांनीं त्यासंबंधीं तीन चार वर्षांपूर्वी केसरींत भरपूर माहिती आणि तीहि अत्यंत चटकदार रीतीनें दिलेली असल्यामुळें पुनरुक्ति करून जागा अडवूं इच्छीत नाहीं. म्हणून पुढील लेखांत म्हैसूरसंबंधानें माझा काय ग्रह झाला हें सांगून ही लहानशी लेखमाला मी पुरी करणार आहें.

---

## लेखांक ६ वा

(केसरी—३ डिसेंबर १९३७)

म्हैसूर संस्थानसंबंधीं माझा जो ग्रह झाला तो तीन चार मुद्द्यांना धरून सांगतां येईल (१) म्हैसूरची नैसर्गिक संपत्ति, शोभा व कलाकौशल्य (२) त्या नैसर्गिक संपत्तीचा करण्यांत आलेला प्रत्यक्ष उपयोग (३) राज्य-व्यवस्था.

नैसर्गिक सौंदर्य व संपत्ति यासंबंधानें म्हैसूरइतका समृद्ध प्रांत माझ्या पाह-ण्यांत दुसरा आला नाहीं. मीं एके ठिकाणीं वाचल्याचें आठवतें कीं, दक्षिण

कर्नाटक हा हिंदुस्थानांत सर्वांच्या आधीं 'जन्मलेला' म्हणजे 'वर आलेला' प्रदेश आहे. त्यामुळें असो किंवा इतर कारणांनीं असो, भूप्रदेशावरील सौंदर्य आणि भूमीच्या उदरांतील संपत्ति हीं म्हैसूरला विशेष लाभलेलीं आहेत.

खानदेश किंवा वऱ्हाड प्रांत सुपीक आहे, परंतु त्यांत वनश्री अशी कांहीं नाहीं. पाहणाराला ते प्रदेश रूक्ष वाटतात. पण म्हैसुराची ठेवण सर्वत्र उच्च-नीच आहे, आणि हे दोनहि भाग झाडींनें मढविलेले दिसतात. प्रदेशाच्या उंचसखलपणामुळें कांहीं सृष्टिनिर्मित तर कांहीं प्रयत्नानें बनविलेलीं तळीं आणि तींहि मोठमोठालीं अशीं जागजागीं आढळतात. म्हैसूर मुलखांतील दर दोन चौरस मैलाला दोन किंवा तीन तळीं पडतील असा अंदाज आहे. या तळ्यांचा उपयोग पाणीपुरवठ्याप्रमाणें शेतकी बागायतीलाहि होतो. आणि मधूनमधून जे मैदानी व रूक्ष असे भाग उरलेले होते, त्यांतून अलीकडे कालवे गेल्यामुळें चोहोंबाजूस नजर पोंचेपर्यंत भातशेतीची लागवड पाहून डोळ्यांना आनंद होतो.

मीं म्हैसूर संस्थानांत सुमारें पांच-सहाशें मैल मोटारीनें प्रवास केला. त्यांत जंगली रस्ताच पुष्कळ अधिक होता. बंगलोर ते म्हैसूर हा ऐशी-पंच्याऐशी मैलांचा रस्ता उघड्या प्रदेशांतून जातो. परंतु इतरत्र बहुतेक रस्ता जंगलांतून वळणावळणांनीं गेलेला आढळला. यामुळें मोटारीचा प्रवास थोडा जपून करावा लागतो. पण उन्हातान्हाचा त्रास होत नाहीं. शृंगेरीहून भद्रावतीला गेलों तों कांहीं घटका रात्र झाली आणि हा मार्ग इतका दाट जंगलमय होता कीं, अशा वेळीं यांतून निभावून गेलों म्हणजे मिळविली असें वाटे. या जंगलांत वाघ, रानटी हत्ती, गवे यांची शिकार होऊं शकते. वाटेंत क्वचित् एखाद्या खेड्यांतील पांच-चार झोंपड्या असल्या तरी त्या जंगलाच्या कुशींत लपून गेलेल्या! अगुंब्याची खिंड, शिवसमुद्रम् येथील कावेरीची प्रचंड दरी, आणि बाबा-बुढणच्या अलीकडील डोंगर येथील सृष्टिशोभा फारच रमणीय वाटली.

### म्हैसूरचें जंगल

म्हैसूरचें जंगल आमच्या इकडील घाटांतील जंगलासारखें बिनउत्पन्नाचें म्हणजे जळाऊ लाकडाचें किंवा फार तर गांवठी सागाचें नाहीं. तर त्यांत इमारतींच्या कामापासून दिवाणखान्यांतील ऐषआरामाच्या नक्षीदार सामाना-पर्यंत लागणारें सर्व प्रकारचें लाकूड— उंची साग, रोजवुड इत्यादि मिळतें. चंदनाबद्दल तर म्हैसूरची ख्यातिच आहे. किंबहुना सर्व जगांत एकट्या

म्हैसुराला चंदनाचा मक्ता आहे असें म्हटलें तरी चालेल. याशिवाय उत्तम प्रकारचा बुंद ( कॉफी ), मिरीं, वेलदोडे यांच्या बागा जंगलांत ठिकठिकाणीं दिसतात. उलट लोखंडापासून सोन्यापर्यंत अनेक प्रकारच्या धातु म्हैसूरच्या डोंगरांतून किंवा भूमीच्या तळघरांतून सांठविलेल्या आहेत. म्हैसूरकडे जुन्याच काय पण नव्याहि इमारती बांधण्यांत लांकडाचा उपयोग विशेष केलेला नजरेस येतो. सिमेंट-कॉंक्रिटच्या इमारतींची प्रथा तिकडे अजून विशेष पडलेली नाहीं. कदाचित् यापुढें सिमेन्टचे कारखाने निघणार आहेत म्हणतात, तेव्हां ती पडेल. नाहीं कोणी म्हणावें ?

तळ्याच्या समृद्धीबद्दल वर सांगितलेंच. पण एक कावेरी नदीच म्हैसूरला इतकी उपकारकर्त्री झाली आहे कीं, बोलतां येत नाहीं. " जो कोण हांक मारी त्याला प्रसन्न कावेरी " अशा अर्थाची तिकडे एक म्हणच आहे. दुसरी तुंगभद्रा नदी ही बहुतेक एकट्या म्हैसूरचीच मिळकत आहे. 'कृष्णास्नान आणि तुंगापान' अशीहि एक म्हण आहे. पण अनुभवानें या म्हणीचा निम्मा म्हणजे दुसरा भाग तेवढा मात्र खरा असें मी म्हणेन. पावित्र्याची मानीव कल्पना सोडली तर, कृष्णेचें पाणी प्रायः गढूळ म्हणजे स्नानाला फारसें चांगलें नाहीं असेंच कबूल करावें लागेल. पण तुंगभद्रेचें पाणी मात्र फार स्वच्छ व त्याहूनहि फार गोड. शृंगेरीजवळ तुंगेचा स्वच्छ प्रवाह पाहिला तसा फार थोड्या नद्यांचा आढळतो.

भरतखंडांत सृष्टिनिर्मितीचा पहिला मान म्हैसूर प्रांताला मिळालेला आहे हें म्हणणें खरें असो वा नसो; परंतु त्याच्या प्राचीनत्वाबद्दल मुळींच शंका नाहीं. आणि मनुष्यप्रयत्नानें या प्राचीनत्वाचा ऐतिहासिक प्रत्यक्ष असा पुरावा पुष्कळच बाहेर आलेला आहे. म्हैसूरचें पुराणवस्तुसंशोधन खातें फार उद्योगी दिसतें. पूर्वीं मिस्टर राईस नांवाच्या संशोधकानें दहा हजार प्राचीन लेख शोधून काढून एप्रिग्रॅफिया कर्नाटिका नांवाच्या ग्रंथांत छापले आहेत. त्यानंतर रा. ब. नरसिंहाचार्य आणि पंडित शामशास्त्री यांनीं तेंच काम पुढें चालवून ताम्रपत्रें, शिलालेख, भूर्जपत्रें इत्यादि मौल्यवान ऐतिहासिक साधनें पुष्कळच मिळविलीं आहेत. आणि म्हैसुरांतील कलाकौशल्यदर्शक प्राचीन देवालयांसंबंधानें इंग्रज व हिंदी शिल्पज्ञ यांनीं अनेक लेख लिहिले आहेत. म्हैसूर दरबारला या कामाची बरीच आवड दिसते. यामुळें या कामीं सढळ हातानें खर्च केला जातो. लॉर्ड कर्झन यांचा पुराणवस्तुसंरक्षक कायदा येथेंहि

लावण्यांत आलेला आहे. आणि प्राचीन वास्तु, मंदिरें व शिल्पकाम हें उकरून काढून साफसूफ करून, जतन करून ठेवण्याचें काम येथें अव्याहत चालू आहे. बेलूर येथील देवळाच्या प्राकारांत एक लहानसें बांधीव दगडी तळें आहे. त्याच्या पाण्यांत रसायनें व औषधी टाकून तें इतकें स्वच्छ करून ठेवलेलें आढळलें कीं वाहत्या नदीच्या पाण्याप्रमाणें तें घेऊन प्यावें असा मोह पडतो.

आजपर्यंतच्या संशोधनांत मिळालेला प्रत्यक्ष लेख ब्राह्मणी लिपींत व प्राकृत भाषेंत लिहिलेला कदम्ब राजवटीच्या वेळचा म्हणजे सुमारें सतराशें वर्षांपूर्वीचा आहे; त्यानंतर पांचव्या शतकांतील कानडी भाषेंतील लेख आहे. तमालपत्र व भूर्जपत्र यांजवरील लेखांचा संग्रह म्हैसूर येथील 'ओरिएण्टल लायब्ररीं'त आढळतो. नाण्यांचीहि जमवाजमव पुष्कळच झालेली आहे. बंगलोर येथील म्यूझिअममध्यें या नाण्यांचा संग्रह असून त्यांतील कांहीं इसवी सनापूर्वीं तीनशें वर्षांचीं असावीं असें तज्ज्ञांचें म्हणणें आहे. चितळदुर्गजवळ चंद्रवली येथें दोन हजार वर्षांपूर्वीचें एक गांव खोदकामांत निघालें आहे, आणि म्हैसूरच्या उत्तर भागांत ब्रह्मगिरी येथें उकरून काढलेली वसाहत तर सुमारें सहा हजार वर्षांपूर्वीची आहे असें म्हणतात! नाण्यांच्या संग्रहांत सहा हजार नाणीं आणि पदार्थसंग्रहालयांत जुनीं मातीचीं व धातूचीं भांडीं ठेवलेलीं आहेत. या एका संस्थानांत पुराणवस्तु संरक्षण खात्याला संभाळून ठेवण्याइतक्या महत्त्वाचे वाटलेले असे सुमारें दोनशें अवशेष आहेत.

## मूर्तींचें वैचित्र्य

होयसाळ राजवंशाच्या कारकीर्दींत या भागांतील कलाकौशल्याचा कळस झाला असें दिसतें. हें कलाकौशल्य नुसतें बांधकामांतील नसून विशेष हा कीं, तें दगडावर प्रकट केलेलें आहे. एका बाजूनें मूर्ति इतक्या प्रचंड कीं, त्यांचीं तोंडें शिड्या लावून पहावीं लागतात. दुसऱ्या बाजूला घोटीव दगडावरील नक्षीकाम इतकें बारीक कीं, साध्या डोळ्याच्या माणसाला तें स्पष्ट दिसण्याची मारामार. वेरूळ येथें असेंच शिल्पकाम दिसतें, पण त्याचा मुख्य गुण भव्यता हा असून तें उभ्या खडकांत केलेलें आहे. म्हैसूरकडील कलामंदिरांतील काम सुट्या दगडावर केलेलें असून एकेक भाग घडवून जोडलेला दिसतो. या दगडी मूर्तींच्या चित्रांची गणती एकटा मनुष्य करूं लागल्यास त्याला यादी पुरी करण्याला कित्येक महिनेच काय पण कदाचित् वर्षेंहि लागतील. देवळाच्या उंच गाभाऱ्यांत पालथ्या दगडी छतावर केलेलें खोदकाम पाहून तर मान

ताटकळत राहिल्यानें भोवळ येते. आणि चंद्रज्योती लावून किंवा लांब काठ्यांना टांगलेले पेट्रोमॅक्सचे दिवे उंच धरून पहावी तेव्हां ही नक्षी दिसते. अशा प्रकारचीं दगडी कलाकुसरीचीं कामें मुख्यतः बेलूर, हळेबीड, श्रवण-बेळगोळ, हळेअळूर, सोमनाथपूर, नरसमंगल इत्यादि ठिकाणीं दिसून येतात. कोठें कोठें विटांचीं कामें एक हजार वर्षांपूर्वीचीं जुनीं आढळतात. या प्राचीन कलाकौशल्यांत सनातनी हिंदु, जैन व लिंगायत या तीन संस्कृतींची इतकी सरमिसळ झालेली आहे कीं, ती प्रयत्नानें हुडकून काढावी लागते. श्रवणबेळ-गोळचा पुतळा जैन-संस्कृति दाखवितो तर ठिकठिकाणचे प्रचंड दगडी नंदी लिंगायत संस्कृति दर्शवितात. सनातनी धर्माच्या देवदेवतांचीं चित्रें व मूर्ति पुष्कळ असून भारतरामायणादि इतिहासाच्या कथानकांनीं अनेक दगडी चित्रपटांना निरनिराळे विषय पुरविलेले दिसतात.

### धर्मगुरूंचा मान

इतिहासदृष्ट्या इकडे ख्रिस्ती शकापूर्वी तीन शतकें होऊन गेलेल्या चंद्रगुप्त मौर्यापर्यंत सुगावा लागतो. तो खराखोटा देव जाणे! कारण चंद्रगुप्ताला शेवटीं राजैश्वर्याचा वीट येऊन तो पाटलीपुत्र सोडून श्रवणबेळगोळ येथें जैन धर्म स्वीकारून मठवासी होऊन राहिला असें म्हणतात. बेलूर येथील मंदिर होयसाळ वंशापैकीं विष्णुवर्धन यानें बांधविलें. तें नऊशें वर्षांचें जुनें आहे. या देवळांत विजय नारायण देवतेची स्थापना झालेली आहे. विष्णुवर्धन हा मूळचा जैनधर्मी, परंतु वैष्णव धर्माचा प्रस्थापक श्रीरामानुजाचार्य यानें त्याला फिरून सनातनी हिंदु धर्म स्वीकारण्यास लावलें असें म्हणतात. यापुढील कांहीं राजवंशांत बसवेश्वराच्या लिंगायतधर्मपंथाला मान देण्यांत आला होता. बेलूर येथील देवळांत श्रीरामानुजाचार्यासंबंधीं बरेच वास्तुशेष व एक लहानसें राखीव स्थळ आहे. तेथें भेटलेल्या वैष्णवधर्मीय उपासकांनीं मला सांगितलें कीं, 'विशिष्ट प्रसंगीं अस्पृश्यता न मानण्याचा जो दंडक रामानुजाचार्यांनीं मूळ घालून दिला तो अजूनहि पाळला जातो.' इकडील जुन्या इतिहासावरून असें दिसतें कीं, राजांना राजेपणाचा मान असला तरी धर्मगुरूंचा मान त्या-हूनहि विशेष होता. कोणी नवा धर्मगुरु उदयाला आला म्हणजे स्वतः राजा-चीहि भक्ति त्याचा धर्म स्वीकारण्यापर्यंत जाई; आणि स्वतः एखाद्या राजा-कडून धर्मांतर करविणें यापेक्षां अधिक बलवत्तर असें धर्मप्रचाराचें दुसरें साधन कोणाहि धर्मप्रवर्तकाला कोठून मिळणार?

हळेबीड या गांवाला द्वारसमुद्र असें एक नांव आहे. उत्तरेंत मुसलमान लोकांचें राज्य स्थापन झाल्यावर मुसलमानांच्या स्वारीची पहिली लाट दिल्लीकडून निघाली ती दौलताबादेवरून खालीं या द्वारसमुद्रापर्यंत येऊन थडकली.

## शृंगेरींतील तपोवन

शेवटीं शृंगेरीसंबंधानें दोन शब्द सांगून हा लेखांक पुरा करितों. म्हैसूरला जाण्याचें ठरल्यापासून शृंगेरी पाहण्याचा निश्चय मनांत केला होता आणि तो घाईघाईनें कां होईना अखेर सिद्धीला गेला. आजकाल सनातनी हिंदु धर्माचें गुरुपद ज्यांच्याकडे आहे त्यांतील मुख्य दोन म्हणजे आद्य श्रीशंकराचार्य आणि श्रीरामानुजाचार्य अर्थात् स्मार्त व वैष्णव धर्मपंथांचे प्रवर्तक, हे दोनहि म्हैसूरच्या राज्यांत उदय पावले ही गोष्ट विशेष लक्षांत ठेवण्यासारखी आहे. या कर्नाटक प्रांतासंबंधानें अभिमान बाळगण्यासारखी अशी ही एक गोष्ट होय, असें सर्व महाराष्ट्रीयांना वाटतें, व हा कारभार कोणीहि महाराष्ट्रीय लोक कर्नाटकाला केव्हांहि मोठ्या आनंदानें देतात.

शृंगेरी हें ठिकाण तुंगा नदीच्या कांठीं आहे. येथें नदीचें पात्र इतकें प्रसन्न दिसतें कीं, सांगतां पुरवत नाहीं. अलीकडच्या बाजूला आद्य श्रीशंकराचार्यांनीं स्थापलेला मठ, देवालय, पाठशाळा, अन्नछत्र असून मुख्य मंदिराची बांधणी अलीकडेच झालेली आहे. नदीपलीकडे लागूनच एक निर्मनुष्य अशी विस्तृत तपोभूमि असून त्यांत गायींचीं खिल्लारें चरत असलेलीं दिसतात. या तपोवनांत श्रीशंकराचार्यांना राहण्याकरितां एक नवीन इमारत बांधलेली आहे. आद्य श्रीशंकराचार्य हे इकडे तपश्चर्येला केव्हां कां आले इत्यादि वृत्तान्त ग्रंथांतरीं आढळतोच. ते प्रथम तुंगेच्या कांठीं आले तेव्हां शृंगेरी किंवा शृंगागिरी येथील वनश्री कशी असावी याची कल्पना करितांना मन रमून जातें. येथूनच शंकराचार्य दिग्विजय करीत व स्मार्त धर्माची प्रस्थापना करीत बाहेर पडले, आणि भरतखंडाच्या चारहि दिशांना मठ व संप्रदाय स्थापून, बौद्ध धर्माच्या ऱ्हासानंतर, जुन्या वैदिक परंतु यज्ञमार्ग सोडून तत्त्वज्ञानावर अधिष्ठित केलेल्या स्मार्त धर्माची त्यांनीं प्रतिष्ठापना केली. हा पराक्रम पाहून आदरबुद्धि उत्पन्न झाल्याशिवाय राहत नाहीं. वैराग्यश्रीची ही परंपरा पुढेंहि चालू राहिल्याचा पुरावा हाच कीं, विजयनगरचें नूतन राज्य प्रस्थापित करणाऱ्या

श्रीविद्यारण्यांना येथें शृंगेरीसच येऊन पीठासनावर बसण्याची इच्छा झाली. विद्या आणि अरण्य यांचा संबंध खरोखरच अनादि होय. कारण अरण्यांत राहून मन एकाग्र केल्याशिवाय विद्येची खरी उपासना कशी होणार ?

विद्यारण्यासंबंधानें विचार करतां, मला मुद्राराक्षसांतील खालील श्लोकाची नेहमीं आठवण होते—

"उपलशकलमेतद् भेदकं गोमयानां । बटुभिरुपहृतानां बर्हिषां स्तूपमेतत् ।
इदमपि च समिद्भिः शुष्यमाणाभिराभिः । विनमितपटलांतं दृश्यते जीर्णकुड्यम्" ॥

ज्याचा शिष्य महाराज चंद्रगुप्त त्या आचार्य आर्य चाणक्याच्या घराचें हें वर्णन आहे !

अजूनहि पीठाधिष्ठित जगद्गुरु येथें तरी आजन्म ब्रह्मचारी असतात. महाराष्ट्रांतील जगद्गुरूंप्रमाणें तीनहि आश्रम भोगून, आणि पौत्रादि प्रापंचिक परिवाराचा परस्पर संभाळ करवून, चतुर्थाश्रमांत शिरलेले यति नसतात ही गोष्ट विशेष वाटते. शृंगेरीस गेलों तेव्हां तेथील विद्यमान गुरुस्वामी व शिष्यस्वामी दोघांचेंहि दर्शन घेतलें. त्या वेळीं ते दोघेहि आपल्याजवळील लाकडी व्यासपीठावर पोथी-पुस्तकांचें पठन करीत होते. दोघेहि विद्वान आहेत असें म्हणतात. पण त्यांच्याशीं माझा भाषणव्यवहार वेळेच्या अभावामुळें फारसा घडूं शकला नाहीं. एक गोष्ट मात्र दृष्टीला पडली ती ही कीं, नाहीं नाहीं म्हणतां शृंगेरींतील जुन्या अवशेषांना हळूहळू आधुनिक स्वरूप येत चाललें आहे. मीं तपोवन म्हटलें त्यांत आतां अगदीं आधुनिक पद्धतीचा बंगला बांधला असून त्यांत यवनांच्याहि तसबिरी टांगलेल्या दिसल्या. विजेची रोषनाई आढळली. तें पाहून मला असें वाटलें कीं, खरोखर अशा जागेला असें स्वरूप न येतां, पर्णकुटीवजा एखाद्या स्वच्छ पण वृक्षलतांनीं शोभिवंत अशा जागेंत श्रींची स्वारी तत्त्वज्ञानाचें पठनपाठन करतांना दिसली असती तर अधिक बरें झालें असतें.

## संस्थानाचें वैभव

पीठाधिष्ठित आचार्य व्यक्तीला संसार असा नाहींच. मग ऐश्वर्यदर्शक उपाधींचा उपद्रव तरी कां असावा ? पण आचार्यापेक्षां आचार्यभक्तांचाच उपद्रव खरा ! कारण त्यांची गुरुभक्ति, पीठाला ऐश्वर्यदान करून त्यांतल्या त्यांत स्वतःचें ऐश्वर्य प्रकट केल्यावांचून, सिद्धच होत नाहीं. शृंगेरीच्या मठाला आतां संस्थानाचें स्वरूप आलें आहे. गजान्त-लक्ष्मी प्राप्त झाली आहे.

संस्थानचें उत्पन्न सुमारें सवा लाख आहे. शारदांबेची मूर्ति आणि देवळांतील अनेक उपकरणें रत्नजडित किंवा सोन्यारुप्याचीं अशीं आहेत. तेथील सर्वाधिकाऱ्यांनीं संस्थान देवतेचा जवाहिरखाना उघडून मजपुढें मांडला तेव्हां मी आश्चर्यानें दिपून जात नव्हतों, तर विनोदबुद्धीनें मनांत हसत होतों. कारण यति, देवता, व रत्नभांडार या तीन वस्तूंच्या संबंधांत मला इतका विपरितपणा वाटला कीं, तें एक हास्यकारण झाल्याशिवाय राहिलें नाहीं. आणि शेवटीं सांगावयाचें हें कीं, मठाला संस्थानाचें स्वरूप आल्यामुळें व्यवहारांत अकुशल अशा धनिकाची जी फजिती होते ती येथें दिसून आली. स्वतः श्रींना ऐश्वर्याचा लेप नाहीं. परंतु संस्थान, उत्पन्न, जमीनजुमला, माल-मिळकत आली म्हणजे तेथें व्यवस्थापक आलेच. ते थोडेच भाविक असणार! त्यांचा डोळा श्रींच्या पदकमलापेक्षां रत्नजडित पदकांवर! शेवटीं सर्व प्रकारची चोरीमारी व अव्यवस्था झालेली पाहून म्हैसूर दरबारानें या संस्थानावर आतां आपला एक डेप्युटी कलेक्टर सर्वाधिकारी म्हणून नेमला आहे. शृंगेरीसारख्या ठिकाणीं गेलें म्हणजे असलें सर्व कांहीं दाखवितात तें पाहावेंच लागतें, पण परत येतांना मात्र मी देवीच्या अंगावरील अलंकार, जवाहिरखाना, सोन्यारुप्याचे रथ व वाहनें, हीं सर्व विसरून आद्य मठ, तुंगा नदी, तपोवन, गायींचीं खिल्लारें आणि हातांत पोथी घेऊन बसलेल्या गुरुशिष्यस्वामींच्या मूर्ति इतक्यांचीच आठवण घेऊन परत आलों. गंगाकांठचें हरिद्वार रम्य खरें, पण कांहीं दृष्टींनीं त्याहिपेक्षां रम्य असें वाटणारें जें शृंगेरीस्थान त्याचें स्मरण मला जन्मभर राहील.

---

## लेखांक ७ वा

(केसरी—१० डिसेंबर १९३७)

### कांहीं वादग्रस्त विषय

म्हैसूर-बंगलोरच्या मुक्कामांत, त्याचप्रमाणें हुबळी ते सांगली या दौऱ्यांत मला एक ठराविक कार्यक्रम करावा लागे; तो म्हणजे प्रचलित पण त्यांतल्या त्यांत वादग्रस्त अशा कांहीं विषयांवर माझा अभिप्राय प्रकट करणें. हे विषय तीन-चार प्रकारचे होते. (१) म्हैसूर संस्थानांतील स्वराज्याची चळवळ

विशेषतः म्हैसूर दरबार व काँग्रेसचे कार्यकर्ते यांच्यांतील संबंध. (२) कर्नाटकाचें एकीकरण व कर्नाटकी विद्यापीठ. (३) कानडी भाषेवरील मराठीचें अतिक्रमण व त्याच्याच उलट मराठीवरील कानडी भाषेचें अतिक्रमण. (४) संस्थानी राज्यकारभार व फेडरेशन. पैकीं सोयीकरितां प्रथम क्रमांक दोन व तीन या प्रश्नांविषयीं थोडेबहुत सांगतों, नंतर एक व चार या प्रश्नांविषयीं सांगेन.

## कर्नाटकाचें एकीकरण

कर्नाटकाच्या एकीकरणाचा प्रश्न कानडी भाषा बोलणाऱ्या लोकांसंबंधाचा असला तरी म्हैसूर संस्थानांतील लोक त्यांत फारसें लक्ष घालीत नाहींत. कारण खालसांतील कर्नाटकविभाग आपल्या राज्याला जोडून घ्यावा, व अशा रीतीनें कर्नाटकाचें एकीकरण करावें, अशी म्हैसूर दरबारची अपेक्षा तर नाहींच नाहीं, पण इच्छा नाहीं असेंहि म्हटलें तरी चालेल. आज आहेत तीं संस्थानें राहावींत कीं नष्ट व्हावींत असाच जर व्यापक प्रश्न कांहीं लोक उपस्थित करूं लागले आहेत, तर म्हैसूरचा मुलूख वाढवावा व संस्थान लहानाचें मोठें करावें अशा प्रकारचे मनोरथ न करण्याइतकें शहाणपण म्हैसूर दरबारला खचित आहे. बंगलोर छावणींतले लोक संस्थानी राज्यांत परत जाण्याला आपली नाखुषी उघड रीतीनें प्रदर्शित करीत आहेत. मग केवळ एक-भाषा बोलणारे लोक एका राज्यांत, एका प्रांतांत, असावेत या ध्येयाच्या मोहामुळें धारवाड, विजापूर, कारवार, बेळगांव हे जिल्हेदेखील आमच्या ताब्यांत द्या असें म्हणण्याचें धाडस म्हैसूर दरबाराकडून कसें होईल? म्हैसूर दरबारची आकांक्षा आज येऊन-जाऊन इतकीच आहे कीं, कोणीकडून तरी आहे तेवढें म्हैसूरचें राज्य स्वतंत्रपणें राहो म्हणजे मिळविली.

## दोन्ही अंगांनीं कुलूप!

वरील चार कानडी जिल्ह्यांचे लोकच कदाचित् उलट असें म्हणावयास निघतील कीं, म्हैसूरचें संस्थान खालसा करून त्याचा-आमचा मिळून एक अखंड कर्नाटक प्रांत करावा, व तो हिंदी फेडरेशनमध्यें समाविष्ट व्हावा. पण तेंहि मनांतले मांडेच होत! कारण, आहेत तीं संस्थानें बुडविण्याची ब्रिटिश सरकारची छाती नाहीं. दुबळ्याहि संस्थानांना स्वातंत्र्याचे नवे ताम्रपट देण्याला ब्रिटिश सरकारनें जेथें काढले, तेथें अशा रीतीनें कर्नाटकाचें एकीकरण ही गोष्ट अशक्यांतली अशक्य नव्हे काय? तात्पर्य, एकीकरणाच्या या व्यापक कल्पनेला अशा रीतीनें दोहों अंगांनीं कुलूप लागलें गेलें आहे.

### महाराष्ट्राचा विरोध नाहीं

उरला प्रश्न वरील चार जिल्हे मिळून, व कदाचित् त्यांना मंगलोर जोडून एक कर्नाटक प्रांत करण्याचा. या प्रश्नासंबंधानें मी सरळ सांगत आलों कीं, "कर्नाटकाच्या या मागणीला महाराष्ट्राकडून पूर्वी कधींहि विरोध झाला नाहीं व पुढेंहि होणार नाहीं." प्रश्न असेल तर तो व्यावहारिक दृष्ट्या शक्याशक्यतेचा आहे. आणि त्या दृष्टीनें कोणतीहि योजना पुढें आली तरी महाराष्ट्र त्याला आनंदानें मान्यताच देईल. कन्नड लोकांनीं हिंदुस्थान सरकारकडून हा प्रश्न हवा तसा आपला आपण, किंवा आमच्याहि सहकारितेनें, सोडवून घ्यावा. कानडी भाषा बोलणारांचें जर एकीकरण व्हावें तर, महाराष्ट्र, वऱ्हाड व मध्यप्रांतांतील चार मराठी जिल्हे यांचाहि मिळून एक प्रांत कां होऊं नये ? पण अशी अतिक्रमणाची मागणी महाराष्ट्रानें पूर्वी केलेली नाहीं व आपण होऊन तो ती करणारहि नाहीं. पुणें-महाराष्ट्र हें इतर महाराष्ट्रावर अतिक्रमण करतें असा निष्कारण बोभाटा आधींच झाला आहे तेवढा पुरे ! महाराष्ट्राच्या एकीकरणाचा प्रश्न वऱ्हाड-नागपूरचे लोक आपण होऊन काढतील तर गोष्ट निराळी. तें कसेंहि असो, प्रस्तुत मुद्दा इतकाच कीं महाराष्ट्राच्या एकीकरणाचा प्रश्न, आडकाठीसारखा, कर्नाटकाच्या एकीकरणाच्या मार्गांत घालण्याची महाराष्ट्राची इच्छा नाहीं. या माझ्या अभिप्रायानें उत्तर-कर्नाटकांतील लोकांचें पूर्ण समाधान होत असे.

### विद्यापीठाला संमति

मग प्रश्न कर्नाटक-विद्यापीठाचा. त्यालाहि महाराष्ट्राची पूर्ण संमति आहे असेंच मी सांगे. महाराष्ट्राला जर आपलें स्वतंत्र विद्यापीठ पाहिजे तर कर्नाटकालाहि तें पाहिजेच. पण या विद्यापीठाच्या बाबतींतल्या एक-दोन अडचणी कर्नाटकांतल्याच कांहीं विचारी लोकांना दिसून येतात. पहिली अडचण ही कीं, धारवाड, कारवार, विजापूर, बेळगांव या चार जिल्ह्यांना म्हणून एकच स्वतंत्र विद्यापीठ झेपेल कसें व परवडेल कसें ? कारण या विभागांत अद्यापि दोनतीनच कॉलेजें आहेत व तींहि केवळ ऑर्टस् कॉलेजें. या चारांच्या जोडीला मंगलोरचा आणि बल्लारीचा कांहीं भाग घेतला, तर एखाददुसऱ्या कॉलेजची भर पडेल पण तीहि तशाच प्रकारच्या कॉलेजाची.

दुसरी एक अडचण अशी आहे कीं, अस्सल कानडी संस्कृतीचें मुख्य केंद्र म्हैसूर-बंगलोर हेंच वास्तविक असून, उत्तर-कर्नाटकांतील कानडी-संस्कृति

त्या दर्जाची नाहीं असें कानडी लोकच कबूल करितात. आणि म्हैसुरांत तर आधींच एक स्वतंत्र विद्यापीठ निर्माण झालेलें आहे. मग विद्यापीठाचा हेतु जो संस्कृतिरक्षणाचा व वाढविण्याचा तो म्हैसूरच्या विद्यापीठाकडूनच अधिक चांगला साधला गेला तर काय वाईट ? राज्यसूत्रें एका प्रांतांत आणि संस्कृतीचें केंद्र दुसऱ्या प्रांतांत हा विरोध कांहीं लोकांना बरा वाटत नाहीं; तथापि आहे तें म्हैसूरचें विद्यापीठच उत्तर-कर्नाटकानेंहि आपलेंसें मानावें आणि अधिक सबळ व संपन्न करावें असें कांहीं लोकांचें म्हणणें दिसतें. म्हैसूरच्या राज्यांतील लोक तर याच विचारसरणीला उचलून धरितात, मग त्यांची दृष्टि स्वार्थी म्हणा किंवा दुसरें कांहीं म्हणा.

म्हैसूरचें विद्यापीठ स्वतंत्र राजसत्तेमुळें मनांत येतांच निर्माण झालें ही गोष्ट खरी, तथापि त्यालाहि आज आपण कमकुवत आहों ही जाणीव भासतेच. तात्पर्य, ह्या प्रश्नासंबंधीं दोन्ही मुलुखांतील लोकांत मतभिन्नता कशी आहे याचें फक्त दिग्दर्शन मीं येथें केलें आहे. येथेंहि सांगण्याचा मुद्दा हाच कीं, उत्तर-कर्नाटकानें स्वतंत्र प्रांत बनून आपल्यापुरतें विद्यापीठ निर्माण केलें तर महाराष्ट्र त्या उपक्रमाचें अभिनंदनच करील. बिलकूल विरोध करणार नाहीं. विरोध करण्याचें त्याला काय कारण ? मीं असें ऐकिलें आहे कीं उत्तर-कर्नाटकांतील लोकांनीं स्वतंत्र विद्यापीठाचा आग्रह न धरतां म्हैसूर विद्यापीठ हें आपलेंच मानावें, आणि तें अधिक सबळ व संपन्न करावें, असा प्रयत्न म्हैसुरांतील कांहीं लोक खासगी चर्चेनें करीत असतात. पण त्या प्रश्नाचा अखेर निकाल काय लावावा किंवा लागेल यांत महाराष्ट्रानें लक्ष घालण्याचें कारण नाहीं. त्यांचें ते पाहून घेतील. माझा हाहि अभिप्राय कर्नाटकच्या लोकांना पटला असें मला वाटतें.

### मराठीवरील अतिक्रमण

आतां कानडी व मराठी या भाषांच्या परस्पर-अतिक्रमणाविषयीं पाहूं. हा प्रश्न पहिल्या प्रश्नाहून अधिक भानगडीचा वाटतो आणि आहे यांत शंका नाहीं. कारण कोणतीहि एखादी संस्कृति केवळ आपल्या गुणांमुळें किंवा चित्ताकर्षकतेमुळें जेव्हां दुसऱ्या एखाद्या संस्कृतीवर अतिक्रमण करते तेव्हां तें अतिक्रमण आक्षेपार्ह ठरत नाहीं. कारण मराठीनें जसें कानडी-संस्कृतींतील चांगलें दिसेल तें घ्यावें तसेंच कानडीनेंहि मराठी संस्कृतींतील चांगलें दिसेल तें घ्यावें हें स्वाभाविक आहे. किंबहुना आजवर

असल्यामुळें तें पति होऊं शकत नाहीं. तेव्हां तो पति दुसरीकडेच हुडकला पाहिजे. तो प्रजेशिवाय दुसरीकडे कोठें सांपडणार? बरें, या मुलीची वैधव्यावस्था मानली तर तिला इस्टेटीवर मर्यादितच अधिकार राहणार. भावी वारसाच्या हक्काला बाध येईल अशा रीतीनें इस्टेटीची विल्हेवाट तिला लावतां यावयाची नाहीं. हे भावी वारस म्हणजे त्यांची प्रजाच होय. अशा रीतीनें आपल्या मतलबासाठीं पत्याळच्या महाराजांनीं पुढें केलेली उपमा त्यांच्यावरच बरोबर उलटवितां येते. जुन्या परंपरेंत वाढलेले संस्थानिक झाले तरी 'मी म्हणजेच संस्थान' असें ते वाटेल त्या बाबतींत म्हणूं शकत नाहींत. स्वयंनिर्णयाचें सध्यां युग सुरू आहे हें खरें. पण हा स्वयंनिर्णयाचा हक्क केवळ अनियंत्रित राजांनाच बहाल केलेला नाहीं. उलट या राजांना न जुमानतां प्रजेनेंच हा हक्क चालवावयाचा आहे. पाश्चात्य देशांतील सर्व राजमुकुट वितळविण्याच्या कढईंत पडले आहेत. आजचें वातावरण ओळखण्याच्या दृष्टीनें ही गोष्ट संस्थानिकांच्या निदर्शनास आणावीशी वाटते. त्यांचा पाणउतारा करण्यासाठीं नव्हे. अशा वेळीं भोंवतालच्या परिस्थितीकडे संस्थानिकांनीं दुर्लक्ष करणें वेडेपणाचें ठरेल. एका बाजूनें ब्रिटिश सरकार व दुसऱ्या बाजूनें ब्रिटिश प्रजा या दोन शक्तींच्या मध्यें सांपडलेल्या संस्थानिकांनीं यापुढें शहाणपणानें व जपूनच वागलें पाहिजे. नाहीं तर लोकसत्तेच्या क्षोभाच्या तुफानांत कांहीं एका मर्यादेपलीकडे त्यांना ब्रिटिश सरकारहि वांचवूं शकणार नाहीं."

---

# संस्थानिकांनो ! तुम्ही प्रजा जोडणार कीं तोडणार ?

(केसरी—१ नोव्हेंबर १९३०)

हिंदुस्थानांतील ब्रिटिश सरकार व हिंदी संस्थानें यांचें मिळून एक फेडरेशन किंवा संयुक्त राज्य पुढेंमागें केव्हां होईल तें होवो. पण आजहि वस्तुतः हें राज्य आपल्या परीनें संयुक्त असतांहि हीं दोनहि सरकारें पृथक्‌पणाचा जो बहाणा किंवा लटुपटीचा खेळ करीत आहेत तो पाहिला म्हणजे कोणालाहि हसूंच येईल. छोटे-मोठे संस्थानिक पोलिटिकल अधिकाऱ्यांच्या

डोळयांकडे पाहून त्याच्या इशाऱ्यानें आपल्या कक्षेंत कसे फिरत असतात, किंबहुना उलट्या-सुलट्या उड्याहि कशा मारतात हें प्रसिद्धच आहे. असें असतां या संस्थानिकांनीं आपण अधिकारानें ब्रिटिश सरकारच्या बरोबरीचे म्हणून स्वतंत्र असल्याचा देखावा सुरू केला आहे. पण हें नाटक सर्वस्वीं संस्थानी प्रजेच्या खर्चानें सुरू आहे. स्वातंत्र्याचें मुख्य लक्षण आपल्या प्रजेवरील अनियंत्रित अधिकार व परराष्ट्रीय प्रजा आपल्या राज्यांत आली असतां, तिला बाहेर घालवून देण्याचा अनियंत्रित अधिकार हें होय. ही गोष्ट राजकारणाच्या तत्त्वज्ञानांत मूलभूत मानलेली आहे यांत शंका नाहीं. आणि या दोनहि सरकारांनीं आपापलें स्वातंत्र्य प्रकट करण्याकरितां प्रजेचा छळ सुरू केला आहे. पैकीं ब्रिटिश सरकारनें असा डाव आरंभिला आहे कीं, आपल्या मुलखांतील चळवळया लोकांपैकीं ज्या लोकांचा संबंध एखाद्या देशी संस्थानाशीं खरा किंवा खोटाहि पोंचत असेल त्याला 'फॉरिनर्स ॲक्ट' म्हणजे परक्या लोकांचा कायदा (सन १८६४ चा ३ रा) लावून त्यांना त्या संस्थानांत जाऊन राहण्याचा हुकूम करावयाचा व तो त्यांनीं अमान्य केल्यास त्यांना ब्रिटिश मुलखांतील तुरुंगांत ठेवावयाचें.

## एकजीव समाज

गुजराथला काठेवाडचीं संस्थानें लागून असल्यामुळें या संस्थानांतून अनेक सुशिक्षित व बुद्धिवान् लोक ब्रिटिश मुलखांत येऊन राहिले, तेथें त्यांनीं घरेंदारें केलीं, व्यापार-उद्योगधंदे थाटले; किंवा सार्वजनिक हितबुद्धीनें चळवळी आरंभिल्या. ही गोष्ट होणें सर्वस्वीं स्वाभाविकच होय. कारण ब्रिटिश सरकार आणि संस्थानें हीं आपल्यामधील क्षेत्रमर्यादा दाखविण्याकरितां मनानें एखादी काल्पनिक रेघ काढोत, परंतु निसर्गसृष्टि असल्या रेघा जुमानीत नाहीं. आणि मनुष्यसमाजहि त्या जुमानीत नाहीं. हिंदुस्थानाबाहेर कोठेंहि पाहिलें तर हजारा-लाखांनीं एका राष्ट्रांतले लोक दुसऱ्या राष्ट्रांत जाऊन तात्पुरते किंवा कायमहि राहिलेले आढळून येतात; मग हिंदुस्थानांतील लोक हे तर काय, एकाच घरांतल्याप्रमाणें मूळ एकाच समाजांतले. शरिरांतले निरनिराळे अवयव ज्याप्रमाणें स्नायु व मज्जातंतु यांच्या जाळ्यांनीं एकजीव झालेले असतात; त्याप्रमाणें ब्रिटिश मुलूख व संस्थानी मुलूख हा त्यांतील समाजाच्या ऋणानुबंधांच्या शेंकडों पाशांनीं एकजीव झालेला आहे. दोनशें वर्षांपूर्वीं परकी सरकार येऊन या ठिकाणीं

बसलें किंवा हल्लीं नांदत असलें म्हणून, त्यामुळें या समाजाचे घटक एक-मेकांना परकी मानूं शकत नाहींत. याचें उत्कृष्ट उदाहरण म्हणजे गोमंतकांतील हिंदु समाज, व त्यालगतचा ब्रिटिश मुलखांतील हिंदु समाज. कारण पोर्तुगीज सरकार व ब्रिटिश सरकार यांचा अर्थाअर्थी कांहीं संबंध नाहीं. मग संस्थानांवरील अधिराजे म्हणविणारें इंग्रज सरकार आणि त्यांच्या अंकित असणारे संस्थानिक यांच्या मुलखांतील प्रजेनें अविभाज्य व एकजीव राहण्याची आकांक्षा धरल्यास त्यांत काय वावगें ?

## बालिश सबबीवरून हद्दपारी

संस्थानी मुलूख व त्यांत कार्यक्षेत्राला मिळणारा वाव हा अतिशय संकुचित. यामुळें संस्थानी मुलखांतल्या उद्योगी, बुद्धिवान्, कर्त्या महत्त्वाकांक्षी लोकांना ब्रिटिश मुलखांत राहूं जाण्याची इच्छा झाल्यास ती स्वाभाविक होय. नद्या-खाडयांतील मासे लहान म्हणून ते सामान्यतः नद्याखाड्यांतच पोहतात. पण त्यांतला एखादा मासा मोठा निघाला तर तो नदीमुखानें सहजच समुद्रांत प्रवेश करतो व तेथें नांदतो. तीच गोष्ट संस्थानांतून उठून ब्रिटिश मुलखांत जाऊन राहणाऱ्या लोकांची होय. उलट आजवर ब्रिटिश सरकारनेंहि सामान्यतः असें उदार किंवा व्यापक धोरण ठेवलें होतें कीं, त्यामुळें ब्रिटिश मुलखांतील संस्थानी लोकांना कायदेकौन्सिलच्या मतदारीचे आणि निवडणुकीस उभे राहण्याचे हक्क होते व अजूनहि आहेत. तसेंच अशा लोकांपैकीं कोणी गुन्हे केले असतां आपल्या हद्दींतील गुन्हेगार म्हणून त्याजवर योग्य रीतीनें खटले करून तुरुंगांत टाकण्याला संस्थानिकांकडून कधींहि त्यांस प्रतिबंध झालेला ऐकिवांत नाहीं. आजवर एकाहि गुन्हेगारानें "मी संस्थानी प्रजाजन म्हणून मला इन्साफाकरितां संस्थानी अधिकाऱ्याकडे द्या" असें म्हटल्याचा दाखला सांपडेल कीं नाहीं याची शंकाच वाटते. असें असतां अलीकडे ब्रिटिश सरकारनें वर सांगितलेल्या फॉरिनर्स ॲक्टचा उपयोग करून आपल्याला अनिष्ट वाटणाऱ्या लोकांवर इतर कोणताहि उघड आरोप न ठेवतां, "तूं संस्थानाची प्रजा, आमची नव्हे व आम्हांला नको" असली बालिशपणाची सबब सांगून बिनचौकशीनें त्यांना हद्दपार करण्याचा उपक्रम केला आहे.

## दोन्ही रियासतींचा मज्जाव !

काठेवाडलगत गुजराथेंत अशीं उदाहरणें पुष्कळ झालीं व इकडे दक्षिण-महाराष्ट्रांतहि हल्लीं होऊं लागलीं आहेत. बडोदें वगैरे संस्थानांतील प्रजा

म्हणून कांहीं लोकांना सरकारनें ( व ते कोणी नामांकित चळवळयेहि नव्हते ) हद्दपारीची शिक्षा दिली व त्यांतील जे कोणी आपल्या पायांनीं गेले नाहींत त्यांना बळजबरीनें धक्के मारून घालवून दिलें किंवा इकडील तुरुंगांत डांबून ठेवलें, ही गोष्ट वाचकांना बहुधा माहीत असेल. याचेंच अगदीं ताजें उदाहरण म्हटलें म्हणजे श्री. गंगाधरराव देशपांडे यांचे सहकारी मदतनीस रा. पुंडलीक कातगडे यांच्यावर तारीख २४ ऑक्टोबर रोजीं बजावलेली नोटीस होय. हल्लींच्या चळवळींत ते तुरुंगांत गेले. पण ते बाहेर पडण्यापूर्वींच त्यांचेवर अशी नोटीस बजावण्यांत आली कीं, ते मिरज संस्थानाचे प्रजाजन म्हणून वाटल्यास त्यांनीं मिरजेस जाऊन राहावें; पण ब्रिटिश मुलखांत राहतां कामा नये. पण मौज ही कीं, रा. पुंडलीक हे आपलेहि प्रजाजन नव्हेत असें म्हणून त्यांनीं मिरज संस्थानांतहि राहूं नये अशी मिरजेच्या स्थानिक अधिकाऱ्यांची कारवाई सुरू झाली असें म्हणतात. या कारवाईचा प्रकार अखेर कोठवर जातो हें पाहण्याला रा. पुंडलीक हे मिरजेंत राहिलेच नाहींत. ते उठून सांगलींत जाऊन राहिले. पण उद्यां "दोन रियासतींना अप्रिय झालेला मनुष्य तुम्ही आपल्या मुलखांत कां राहूं देतां" असा गुप्त इशारा पोलिटिकल एजंटाकडून सांगलीच्या अधिकाऱ्यांना मिळणार नाहीं कशावरून? हल्लीं सर मोरोपंत जोशी यांच्यासारखे कायदेपंडित सांगलीस अॅडमिनिस्ट्रेटर आहेत व आपल्या कायदेपंडितगिरीची दृष्टि चालवून, धिटाईनें ते कदाचित् असल्या गुप्त इशाऱ्याला भीक घालणार नाहींत ही गोष्ट वेगळी. पण ही स्थिति सांगली संस्थानांत कायमची टिकणारी नव्हे. कारण श्रीमंत मिरजकर काय किंवा श्रीमंत सांगलीकर काय, एकाच खाणींतील माती होत. म्हणून या प्रश्नाला मिरज, सांगली किंवा पुंडलीक कातगडे असें व्यक्तिस्वरूप नसून सामुदायिक रीतीनेंच या प्रश्नाचा विचार व निकाल व्हावयास पाहिजे.

### आगाऊ इशारा

पुंडलीक यांनीं मिरजेंत ठाणें न दिल्यामुळें तेथील अधिकाऱ्यांनीं त्यांचें अखेर काय केलें असतें हें समजण्याला मार्ग नाहीं. पण आमची बातमी खरी असेल तर मिरजेच्या अधिकाऱ्यांनीं ब्रिटिश अधिकाऱ्यांचें अनुकरण करून फॉरिनर्स अॅक्टसारखा एखादा कायदा आपल्या संस्थानाकरितां करण्याचें योजिलें आहे. म्हणजे अमुक लक्षणें, अर्थात् जन्मस्थान, मिळकतीचें प्रमाण इत्यादि, ज्यांना लागू पडत नाहींत असे संस्थानाच्या अधिकाऱ्यांना वाटेल

त्यांना हद्दपार करण्याचा अधिकार अधिकाऱ्यांनीं आपल्याकडे घेण्याचें या कायद्यानें योजिलें असल्याचें समजतें. आम्हांला समजलेली ही माहिती खरी नसल्यास आम्ही त्यांत आनंदच मानूं. पण उद्यां असा कायदा एकदां कागदावर लिहिला गेल्यावर पुसून टाकण्याचें रबर कोणाच्या हातीं आहे? म्हणून माहिती कच्ची किंवा अपुरी असली तरी तिचा योग्य तो उपयोग आधीं इशारा देण्याकडे करण्याचा मोह आम्हांला सहजच होतो आणि याचें कारणहि उघड आहे.

## आत्मघातकी वर्तन

ब्रिटिश सरकारचें अनुकरण संस्थानी अधिकाऱ्यांनीं चांगल्या गोष्टींत हवें तितकें करावें. पण वाईट गोष्टींतहि करणें म्हणजे स्वतःचा आंधळेपणा जगाला प्रकट करण्यासारखें होय. हिंदुस्थानाबाहेर राष्ट्राराष्ट्रांना अनिष्ट परक्या लोकांना हद्दपार करण्याचा अधिकार असतो. परंतु त्याचा उपयोग ते प्रायः युद्धाच्या गडबडीसारख्या वेळींच करतात, एरवीं सहसा करीत नाहींत. हल्लींच्या चळवळीला युद्धाचें स्वरूप ब्रिटिश सरकार मायावीपणानें कसें देतें हें चरण बिळाशी-प्रकरणावरून लोकनिदर्शनाला आलेंच आहे. पण आधीं तीच घोडचूक होय. पण हल्लींची चळवळ सुरू होण्यापूर्वींहि सरकारनें या कायद्याचा उपयोग केला होता. मिरज संस्थानांत अलीकडे कांहीं चळवळ झाली असली तरी तिला बिळाशी-च्याहि 'बंडाची' उपमा शोभणार नाहीं. असें असतां परकी प्रजेला बिन-चौकशीनें हद्दपार करण्यासाठीं मिरज संस्थानचे अधिकारी ब्रिटिश सरकारचें अनुकरण करतील व इतर कोणी संस्थानिक मिरजेचें अनुकरण करण्यास प्रवृत्त होतील तर तो वेडेपणा असून संस्थानिकांच्या दृष्टीनेंहि आत्मघातकीपणाचा आहे हें देखील त्यांना आज कळत नसेल तर उद्यां कळून येईल.

## अधिकाऱ्यांचा खेळ!

प्रश्न असा कीं, हिंदुस्थानांत जर असे कायदे मुलूखभर झाले व त्यांचा अम्मल अधिकाऱ्यांच्या लहरींप्रमाणें पण सर्रास होऊं लागला तर बिचाऱ्या प्रजाजनांनीं काय करावें? बेळगांवच्या डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटानें खो दिला म्हणून मिरजेस जावें, मिरजेच्या मॅजिस्ट्रेटनें खो दिला म्हणून सांगलीस जावें, सांगलीच्यानें खो दिला म्हणून मिरजमळ्यांत जाऊन राहावें. असा खोखोचा खेळ चालवयाचा कीं काय? तसें झाल्यास इसापनीतींतील बेडकांनीं तळ्याच्या कांठावरील खोडकर पोरांना 'तुमचा खेळ होतो पण आमचा जीव जातो'

असें जें म्हटलें तें खालसा काय किंवा संस्थानी काय, प्रजेला म्हणण्याची पाळी येईल. अधिकाऱ्यांकडून असा कांगावा करण्यांत येतो कीं, हें चळवळ्ये लोक म्हणजे रक्त खाणाऱ्या उवा होत. त्यांना केसांतून विंचरून काढून टाकलेंच पाहिजे. पण अधिकाऱ्यांच्याहि लक्षांत हें यावें कीं, उवा झाल्या तरी त्या स्वच्छ केसांत होत नाहींत. केसांत आधीं घाण माजते व मग त्यांत उवा होतात. अर्थात् या उभयमुलुखांतील अधिकाऱ्यांनीं जर आपला कारभार स्वच्छ ठेवला तर त्यांत चळवळ्ये लोक कशाला निर्माण होतील? पण वेळच्या वेळीं तेल लावून, स्नान करून, वाळवून, विंचरून केसांची निगा न ठेवतां, एखाद्या कैकाडणीनें आपल्या केसांचा घाम पुसला नाहीं, त्यांत धूळ सांचूं दिली व वेळींच नाजुक बारीक दांतांच्या फणीनें केस साफ ठेवले नाहींत, तर तिला पुढें आपल्या तीक्ष्ण नखांच्या फण्याहि पुऱ्या पडत नाहींत. आणि ही स्थिति प्राप्त झाल्यावर डोक्यांतल्या सगळ्या उवा तर निघणार नाहींतच पण तिला खाजवून खाजवून आपलें डोकेंच रक्तबंबाळ झालेलें सोसावें लागतें. ब्रिटिश सरकारनें चालविलेल्या फॉरिनर्स ॲक्टाच्या अमलाविरुद्ध आम्ही त्याची वार्ता येऊं लागल्यासपासून तक्रार करीत आहों. अर्थात् संस्थानिकांनीं जर अंधानुकरणानें तसलेंच कांहीं करण्याचें मनांत आणलें तर, त्याच्याविरुद्धहि आम्हांला तक्रार केलीच पाहिजे.

## संस्थानिकांची सवाई सोटेशाही

आमचें म्हणणें असें नाहीं कीं, संस्थानिकांनीं आपल्या राज्यांत अविवेकी चळवळ्यांना मुक्तद्वार ठेवावें. त्यांचे हातीं पिनल कोड, क्रिमिनल प्रोसीजर कोड हे कायदे आहेतच. तेवढे त्यांना खास पुरे होतील. म्हणजे कोणीहि राजद्रोहात्मक किंवा जातिविद्वेषक चळवळ आरंभिल्यास त्याचा पत्तामुद्दा नीट ठेवून त्याजवर उघड आरोप व रीतसर चौकशी करून, तुरुंगांत घातल्यास अधिकाऱ्यांना कोणीहि नांवें ठेवणार नाहीं. संस्थानी मुलुखांत कोणाहि चळवळ्यांनीं ब्रिटिश सरकारवर किंवा इतर संस्थानिकांवर टीका करून स्थानिक अधिकाऱ्यांना जड पाडावें किंवा अवघड करावें याविरुद्ध आम्ही नेहमीं प्रतिपादन करीत आलों आहों. तसेंच संस्थानिक झाले म्हणून त्यांचें व त्यांच्या प्रजेचें रक्षण राजद्रोहापासून किंवा जातिविद्वेषापासून होऊं नये असें आम्ही तरी कसें म्हणूं? परंतु उलट लाकूड वीतभर आणि ढलपी हातभर असें जेव्हां संस्थानिक करतात तेव्हां त्यांचा निषेध आम्ही कां करूं नये? एकच उदाहरण द्यावयाचें

तर तें असें कीं, ब्रिटिश मुलखांतील बेकायदेशीर संस्थांचा सभासद राहणाराला किंवा होणाराला जी शिक्षा ठेवली आहे, तिच्या पांचपट किंवा दसपट शिक्षा मिरज संस्थानांत कां ठेवली जावी हें आम्हांला कळत नाहीं. ब्रिटिश सरकार-पेक्षां संस्थानी सरकारला इतका अधिक नाजुकपणा येण्याचें काय कारण? तर हेंच कीं, "आम्ही मोठे दक्ष आहों, अनुकरणशील आहों, खावंदांचा शब्द पडला कीं, आम्ही तो उचलून धरण्याला तयार आहों" असें भासवावयाचें.

## अगतिक अवस्था

असो. आपल्या राज्यांतील लोकांना, परकीय असें राष्ट्रबुद्धिविघातक विशेषण लावून, व त्यालाच अनिष्ट, निंदाव्यंजक दुसरें विशेषण लावून बिन-चौकशीनें हद्दपार करण्याचा जो नवीन उपक्रम झाला आहे त्याचा जितका निषेध करावा तितका थोडाच आहे. कारण आई जेवूं घालीना व बाप भीक मागूं देईना, याप्रमाणें संस्थानी सरकार व ब्रिटिश सरकार यांनीं करण्याचें आरंभिलें तर लोकांनीं जावयाचें तरी कोठें? महायुद्धांत समोरासमोर तोफखाने भिडले असतां त्यांतूनहि मध्यें 'नो मॅन्स् लँड' म्हणून कोठें कोठें बचावाची एखादी जागा उरत असे. तशीहि येथें सोय उरत नाहीं. कारण उभयसरकारांच्या हद्दी इतक्या भिडलेल्या आहेत कीं, त्या काल्पनिक क्षुरधारेनेंच वेगळ्या करतां येतील. मग येथें बचावाची जागा कोठून मिळणार? कायदेशीर आरोप व रीतसर चौकशी यांचा बहाणा करून देखील अधिकाऱ्यांना एखाद्याला पुष्कळ छळतां येईल. पण येथें छळाला कांहीं तरी शिस्त व नियम असल्यानें, मनुष्याला प्रतिकार करण्याची थोडी तरी आशा असते व जागा राहते; पण निवळ आडमुठेपणाच्या हद्दपारीपासून मनुष्यानें बचाव कसा करावा? व या पाटलांच्या नांवानें बोंब मारीत गांव सोडून देशोधडीला जाव-याचें म्हटलें तरी देशोधडीला जावयाला हे अधिकारी नाहींत असा निर्मक्षिक देश तरी कोठला आणावयाचा?

## ईश्वरी योजना कशी असेल?

भारती युद्धांत रणभूमीवर हत्तीच्या गळ्यांतील घंटा पडून झुडपांतील चिमणीच्या घरट्याचें रक्षण उलट-सुलट सुटणाऱ्या तीरांपासून ईश्वरानें केलें असें म्हणतात. त्याप्रमाणें ईश्वरच आतां अशी कांहीं बचावाची जागा किंवा योजना काढील तर गोष्ट निराळी. नाहीं तर काम कठीण आहे. पण ईश्वरी योजनाच म्हणावयाची तर ती अशी दिसते कीं, आधीं संस्थानांविरुद्ध

कागाळ्या होऊन व चळवळी होऊन संस्थानें बुडवावयाचीं व मग फेडरेशन होऊन ब्रिटिश मुलखांतल्याहि अरेरावी अधिकाऱ्यांची सत्ता नष्ट होऊन ती सर्वस्वीं हिंदी प्रजेच्या हातीं जावयाची. याच्या उलट योजना म्हटली तर, ब्रिटिश राज्य नष्ट होऊन संस्थानिकांतूनच कोणी तरी नेपोलियन, अलेक्झांडर, शिवाजी किंवा व्हिक्टर इमॅन्युएल निर्माण होऊन त्यानें हिंदुस्थानचें एकछत्री राज्य एखाद्या अशोकाप्रमाणें करून अनियंत्रित राजसत्तेचें वैभव फिरून एकवार गाजवावयाचें. पण या दोहोंपैकीं या नव्या युगांत पहिली योजनाच यशस्वी होण्याचा संभव अधिक व ती तशी झाली म्हणजे मग संस्थानिकांना काय तें कळून येईल. पण आमचें चुको किंवा बरोबर असो. नवीन फेडरेशनच्या घटनेंतहि विद्यमान संस्थानें शक्य तितकीं शिल्लक राहावीं, मात्र त्यांतील कारभार सुधारलेल्या पद्धतीनें व जबाबदारीनें चालावा असेंच आम्ही आजवर म्हणत आलों आहों व पुढेंहि म्हणत राहण्यासारखी स्थिति ईश्वरानें ठेवावी अशी आमची इच्छा आहे. पण हल्लीं संस्थानिकांनीं चाळे चालविले आहेत त्याप्रमाणें, इकडे ब्रिटिश सरकारपासून स्वतंत्र राहण्याचा दावा सांगावयाचा व दुसरीकडे आपल्याच प्रजेशीं मिळतें न घेतां व त्यांना योग्य अधिकार न देतां, सुलतानी अधिकार गाजविण्याकरितां, आपल्या प्रजेपुढें ब्रिटिश सरकारचा दाखला सिरवावयाचा. या दोनहि गोष्टी ज्या सुरू आहेत त्या संस्थानिकांना सारख्याच घातक होत. आम्हीहि संस्थानिकांचे हितचिंतक आहोंत. परंतु कोणत्याहि तऱ्हेनें त्यांचे मिंधे नाहीं म्हणून त्रयस्थ रीतीनें त्यांच्याच हिताची जी गोष्ट आम्हांला सुचते ती बोलून दाखविण्याला आम्ही कां भ्यावें ?

## वऱ्हाडचा दाखला

संस्थानिकांनीं या बाबतींत वऱ्हाडचें उदाहरण डोळ्यांपुढें ठेवावें. इंग्रज सरकारच्या अडचणींचा फायदा घेऊन निजाम सरकारनें जेव्हां हळूच वऱ्हाड परत मागण्याची गोष्ट काढली, तेव्हां लॉर्ड कर्झन यांचें काम पुरें करण्याकरितां लॉर्ड रेडिंग यांनीं निजाम सरकारला थप्पड लगावून सुजलेल्या गालावर पानें चोळलीं! हें तर झालेंच. पण वऱ्हाडच्या प्रजेनें स्वतः काय केलें हेंहि त्यांनीं लक्षांत आणावें. तुम्ही ब्रिटिश रियासतींत राहूं इच्छिता कीं, निजामशाही राज्यांत परत जाऊं इच्छिता असा बिकट प्रश्न आपणांपुढें टाकणारें ब्रिटिश सरकार हें स्वार्थी व कपटपटु आहे हें लक्षांत येऊनहि वऱ्हाडच्या प्रजेनें निजामशाहींत

परत जाऊं इच्छीत नाहीं असें ठरविलें व कळविलेंहि म्हणतात. मग ते ठराव प्रत्यक्ष लेखी नसोत. यावरून वेळ आला तर नव्या घटनेच्या मिषानें, संस्थानें बुडविण्याचा प्रश्न ब्रिटिश सरकारनें काढला, तर त्याला संस्थानी प्रजा आज काय उत्तर देईल हें आम्ही बोलून दाखविण्याचें कारण नाहीं. तथापि हिंदुस्थानांतील स्वराज्याची घटना सर्वस्वीं परकीय स्फूर्तीची किंवा वळणाची न होतां शक्य तर स्वदेशी स्फूर्तीची व वळणाची व्हावी असें म्हणणारे व खरी इच्छा धारण करणारे आम्ही असल्यानें संस्थानिकांनीं हे आत्मघातक चाळे सोडावे, अशी त्यांनाच विनंतिपूर्वक सूचना करण्यापेक्षां आमच्या हातीं तरी अधिक काय आहे ? संस्थानिकांना संस्थानी प्रजेचा कंटाळा येणें म्हणजे त्यांना स्वतः-चाच कंटाळा येण्यासारखें होय. कारण प्रजा व राजा हे शब्दच अनुयोगी-प्रतियोगी संबंधाचे आहेत. म्हणून प्रजा जोडावयाची तें सोडून हल्लींच्या कायद्यांचा दुरुपयोग करून आणि त्यांत नवीन कायद्यांची भर घालून, प्रजा तोडण्याचें काम जर संस्थानिक करूं लागतील तर त्यांच्यासारखे शहाणे तेच होत ! !

---

# मिरज संस्थान प्रजापरिषद

## अधिवेशन ५ वें, मे १९३१

### ( अध्यक्षीय भाषण )

" **परिषदेच्या** कार्यास सुरुवात करण्यापूर्वीं मला एका गोष्टीची आठवण झाली आहे. त्या आठवणीचा परिणाम माझ्यावर कायमचा राहिल्या-मुळें तो सांगावा असें मला वाटतें. मालगांवास उरूस होत असे. तो पाहण्यास पन्नास वर्षांमागें ( लहानपणीं ) मी येथें आलों होतों. उरुसांत त्या वेळीं दारूकाम चांगलें होत होतें. दारू तयार करणारानें एक दारूचें झाड तयार करून त्यांत आपलें नांव घातलें होतें. त्याच वेळीं दारूकामाचा दुसरा एक प्रकार पाहिला. तो म्हणजे घडाबाजीचा. एका मडक्यांत निरनिराळ्या प्रकारचीं स्फोटक द्रव्यें घालून तयार केलेली दारू ठेवावयाची व त्यास बत्ती देऊन तें मडकें मंडळींत सोडावयाचें. बत्ती पेटल्यावर तें मडकें इकडेतिकडे

धावूं लागलें म्हणजे त्यामुळें लोकांची पांगापांग होऊन कांहीं काळ चलबिचल होई. या दोन प्रसंगांमुळें माझ्या मनांत एक गोष्ट ठसली. दारूस्फोट व साक्षरता यांच्यांतहि संबंध आहे; व यःकश्चित खापर आंतील दारूमुळें जिवंत माणसांची दाणादाण करूं शकतें व त्यामुळें कार्य होतें हें कळून आलें. कोणतीहि चळवळ घ्या तिच्या बुडाशीं साक्षरता आहेच. या साक्षरतेच्या दारूनें हिंदुस्थानच्या राजकीय क्षेत्रांत गडबड उडवून दिली आहे. पण संस्थानांत चाललेली ही चळवळ घडाबाजीप्रमाणें आहे. घडाबाजीपासून कोणाचाहि घातपात होत नाहीं. पण कांहीं काळ गडबड होते. त्याचप्रमाणें या लहानशा चळवळीचा परिणाम होत आहे. स्थगित झालेल्या माणसाची या चळवळीनें थोडी उठावणी होते यांत शंका नाहीं.

## हिंदुस्थानचा नकाशा एकरंगी नको

श्रीमंतांनीं आपलेपणाच्या भावनेनें परिषद् भरविण्यास परवानगी दिली याबद्दल मी त्यांचा आभारी आहे. श्रीमंतांचा मजवर लोभ आहे तसाच आपलाहि आहे; व लोभामुळें आपण मला आज अध्यक्षस्थान दिलें याची जाणीव आहे. वर्तमानपत्रकर्ता या नात्यानें संस्थानावर टीका करण्याचा प्रसंग येतो. त्यावरून संस्थानचा मला अभिमान नाहीं असें नाहीं, उलट जास्त अभिमान आहे. ब्रिटिश राज्यापेक्षां हिंदी राजवटींत चार गुण अधिक निपजतात हें कोणी दाखविल्यास मला अत्यंत अभिमान व एक प्रकारचा गर्व वाटतो. संस्थानें वाइटांत वाईट असलीं तरी तीं राहावीं असें वाटतें. संस्थानें बुडवावीं असें म्हणणारांचा मला मनापासून राग येतो. संस्थानें हीं आपल्या गतवैभवाचीं जिवंत स्मारकें आहेत. हल्लींच्या संस्थानिकांच्या पूर्वजांनीं खरोखरीच आपल्या अंगच्या विशेष गुणांनीं, पराक्रमानें व कर्तबगारीनें संस्थानें मिळविलीं आहेत. थोरल्या बाजीरावाच्या कारकीर्दींत उदयास आलेलीं संस्थानें पाहिलीं तर आपल्यास त्यांच्याबद्दल आनंदच वाटेल. उत्तरेकडे मराठ्यांची सत्ता पसरविण्याच्या कामीं ग्वाल्हेर व इंदूर या संस्थानांच्या उत्पादकांनीं केवढी मदत केली तें आपण विसरून जातां कामा नये. नकाशावर एकजात तांबडा रंग फासून आपणांस काय मिळणार आहे हेंच मला समजत नाहीं. हीं संस्थानें नाहींशीं करण्यांत आलीं तर आपल्या पूर्वींच्या मोठेपणाचीं स्मारकें आपण कशीं दाखवूं शकाल ? आपल्या घरांतील कुटुंबांत सर्वच माणसें कुठें चांगलीं निपजतात ? एखादा संस्थानिक वाईट निपजला म्हणून काय झालें ? तेवढ्यासाठीं उर्वरित संस्थानें

ब्रिटिशांच्या घशांत घाला असे म्हणणारे देशाचे वैरी आहेत असें मी समजतों. संस्थानिकांचीं राज्यें जिवंत राहावींत व त्यांनीं वैभव मिळवून आनंदानें तें भोगावें. पण त्याबरोबरच चालू परिस्थितीकडे लक्ष देऊन आपल्याबरोबर आपल्या प्रजेलाहि त्यांत भागीदार करावें एवढेंच आमचें सांगणें आहे.

## संस्थानिकांना दुखवूं नका

कै. माधवरावजी रानडे, गोखले व दादाभाई यांच्यासारख्यांचें ब्रिटिश सरकारनें राज्यकारभारांत कांहीं एक ऐकलें नाहीं. लोकमान्यांचें तर नाहींच नाहीं. पण ब्रिटिश सरकार या संस्थानिकांचें मात्र थोडेंबहुत ऐकतें. संस्थानिकांना सरकार जवळ करीत आहे. तेव्हां आपल्यास जर राजकारण साधावयाचें असेल तर आपण तरी त्यांना कां दूर लोटावें ? संस्थानिकांच्या मनांत प्रजेच्या चळवळीमुळें भीति उत्पन्न झाली आहे. त्यांना ही चळवळ आपल्या जिवावरच उठली आहे असें वाटत आहे. म्हणून आपल्यापैकीं कांहीं अधिकार ते प्रजेला द्यावयास कचरतात. तेव्हां प्रजेनेंहि त्यांना आपण राजनिष्ठ राहून ऐश्वर्याचा उपभोग उभयतां गोडीगुलाबीनें घेऊं या असें आश्वासन द्यावें.

## ठरावांची अंमलबजावणी

श्रीमंतांचा व माझा ऋणानुबंध असला तरी त्यांच्यापुढें एक व आपल्यापुढें एक असें कधींहि मी बोलणार नाहीं हें मी प्रांजलपणें सांगतों. जें येथें तेंच तेथें. आपलें हें पांचवें अधिवेशन आहे. तेव्हां ही चळवळ नुकतीच सुरू झाली आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. मागच्या वर्षी सत्याग्रह-युद्धांत आपण गुंतला म्हणून परवानगी मागितली नसल्याचा संभव जास्त आहे. आपण परिषदेसाठीं परवानगी मागितली व ती दिली नाहीं अशी चूक दरबारनें केली नाहीं. पण परवानगी तरी का मागावयास लागावी हें मात्र मला समजत नाहीं ! श्रीमंतांनीं उगीच आमच्याबद्दल गैरसमज उत्पन्न करून न घेतां आपल्या मनांतील तेढ काढून टाकावी. या परिषदेचा अध्यक्ष या नात्यानें मी झालेल्या ठरावांची अंमलबजावणी करण्याचा प्रयत्न करीन. श्रीमंतांशीं व युवराजांशीं चर्चा करून ढोबळ प्रश्नांसंबंधानें मध्यस्थी करण्याचा प्रसंग आल्यास तीहि मी मोठ्या आनंदानें करीन.

## कायदे-कौन्सिल द्या

प्रजेमध्यें कोणी कर्तबगार माणसें नाहींत अशी भलतीच समजूत संस्थानिकांची असल्यानें आपणांस प्रजेनें अमुक एक गोष्ट करा असें कां सांगावें असें वाटतें. आपणांसच सर्व कांहीं सुचतें असें त्यांना वाटतें. पण त्याप्रमाणें प्रजेला सुख मिळालें असतें तर प्रजेला तरी येथें येण्याचें कारण कां पडलें असतें ? संस्थानिकांना अधिकारन्यासाची भीति वाटते व त्याचें कारण एकच आहे. त्यांना आपल्या खासगी खर्चाबद्दल भीति वाटते. पण कायदे-कौन्सिल निर्माण करून आपल्या तनख्याची रक्कम एकदां कायमची ठरवून द्या म्हणजे झालें. प्रजेकडून आपल्या राजाचा ठरींव तनखा सहसा कमी केला जात नाहीं हें इंग्लंडच्या उदाहरणावरून सिद्ध करून दाखवितां येईल. मानमरातबानें व अधिपति या नात्यानें त्यांच्या दर्जास शोभेल अशा पद्धतीनें राहण्यास जो खर्च लागेल तो आपल्या राजास न देण्यास व दिलेला कमी करण्यास प्रजा केव्हांहि तयार होणार नाहीं हें त्यांनीं पक्कें लक्षांत ठेवावें. गेलीं तीनशें वर्षें इंग्लंडांत पार्लमेंटकडे सर्वाधिकार आहे. तेव्हां त्यांना राजाचा तनखा कमी करतां आला असता, पण त्या अधिकाराचा त्यांनीं दुरुपयोग केला नाहीं हें लक्षांत घेण्यासारखें आहे. उलट वाईट राजाबद्दलहि प्रजेला योग्य अभिमान वाटतो ही गोष्ट कै. श्रीमंत मल्हारराव गायकवाड यांच्यावर प्रसंग आला असतां जाहीर झाली आहे. पण संस्थानिकांना प्रजेच्या मनाची जाणीव नसल्यानें उभयतांमध्यें वादाचे प्रसंग येत आहेत. तेव्हां आपल्या तनख्याची रक्कम एकदां ठरवून व बाकीचा कारभार कायदे-कौन्सिलकडे सोंपवून श्रीमंतांनीं सुखानें राहावें अशी सूचना आहे.

## जबाबदारीची विभागणी करा

एखादा संस्थानिक १८ वर्षांचा झाला म्हणजे तो फांशीपर्यंतचे सर्वाधिकार चालविण्यास योग्य झाला असें मानण्यांत येतें. पण त्याचें शिक्षण किती झालेलें असतें हें न सांगतांच समजण्यासारखें आहे. प्रजेमध्येंहि बरेच विद्वान् असतात. म्हणून कालमानाकडे लक्ष देऊन संस्थानिकांनीं प्रजेला राज्यकारभार चालविण्यांत भागीदार करून कारभार चालवावा. जबाबदारीनें राज्यकारभार चालविण्यास प्रजा तयार आहे. राजा हा स्थिर असून मंत्रिमंडळ हें चल असतें असा सिद्धान्त आहे. तेव्हां मंत्रिमंडळापासून धोका बाळगण्याचें कारण नाहीं.

## कोरडा मुसलोनी नको

कोणत्याहि संस्थानिकानें आपण मुसलोनी अगर नेपोलियन आहों अशी भलतीच समजूत करून राज्यकारभार हाकण्याच्या भरीस पडूं नये. 'मुसलोनी' म्हणवून घेण्यांत ज्यांना अभिमान वाटतो त्यांना मुसोलिनीची कृति दिसत नाहीं ही आश्चर्याची गोष्ट आहे. आपल्या देशाकडे कोणी वांकड्या डोळ्यानें पाहतो असें वाटल्यास मुसलोनीसारखा सर्वाधिकारी त्याचे डोळे काढून टाकण्यास सदैव तयार असतो. आपल्या प्रजेस सुराज्य देऊन आपल्या देशाचा दर्जा सर्व जगांत कसा वाढेल इकडे इटलीच्या मुसलोनीचें लक्ष असतें पण त्याच्या उलट इकडची स्थिति आहे. तेव्हां असला कोरडा मुसलोनी नको तर ओला मुसलोनी पाहिजे.

## बिरड्याची गांठ खुंट्यालगत

लोकतंत्र म्हणजे कांहीं अमर्याद गोष्ट आहे असें नाहीं. तिलाहि कांहीं मर्यादा आहे. परंतु त्या क्षेत्रांत वावरण्यास प्रजेला योग्य वाव मिळाला पाहिजे. आजची स्थिति पाहिली तर ती अगदीं निराशाजनक आहे. प्रजेनेंहि कांहीं बंधनें पाळून राज्यकारभार चालविण्यास तयार असलें पाहिजे व जबाबदारी टाकल्यावर ती तयार होईल असें वाटतें. औंधचेंच उदाहरण घ्या. तेथील अधिपतींनीं स्वराज्यदान करतों असें जाहीर केल्यावर तें दान स्वीकारण्यापूर्वी आपली पात्रता आहे कीं नाहीं याचा तेथील प्रजाजनांना विचार पडून त्यांनीं नुकतीच एक परिषद भरविली हें सर्वांस माहीत आहे. डावांत राज्य अंगावर येतें त्यांतीलच हा एक प्रकार आहे! श्रीमंत सद्गुणी आहेत. त्यांचें चारित्र्य निष्कलंक! पण राज्यकारभाराच्या दृष्टीनें या गोष्टी काय कामाच्या! या अनुकरणरूपी गुणांचा कांहीं उपयोग नाहीं.

येथील प्रजेवर जीं निष्कारण बंधनें संस्थाननें घातलीं आहेत तीं पाहिलीं असतां वाईट वाटतें. राज्यकारभाराच्या बाबतींत हें संस्थान अगदीं मागसलेलें आहे. हरिदास, पुराणिक यांना कीर्तनें व प्रवचनें करण्यास सुद्धां परवानगी लागावी ही खरोखरी लाजिरवाणी गोष्ट आहे. या परिषदेचीच गोष्ट पाहा. बंधनें पाळून परिषद भरविणें ही गोष्ट माझ्या मनाला बरोबर वाटत नाहीं. तेव्हां ही स्थिति बरोबर नाहीं. याचा संस्थानिकांनीं योग्य विचार करावा. परके ते परके व आपले ते केव्हांहि आपलेच. परस्थांनीं

आमच्या संस्थानिकांस अमुक एक करा अशी सक्ती करण्याची वाट तरी कां पाहावी ? त्यांत त्यांना भूषण नाहीं. त्यांनीं आपण होऊनच आपल्या प्रजेस अधिकारदान करावें हें केव्हांहि चांगलें. प्रजेची गुराप्रमाणें अवस्था करूं नका. तिच्या गळ्यांत दावें बांधा, पण तें बरेंच सैल असूं द्या. निदान दाव्याचें बिरडें खुंट्यालगत तरी घालूं नका !

### प्रजेचें कर्तव्य

आतांपर्यंत राजे लोकांच्या कर्तव्याबद्दल आपण विचार केला. आतां प्रजेनेंहि आपलें कर्तव्य कसें बजावलें पाहिजे हें सांगण्याची अत्यंत आवश्यकता आहे. चळवळ चालवितांना प्रजेनें पुढील सहा पथ्यें संभाळलीं पाहिजेत. (१) संस्थानिकांशीं राजनिष्ठ राहावें. (२) संस्थानिकांचें घराणें व विद्यमान व्यक्ति यांच्याबद्दल परिषदेंत चर्चा करूं नये. (३) योग्य त्या खासगी खर्चा-बद्दल (सिव्हिल लिस्ट) प्रजेतर्फें आश्वासन देण्यांत यावें. (४) धर्मद्वेष व जातिद्वेष यांपासून अलिप्त राहावें. (५) दुसऱ्या संस्थानिकांच्या राज्यकार-भारावर निंदाव्यंजक टीका करूं नये, मात्र चांगलें घेण्यासारखें असल्यास तुलनेच्या दृष्टीनें उल्लेख करण्यास हरकत नाहीं. व (६) ब्रिटिश सरकारचा संबंध आणूं नये, कारण तसें केल्यानें संस्थानांत हात घालण्यास आपण त्यांना निमित्त पुरवितों. तसेंच करबंदीसारखी अखेरची वासवी शक्ति आहे असें समजून तिचा भलत्या वेळीं उपयोग करूं नये. खालसांत तिचा उपयोग करतात म्हणून तुम्ही तिचा अवलंब करूं नका. कारण इकडील प्रजेचें व राज्यकर्त्यांचें नातें भिन्न आहे. एवढीं पथ्यें सांभाळलीं तर आपलें काम योग्य रीतीनें चालेल व चालो असें मी इच्छितों."

---

# एकजिनसी नागरिकत्वाची मागणी

(केसरी—२५ ऑगस्ट १९३१)

महाराष्ट्र, कर्नाटक व दक्षिण-हिंदुस्थान या भागांतील संस्थानांच्या नाग-रिकांसाठीं ऑगस्ट महिन्याचा शेवटचा आठवडा हा "संस्थानी लोक-सप्ताह" म्हणून पाळण्याचें ठरलें असून तदनुसार कार्याची योजनाहि झालेली आहे. अखिल भारतीय संस्थानी लोकसभेच्या चालकांनीं व कार्यकर्त्यांनीं

चालू ऑगस्ट महिन्याचे चार आठवडे हे हिंदुस्थानांतील निरनिराळ्या भागांतल्या संस्थानी नागरिकांसाठीं सप्ताहकार्यासाठीं वांटून दिले. गुजराथ-काठेवाड भागांत पहिला आठवडा, राजपुताना व मध्यहिंदुस्थान या भागांत दुसरा आठवडा व पंजाब-ओरिसा इत्यादि भागांत तिसरा आठवडा. याप्रमाणें सप्ताह पाळले जाऊन चालू शेवटचा सप्ताह वर दिल्याप्रमाणें दक्षिणेकडील संस्थानांतून साजरा व्हावयाचा आहे. या सप्ताहांत केवळ सभा-व्याख्यानांचाच कार्यक्रम व्हावयाचा नसून, अखिल भारतीय संस्थानी लोकपरिषदेचे सभासद करणें व संस्थानी लोकसभेनें संस्थानी लोकांच्या किमान मागण्या ठरविल्या आहेत त्यांना हजारों लोकांची लेखी संमति मिळविणें हीं दोन कामें या सप्ताहांत व्हावयाचीं आहेत व त्यासाठीं सर्व संस्थानांतील कार्यकर्त्यांकडे हस्तपत्रकेंहि पाठविण्यांत आलीं आहेत.

अखिल भरतखंडाच्या राज्यघटनेची दुरुस्ती चालू असतां ज्या वर्गांना या दुरुस्तीच्या विलायतेंतील वाटाघाटींत प्रतिनिधित्व लाभलें ते वर्गहि आपल्या प्रतिनिधींचा पाठपुरावा करण्यासाठीं इकडे हिंदुस्थानांत चळवळ करतात. मग ज्या आठ कोटी लोकांचे पहिल्या दुसऱ्याहि गोलमेज परिषदेंत खरे प्रतिनिधि घेतले गेले नाहींत त्यांनीं आपलें म्हणणें गोलमेज परिषदेंत कानांवर जाण्यास किती प्रचंड चळवळ करणें आवश्यक ठरेल बरें ? संस्थानांतील लोकांचे खरे प्रतिनिधि तर गोलमेज परिषदेंत नाहींतच, पण उलट सर्व संस्थानांचे आम्ही प्रतिनिधि म्हणून मिरवणारे संस्थानिक हे तोतये प्रतिनिधि, संस्थानी लोकांच्या हक्कांचा प्रश्न कोणी उपस्थित केल्याबरोबर तो “ अप्रस्तुत व परिषदेच्या क्षेत्राबाहेरचा ” म्हणून ‘मूले कुठारः’ घालण्यासाठीं तेथें टपून बसले आहेत. किंबहुना गेल्या गोलमेज परिषदेच्या बैठकींत दुसऱ्या कोणी संस्थानी नागरिकांचा प्रश्न उपस्थित केला नसतांना देखील, अस्वलाआधीं आरोळी ठोकावी त्याप्रमाणें, “ संस्थानांतील लोकांचा प्रश्न हा आमचा अंतर्गत प्रश्न आहे, तो या परिषदेच्या कक्षेंत येत नाहीं व येणार नाहीं अशा अटीवरच आम्हीं परिषदेंत प्रवेश केला आहे ” असें त्यांनीं हडसून-खडसून बजावलें !

गोलमेज परिषदेंत इतर निरनिराळ्या प्रतिनिधींचाहि संस्थानी लोकांना कांहीं उपयोग होण्याची विशेष आशा नाहीं. इंग्रज प्रतिनिधींना— मग ते कोणत्याहि पक्षाचे असोत— संस्थानिकांची अडचण हिंदी स्वराज्याच्या

मार्गांत परस्पर उत्पन्न झाली तर ती मनांतून हवी असल्यामुळें ते प्रतिनिधि संस्थानिकांनाच अनुकूल असणार. शौकतअल्लींसारखे अल्पसंख्य वर्गांचे प्रतिनिधि ब्रिटिश सरकारच्या आश्रयानेंच आपलें काम साधणार असल्यानें तेहि या बाबतींत ब्रिटिश प्रतिनिधींच्या सुरांत सूर मिळविणार. नेमस्त प्रतिनिधींना मनांतून संस्थानी लोकांची काळजी असली तरी त्यांचा प्रश्न गोलमेज परिषदेच्या विचारकक्षेच्या बाहेरचा आहे असें ठरल्यावर, सनदशीर पद्धतीच्या शिस्तींतच ते वागणारे असल्यानें, ते तो प्रश्न उपस्थित करूं इच्छिणार नाहींत. राहतां राहिले काँग्रेसचे एकमेव प्रतिनिधि. त्यांचें जाणेंच आज डळमळीत आहे. आणि यदाकदाचित् कांहीं तरी तडजोड निघून ते गेले तरी ते संस्थानी लोकांसंबंधीं तेथें काय बोलतील किंवा कांहींच बोलणार नाहींत हेंहि अनिश्चित आहे. कराचीच्या ठरावांत त्यांनीं आपल्या प्रतिनिधित्वा-संबंधीं इतर बंधनें लादून घेतलीं असलीं तरी संस्थानी लोकांच्या प्रश्नासंबंधानें कोणतेंच बंधन लादून घेतलें नाहीं.

संस्थानी लोकप्रतिनिधि कराचीला गेले होते. त्यांचें म्हणणें गांधीजींनीं खासगी रीतीनें ऐकून घेतलें व खासगी आश्वासनांवर विसंबून राहून या प्रश्नाचा उल्लेख ठरावांत घालण्याबद्दल आग्रह धरूं नका असेंच त्यांनीं तेथें सांगितलें ! मुंबईच्या ऑ. इं. कॉ. कमिटीच्या बैठकींतहि गांधीजींनीं सत्यमूर्तींना जाहीरपणें विनंति करून त्यांचे संस्थानी प्रश्नासंबंधाचे ठराव परत घेण्यास लावलें ! गांधीजींच्या वैयक्तिक वजनाचा फायदा काँग्रेसला हवा आहे, व ते त्यांच्या स्वभावानुसार कांहीं विशिष्ट पद्धतीनेंच जातां आलें तर जाणार. यामुळें गांधीजींना नको असलेलें कोणतेंहि बंधन त्यांच्यावर लादण्यास काँग्रेसमधील बहुमत तयार नाहीं. संस्थानी लोकांच्या हक्क-संरक्षणाच्या दृष्टीनें संयुक्त घटनेंत सामील होणाऱ्या संस्थानिकांवर कांहीं अटी घालाव्या असें काँग्रेसमधील बहुमतास व गांधीजींच्या निकटवर्ती अनुयायांसहि वाटत नाहीं असें नाहीं. पण सत्यमूर्तींनीं मुंबईस म्हटल्याप्रमाणें गांधीजींच्या अलौकिक प्रतिनिधित्वाची किंमत म्हणूनच, संस्थानी लोकांच्या बाबतींत अधिक स्पष्ट ठराव करण्याची इच्छा असतांनाहि काँग्रेसच्या बहुमताला त्या इच्छेला दाबून ठेवणें तूर्त प्राप्त झालेलें आहे.

हिंदुमुसलमानांचा वाद येथेंच मिटवून गेलें पाहिजे असा आग्रह ज्या हेतूनें गांधीजींनीं धरला होता त्याच हेतूनें संस्थानिकांशीं भांडण आतांच उपस्थित करावयास नको याबद्दल त्यांनीं आग्रह धरला असला पाहिजे. यासाठीं जसे ते मुसलमानांना झुकतें माप देण्यास तयार असतात तसेच संस्थानिकांनाहि देण्यास ते तयार असतात ही त्यांची वृत्ति सर्वांच्या परिचयाचीच आहे. मिळून काय, कांहीं ना कांहीं कारणानें आज गोलमेज परिषदेंत समाविष्ट असणारे सर्व वर्ग कोणी उघड विरोधी म्हणून, कोणी उदासीन म्हणून, कोणी मतलबी म्हणून, कोणी बेभरंवशी म्हणून, तर कोणी धोरणी म्हणून संस्थानी लोकांच्या हितसंबंधाचें रक्षण करण्याच्या व त्यासंबंधानें आग्रह धरण्याच्या दृष्टीनें निरुपयोगीच आहेत! म्हणून संस्थानी प्रजेचें गाऱ्हाणें गोलमेज परिषदेच्या पुढें येण्याचें इतर मार्ग अवलंबिणें हाच एक रस्ता संस्थानी प्रजेस आतां राहिला आहे. याचा एक मार्ग म्हणजे या वेळीं संस्थानी लोकांतर्फे विलायतेस प्रतिनिधि पाठवून त्यांनीं तेथें बाहेरून चळवळ करणें हा होय.

बाहेरून करण्याच्या खटपटींतहि संस्थानिकांनीं प्रजेकडून उकळलेला पैसा त्या प्रजेलाच विलायतेंत मारक होतो. कायदेशीर प्रश्नाचें बुजगावणें उपस्थित करून संस्थानिकांची अनियंत्रित सत्ता कायम ठेवण्यासाठीं झटणारे मोठे कायदेपंडित आपल्या दिमतीस घेऊन संस्थानिकांना आपलें काम साधतां येतें. शिवाय प्रतिनिधींना मेजवान्या देऊन त्यांना आपलेसे करून घेण्याचें विलायतेंतील शिष्टसंमत साधनहि प्रजेच्या पैशावर संस्थानिक हवें तसें अमलांत आणूं शकतातच. म्हणून संस्थानी लोकांतर्फे विलायतेस गोलमेज परिषदेच्या बाहेर खटपट करणारे लोक पाठवूनच केवळ भागणार नसून येथेंहि चळवळ करून त्यांचा पाठपुरावा केला पाहिजे. येथें चळवळ करून विलायतेंतल्या बैठकींवर कसा परिणाम घडवून आणतां येतो याचें उदाहरण गेल्या वर्षींच्या काँग्रेसच्या चळवळीनें दाखविलेलें आहेच. अर्थात् या संस्थानी आठवड्यापुरतीच केवळ नव्हे तर पुढेंहि तशीच परिणामकारक चळवळ संस्थानी नागरिकांनीं जागरूकपणें केली पाहिजे.

सध्यांच्या सप्ताहांत ज्या दोन गोष्टी करण्याचें ठरलें आहे त्या या दृष्टीनें अत्यंत आवश्यक अशा आहेत. अखिल भारतीय संस्थानी लोकपरिषदेचे हजारों सभासद सर्व हिंदुस्थानभर झाल्यानें या परिषदेच्या अधिकाऱ्यांना व

पुढाऱ्यांना आपल्या प्रतिनिधित्वाचें नाणें खणखणून वाजवून दाखवितां येईल, व त्याबद्दल कोणालाहि शंका घेतां येणार नाहीं. त्याचप्रमाणें संस्थानी लोकपक्षाच्या ज्या किमान मागण्या आहेत त्याहि फारच विचार करून ठरविलेल्या आहेत. त्या अशा कीं, "(१) राज्यघटनेंत संस्थानांतील नागरिकांचे मूलभूत हक्क ग्रथित केले पाहिजेत व संस्थानी नागरिक हा संयुक्त स्वराज्याचा नागरिक समजला गेला पाहिजे. (२) या मूलभूत अधिकारांचें संरक्षण होण्यासाठीं संयुक्त सरकारनें न्यायकोर्टें नेमलीं पाहिजेत. (३) मध्यवर्ती कायदेमंडळांत जे संस्थानी प्रतिनिधि घ्यावयाचे ते खालसा मुलखांतल्याप्रमाणेंच निवडणूक करून घेतलेले असले पाहिजेत व (४) संस्थानांतील न्यायकोर्टांवर संयुक्त सरकारनें नेमलेल्या अखिल भारतीय वरिष्ठ न्यायकोर्टाची हुकमत असली पाहिजे." या किमान मागणींत संस्थानांमध्यें प्रातिनिधिक व जबाबदार राज्यपद्धति स्थापन केली पाहिजे ही मागणी घालण्यांत आली नाहीं. संस्थानिकांच्या गैरवर्तणुकीबद्दल चौकशी करण्याचा जो सार्वभौमत्वाचा हक्क तो ब्रिटिश राजसत्तेकडून हिंदी राजसत्तेकडे यावा ही मागणीहि या किमान मागण्यांत घातली नाहीं हें लक्षांत ठेवलें पाहिजे.

संस्थानिकांनीं पहिल्या गोलमेज परिषदेंत संयुक्त राज्यघटनेचें तत्त्व मान्य करून हिंदुस्थान हें एक व अविभाज्य आहे, या कल्पनेला पाठिंबा उघडपणें दिला. या कल्पनेला संस्थानिकांनीं संमति दिली याबद्दल त्यांचा केवढा तरी गौरव त्या वेळीं करण्यांत आला. पण संस्थानिकांनीं जर प्रामाणिकपणानें व जाणतेपणानें वरील दोन तत्त्वांस संमति दिली असेल तर त्या तत्त्वांचे अगदीं क्रमप्राप्त परिणाम त्यांना पत्करलेच पाहिजेत व तेच अगदीं किमान स्वरूपांत उपरिनिर्दिष्ट चार कलमांत ग्रथित झालेले आहेत. या चारी कलमांचा एकाच वाक्यांत मथितार्थ सांगावयाचा तर तो असा कीं, संयुक्त घटनेंतील नागरिकत्व सर्व हिंदुस्थानभर एकजिनसी असलें पाहिजे. असें तें एकरूप असल्याशिवाय संयुक्त राज्यघटना उभी करूं पाहणें हें वेडेपणाचें तरी ठरेल किंवा तें लबाडीचें तरी लक्षण मानलें जाईल. आणि ही एकजिनसी नागरिकत्वाची भूमिका मान्य न करतांच संस्थानिकांनीं संयुक्त घटनेला मान्यता दिली असेल तर ती केवळ लोकांच्या डोळ्यांत धूळ फेकण्याकरितां घेतलेलें एक सोंग या स्वरूपाचीच मानावी लागेल.

संयुक्त घटना हिंदुस्थानला खरी हितप्रद व्हावयाची असेल तर संस्थानी नागरिकांच्या या मागणीला खालसांतील प्रजेनेंहि पाठिंबा देणें अगदीं आवश्यक आहे. नाहीं तर हिंदुस्थानलाहि खरें जबाबदारीचें स्वराज्य लाभणें दुरापास्त होईल. म्हणून केवळ संस्थानी बांधवांशीं सहानुभूति दाखविण्या-करितांच नव्हे तर आपल्या स्वराज्यावरचें अत्यंत अनिष्ट असें संकट टाळण्या-करितांहि संस्थानी लोकपक्षाच्या या चळवळीला खालसांतील नागरिकांनीं सक्रिय पाठिंबा देणें जरूर आहे. चालू आठवडा हा दक्षिणेकडील संस्थानां-साठीं आहे व त्या संस्थानांतून होणारा कार्यक्रमहि जाहीर झाला आहे. पण त्याशिवाय खालसा मुलखांतील शहरांतून व गांवांतूनहि नागरिकांनीं सभा भरवून संस्थानी लोकपक्षाच्या किमान मागणीला एकमुखी पाठिंबा देणें व या मागणीचा हिंदुस्थानच्या स्वराज्याशीं जिव्हाळ्याचा संबंध कसा आहे हें लोकांना समजावून सांगणें अगत्याचें आहे. संस्थानिक व त्यांचे पाठीराखे आपल्या सोयीसाठीं हिंदुस्थानांतील नागरिकांत भेद करीत असतील. पण हिंदुस्थानांतील लोक तरी हिंदुस्थान हें सामान्य नागरिकांच्या हक्काच्या दृष्टीनें एकजिनसी व अविभाज्य मानतात हेंहि अशा रीतीनें प्रकट होईल. संस्थानी लोक व बाहेरचे लोक हे एकाच राष्ट्रदेहाचे अवयव आहेत. त्यांचीं सुखदुःखें सारखींच असून त्यांचें ध्येयहि सारखेंच आहे. या बाबतींत भेदाभेद करणें हा भ्रम असून स्वराज्याच्या कार्याला तो अमंगल अपशकुन आहे. ही गोष्ट सिद्ध करण्यास संस्थानी लोक व खालसांतील लोक यांचें नित्य सहकार्य संस्थानी चळवळींत असलें पाहिजे.

---

# राजा व प्रजा यांचे संबंध

[ ता. ३० डिसेंबर १९३१ रोजीं देवास येथील कन्याशाळेच्या पटांगणांत दिलेलें व्याख्यान.]

संस्थानिक व त्यांची प्रजा या दोघांचाहि मी मित्र आहे. एका बाजूस कम्यूनिझमसारखीं मतें फैलावणारा वर्ग व दुसरे बाजूस निव्वळ एकतंत्री राज्यकारभार चालविणारा संस्थानिक यांच्या मधोमध उभा राहून, राजा व प्रजा यांनीं एकमेकांचे विचारानें व उभयतांचे हिताचे दृष्टीनें परस्पर-सहका-

रितेनें राज्यकारभार चालविला पाहिजे अशा मताचा मी आहे आणि 'केसरी' पत्राचें आज ५० वर्षांचें धोरण अशाच प्रकारचें आहे. इतर कांहीं ठिकाणांप्रमाणें येथें 'केसरी' पत्रास बंदी नाहीं आणि पूर्वींहि नव्हती. तसेंच येथें सभा भरविण्यास किंवा तींत राजकारणाची चर्चा करण्यास प्रत्यवाय तर नाहींच परंतु इतरत्र न आढळणारी अशी देवास येथील विशेष गोष्ट म्हणजे स्वतः महाराजहि सभेस हजर राहतात आणि त्यांच्यासमोर राजकारणाची चर्चाहि चालते ! असा प्रसंग हा माझ्या आयुष्यांत पहिलाच असून तिचा उल्लेख मी कोठेंहि गेलों तरी मोठ्या अभिमानानें करीन.

घरांतील कर्ता पुरुष, आपल्या बायकामुलांचें मत घेऊनच घरचा कारभार करीत असतो. त्याचप्रमाणें राजानें प्रजेला विश्वासांत घेऊन तिच्या सल्लामसलतीनें राज्यकारभार चालविला पाहिजे. राजा हा प्रजेचा पिता, या दृष्टीनें त्यानें निव्वळ स्वार्थांध न होतां प्रजेच्या सहकार्यानें सर्वांच्या सुखाच्या गोष्टी केल्या पाहिजेत. भारतवर्षांतील प्राचीन राज्यकर्ते अशाच बुद्धीनें कारभार करीत असत. यःकश्चित् तापसाच्या आश्रमांतील हरिणींचेंहि कुशल राजा विचारीत असे. तात्पर्य, राजा व प्रजा यांचे संबंध एकमेकांशीं अत्यंत प्रेमाचे असत. आजहि प्रजा राजाला मायबाप समजते आणि कायद्याच्या दृष्टीनें राजा प्रजाजनांचा शेवटचा वारस ठरतो. अशा स्थितींत राज्यकारभारांत प्रजेस योग्य वांटा देणें राजाचें कर्तव्य आहे. हिंदुस्थानच्या नकाशांतील पिवळा रंग पुसून टाकून सर्वत्र एकरंगी कुंचला फिरवावा असे विचार आज लोकांपुढें येत आहेत. तथापि संस्थानें हीं जुन्या वैभवाचीं अभिमानानें दाखविण्याजोगीं चिन्हें असून तशीं तीं टिकावींत व त्यांबद्दल आपणांस अभिमान वाटतो. संस्थानें बुडवूं नयेत अशा मताचा मी आहे. तथापि भावी राज्यघटनेंत त्यांचें स्थान अढळ राहावें अशी संस्थानिकांची इच्छा असेल तर त्यांनीं प्रजारंजनाचें आपलें कर्तव्य चोख रीतीनें पार पाडलें पाहिजे. या बाबतींत संस्थान लहान आहे, अशी त्यांस अडचण दाखवितां येणार नाहीं. संस्थान कितीहि लहान असो, तेथील अधिपतीस आपल्या प्रजेस राज्यकारभारांत सहकार्य करूं देणें अशक्य नाहीं. उलटपक्षीं प्रजेनें राजाच्या इभ्रतीस शोभेल असा त्याचा मानमरातब कायम ठेवणें अवश्य आहे.

संस्थानांत चळवळी करणारांनीं राजकुलाविषयीं आदर बाळगावा व ब्रिटिश हद्दींतील राजकारण त्यांनीं संस्थानांत आणूं नये. संस्थानांतील

लोकांना त्यांचेंच काम पुरेसें आहे. एवढें करून मग राजाजवळ राज्य-कारभारांतील आपला न्याय्य हक्क त्यांनीं मागावा आणि त्यासाठीं अवश्य वाटल्यास मार्गांत आड येणारे कायदेहि खुशाल मोडावे ! संस्थानिक व त्यांचे प्रजाजन एकाच रक्तामांसाचे आहेत आणि कोणताहि सुज्ञ संस्थानिक त्यांचें मागणें अमान्य करूं शकणार नाहीं.

---

# भोरमधील राजकीय सुधारणा

(केसरी—जानेवारी १९३२)

[भोर कायदेमंडळांत केलेल्या भाषणाचा सारांश]

**मी** या कायदेमंडळाचा सभासद नसतांना मला निमंत्रण करून आज येथें भाषण करण्यास परवानगी दिली याबद्दल मी श्रीमंत सरकारांचा फार आभारी आहे. सहा महिन्यांपूर्वी याच ठिकाणीं खासगी स्वरूपाची सभा भरविण्यांत आली होती त्या सभेस कायदेकौन्सिलचे सर्व सभासद व इतर निमंत्रित मंडळी बरीच हजर होती. त्या वेळीं कौन्सिलच्या घटनेबद्दल सर्वांनीं मोकळेपणानें विचारविनिमय केल्यावर त्याबद्दल मीं रिपोर्ट तयार करून तो येथें वाचून दाखविला होता. त्याचा अखेरचा निकाल कसा लागला याबद्दल संधि मिळेल त्याप्रमाणें चौकशी करीत होतों. त्या वेळीं वाटाघाटींत ठरल्याप्रमाणें कांहीं गोष्टींचा निकाल लागला आहे व कांहींचा अद्याप लागावयाचा आहे. सर्व गोष्टींचा निकाल होईल त्या वेळीं प्रसंग येईल त्याप्रमाणें योग्य तें आपण कराल अशी मला आशा आहे.

### अभिनंदनाच्या बाबी

आतां श्रीमंतांनीं आपले भाषणांत ज्या गोष्टी जाहीर केल्या त्यांत चालू सालीं खासगी खर्चांपैकीं १५ हजार रुपये कमी करण्यापासून तों फेडरेशनपर्यंत दूर दृष्टि दाखविली, यांबद्दल मी आपलें अभिनंदन करतों. खासगी खर्चाची रक्कम श्रीमंतांनीं स्वयंस्फूर्तीनें कमी केली असावी. कदाचित् या बाबतींत कांहीं सूचना आली असल्यास मला माहीत नाहीं. श्रीमंतांनीं तालुका लोकल बोर्डें दिल्याचें जाहीर केलें हीच स्थानिक स्वराज्याची पहिली पायरी आहे. ही

योजना फार चांगली आहे. लोकल बोर्डें कौन्सिल देण्यापूर्वीच मिळणें जरूर होतें. लोकल बोर्डें हींच प्राथमिक महत्त्वाचीं आहेत. आतां तालुका लोकल बोर्डें असावींत का जिल्हा लोकल बोर्ड असावें, हा एक प्रश्न आहे. बडोदें संस्थानांत प्रथम तालुका लोकल बोर्डें देण्यांत आलीं होतीं, परंतु तालुका लोकल बोर्डांचा कारभार सुयंत्रित न चालल्यामुळें तालुका लोकल बोर्डें मोडून जिल्हा लोकल बोर्डें स्थापन करण्यांत आलीं. ब्रिटिश हद्दींतहि तालुका लोकल बोर्डें व जिल्हा लोकल बोर्डें यांची अधिकारवांटणी बरोबर झालेली नाहीं. तालुका लोकल बोर्डें जिल्हा लोकल बोर्डांतून निर्माण होण्यासारखीं असतात. कायदे कौन्सिलांत लोकनियुक्त सभासद निवडून देण्याचे अधिकार द्यावयास पाहिजे होते. त्याप्रमाणें तालुका लोकल बोर्डांस कौन्सिलचे सभासद निवडून देण्याचे अधिकार दिले आहेत. यामुळें कौन्सिलांत सभासद निवडून येण्याचें तत्त्व लागू झालें आहे. परंतु लोकल बोर्डांतील सभासद निवडून देण्याचा अधिकार मागून म्हणजे ३ वर्षांनीं मिळण्याचा आहे. कौन्सिलास निवडणुकीचें तत्त्व लागू करण्यास आपण नामदार सभासद मंडळी विरुद्ध होतां; परंतु मीं आपल्या विरुद्ध जाऊन निवडणुकीचें तत्त्व लागू करण्याबद्दल रिपोर्ट केला होता. श्रीमंतांनीं माझ्या रिपोर्टाप्रमाणें तालुकानिहाय एक एक सभासद निवडून देण्याचा अधिकार दिला ही फार चांगली गोष्ट झाली आहे. आरंभीं सुधारणेचे बाबतींत हें धीमें पाऊल असलें तरी सुधारणेबद्दल आपण सर्वांनीं निःशंक राहावें.

## श्रीमंतांचें प्रागतिक धोरण

श्रीमंतांचें धोरण प्रागतिक आहे. त्यांनीं तीन वर्षांनीं तालुका लोकल बोर्डांस निवडणुकीचें तत्त्व लागू करण्याचें जाहीर केलें आहे. पण कदाचित् त्यांचे मर्जीस आल्यास तें त्यापूर्वींहि लागू होईल अशी मला आशा आहे. फेडरेशनबद्दल श्रीमंतांनीं व्यक्त केलेले आपले विचार सर्वस्वीं युक्त आहेत. फेडरेशन हा एक गहन विषय आहे. सर्व हिंदुस्थान एकजीव व्हावा, ब्रिटिश हिंदुस्थान व संस्थानी हिंदुस्थान एकजीव व्हावेत ही उदात्त भावना आहे. प्रत्येक संस्थानानें, मग तें लहान असो अगर मोठें असो, फेडरेशनमध्यें सामील होण्यांत हित आहे. फेडरेशनमध्यें सामील होण्यास श्रीमंत सरकार कबूल आहेत ही गोष्ट ऐकून फार समाधान वाटलें. एखादें लहान संस्थान फेडरेशनमध्यें सामील झालें काय किंवा न झालें काय त्यांत फेडरल इंडियाचें

नुकसान नाहीं. पण श्रीमंतांनीं आपलें चालू सालचे खासगी नेमणुकीपैकीं १५ हजार रुपये कमी करून या रकमेवरील व्याजाचा विनियोग लोकल बोर्डानें करावा असें ठरविलें ही फार समाधानाची गोष्ट आहे. हल्लीं फ्रँचाइज् कमिटी हिंदुस्थानांत आली असून मताधिकाराबद्दल लौकरच वाटाघाट होणार आहे. त्यांतून आपल्याला उपयुक्त कल्पना निघण्याचा संभव आहे. तेव्हां लोकल बोर्डाचे निवडणुकीस श्रीमंतांनीं तीन वर्षांची मुदत ठेवली आहे, हें एक तऱ्हेनें सोईचेंच झालें आहे.

## थोडी स्पष्टोक्ति

आतां श्रीमंतांनीं जाहीर केलेल्या सुधारणांबद्दल आपलें समाधान होणार नाहीं. माझेंहि समाधान झालेलें नाहीं, हें मी स्पष्टपणें बोलून दाखवितों. माझा स्पष्टपणा श्रीमंतांस माहीत असल्यामुळें ते मजवर रागावणार नाहींत अशी माझी खात्री आहे. परंतु श्रीमंतांनीं सुधारणेचें पाऊल पुढें टाकलेलें आहे यांत शंका नाहीं. १० वर्षांपूर्वीं जेथें सभा भरविण्यास बंदी होती त्या ठिकाणीं १० वर्षांत इतकी सुधारणा झाली आहे यावरून श्रीमंतांचें धोरण प्रागतिक आहे हें आपणासहि कबूल असेल असें मला वाटतें. खासगी खर्च वगैरे बाबी सोडून बाकीचा कारभार रयतेसाठीं रयतेनें करावयाचा हीच खरी सुधारणा आहे व तशी सुधारणा श्रीमंत आज नाहीं कांहीं कालानें करतील अशी मला आशा आहे. रयतेनें रयतेच्या सोयी करण्यांत गैर तें काय आहे? उलट तें लोकांना फायदेशीर होऊन सरकारासहि सुखावह होणार आहे. उदाहरणार्थ रा. वाग्भटराव देशपांडे यांनीं विधवांच्या पोटगीबद्दल व दत्तकाबद्दल अडचण लक्षांत येतांच बिलें आणलीं व एक बिल थोडें दुरुस्त होऊन व दुसरें तसेंच पास झालें यावरूनहि मी म्हणतों त्याप्रमाणें आपल्या हातानें आपल्या अडचणी दूर कशा करतां येतात हें सिद्ध झालें आहे. वास्तविक आपल्या शास्त्राप्रमाणें बहिणीचा मुलगा व आपला नातू दत्तक घेण्यास हरकत नाहीं. पेशव्यांच्या डायऱ्या पाहिल्या तर असे दत्तक घेण्यास परवानगी होती हें कळून येईल. परंतु ब्रिटिश सत्तेखालीं निर्णय देणें आपले हातीं नसल्यामुळें या अडचणी येत आहेत.

## स्वराज्यदानाचें भूषण व फायदा

तिकडील असेंब्लींत सामाजिक बिलेंहि पास करून घेण्यास फार जिकीर होते. मी स्वतः ७ वर्षें असेंब्लीचा सभासद होतों. रा. सारडा यांना बिल

पास करून घेण्यास किती यातायात पडली तें मला माहीत आहे; पण आपले येथें श्रीमंतांची सहानुभूति व आपलें सहकार्य मिळाल्यानें बिलें लवकर पास झालीं व म्हणून आपले कौन्सिलनें पास केलेल्या या दोन बिलांबद्दल रा. वाग्भटराव यांचें मी अभिनंदन करतों. रा. वाग्भटराव यांस सुधारक म्हणा अगर वाटेल तें म्हणा पण त्यांनीं खटपट करून समाजास भासणारी ही अडचण दूर करून घेतली आहे तेव्हां मी सांगितल्याप्रमाणें कारभार लोकांचे हातीं देण्यांत कोणाचेंच नुकसान नाहीं."

---

# हिंदी संस्थान प्रजापरिषद्, मुंबई

## अधिवेशन ४ थें

### (अध्यक्षीय भाषण-जुलै १९३३)

आजची बैठक खालसा व संस्थानी या दोन्हीं भूभागांच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाच्या वेळीं बोलावण्यांत आलेली आहे. जॉइंट पार्लमेंटरी कमिटीचें काम जवळ जवळ पुरें होत आलें आहे. या कमिटीच्या रिपोर्टांतील निर्णय कोणते होतील याचा अंदाज करणें आज शक्य नाहीं. संस्थानें व खालसा मुलूख यांच्या दरम्यानचे भविष्यकालीन संबंध कोणत्या स्वरूपाचे असतील याची अंधुक कल्पना कमिटीच्या सभासदांना व त्यांच्या सहकाऱ्यांना असेल ! ! परंतु येथें हिंदुस्थानांत संघटनेची योजना तयार होत आहे कीं तिची मोडतोड होत आहे याजबद्दल कांहींच कल्पना नाहीं. सबब या वेळीं संस्थानी प्रजाजनांचें हितसंवर्धन व्हावें अशी खटपट करणाऱ्यांनीं संघटनेच्या योजनेच्या या अत्यंत महत्त्वाच्या प्रश्नाकडे आपली नजर ठेवून त्या प्रश्नाची चर्चा केली पाहिजे; या दृष्टीनें बैठकीचे वेळीं संस्थानी प्रजाजनांच्या दृष्टीनें महत्त्वाच्या परंतु किरकोळ स्वरूपाच्या व हरघडी अनुभवास येणाऱ्या इतर प्रश्नांकडे लक्ष न लावतां संघटनेच्या महत्त्वाच्या प्रश्नाकडेच आपलें सर्व चित्त वेधविलें पाहिजे.

#### संघटनेचें ध्येय

हिंदुस्थानांत अराजकतेचें साम्राज्य होऊं नये अशी जर इच्छा असेल, तर खालसा मुलूख व संस्थानें यांच्यामधील एखाद्या: सामाईक हितसंबंधाच्या

दोरीनें सर्वांवर अंमल ज्याचा राहील अशा राज्यपद्धतीनें त्यांना बांधून टाकणें अवश्य आहे. हिंदुस्थानांत सुमारें ६०० संस्थानें आहेत; त्यांचे संघ खालसा मुलुखांतील साधारणतः प्रांताच्या क्षेत्राबरोबरीचे करून हे संस्थानांचे घटक व खालसांतींतील प्रांत यांची संघटना करणें योग्य होईल. याबद्दल निरनिराळया तत्त्वांवर निरनिराळया योजना सुचवितां येणें शक्य आहे. परंतु माझ्या म्हणण्याचा अर्थ इतकाच आहे कीं, खालसा मुलुखाच्या निरनिराळया प्रांतांत जसा एकसूत्रीपणा आहे, तशी परिस्थिति संस्थानांचे बाबतींत उत्पन्न करून संघटनेची योजना अस्तित्वांत आणण्याचा सक्त प्रयत्न करून पाहिला पाहिजे. संघटना व अधिकारविभागणी या परस्परविरोधी पद्धति आहेत, परंतु त्यांचा समन्वय घालणें शक्य आहे. हिंदी जनतेला हिंदी तत्त्वज्ञानानें ऐक्यांत विविधता व विविधतेंत ऐक्य पाहण्याची सवय झालेली आहे व ही गोष्ट सजीव परिमाणूपासून विराटस्वरूपी जगाच्या कल्पनेंतील प्रत्येक अंशमात्रांत दृग्गोचर होते.

## संस्थानामध्यें युरोपीय दिवाण

संघटनेच्या योजनेबरोबर संस्थानांतील मंत्रिमंडळांत बरीच बदलाबदल करण्यांत येत आहे. हिंदी प्रधान शक्य तितक्या ठिकाणीं काढून टाकून त्या ठिकाणीं युरोपीय गृहस्थांच्या नेमणुका करण्यांत येत आहेत. संस्थानांचा कारभार बेबंद झाल्यामुळें ज्याच्या कारभारांत साम्राज्य सरकारास हात घालणें अवश्य वाटलें, त्या त्या संस्थानांचा कारभार हातीं घेऊन त्याला इष्ट स्वरूप प्राप्त व्हावें म्हणून निरनिराळ्या खात्यांतील महत्त्वाच्या जागीं मुलकी अगर लष्करी युरोपियन अधिकाऱ्यांच्या नेमणुका करण्यांत येत आहेत. या गोष्टीकडे दोन दृष्टींनीं पाहिलें पाहिजे. संस्थानामध्यें लहान मोठ्या सर्व जागांवर हिंदी अधिकारी असून, संस्थानचा कारभार सुयंत्र चालतो असें दाखवून, खालसा मुलुखांत नोकरशाहीचें हिंदीकरण करण्याबद्दल जी मागणी करण्यांत येत आहे, तिचें वैय्यर्थ्य सिद्ध करावयाचा हा डाव आहे. तसेंच मध्यवर्ती कायदेमंडळ संघटनात्मक स्वरूपाचें झाल्यावर त्यांतील संस्थानांचे प्रतिनिधि म्हणून युरोपीय अधिकाऱ्यांची नेमणूक करण्यास अवसर मिळून ते संस्थानांचे प्रतिनिधि म्हणून सर्व चर्चेंत भाग घेऊन मतें देऊं शकतील, हा हेतु या योजनेच्या बुडाशीं दिसतो. या नवीन धोरणामुळें हिंदी लोकांचें व संस्थानांचें नुकसान होणार आहे. खालसा मुलुखांतील सुधारणेनें व्हावयाच्या हिंदीकरणानें होणारें

युरोपियन तरुणांचें नुकसान यामुळें भरून निघणार आहे, व मध्यवर्ती कायदेमंडळांत संस्थानिकांच्यातर्फेचे युरोपियन सभासद तेथें जाऊन संस्थानिकांना मिळालेल्या जास्त सभासदांच्या संख्येचा फायदा घेऊन ब्रिटिश राजसत्तेच्या मताला अप्रत्यक्ष रीतीनें महत्त्व प्राप्त होणार आहे. हिंदी संस्थानिकांचे हे नांवाचे युरोपीय प्रतिनिधि मध्यवर्ती कायदेमंडळांत ब्रिटिश राजसत्तेचे हेतु आपल्या वजनानें पुरे करूं शकणार आहेत !

## शुभ्रपत्रकांतील संघटनेची योजना

संस्थानांना संघटनेंत सामील होणें किंवा न होणें याची जशी मुभा राहत आहे, त्याप्रमाणें संस्थानिक म्हणतील त्या अटींवर त्यांना संघटनेंत समाविष्ट करून घ्यावयाचें किंवा नाहीं याबद्दलचें स्वातंत्र्य साम्राज्य सरकारासहि असणें क्रमप्राप्त आहे. एकदां एखादें संस्थान संघटनेंत सामील झालें म्हणजे त्याला मर्जीमाफक तिच्यांतून फुटून जातां येणार नाहीं. त्या संस्थानाची एखादी तक्रार असेल तर तिचा निर्णय सुप्रीम कोर्टामार्फत लावून घेण्याचा हक्क सदर संस्थानास राहील.

संघटनेच्या योजनेमध्यें सर्व घटकांस लागू असणाऱ्या अशा कित्येक विषयांना सांघिक विषय म्हणतां येतील व दोन विभाग असलेल्या मध्यवर्ती कायदेमंडळामार्फत संघटनेंतील घटकांना त्यांच्या प्रतिनिधींच्या द्वारें सांघिक विषयासंबंधानें नवे कायदे करणें किंवा जुने रद्द करणें याबद्दलचा कायदे करण्याचा अधिकार अन्य घटकांच्या सहकार्यानें बजावतां येईल. या मध्यवर्ती कायदेमंडळाच्या खालच्या विभागाचें नांव 'असेंब्ली' हें राहणार असून, तिच्या एकंदर ३७५ सभासदांपैकीं १२५ सभासद संस्थानी हिंदुस्थानच्या घटकांतर्फे संस्थानिकांच्या नेमणुकीनें यावयाचे आहेत, व वरिष्ठ विभागाच्या २६० सभासदांपैकीं १०० सभासद या सेनेटमध्यें संस्थानिकांच्या नेमणुकीनें बसावयाचे आहेत ! या मध्यवर्ती कायदेमंडळाच्या दोन्ही विभागाच्या सभासदांपैकीं संस्थानी हिंदुस्थानच्या वांटणीस आलेल्या सभासदांच्या संख्येची वांटणी संस्थानासंस्थानामध्यें कशी करावयाची हें अद्याप निर्णित झालेलें नाहीं. नरेंद्र-मंडळाच्या स्टँडिंग कमिटीनें या सभासदांची एक योजना तयार केली आहे. सदर योजना नरेंद्रमंडळांतील व बाहेरील बऱ्याच संस्थानिकांना मान्य नाहीं. तेव्हां या प्रश्नाचा निर्णय मुख्य प्रधानमंडळ यांच्या निर्णयानें व्हावा अशी परिस्थिति निर्माण होण्याचा संभव आहे. आणि ही

परिस्थिति हिंदु-मुसलमानांच्या निर्णयाप्रमाणें हिंदी जनतेच्या आपसांतील भांडणाचें दुसरें एक प्रदर्शन आहे.

मध्यवर्ती कायदेमंडळांतील वरिष्ठ विभागांतील संस्थानी सभासदांची वांटणी, संस्थानांचा दर्जा व घराणें, सलामी वगैरेनीं निश्चित होणारें त्यांचें महत्त्व यावर अवलंबून ठेवण्यांत येईल व खालच्या विभागांतील संस्थानी सभासदांची वांटणी लोकसंख्येच्या प्रमाणावर अवलंबून ठेवण्यांत येईल. साधारणतः मध्यवर्ती कायदेमंडळाच्या वरिष्ठ विभागांत संस्थानांचे प्रतिनिधि म्हणून संस्थानिक स्वतः अगर त्यांच्या दरबारांतील प्रमुख अधिकारी हे येतील व खालच्या विभागांत बिनअधिकारी अशा एखाद्या गृहस्थाची नेमणूक संस्थानिक अगर संस्थानी दरबार करतील. सांघिक विषयासंबंधाचे सर्वाधिकार संस्थानी घटक प्रथम बादशाही गादीकडे सुपूर्त करतील व नंतर बादशहा ते संघटनात्मक स्वरूपाच्या स्वाधीन करतील. हे अधिकार संस्थानिक कराराबरहुकूम बादशहांकडे सोंपवितील. सांघिक विषयाव्यतिरिक्त बाकीच्या विषयासंबंधाचे साम्राज्य सरकारचे अधिकार आजच्याप्रमाणें गव्हर्नर जनरल-इन्-कौन्सिल यांचेकडे न राहतां, ते बादशहांचे प्रतिनिधि म्हणून व्हाइसरॉयसाहेब यांचेकडे सोंपविण्यांत येतील !

## संस्थानें ही खासगी मालमत्ता नव्हे !

भविष्यकालीन मध्यवर्ती सरकार जबाबदार स्वरूपाचें झाल्यास आपण संघटनेंत सामील होऊं अशी जी अट संस्थानिकांनीं संघटनेचे बाबतींत घातली आहे, ती गोष्ट त्यांनीं शहाणपणाची केली आहे. तथापि त्यांनीं आपलें धोरण स्वार्थपरायण ठेवतां कामा नये व मध्यवर्ती कायदेमंडळांत खालसा मुलुखांतील प्रांतांचे प्रतिनिधि ज्या तत्त्वावर जातील त्या तत्त्वावर संस्थानी घटकांचे प्रतिनिधि पाठविण्यास मान्यता द्यावी. त्याचप्रमाणें खालसा मुलुखांत जशा प्रातिनिधिक संस्था स्थापन करणें, खासगी खर्चाकरितां नियमित रक्कम घेणें, संस्थानांचा कारभार 'ट्रस्टी' या नात्यानें लोकहितपर अशा त्यांच्या संमतीनें ठेवणें, संघटनेनंतर वरिष्ठ सरकारचे पक्षपाती म्हणून खालसा मुलुखांतील जनतेविरुद्ध वागण्याचें धोरण न ठेवणें, खालसा मुलुखांतील जनतेच्या लोकशाहीच्या आकांक्षांविरुद्ध आपलें वजन वरिष्ठ सरकारच्या पारड्यांत न टाकणें, आपल्या राजसत्तेची भलती घमेंड बाळगून इंग्लंडच्या गादीशीं आपले संबंध जोडण्याची

नसती हाव न धरणें, वगैरे गोष्टी संस्थानिकांनीं आजच्या परिस्थितींत करण्यासारख्या आहेत.

### बादशहा म्हणे संस्थानिकांचे दोस्त

हें ध्येय गांठण्याचा मार्ग कष्टाचा आहे; परंतु नजरेपुढें ठेवलेलें ध्येय खरें स्वराज्याचें आहे व यासाठींच संस्थानिकांना माझी अशी विनंति आहे कीं, त्यांनीं हिंदुस्थानांत लोकशाहीचा कारभार जारी होईल असें आपलें धोरण ठेवून, आपलें व आपल्या देशबांधवांचें हित साधावें. इंग्रजी राजसत्तेचे 'सहकारी' या पोकळ पदवीनें आपलें डोकें भ्रमूं देऊं नये. त्यांनीं आपलें आजचें धोरण कायम ठेवल्यास त्यांना यावत्चंद्रदिवाकरौ ब्रिटिशांच्या गुलामगिरींतच खितपत पडावें लागेल. इंग्लंडच्या राज्यघटनेंत ग्रेट ब्रिटनच्या गादीनशीन व्यक्तीस काय अधिकार आहेत, याबाबत संस्थानिक आपली गैरसमजूत करून घेऊन, बादशाही गादीशीं स्वतःस जोडून घेत आहेत. साम्राज्याच्या दृष्टीनें त्यांना खालसा मुलुखापेक्षां विशेष महत्त्व मिळेल असें मुळींच नाहीं. संस्थानिकांना हिंदुस्थानांतच राहावयाचें असल्यामुळें त्यांनीं 'सुसरीबाई, तुझी पाठ मऊ' असें म्हणूनच येथील जनतेशीं वागलें पाहिजे.

### संस्थानी प्रजेच्या मागण्या

संस्थानी प्रजेच्या मागण्या खालीलप्रमाणें आहेतः—

( १ ) अधिराजत्वाचे अधिकार पूर्णपणें संघटनात्मक स्वरूपाच्या मध्यवर्ती सरकाराकडे असावेत.

( २ ) संक्रमणाच्या कालांत अधिराजत्वाचे अधिकार राखीव म्हणून पाहिजे तर समजण्यांत यावेत.

( ३ ) संक्रमणाच्या कामांत संस्थानिकांनीं संस्थानांतील राजयंत्र असें सुधारावें कीं, संक्रमणाचे कालान्ते अखेरीस संस्थानांतून जबाबदार-पद्धतीचा राज्यकारभार जारी करणें शक्य व्हावें.

( ४ ) ज्या संस्थानांचा राज्यकारभार खालसांतील प्रांताच्या राज्यकारभारासारखा जवळ जवळ आहे, त्या संस्थानांनाच संघटनेंत सामील करून घ्यावें.

( ५ ) वरील अटींप्रमाणें संस्थानांतील राज्यकारभार सुधारला गेला तर संघटनात्मक स्वरूपाच्या राजसत्तेकडे सोपवावयाच्या खात्यांची संख्या व

इतर खात्यांची संख्या कमी होईल व याप्रमाणें अखिल भारतीय संघटना पूर्णत्वास पोंचेल.

(६) संघटनात्मक स्वरूपाच्या राजसत्तेच्या मध्यवर्ती कायदेमंडळांत संस्थानी घटकांचे प्रतिनिधि निवडणुकीचे तत्त्वानुसार पाठविण्यांत यावेत व या कायदेमंडळाच्या कोणत्याहि विभागांत संस्थानिकांच्या नेमणुकीच्या सभासदांनीं स्थान मिळूं नये.

(७) संघटनात्मक स्वरूपाच्या सरकारच्या अंमलाखालीं असणाऱ्या खात्याबाबतचे जे कायदे मध्यवर्ती कायदेमंडळांत पास होतील त्यांची अंमलबजावणी संस्थानी घटकांच्या क्षेत्रांत आपोआपच व्हावी. तसेंच या खात्यांचा कारभार मध्यवर्ती सरकारच्या अधिकाऱ्यांमार्फत चालावा. मध्यवर्ती कायदेमंडळामध्यें पास झालेल्या कायद्यांचें अतिक्रमण करण्यांत आल्यास अगर संघटनात्मक स्वरूपाच्या सरकारच्या हातीं सुपूर्त केलेल्या खात्यांच्या कारभारांत, संस्थानी मुलुखांत जर कांहीं कमजास्त घडून येईल. तर त्याबाबतचा निर्णय करण्याचा अधिकार संघटनेच्या वरिष्ठ न्यायपीठास असावा.

(८) संस्थानी घटकांत जबाबदार पद्धतीचें राज्ययंत्र अस्तित्वांत येईपर्यंत व तेथें न्यायखातें स्वतंत्र स्वरूपाचें होऊन, कायद्याचें राज्य प्रस्थापित होईपर्यंत, संस्थानांतील न्यायखात्यावर संघटनात्मक सरकारच्या वरिष्ठ कोर्टाची हुकमत चालावी.

(९) संघटनेची घटना तयार करणाऱ्या कायद्यांत जनतेच्या जन्मसिद्ध हक्काच्या संरक्षणाबद्दलचीं कलमें असावींत, व या हक्कांचें अतिक्रमण झाल्यास त्याबद्दलची दाद संघटनात्मक सरकारच्या वरिष्ठ कोर्टांत मागतां यावी.

(१०) यापुढें अखिल भारतीय स्वरूपाची घटना तयार करण्याकरितां ज्या ज्या परिषदा बोलाविण्यांत येतील, त्यांमध्यें संस्थानी प्रजाजनांच्या प्रतिनिधींना स्थान मिळणें जरूर आहे.

## मूलभूत हक्क

नैसर्गिक हक्कांची घोषणा करणें आवश्यक आहे. खालसा मुलुखांतील लोकांच्या दृष्टीनें अशी घोषणा करणें तत्त्वाच्या दृष्टीनेंच तेवढें आवश्यक होईल. तशी ती करण्यानें घटना तयार करणाऱ्यांचा सद्धेतु, संस्कृति व राजकीय शहाणपणा हें दाखविण्यापुरता तरी त्याचा उपयोग होईल. आजच्या

विसाव्या शतकांत संस्थानांतील प्रजाजनांना नागरिकत्वाचे अगर मनुष्यप्राण्याचे हक्कसुद्धां नसावेत ही मोठी अजब गोष्ट आहे. संघटनात्मक सरकारच्या आधीन केलेल्या खात्यांचा दर्जा किती मोठा आहे, याचें निवेदन हक्कांचे जाहीर घोषणेंत एकदां केलें पाहिजे असें माझें आग्रहाचें म्हणणें आहे; व जोंपर्यंत संस्थानिक आपल्या प्रजाजनांच्या नैसर्गिक हक्कांच्या घोषणेस मान्यता देणार नाहींत तोंपर्यंत, अशी लुळीपांगळी संघटना अस्तित्वांत आणणें योग्य होणार नाहीं.

## संघटनेंत संस्थानांचे प्रतिनिधि

संघटनेनंतर मध्यवर्ती कायदेमंडळांत जे संस्थानी घटकांचे प्रतिनिधि खालसा मुलुखांतील प्रतिनिधींबरोबर मांडीस मांडी लावून संघटनेच्या राज्यकारभाराची चर्चा करण्याकरितां येतील, त्यांच्या योग्यतेची व त्यांच्या प्रातिनिधिकत्वाची दूरदुरून का होईना आम्हांस चौकशी करणें प्राप्त आहे. या नव्या कायदेमंडळामध्यें बेबंद सत्ताधारी संस्थानिकांच्या गुलामगिरीचा छाप असणारे संस्थानिक प्रतिनिधि येण्याचें ठरल्यास त्यांच्याशीं सहकार्य करणें शक्य आहे किंवा काय याचा विचार करावा लागेल.

संस्थानी दरबार संस्थानांच्या प्रतिनिधींना मध्यवर्ती कायदेमंडळांत पाठवितांना त्यांना प्रातिनिधिक स्वरूप देण्याची काय तजवीज करणार आहेत, या माझ्या प्रश्नास येथील संस्थानी प्रतिनिधींनीं या बैठकींत उत्तर दिलें पाहिजे असें माझें म्हणणें नाहीं. परंतु मी वर वर्णन केलेली विषमता त्यांना पटली असून, सदर गोष्टीचा विचार संस्थानी दरबाराकडून अवश्य होईल एवढें जरी त्यांनीं सांगितलें तरी मला त्याचें तेवढें उत्तर या वेळीं पुरें आहे.

## संस्थानी प्रजेच्या प्रतिनिधींना मज्जाव

लॉर्ड रेडिंग हे हिंदुस्थानांत व्हाइसरॉय असतांना त्यांनीं, निजामसाहेबांनीं भलती भाषा सुरू करतांच खणखणीत उत्तर देऊन त्यांच्या डोळ्यांत चरचरीत अंजन घातलेलें सर्वांच्या माहितीचें आहे. कोणत्याहि संस्थानिकाला त्याच्या अव्यवस्थित राज्यकारभाराबद्दल पदच्युत करण्याचा वरिष्ठ सरकारला मात्र अधिकार आहे असें निजामसाहेबांना सांगणारे लॉर्ड रेडिंग हे त्याच निजामसाहेबांच्या प्रधानाबरोबर गोलमेज परिषदेंत बरोबरीचे सभासद या नात्यानें बसत आहेत! हिंदुस्थानच्या स्टेट सेक्रेटरीच्या दर्जाच्या

जागेवर असलेल्या इंग्रज गृहस्थाला सांगलीसारख्या छोट्या संस्थानचा दिवाण अगर खालीकोटचा जमीनदार यांचेबरोबरीनें एका टेबलाभोंवतीं बसण्यांत अपमान वाटत नाहीं. संस्थानिकांनीं संस्थानी प्रजाजनांच्या प्रतिनिधींबरोबर बसण्याचें नाकारून आपल्या प्रजाजनांचीं मनें फार दुखविलीं आहेत! ब्रिटिश सरकारनें थोडें व्यवहारज्ञान दाखवून संस्थानिकांची ही मागणी नाकारावयास पाहिजे होती, परंतु या वेळीं ब्रिटिश मुत्सद्द्यांनीं संस्थानिकांवरील ब्रिटिश राजसत्तेच्या अधिकारांत काडीचाहि कमीपणा होऊं न देतां, संस्थानी प्रजाजनांच्या मागण्या तेवढ्या धुडकावून लावलेल्या आहेत.

संघटनेचा प्रश्न निरनिराळ्या सर्व बाजूंनीं आज विचार करण्यासारखा आहे. कारण घटनेचा कायदा एकदां पास झाला म्हणजे त्यांत दुरुस्ती होण्यास वर्षानुवर्षें जावीं लागतील. संस्थानिकांच्या आंतील दाबामुळें संघटनेचा फुगा फुटूं नये म्हणून त्या फुग्यावर लोकमताचें दडपण घालणें अवश्य आहे. आज संस्थानी प्रजाजनांची ओरड अरण्यरुदनवत् जरी होत आहे, तरी वेळचे वेळीं 'टाहो' फोडणें अवश्य आहे. कारण वेळप्रसंग आहे; कोण जाणे! या त्रस्त संस्थानी प्रजाजनांच्या साहाय्यार्थ कोणी धावून येणारच नाहीं असें कां मानावें?

---

# दक्षिणी संस्थान प्रजापरिषद, १९३३

## ( स्वागताध्यक्षीय भाषण )

दक्षिणी संस्थान प्रजापरिषदेचें हें १० वें अधिवेशन आज भरलें आहे. परिषदेची योजना फार दिवसांपूर्वींपासून झालेली नाहीं. मुदत थोडी असतांहि आपण येथें अगत्यपूर्वक आलां याबद्दल फार आनंद वाटतो. संस्थानिक जी गोष्ट घडूं देणार नाहींत ती आपण अवश्यमेव घडवून आणूं अशा इच्छेनें आपण इतउत्तर या गोष्टीकडे लक्ष देऊं लागलां ही समाधानाची गोष्ट आहे. संस्थानिक आपल्या प्रजेस अस्पृश्याप्रमाणें लेखून दूर सारतात; पण प्रजा मात्र त्यांना तशी लेखीत नाहींत. संस्थानिकांनीं अशा ठिकाणीं येऊन प्रत्यक्ष येथें काय चालतें याची माहिती घ्यावी. त्यांनीं येथें जे प्रतिनिधि पाठविले असतील त्यांनीं तरी येथील चर्चा यथातथ्य रीतीनें त्यांच्या कानांवर घालावी व ती तशी जाईल असें आम्ही तरी मानतों.

हें अधिवेशन जरी दरसाल भरत नाहीं तरी मधून मधून भरतेंच. संस्थानी प्रजेची ही चळवळ १२ वर्षांपेक्षां जुनी नाहीं. तेव्हां या १२ वर्षांत आपण काय मिळविलें हें आपण विहंगमदृष्टीनें पाहणें योग्य होईल. आतांपर्यंत झालेली ही प्रगति थोडी नाहीं असें म्हणण्यास पुष्कळ जागा आहे. कारण प्रजेनें राजापाशीं कांहीं मागावयाचें याबद्दलच पूर्वी एक प्रकारची भीति वाटत होती. ती स्थिति आज जाऊन प्रजेस आपलें अंतिम ध्येय काय आहे हें नक्की समजलें असून आपले मूलभूत हक्क तरी कोणते आहेत याची प्रजाजनांना पूर्ण कल्पना आली आहे. ज्ञान होणें ही निम्मी मजल व त्या ज्ञानापासून साक्षात्कार ही दुसरी पायरी. निदान गेल्या बारा वर्षांच्या चळवळीपासून प्रजेस बरेंच ज्ञान प्राप्त झालें आहे. दक्षिण महाराष्ट्रांतील कांहीं संस्थानांत जीं कायदेमंडळें स्थापन झालेलीं आहेत तीं या चळवळीचाच परिणाम असें म्हणण्यास हरकत नाहीं. आतां हीं कायदेमंडळें कोठेंकोठें उपजतांच मेलीं अगर मेलेलींच उपजलीं अशी स्थिति असली तरी, स्थापन झालीं आहेत हें कांहीं थोडें-थोडकें झालें नाहीं.

## कायदेमंडळें द्या !

राजांना त्यांच्या दृष्टीनें सांगण्याचा जेव्हां प्रसंग येतो तेव्हां मी त्यांना आपण आपल्या संस्थानांत कायदेमंडळ स्थापन करा असें सांगतों; व कायदेमंडळाची मागणी ही पहिली गोष्ट आहे असें इकडे प्रजेला सांगतों. वरपांगी का होईना, एक संस्थानिक असेंहि म्हणावयास तयार झाला आहे कीं "तुम्हांस काय मागावयाचें असेल तें मागा, मी देण्यास तयार आहे." त्यानें किती दिलें हें मला माहीत नाहीं. पण तो जाहीर रीतीनें म्हणतों कीं, स्वराज्य देण्यास मी तयार आहे. १२ वर्षांत असा एक तरी संस्थानिक निघाला ही खरोखर अभिमानाची गोष्ट होय. संस्थानांत स्थानिक संस्थांची घटना अद्यापि झाली नाहीं; तेव्हां अगोदर कायदेमंडळें स्थापन होणें हें 'आधीं कळस मग पाया' यासारखें होत असलें तरी, कायदेमंडळें अस्तित्वांत आल्यावर त्यांचीहि स्थापना उत्तम रीतीनें करतां येईल. संस्थानांत स्थापन झालेल्या कायदेकौन्सिलांची स्थिति मीं पाहिली आहे. कांहींमध्यें अपात्रता दिसून आली, तर कांहींचें काम चांगलें चाललें आहे. मागासलेल्या मिरजेमध्येंहि कायदेमंडळ स्थापन झालें याबद्दल मला आनंद वाटतो. दक्षिण महाराष्ट्रांत कोल्हापूर हें

सर्वांत मोठें संस्थान आहे. या संस्थानांत मात्र कायदेमंडळ अद्यापि नाहीं. त्याचा आराखडा तयार झाला असें ऐकतों! दरबार फेडरेशनची वाट पाहत बसल्याचें मीं ऐकलें आहे. फेडरेशन झालें कीं कोल्हापुरास देखील कायदे-मंडळ स्थापन होईल. 'देखील' असें म्हणण्याचें कारण कोल्हापुरास झालें म्हणजे सर्व ठिकाणीं झालें असें समजावें! दक्षिण महाराष्ट्रांतील संस्थानांची स्थिति उत्तर हिंदुस्थानांतील संस्थानांपेक्षां आतां सुधारली आहे. संस्थानांत आपल्या प्रजेस अधिकार देण्याचे दृष्टीनें या संस्थानांत इष्ट ती सुधारणा निदान सुरू झाली असल्यानें संस्थानें जगावींत, तीं मरूं नयेत असेंच वाटेल. ऐन-जिनसी संस्थानें बुडवावीं असें मला वाटत नाहीं. कारण मी आशावादी आहे. पण राजे लोकांनीं प्रजेचे हक्क सतत धुडकावून टाकण्याचाच निश्चय केला तर मलाहि हीं संस्थानें जावींत असें वाटेल!

## संस्थानांचें एकीकरण करा

दक्षिण महाराष्ट्रांत लहान लहान संस्थानें आहेत; त्या संस्थानांचें एकीकरण व्हावें असें मला वाटतें. कारण असें झालें म्हणजे त्या त्या संस्थानांत कांहीं तरी चांगली प्रगति होऊं शकेल. संघटन अगर एकीकरण करण्याचा या संस्थानिकांनीं निश्चय केला तर त्याचा फायदा सर्वांना सारखा मिळेल; आणि मग संस्थानें बुडविलीं जावींत असा प्रवाद ऐकूं येणार नाहीं. कारण अशा कांहीं महत्त्वाच्या गोष्टी आहेत कीं, त्या लहान संस्थानिकांच्या हातून साध्य होणार नाहींत. ज्या संस्थानांत न्यायाच्या कामीं ढवळाढवळ बिलकूल होत नाहीं, व प्रजेस जरी झोपेंतून जागें केलें तरी ती संस्थानिकांच्या न्यायदाना-वर अत्यंत विश्वास आहे असें म्हणत उठेल, अशा संस्थानिकास १०० खून माफ आहेत असें मी म्हणेन! 'खून' याचा लक्षणेनेंच अर्थ घ्यावयाचा आहे! चांगल्या न्यायदानावर प्रजेच्या उन्नतीचें अधिष्ठान आहे. लहान लहान संस्थानांत अशी गोष्ट होणें मनांत असली तरी शक्य नाहीं. न्यायखातें स्वतंत्र असणें जरूरीचें आहे. त्यावर संस्थानिकांचें नियंत्रण असूं नये. अशाकरितां दक्षिण महाराष्ट्रांतील दहा संस्थानांनीं एक स्वतंत्र हायकोर्ट मध्यवर्ती ठिकाणीं स्थापून प्रजेस योग्य न्याय देण्याची व्यवस्था करावी. अशा न्यायाधिका-ऱ्यांना पगारहि चांगला देणें शक्य होऊन तो स्वतंत्र रीतीनें उत्तम न्याय-दान देऊं शकेल. तेव्हां एकीकरण करण्याची बुद्धि संस्थानिकांनीं प्रकट करावी. सॅनिटेशन अगर तत्सम सार्वजनिक हिताच्या गोष्टींचें एकीकरण

केल्यानें त्याहि चांगल्या होतील. पोलिटिकल खातें ज्या त्या संस्थानिकानें स्वतंत्र ठेवावें.

## प्रजेला कोणते हक्क द्यावेत

संस्थानांत खर्च बांधून गेले आहेत, तेव्हां खाजगी खर्चावर शेंकडा अमुक एक रक्कम ठरवावी व बाकीच्या बाची प्रजेकडे सोपवाव्या. यांत संस्थानिकांस थोडा हक्क बुडवून घ्यावा लागेल. चोरून अमुक एक खात्यावर अमुक रक्कम खर्च घालतां येते ती यापुढें त्यांना घालतां येणार नाहीं. हें जरी खरें असलें तरी तसें होणें वाजवी नव्हे. प्रजेनेंहि धर्मादायावर होणारा खर्च बुडवूं नये. सरकारला देण्याची खंडणी ही दिलीच पाहिजे. तसेंच पोलीस व शिबंदी यांचा खर्च दरबारकडे ठेवून बाकीचीं खातीं प्रजेकडे देण्यास कोणती हरकत आहे? पब्लिक वर्क्स खातें, सॅनिटेशन खातें, शाळा खातें हीं सर्वस्वीं लोकांच्या हातीं संस्थानिकांनीं कां देऊं नयेत? संस्थानिकांना यांत का बाऊ वाटतो हें कळत नाहीं! या बाबतींत ते मुत्सद्दीपणा दाखवीत नाहींत असें म्हणणें भाग आहे. हे अधिकार प्रजेस दिले तर काय हानि होते? संस्थानिकांनीं नेमलेले पगारी कारभारी आहेतच. ते परस्पर शिव्या खातील. तोंडाला त्यांना बळी दिलें तर संस्थानिकांच्या मागचा प्रजेचा भुंगा आपोआप कमी होईल! संस्थानिकांशीं खासगी बोलण्याचा जेव्हां एखादे वेळीं प्रसंग येतो तेव्हां आम्ही त्यांना "प्रजेला कायदेकौन्सिलें देऊन काय गंमत होते ती तरी बघा" असें सांगतों. पण त्यांना ही साधी गोष्ट देखील कशी कळत नाहीं कोण जाणे!

असो. गेल्या १०-१२ वर्षांत काय झालें याचें थोडें विवेचन केलें. या परिषदेचें अध्यक्षस्थान स्वीकारण्याचें दि. ब. लठ्ठे यांनीं कबूल केलें याबद्दल मी त्यांचे दक्षिण प्रजापरिषद संस्थेतर्फे आभार मानतों. दि. ब. लठ्ठे यांचा संस्थानी प्रश्नांचा व्यासंग व दृढाभ्यास आहे. प्रजेचे व राजाचे हक्क काय आहेत याबद्दल त्यांना उत्कृष्ट ज्ञान आहे. तसेंच एका मोठ्या संस्थानाचे दिवाण म्हणून त्यांनीं काम केलें असल्यानें त्यांच्या अनुभवाचा आपल्यास फायदा होईल व त्यांचा सल्ला मार्गदर्शक होईल. अशा अनुभवाचे गृहस्थ आज आपल्यास अध्यक्ष म्हणून लाभले. तेव्हां त्यांनीं अध्यक्षस्थान स्वीकारावें अशी मी सूचना करतों.

---

# संस्थानें— पूर्वजांचीं स्मृतिचिन्हें

[ ता. २९ ऑक्टोबर १९३७ रोजीं सांगली येथील निरनिराळ्या संस्थांनीं दिलेल्या मानपत्रास उत्तर म्हणून केलेलें भाषण.]

संस्थानांसंबंधीं माझें असें मत आहे कीं, पूर्वजांच्या कर्तृत्वाचीं स्मृतिचिन्हें म्हणून संस्थानें कायम राहावींत, हें माझें स्पष्ट मत आहे. संस्थान या संस्थेबद्दल मला पूर्ण आदर वाटतो. मी जसा राजांचा मित्र आहे तसा प्रजेचाहि मित्र आहे. दोघांचेहि हक्क ऊर्जितावस्थेस यावेत अशासाठीं गेलीं १५-२० वर्षें मी बोलत व लिहीत आलों आहे. प्रजेनें केलेली कोणतीहि अत्याचारी चळवळ मला मान्य नाहीं. त्याबरोबर राजांचा एकतंत्री कारभार मला केव्हांहि पसंत पडणार नाहीं. यामुळेंच मला दोघांवरहि टीका करावी लागली. माझीं स्वतःचीं मतें सोडावीं लागतील असें मित्रत्व मला मुळींच नको आहे. संस्थानिकांमध्यें माझा अतिशय मित्र असा कोणी नाहीं. तथापि तीन-चार संस्थानिक मी म्हणतों ते केव्हां केव्हां ऐकून घेतात म्हणजे माझ्या म्हणण्याचा 'विचार करतों' एवढें म्हणतात. अशा संस्थानिकांशीं माझा तह झाला आहे. त्यांच्या आमच्या खाजगी बोलण्यांत पूर्ण सलोखा असतो.

पूर्वजांची स्मृति कायम राहावी म्हणून संस्थानें कायम राहावींत असें मी म्हणतों. मल्हारराव होळकर मेंढ्या चारीत होता. तो एका हयातींत पेशव्यांचा आधारस्तंभ होऊन बसला. त्याचे वंशज संस्थानिक जर आज नसले तर इंग्रजाला अगर कोणाहि परकीयांना आमच्या कर्तृत्वाची जाणीव कोणाकडे बोट दाखवून करून देतां येईल ? राणोजी शिंदे साधा हुजऱ्या होता; पण मराठेशाहीच्या अंतकाळीं महादजी शिंदा व इंग्रज हे एकमेकांचे प्रतिस्पर्धी होते; इंग्रजांना विरोध करणारा एक मराठा संस्थानिक होता व आजचें ग्वाल्हेर संस्थान त्या पुरुषाचें स्मारक आहे.

संस्थानें कायम असावीं असें म्हणावयास आणखी एक कारण आहे. ब्रिटिश हिंदुस्थानापेक्षां एखादी राजकीय अगर सामाजिक सुधारणा संस्थानांतच चटकन होऊं शकते. ब्रिटिश सरकारच्या चक्रव्यूहांत सांपडली तर जी कल्पना अभिमन्यूप्रमाणें मरावयाची, तीच संस्थानिकांचें मन वळविलें तर अमलांत आलेली दिसते.

संस्थानांच्या बाजूस माझा तिसरा मुद्दा म्हणजे अधिकाराच्या जागांच्या हिंदीकरणासंबंधीं आम्ही बाहेर चळवळ करतों. तें कार्य संस्थानांत आपोआप होऊं शकतें. म्हैसूरमधील कन्नमर्डीचें ( कृष्णराजसागर ); धरण घ्या किंवा भद्रावतीचा कारखाना पाहा. तेथें एक सुद्धां साहेबाची टोपी दिसावयाची नाहीं. ब्रिटिश हिंदुस्थानांत तसें नाहीं. कितीहि कल्पकतेनें पूल किंवा दिवाण-खाना बांधा त्यावर साहेबाच्या नांवाची पाटी लागून कर्तबगारीचें सर्व श्रेय तिकडे जावयाचें ! न्याय, मुलकी, अंमलबजावणी वगैरे सर्व खात्यांचे अधिकार म्हैसूरसारख्या संस्थानांत आपलेच लोक पाहत आहेत. राजानें जर आपल्या लोकांचा अभिमान धरला तर लोकहि त्याच्याबद्दल अभिमान बाळगतील हें उघड आहे. कर्तबगारी दाखवावयास वाव, मोठा पगार व मान आपल्या लोकांस मिळूं शकतो. म्हणून संस्थानें कायम राहावींत असें माझें मत आहे.

संस्थानच्या शाश्वतीसंबंधीं मी बोलत असतांना संस्थानी प्रजेला स्वराज्य पाहिजे ही गोष्ट मी निःसंदिग्धपणें पुढें मांडत आलों आहे. संस्थानिक व संस्थानांतील लोक यांचें हित परस्परावलंबी असल्यामुळें ह्या दोहोंबद्दलचीं माझीं विधानें एकमेकांना मुरड घालणारीं नाहींत. शक्य तितके अधिकार लोकांना मिळाले पाहिजेत असें मी संस्थानिकांना सांगत आलों आहे. मात्र या बाबतींत लोकांनीं फक्त चळवळीचा वरवर दिसणारा भाग पाहून उपयोगाचें नाहीं ही गोष्ट लक्षांत न आल्यामुळें विशेष जबाबदार लोकांकडून चळवळ होत नाहीं असा दुर्दैवानें अनुभव येतो. भोर संस्थानांत ही गोष्ट प्रत्ययास आली आहे. कोणतीहि चळवळ करावयाची ती विवेक बुद्धीनें झाली पाहिजे, ही सर्वांनीं खूणगांठ बांधली पाहिजे. संस्थानिक आपली सत्ता सोडावयास तयार नसणार हें अगदीं स्वाभाविक आहे. या बाबतींत गृहराज्यांत प्रयोग करून पाहावा. तेथेंहि जुनी एकतंत्री राज्यसत्ता चालते ती आपणांस सोड-वत नाहीं. यावरून हातची सत्ता सोडण्याची बुद्धि होण्यास मूळ मनुष्य-स्वभावांतच बदल झाला पाहिजे.

फेडरेशनमुळें एक गोष्ट वाईट झाली आहे. त्यामुळें संस्थानिकांना आपलें स्थान अधिक घट्ट झालें आहे असें वाटतें. संयुक्त राज्यघटनेंत संस्थानिक सरकारच्या उपयोगी पडणार व उलटपक्षीं सरकार संस्थानांमध्यें संस्थानिकांना अनियंत्रित राज्य करावयास सवलत देणार. आपण समजतों इतके संस्थानिक अप्रबुद्ध नाहींत. त्यांना आपला स्वार्थ चांगला कळतो. आपले हक्क दृढ

करण्यासाठीं अनेक कमिट्या व वकील, बॅरिस्टर देण्यांत संस्थानिकांनीं आतां पर्यंत कोट्यवधि रुपये खर्च केले आहेत. आपल्या प्रजेपासून व सरकारपासून पूर्ण स्वातंत्र्य मिळविण्यासाठीं संस्थानिकांनीं जर इतका पैसा खर्च केला आहे व आपली संघटना केली आहे, तर आपणहि ती कां करूं नये? संस्थानांतील लोकनियुक्त सभासदांनीं आपली संघटना जरूर करावी.

संस्थानांत कोठें रयत सभा तर कोठें रिप्रेझेंटेटिव्ह कौन्सिलस आहेत. परंतु साऱ्या संस्था जशा भासविल्या जातात तशा मुळींच नसतात. पन्नास वर्षांत त्यांत सुधारणा झालेली असत नाहीं. आम्हांला सांगण्यांत येतें कीं, विलायतेंतहि राजाला व्हेटोचा अधिकार आहे. पण तिकडे शंभर वर्षांत एखादे वेळीं उपयोगांत येणारा हक्क येथें हरएक बाबतींत ढवळाढवळ होत असतांना येथें कसा लागू पडणार?

लोकमत प्रभावशाली असणारें कायदेमंडळ एकाहि संस्थानांत नाहीं. आतां यावर नेहमीं विचारण्यांत येतें कीं, आम्ही इतक्या हाका मारतों पण दाद लागत नाहीं. त्याला उत्तर एकच. आपण युरोपचा इतिहास वाचा. १८४८ सालानंतर तिकडे निरनिराळ्या देशांतून चाललेल्या चळवळींचें आपण सूक्ष्म अवलोकन केलें तर तिकडील लोकांनीं कांहीं ठिकाणीं राजे काढून टाकले, तर कांहीं ठिकाणीं राजांचे अधिकार काढून टाकले असें आपणांस दिसून येईल. आपणाला यांपैकीं पहिलें उदाहरण घ्यावयाचें नाहीं. पण हरएक प्रकारचे प्रयत्न करून दुसरी गोष्ट साधावयाची. युरोपच्या इतिहासाबरोबर ब्रिटिश हिंदुस्थानांतील चळवळीचा इतिहास पाहा. त्याचाहि आपणांस उपयोग होईल. ब्रिटिश इंडियांत राजा पाहिजेच असा आग्रह नाहीं. कारण कॉंग्रेसनें पूर्णस्वातंत्र्य हें आपलें धोरण ठेवलें आहे एवढी गोष्ट वगळून संस्थानांतील लोकांना तिकडील चळवळीचें अनुकरण करतां येईल.

संस्थानांत राजे हवेत पण त्याबरोबरच स्वतंत्र नागरिक म्हणून राहतां आलें पाहिजे; यासाठीं तुम्हांला अतिशय यत्न केला पाहिजे. बाहेरच्या मदतीची अपेक्षा करतां कामा नये. या कामीं तुमची तुम्हीच चळवळ केली पाहिजे.

संस्थानिक नेहमीं म्हणत असतात कीं, क्रमानें प्रजेला आमच्या राज्यकारभारांत अंशभागी करून घेऊं. Progressive Realisation of Responsible Government या ब्रिटिश हिंदुस्थानांतील उक्तीचें

हें भाषांतर आहे, परंतु हें ध्येय जगाच्या अंतापर्यंत चालवयाचेंच आहे. ब्रिटिश सरकारनें लोकांमध्यें उदार मतांचा प्रसार केला. त्यांचीं हीं तत्त्वें आतां त्यांना बाधक होत आहेत. पण संस्थानिक हे या कामीं त्यांच्याहून शहाणे आहेत. उदार शब्द ते सहसा तोंडांतून काढीतसुद्धां नाहींत. आम्ही लोकांना सर्व हक्क द्यावयास तयार आहोंत असें आश्वासन देण्यासहि ते इच्छीत नाहींत. पण बाप जर मरेपर्यंत आपल्या जानव्याची किल्ली सोडीना तर वीस वर्षें उमरीचा मुलगा तें किती दिवस चालू देणार? बाप ही गोष्ट योग्य वेळींच जाणतो व मुलाची कांहीं सोय लावतो व आतां जे लोभी बापाला समजतें तें संस्थानिकाला जरूर कळलें पाहिजे; नाहीं तर संस्थानांत भलत्याच चळवळी होतील व त्यांचीं फळें संस्थानिकांना व प्रजेला भोगावीं लागतील. संस्थानिक जसे स्वतःला व आपल्या पगारी नोकरांना शहाणे समजतात तसे प्रजेंतहि पुष्कळ शहाणे लोक आहेत. संस्थानिकांचा पगार घेत नाहींत म्हणून ते कांहीं मूर्ख ठरत नाहींत. यासाठीं लोकांतील एखादा शहाणा मनुष्य संस्थानिकांनीं कौन्सिलर म्हणून घ्यावयास काय हरकत आहे?

एका संस्थानच्या विधि-मंडळांतील एका हुशार व तरुण सभासदाला संस्थानचा मंत्री म्हणून विनावेतन काम करण्याचा मीं एकदां सल्ला दिला होता. पण त्या संस्थानिकाला ती गोष्ट पटली नाहीं. त्यांनीं पगार देऊन नेमला कीं, तो अधिकारी सत्पात्र! कोण हा अन्याय्य! याचा जितका निषेध करावा तितका थोडा.

ब्रिटिश हिंदुस्थानांत लोकमतानुवर्ती कारभार चालू झाला याचा अर्थ पांच वर्षांत एकदां मत देऊन निवडणूक करतां येतें एवढाच आहे. सकृद्दर्शनीं यांत कांहीं अर्थ नाहीं असें वाटतें. सर्कशींतील सिंहासारखी मतदारांची स्थिति असते. तो कसाबसा तरी एकदां मत देऊन मोकळा होतो. बरें निवडून गेलेला मनुष्य तरी पूर्ण स्वतंत्र कुठें असतो? विधिमंडळांत गेला कीं, लागलीच कॉंग्रेसची शिस्त त्याच्या मागें. डोळे असून बघावयाचें नाहीं व कान असून ऐकावयाचें नाहीं अशी त्याची स्थिति. चार दोन प्रमुख माणसें बोलतील त्या-प्रमाणें हात वर करावयाचे हीच या सभासदांची कामगिरी. मतदार व पक्षाची शिस्त यांना संभाळतां संभाळतां स्वतःच्या स्वतंत्र बुद्धीचा उपयोग करण्यास अवसर कोठला मिळणार? आणि ही सत्ता तरी विधिमंडळातील प्रमुख लोकांच्या हातांत थोडीच आहे? खरी सत्ता सर्व वर्ध्यासच आहे. हरिजनाचा

अंक वाचून पाहावयाचा आणि सांगावयाचें, "हें पाहा आमचें धोरण" लोकसत्तात्मक राज्यपद्धतीची अशी जरी हास्यास्पद स्थिति असली तरी तिचें महत्त्व कमी होऊं शकत नाहीं. मी निवडून दिलेला मनुष्य राज्यकारभार चालवितो आहे हा अभिमान लहानसान नव्हे. मग असा अधिकार संस्थानिकांनीं आपल्या प्रजेला कां देऊं नये? या समाधानाखेरीज आपणास हितकारक वाटणाऱ्या गोष्टींचे प्रयोग करून पाहण्याची संधि संस्थानिकांनीं लोकांना अवश्य दिली पाहिजे. संस्थानिक कायम टिकून राहावा व त्याला आपल्या योग्यतेप्रमाणें राहण्यासाठीं तनखाहि मिळावा, एखाद्या साबणवडीसाठीं त्याला आमचें मत विचारण्याचें कारण पडूं नये. इतर लोकांपेक्षां तो मोठा, हें दिसेल असा त्याचा दर्जा लोकांनीं ठेवला पाहिजे. त्याचा कोणत्याहि प्रकारें अपमान न होईल ही खबरदारी घेतली पाहिजे. पूर्वापार चालत असलेल्या वहिवाटी, समारंभ, उत्सव अबाधित राहतील अशीहि आपण व्यवस्था केली पाहिजे. मात्र अनिर्बंध राज्य करण्याची सत्ता असूं नये. राजाला विशेष गोष्टी राखून ठेवून बाकीच्या प्रजेनें मागितल्या तर त्यांत काय बिघडलें? अशा तोडून दिलेल्या बाबींत ढवळाढवळ राजानें करतां कामा नये. तो तशी करील तर तोडून दिलें याचा अर्थ काय? संस्थानिक असा मार्ग जोंपर्यंत स्वीकारणार नाहींत तोंपर्यंत त्यांच्या मागच्या लोकांचा त्रास चुकणार नाहीं. स्टेट्स पीपल्स सोसायटीनें सांगली येथें जी संघटना केली आहे, तशी इतर संस्थानांत अवश्य व्हावी. त्यांत राजाचा द्रोह नाहीं, द्वेष नाहीं. असेंब्लींत चार लोकांनीं विस्कळित बसण्यापेक्षां एकविचारानें वागावें. त्यांनीं आपली मध्यवर्ती कचेरीहि ठेवावी. या संघानें संस्थानिकाला शिव्या द्यावयाच्या नाहींत, त्याची मानखंडना करावयाची नाहीं, त्याबरोबरच प्रजेच्या कार्याकडे संकल्पित केलेला पैसा व हक्क यासाठीं चिकाटीनें झगडत राहावयाचें असें धोरण स्वीकारलें पाहिजे. अशा एकजुटीचा आजच्या स्थितींतहि सरकारवर वजन पाडावयास उपयोग होईल.

— समाप्त —